अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणतां वाचे ॥ ५ ॥ तुका म्हणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या ॥ ६ ॥

११० गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनी ॥ १॥ येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळा ॥ २ ॥ लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ ३ ॥ तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा वाहो उभारा ॥ ४ ॥

१११ समुद्रवलयांकित पृथ्वीचें दान । करितां समान नये नामा ॥ १ ॥ म्हणऊनि कोणी न करावा आळस । म्हणा रात्रंदिवस राम राम ॥ २ ॥ सकळही शास्त्रें पठण करितां वेद । सरी नये गोविंद नामें एकें ॥ ३ ॥ सकळही तीर्थें प्रयाग काशी । करिता नामाशीं तुळतिना ॥ ४ ॥ कर्वतीं कर्मरीं देहासी दंडण । करितां समान नये नामा ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । नाम हेंचि सार विठोबाचें ॥ ६ ॥

११२ न पालटे एक । भोळा भक्ताचि भाविक ॥ १ ॥ येरां नाश आहे पुढें । पुण्य सरता उघडें ॥ २ ॥ नेणे गर्भवास । एक विष्णु-चाचि दास ॥ ३ ॥ तुका म्हणे खरें । नाम विठोबाचें बरें ॥ ४ ॥

११३ झाडें वोरपोनि खाऊनिया पाला । आठवि विठ्ठला वेळोवेळा ॥ १ ॥ वल्कलें नेसूनि चिंध्रिया वेढूनी । सांडी जवळुनी देहभान ॥ २ ॥ लोकमान वमनासमान मानणें । एकांतीं राहणें विठोबासाठीं ॥ ३ ॥ सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ४ ॥ ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥ ५ ॥

११४ विठोबाचें नाम ज्याचें मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल भावें म्हणे वाचे । तरी तो काळाचें दांत ठेंची ॥ २ ॥ बहूत तारिलें सांगों किती आतां । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे म्याही ऐकोनिया कीर्ति । धरिला एकांतीं हृदयामाजी ॥ ४ ॥

११५ नाम न वदे ज्याची वाचा । तो लेक दों बापांचा ॥ १ ॥ हेचि ओळख तयाची । खूण जाणा अभक्ताची ॥ २ ॥ ज्यासी विठ्ठल

नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥ ३ ॥ ठावा नाहीं पांडुरंग । जाणा जातांचा तो मांग ॥ ४ ॥ नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ॥ ५ ॥ तुका म्हणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥ ६ ॥

११६ नाशिवंत देह नासेल हा जाणा । कां रे उच्चाराना वाचे नाम ॥ १ ॥ नामाचे तारिले कोट्यान हे कोटी । नामें हे वैकुंठीं बैस-विले ॥ २ ॥ नामापरतें सार नाहीं त्रिभुवनीं । तें कां तुम्हीं मनीं आठवाना ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम वेदासी आगळें । तें दिलें गोपाळें फुकासाठीं ॥ ४ ॥

११७ नाम दूषी त्याचें नको दरुषण । विष तें वचन वाटे मज ॥ १ ॥ अमंगळ वाणी नाइकवे कानीं । निंदेची पोहणी उठे तेथें ॥ २ ॥ काय साच लभ्य त्याचिये वचनीं । कोणत्या पुराणीं दिली ग्वाही ॥३॥ काय आड लावूं त्याचिया तोंडासी । आतां या जिभेसी काय करूं ॥४॥ तुका म्हणे संत न मानिती त्यांस । घेऊं पाहे ग्रास यमदूत ॥ ५ ॥

११८ हित तें हें एक राम कंठीं राहे । नाठवती देहभाव देहीं ॥१॥ हाचि एक धर्म निज बीजवर्म । हेंचि जाळी कर्में केलीं महा ॥ २ ॥ चित्त राहे पायीं रूप बैसे डोळां । जीवें कळवळा आवडीचा ॥ ३ ॥ अखंड न खंडे अभंग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु ॥ ४ ॥

११९ मंत्र चळे पिसें लागतें सत्वर । अबद्ध ते फार तरलें नामें ॥१॥ अशौच तो बाधो आणिकां अक्षरां । नाम निदसुरा घेतां तरे ॥ २ ॥ राग ज्ञान घात चुकतां होय वेळ । नाम सर्वकाळ शुभदायक ॥ ३ ॥ आणिकां भजना बोलिला निषेध । नाम तें अभेद सकळां मुखीं ॥ ४ ॥ तुका म्हणे तपें घालिती घालणी । वेश्या उद्धरूनि नेली नामें ॥ ५ ॥

१२० वेदाचें गव्हर न कळे पाठकां । अधिकार लोकां नाहीं येरां ॥ १ ॥ विठोबाचें नाम सुलभ सोपारें । तारी एकसरें भवसिंधु ॥ २ ॥ जाणत्या असाध्य मंत्र तंत्र काळ । येर तो सकळ मूढ लोक ॥ ३ ॥ तुका म्हणे विधिनिषेध लोपला । उच्छेद या झाला मारगाचा ॥ ४ ॥

१२१ नव्हे गुरुदास्य संसारियां । वैराग्य तरीं भेणें कांपे विषया तैसे नाम नव्हे पंढरिराया । जया सायास न लगती ॥ १ ॥ म्हणोनि गोड सर्व भावें । आंघोळी नलगे तोंड धुवावें । अर्थ चाड जीवें । नलगे भ्यावें संसारा ॥२॥ कर्म तंव न पुरे संसारिक । धर्म तरी फलदायक । नाम विठ्ठलाचें एक । नाशी दुःख भवाचें ॥३॥ न लगे सांडणें मांडणें। आगम निगमाचें देखणें । अवघे तुका म्हणे । विठ्ठल नामें आटलें ॥४॥

१२२ कर्म धर्म नव्हती सांग । उण्या अंगें पतन ॥ १ ॥ भलत्या काळें नामावळी । सुलभ भोळीं भाविकां ॥ २ ॥ प्रायश्चित्तें पडती पायां । गाती तयां वैष्णवां ॥ ३ ॥ तुका म्हणे नुपजे दोष । करा घोष आनंदें ॥ ४ ॥

१२३ प्राणिया एक बीज मंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हण कां मुरारी ॥ १ ॥ हेंचि साधन रे तुज सर्वांहि सिद्धींचें । नाम उच्चारीं रे गोपाळाचें वाचे ॥ २ ॥ उपास पारणें नलगे वनसेवन । नलगे धूम्रपान पंचाग्निसाधन ॥ ३ ॥ फुकाचें सुखाचें कांहीं न वेंचे भांडार । कोटी यज्ञापरिस तुका म्हणे हें सार ॥ ४ ॥

१२४ रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ १ ॥ धन्य तो एक संसारी । राम नाम जो उच्चारी ॥ २ ॥ राम नाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ ३ ॥ तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्ही ॥ ४ ॥

१२५ काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ १ ॥ नाम वाचे श्रवण कीर्ति । पाउलें चित्तीं समान ॥ २ ॥ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥ तुका म्हणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामीं ॥ ४ ॥

१२६ वेद अनंत बोलिला । अर्थ इतकाची साधिला ॥ १ ॥ विठो-बासी शरण जावें । निज निष्ठे नाम गावें ॥ २ ॥ सकळ शास्त्रांचा

विचार । अंतीं इतकाची निर्धार ॥ ३ ॥ अठरा पुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हाचि हेत ॥ ४ ॥

१२७ अनुहातध्वनि वाहे सकळां पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ॥ १ ॥ सकळां जीवांमाजी देव आहे खरा । देखिल्या दुसरा विण न तरे ॥ २ ॥ ज्ञान सकळांमाजी आहे हें साच । भक्तीविण तेंच ब्रह्म नव्हे ॥ ३ ॥ काय मुद्रा कळल्या कराव्या सांगतां । दीप न लागतां उन्मनीचा ॥ ४ ॥ तुका म्हणे नका पिंडाचें पाळण । स्थापूं नारायण आतुडेना ॥ ५ ॥

१२८ हांकेसरसी उडी । घालुनियां स्थंभ फोडी ॥ १ ॥ ऐसी कृपावंत कोण । माझे विठाई वांचून ॥ २ ॥ करितां आठव । धांवोनियां घाली कव ॥ ३ ॥ तुका म्हणे गीतीं गातां । नामें द्यावी सायुज्यता ॥ ४ ॥

१२९ नाम साराचेंही सार । शरणांगत यमकिंकर ॥ १ ॥ नाम उत्तम उत्तम । वाचे बोला पुरुषोत्तम ॥ २ ॥ नाम जपतां चंद्रमौळी । नामें तरला वाल्हा कोळी ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्णूं काय । तारक विठोबाचे पाय ॥ ४ ॥

१३० प्रेम तेथें वास करी । मुखीं उच्चारितां हरी ॥ १ ॥ प्रेमें यावें तया गांवा । चोजवीत या वैष्णवां ॥ २ ॥ प्रेम पाठीं लागे वळें । भक्त देखोनिया भोळे ॥ ३ ॥ प्रेम न वजे दवाडितां । शिरे वळें जेथें कथा ॥ ४ ॥ तुका म्हणे थोर आशा । प्रेमा घरीं विष्णुदासा ॥ ५ ॥

१३१ वंदूं चरणरज सेवूं उष्टावळी । पूर्व कर्मा होळी करूनी सांडूं ॥ १ ॥ अमुप हें गांठी बांधूं भांडवल । अनाथा विठ्ठल आम्हां जोगा ॥ २ ॥ अवघे होती लाभ एका या चिंतनें । नामसंकीर्तनें गोविंदाच्या ॥ ३ ॥ जन्ममरणाच्या खुंटतील खेपा । होईल हा सोपा सिद्ध पंथ ॥ ४ ॥ गेले पुढें त्यांचा शोधीत मारग । चला जाऊं माग घेत आम्ही ॥ ५ ॥ तुका म्हणे घालूं जीवपणा चिरा । जाऊं त्या माहेरा निजाचिया ॥ ६ ॥

१३२ नामाची आवडी तोचि जाणा देव । न धरी संदेह कांहीं मनीं

॥ १ ॥ ऐसें मी हें नाहीं बोलत नेणतां । आणोनि संमता संतांचिया ॥ २ ॥ नाम म्हणे तया उरलें साधन । ऐसें हें वचन बोलों नये ॥३॥ तुका म्हणे सुख पावे या वचनीं । ज्याचीं शुद्ध दोन्ही मायबापें ॥ ४ ॥

१३३ सर्व सुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥ १ ॥ सर्वांगें तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ॥ २ ॥ ऐसी उभारिली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरवसा ॥ ४ ॥

## श्री निळोबामहाराज

१३४ नामापाशीं भुक्तिमुक्ति । ज्ञान विरक्ति हरिनामीं ॥ १ ॥ नामापाशीं दया शांति । साधना समाप्ती हरिनामीं ॥ २ ॥ नामें प्राप्त नित्यानंद । स्वरूपावबोध हरिनामें ॥ ३ ॥ नामीं तिष्ठती ऋद्धिसिद्धि । तुटती उपाधी हरिनामें ॥ ४ ॥ निळा म्हणे हरिनाम सार । उतरि भवपार हरिनाम ॥ ५ ॥

१३५ विठ्ठल नामें वाहे टाळी । ब्रह्मानंदाच्या कल्लोळीं ॥ १ ॥ निजात्मसुखाचा सोहळा । विठ्ठल अवलोकिती डोळां ॥ २ ॥ सकळही सुकृतें ओळलीं । विठ्ठलरूपें उभीं ठेलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जडली बुद्धी । नित्य हरिनामें समाधी ॥ ४ ॥

१३६ विठ्ठल विठ्ठल म्हणतां वाचे । स्वरूप त्याचें आठवे ॥ १ ॥ श्याम सुंदर कटीं कर । रूप मनोहर तेजस्वी ॥ २ ॥ दिव्य सुमनें तुळशीमाळा । मळवट पिंवळा रेखियेला ॥ ३ ॥ निळा म्हणे मुगुटा-वरी । खोंविल्या मंजुरी कोंवळिया ॥ ४ ॥

१३७ होय अंतरीं पालट । करितां पाठ हरिनामें ॥ १ ॥ देवा ऐसे देवाचि होती । जे या भजती विठ्ठला ॥ २ ॥ ऐसा याचा प्रताप ठसा । प्रगटे सारिसा नामजपें ॥ ३ ॥ निळा म्हणे लटिकें नव्हे । पहा स्वानुभवें आपुलिया ॥ ४ ॥

१३८ यम नियम प्राणायाम । साधे जपतां रामनाम ॥ १ ॥ रामनाम जपतां आधीं । नासताती आधिव्याधी ॥ २ ॥ रामनामीं

जडली वाचा । हरिरूप होय साचा ॥ ३ ॥ निळा म्हणे रामनाम । पावलासे मोक्षधाम ॥ ४ ॥

१३९ पशु पक्षी श्वापद याती । भृंग पतंग कीटक जाती ॥ १ ॥ हरीतें भजतां हरिरूप झालीं । निजानंदीं निमग्न ठेलीं ॥ २ ॥ दैत्य दानव निशाचर । मानव याती नारीनर ॥ ३ ॥ निळा म्हणे भजतां हरी । अगाधपणें पावले थोरी ॥ ४ ॥

१४० निजात्मप्राप्तीलागीं सार । हरिचिया उच्चार नामाचा ॥ १ ॥ हेंचि बिज हेंचि गुज । हेंचि निज निजाचें ॥ २ ॥ ऐसें संतीं पुरस्कारुनी । सांगितलें कानीं येऊनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे परम प्राप्ती । नामींचि विश्रांति हरीचिया ॥ ४ ॥

१४१ उच्चारितां नाम वाचे । झालें त्याचें स्वरूपाचें ॥ १ ॥ नाहीं तया उरलें दुजें । आत्मतेजें जग भासे ॥ २ ॥ ब्रह्मानंदीं निमग्न वृत्ति । विराजति स्वानंदें ॥३॥ निळा म्हणे गुणातीत।अखंडित निजबोधें॥४॥

१४२ उपदेशिला एकचि सार । मजही उच्चार नामाचा ॥ १ ॥ म्हणती न पडे साधन फंदी । होशिल दोंदी काळाचा ॥ २ ॥ करी संत समागम । गाई हरिनाम कीर्तनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा संतीं । केला निज प्रीति उपदेश ॥ ४ ॥

१४३ सुखें जन्मांतरें घेऊं । नामें आळवूं श्रीहरीचीं ॥ १ ॥ नाहीं आम्हा त्याचें कोडें । संसार बापुडें तें काय ॥ २ ॥ कळिकाळाचें भय तें किती । पायां पडती यमधर्म ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वहि सिद्धी । रुळती पदीं हरिनामें ॥ ४ ॥

१४४ नामचिंतनें जडली प्रीती । भगवद्भावना सर्व भूतीं ॥ १ ॥ हेचि परमार्थ साधन । मुखीं नाम हृदयीं ध्यान ॥ २ ॥ विषयभोगीं विलोभता । मोह न बाधी त्या ममता ॥ ३ ॥ निळा म्हणे निजध्यासें । झाले मुक्त शुका ऐसे ॥ ४ ॥

१४५ संत एकांतीं बैसले । सर्वही सिद्धांत शोधिले । ज्ञानदृष्टी

अवलोकिलें । सारांश काढिलें निवडुनी ॥ १ ॥ तें एक श्रीहरीचें नाम । सकळ पातकां करी भस्म । अधिकारी उत्तम आणि अधम । चारी वर्ण नरनारी ॥ २ ॥ विठ्ठल नामें उच्चार ओठीं ॥ मूर्ती पाहतां दृष्टी । लाभे ब्रह्मतेची पुष्टी । वाढे पोटीं निजशांती ॥ ३ ॥ देखतां कांपती त्या काळ । हरिच्या ऐसें अंगी बळ । प्रगटे वैराग्य अढळ । तुटती मळ ममतेचे ॥ ४ ॥ महादोषांची झाडणी । अहंभावादिकांची गाळणी । उभय कुळें बैसवोनि । जाती विमानी वैकुंठा ॥ ५ ॥ ऐसा नामाचा प्रताप । नेदी उरो पुण्य पाप । भंगूनियां त्रिविध ताप । ठाकती सद्रूप होऊनि ॥ ६ ॥ दृश्य नुरे त्याचिये दृष्टी । ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी । निळा म्हणे धरितां कंठीं । वाचि मात्र हरिनाम ॥ ७ ॥

१४६ हेंचि परमार्थाचें सार । हरिचिया उच्चार नामाचा ॥ १ ॥ जिहीं केला पावले ते । वैकुंठीं सरते सुखी झाले ॥ २ ॥ गातां वानितां हरि गुणरासी । झाले त्रैलोक्यासी पूज्य ते ॥ ३ ॥ निळा म्हणे निका उपावो । सांपडला ठावो वैष्णवा ॥ ४ ॥

१४७ नाम वाचे श्रवण कीर्ती । पाऊलें चित्तीं समान ॥ १ ॥ काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ २ ॥ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वरूपसिद्धी । नित्य समाधि हरि नामीं ॥ ४ ॥

१४८ हेंचि आम्हासी गुरुवाक्य । हरिचें नाम उपदेशिलें ॥ १ ॥ आणिका साधनीं चाडची नाहीं । घालिती अपायीं म्हणोनियां ॥ २ ॥ योगाभ्यास मंत्रजप । पुरश्चरण तप हरिनाम ॥ ३ ॥ निळा म्हणे दाविला मार्ग । हाचि हा चांग गुरूनाथें ॥ ४ ॥

## श्री नामदेव महाराज

१४९ नामाचा महिमा नेणेचि पैं ब्रह्मा । म्हणोनियां कर्मा अनुसरला ॥१॥ नाम हेंचि कर्म नाम हेंचि धर्म । केशव हेंची वर्म सांगितलें ॥२॥ नाम शुद्ध स्नान नाम शुद्ध संध्या । नामाविणे वेद आणिक नाहीं

॥ ३ ॥ करितां आचमन केशव नारायण । करिती उच्चारण आधीं हेंचि ॥४॥ लग्नाचेये काळीं म्हणती सावधान । लक्ष्मीनारायण चिंतन करा ॥ ५ ॥ देहाचेये अंतीं प्रायश्चित देती । शेवटीं वदविती रामनाम ॥ ६ ॥ ऐसिया नामापरतें नाहीं सार । गिरिजेसी शंकर उपदेशी ॥७॥ करितां पितृश्राद्ध कर्म आचरती । शेवटीं म्हणती एको विष्णु ॥ ८ ॥ नामें होय गती नामें होय मुक्ति । नामयाचे चित्तीं रामनाम ॥ ९ ॥

१५० हडबडलीं पातकें । घेतां रामनाम एकें ॥ १ ॥ नाम घेतां तत्क्षणीं । चित्रगुप्तें सांडिली लेखणी ॥ २ ॥ घेऊनि पूजेचा संभार । ब्रह्मा येतसे समोर ॥ ३ ॥ नामा म्हणे जरी हें लटकें । तरी माझें छेदावें मस्तक ॥ ४ ॥

१५१ असत्याचे मळ बैसले ये वाचे । ते न फिटती साचे तीर्थोदकें ॥१॥ हरीनामामृत प्रक्षाळी जिव्हेतें । पाणिये बहुतें काय करिती ॥२॥ गंगासागरादी तीर्थं कोडीवरी । हरिनामाची सरी न पवती ॥३॥ हरिनाम गंगे सुस्नात पैं झाला । नाम्याजवळीं आला केशिराज ॥ ४ ॥

१५२ करीं घेऊनि ब्रह्मविणा । नारद बोळगे नारायणा ॥ १ ॥ हेंचि हेंचि तत्वसार । नाम म्हणे निरंतर ॥ २ ॥ आपण शिव आणि शक्ति । राम नाम ते जपती ॥३॥ गात नाचत प्रल्हाद वीर । खांबीं केलासे अवतार ॥ ४ ॥ कुंटिणी पाक्षिया म्हणे रामा । तिसी नेलें निजधामा ॥५॥ अहल्येसी लागतां चरण । तिसीं आलें मनुष्यपण ॥ ६ ॥ अजामेळ पातकी अपार । नामें पावला पैल पार ॥ ७ ॥ गजेंद्रें केलें स्मरण । त्याचें तोडीलें बंधन ॥ ८ ॥ द्रौपदी स्मरे हृषिकेशी । वस्त्रें पुरविलीं तियेसीं ॥ ९ ॥ परिक्षितीसीं घडलें स्मरण । त्यासी झाले सुलभ चरण ॥ १० ॥ नामा म्हणे निरंतरु । गगनीं अढळ केला धुरू ॥ ११ ॥

१५३ अग्नी जाळी तरी न जळती पांडव । हृदयीं माधव धरिला म्हणोनी ॥ १ ॥ अग्नी जाळी तरी न जळती गोपाळ । हृदयीं देव ळबो धरिला म्हणोनी ॥ २ ॥ अग्नी जाळी तरी न जळे हनुमंत । हृदयीं

सीताकांत म्हणोनियां ॥ ३ ॥ अग्नी जाळी तरी न जळे प्रल्हाद । हृदयीं गोविंद म्हणोनियां ॥ ४ ॥ अग्नी जाळी तरी न जळे पै सीता । हृदयीं रघुनाथ धरिलें म्हणोनिया ॥ ५ ॥ लंकेसी उरलें बिभीषणाचें घर । हृदयीं सीतावर धरिला म्हणोनियां ॥ ६ ॥ नामा म्हणे स्वामी स्मरावें गोविंदा । चुके भवबाधा संसाराची ॥ ७ ॥

१५४ आणीक ही मंत्र मोक्षदानी खरे । अशौचाचा थार असूं नये ॥ १ ॥ नाममंत्र कांहीं बाधीना कोणासी । जया अहार्निशी रामकृष्ण ॥२॥ तपाची मांडणी आकाशाचें खेव । इंद्रियांची हांव राहे तरी ॥३॥ यज्ञ तो आचार धनाचें सांकडें । तरी जाण द्वाड स्वर्ग सुख ॥ ४ ॥ नामा म्हणे नाम साधकाची माता । जैसें तैसें घेतां भक्ति जोडे ॥ ५ ॥

१५५ दग्धही होतसे आलें जें आकारा । असोनि निर्धारा नाम नाहीं ॥ १ ॥ नाम अनुभवें प्रपंचाचि ब्रह्म । जाहला सर्वोत्तम संतकृपें ॥ २ ॥ म्हणोनिया संता जाऊनि शरण । साधावें निधान नामब्रह्म ॥ ३ ॥ नामदेव म्हणे संताचिया कृपें । माजी नाम सोपें नांदतसे ॥ ४ ॥

१५६ नामापरता मंत्र नाहीं त्रिभुवनी । ऐसी बोले वाणी वेदशास्त्रीं ॥ १ ॥ पहा विचारोनि अनुभव मनीं । नका आडरानीं झणीं भरो ॥ २ ॥ नामावांचोनि तरले जे म्हणती । ते आधीं बुडती भवसागरीं ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम ॐकाराचें मूळ । परब्रम्ह केवळ रामनाम ॥ ४ ॥

१५७ नामाचा धारक विष्णुरूप देख । वैकुंठीचें सुख रुळे पायीं ॥१॥ निराकार देव आकारासी आला । भक्ती पै स्थापिला नामरूपा ॥२॥ नाममंत्र बीज जंववरी नाहीं जया । तंववरी केशव दया नाहीं प्राप्त ॥३॥ नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ हरीभक्त ॥ ४ ॥

१५८ तूं तंव नेणता परी हरि जाणता । आहे तो समता सर्वांभूतीं ॥ ॥ १ ॥ सर्व ब्रह्म हरी येकाचे निर्धारी । होसील झडकरी ब्रह्म तूंचि ॥ २ ॥ अच्युत माधव अमृताच्या पाठें । लागतांची वाटे

वंदी यम ॥ ३ ॥ नामा म्हणे होसील जिवलग विष्णूचा । दास त्या हरीचा आवडता ॥ ४ ॥

१५९ मंत्राचा पैं मंत्र हरी हरी उच्चार । न लगे तो विचार करणें कांहीं ॥ १ ॥ सुफळ नाम गाढें वाचेसी उच्चारूं । केशव हाचि करूं सर्वांभूतीं ॥ २ ॥ नाहीं यासी पतन न होईल बंधन । नित्य हेंचि स्नान रामनामें ॥ ३ ॥ नामा म्हणे भाव सर्वांभूतीं करा । आणिक पसारा घालूं नको ॥ ४ ॥

१६० विष्णुनाम श्रेष्ठ गाताती देवऋषी । नाम अहर्निशीं गोपाळाचें ॥ १ ॥ हरि हरि हरि तूंचि वा श्रीहरी । वसे चराचरीं जनार्दन ॥ २ ॥ आदि ब्रह्म हरी आळवी त्रिपुरारी । उमेप्रती करी उपदेश ॥ ३ ॥ नामा म्हणे पूर्ण ब्रह्म जप उत्तमोत्तम । शंकरासी नेम दिनानिशीं ॥ ४ ॥

१६१ आम्ही विठोबाचे दूत । यम आणूं शरणांगत ॥ १ ॥ मुखीं नाम हातीं टाळी । महा पापा करूं होळी ॥ २ ॥ करूं हरिनामाचा घोष । कुंभपाक पाडूं वोस ॥ ३ ॥ करूं हरिकथा कीर्तन । तोडूं यमाचें बंधन ॥ ४ ॥ एवढा प्रताप नामाचा । रीघ नव्हे कळिकाळाचा ॥ ५ ॥ ऐसा नामा यशवंत । विठोबाचा शरणागत ॥ ६ ॥

१६२ हरिनाम गातां पवित्र । सेविती हरिहर ब्रह्मादिक ॥ १ ॥ नाम तारी नाम साहाकारी । नामें उच्चारीं रूपें तुझीं ॥ २ ॥ ऐसी अनंत नामें तुझीं न वर्णवती देवा । नामा म्हणे केशवा विनवीतसे ॥ ३ ॥

१६३ नामाचा प्रताप काय सांगूं वाचे । अक्षय सुखाचें स्थान दावी ॥ १ ॥ नामाविण कांहीं नाहीं नाहीं सार । साधावें सत्वर भलें नो हें ॥ २ ॥ अजामेळ पहा आजन्म पातकी । नामें गेला सेखीं वैकुंठासीं ॥ ३ ॥ कुंटिणी जारणी शुकामिसें गाय । वैकुंठासी जाय तत्क्षणीं ॥ ४ ॥ पहा वाल्या कोळी उफराट्या नामें । भविष्य संभ्रमें वाखाणिलें ॥ ५ ॥ नामा म्हणे किती सांगावा निर्धार । साधन सोपारें नाम एक ॥ ६ ॥

१६४ शेतीं बीज नेतां थोडें । मोटे आणितातीं गाडे ॥ १ ॥ एक्या नामें हरि जोडे । फिटे जन्माचें सांकडें ॥ २ ॥ बाळे भोळे जन । सर्व तरती कीर्तनें ॥ ३ ॥ नामा म्हणे नेणें सूढे । नाम स्मरावें सावडें ॥ ४ ॥

१६५ एकांत एकला सर्व आहे हरी । ऐसेंचि अहर्निशीं ध्याइजे तूं ॥ १ ॥ सर्वांभूतीं विठ्ठल आहे आहे साचे । हें तव वेदींचें वचन जाण ॥ २ ॥ मार्ग हाचि सोपा गेले मुनिजन । जनीं जनार्दन हाचि भावो ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम प्रेम उच्चारण । सर्व ही कारण होईल तुझें ॥ ४ ॥

१६६ म्हणे दीनबंधु तुम्ही सावध व्हावें । संतांशीं शरण नाम मुखीं वदावें ॥ १ ॥ नामापरतें साधन नाहीं या कलियुगांत । व्यर्थ श्रम होसी पाहतां आणीक मत ॥ २ ॥ मताभिमान करोनी तुम्ही जाल आडवाटां । अभिमानें ठकाविलें नारदाहि श्रेष्ठां ॥ ३ ॥ आलिया जन्मास आतां न करीं आळस । नामदेवालागीं सांगे जगन्निवास ॥ ४ ॥

१६७ म्हणतां वाचे नाम वंदि तया यम । काळादिकासम वंदी तया ॥ १ ॥ ऐसें नाम श्रेष्ठ सकळांसी वरिष्ठ । उच्चारितां नीट वैकुंठ गाजे ॥ २ ॥ तो हा नाममहिमा वाखाणित ब्रह्मा । न कळे तया उपमा आदि अंतीं ॥ ३ ॥ नामा म्हणे पाठें नामाचेनि वाटे । तरी प्रत्यक्ष प्रगटे विठ्ठल हरी ॥ ४ ॥

१६८ नामें सदाशुद्धि प्राणिया होतसे । नामापाशीं असे भुक्ति मुक्ति ॥ १ ॥ नामा ऐसें सोपें नाहीं त्रिभुवनीं । नाम संजिवनी साधकांसी ॥ २ ॥ नामें भक्ति जोडे नामें कीर्ति वाढे । नामें सदा चढे मोक्ष हातां ॥ ३ ॥ यज्ञ दान तप नामें आलीं हातां । नामें सर्व सत्ता प्राप्त होय ॥ ४ ॥ नामा म्हणे सदा नाम ज्याचे मुखीं । नाहीं याच्या तुकीं दुजा कोणी ॥ ५ ॥

१६९ नामें तो सरता नामें तो परता । नामें पंढरिनाथा भेटविलें ॥ १ ॥ नाम हेंचि तारी नाम भवसागरीं । उतरी पैलतिरीं नाम तुझें

॥ २ ॥ नाम तें अंजन नामें बोधे मन । नामींचि निधान चांगया झाला ॥ ३ ॥ मार्गीं जातां तुम्ही उगींचि नसावें । वाचेसीं म्हणावें रामकृष्ण ॥ ४ ॥ राम कृष्ण हरि मुकुंद मुरारी । केशव नरहरी नारायण ॥ ५ ॥ ऐसा हा सतत आठव नामाचा । नामा म्हणे कैंचा दोष तया ॥ ६ ॥

१७० चिंतातुर देहीं न साहे काजळी । मनाची पाजळी उभय दिवीं ॥१॥ प्रकाश पडेल ब्रह्म हें दिसेल । वैकुंठ जोडेल भजनभक्ती ॥२॥ नाहीं याती वर्ण नाहीं या वेदोक्त । नामींचि संतृप्ति होती जीवा ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम हेंचि बीजसार । तुटेल येरझार भवबंधाची ॥ ४ ॥

१७१ गोक्षीर लाविलें अंधळिया मुखीं । तेथील पारखी जिव्हा जाणे ॥ १ ॥ तैसें देवा तुझें नाम निरंतर । जिव्हेसी पाझर अमृताचे ॥ २ ॥ सोलूनियां केळें साखरें घोळिलें । अंधारीं खादलें तरी गोड ॥ ३ ॥ द्राक्ष फळां घड सेवितां चोखड । तयाहूनि गोड नाम तुझें ॥ ४ ॥ आळूनिया क्षीर तुपाचिये आळें । कालविलें गुळें गोड जैसें ॥ ५ ॥ जाणोनियां नामा करी विनवणी । अमृताची खाणी नाम तुझें ॥ ६ ॥

१७२ नामाचि हें आहे पंचतत्वां ठाव । नाहीं दुजा भाव देखावया ॥ १ ॥ देखणारा जहाली कर्पुराची वाती । नामाग्नि विश्रांती ठाई जहाली ॥ २ ॥ द्वैताद्वैत तेथें नेणे जाणपण । गेलें हारपोन नामें सर्व ॥ ३ ॥ नामदेव म्हणे अनाम तें नाम । नाना नाम भ्रम तेथें दुजा ॥ ४ ॥

१७३ भक्ति करूनियां कोण वांया गेला । सांगा हो विठ्ठला निवडूनी ॥ १ ॥ द्वापाराचे अंतीं नामची सुकृत । अद्यापि निश्चित चालतसे ॥ २ ॥ नाम ऐकतां तरती निर्धारी । व्याख्यान श्रीधरी टीकाकार ॥ ३ ॥ नामा म्हणे राम नाहीं त्रिभुवनीं । नाम तें निधान कलियुगीं ॥ ४ ॥

१७४ देवाचें हें गुज सकळ मंत्रमय । जें कां नित्य ध्येय शंकराचें ॥ १ ॥ तें हें रामनाम सेवितां सर्वभावें । रामरूप व्हावें निश्चयेंसी ॥ २ ॥ नष्ट अजामेळाचें पतितत्व गेलें । दिव्य रूप झालें वाल्मिकाचें ॥ ३ ॥ शरीर संपत्ति बळीनें देऊनि सकळ । केला द्वारपाळ नारायण ॥ ४ ॥

कृष्णाविण दुजें नेणती कायावाचा । झाला पांडवांचा सहकारी ॥५॥ नामा म्हणे केशव भावाचा लंपट । भक्तांसी निकट रतलासे ॥ ६॥

१७५ नामाचें सामर्थ्य नेणे वेदशास्त्र । शेषाचीं वक्त्रें मौनावलीं ॥ १ ॥ गंगा गणपती चंद्रसूर्य श्रेष्ठ । शंकर वरिष्ठ मौनावले ॥ २ ॥ भीष्म पाराशर उद्धव अंगद । ब्रह्मा मुचकुंद मौनावले ॥ ३ ॥ नामा म्हणे येरे काय जाणे स्तुति । दाटोनि श्रीपति उभा केला ॥ ४ ॥

१७६ नामाचा प्रताप जाणवेना कोणा । समुद्रीं पाषाण तारियेले ॥ १ ॥ आवडीनें कोणी चिंतितां उल्हास । काय तो तयास उपेक्षील ॥ २ ॥ कुंटिणी ते नीच राव्यासाठीं नेली । वैकुंठीं ठेविली सारूप्यानें ॥ ३ ॥ अजामिळ खळ पुत्राचिया मिषें । उद्धारिलें त्यास दिनानाथें ॥ ४ ॥ नामा म्हणे ऐसें सांगो आतां किती । नामापाशीं मुक्ति उभी असे ॥ ५ ॥

१७७ नामाचि जो जाणे आनु कांहीं नेणें । संसार नामाविणें जाईजणा ॥ १ ॥ नाम स्मरे त्यासि संसार नाहीं । खुंटली ते पाहीं येरझार ॥ २ ॥ नाम न होय त्याचें जळो जाळेपण । आळसी वायांविण संसारासी ॥ ३ ॥ नामा म्हणे मज नामींच सौरस । नाम स्मरे हृषीकेशु त्यासी पावे ॥ ४ ॥

१७८ साराचेंहि सार भक्तीचें भांडार । नाम निरंतर गातां वाचे ॥ १ ॥ कासया करावें आणिक साधन । नामाविण क्षण जाऊं नेदी ॥ २ ॥ दया शांति क्षमा हेंचि पैं भूषण । नामसंकीर्तन अहर्निशीं ॥ ३ ॥ नामा म्हणे जप अखंड नामाचा । काळ हा सुखाचा सदोदित ॥ ४ ॥

१७९ नांदतसे नाम आकाश पाताळीं । सर्व भूमंडळीं घनदाट ॥ १ ॥ पातळ फोडोनि किती आहे पुढ । नाहीं अंत वाड नसवरी ॥ २ ॥ चौऱ्यांसी भोगिती दुर्मति पामर । नाहीं सारासार जाणत ते ॥ ३ ॥ नामदेव म्हणे नाम अविनाश । तेथें नाना वेष नाम सर्व ॥ ४ ॥

१८० तरले तरती हा भरंवसा । बुडती न येती गर्भवासा ॥ १ ॥ वाट सांपडली निकी । विठ्ठल नाम ज्याचे मुखीं ॥ २ ॥ तीर्थें इच्छिती चरणींचे । रज नामधारकांचे ॥ ३ ॥ प्रायश्चित्त सांडोनि प्रौढी । झालीं दीन रूपें बापुडीं ॥ ४ ॥ ऋद्धी सिद्धी महाद्वारा । मोक्ष वोळंगण करी ॥ ५ ॥ नामा म्हणे सुख निधान । नाम पतीत पावन ॥ ६ ॥

१८१ तीर्थ तपराशी जप हृषिकेशी । नाम अहर्निशीं रामराम ॥ १ ॥ तीर्थांचें पै तीर्थ नाम हें समर्थ । होईल कृतार्थ रामनामें ॥ २ ॥ साधेल साधन तुटेल बंधन । वाचे जनार्दन सुफळ सदा ॥ ३ ॥ नामा म्हणे हरी उच्चार तूं करीं । उद्धरसी निर्धारीं इहलोकीं ॥ ४ ॥

१८२ सुखाचा सोहळा वाटतसे जीवा । भेटणें केशवालागीं आजी ॥ १ ॥ पाउला पाउलीं याचिया वाटे । पताकांचे थाट दिसताती ॥ २ ॥ पैल तो कळसु पाहें पां साजणी । नामघोष कानीं पडतसे ॥ ३ ॥ नामा म्हणे नामीं पारणें जो करी । तयासि श्रीहरी उपेक्षीना ॥ ४ ॥

१८३ कां करिसी सोस मायेचा असोस । नव्हे तुज सौरस नामेंविण ॥ १ ॥ नामचि हा मंत्र नामचि हो तंत्र । नामेंविण पवित्र न होसी देखा ॥ २ ॥ तिहीं लोकीं पाहतां नामेंविण सर्वथा । अच्युत म्हणतां पुण्य कोटी ॥ ३ ॥ नामा म्हणे ब्रह्म आदि अंतीं नेम । तें विटेवरी सम उभें असे ॥ ४ ॥

१८४ सार पें सांगत उपनिषद् तुम्हां । वाचे रामनामा जप करा ॥ १ ॥ हेंचि पें मथित सांगोनियां गेले । उच्चारितां ठेले ब्रह्मरूप ॥ २ ॥ ज्योतिसी ते ज्योति भजन करील । आपणाचि होईल हरी स्वयें ॥ ३ ॥ नामा म्हणे कैसें विपरीत करणें । भूतदया धरणें सर्वांभूतीं ॥ ४ ॥

१८५ अखंड मुखीं रामनाम । धन्य तयाचाचि जन्म ॥ स्नान

संध्येसी नेम । तो पुरुष महापवित्र ॥ १ ॥ धन्य धन्य तयाचा जन्म। रामार्पण अवघें कर्म ॥ तोचि तरला हाचि नेम । रामकृष्ण उच्चारणीं ॥ २ ॥ अनंत जन्मांचें सांकडें । तेणेंचि उगविलें कोडें ॥ जपतप येणें नावडे । रामकृष्ण उच्चारणीं ॥ ३ ॥ नामा म्हणे नाममात्रें । अवघीं निवारलीं शस्त्रें ॥ रामकृष्ण नाम वक्त्रें । उच्चारी तो धन्य ॥४॥

१८६ मायेचे भूचर रजतम सात्त्विक । रामनाम एक सोडवणें ॥ १ ॥ राम हेंचि स्नान राम हेंचि ध्यान । नामें घडे यज्ञ कोटी देखा ॥ २ ॥ न लगती साधन नाना मंत्र विवेक । रामनामीं सुख रंगीं कारे ॥ ३ ॥ नामा म्हणे श्रीराम हेंचि वचन आम्हां । नित्य ते पौर्णिमा सोळा कळी ॥ ४ ॥

१८७ कृष्णकथा सांग जेणें तुटे पांग । न लगे तुज उद्वेग करणें कांहीं ॥ १ ॥ समर्थ सोईरा राम हा निधान । जनीं जनार्दन एक ध्याई ॥ २ ॥ नामा म्हणे उच्चार रामकृष्ण सार । तुटेल येरझार भवाब्धीची ॥ ३ ॥

१८८ सर्वांभूतीं हरी आहे आहे साच । मायाजाळ न छळे भाविकांसी ॥ १ ॥ सर्व ब्रह्म ऐसें वेद बोले गाढा । ब्रह्मीचा पवाडा अगम्य तो ॥ २ ॥ जाणतां नेणतां हरिनाम उच्चार । मार्ग तो साचार सुफल सदा ॥ ३ ॥ नामा म्हणे कारण जिव्हा होय स्मरण । सर्व नारायण हरी दिसे ॥ ४ ॥

१८९ जप तप अनुष्ठान हरी । एकाचि तो नमस्कारी ॥ भूतद्वेष कदा न करी । तप सामुग्री हेचि तुझी ॥ १ ॥ हरी माधव यादवा । कृष्णा गोविंदा केशवा ॥ येणें करोनियां जीवा । सर्व काळ रंजवी ॥ २ ॥ स्मरतां हरीचें नाम । पळोनी जाति काळ यम ॥ तुटती नाना योनि जन्म । गर्भवासा मग नये ॥ ३ ॥ नामा जपे नामावळी । अखंड तप हेंचि सदा काळीं ॥ हरीनामे पिटोनि टाळी । हाचि तरणोपाय सकळांचा ॥ ४ ॥

१९० सर्व काळ हरी जप। हेचि तपामाजीं तप॥ न लगती घालावे संकल्प। नाना मंत्राचे परियेसीं ॥ १ ॥ मंत्रामाजी मंत्रसार। रामकृष्ण हा उच्चार ॥ नित्यानित्य निर्विकार। हरी जोडेल साचारें ॥ २ ॥ मागें कृतायुगीं सांगों। त्रेतायुगीं काय ओळगों ॥ द्वापारीं कृष्ण रंगे रंगों। परी कलीमाजीं नाम तारक ॥ ३ ॥ नामा म्हणे ग्रंथीं। पाहे पा यथानिगुतीं ॥ नाम जपतांचि तरती। हें व्यासाचें वचन ऐसें ॥ ४ ॥

१९१ नाम वाचे उच्चारितां। हरे संसाराची व्यथा ॥ जाती दोषाचिया चळथा। रामकृष्ण उच्चारणीं ॥ १ ॥ हरी माधव गोविंद। याचि नामाचा जया छंद ॥ तोचि पावेल परम पद। निजभुवन वैकुंठीं ॥ २ ॥ जन्मजन्माचि तप राशी। तेणें नाम आलें मुखासी ॥ स्मरतां हरी हृषिकेशी। सकळ पूर्वजां उद्धार ॥ ३ ॥ नामा जपे ध्यानीं मनीं। अखंड विठ्ठल हरीकीर्तनी ॥ तेणें जपें ये मेदिनीं। कोटि यज्ञ घडले ॥ ४ ॥

१९२ रूपासीं रूपस नाम हृषिकेशा। पंढरी निवास जप करी ॥ १ ॥ विठ्ठल श्रीहरी मुकुंद श्रीहरी। नामेंचि बोहरीं प्रपंचाची ॥ १ ॥ विठ्ठल नामामृत हेचि जीवन होत। नाम हें मुखांत केशवाचे ॥ ३ ॥ नामा म्हणे देव अमृताचा लाटा। मुखामाजीं पैठा होत नामें ॥ ४ ॥

१९३ गीता हेचि गंगा गुह्यभाव पैं गा। नाम हेंचि वेगा सोडवण ॥ १ ॥ सर्व ब्रह्म हरी सांगतसे मुरारी। विश्वरूप श्रीहरी आपण झाला ॥ २ ॥ उपदेश अर्जुना जनीं जनार्दना। अखंड भावना भूतदया ॥ ३ ॥ नामा म्हणे सर्व आहे हाचि देव। उदार माधव सर्वांभूतीं ॥ ४ ॥

१९४ नामाचें चारित्र सदा अति गोड। तीर्थें काय चाड नाममात्रें ॥ १ ॥ ऐसा दृढ मनीं करावा विचार। नाम परिकर कलि-

युगीं ॥ २ ॥ नामा म्हणे नाम अनादि अक्षर । उभा कटीं कर भक्तांसाठीं ॥ ३ ॥

१९५ नाम तेंचि रूप रूप तेंचि नाम। नामरूपा भिन्न नाहीं नाहीं ॥ १ ॥ आकारला देव नामरूपा आला । म्हणोनी स्थापिलें नाम वेदीं ॥ २ ॥ नामा परता मंत्र नाहीं हो आणिक । सांगती ते मूर्ख ज्ञानहीन ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम केशव केवळ । जाणती प्रेमळ भक्त भले ॥ ४ ॥

१९६ अनंत जन्में मेळवितां दुर्लभ । तो प्राणवल्लभ शंकराचा ॥ १ ॥ वेदशास्त्र मंथुनी काढियेलें सार । ब्रह्मादिकां पार रामनाम ॥ २ ॥ स्वर्गिंचे देव चिंतिताती मनीं । एक वेळां झणीं भेटी देईं ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवाचें नाम उच्चारितां। विघ्नासी भंगितां नवल काय ॥ ४ ॥

१९७ विठ्ठलाचें नाम जे माउलिचे ओठीं । विठो तिचे पोटीं गर्भवासी ॥ १ ॥ ज्याचिये कुळीं पंढरीची वारी । विठो त्याचे घरीं बाळलीला ॥ २ ॥ नामा म्हणे जिव्हे काढीन मी रवा । असत्य केशवा वचन होतां ॥ ३ ॥

१९८ अनंत ब्रह्मांडें व्यापक तें नाम । अनादि निष्काम विश्वंभर ॥ १ ॥ तोचि कृष्ण परब्रह्म द्वारकेसी । पांडवां मानसीं ठसावला ॥ २ ॥ ठसावला तोचि पाहावा अनुभव । पांचा लागीं ठाव मग कैंचा ॥ ३ ॥ नामदेव म्हणे संपूर्ण आघवा । नामाचिया गांवां सिव नाहीं ॥ ४ ॥

१९९ ज्ञान व्हावें आधीं ओळखावें नांवा । मग जावें गांवा तयाचिया ॥ १ ॥ या नामाचें मूळ त्यामाजी जो धाला । प्रपंचाचा घाला मग नाहीं ॥ २ ॥ नाम गांव प्रपंच सर्व आहे नाम । ब्रह्मानंदें प्रेम घनदाट ॥ ३ ॥ नामदेव म्हणे नंदाचिया घरीं । होता एक हरी दुजें नाम ॥ ४ ॥

२०० साधनांत सोपें नाम हें केवळ । यावीण सकळ शीण वांयां ॥ १ ॥ धरारे धरा नाम विठोबाचें । तेणें अज्ञानाचें मूळ नासे ॥ २ ॥ नाम तारी फार पुराणीं वर्णिलें । नामाचि केवळ आत्मसत्ता ॥ ३ ॥ नामा म्हणे नामीं रंगला सुरंग । अंगें स्वयमेव पांडुरंग ॥ ४ ॥

२०१ जीव शिव ग्रामीं मीतूंपण पाहीं । हा गौरव कांहीं नाहीं नामीं ॥१॥ नाहीं चतुर देह तूर्या हे उन्मनी । स्वयंभु ते खाणी निज-नामाची ॥ २ ॥ नामी जडे चित्त तेथें काय उणें । लाजित साधनें नाना जाहलीं ॥ ३ ॥ नामा म्हणे नामीं मीतूंपण । नाहीं कांहीं आन सर्व तेंची ॥ ४ ॥

२०२ पवित्र परिकर नाम हा उच्चार । उद्धरण साचार जगा यया ॥ १ ॥ गोविंद केशव उच्चारी श्रीराम । न लगती नेम असूप जप ॥ २ ॥ तें हें विठ्ठलरूप पिकलें पंढरीं । नाम चराचरीं विठ्ठल ऐसें ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम सर्वांत सखोल । उच्चारितां मोल नलगे तुज ॥ ४ ॥

२०३ आकारिक नाम जीवानें ठेविलें । शिवानें तें केलें निर्विकल्प ॥ १ ॥ जीवाशिव दोन्ही विराले ज्यामाजीं । तें नाम सहजीं आद्य आहे ॥ २ ॥ तया नामाविण जावयासीं ठाव । नाहीं दुजा भाव तिळभरी ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम घनदाट । प्रपंच निघोट नामापरी ॥ ४ ॥

२०४ कृष्णनाम श्रेष्ठ गाती देव ऋषी । नाम अहर्निशीं गोपाळाचें ॥ १ ॥ हरी हरी हरी तूंचि वा श्रीहरी । वसे चराचरीं जनार्दन ॥ २ ॥ आदि ब्रह्मा हरि आळवी त्रिपुरारी । उमेप्रति करी उपदेश ॥ ३ ॥ नामा म्हणे ब्रह्म हा जप उत्तम । शंकरासी नेम दिनानिशीं ॥ ४ ॥

२०५ भजन करारे हरिहरा । नारायण शिवशंकरा ॥ माझें बोलणें अवधारा । भेद न करा दोघांचा ॥ १ ॥ तुम्हांसी सांगेन सत्य वृत्तांत । पाहें पा तेथींचा दृष्टांत ॥ नारायणें सेविलें अमृत । श्वेत झाला महा-

देव ॥ २ ॥ शंभूनें गिळिलें हलाहल । म्हणोनि विष्णु झाला निळा ॥ देखत आंधळा । झणीं होसी गव्हारा ॥ ३ ॥ लक्ष्मी रूपें आपण हरू । देवें वरिला शारंगधरू ॥ गरूडरूपें महेश्वरू । वाहन झाला विष्णुचें ॥ ४ ॥ शक्तिरूपें शारंगपाणी । नारायण झाला भवानी ॥ शारंगधर नंदी होऊनि । सन्मुखासनीं बैसला ॥ ५ ॥ एक तो एका वेगळा नाहीं । दृष्टांत तूं आगमीं पाहीं ॥ नामा म्हणे एक केशव ध्यायीं । हरिहर पाहीं ज्याचे अवतार ॥ ६ ॥

२०६ म्हणतां वाचे नाम वैकुंठ जवळी । नित्य वनमाळी भक्तांसंगें ॥ १ ॥ होईल साधन विठ्ठलीं परिपूर्ण । निवती नयन मूर्ति पाहतां ॥ २ ॥ शंखचक्रांकित आयुधें शोभती । भाग्योदयीं दिसती भावशीळा ॥ ३ ॥ नामा म्हणे तें रूप पंढरीस आहे । न सांडी ते सोय केशवाची ॥ ४ ॥

२०७ आपुली पदवी सेवकासी द्यावी । तो एक गोसावी पांडुरंग ॥ १ ॥ भावाचा आळुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं ॥ २ ॥ प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । क्षण एक न सोडी संग त्याचा ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हा दीनांचें माहेर । तो एक उदार पांडुरंग ॥ ४ ॥

२०८ सोयरा सुखाचा विसावा भक्तांचा । विठोबा निजाचा मायबाप ॥ १ ॥ कृपाळू दीनाचा पडिभर नामाचा । तोडर ब्रीदाचा साच तया ॥ २ ॥ काया मनें यांचा संग करा त्याचा । अनंत जन्माचा हरेल शीण ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हां दीनांचे माहेर । हरी निरंतर न विसंबे ॥ ४ ॥

२०९ देव दयानिधि भक्तांचा कैवारी । नाममात्रें तारीं सर्वांलागीं ॥ १ ॥ तया देवराया गावें हो आवडी । लागे मनीं गोडी सर्वकाळ ॥ २ ॥ नाहीं यातिकूळ उंच नीच भेद । भाव एक शुद्ध पहा-

तसे ॥ ३ ॥ नामा म्हणे काय सांगावें नवल । अखंड दंडलें त्योंमाकार ॥ ४ ॥

२१० नाम फुकाचें चोखट । नाम घेतां नलगे कष्ट ॥ १ ॥ पडशील ज्या सागरीं । रामनामें आत्मा तारी ॥ २ ॥ पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥ नामा हें महिमान जाणे । घेतो विठ्ठलाची आण ॥ ४ ॥

२११ कांसवीचे दृष्टी जें होईजे भेटी । तें अमृताची सृष्टी घडे त्यासी ॥ १ ॥ तैसें हें भजन श्रीरामाचें ध्यान । वाचे नारायण अमृतमय ॥ २ ॥ धन्य त्याचें कुळ सदा पैं सकळ । दिननिशीं पळ राम नाम ॥ ३ ॥ नामा म्हणे चोखडा भक्त तो उत्तम । वाचेसी सुगम रामनाम ॥ ४ ॥

२१२ अभ्यासिले वेद झाला शास्त्रबोध । साधिल्या विविध नाना कळा ॥ १ ॥ प्रेमाचा जिव्हाळा जंव नाहीं अंतरीं । तव कैसा श्रीहरि करील कृपा ॥ २ ॥ हित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ॥ ३ ॥ प्रसंगीं पुराणें ऐकिलीं श्रवणीं । त्यांतील कोण मनीं धरील अर्थ ॥ ४ ॥ काय तें सांडिलें काय तें मांडिलें । काय तें दंडीलें प्रवृत्तीसी ॥ ५ ॥ अनंत ह्या मूर्ति पाहिल्या लोचनीं । त्यांतील कोण ध्यानीं प्रतिबिंबली ॥ ६ ॥ स्वप्नींचिया परी देखसी अभ्यास । न धरीच विश्वास चित्त तुझें ॥ ७ ॥ वांझेचिये स्तनीं अमृताची धनी । मृगजळ पाणी तान्हावोलें ॥ ८ ॥ तरी प्रेमेंविण फळती क्रियाकर्में । हाता येती वर्में विठोबाचीं ॥ ९ ॥ दृष्टीचें देखणें श्रवणींचें ऐकणें । मनाचें बैसणें एक होय ॥ १० ॥ नामा म्हणे तरी विठो येउनी भेटे । कायाच पालटे कैवल्य होय ॥ ११ ॥

२१३ नामामृत गोडी आहे वैष्णवांसी । येरां प्राकृतांसी कळेनाची ॥ १ ॥ प्राकृत हे जन भुलले विषयीं । नामाचिया गांवीं कैसे जाती ॥ २ ॥ नामीं चित्त व्हावें जावें तेव्हां गांवा । मग नाम गोंवा तेथें

केंचा ॥ ३ ॥ नाम तोंचि झालें वर्ण रूपातीत । अनाम स्वतंत्र स्वयंभ तो ॥ ४॥ नामदेव म्हणे नाम हें सुलभ। अभक्तां दुर्लभ नानापरी ॥५॥

२१४ सर्वांमाजी सार नाम हें देवाचें । सर्व साधनांचें सार जें का ॥ १ ॥ चार सहा आणिक अठरा वर्णिती । नामें निजप्राप्ति अर्धक्षणीं ॥ २ ॥ व्यासादिक नाम साधियेलें दृढ । प्रपंच काबाड निरसेल ॥ ३ ॥ नामदेव म्हणे निजनाम ब्रह्म । घेतां नेमधर्म सर्व साधे ॥ ४ ॥

२१५ व्रत तप दान हवन पूजन । न लगे साधन नाम म्हणतां ॥ १ ॥ रामकृष्ण हरी मुकुंदा मुरारी । जिव्हे क्षणभरी न विसंबें ॥२॥ कळिकाळ दारुण करीतसे विघ्न । परजी नारायण नाम जिव्हे ॥ ३ ॥ शरण आलों जिव्हे तुवां नुपेक्षावें । नामा म्हणे गावें हरिनाम ॥ ४ ॥

२१६ गोविंद गोपाळ वाचेसी निखळ । तो उद्धरे तात्काळ कलीमाजी ॥ १ ॥ नारायण नारायण हेंचि पारायण । उद्धरले जन इहलोकीं ॥ २ ॥ तुटती यातना कर्माच्या भावना । जडजीव उद्धरणा नाम स्मरा ॥ ३ ॥ नामा म्हणे राम हा जप परम । न लगती नेम नाना कोटी ॥ ४ ॥

२१७ नामावांचूनि कांहीं दुजें एथें नाहीं । वेगीं लवलाहीं राम जपा ॥ १ ॥ गोविंद गोपाळ वाचेसी रसाळ । पावसी केवळ निजपद ॥ २ ॥ ध्रुव प्रल्हाद बळी अंबऋषि प्रबुध । नामेंचि विद्वद पावले देखा ॥ ३ ॥ नामा म्हणे राम वाचे जया नाम । संसाराचे श्रम हरे नामें ॥ ४ ॥

२१८ नामीं नारायण । होय भक्तांचे आधीन ॥ १ ॥ न मागतां भक्ति । नामापासी चारी मुक्ती ॥ २ ॥ भुलो नये जाण । नाम वैकुंठीं निशाण ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसे प्राणी । सम होती नारायणी ॥ ४ ॥

२१९ ब्राह्मण हो तुम्ही सर्व नारीनर । सर्वांसी आधार नाम सत्य

॥ १ ॥ नामाविण गति न सरे आणिक । वैकुंठनायक बोले मुखें ॥२॥ परी तेंचि नाम पहावें शोधुनी । चौऱ्यांशीची खाणी तेव्हां चुके ॥ ३ ॥ नामा म्हणे आतां सद्‌गुरु वंदुनी । नाम घ्या शोधूनि सत्य मुक्त ॥ ४ ॥

२२० ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गवसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥ लहान थोरांसी करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥ २ ॥ सर्वांप्रति माझी हेचि पै विनंती । आठवा श्रीपती आपुले मनीं ॥ ३ ॥ केशव नारायण करावें आचमन । तेवीं संध्या स्नान कर्म तया ॥ ४ ॥ नामा म्हणे हेचि करा नित्य भजन । ब्रह्मार्पण साधन याचे पायीं ॥ ५ ॥

२२१ नव्हे तुज हित विषय पोशितां । हरी हरी म्हणतां तरशील ॥ १ ॥ माधव श्रीहरी कृष्ण नरहरी । वेगीं हा उच्चारीं लवलाहीं ॥ २ ॥ घडतील यज्ञ पापें होतिल भग्न । प्रपंच सर्वज्ञ होईल ब्रह्म ॥ ३ ॥ नामा म्हणे हरिकथा हरी भवव्यथा । उद्धरसी सर्वथा भाक माझी ॥ ४ ॥

२२२ ब्राह्मण व शूद्र वैश्य नारीनर । सर्वांसी आधार नाम सत्य ॥ १ ॥ नामाविण गति नाहीं हो आणिक । वैकुंठनायक बोले मुखें ॥ २ ॥ परी तेंचि नाम पहावें शोधून । चौऱ्यांशी खाणी चुके तेव्हां ॥ ३ ॥ नामदेव म्हणे सद्‌गुरुपासोनी । नाम घ्या शोधूनि भावमुक्त ॥ ४ ॥

२२३ शिव हलाहलें तापला । तोहि नामें शीतळ झाला ॥ १ ॥ नाम पावन पावन । याहूनि पवित्र आहे कोण ॥ २ ॥ शिवासी नामाचा आधार । केला काळिकाळ किंकर ॥ ३ ॥ मरण झालें काशीपुरीं । तेथें नामचि उद्धरी ॥ ४ ॥ अठरा पुराणांची पोथी ॥ नामाविण नाहीं रीती ॥ ५ ॥ नामा म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरें ॥ ६ ॥

२२४ भवाब्धि तारक रामकृष्ण नाव। रोहिणीची माव सकळ दिसे ॥ १ ॥ नाम होंचि थोर नाम होंचि थोर। वैकुंठीं बिढार रामनामें ॥ २ ॥ राम हे निशाणी जपतांचि अढळ। वैकुंठ तत्काळ तया जीवा ॥ ३ ॥ नामा म्हणे वैकुंठ नामेंचि जोडेल। अंतीं तुज पावेल नाम एक ॥ ४ ॥

२२५ तपतीर्थ दान हें सर्व कुवाडें। नाम एक वाड केशवाचें ॥ १ ॥ मुमुक्षु साधकीं सदा नाम गावें। तेणेंचि या व्हावें अखंडित ॥ २ ॥ विपत्तीचें वळें न होतां विन्मुख। नाममाल एक धरा वाचे ॥ ३ ॥ जीवन्मुक्त शुक मुनि ध्रुवादिक। तयासी आणिक ध्यास नाहीं ॥ ४ ॥ नामयाची वानी अमृताची खाणी। घ्यावी आतां धणी सर्वत्रांही ॥ ५ ॥

२२६ केशव नाम गाय केशव नाम गाय। केशव नाम गाय कामधेनु ॥ १ ॥ वेणुनादीं चरे पाणी पी भीवरे। ती गाय हंबरे भक्तांलागीं ॥ २ ॥ भक्तीसुखें धाय प्रेमें तें पान्हाय। सुकेलिया खाय पातकासी ॥ ३ ॥ नामा म्हणे गाय ते पंढरीस आहे। पापिया न साहे पाठी लागे ॥ ४ ॥

२२७ केशव म्हणतां क्लेश जाताती परते। त्याहूनि सरतें आणिक नाहीं ॥ १ ॥ वेद कां पढसी शास्त्रें कां शिणसी। उदंड वाचेसी हरी म्हणा ॥ २ ॥ याहूनि पैं सार नाहीं हो दुसरें। भीष्में युधिष्ठिर उपदेशिला ॥ ३ ॥ नामा म्हणे धरा केशवीं विश्वास। तुटे गर्भवास नामें एकें ॥ ४ ॥

२२८ सार पैं नाम विठ्ठलाचें आहे। दिनानिशीं सोय मना लावीं ॥ १ ॥ गुंपेजेल मन जोडती पाउलें। तुटती घेतले मायाजाळ ॥ २ ॥ नामाचि कारण जप पैं सफळ। उद्धार निर्मळ सकळ जीवां ॥ ३ ॥ नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरिये। नाम अमृतमय चराचरीं ॥ ४ ॥

२२९ विठ्ठल नामीं आळस न करी गव्हारा। वांयांचि येरझारा

शिणतोसी ॥ १ ॥ हरी उच्चारण करी हा विचार । नामाचे साचार उद्धरण ॥२॥ मी म्हणतां अहंता वाढे हे सर्वथा । परी भजना परता नाहीं मार्ग ॥ ३ ॥ मायाजाळ विषय तोडी तोडी सांठा । विठ्ठलनाम पाठा वोळगे जना ॥ ४ ॥ सर्व हें लटिकें मोहजाळ फिकें । नामाविण एके नाहीं दुजें ॥ ५ ॥ नामा म्हणे उपदेश भजे केशवास । वैकुंठ-निवास वोळगे तुज ॥ ६ ॥

२३० सकळ साधनांचें सार । रामकृष्ण हा उच्चार ॥ १ ॥ म्हणा गोविंद नरहरी । सकळ जीवां तोचि तारी ॥ २ ॥ नाम घेतां हरी माधव । तरताती सकळ जीव ॥ ३ ॥ नामा म्हणे केशव वाचे । धन्य जीवीत वैष्णवांचें ॥ ४ ॥

२३१ रामकृष्ण माळ घालीं कां अढळ । तुटेल भवजाळ माया-मोह ॥ १ ॥ होशील तूं साधू न पवसी बाध । पूर्ण ब्रह्मानंद पावेल तुज ॥ २ ॥ जपतां रामनाम पुरती सर्व काम । आदीं अंतीं नेम साधेल तुज ॥ ३ ॥ नामा म्हणे कृतार्थ पूर्ण मनोरथ । न लगती ते अर्थ माया फांसे ॥ ४ ॥

२३२ नाम हें अमृत भक्तांसी लाधलें । आपण घेतलें बोध्यरूप ॥ १ ॥ नाम हें आळवा नाम हें आळवा होईल दोहावा कामधेनु ॥ २ ॥ न बाधेल विघ्न प्रपंच हें भान । नाम हेचि खूण वैकुंठींची ॥३॥ नामा म्हणे जड जीव ब्रह्म असे सर्व । हा गीतेमाजीं भाव सांगितला ॥ ४ ॥

२३३ तुटे मायाजाळ बिघडे भवसिंधु । जरी लागे छंदु हरिनामाचा ॥ १ ॥ येर कर्मधर्म करितां या कळीं । माजीं कोण बळी तरला सांगा ॥ २ ॥ न पढवे वेद नव्हे शास्त्र बोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ ३ ॥ नव्हे अनुष्ठान न कळे ब्रह्मज्ञान । करावी सोपान कृष्ण कथा ॥ ४ ॥ न साधे हा योग न करवे वैराग्य । साधा भक्तिभाग्य

संतसंगें ॥ ५ ॥ नामा म्हणे साधन न लगे आणिक । दिधली मज भाक पांडुरंगें ॥ ६ ॥

२३४ सोपा हा सुगम उपावो परीस । धरी तूं विश्वास नाम महीमें ॥ १ ॥ नाम होंचि गंगा नाम होंचि भीमा । अंतरीं श्रीरामा जपिजेसु ॥ २ ॥ अमृत सुरस रामनाम एक । वाचेचें वाचक मन ॥ ३ ॥ करीं । नामा म्हणे सुरस सेवीं सुधारस । ध्यायीं केशवास दिननिशीं ॥ ४ ॥

२३५ व्यापक तें नाम तेव्हांच होईल । जेव्हां ओळखेल मीपणासी ॥ १ ॥ आपुलेंचि नाम न ओळखिलें । व्यापक साधिलें जायचिना ॥ २ ॥ आपुलीच ओळख आपणासी पडे । मग सर्वत्र जोडे नाम तेव्हां ॥ ३ ॥ नामाविण नाम तेंचि होय विश्राम । नामदेव म्हणे संतां पुसा ॥ ४ ॥

२३६ हाचि नेम सारी साधेल तो हरी । नाम हें मुरारी अच्युताचें ॥ १ ॥ गोविंद हरे गोविंद हरे । यादव मुरारे रामनाम ॥२ ॥ न लगती कथा नाना विकलता । नामचि स्मरतां नाम वाचे ॥ ३ ॥ नामा म्हणे राम आम्हां हाचि नेम । नित्य तो सप्रेम जप आम्हां ॥४॥

२३७ नाम गाऊं नाम ध्याऊं । नाम विठोबासी वाहूं ॥ १ ॥ आम्ही दैवाचे दैवाचे । दास पंढरिरायाचे ॥ २ ॥ टाळ दिंडी घेऊनि हातीं । केशवराज गाऊं गीतीं ॥ ३ ॥ नामा म्हणे लाखोली सदा । अनंत नामें वाहूं गोविंदा ॥ ४ ॥

२३८ शास्त्रांचे हें सार वेदाचें गव्हार । उतराया पार आणिक नाहीं ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल म्हणा उघडा मंत्र जाणा । कळिकाळ अंकणा होईल तुम्हां ॥ २ ॥ न करावें खंडन अखंड उच्चारण । तप अनुष्ठान न लगे तुम्हां ॥ ३ ॥ सिद्धीचें हें सार मुक्तीचें माहेर । उततरावया पार दुजें नाहीं ॥ ४ ॥ विठ्ठला परतें काय करिसी दैवत ।

परब्रम्ह निरुतें पंढरीये ॥ ५ ॥ सिद्धीचें सहज भक्तीचें हें बीज। केशवीं दिलें मज म्हणे नामा ॥ ६ ॥

२३९ करितां वेदाध्ययन ज्योतिष। नामाचा तो लेश नये हातां ॥ १ ॥ बहुत व्युत्पत्ति पुराण। व्यर्थ तें स्मरण नाम नव्हे ॥ २ ॥ अनंत हें नाम जयांतूनि आलें। त्यांतचि जिरालें जळीं जळ ॥ ३ ॥ सद्गुरुतें नाम सद्गुरुकृपेविण कोणा। साधन साधेना जपें तपें ॥४॥ नामदेव म्हणे स्वतःसिद्ध नाम। गुरुविण वर्म हातां नये ॥ ५ ॥

२४० ज्ञान ध्यान जप तप साधन। तें नाम प्रत्ययातें नये कोणा ॥ १ ॥ गुरुपदीं जावें आधीं हो शरण। मी हें माझें ओळखून घ्यावें नाम ॥ २ ॥ तयाचें तें मूळ पाहोनियां त्यांतें। मिळवावें द्वैत अद्वैतीतें ॥ ३ ॥ द्वैतद्वैतातीत तें स्वयंभ संचलें। तेंचि नाम आलें त्रिभुवनीं ॥ ४ ॥ नामदेव म्हणे परब्रह्म तें नाम। द्वैत क्रियाकर्म नाहीं तेथें ॥ ५ ॥

२४१ सद्गुरुवांचूनि नाम नये हाता। साधन साधितां कोटीगुणें ॥ १ ॥ जैसा कांतेविण करणें संसार। तैसा हा व्यापार साधनाचा ॥ २ ॥ जंव सद्गुरु नाहीं केला भ्रतार। साधन विचार व्यर्थ गेला ॥ ३ ॥ नामदेव म्हणे सद्गुरुपासोनी। नाम घ्या जाणोनी नाना काही ॥ ४ ॥

२४२ अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे। अवघें कुळ त्यांचें पुण्यवंत ॥ १ ॥ अवघेचि संसारी जाणावे ते धन्य। ज्याचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ २ ॥ अवघा विठ्ठल भोगिती दिनराती। वोळगे किंकरवृत्ती नामा त्यांतें ॥ ३ ॥

२४३ सर्वांभूतीं भज नमन करीं संतां। नित्य त्या अच्युता स्मरण करीं ॥ १ ॥ ऐसें भजनीं विनट सांपडेल वाट। रामकृष्ण नीट वैकुंठीची ॥ २ ॥ न लगती साधनें वांयांचि बंधनें। एका नामें होणें चतुर्भुज ॥ ३ ॥ नामा म्हणे थोर नामेंचि सधर। वैकुंठी विहार तया भक्तां ॥ ४ ॥

२४४ चंद्र तारांगण नैऋति भास्कर। तटस्थ निर्धार ब्रह्मादिक ॥ १ ॥ ब्रह्मादि सकळ भजनीं तत्पर। तेव्हां हरिहर नाचतसे ॥ २ ॥ कृष्णा विष्णु नाम अच्युत अनंत। सगुण निश्चित स्मरा वेगीं ॥ ३ ॥ नामा म्हणे नको उदंड सायास। तोडीं भवपाश रामनामें ॥ ४ ॥

२४५ हरिनाम पाठ हाचि भाव। हरी हरी हाचि देव ॥ हरीविण न फिटे संदेह। सर्व जिवाचा जाण पां ॥ १ ॥ हरीतत्त्व ज्याचे देहीं। तोचि तरला येथें पाहीं ॥ हरीविण या डोहीं। भवसागर कैसा तरेल ॥ २ ॥ रामकृष्ण वासुदेवा। हाचि सर्व जीवांचा विसांवा ॥ येथें पोकारूनियां धांवा। विठ्ठलनाम उच्चारीं ॥ ३ ॥ नामा जपे हृदयीं सदा। रामकृष्ण हाचि धंदा ॥ हरीराम परमानंदा। हाचि जप जपतसे ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

२४६ गातां विठोबाची कीर्ती। महा पातकें जळती ॥ १ ॥ सर्व सुखाचा आगर। उभा असे विटेवर ॥ २ ॥ आठवितां पाय त्याचे। मग तुम्हा भय कैचें ॥ ३ ॥ काया वाचा मनें भाव। जनी म्हणे गावा देव ॥ ४ ॥

२४७ जन्मा येऊनियां देख। करा देहाचें सार्थक ॥ १ ॥ वाचे नाम विठ्ठलाचें। तेणें सार्थक देहाचें ॥ २ ॥ ऐसा नामाचा महिमा। शेषा वर्णितां झाली सीमा ॥ ३ ॥ नाम तारक त्रिभुवनीं। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

२४८ नाम फुकट चोखट। नाम घेतां नये वीट ॥ १ ॥ जड शिळा ज्या सागरीं। आत्मारामें नामें तारी ॥ २ ॥ पुत्रभावें स्मरण केलें। तया वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥ नाममहिमा जनी जाणे। ध्यातां विठ्ठलचि होणें ॥ ४ ॥

२४९ एक नाम अवघें सार। वरकड अवघें तें असार ॥ १ ॥

म्हणोनियां परतें करा । आधीं विठ्ठल हें स्मरा ॥ २ ॥ जनी देवाधि-देव । एक विठ्ठल पंढरीराव ॥ ३ ॥

२५० काय हें करावें । धनवंतादि अघवे ॥ १ ॥ तुझें नाम नाहीं जेथें । नको माझी आस तेथें ॥ २ ॥ तुजविण बोल न मानीं । करी ऐसें म्हणे जनी ॥ ३ ॥

२५१ विठ्ठल नामाची नाहीं गोडी । काळ हाणोनि तोंड फोडी ॥ १ ॥ गळां बांधोनि खांबासी । विंचू लाविती जिव्हेसी ॥ २ ॥ ऐसा अभिमानी मेला । नर्क कुंडीं थारा त्याला ॥ ३ ॥ नामा बोध करी मना । दासी जनी लागे चरणा ॥ ४ ॥

२५२ तो हा भक्तांचे तोडरीं । वाचे उच्चारितां हरी ॥ १ ॥ काम होऊनि निष्काम । काम भावभक्ति प्रेम ॥ २ ॥ तो हा पूर्ण काम होय । अखंडित नाम गाय ॥ ३ ॥ काम निष्काम झाला मनीं । वंदी नाचे दासी जनी ॥ ४ ॥

२५३ नाम विठोबाचें घ्यावें । मग पाउल टाकावें ॥ १ ॥ नाम तारक हें थोर । नामे तारिले अपार ॥ २ ॥ अजामेळ उद्धारिला । चोखा मेळा मुक्तीस नेला ॥ ३ ॥ नाम दळणीं कांडणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

२५४ निराकारीचें नाणें । शुद्ध ब्रह्मीचें ठेवणें ॥ १ ॥ प्रयत्नें काढिलें बाहेरी । संत साधु सवदागरीं ॥ २ ॥ व्यास वासिष्ट नारद मुनी । टांकसाळ घातली त्यांनीं ॥ ३ ॥ उद्धव अक्रुर स्वच्छंदीं । त्यांनी आटविली चांदी ॥ ४ ॥ केशव नामयाचा शिक्का । हारप चाले तिन्ही लोकां ॥ ५ ॥ पारख नामयाची जनी । वरती विठोबाची निशाणी ॥ ६ ॥

२५५ नाम विठोबाचें थोर । तरला कोळी आणि कुंभार ॥ १ ॥ ऐसी नामाची आवडी । तुटे संसाराची बेडी ॥ २ ॥ नाम गाय वेळोवेळां । दासी जनीसी नित्य चाळा ॥ ३ ॥

२५६ हरिहर ब्रह्मादिक । नामें तरले तिन्हीं लोक ॥ १ ॥ ऐसा कथेचा महिमा । झाली बोलायाची सीमा ॥ २ ॥ जपें तपें लाजविलीं । तीर्थें शरणागत आलीं ॥ ३ ॥ नामदेवा कीर्तनीं । ध्वजा आल्या स्वर्गाहुनी ॥ ४ ॥ देव श्रुती देती ग्वाही । जनी म्हणे सांगू कायी ॥ ५ ॥

## श्रीभानुदासमहाराज

२५७ जपतां नाम विठ्ठलाचें । भय नाहीं हो काळाचें ॥ १ ॥ नाममंत्र त्रिअक्षर । करी सदा तो उच्चार ॥ २ ॥ विठ्ठल नामें सुख आनंद । भानुदासा परमानंद ॥ ३ ॥

२५८ तुमचें नाम गोड नाम गोड । पुरवी कोड जीवाचें ॥ १ ॥ वाचे सुलभ नामावळी । महा दोषां होय होळी ॥ २ ॥ सुख अनुपम्य गातां नाम । भानुदास म्हणे आम्हा विश्राम ॥ ३ ॥

२५९ नामाचा महिमा शुक सांगे । परीक्षिती राजा जाणे अंगें ॥ १ ॥ जपतांचि रामकृष्ण नामें । दहन होती कर्माकर्में ॥ २ ॥ नामें दया शांति क्षमा । नामें शीतळ शंकर उमा ॥ ३ ॥ नाम जप ध्यानीं मनीं । भानुदास वंदितो चरणीं ॥ ४ ॥

२६० एक नामापरतें साधन । नाहीं नाहीं दुजें आन ॥ १ ॥ वांयां धावती वराडी । करती संसाराची जोडी ॥ २ ॥ न चुके जन्ममरण वेरझारा । हें तो नकळे पामरा ॥ ३ ॥ नामावांचुनी जें जें कर्म । अवघा जाणा तो अधर्म ॥ ४ ॥ भानुदास प्रेमें नाचे । सदा नामघोष वाचे ॥ ५ ॥

२६१ चार युगांमाजीं पावन । कलिमाजी सोपें भजन ॥ १ ॥ मना दृढ करुनि साचा । विठ्ठल विठ्ठल वदे वाचा ॥ २ ॥ संकल्प विकल्प नको भिन्न । तेणें पावे हरिचरण ॥ ३ ॥ नामें जिवींचा जिव्हाळा । भानुदासा जीवनकळा ॥ ४ ॥

२६२ तारक नाम सोपें साचें । विठ्ठल विठ्ठल वदतां वाचे ॥ १ ॥

जन्म मृत्यूचें खंडन । पापा तापाचें दहन ॥ २ ॥ नामें निजव्यास देखा भानुदासा सुखें सुखा ॥ ३ ॥

२६३ कल्पना अविद्या सांडोनियां गोडी । रामनाम जोडी करी बापा ॥ १ ॥ येर ते मायीक नको पडूं छंदा । आठवी गोविंदा एकपणें ॥ २ ॥ द्वैताचि ते वाढी छेदूनियां काढी । नामाची तूं गुढी उभवी सदा ॥ ३ ॥ भानुदास म्हणे सांडोनि कल्पना । चिंती तूं चरणा विठोबाच्या ॥ ४ ।

## श्री एकनाथ महाराज

२६४ ऐका नामाचें माहिमान । नाम पावन तें जाण ॥ १ ॥ हास्य विनोदें घेतां नाम । तरती जन ते अधम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं धरीं विश्वास । नामें नासती दोष कळिकाळाचे ॥ ३ ॥

२६५ नामाचें महिमान सादर ऐका । तारियेले देखा महा पापी ॥ १ ॥ पापाची ते राशी अजामेळ जाण । जपतांचि पावन नामें जाहला ॥ २ ॥ गणिका पांखिरूं नाम जपे सदा । नोहे तिसी बाधा गर्भवासा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कलीमाजी नाम । उत्तम उत्तम जपा आधीं ॥ ४ ॥

२६६ दोषी पापराशी नामाचे धारक । होतां तिन्ही लोक वंदिती माथां ॥ १ ॥ नामाचें महिमान नामाचें माहिमान । नामाचें माहिमान शिव जाणें ॥ २ ॥ जाणती ते ज्ञानी दत्त कपिल मुनी । शुकादिक जनीं धन्य जाहले ॥३॥ एका जनार्दनीं नाम परिपूर्ण । सांपडली खूण गुरुकृपें ॥ ४ ॥

२६७ नाम तारक ये मेदिनीं । नाम सर्वांचें मुगुटमणी ॥ नाम जपे शूळपाणी । अहोरात्र सर्वदा ॥ १ ॥ तें हें सुलभ सोपारें । काम क्रोध येणें सरे ॥ मोह मद मत्सर नुरे । नाममात्रें त्रिजगतीं ॥ २ ॥ घेउनी नामाचें अमृत । एकाजनार्दनीं झाला तृप्त ॥ म्हणोनी सर्वांतें सांगत नाम वाचे वदावें ॥ ३ ॥

२६८ नाम तारक हें क्षितीं । तरले आणि पुढें तरती ॥ १ ॥ न लगे साधन आणि मंडन । नामें सर्व पाप दहन ॥ २ ॥ योगयागांची परवडी । नामापुढें वांयां गोडी ॥ ३ ॥ नाम वाचे आवडी घोका । म्हणे जनार्दनी एका ॥ ४ ॥

२६९ नाम पावन पावन । नाम दोषांसि दहन॥ नाम पतित पावन । कलींमाजी उद्धार ॥ १ ॥ गातां नित्य हरीकथा । पावन होय श्रोता वक्ता ॥ नाम गाऊनि टाळी वाहतां । नित्यमुक्त प्राणी तो ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाम । भवसिंधु तारक नाम ॥ सोपें सुगम वर्म । भाविकांसी निर्धारें ॥ ३ ॥

२७० अष्टादश पुराणें सांगती वडिवार । नाम साराचें सार कलीयुगीं ॥ १ ॥ तारिले पातकी विश्वासघातकी । मुक्त झाले लोकीं तिहीं सत्य ॥ २ ॥ सर्वांतर सार नामजपु निका । जनार्दनाचा एका घोकितसे ॥ ३ ॥

२७१ सकळ साधनांचें सार । मुखीं नामाचा उच्चार ॥ १ ॥ सकळ तपांचें जें सार । मुखीं नामाचा उच्चार ॥ २ ॥ सकळ ज्ञानांचें जें सार । मुखीं नामाचा उच्चार ॥ ३ ॥ सकळ ब्रह्मविद्येचें जें घर । एका जनार्दनाचें माहेर ॥ ४ ॥

२७२ साधन सोपें नाम वाचे । पर्वत भंगती पापाचे ॥ विश्वासियातें साचें । नाम तारक कलियुगीं ॥ १ ॥ अहोरात्र वदतां वाणी । ऐसा छंद ज्याचे मनीं ॥ त्याचेनि धन्य ही मेदिनी । तारक तो सर्वांसी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नाम । भाविकांचें पुरे काम ॥ अभागियांतें वर्म । नव्हे नव्हे सोपारें ॥ ३ ॥

२७३ पशु पक्षी वनचरें । श्वान श्वापदादि सूकरें ॥ १ ॥ पडतां नामघोष कानीं । पावन होती इये जनीं ॥ २ ॥ चतुष्पाद आणि तरुवर । नामें उद्धार सर्वांसी ॥ ३ ॥ उंच नीच नको याती । ब्राह्मणादि

सर्व तरती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं अभेद । नामीं नाहीं भेदाभेद ॥ ५ ॥

२७४ नाम गाये तो पवित्र क्षितीं । नामें उद्धार त्रिजगतीं ॥ १ ॥ ज्याचें उच्चारितां नाम । निवारे क्रोध आणि काम ॥ २ ॥ वेदशास्त्री विवेकी संपन्न । नामें होताती पावन ॥ ३ ॥ नामें उत्तम अधमा गती। एकाजनार्दनीं ध्याय चित्तीं ॥ ४ ॥

२७५ नामामृता पुढें । कायसें अमृत बापुडें ॥ १ ॥ ऐसा नामाचा बडिवार । गोडी जाणे गिरिजावर ॥ २ ॥ नामें जोडे ब्रह्मज्ञान । भुक्तिमुक्ति नामें जाण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सार । ब्रह्मज्ञानाचें हें घर ॥ ४ ॥

२७६ दोष दुरितांचे पाळें । पळती बळें नाम घेतां ॥ १ ॥ नाम प्रताप गहन । भव तारण हरिनाम ॥ २ ॥ आणिक नको दुजी चाड । नाम गोड विठ्ठल ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम । तरले तरती निष्काम ॥ ४ ॥

२७७ नाम पावन तिहीं लोकीं । मुक्त जहाले महापातकी ॥ १ ॥ नाम श्रेष्ठांचें हें श्रेष्ठ । नाम जपे तो वरिष्ठ ॥ २ ॥ नाम जपे नीळकंठ । वंदिताती श्रेष्ठ श्रेष्ठ ॥ ३ ॥ नाम जपे हनुमंत । तेणें अंगीं शक्तिवंत ॥ ४ ॥ नाम जपे पुंडलीक । उभा वैकुंठ नायक ॥ ५ ॥ नाम ध्यानीं मनीं देखा । जपे जनार्दनीं एका ॥ ६ ॥

२७८ तारले नामें अपार जन । ऐसें माहिमान नामाचें ॥ १ ॥ अधम तरले नवल काय । पाषाण ते पाहें तारियेले ॥ २ ॥ दैत्य दानव ते राक्षस । नामें सर्वांस मुक्तिपद ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम सार । जपा निरंतर हृदयीं ॥ ४ ॥

२७९ नामें घडे निजशांती । तेथें वसे भुक्ति मुक्ति ॥ नाम तारक त्रिजगतीं । दृढभावें आठवितां ॥ १ ॥ म्हणोनी घेतलासे लाहो । रात्रंदिवस नाम गावो ॥ कळिकाळाचें भेवो । सहज तेथें पळतसे ॥ २ ॥

मज मानला भरंवसा । नामीं आहे निजठसा ॥ एकाजनार्दनीं सर्वेशा । नाम जपे अंतरीं ॥ ३ ॥

२८० नामें प्राप्त नित्यानंद । नामें होय परम पद ॥ नामें निरसे भवकंद । नाम तारक निर्धार ॥ १ ॥ हेंचि मना दृढ धरीं । वांयां नको पडूं फेरी ॥ तेणें होसी हावभरी । मग पतनीं पडसील ॥ २ ॥ म्हणे एकाजनार्दन । नामें तरती अधम जन ॥ नामें होय प्राप्त पेणें । वैकुंठाचि निर्धारें ॥ ३ ॥

२८१ योग याग तप व्रतें आचरितां । नाम सोपें गातां सर्व जोडे ॥ १ ॥ पाहोनियां प्रचीत नाम घे अनंत । तुटे नाना घात जपें नाम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं नामाचा महिमा । वर्णितां उपरमा शेष आला ॥ ३ ॥

२८२ नित्य नैमित्तिक कर्म । जया न घडे हा धर्म ॥ तेणे उच्चारावें नाम । सत्य निर्धार जाणावा ॥ १ ॥ नामें कर्माची सुटे उपाधी । नामें तुटे आधीव्याधी ॥ नामें शोक संदेह बुद्धी । नासतसे हरिनामें ॥ २ ॥ नाना रोग तुटती नामें । घडती सर्व ब्रह्म कर्में । एका जनार्दनीं नामें । धर्म सकळ साधती ॥ ३ ॥

२८३ नाम श्रेष्ठ तिहीं लोकीं । म्हणोनी शिव नित्य घोकी ॥ १ ॥ सदा समाधी शयनीं । राम चिंती ध्यानीं मनीं ॥ २ ॥ अखंड वैराग्य बाणलें अंगीं । म्हणोनि वंद्य सर्वां जगीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं वाचे । नाम वदे सर्वदा साच ॥ ४ ॥

२८४ जेणें नाम धरिलें कंठीं । धावे त्याच्या पाठीं पोटीं ॥ १ ॥ नाम गातां जनीं वनीं । आपण उभा तेथें जाउनी ॥ २ ॥ नामासाठीं मागें धांवे । इच्छिलें तेणें पुरवावें ॥ ३ ॥ याती कुळ तयाचें । न पाहे कांहीं साचें ॥ ४ ॥ वर्णाची तों चाड नाहीं । नाम गातां उभा पाहीं ॥ ५ ॥ एकाजनार्दनी भोळा । नामासाठीं अंकित झाला ॥ ६ ॥

२८५ भाग्याचें भाग्य धन्य ते संसारी । सांठविती हरी हृदयां-माजी ॥ १ ॥ धन्य त्यांचें कूळ धन्य त्यांचें कर्म । धन्य त्यांचा स्वधर्म नाम मुखीं ॥ २ ॥ संकटीं सुखांत नाम सदा गाय । न विसंबे देवराय

क्षण एक ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धन्य त्यांचें दैव । उभा स्वयमेव देव घरीं ॥ ४ ॥

२८६ अमृत तें स्वर्गीं निर्जर सेविती । परी चरफडती नामामृता ॥ १ ॥ धन्य ते दैवाचे नाम घेती वाचे । होतें पै जन्माचें सार्थक तेणें ॥ २ ॥ नलगे उपवास पारणें अष्टांग । नलगे नाना योग साधनें नीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नामामृत सार । उतरले पैलपार वैष्णव जन ॥ ४ ॥

२८७ नामापाशीं तिष्ठे देव । नामापाशीं वसे भाव ॥ नामापाशीं मुक्ति गौरव । अहर्निशीं वसतसे ॥ १ ॥ नामापाशीं रिद्धिसिद्धी । नामापाशीं ते समाधी ॥ नामें तुटती उपाधी । जन्मोजन्मींच्या ॥ २ ॥ नामापाशीं भुक्तिमुक्ति । नामापाशीं ते विरक्ती । नामें पातकें नासती । बहु जन्मांचीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम । गातां निरसे भवभ्रम ॥ साधन उत्तम । कलियुगामाझारी ॥ ४ ॥

२८८ राजाला आळस संन्याशाला सायास । विधवेसी विलास विटंबना ॥ १ ॥ व्याघ्रासी शांतता गाईसी उग्रता । वेश्येसी हरिकथा विटंबना ॥ २ ॥ दानेविण पाणी घ्राणेविण घाणीं । नामेंविण वाणी विटंबना ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भावभक्तीविना । पुण्य केलें नाना विटंबना ॥ ४ ॥

२८९ गांवढे सहस्र ब्राह्मण । तृप्त केलिया भोजन ॥ पुण्य-क्षेत्रींचा एकाचि जाण । सुकृत तितुकेंची जोडे ॥ १ ॥ ऐसें पुण्य-क्षेत्रींचे दश शतक । तृप्त केलिया पाठक ॥ पहातां सुकृत । तितु-केंची जोडे ॥ २ ॥ ऐसे सहस्र वेद पाठक । तृप्त केलिया पंडित एक ॥ पहातां सुकृत । तितुकेंचि जोडे ॥ ३ ॥ तैसेंच पंडित सहस्र एक । तृप्त केलिया संन्यासी देख ॥ तरी तें सुकृत । तितुकेंचि जोडे ॥ ४ ॥ तैसे सहस्र संन्यासी । गणित एक परमहंसी ॥ पाहतां सुकृतासी । एक तृप्त केलिया ॥ ५ ॥ परमहंसी सहस्र गणी । तैसीच ब्रह्मज्ञा-

नाची मांडणी ॥ जोडे सुकृत तृप्तकरणीं । एक ब्रह्मवेत्ता ॥ ६ ॥ उपमा देतां ब्रह्मवेत्यासी । पहतां ब्रह्मांडी नाहीं त्यासी ॥ तृप्त केलिया ब्रह्मवेत्यासी । हरिहर तृप्त ॥ ७ ॥ ऐसे वेत्ते अपरंपार । नये नामधारका बरोबर ॥ नामधारका सादर । पाहे एकाजनार्दनीं ॥ ८ ॥

२९० नामपाठ गाय संतांचे संगती । नाहीं पुनरावृत्ति तया मग ॥ १ ॥ नामपाठ गाय सर्वभावें मनीं । चुकेल आयणी गर्भवास ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाये । जनार्दन पाहे जनीं वनीं ॥ ३ ॥

२९१ नामपाठ गाये सदोदित मनीं । यमाची जाचणी नोहे तया ॥ १ ॥ नाम पाठ भावें आदरें जो गाये । सर्व सुख पाहे तया होय ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामीं धरी आवडी । सर्वभावें जोडी नाम पाठ ॥ ३ ॥

२९२ नामपाठ सार वेदाचें तें मूळ । शास्त्रांचें तें फळ नामपाठ ॥ १ ॥ योग याग विधी न लगे खटपट । नामपाठें स्पष्ट सर्व कार्य ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ घोकी । गुढी तिहीं लोकीं उभारली ॥ ३ ॥

२९३ नामपाठ ब्रह्म उघड बोले वाचा । वेदांतीं तो साचा निर्णय असे ॥ १ ॥ नामपाठ भाव भक्ती ते कारण । आणिक साधन नाहीं दुजें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका गाये तो आवडी ।.तोडियेली बेडी संसाराची ॥ ३ ॥

२९४ नामपाठ जगीं सोपें तें साधन । म्हणोनी वर्तन वैष्णव करिती ॥ १ ॥ आनंदें नाचती टाळी वाजविती । नामपाठ गाती सर्वभावें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका भुलला नामपाठीं । म्हणोनि वैकुंठीं घर केलें ॥ ३ ॥

२९५ नामपाठ प्रेमें सांवता तो गाये । हृदय कमळीं वाहे नारायणा ॥ १ ॥ नामपाठ निका नामपाठ निका । खूर्पूं लागे देखा देव

त्यासी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ऐकोनियां बोल । सांगत नवल संतांपुढें ॥ ३ ॥

२९६ नामपाठें गीता ज्ञानेश्वरी होय । स्मरे तूं निर्भय ज्ञानदेवी ॥ १ ॥ नामपाठें सोपीं अक्षरें तीं उच्चार । ज्ञानेश्वरीं उच्चार करी वाचे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका ज्ञानेश्वरी ध्याय । तेणें मुक्त होय युगायुगीं ॥ ३ ॥

२९७ नामपाठ विठ्ठल पंचविसावा वाचे । सार्थक जन्माचें जालें जालें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल वदतां वो वाचे । सार्थक जन्माचें झालें साचें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठ गाय । विठ्ठल विठ्ठल ध्याये वेळोवेळा ॥ ३ ॥

२९८ झाला नामपाठ झाला नामपाठ । मोक्ष मार्ग वाट सोपी झाली ॥ १ ॥ आवडी आदरें नामपाठ गाये । हरीकृपा होय तयावरी ॥ २ ॥ जनार्दनाचा एका नामपाठें निका । तोडियेली शाखा अद्वैताची ॥ ३ ॥

२९९ अकर उकर मकार नामाचे ठेविलें । शिवातेंही केलें निराकार ॥ १ ॥ जीव शिव दोन्ही विराले ज्यामाजी । तें नाम सहजीं विठ्ठल होय ॥ २ ॥ नामाविण नाहीं आणिकांसी ठाव । दुजा नाहीं भाव जीवां सर्वां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं नाम वनदाट । भूवैकुंठ पेठ पंढरी देखा ॥ ४ ॥

३०० अविनाश नाम स्वयंभ संचलें । तें उभें चांगलें विटेवर ॥ १ ॥ वर्णितां वेदांसी न कळेचि पार । तें उभें साचार विटेवरी ॥ २ ॥ मौन्यरूप श्रुती राहिल्या तटस्थ । तो आहे मूर्तिमंत विटेवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम अविनाश । गातां जाती दोष जन्मांतरींचे ॥ ४ ॥

३०१ तुमचें नाम आठवितां । धणी न पुरे पंढरीनाथा ॥ १ ॥ सुख अनुपम्य कल्प कोडी । युगा ऐसी एक घडी ॥ २ ॥ निजध्यास

जडतां नामीं । सुखें सुख दुणावे प्रेमीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम । श्रेष्ठ धामांचें हें धाम ॥ ४ ॥

३०२ अंकितपणें राहिला उभा । विठ्ठल चैतन्याचा गाभा ॥ उजळली दिव्य प्रभा । अंग कांति साजिरी ॥ १ ॥ पीतांबर माळ कंठीं । केशर कस्तुरीची उटी ॥ मुकुटा तळवटी । मयुर पिच्छें शोभती ॥ २ ॥ सनकादिकांचें जें ध्यान । उभें विटे समचरण ॥ भक्तांचें तें ठेवणें । जाप्य गौरीशिवाचें ॥ ३ ॥ तो देवाधिदेव विठ्ठल । वाचे वदतां नलगे मोल ॥ एका जनार्दनीं बोल । फुकाचें तें वेचितां ॥ ४ ॥

३०३ सर्वकाळ ज्यांचा नेम । वाचे श्रीविठ्ठलाचें नाम । दुजा नाहीं कांहीं श्रम । विठ्ठल विठ्ठल वदती ॥ १ ॥ धन्य पुण्य तया साचें । नामस्मरण नित्य वाचे ॥ त्रीअक्षरी नाम वाचे । धन्य त्यांचें पुण्य तें ॥ २ ॥ ऐसा साधे जया नेम । तया सोय राखे आत्माराम ॥ एका जनार्दनीं परम । प्रिय तो देवाचा ॥ ३ ॥

३०४ नामामृत गोडी वैष्णव जाणती । येर चरफडती काग जैसे ॥ १ ॥ प्राकृत हे जन भुलले विषया । नामाविण वांयां जाती देखा ॥ २ ॥ नामें साधे मुक्ति नामें साधे भुक्ति । नामेंचि विरक्ति होत आहे ॥ ३ ॥ नाम तेंचि जालें वर्णरूपातीत । अनाम सतत उभें असे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण नाम बोध । विठ्ठल नामीं छंद सदा असो ॥ ५ ॥

३०५ उभा विटेवरी कट धरूनियां करीं । पीतांबर साजिरी बुंथी शोभे ॥ १ ॥ विठोबा विठोबा नामाचा हा छंद । मन तें उद्बोध जडो पाई ॥ २ ॥ त्रीअक्षर नाम जप हा परम । तो मंगळधाम विठ्ठल माझा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं विठ्ठल कानडा । देखिला उघडा विटेवरी ॥ ४ ॥

३०६ सर्वांमाजी सार नाम विठोबाचें । सर्व साधनांचें घर जें का ॥ १ ॥ सहा चार अठरा वर्णिताती कीर्ति । नामें मोक्षप्राप्ती अर्धक्षणीं ॥ २ ॥ शुकादिकीं नाम साधिलेंसे दृढ । प्रपंच काबाड निरासिलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जनीं ब्रह्मनाम । तेणें नेमधर्म सर्व होय ॥ ४ ॥

३०७ न धरी लौकिकाची लाज । तेणें सहज नाम गावें ॥ १ ॥ अनायासे देव हातां । साधन सर्वथा दुजें नाहीं ॥ २ ॥ साधन तें खटपट । नाम वरिष्ठ नित्य गावें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं सोपा । विठ्ठल नाम मंत्र जपा ॥ ४ ॥

३०८ विठ्ठल विठ्ठल वदतां वाचें । स्वरूप त्याचे ठसावें ॥१॥ हा तो अनुभवा अनुभव । निरसे भेव काळाचें ॥ २ ॥ रूप देखतां आनंद । जन्मकंद तुटे तेणें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मन । जडोन ठेलें चरणीं ॥ ४ ॥

३०९ एकाविध भावें हरी । वाचे उच्चारी सर्वदा ॥ १ ॥ सर्व साधनांचें सार । विठ्ठलमंत्रांचा उच्चार ॥ २ ॥ असो सदा हेंचि ध्यान । विठ्ठल नामाचें चिंतन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जपा । विठ्ठल विठ्ठल मंत्र सोपा ॥ ४ ॥

३१० एक वेळ गाय विठ्ठलाचें नाम । मोक्ष मुक्ति सकाम पुढें उभे ॥ १ ॥ आवडीनें घाली तया लोटांगण। संतांचे चरण वंदी माथां ॥ २ ॥ पंढरीची वारी संतांचा सांगात । पुरती सर्व हेत निश्चयेंसी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धरूनि विश्वास । संतांचा दास होय आधीं ॥ ४ ॥

३११ गायन तें सोपें गाऊं । वाचे ध्याऊं विठ्ठल ॥ १ ॥ तेणें सर्व होय सिद्धी । तुटे उपाधी जन्म जरा ॥ २ ॥ साधनांचा न करूं श्रम । गाऊं नाम आवडी ॥ ३ ॥ शुकादिक रंगले रंगीं । त्याची मार्गीं आम्ही जाऊं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धणीवरी । उच्चारूं हरी संतसंगें ॥ ५ ॥

३१२ कलियुगामाजीं एक हरिनाम साचें । मुखें उच्चारितां पर्वत छेदी पापांचे ॥ १ ॥ सर्वभावें भजा एक हरीचें नाम । मंगला मंगल करील निर्गुण निष्काम ॥ २ ॥ दोषी अजामेळ तोहि नामें तरला । हरिनामें गणिकेचा उद्धार झाला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम साराचें सार । स्त्रियादि अंत्यजा एकदांचि उद्धार ॥ ४ ॥

३१३ जगीं तो व्यापक भरूनी उरला । शरण तूं तयाला जाय वेगीं ॥ १ ॥ उघडा मंत्र जाण वदे नारायण । नोहे तुज विघ्न यमदूत ॥ २ ॥

अखंड वाचेसी उच्चार नामाचा । तेणें कळिकाळाचा धाक नाहीं ॥३॥ एकाजनार्दनीं संतसेवेविण । आणिक साधन नाहीं दुजें ॥ ४ ॥

३१४ नाम हें नौका तारक भवडोहीं । म्हणोनि लवलाही वेग करा ॥ १ ॥ बुडतां सागरीं तारूं श्रीहरी । म्हणोनी झडकरी लाहो करा ॥ २ ॥ काळाचा तो फांसा पडला नाहीं देहीं । म्हणोनि लवलाही लाहो करा ॥ ३ ॥ एकाजनार्दनी लाहो करा वळें । सर्वदा सर्वकाळें लाहो करा ॥ ४ ॥

३१५ दुजा छंद नोहे वाचे । वदें साचें हरिनाम ॥ १ ॥ कोटी कुळें होतीं पावन । नामस्मरण करतांची ॥ २ ॥ यम न पाहे तयाकडे । वाडें कोडें नमस्कारी ॥ ३ ॥ विधि शची उमारमण । वंदिती चरण आवडी ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । उपाय नेटका कलियुगीं ॥ ५ ॥

३१६ सर्वांवरि वरिष्ठ सत्ता । वाचे गातां हरिनाम ॥ १ ॥ साधन सोपें पाहतां जगीं । सांडावी उगी तळमळ ॥ २ ॥ रामनामें करा ध्यास । व्हारे उदास प्रपंचीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । करा वज्राहुनी कठिण ॥ ४ ॥

३१७ नामें पाषाण तरले । महा पापी उद्धरले ॥ राक्षसादि असुर तरले । एका नामें हरीच्या ॥ १ ॥ घेई घेई नाम सदा । तेणें तुटेल आपदा ॥ निवारेल बाधा । पंचभूतांची निश्चयें ॥ २ ॥ होका पंडित ब्रह्मज्ञानी । तरती तारती मेदिनी ॥ शरण एकाजनार्दनीं । नाम उच्चारणी आनंद ॥ ३ ॥

३१८ हरिनामें तरले । पशुपक्षी उद्धरले ॥ १ ॥ ऐशी व्याख्या वेद-शास्त्रीं । पुराणें सांगताती वक्त्रीं ॥ २ ॥ नामें प्रल्हाद तरला । उपमन्यु अढळपदीं बैसला ॥ ३ ॥ नामें तरली ती शिळा । तारियला वानर मेळा ॥ ४ ॥ हनुमंत ज्ञानी नामें । गणिका निजधामीं नामें ॥ ५ ॥ नामें पावन वाल्मिक । नामें अजामेळ शुद्ध देख ॥ ६ नामें चोखामेळ केला पावन । नामें कबीर कमाल तरले जाण ॥ ७ ॥ नामें उंच नीच तारिले । एका-जनार्दनीं नाम बोले ॥ ८ ॥

३१९ हरीचे नामे हरीचे भक्त । उद्धरले असंख्यात ॥ १ ॥ दैत्य

दानव मानव । रीस वानर जीव सर्व ॥ २ ॥ वृक्ष पाषाणादी तृण । हरिनामें ते पावन ॥ ३॥ पशु पक्षी अबला । एकाजनार्दनीं तरल्या ॥ ४॥

३२० हरीनामामृतें तरले अपार। व्यासवाल्मिकादी निर्धार तरले जाण ॥ १ ॥ सेवेचेनि मिसें अक्रुर तरला । उद्बोध जाहला हृदयामाजी ॥ २ ॥ सख्यत्व योगें अर्जुन तरला । प्रत्यक्ष भेटला कृष्णराव ॥ ३ ॥ दास्यत्व निकटीं हनुमंता भेटी । हृदय संपुटी राम वसे ॥ ४ ॥ नामधारकपणें प्रल्हादु तरला । प्रत्यक्ष देखिला नरहरी ॥ ५ ॥ उपमन्यू बाळक दुधाचिया छंदें । तयासी गोविंदें कृपा केली ॥ ६ ॥ ऐसे अपरंपार तरले नामस्मरणीं । एकाजनार्दनीं नाम जपे ॥ ७ ॥

३२१ जेथें हरीनामाचा गजर । कर्म पळतसे दूर ॥ १ ॥ नाम निर्दळी पापातें । वदती शास्त्रें ऐशीं मतें ॥ २ ॥ पापांचे पर्वत । नाम निर्दाळी सत्य ॥ ३ ॥ नाम जप जनार्दन । एका जनार्दनीं पावन ॥ ४ ॥

३२२ सुलभ सोपारें नाम मुखीं गातां । पातकाच्या चळथा कांपताती ॥ १ ॥ हरिनाम सार वाचे तो उच्चार । तरले नारीनर नाममात्रें ॥ २ ॥ वेदांत सिद्धांत तयांचा संकेत । नामें होती मुक्त महापापी ॥३॥ एकाजनार्दनीं वेदाचें निजसार । नाम परात्पर जपती सर्व ॥ ४ ॥

३२३ हरिनामीं ज्याची प्रीती । सदा वानिति हरिनाम ॥ १ ॥ धन्य धन्य जन्म त्यांचा । उच्चार वाचा हरिनाम ॥ २ ॥ नेणती शीण योगयागीं । घेती जगीं हरिनाम ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हरिनाम । उमेसी सांगे राम जप करी ॥ ४ ॥

३२४ नाम तें ब्रह्म नाम तें ब्रह्म । नामापाशीं नाहीं कर्म विकर्म ॥ १ ॥ अबद्ध पढतां वेद बाधी निषिद्ध । अबद्ध नाम पढतां प्राणी होती शुद्ध ॥ २ ॥ अबद्ध मंत्र जपतां जापक चळे । अबद्ध नाम जपतां जडमूढ उद्धरले ॥ ३ ॥ स्वधर्म कर्म करी पडे व्यंग । विष्णुस्मरणें तें समूळ होय सांग ॥ ४ ॥ नामापाशीं नाहीं विधिविधान । आसनीं शयनीं

भोजनीं नाम पावन ॥ ५ ॥ एका जनार्दनीं नाम निकटी । ब्रह्मानंदी भरली सृष्टी ॥ ६ ॥

३२५ जगासी तारक हरि हा उच्चार । सर्व वेरझार खुंटे जेणें ॥ १ ॥ पाहतां ब्रह्मांडीं व्यापक तो हरी । सबाह्य अभ्यंतरीं भरलासे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं रिता ठाव कोठें । पुंडलिक पेठे उभा नीट ॥ ३ ॥

३२६ नामाचे पोवाडे वर्णिती सावडे । हरिनामें बागडे रंगले ते ॥ १ ॥ नामापरतें आन नेणती सर्वथा । साधन चळथा वांयां जाय ॥ २ ॥ नाम निजधीर मानुनी भरंवसा । गाती ते उल्हासा रात्रंदिन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ध्यानीं आणि मनीं । नामसंजीवनी जपतसे ॥ ४ ॥

३२७ अष्टांग साधन न करीं वाउगें । धूम्रपान वेगें कासया करसी ॥ १ ॥ मनीं हरी धरी मनी हरी धरी । वाउगा तूं फेरीं पडों नको ॥ २ ॥ साधन फुकट वाउगे ते कष्ट । धरी हरी वरिष्ठ मनामाजी ॥ ३ ॥ साधन साधितां शिणताती मुनी । तो हरी कीर्तनीं नाचतसे ॥ ४ ॥ सायास नलगे करावे ते कांहीं । एकाजनार्दनीं पायीं बुडी दिली ॥ ५ ॥

३२८ महामाला हरीचें नाम । तरती अधमादि अधम ॥ हाचि कलिमाजी धर्म । नामापरतें न देखे ॥ १ ॥ जगीं नाम तारक नौका । आन उपाय नाहीं देखा ॥ साधन साधितां साधकां । नामापरतें थोर नाहीं ॥ २ ॥ धरा विश्वास बांधा गांठीं । नाम जपा जगजेठी ॥ एका-जनार्दनीं भय पोटीं । नाहीं तुम्हां काळाचें ॥ ३ ॥

३२९ येणेंचि नामें तारिलें बहुतां । दोषी तो पुरता अजामेळ ॥ १ ॥ गणिका आणि वाला अजामेळ भिल्लणी । गोपाळ गौळणी तारियेल्या ॥ २ ॥ गजेंद्र तो पशु नाडिता जळचरें । धांवे देव सत्वरें ब्रीदासाठीं ॥ ३ ॥ प्रल्हादा संकट पडतां निवारी । चोखियाचें करी बाळंतपण ॥ ४ ॥ दामाजीचा महार होऊनियां ठेला । उणेंपण त्याला येवों नेदी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भक्तांचा अंकित । उभाचि तिष्ठत विटेवरी ॥ ६ ॥

३३० चिंतनें कंसासुर तरला । चिंतनें पूतनेचा उद्धार केला ॥

चिंतनें आनंद जाहला । अर्जुनादिकांसी ॥ १ ॥ म्हणोनि करावें चिंतन ॥ काया वाचा आणि मन ॥ संताचे चरण । नित्यकाळ चिंतावे ॥ २ ॥ चिंतन आसनीं शयनीं । भोजनी आणि गमनागमनीं ॥ सर्वकाळ निज-ध्यानीं । चिंतन रामकृष्णाचें ॥ ३ ॥ चिंतन हेंचि तप थोर । चिंतनें साधे सर्व संसार ॥ एकाजनार्दनीं निर्धार । नामस्मरण चिंतनीं ॥ ४ ॥

३३१ चिंतन तें सोपें जगीं । रामकृष्ण म्हणा सत्संगीं । उणें पडों नेदी व्यंगीं । देव धांवे चिंतनें ॥ १ ॥ चिंतन करितां द्रौपदी । पावलासे भलते संधी ॥ ऋषीश्वरांची मांदी । तृप्त केली क्षणमात्रें ॥ २ ॥ चिंतनें रक्षिलें अर्जुना । लागों नेदी शक्ति बाणा ॥ होउनी अंकणा । रथारूढ बैसला ॥ ३ ॥ चिंतनें प्रल्हाद तारिला । जळीं स्थळीं सांभाळिला ॥ एका-जनार्दनीं भला । चिंतनाचा अंकित ॥ ४ ॥

३३२ चिंतनें बळीद्वारी बंधन । चिंतनें होय समाधान ॥ न म्हणे उच्छिष्ट अथवा पूर्ण । चिंतनेंचि मुख पसरी ॥ १ ॥ चिंतनें भोळे भाविक जन । तयांचें वारी नाना विघ्न ॥ धर्माघरीं उच्छिष्ट जाण । चिंतनासाठीं काढीतसे ॥ २ ॥ चिंतनासाठीं सारथी जाहला । चिंत-नासाठीं उभा ठेला ॥ चिंतनेंचि गोंविला । पुंडलिकें अद्यापी ॥ ३ ॥ चिंतनें उभा विटेवरी । न बैसे अद्यापीवरी ॥ एकाजनार्दनीं निर्धारी । चिंतन सोपें सर्वांत ॥ ४ ॥

३३३ चिंतनें धांवे भक्तां पाठीं । धरी कांबळी हातीं काठी ॥ चिंतनें उठाउठी । बांधवितो आपणिया ॥ १ ॥ ऐसा भुकेला चिंतनाचा । न पाहे यातीहीन उंचाचा ॥ काय अधिकार शबरीचा । फळें काय प्रिय तीं ॥ २ ॥ एका जनार्दनीं चिंतन । तेणें जोडे नारायण ॥ आणिक नलगे साधन । कलीमाजी सर्वथा ॥ ३ ॥

३३४ चिंतनीं केला उद्धार । चिंतनें तरले नारीनर ॥ पशुपक्ष्यादि साचार । चिंतनेंचि तारिले ॥ १ ॥ एवढी चिंतनाची थोरी । महापापा होय बोहरी ॥ याती कुळाची वारी । कोण पुसे थोरिवा ॥ २ ॥ मुक्ति-

मुक्तिचें सांकडें । तयां न पडोचि वापुडें ॥ चिंतनेंचि कोडें । सर्व हरे तयांचें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं मन । दृढ ठेवावें बांधून ॥ चिंतनेंचि जाण । सर्व लाभ घडती ॥ ४ ॥

३३५ चिंतनें उद्धरला पापी । महा दोषी केला निःपापी ॥ तया म्हणती ऋषी तपी । पुराणीं ते सर्व ॥ १ ॥ नारदें सांगोनियां मंत्र । केला जगीं तो पवित्र ॥ चिंतना एवढें पात्र । आन नाहीं सर्वथा ॥ २ ॥ चिंतनें शुकादिक मुक्त । राजा जाहला परीक्षित ॥ ऐसे अपार आहेत । चिंतनें मुक्त जाहले ते ॥ ३ ॥ चिंतनाची एवढी थोरी । गणिका नारी परद्वारीं ॥ वाचे उच्चारितां हरी । मोक्षधामीं बैसविली ॥ ४ ॥ चिंतनें हनुमंता समाधी । तुटोनि गेली आधिव्याधी । एकाजनार्दनीं बुद्धी । चिंतनींच जडलीसे ॥ ५ ॥

३३६ देहीं न धरी जो आशा । चित्त पंढरी-निवासा ॥ स्मरणाचा ठसा । रात्रंदिवस जयात ॥ १ ॥ तोचि होय हरीचा दास । तेणें पुरती सर्व सायास ॥ नाहीं आशा पाश । चिंतनावांचुनी सर्वथा ॥ २ ॥ ध्यानीं मनीं नारायण । सदा सर्वदा हें चिंतन ॥ एका जनार्दनीं मन । जडलेसें हरिपायीं ॥ ३ ॥

३३७ चिंतन तें हरिचरण । हेंचि कलीमाजी प्रमाण ॥ सर्व पुण्याचें फळ जाण । नामस्मरण विठ्ठल ॥ १ ॥ मागें तरले पुढें तरती । याची पुराणीं प्रचिती । वेदशास्त्र जया गाती । श्रुतीही आनंदें ॥ २ ॥ हेंचि सर्वांशीं माहेर । भूवैकुंठ पंढरपूर । एकाजनार्दनीं नर । धन्य जाणा तेथींचे ॥ ३ ॥

३३८ चिंतन तें करी सदा । रामकृष्णहरिगोविंदा ॥ १ ॥ हेंचि एक सत्य सार । वांयां व्युत्पत्तीचा भार ॥ २ ॥ नको जप तप अनुष्ठान । वाचे वदे नारायण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव । अवघा देहीं पाहें देव ॥ ४ ॥

३३९ सप्रेमें करितां भजन । तेणें घडती कोटी यज्ञ ॥ १ ॥ प्रेम-

सार प्रेमसार । वांयां भार कुंथेचा ॥ २ ॥ प्रेमेवीण न भेटे देवा । अवघा वावो पसारा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेमसार । तुटे येरझार येणें जाणें ॥ ४ ॥

## श्रीनिवृतीनाथ

३४० न जाणती कळाकुसरी गोपाळ । नाम हें मंगळ अच्युताचें ॥ १ ॥ हेंचि मज द्यावें सप्रेम आपुलें । ध्यातुसें पाउलें एवढ्यासाठीं ॥ २ ॥ न मागे ने घे कांहीं याविण आणिक । सप्रेमाची भूक तृष्णा करी ॥ ३ ॥ समर्थाचे घरीं कांहीं नाहीं उणें । अखंड प्रेम देणें कृष्णनामीं ॥ ४ ॥ इतुकेंचि दातारा पुरवी माझें कोड । यावीण काबाड भार नेघे ॥ ५ ॥ निवृत्ति सप्रेम संजीवनी मूळ । स्मरतां काळ वेळ नाहीं नामीं ॥ ६ ॥

३४१ नाम मुखीं सदा तोचि पै भाग्याचा । तयासी यमाचा धाक नाहीं ॥ १ ॥ रामनाम हरि सर्व काळ वसे । तेथेंचि विलसे हरीराज ॥ २ ॥ हरिध्यान वसे अखंड सर्वदा । न पवे आपदा इये जनीं ॥ ३ ॥ निवृत्ति राम हरिभजन करी । सर्वत्र कामारी ऋद्धिसिद्धी ॥ ४ ॥

३४२ आशा पिपाशा नेघों पै चित्तीं । एका नामें तृप्ति सर्वकाळ ॥ १ ॥ राम राम नाम आम्हांसी अखंड । नेणों पै पाखांड नाना मतें ॥ २ ॥ हरिनाम वाचे सार मंत्र आम्हां । अखंडित प्रेमा वसे चित्तीं ॥ ३ ॥ निवृत्ती संचित गयनी पै सांगे । एका श्रीरंगें जोडी करा ॥ ४ ॥

३४३ ज्याचे मुखीं नाम अमृतसरिता । तोचि एकु पुरता घट्ट जाणा ॥ १ ॥ नामाचेनि बळें कळिकाळ आपणा । ब्रम्हांडा येसणा तोचि होय ॥ २ ॥ न पाहे तयाकडे काळ अवचिता । नामाची सरिता जया मुखीं ॥ ३ ॥ निवृत्ति नामामृत उच्चारी रामनाम । नित्य परब्रह्म त्याचे घरीं ॥ ४ ॥

३४४ नित्य नाम वाचे तोचि एक धन्य । त्याचेंचि शुद्ध पुण्य

इये जनीं ॥ १ ॥ रामनामांकित नित्य नाम वाचे । दहन पापाचें एका नामें ॥ २ ॥ ऐसा जो नित्यता पढतसे नाम । नाहीं तया सम दुजें कोणी ॥ ३ ॥ निवृत्ति अव्यक्त रामनाम जपे । नित्यता पैं सोपें रामनाम ॥ ४ ॥

३४५ अखंड जपतू नाममंत्र वाचे । त्याहुनि दैवाचे कोण भूमीं ॥ १ ॥ अमृतीं राहिला त्यासि कैचें मरण । नित्यता शरण हरि-चरणीं ॥ २ ॥ नाममंत्रराशि अनंत पुण्य त्यासी । नाहीं पैं भाग्यासी तयाहुनि ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे सार रामनाम मंत्रु । कैचा त्यासी शत्रु जितीं जनीं ॥ ४ ॥

३४६ नाम नाहीं वाचे तो नर निर्दैव । कैसेनि दैव फावेल तया ॥ १ ॥ जपे नाम वाचे रामराम पाठें । जाईल वैकुंठें हरि म्हणतां ॥ २ ॥ न पाहे पैं दृष्टी कळिकाळ तुज । रामनाम बीज मंत्रसार ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे नाम जपावें नित्यता । आपणची तत्वता होईल हरी ॥ ४ ॥

३४७ नामाचेनि बळें तरिजे संसार । आणिक विचार करूं नको ॥ १ ॥ नाम जप वेगीं म्हणे हरी हरी । प्रपंच बोहरी आपेआप ॥ २ ॥ नित्यता भजन देव द्विज करी । नाम हें उच्चारी रामनाम ॥ ३ ॥ निवृत्ति जपतु रामनाम वाचे । दहन पापाचें आपेआप ॥ ४ ॥

३४८ नामाचेनि स्मरणें नित्यता पारणें । तेंवि विठ्ठलनाम नाणें पंढरीयें ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल मंत्र हेंचि निजशास्त्र । विचारितां सर्वत्र दुजें नाहीं ॥ २ ॥ नामाविण मूर्ख नित्य पैं तया दुःख । नामें शुकमुख नित्य सदा ॥ ३ ॥ निवृत्तीचें जाप्य विठ्ठल नाम पाठ । एका नामें पाप कोटि जाय ॥ ४ ॥

३४९ रामनाम नित्य अखंड पैं चित्तीं । तयाचे पुरती सर्वकाम ॥ १ ॥ रामकृष्ण नामें तुटती संसार । नाहीं त्या येरझार योनिमाळे ॥ २ ॥ हरिध्यान आम्हां हाचि मंत्र थोर । न करी विचार अन्य शास्त्रीं

॥ ३ ॥ निवृत्ति अखंड जपतुसे नाम । हृदयीं सप्रेम मूर्ति त्याची ॥ ४ ॥

३५० हरिवीण दैवत नाहीं पैं अनुचित्तीं । अखंड श्रीपती नाम वाचे ॥ १ ॥ रामकृष्ण मूर्ती या जपा आवृत्ति । नित्य नामें तृप्ती जाली आम्हां ॥ २ ॥ नामाचेनि स्मरणें नित्य पै सुस्नात । दुजियाची मात नेणों आम्हीं ॥ ३ ॥ निवृत्ती जपतु अखंड नामावळी । हृदयकमळीं केशीराज ॥ ४ ॥

३५१ अचेत आत्मा चेतविला साचा । प्रबोध नामाचा रामनामीं ॥ १ ॥ हें सुख साचार निरंतर सर्वां । एकतत्वी भावी आचरण ॥ २ ॥ निवृत्ति म्हणे आत्मा हाचि पैं विठ्ठल । नाहीं बहुसाळ कर्मकांड ॥ ३ ॥

३५२ रूप ध्यावो ध्यानीं आईकों पैं कीर्तनीं । पारणें श्रवणीं नयनाचिये ॥ १ ॥ हृदयीं विठ्ठल ध्यातां निरंतरु । वैकुंठ साचारु प्राणियांसी ॥ २ ॥ अनंत जन्माचें प्रायश्चित्त हरी । विठ्ठल साजिरी ब्रीदावळी ॥ ३ ॥ निवृत्ति साधन रूप ध्यान ध्यानीं । मनाची उन्मनी हरिचरणी ॥ ४ ॥

३५३ नाममंत्रसार नित्य निरंतर । येणेंचि संसार तरे जाणा ॥ १ ॥ एकेविण दुजें नाहीं नाहीं सहजें । नाम मुखें भोजें घेईजसु ॥ २ ॥ निवृत्ति म्हणे पारु विठ्ठलीं उच्चारु । तयाचा संसारु मोक्षरूप ॥ ३ ॥

३५४ प्रवृत्ति निवृत्ति या दोन्ही सहज । जनीं वनीं काज करूनी असती ॥ १ ॥ नारायण नाम जपतांचि दोन्ही । एक तत्वीं करणी सांगिजे गुज ॥ २ ॥ आशेचे विलास गुंफोनि माहिमा । तत्वीं तत्व सीमा निजज्ञानें ॥ ३ ॥ निवृत्ति तत्वता मनाचें मोहन । नित्य समाधान रामनामें ॥ ४ ॥

३५५ एक तत्व हरि असे पैं सर्वत्र । ऐसें सर्व शास्त्र बोलियेलें ॥ १ ॥ हरिनामें उद्धरे हरिनामें उद्धरे । वेगीं हरि त्वरें उच्चारी जो ॥ २ ॥ जपतां पै नाम यम काळ कांपे । हरी हरी सोपें जपिजे

सुखें ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे हरिनाम पाठ जपा । जन्मांतर खेपा अंतरती ॥ ४ ॥

३५६ संसार सुफळ हरि उच्चारितां । येऱ्हवीं मरतां अधोगती ॥ १ ॥ संसार असारु श्रीपती हा सारु । नामेंविण पारु न पविजे ॥२॥ हरि हरि म्हणतां उतरले पार । दुर्धर संसार तरले त्या ॥ ३ ॥ निवृत्तीचा जप हरि हा उच्चार । संसारसागरतारक हरि ॥ ४ ॥

३५७ सर्व रूपें हरी ऐसें मन करी । वासना प्रहरी नामपाठें ॥ १ ॥ रामकृष्ण वाड सर्व हें वैकुंठ । दिसेल प्रगट निजरूपें ॥ २ ॥ व्रत तप तीर्थ नाम हें अनंत । माजि सामावत आत्मनाथीं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे तें नाम राम वदे जप । फळले संकल्प रामनामें ॥ ४ ॥

३५८ पुंडलीक पेठे वैष्णवांचा हाट । करिती बोभाट हरिनामाचा ॥ १ ॥ वोळलें अंबर अमृत तुषार । झेलीत अमर चकोर झाले ॥ २ ॥ देव मुनी सर्व ब्रह्मादिक लोटे । पंढरीये पेठे प्रेमापिसे ॥ ३ ॥ निवृत्ति निवाळला ज्ञानदेव सोपान । खेचर तल्लीन विठ्ठल नामें ॥ ४ ॥

३५९ ज्याचेनि सुखें चळत पें विश्व । नांदे जगदीश सर्वांघटीं ॥ १ ॥ त्याचें नाम हरी त्याचें नाम हरी । प्रपंच वोहरी कल्पनेची ॥ २ ॥ शांति त्याची नारी प्रकृति विकारी । उन्मनि वोवरी हृदयांतु ॥ ३ ॥ निवृत्तिदेवीं धरिली निर्गुणी । शांति हे संपूर्णा हरिप्रेमें ॥ ४ ॥

## श्रीज्ञानदेवमहाराज

३६० जोडूनियां जोडी जेणें हुंडारिली दुरी । भिकेचि आवडी तया नावडे पंढरी ॥ १ ॥ करंटे कपाळ ज्याचे नाम नये वाचे । सदैव सभाग्य तोचि हरीरंगीं नाचे ॥ २ ॥ आपण न करी यात्रा दुजियासी जावो नेदी । विषयांचा लंपट शिकवी कुविद्या कुबुद्धी ॥ ३ ॥ ऐसें जे जन्मोनि नर भोगिती अघोर । न करिती तीर्थयात्रा तया नरकीं बिढार ॥४॥ पुंडलिकें भक्तें तारिलें विश्वजना । वैकुंठीची मूर्ति

आणिली पंढरपुर पाटणा ॥ ५ ॥ कायावाचामनें जिवें सर्वस्वें उदार ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलाचा वारिकर ॥ ६ ॥

३६१ वाजतसे बोंब कोण्ही नायकती कानी । हरि हरि न म्हणती तया थोर जाली हानी ॥ १ ॥ उठा उठा जागा पाठीं भय आलें मोठें । पंढरीवांचुनीं दुजा ठाव नाहीं कोठें ॥ २ ॥ तापत्रय अग्नीचा लागला वोणवा । कवण रिघे आड कवण करी सावाधावा ॥ ३ ॥ देखोनि ऐकोनि एक बाहिर अंध जाले । विषयांचे लंपट बांधोनि यमपुरीस नेले ॥ ४ ॥ आजा मेला पणजा मेला बाप मसणा नेला । देखत देखत नातु पणतु तोही वेडा जाला ॥ ५ ॥ व्याघ्र लासी सूलें ये लागतील पाठीं । हरिभजन न करितां सगळें घालूं पाहे पोटीं ॥ ६ ॥ संतसंग धरा तुम्ही हरिभजन करा । पाठीं लागलासे काळ दांत खातो करकरां ॥ ७ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला शरण । भावें न निघतां न चुके जन्ममरण ॥ ८ ॥

३६२ भावाचेनि बळें घेतलें वैकुंठ । हरिनाम नीट वैकुंठ मार्ग ॥१॥ सोपें हो साधन साधावयालागीं । न लगे उपाधी नाना मतें ॥ २ ॥ ज्ञानेसहित ज्ञान विज्ञानेसि घन । वृत्तीचें समाधान निवृत्ति करी ॥ ३ ॥ शांति दया क्षमा करुणानिधी प्रेम । नेऊनि परब्रह्म भावें मिळती ॥ ४ ॥ ज्ञानदेवो सांगे भावो मिनला गंगे । सुस्नात सर्वांगें हरी गंगा ॥ ५ ॥

३६३ यश कीर्ति वानु नेणें मी वाखाणूं । रामकृष्ण आम्हा सणू नित्य दिवाळी ॥ १ ॥ नरहरि रामा नरहरि रामा । पुराण पुरुषोत्तमा हरि गोपाळा ॥ २ ॥ या नेमीं अक्रूर बोधला परीक्षिति उपदेशिला । अर्जुनासि जाला साहाकारी ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे नामेविण जो नरु । तो होय भूमिभारु ये संसारी ॥ ४ ॥

३६४ अनंत नामाचें पाठांतर । रामकृष्ण नाम निरंतर ॥ सर्व सुखाचें भांडार । हरि श्रीधर नाम वाचे ॥ १ ॥ हरिनाम गजरु खरा ।

येणें तूं तरशील सैरा ॥ जन्म जुगाच्या येरझारा । खंडती एक्या हरिनामें ॥ २ ॥ अनंत तीर्थांचे मेळ । साधलिया हरीनाम कल्लोळ ॥ पूर्वजांसहित अजामेळ । उद्धरिला सहपरिवारें ॥ ३ ॥ कोटी जन्मांचे दोष ।. हरतील पातकें जातील निःशेष ॥ अंतीं होईल वैकुंठवास । कोटि कुळांसी उद्धार ॥ ४ ॥ हें योगियांचें निज जीवन । राम कृष्ण नारायण ॥ येणें जगत्र होय पावन । हरिस्मरण जीवांसी ॥ ५ ॥ ज्ञानदेवीं घर केलें । हरी ऐसें रत्न सांठविलें ॥ शेखीं कोटि कुळां उद्धरिलें । हरि हरि स्मरिलें निशिदिनीं ॥ ६ ॥

३६५ पद्पदार्थ संपन्नता । व्यर्थ टवाळी कां सांगतां ॥ हरिनामीं नित्य अनुसरतां । हें सार सर्वार्थीं ॥ १ ॥ हरिनाम सर्व पंथीं । पाहावें नलगे ये अर्थीं ॥ जे अनुसरले ते कृतार्थी । भवपंथा मुकले ॥ २ ॥ कूळ तरलें तयांचें । जीहीं स्मरण केलें नामाचें ॥ भय नाहीं त्या यमाचें । सर्व ग्रंथीं बोलियेलें ॥ ३ ॥ नलगे धन नलगे मोल । नलगाते कष्ट बहूसाल । कीर्तन करितां काळवेळ । नाहीं नाहीं सर्वथा ॥ ४ ॥ हरि सर्वकाळ अविकळ । स्मरे तो योगिया धन्य केवळ ॥ त्याचेनि दर्शनें सर्वकाळ । सुफळ संसार होतसे ॥ ५ ॥ ज्ञानदेवीं जप केला । मन मुरडोनि हरि ध्याइला ॥ तेणें सर्वांगीं निवाला । हरिच झाला निजांगें ॥ ६ ॥

३६६ जन्मजन्मांतरीं असेल पुण्यसामुग्री । तरिच नाम जिव्हाग्रीं येईल श्रीरामाचें ॥ १ ॥ धन्य कुळ तयाचें रामनाम हेंचि वाचे । दोष हरतील जन्माचे श्रीराम म्हणतांची ॥ २ ॥ कोटी कुळाचें उद्धरण मुखीं राम नारायण । रामकृष्ण स्मरण धन्य जन्म तयाचें ॥ ३ ॥ नाम तारक सांगडी नाम न विसंबे अर्ध घडी । तप केलें असेल कोडी तरिच नाम येईल ॥ ४ ॥ ज्ञानदेवी अभ्यास मोठा नामस्मरण मुखावाटा । पूर्वज गेले वैकुंठा हरि हरी स्मरतां ॥ ५ ॥

३६७ समाधिसाधन संजीवन नाम । शांति दया सम सर्वांभूतीं

॥ १ ॥ शांतीची पै शांति निवृत्ति उतारू । हरिनाम उच्चारु दिधला तेणें ॥ २ ॥ शम दम कळा विज्ञान सज्ञान । परतोनि अज्ञान नये घरा ॥ ३ ॥ ज्ञानदेवा सिद्धि साधन अवीट । भक्तिमार्ग नीट हरिपंथीं ॥ ४ ॥

३६८ त्रिभुवनीचें सुख एकतत्त्व विठ्ठल । नलगे आम्हां मोल उच्चारितां ॥ १ ॥ विठ्ठल उघडा मंत्र कळिकाळा त्रास । घालूनियां कांस जपों आधीं ॥ २ ॥ सत्वर सत्वाचे जपती नामावळी । नित्यता आंघोळी घडे रया ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरू जिव्हाळा हृदयीं । जीवाचा जीव ठायीं एक पाही ॥ ४ ॥

३६९ सहज कर्मभक्ति घडावया कोडें। ज्ञानघन निवाडें नाम जपों ॥ १ ॥ नाममात्र नमन ज्ञानघन पूर्ण । रामनामें कर्ण भरूं रया ॥ २ ॥ सत्वाचे सागरीं उतरों पैलथडी । रिती अर्धघडी जावों नेदीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवा चित्त अवघें घन गोत । रामनामें तृप्त सकळ जीव ॥ ४ ॥

३७० प्रेमाचा जिव्हाळा नाम मुखाशीं आलें । सार्थक पैं जालें संसाराचें ॥ १ ॥ केशवनामसार विठ्ठल उच्चार । राम निरंतर हृदयीं वसे ॥ २ ॥ पाहतां हा भाव लीळा तो विग्रह । तेथींचा अनुभव विरळा जाणे ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु पाहतां विस्तारु । नामाचा वडिवारु न बोलवे ॥ ४ ॥

३७१ आठवितां विसरलें आपुलिया गोता । हरिनामें त्वरिता मोक्ष जाला ॥ १ ॥ त्याचें नामचि त्वरित प्रल्हादें केलें प्रसन्न । तेणें संजिवन जाले त्याचें देह ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु नृसिंहरूपें देखे । दैत्य हरिखें धरी जानु ॥ ३ ॥

३७२ विठ्ठलनाम नुच्चारीसी । तरी खरवकुंडी पडसी ॥ १ ॥ विठ्ठलनाम उच्चारी । आळसु न करी क्षणभरीं ॥ २ ॥ विठ्ठलनाम तीन अक्षरें । अमृतपान केलें शंकरें ॥ ३ ॥ रखुमादेविवरा विठ्ठलें । महापातकी उद्धरले ॥ ४ ॥

३७३ एक मूर्ख नेणती । नाम हरीचें न घेती ॥ मुखें भलतेंचि

जल्पती । ते पावती अधःपंथा ॥ १ ॥ नामेंविण सुटका नाहीं । ऐसी वेदशास्त्रीं ग्वाही ॥ जो वेद मस्तकीं पाही । ब्रह्मयाने वंदिला ॥ २ ॥ नित्य नामाची माळा । जिव्हे घे तूं गळाळा ॥ तो नर कर्मां वेगळा । ऐसें बोलती पुराणें ॥ ३ ॥ नयनीं श्रवणीं हरी । आणिक काम न करी ॥ तो साधुभक्त निर्धारीं । हरिचा आवडता ॥ ४ ॥ ज्ञानदेवीं पाहिलें । हरिनाम साधुनी घेतलें ॥ तें समाधीस केलें । पुष्पशयनीं आसन ॥ ५ ॥

३७४ निरंतर ध्यातां हरी । सर्व कर्माची बोहरी ॥ दोष जाती दिगंतरीं । रामकृष्ण उच्चारणीं ॥ १ ॥ जप तीर्थ हेंचि नाम । जप व्रता हाचि नेम ॥ ऐसें धरोनिया प्रेम । तोचि भक्त तरेल ॥ २ ॥ जीव शिव एक करी । शांति क्षमा जरी धरी ॥ त्यापाशीं नित्य श्रीहरी । प्रत्यक्ष आपण उभा असे ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे नित्य । त्याचें वचन तेंचि सत्य ॥ त्याचें वचन सर्व कृत्य । सिद्धी पावेल सर्वथा ॥ ४ ॥

३७५ संपत्तिविपत्ति दुःख । हरेल अवघा शोक ॥ वेगीं करूनियां विवेक । हरिस्मरण करी ॥ १ ॥ मंत्र यंत्र सूत्रधारी । सिद्ध साध्य तोचि हरी ॥ नित्य जपोनि वैखरी । आसता करी हरीसी ॥ २ ॥ ध्यान मन एक चित्त । अलक्ष लक्षी अच्युत ॥ न सांगे हिताची मात । अखंड जपे हरिनाम ॥ ३ ॥ ज्ञानदेवें जप केला । मग समाधीस बैसला ॥ नाम घेतां बोध झाला । देव आला हृदयासी ॥ ४ ॥

३७६ प्रेम जयाचें कथेवरी । तोचि धन्य ये चराचरी ॥ रामकृष्ण निरंतरीं । मुखीं आवडीं जपतसे ॥ १ ॥ धन्य धन्य तोचि वंशी । धन्य धन्य माता कुशीं ॥ धन्य धन्य काळ तयासी । रामकृष्ण म्हणतांची ॥ २ ॥ ऐसे धन्य जन्म तयाचे । धन्य धन्य पुण्य साचें ॥ त्यासी भय कळिकाळाचें । नाहीं जन्म घेतालिया ॥ ३ ॥ एवढा महिमा नामाचा । धन्य जो राम उच्चारी वाचा ॥ धन्य जन्म तयाचा । ज्ञानदेव म्हणे ॥ ४ ॥

३७७ रामकृष्ण गोविंदाचें नामस्मरण वाचे । घडिये घडिये साचें ध्यान श्रीविठ्ठलाचें ॥ १ ॥ एक नाम आठवितां दुतां पाडियेली चिंता । नाम आनंदें गातां पाविजे सायुज्यता ॥ २ ॥ तिहीं लोकीं नाम थोर वेदशास्त्रांचें सार । सगुण निर्गुणाकार निज ब्रह्म सार ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु कृपाळु उदारु। नामस्मरणें पारु उतरी हा निर्धारु॥ ४॥

३७८ सकळ मंगळनिधी । श्री विठ्ठलाचें नाम आधीं ॥ १ ॥ म्हण कारे म्हण कारे जना । श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ २ ॥ पतीत पावन साचें । श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ ३॥ बापरखुमादेविवरु साचें। श्रीविठ्ठलाचें नाम वाचे ॥ ४ ॥

३७९ अष्टांग योगें न शिणिजे । यमनेम निरोध न किजे रया ॥ १ ॥ वाचा गीत गाईजे । गाता वातां श्रवणीं ऐकिजे रया ॥ २ ॥ गीताछंदें अंग डोलिजे । लीलाविनोदें संसार तरिजे रया ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु । नामें जोडे हा उपावो किजे रया ॥ ४ ॥

३८० कर्म आणि धर्म आचरिजे जयालागीं । साधक सिणले साधन साधितां अभागी ॥ १ ॥ गोड तुझें नाम विठो आवडलें मज । दुजें उच्चारितां मना वाटतसे लाज ॥ २ ॥ भुक्ति आणि मुक्ति नामापासीं प्रत्यक्ष । चार्‍ही वेद साही शास्त्रें वदताती साक्ष ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरा तुझी आण । काया वाचा चित्त चरणीं ठुललें गहाण ॥ ४ ॥

१८१ रामकृष्णनामें ये दोन्हीं साजिरीं । हृदय मंदिरीं स्मरा कांरे ॥ १ ॥ आपुली आपण करा सोडवण । संसारबंधन तोडा वेगीं ॥ २ ॥ ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्ण माळा । हृदयीं जिव्हाळा श्रीमूर्ति रया॥३॥

३८२ अंडज जारज स्वेदज उद्भिज आटे । हरिनाम नाटें तें बरवें ॥ १ ॥ जो नाटे तें नाम चित्तीं । रखुमादेवीपति श्रीठ्ठलाचें ॥ २ ॥ शरीर आटे संपत्ति आटे । हरिनाम नाटें तें बरवें ॥ ३ ॥ बापरखुमादेविवराचें नाम नाटें । युगें गेलीं परि उभा विटे ॥ ४ ॥

३८३ भ्रम धरिसी या देहाचा । विठ्ठल म्हणे कां रे वाचा ॥ १ ॥ पडोन जाईल हें कलेवर । विठ्ठल उच्चारी पा सार ॥ २ ॥ रखुमादेविवरु अभयकरू । मस्तकीं ठेविला हा निर्धारू ॥ ३ ॥

३८४ आरंभीं आवडी आदरें आलें नाम । तेणें सकळ सिद्धि जगीं जालें पूर्ण काम ॥ १ ॥ रामकृष्ण गोविंद गोपाळा । तूं माय माउली जिवीं जिव्हाळा ॥ २ ॥ तुझेयेनि नामें सकळ संदेहो फिटला । बापरखुमादेविवरा श्रीविठ्ठला ॥ ३ ॥

३८५ सोनयाचा दिवस आजि अमृतें पहाला । नाम आठवितां रूपीं प्रगट पै झाला ॥ १ ॥ गोपाळा रे तुझें ध्यान लागो मना । आनु न विसंबे हरि जगन्नजीवना ॥ २ ॥ तनु मनु शरण विनटलों तुझ्या पाईं । बापरखुमादेविवरा वांचूनि आनु नेणें कांहीं ॥ ३ ॥

३८६ नाम प्रल्हाद उच्चारी । तया सोडवी नरहरी ॥ उचलुनि घेतला कडियेवरी । भक्तसुखें निवाला ॥ १ ॥ नाम बरवया बरवंट । नाम पवित्र आणि चोखट ॥ नाम स्मरे नीळकंठ । निजसुखें निवाला ॥ २ ॥ जें ध्रुवसीं आठवलें । तेंचि उपमन्यें घोकिलें ॥ तेंचि गजेंद्रा लाधलें । हित जालें तयांचें ॥ ३ ॥ नाम स्मरे अजामेळ । महापातकी चांडाळ ॥ नामें जाला सोज्वळ । आपणासहित निवाला ॥ ४ ॥ वाटपाडा कोळिकु । नाम स्मरे तो वाल्मिकु । नामें उद्धारिले तिन्ही लोकु । आपणासहित निवाला ॥ ५ ॥ ऐसें अनंत अपार । नामें तरलें चराचर ॥ नाम पवित्र आणि परिकर । रखुमादेविवराचें ॥ ६ ॥

३८७ भक्तीचें तें ज्ञान वाचे नारायण । दया ते संपूर्ण सर्वां भूतीं ॥ १ ॥ ज्ञान नारायण ध्यान नारायण । वाचे नारायण सर्वकाळ ॥२॥ संसारग्रामीं नाम हाचि सांठा । पावाल वैकुंठा नामें एकें ॥ ३ ॥ गोविंद गोपाळ वाचेसि निखळ । पद पावाल अढळ अच्युताचें ॥४॥ नामेंचि तरले शुकादिक दादुले । जडजीव उद्धरले कलीयुगीं ॥ ५ ॥ स्मरण करितां वाल्मीक वैखरी । वारुळाभीतरीं रामराम ॥ ६ ॥

सर्वांमाजीं श्रेष्ठ पुण्य भूवैकुंठ। विठ्ठल मूळपीठ जगदोद्धार ॥ ७ ॥ निवृत्ति निरोपण ज्ञानदेवा ध्यान। सर्वत्र नारायण एकरूप ॥ ८ ॥

३८८ नाम पवित्र आणि परिकरु। कल्पतरूहुनी उदारु ॥ ते तूं धरी कां रे सधरु। तेणें तरसी भव दुस्तरु ॥ १ ॥ नरहरी नाम उच्चारी। तेणें तरसी भवसागरीं ॥ ध्रु० ॥ जपें न लाहसी तपें न लाहसी। क्रियें षट्कर्में न पवसी ॥ नामें एकेरें पावसी। स्वर्गीं अमृतपान ॥ २ ॥ क्षीर गोड ऐसें म्हणसी। परि तेथेंही वीट असे ॥ नाम उच्चारितां वाचे। कोटि जन्माचें पातक नासे ॥ ३ ॥ मन मारूनियां सायासीं। परि तेथेंही अवगुण असे ॥ नाम उच्चारितां वाचे। सकळिक ध्यान डोळां दिसे ॥ ४ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलाचें। विपायें नाम आलें वाचे ॥ जळती डोंगर कल्मपाचे। भय नाहीं कळिकाळाचें ॥ ५ ॥

३८९ तत्वमस्यादि महावाक्य उपदेश। नामाचा अर्धांश नाहीं तेथें ॥ म्हणोनि नामसंकीर्तन करितां जवळीं जोडिलासि आतां। क्षणुभरी न विसंबें जिवाचिया जिवना रया ॥ १ ॥ नाम निजधीर गर्जती वैष्णव वीर। कळिकाळ यमाचे भार पळाले तेथें ॥ २ ॥ म्हणोनि नाम वज्रकवच तोचि निर्गुणाचा अभ्यास। पाहे पां स्वयं प्रकाशें विचारूनी। ऐसें सुंदर रुपडें हृदयीं धरिलें आतां पाहातां केवि होये पुनर्योनि रया ॥ ३ ॥ ऐसा सकळां अकळ कळला। हृदयीं धरिला समताबुद्धी। बापरखुमादेविवरु विठ्ठल चिंतितां। तुटली जन्माची आधि व्याधि रया ॥ ४ ॥

३९० अशौचिया जपों नये। आणिकातें ऐकों नये। ऐसिया मंत्रातें जग बिहे। त्याचें फळणें थोडें परि क्षोभणें बहु। तैसा मंत्रराज नव्हे रे ॥ १ ॥ नारायण नाम नारायण नाम। नारायण नाम झणत्कारेंरे ॥ ध्रु० ॥ बाहे उभारावी त्यावरी काहाळ लावावी। गातिया ऐकातिया उणीव येवों नेदावी। उत्तमापासूनी अंत्यजवरी। मुक्तीची सेल मागावीरे रे ॥ २ ॥ काय करील यागें न सिणावें योगें

हें तो व्यसनाचि वाउगें । नरहरि नरहरि उदंड वाचा म्हणाल तरि कळिकाळ राहेल उगेरेरे ॥ ३ ॥ चरणि गंगा जन्मली अहिल्या उद्धरली नामें प्रतिष्ठा पावली गिरिजा । सकळिकां साधना वरिष्ठ हें नाम मा मनी भाव न धरी दुजा रे रे ॥ ४ ॥ तीर्थी भजीजाल अमरीं पूजिजाल तुमचिया भावासारिखा देवो होईल । बापरखुमादेविवरु विठ्ठलु तुमचा ऋणवई म्हणतां न लजेलरे रे ॥ ५ ॥

३९१ सकळ धर्मांचें कारण । नामस्मरण हरिकीर्तन । दयाक्षमा समाधान । संतजन साधिती ॥ १ ॥ निजधर्म हा चोखडा । नाम उच्चारु घडघडां । भुक्ति मुक्तीचा सवगडा । हा भवसिंधुतारक ॥ २ ॥ लावण्य मान्यता विद्यावंत । सखे स्वजन पुत्र कलत्र । विषयभोग वयसा व्यर्थ । देहासहित मरणांतीं ॥ ३ ॥ जें जें देखणें सकळ । तें हें स्वप्नींचें मृगजळ । म्हणोनि चिंतीं चरणकमळ । रखुमादेविवर विठ्ठलाचे ॥ ४ ॥

३९२ सार सार सार विठोबा नाम तुझें सार । म्हणोनि शूळपाणी जपताहे वारंवार ॥ १ ॥ आदिमध्य अंतीं निजबीज ओंकार । ध्रुव प्रल्हाद अंबऋषी मानिला निर्धार ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति सुखदायक साचार । पतीत अज्ञान जीव तरले अपार ॥ ३ ॥ दिवसोंदिवस व्यर्थ जात संसार । बापरखुमादेविवर विठ्ठलाचा आधार ॥ ४ ॥

३९३ हरि आलारे हरि आलारे । संत संगें ब्रह्मानंदु जालारे ॥ १ ॥ हरि येथेंरे हरि तेथें रे । हरिवांचूनि न दिसे रितें रे ॥ २ ॥ हरि पाहिरे हरि ध्याईरे । हरिवांचूनि दुजें नाहीं रें ॥ ३ ॥ हरि वाचेरे हरि नाचेरे । हरि पाहातां आनंदु साचेरे ॥ ४ ॥ हरि आदीरे हरि अंतीरे । हरि व्यापकु सर्वांभूतीं रे ॥ ५ ॥ हरि जाणारे हरि वानारे । बापरखुमादेविवरु राणारे ॥ ६ ॥

३९४ पन्नास अक्षरीं करिसी भरोवरी । शरवीं तुझें तोंड तुज वैरीरया ॥ १ ॥ यापरि नामाची वोळ हे मांडुनी । संसार दवडुनी घाली

परता ॥ २ ॥ रकारा पुढें एक मकार मांडी कां । उतरसी सम तुका शंभुचिया ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलु हृदयीं । आपुली आण वाहो त्रिभुवनीं रया ॥ ४ ॥

३९५ गाते श्रोते आणि पाहाते । चतुर विनोदि दुश्चिते । सोहंभावी पूर्ण ज्ञाते । या सकळांतें विनवणी ॥ १ ॥ करा विठ्ठल स्मरण । नामरूपीं अनुसंधान । जाणोनि भक्तां भवलक्षण । जघनप्रमाण दावितो ॥ २ ॥ पुंडलीकाच्या भावार्था । गोकुळींहुनी जाला येता । निजप्रेमभक्ति भक्तां । घ्या घ्या आतां म्हणतसे ॥ ३ ॥ मी माझें आणि तुझें । न धरीं टाकीं परतें ओझें । भावबळें फळाते विजें । बापरखुमादेविवरु विठ्ठलीं ॥ ४ ॥

३९६ विठ्ठलु नाहीं जये शरीरीं । वायां कां गा जन्मले संसारी । विठ्ठलु नाहीं जये नगरीं । तें अरण्य जाणावें ॥ १ ॥ विठ्ठलु नाहीं जये देशीं । स्मशान भूमी ते परियेसी । रविशशिवीण दिशा जैसी । रसना तैसी विठ्ठलेंवीण ॥ २ ॥ विठ्ठलावेगळें जितुकें वर्म । विठ्ठलावेगळा जितुका धर्म । विठ्ठलावेगळें बोलती ब्रह्म । तितुकाही श्रम जाणावा ॥ ३ ॥ सच्चिदानंदघन । पंढरिये परिपूर्ण । कर ठेवोनियां जघन । वाट पाहे भक्तांची ॥ ४ ॥ विठ्ठलेंविण देवो म्हणती । ते संसार पुढती पावती । विठ्ठलाविण तृप्ती । नाहीं प्रती विठ्ठलेंविण ॥ ५ ॥ श्रीगुरुनिवृत्तीनें दिधलें । तें प्रेम कोणें भाग्यें लाधलें । बापरखुमादेविवर विठ्ठलें दिधलें । ऐसें केलें ज्ञानदेवा ॥ ६ ॥

३९७ ॐ नमो भगवते वासुदेवाया । बोडियाणा बंदु देहुडा घालुनि लागसील पावो । बोत पोत मना सांडुनि धरिसी अहंभावो । ॐकार बिंदुचा न पवसि ठावो । बोळगे बोळगे कृष्ण द्वारावतिये रावो ॥ १ ॥ ॐनमो भगवते वासुदेवाया । द्वादशाक्षरी मंत्रु न जपसि काह्या ॥ध्रु०॥ नागिणि उत्साहें नवहि द्वारें निरोधुन । नाडित्रयामाजि सुषुम्नासंचरण । न साधे हा मार्ग ऐसें बोलती मुनिजन । नरहरिचिंतनें अह-

निशी मुक्तिस्थान ॥ २ ॥ मोडिसि कर चरण तेणें पावसी अंतसमो । मोहो तृष्णा न तुटे ब्रह्मविद्या केविं गमो । मोठा हा अन्यावो जे हरिचरणीं नाहीं नमो । मोक्षाची चाड तरी मुकुंदीं मन रमो ॥ ३ ॥ भांवावसी ह्मणे हें शरीर कर्दळीस्तंभ । भस्म क्रामि विष्ठा उभें आहे तो सुशोभ । भाविता किटकी जाली भृंगी तिया क्रामिलें नभ । भावें भक्ति सुलभ वोळगा वोळगा पद्मनाभ ॥ ४ ॥ गति मति इंद्रियें जव आहे ती समयोग । गणित आयुष्य न पुरे जंव हे न वचे भंग । गमला हाचि योग जे अनुसरावा श्रीरंग । गरुडध्वजप्रसादें निस्तरिजे भवतरंग ॥ ५ ॥ वनिं सिंह वसतां गजीं मदु केवीं धरावा । वन्हिदग्धबीज त्यासि अंकुर केंवि फुटावा । वज्रपाणी कोपलिया गिरीं उदधि केविं लंघावा । वदनीं हरि न उच्चारी तेणें संसार केविं भुंजावा ॥ ६ ॥ तेज नयनींचा भानु जेणें तेजें मीनले ते । त्याचे मानसिंचा चंद्रमा तो सिंपी ते अमृतें । त्याचे नाभिकमळीं ब्रह्मा तेणें सृजिलीं सकळहीं भूतें । तें विराट स्वरूप ओळखावें विष्णुभक्तें ॥ ७ ॥ वाताघातें फुटे गगनीं मेघाचा मेळावा । वारिबिंदु पद्मिणिपत्रीं केवीं हो ठेवावा । वानराच्या हातीं चिंतामणी केविं द्यावा । वासुदेव चिंतनें तोचि कल्मशा उठावा ॥ ८ ॥ सूक्ष्म स्थूल भूतें चाळिताहे परमू हंसू । शूळपाणी देवोदेवि जयाचारे अंशु । शुभाशुभीं कर्मीं न करि नामाचा आळसु । सुखें निरंतरीं ध्याई ध्याई हृषिकेशु ॥ ९ ॥ देव होऊनीं उद्धार भक्तां देतो अमरपदें । देतां न म्हणे साना थोर वैरियासी तेंचि दे । देहे सार्थक अंतीं वासुदेव अव छंदें । देखा अजामेळ उद्धारिला नामें येणें मुकुंदें ॥ १० ॥ वाडा सायासि मनुष्य जन्म पावला । वियाला पुरुषार्थ तो कां वायां दवडावा । वाचा मनें करूनि मुरारी वोळगावा । व्रतें एकादशी करूनि परलोक ठाकावा ॥ ११ ॥ या धनाचा न धरी विश्वास जैसी तरुवर छाया । याता याती न चुके तरी हे भोगिसील काह्यां । या हरिभजनेंविण तुझे जन्म जाते वायां । या लागीं वैकुंठनाथाच्या तूं चिंती पाये

पायां ॥ १२ ॥ इहींच द्वादशाक्षरीं ध्रुव अढळपद पावला । प्रल्हाद रक्षिला अग्निशस्त्रापासूनि जळा । बापरखुमादेविवरू विठ्ठलु तुम्ही भ्यारे वेळोवेळां । तो कळिकाळापासुनि सोडविल अवलीळा ॥ १३ ॥

## श्रीसोपानमहाराज

३९८ आवडीचे मार्गे प्रवृत्तीचें नेघे । नाममार्गें निघे वेगीं रया ॥ १ ॥ नाम परब्रह्म नाम परब्रह्म । नित्य रामनाम जपिजेसु ॥ २ ॥ अंतरींच्या सुखें बाहिरिलिया वेखें । परब्रह्म सुखें जपतुसें ॥ ३ ॥ सोपान निवांत रामनाम मुखांत । नेणें दुजा मात हरीविण ॥ ४ ॥

३९९ सबाह्य कोंदलें निवांत उगलें । रामरसें रंगलें अरे जना ॥ १ ॥ हरि रामकृष्ण हरि रामकृष्ण । दिनानिशीं प्रश्न मुखें करा ॥ २ ॥ तरला पें संसार रामनाम निरंतर । अखंड जिव्हार रामरसें ॥ ३ ॥ सोपान जपतु रामनामीं रतु । नित्यता स्मरतु रामकृष्ण ॥ ४ ॥

४०० मोक्षालागीं धन वेचावें नलगे । रामकृष्ण वोळगे जपीजेसु ॥ १ ॥ रामकृष्ण मुखें तया अनंत सुखें । तो जाय विशेखें वैकुंठभुवना ॥ २ ॥ वेगाचेनि वेगें जया लागवेगें । प्रपंच वाउगे हरिनामें ॥ ३ ॥ सोपान संचित रामनामामृत । नित्यता सेवित हरिकथा ॥ ४ ॥

४०१ ज्याचे मुखीं हरि तोचि धन्य ये जगीं । तरला पैं वेगीं विठ्ठलनामें ॥ १ ॥ हरि हाचि आत्मा तत्त्व पैं सोपें । हरितील पापें हरिनामें ॥ २ ॥ वैकुंठींचें सुख नलगे पैं चित्तीं । हरि हेचि मूर्ति विठ्ठल ध्यावो ॥ ३ ॥ याचेनि स्मरणें कैवल्य साचार । सोपान विचार हरि जपे ॥ ४ ॥

४०२ हरिनाम जपें सहस्रवरी सोपें । जातील रे पापें अनंतकोटी ॥ १ ॥ हरिविण नाम नाहीं रे पैं सार । दुसरा विचार करूं नको ॥ २ ॥ हरिध्यान चोख पवित्र परिकर । निन्यता शंकर हरिध्यानीं ॥ ३ ॥ सोपान म्हणे हरि जप करा रे सर्वथा । न पावाल व्यथा भवजाळीं ॥ ४ ॥

४०३ रूप हें सांवळें भोगिताती डोळे । उद्धवा सोहळे अक्रु-
रासी ॥ १ ॥ पदरज वंदी ध्यान तें गोविंदीं । उद्धव मुकुंदीं तल्ली-
नता ॥ २ ॥ विदुर सुखाचा नाम जपे वाचा । श्रीकृष्ण तयाचा
अंगीकारी ॥ ३ ॥ निवृत्तींचें ध्यान ज्ञानदेव खूण । सोपान आपण
नामपाठ ॥ ४ ॥

## श्रीमुक्ताबाई

४०४ अलिप्त संसारीं हरिनाम पाठें । जाईजे वैकुंठ मुक्तलग
॥ १ ॥ हरिवीण मुक्त न करि हो सर्वदा । संसार आपदा भव
तोडी ॥ २ ॥ आशेच्या निराशीं अचेतनावारी । चेतविला हरी
आपरूपें ॥ ३ ॥ मुक्ताई जीवन्मुक्तची सर्वदा । अभिन्न पैं भेदा
मोडियेलें ॥ ४ ॥

४०५ नाममंत्रें हरी निजदासां पावे । ऐकोनिया धांवे झडकरी
॥ १ ॥ सुदर्शन करीं पावे झडकरी । पांडवां सहकारी श्रीकृष्ण रया
॥ २ ॥ निजानंद दावी उघड पैं वैकुंठ । नामेचि प्रगट आम्हांलागीं
॥ ३ ॥ मुक्ताई जीवन्मुक्त हा संसार । हरी पारावार केला
आम्हीं ॥ ४ ॥

४०६ भजनभावो देहीं नित्य नामपेठा । नामेंचि वैकुंठा गणिका
गेली ॥ १ ॥ नाममंत्र आम्हां हरीरामकृष्ण । दिनानिशीं प्रश्न मुक्ति-
मार्गु ॥ २ ॥ नामाचि तारकु तरले भवसिंधु । हरिनाम छंदु मंत्र-
सार ॥ ३ ॥ मुक्ताई चिंतन हरिप्रेम पोटीं । नित्य नाम घोटी अमृत
सदा ॥ ४ ॥

४०७ मुक्तामुक्त दोन्ही नाइकतो कर्णी । हरिनामपर्वणी सर्वकाळ
॥ १ ॥ नाहीं काळ तेथें आम्हां वेळ कैची । हरिनामछंदाची गोडी
थोरी ॥ २ ॥ नाना विघ्न बाधा नाइको आम्ही कदा । निरंतर धंदा
रामकृष्ण ॥ ३ ॥ मुक्तपणें मुक्त मुक्ताई पैं रत । हरिनाम स्मरत सर्व-
काळ ॥ ४ ॥

४०८ आदि मध्य उर्ध्व मुक्त भक्त हरी। सबाह्य अभ्यंतरीं हरि एकु ॥ १ ॥ नलगती तीर्थें हरिरूपें मुक्त । अवघेंचि सूक्त जपि-न्नलें ॥ २ ॥ जयाचेनि नामें मुक्त पैं जडमूढ । तरले दगड समुद्रीं देखा ॥ ३ ॥ मुक्ताई हरिनामें सर्वदा पैं मुक्त । नाहीं आदी अंत उरला आम्हा ॥ ४ ॥

४०९ मुक्तलग चित्त मुक्त पै सर्वदा । रामकृष्ण गोविंदा वाचे नित्य ॥ १ ॥ हरि हरि छंदु तोडी भवकंदु । नित्य नामानंदु जपें रया ॥ २ ॥ सर्वत्र रूपडें भरलेसे दृश्य । ज्ञाता ज्ञेय भास हरि-माजी ॥ ३ ॥ मुक्ताई सधन हरीरूप चित्तीं । संसारसमाप्ति हरि-च्या नामें ॥ ४ ॥

## श्री सेनामहाराज

४१० करिसी खटपटी। पोटासाठीं आटाआटी ॥ १ ॥ नाम घेतां विठोबाचें । काय तुझ्या बाचें वेंचे ॥ २ ॥ धनाचिया आशा । वाउगा फिरसी दाही दिशा ॥ ३ ॥ जावें हरिकीर्तना । नावडेचि तुझ्या मना ॥ ४ ॥ सेना म्हणे ऐशा नरा । जवळूनि दूर करा ॥ ५ ॥

४११ मुखीं नाम नाहीं। त्याची संगती नको पाहीं ॥१॥ ऐसियाचे मुखीं माउली । वार घालितां विसरली ॥ २ ॥ जया नावडे संत-संगती । अधम जाणावा निश्चिती ॥ ३ ॥ नाम घेतां लाज वाटे । रंभे निर्लज्ज भेटे ॥ ४ ॥ जातां हरिकीर्तना । नावडे ज्याच्या मना ॥ ५ ॥ सेना म्हणे त्यास । कुळा सुद्धां नर्कवास ॥ ६ ॥

४१२ रामकृष्ण नामें । ऐसीं उच्चारावीं प्रेमें ॥ १ ॥ तेणें काळ दुरी पळे । जाती दोष ते सकळे ॥ २ ॥ ऐसा नामाचा प्रताप । नामें निवारिला ताप ॥ ३ ॥ मुखीं रामनाम उच्चारी । सेना म्हणे निरंतरी ॥ ४ ॥

४१३ नलगे योग तप । करणें साटोप आम्हासीं ॥ १ ॥ सोपें साधन आमुचें । नाम गाऊं विठोबाचें ॥ २ ॥ जो नातुडे कुंभपानीं ।

राहे संपुष्टि येऊनि ॥ ३ ॥ जया नाहीं रूप । आम्हा कीर्तनीं समीप ॥ ४ ॥ सेना म्हणे लडिवाळ । जाणों हरीसी निर्मळ ॥ ५ ॥

४१४ म्हणा हरी हरी । अवघे सकळ नर नारी ॥ १ ॥ येणें तुटेल बंधन । भाग निवारील शीण ॥ २ ॥ प्रेमें घ्यारे मुखीं नाम । हरे सकळही श्रम ॥ ३ ॥ सेना म्हणे चित्तीं धरा । बळकट रखुमाईच्या वरा ॥ ४ ॥

४१५ अंतरीचें पुरे काम । घेतां नाम विठोबाचें ॥ १ ॥ नाम साराचेंही सार । शरणांगत यमकिंकर ॥ २ ॥ पाहिले वेदांत । निश्चय केला निगमांत ॥ ३ ॥ सेना म्हणे न वेंचा कांहीं । लाभ नाहीं या ऐसा ॥ ४ ॥

४१६ करितां योग याग । न भेटेची पांडुरंग ॥ १ ॥ एका भावावांचोनि कांहीं । देव जोडे ऐसा नाहीं ॥ २ ॥ धूम्रपानादी साधन । करितां व्यर्थ होय शीण ॥ ३ ॥ करितां साधनें शिणलीं । सेना म्हणे वायां गेलीं ॥ ४ ॥

४१७ घेतां नाम विठोबाचें । पर्वत जळती पापांचे ॥ १ ॥ ऐसा नामाचा महिमा । वेद शिणला झाली सीमा ॥ २ ॥ नामें तारिले अपार । महापापी दुराचार ॥ ३ ॥ वाल्हा कोळी ब्रह्महत्यारी । नामें तारिला निर्धारीं ॥ ४ ॥ सेना बैसला निवांत । विठ्ठलनाम उच्चारीत ॥ ५ ॥

४१८ नामाचें चिंतन श्रेष्ठ पैं साधन । जातील जळोनि महापापें ॥ १ ॥ नलगे धूम्रपान पंचाग्नि साधन । करितां चिंतन हरी भेटे ॥ २ ॥ बैसुनि निवांत करा एक चित्त । आवडी गावें गीत विठोबाचें ॥ ३ ॥ सकळाहुनि सोपें हेंचि पैं साधन । सेना म्हणे आण विठोबाची ॥ ४ ॥

४१९ नाम साधनाचें सार । भवसिंधु उतरी पार ॥ १ ॥ तिहीं लोकीं श्रेष्ठ । नाम वरिष्ठ सेवी हें ॥ २ ॥ शिव भवानीचा । गुप्त मंत्र आवडीचा ॥ ३ ॥ सेना म्हणे इतरांचा । पाड कैंचा मग येथें ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

४२० सुखाकारणें करी तळमळ । जपे सर्वकाळ विठ्ठल वाचे ॥१॥ तेणें सर्व सुख होईल अंतरा । चुकती येरझारा जन्ममरण ॥ २ ॥ नलगे वेचावें धनाचिये पेटी । धरा नाम कंठी विठोबाचें ॥ ३ ॥ बैसोनि निवांत करावें चिंतन । रामकृष्ण नारायण दिनानिशीं ॥ ४ ॥ चोखा म्हणे ऐसा करावा निर्धार । नाम एक सार विठोबाचें ॥ ५ ॥

४२१ नाम हें सोपें जपतां विठ्ठल । अवघेंचि फळ हाता लागे ॥ १ ॥ योग याग जप तप अनुष्ठान । तीर्थ व्रत दान नाम जपतां ॥ २ ॥ सुखाचें सुख नाहीं यातायाती । बैसोनि एकांतीं नाम स्मरा ॥ ३ ॥ चोखा म्हणे येणें साधेल साधन । तुटेल बंधन भवपाश ॥ ४ ॥

४२२ महादोषराशि पापाचे कळप । नामें सुखरूप कलियुगीं ॥१॥ म्हणोनि आळस करूं नका कोणी । नाम जपा वाणी सर्वकाळ ॥ २ ॥ आसनीं शयनीं नामाचा आठव । आन ठावाठाव करूं नका ॥ ३ ॥ चोखा म्हणे खातां जेवितां वाचे । नाम श्रीविठ्ठलाचें उच्चारावें ॥ ४ ॥

४२३ अखंड नामाचें चिंतन सर्वकाळ । तेणें सफळ संसार होय जना ॥ १ ॥ सर्व हें मायीक नाशिवंत साचें । काय सुख याचें मानितसां ॥ २ ॥ निर्वाणीं तारक विठोबाचें नाम । येणे भवश्रम दूर होय ॥ ३ ॥ चोखा म्हणे नाम जपें दिनानिशीं । येणें सदा सुखी होसी जना ॥ ४ ॥

४२४ त्रैलोक्य वैभव ओंवाळोनि सांडावें । नाम सुखें घ्यावें विठोबाचें ॥ १ ॥ आणिक साधनें आहेत बहुतापरी । नामाची ती सरी न पवती ॥ २ ॥ म्हणोनि सुलभ विठ्ठल एक नाम । गातां नाचतां प्रेमें मुक्ति तया ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझा अनुभव उघडा । भव भय पीडा येणें वारे ॥ ४ ॥

४२५ योग याग तप व्रत आणि दान । करितां साधन नाना कष्ट ॥ १ ॥ सुलभ सोपेंरे नाम विठोबाचें । सकळ साधनाचें मूळ

बीज ॥ २ ॥ येणें भवव्यथा तुटेल जीवाची । प्रतिज्ञा संतांची हीच असे ॥ ३ ॥ म्हणोनि नामाचा करा गदारोळा । म्हणे चोखामेळा विठ्ठल वाचे ॥ ४ ॥

४२६ नामाचें सामर्थ्य विष तें अमृत। ऐसी हे प्रचित आहे जीवा ॥ १ ॥ तें नाम सोपें विठ्ठल विठ्ठल । नको काळ वेळ जपे आधीं ॥ २ ॥ नेमधर्म कांहीं नलगे साधन । सुखें नारायण जप करी ॥ ३ ॥ चोखा म्हणे मज भरंवसा नामाचा । येणें कळिकाळाचा भेव नाहीं ॥ ४ ॥

४२७ अवघ्या साधनांचें सार । रामकृष्ण हा उच्चार ॥ १ ॥ येणें घडे सकळ नेम । वाचे नाम जपतांचि ॥ २ ॥ भाग्यें होय संतभेटी । सांगूं गोष्टी सुखाच्या ॥ ३ ॥ चोखा म्हणे मज आनंद झाला । जीवलग भेटला मायबाप ॥ ४ ॥

## श्रीकान्होपात्रा

४२८ नामें दोष जळती । नामें पापी उद्धरती ॥ १ ॥ हें आलें अनुभवा । सत्य जीवा प्रत्यया ॥ २ ॥ नामें अपार तारिलें । नामें जीवन्मुक्त केले ॥ ३ ॥ कान्होपात्रा नाम घेतां । पायीं जडली तत्वता ॥ ४ ॥

## श्रीनरहरी सोनार

४२९ नाम फुकाचें फुकाचें । देवा पंढरिरायाचें ॥ १ ॥ नाम अमृत हें सार । हृदयीं जपा निरंतर ॥ २ ॥ नाम संतांचें माहेर । प्रेमसुखाचें आगर ॥ ३ ॥ नाम सर्वांमध्यें सार । नरहरी जपे निरंतर ॥ ४ ॥

# मोक्षतुच्छतापर

## श्रीतुकाराममहाराज

४३० सांडुनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ॥ १ ॥ कारे न घ्यावा जन्म । प्रेम लुटावें नाम ॥ २ ॥ येथें मिळतो दहींभात । नाहीं वैकुंठीं ते मात ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ति नलगे । राहिन संतांचिया संगें ॥ ४ ॥

४३१ कासयासी व्हावें जीतांचि मुक्त । सांडूनियां थीत प्रेमसुख ॥१॥ वैष्णवांचा दास जाला नारायण । काय त्या मिळोन असे काम ॥२॥ काय त्या गांठीचें पडलें सुटोन । उगेचि बैसोन धीर धरूं ॥ ३ ॥ सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्दैव तो कोण ह्मणे लाता ॥४॥ तुका म्हणे मज नलगे सायुज्यता । राहेन या संतां समागमें ॥ ५ ॥

४३२ मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥ विटे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढत पुढती आस सेवावी हे ॥ २ ॥ देवाहातीं रूप धरवूं आकार । नेदूं निराकार होऊं त्यासी ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त निवांत राहिलें । ध्याइं तीं पाउलें विटेवरी ॥ ४ ॥

४३३ मुनी मुक्त झाले भेणें गर्भवासा । आम्हां विष्णुदासां सुलभ तो ॥ १ ॥ अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठलस्वरूप म्हणोनियां ॥ २ ॥ पुराणीं उपदेश साधनीं उद्धट । आम्हां सोपी वाट वैकुंठींची ॥ ३ ॥ तुका म्हणे जना सकळांसाहित । घेऊं अखंडित प्रेमसुख ॥४॥

४३४ भक्तिप्रेमसुख नेणावे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥ १ ॥ आत्मनिष्ठ जरी झाले जीवन्मुक्त । तरी भक्तिप्रेमसुख दुर्लभ त्यां ॥२॥ तुका म्हणे कृपा करील नारायण । तरीच हें वर्म पडे ठायीं ॥३॥

४३५ मुक्त कासया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥ १ ॥ सुखें

करीतों कीर्तन । भय विसरलें मन ॥ २ ॥ देखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥ ३ ॥ तुका म्हणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ४ ॥

४३६ मुक्तिपांग नाहीं विष्णुचिया दासां । संसार तो कैसा न देखती ॥ १ ॥ बैसला गोविंद जडोनियां चित्तीं । आदि तोचि अंतीं अवसान ॥ २ ॥ भोग नारायणा देऊनि निराळीं । ओवियां मंगळीं तोचि गाती ॥ ३ ॥ बळ बुद्धि त्यांची उपकारासाठीं । अमृत तें पोटीं सांठविलें ॥ ४ ॥ दयावंत तरी देवाचसारिखीं । आपुलीं पारखीं नोळखती ॥ ५ ॥ तुका म्हणे त्यांचा जीव तोचि देव । वैकुंठ तो ठाव वसती ते ॥ ६ ॥

४३७ प्रेम देवाचें देणें । देहभाव जाय जेणें ॥ न धरावी मनें । शुद्धी देशकाळाची ॥ १ ॥ मुक्त लज्जा विरहीत । भाग्यवंत हरिभक्त ॥ झाले वोसंडत । नाम कीर्ति पवाडे ॥ २ ॥ जोडी झाली अविनाश । जन्मोनि झाले हरिचे दास ॥ त्यांस नव्हे गर्भवास । सौरस परब्रह्मीं ॥ ३ ॥ हेचि वाहाती संकल्प । पुण्य प्रसंगाचे जप ॥ तुका म्हणे पाप । गांवीं नाहीं हरिजना ॥ ४ ॥

४३८ एका हातीं टाळ एका हातीं चिपळिया । घालिती हुमरी एक वाहताती टाळिया ॥ १ ॥ मातले वैष्णव नटती नाना छंदें । नाहीं चाड मोक्षपदें भजनीं आवडी ॥ २ ॥ हाका अरोळिया गीत वाद्यें सुख सोहळे । जाय तें न कळे केव्हां रजनी दिवस ॥ ३ ॥ तीर्थी नाहीं चाड नलगे जावें वनांतरा । तुका म्हणे हरिहरात्मकाचि पृथिवी ॥ ४ ॥

४३९ नामपाठ मुक्ताफळांच्या ओवणी । हें सुख सगुणीं अभिनव ॥ १ ॥ तरी आम्ही जालों उदास निर्गुणा । भक्तांचिया मना मोक्ष नये ॥ २ ॥ द्यावें घ्यावें ऐसा एथें उरे भाव । काय ठाया ठाव पुसोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां अभयदान करा । म्हणा विश्वंभरा दिलें ऐसें ॥ ४ ॥

४४० देवा ऐकें हे विनंति । मज नको रे हे मुक्ती । तया इच्छा गती । हेंचि सुख आगळें ॥ १ ॥ या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । रिद्धिसिद्धि द्वारीं । कर जोडूनी तिष्ठती ॥ २ ॥ नको वैकुंठींचा वास । असे तया सुखा नास । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा ॥ ३ ॥ तुझ्या नामाचा महिमा । तुज न कळे रे मेघश्यामा । तुका म्हणे आम्हां । जन्म गोड यासाठीं ॥ ४ ॥

४४१ आत्मस्थिती मज नको हा विचार । देईं निरंतर चरणसेवा ॥ १ ॥ जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी माझ्या देईं जीवा ॥ २ ॥ काय सायुज्यता मुक्ति हेचि गोड । देवभक्त कोड तेथें नाहीं ॥ ३ ॥ काय तें निर्गुण पाहों कैशापरी । वर्णुं तुझी हरी कीर्ति कैसी ॥ ४ ॥ गोड चरणसेवा देवभक्तपणें । मज देवा झणें दुराविसी ॥ ५ ॥ जाणिवेपासूनि सोडवीं माझ्या जीवा । देईं चरणसेवा निरंतर ॥ ६ ॥ तुका म्हणे गोडा गोड नलगे प्रीति । सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥ ७ ॥

४४२ पांडुरंगा कांहीं आइकावी मात । न करावें मुक्त आतां मज ॥ १ ॥ जन्मांतरें मज ऐसीं देईं देवा । जेणें चरणसेवा घडे तुझी ॥२॥ वाखाणीन कीर्ति आपुलिया मुखें । नाचेन मी सुखें तुजपुढें॥३॥ करूनी कामारी दास दीनाहूनी । आपुला अंगणीं ठाव मज ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्ही मृत्युलोकीं भले । तुझेचि अंकिले पांडुरंगा ॥ ५ ॥

४४३ मी तों बहु सुखी आनंदभरितां । आहें साधुसंतांमेळीं सदा ॥ १ ॥ कांहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा । आणीक केशवा तुजविण ॥ २ ॥ नलगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेतां जन्म ऐसें ॥ ३ ॥ मृत्युलोकीं कोण धरील वासना । पाचावया जनासवें दुःख ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझा दास ऐसें लोकां । कांहीं सकळिकां कळों यावें ॥ ५ ॥

४४४ आमुचें उचित हेंचि उपकार । आपलाची भार घालूं तुज ॥ १ ॥

भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरणें काळीं शिताचिया॥२॥ जेणें काळें उठी मनाची आवडी । तेचि मागों घडी आवडे तें ॥ ३॥ दुःख येऊं नेदी आमुचिया घरा । चक्र करी फेरा भोंवताला ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं मुक्तीसवें चाड । हेंचि आम्हां गोड जन्म घेतां॥ ५॥

४४५ मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥ १ ॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ॥ २ ॥ आपल्या प्रकारा । करा जतन दातारा ॥ ३ ॥ तुका म्हणे भेटी । पुरे एकचि शेवटीं॥४॥

४४६ जंववरी नाहीं देखिली पंढरी । तंववरी थोरी वैकुंठींची ॥ १ ॥ मोक्षसिद्धि तेथें हिंडे दारोदारीं । होउनि कामारी दीनरूप ॥ २ ॥ वृंदावन सडे चौकरंगमाळा । अभिनव सोहळा घरोघरीं ॥ ३ ॥ नामघोष कथा पुराण कीर्तनीं । ओविया कांडणीं पांडुरंग ॥ ४ ॥ सर्व सुख तेथें असे सर्वकाळ । ब्रह्म तें केवळ नांदतसे ॥ ५ ॥ तुका म्हणे जें न साधे सायासें । तें हें प्रत्यक्ष दिसे विटेवरी ॥ ६ ॥

४४७ करोत तपादि साधनें । कोणी साधोत गोरांजनें ॥ १ ॥ आम्ही नवजों तया वाटा । नाचूं पंढरी चोहटां ॥ २॥ पावोत आत्मस्थिति । कोणी म्हणोत उत्तम मुक्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे छंद । आम्हां हरिच्या दासां निंद्य ॥ ४ ॥

४४८ नको कांहीं पडों ग्रंथाचिये भरीं । शीघ्र व्रत करी हेंचि एक ॥ १ ॥ देवाचिया चाडें आळवावें देवा । ओस देहभावा पाडोनियां ॥ २ ॥ साधनें घालिती काळाचिये मुखीं । गर्भवास सेखीं न चुकती ॥ ३ ॥ उधाराचा मोक्ष होय नव्हे ऐसा । पतनासी इच्छा आवश्यक ॥ ४ ॥ रोकडी पातली अंगसंगें जरा । आतां उजगरा कोठवरी ॥ ५ ॥ तुका म्हणे घालीं नामासाठीं उडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ६ ॥

४४९ सोलींव जें सुख अतिसुखाहुनीं । उभें तें अंगणीं वैष्णवांच्या ॥ १ ॥ वृंदावन सडे चौक रंगमाळा । नाचे तो सोहळा

देखोनियां ॥ २ ॥ भूषणमंडित सदा सर्वकाळ । मुद्रा आणि माळ तुळसी कंठीं ॥ ३ ॥ नामओघ मुखीं अमृताचें सार । मस्तक पवित्र सहित रजें ॥ ४ ॥ तुका म्हणे मोक्ष भक्ताचिया मना । नये हा वासना त्याची करी ॥ ५ ॥

४५० तेथें सुखाची वसति । गाती वैष्णव नाचती । दिंड्या पताका झळकती । गर्जती हरिनामें ॥ १ ॥ दांपा झाली ये घे मारी । पळतां भरल्या दिशा चारी । न येती माघारीं । नाहीं उरी परताया ॥ २ ॥ विसरोनि देवपणा । उभा पंढरीचा राणा । विटोनि निर्गुणा । रूप धारिलें गोजिरें ॥ ३ ॥ पोट सेवितां न धाये । भूक मुकलीच राहे । तुका म्हणे पाहे । कोण वास मुक्तीची ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

४५१ नाम सांडोनी मुक्ती घेणें । हीं तों लक्षणें अधमाचीं ॥ १ ॥ आम्हां विष्णुदासां धर्म । नित्य नेम कथेचा ॥ २ ॥ काय करूं त्या व्युत्पत्ति । वडील हांसती पूर्वज ॥ ३ ॥ निळा म्हणे करावी सेवा । आवडी देवा हे माझी ॥ ४ ॥

४५२ देतां कांहींचि न घेती । भुक्ति मुक्ति ऋद्धिसिद्धि ॥ १ ॥ म्हणोनियां संकट थोर । वाटे दुस्तर मज यांचें ॥ २ ॥ वैकुंठासी नेऊं म्हणतां । विटती तत्वतां ऐकोनि ॥ ३ ॥ निळा म्हणे रंगले रंगीं । माझिया निजांगीं लिगटले ॥ ४ ॥

४५३ कोटि जन्म घेईन देवा । करीन सेवा तुमचीच ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति नका आड । घालूं सांकड मज वाटे ॥ २ ॥ काय करूं ते आत्म-स्थिति । खंडन करिती भजनाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे राहों ठायीं । विश्वास पायीं तुमचिये ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४५४ सांडुनि पंढरीची वारी । मोक्ष मागती ते भिकारी ॥ १ ॥ ताट वोगरिलें निकें । सांडुनि कवण जाय भिके ॥ २ ॥ जो नेणे नाम

गोडी । तोचि मुक्तींत चरफडी ॥ ३ ॥ आम्ही पंढरीचे लाटे । न वजों वैकुंठीचे वाटे ॥ ४ ॥ झणी घ्याल गर्भवासा । नामा म्हणे विष्णुदासा ॥ ५ ॥

४५५ जन्मजन्मांतरीं असेल सामोग्री । तरीच नाम जिव्हाग्रीं येईल राम ॥ १ ॥ कर जोडूनि दोन्ही मोक्ष पाहे वास । म्हणे होईन दास हरिदासांचा ॥ २ ॥ तरि हे तुच्छ करुनी न पाहती दृष्टी । आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानीं ॥ ३ ॥ नामाचेनि बळें उजाविलीं साधनें । तोडिलीं बंधनें संसाराचीं ॥ ४ ॥ मुक्तिपद कोणी न घेती फुकासाठीं । हिंडे वाळवंटीं दीनरूपें ॥ ५ ॥ योगियांचें घर रिघे काकुळती । अव्हेरिलें संतीं म्हणोनियां ॥ ६ ॥ रिद्धिसिद्धि म्हणती आमुची कवण गती । यावें काकुलती कवणा आम्हीं ॥ ७ ॥ मोक्ष मुक्ति जिहीं हाणितल्या लाथीं । ते काय धरिती आमुची सोय ॥ ८ ॥ ऐसें सर्व देवांसी श्रीदेव ते पूज्य । केलें एक राज्य पुंडलिकें ॥ ९ ॥ हर्षे निर्भर नामा नाचे महाद्वारीं । मुखीं निरंतरीं नामघोष ॥ १० ॥

४५६ भुक्ति मुक्ति मागों तुज । माझे हांसती पूर्वज ॥ १ ॥ मज प्रेम पाढियें देवा । न मागें आन कांहीं केशवा ॥ २ ॥ चाड धरीन ब्रह्मज्ञानीं । तरी मज व्यर्थ व्याली जननी ॥ ३ ॥ मोक्ष मागूं तुजप्रति । संत छळवादे हांसती ॥ ४ ॥ होऊं सिद्धीचा साधिता । दैवें सांडिलें सर्वथा ॥ ५ ॥ नामा म्हणे तूं जाणसी । माझा भाव हृषीकेशी ॥ ६ ॥

४५७ मुक्तिपद मी गा अभिलाषीन चित्तीं । झणीं अंतरती पाय तुझे ॥ १ ॥ निर्वासना चित्तें भजन तुझें करितां । झणी सायुज्यता देसी मज ॥ २ ॥ मग मीं काय करूं वैकुंठनायका । ऐशा प्रेमसुखा कोठें पाहूं ॥ ३ ॥ ध्यान सुखें करूं पाहें हृदयकमळीं । पाक्षिणी ऐसी आळी करिशी झणीं ॥ ४ ॥ संकल्पीं यावें वाटे चरणाजवळी । विकल्पकाजळी झणी देशी ॥ ५ ॥ नामा म्हणे आतां कांहींच मी न करीं । मज होत कोटीवरी गर्भवास ॥ ६ ॥

४५८ कृपा करोनी त्वां मज प्रसन्न व्हावें। आणि म्या मागावें बुद्धि ज्ञान ॥ १ ॥ ऐसी भुली मज न घाली पांडुरंगा। विघड सत्संगा न करी मज ॥ २ ॥ मोक्षासी साधन एक ती उपाधि। दाखवूनि बुद्धि-भ्रंश केलें ॥ ३ ॥ एक पुत्र कलत्र राज्याचा संभ्रम। दावोनि दुर्गम भ्रम केला ॥ ४ ॥ नामा म्हणे तुझ्या प्रेमालागी भक्ती। घेतली म्या सुती जन्ममरण ॥ ५ ॥

४५९ निंवलोण करूं पंढरीच्या सुखा। आणिक पुंडलीका मायबापा ॥ १ ॥ पाहतां भूमंडळीं नाहीं आणिकरे। पांडुरंग क्षेत्रा-वांचूनियां ॥ २ ॥ अणिमादी सिद्धि भक्तांचिये द्वारीं। होऊनि कामारि वोळंगती ॥ ३ ॥ परलोकी येती परतोनी मागुते। सर्व सुख तेथे भोगावया ॥ ४ ॥ मुक्तिपद कोणी न घे फुकासाठीं। हिंडे वाळवंटीं दीनरूप ॥ ५ ॥ भक्तांचिया पायां पडतो पुढतां पुढती। मज करा सांगाती मोक्ष म्हणे ॥ ६ ॥ सत्यलोकीं जया सुखाची शिराणी। ते आम्हां अनुदिनीं प्रत्यक्ष दिसे ॥ ७ ॥ वंदीजन नामा उभा महाद्वारीं कीर्ति चराचरीं वर्णितसे ॥ ८ ॥

४६० पंढरीचें सुख जिहीं अनुभाविलें। भावें अनुसरलें विठ्ठल पायीं ॥ १ ॥ काया वाचा मन रंगलें चरणीं। धरियेला मनीं पांडुरंग ॥ २ ॥ नामाचेनि बळें उडविलीं साधनें। तोडीलीं बंधनें संसाराचीं ॥ ३ ॥ मुक्तिपद कोणी नेघे फुकासाठीं। हिंडे वाळवंटीं दीनरूप ॥ ४ ॥ योगियांचें घर रिघे काकुलती। आव्हेरीलें संतीं म्हणोनियां ॥ ५ ॥ दोन्ही कर जोडूनि मोक्ष पाहे वास। म्हणे होईन दास हरिदासाचा ॥ ६ ॥ तंव तुच्छ करोनि न पाहती दृष्टी। आपंगिलें शेवटीं ब्रह्मज्ञानें ॥ ७ ॥ अष्टमहासिद्धि म्हणती कवण गति। यावें काकुळती कवणा आम्ही ॥ ८ ॥ मोक्ष मुक्ति जीहीं हाणितल्या पायीं। आमची ते सोयी काय धरिती ॥ ९ ॥ ऐसे भक्तराज देवां वंद्य झाले। ते एक राज्य

केलें पुंडलीकें ॥ १० ॥ हर्षें निर्भर नामा नाचे महाद्वारीं । कीर्ति चराचरीं वर्णीतसे ॥ ११ ॥

४६१ पंढरीची वारी जयाचिये कुळीं । त्याची पायधुळी लागो मज ॥ १ ॥ तेणें त्रिभुवनीं होईन सरता । नलगे पुरुषार्था मुक्ति चारी ॥ २ ॥ नामाची आवडी प्रेमाचा जिव्हाळा । क्षण जिवा वेगळा न करीं त्यासी ॥ ३ ॥ नामा म्हणे माझा सोयरा जिवलग । सदा पांडुरंग तया जवळी ॥ ४ ॥

४६२ नलगे तुझी मुक्ति नलगे तुझी भक्ती । मज आहे विश्रांति वेगळीच ॥ १ माझें मज कळलें माझें मज कळलें । माझें मज कळलें प्रेमसुख ॥ २ ॥ न करीं तुझें ध्यान नलगे ब्रह्मज्ञान । माझी आहे खूण वेगळीच ॥ ३ ॥ न करीं तुझी स्तुती न वाखाणीं कीर्ति। धरिलीसे ते युक्ति वेगळीच ॥ ४ ॥ न करीं कायाक्लेश इंद्रियां निरोध । माझा आहे बोध वेगळाचि ॥ ५ ॥ नामा म्हणे नाम गाईन निर्विकल्प । येसी आपेआप गिंवसीत ॥ ६ ॥

४६३ तुझे चरण देखोनि हरली भवव्यथा । पुढती एक चिंता वाटे थोर ॥ १ ॥ झणीं मज मुक्ति देसी पांडुरंगा । मग मी संतसंगा कोंवि मिळे ॥ २ ॥ पंढरीचा आनंद हा सुख सोहळा । कवणाचिया डोळा पाहों जाऊं ॥ ३ ॥ तुझ्या कथा मज अमृत संजीवनी । कवणाच्या श्रवणीं ऐकों जावों ॥ ४ ॥ म्हणोनि माझ्या जीवा वाटे जड भारी । उदास मुरारी करिसी झणीं ॥ ५ ॥ नामा म्हणे मज तुझी चरणसेवा । जन्मोजन्मीं देवा द्यावी मज ॥ ६ ॥

## श्रीजनाबाई

४६४ बांधोनियां हात गयावळ मारिती । दंड ते करिती मोक्षासाठीं ॥ १ ॥ गेले ते पितर मोक्षालागी तुझे । आतां देई माझे दक्षिणेसी ॥ २ ॥ वापुडें केश बोडिती मिशी दाढी । मग दक्षणा हिरडी खातसे हे ॥ ३ ॥ फार काय सांगूं मेल्याविण मुक्ती । नाहीं तें

वांछिती स्वप्नसुख ॥ ४ ॥ अनंत जन्म मृत्यु होतां जैसें दुःख । त्याहूनि अशेष आहे तेथें ॥ ५ ॥ भांबावलें जन धांवे आटाआटी । सोडूनिया कोटी अनंतपद ॥ ६ ॥ नलगे गाळावें नलगे तळावें । नलगे मरावें मुक्तिसाठीं ॥ ७ ॥ मुक्ति लागे पायां जाऊनियां पाहे । जीव जातां देह जनी नाहीं ॥ ८ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४६५ वेद तो कल्पिक शास्त्र तें शाब्दिक । पुराण सकळीक वाष्कळचि ॥ १ ॥ वाहूली तो जीव सूत्रधारी तो शिव । मिथ्याचि हे भाव जग सर्व ॥ २ ॥ येथें केंचा मुक्त मुळींच नाहीं बद्ध । सर्वांहि अबद्ध दिसे जें कां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसी याची खूण । जाणे तोचि धन्य गुरुपुत्र ॥ ४ ॥

४६६ गर्भवासा भीती ते अंधळे जन । मुक्तिसी कारण नाहीं आम्हां ॥ १ ॥ गर्भवास झालिया संतसेवा घडती । मुक्त झालिया न कळे भगवद्भक्ती ॥ २ ॥ आम्ही सुखें गर्भवास घेऊं देखा । मुक्तीचिया मस्तका पाय देऊं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गर्भवास सोसूं । संतांचा सौरसु हातीं लागे ॥ ४ ॥

४६७ सुटलों म्हणतां बांधला होता । मुक्त म्हणे त्याचे अंगीं ये बद्धता ॥ १ ॥ बद्धता नाहीं जेथें मुक्त ते काई । भ्रांती दों ठाईं झोंबतसे ॥ २ ॥ स्वप्नीचेनी सुखें सुखासनीं बैसे । जागा जालिया कांहींच नसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं एकपणा तुटी । बद्धमोक्षाची तेथें वार्ताहि तुटी ॥ ४ ॥

४६८ गरुड हनुमंतादि आपण । सामोरा येत जगजीवन ॥ १ ॥ आवडी कीर्तनीं ऐशी । लक्ष्मी तेथें प्रत्यक्ष दासी ॥ २ ॥ मोक्षादिकां नव्हे वाड । येरा कोण वाहे कावाड ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भुलला । उघडा कीर्तनीं रंगला ॥ ४ ॥

४६९ ऐसें सुख कोठें आहे । भजन सांडोनि करिशी काय ॥ १ ॥ सांडोनि भजनाचा प्रेमा । मुक्ति मागसी अधमा ॥ २ ॥ सांडोनियां

संतसंग। काय मुक्ति ते अभंग ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मुक्ति। भजन केलिया दासी होती ॥ ४ ॥

४७० निंबलोण करूं पंढरीच्या सुखा। आणि पुंडलिका भक्तराया ॥ १ ॥ परलोकींचे येती परतोनि मागुती। सर्व सुख येथें पहावया ॥२॥ अष्टमहासिद्धि जयाचिये द्वारीं। होऊनि कामारी वोळंगती ॥ ३ ॥ मुक्तिपद देतां न घे फुकासाठीं। ते हिंडे वाळुवंटीं दीनरूप ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं करी निंबलोण। विटेसहित चरण ओंवाळावे ॥ ५ ॥

४७१ वारंवार जन्म घेऊं। परी पाहूं पंढरपुर ॥ १ ॥ दुजें मागणें नाहीं देवा। करूं सेवा वैष्णवांची ॥ २ ॥ न मागों भुक्ति आणि मुक्ति। ती फजीती कोण सोसी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मागें। कीर्तन रंगीं रंगला वेगें ॥ ४ ॥

४७२ भुक्ति मुक्तीचें सांकडें नाहीं विष्णुदासां। प्रपंचाची आशा मा तेथें कैंची ॥ १ ॥ वैकुंठ कैलास अमरपदें तिन्हीं। तुच्छवत् मनीं मानिताती ॥ २ ॥ राज्य भोग संतती संपत्ती धन मान। विष्ठे ते समान श्वानसुकर ॥ ३ ॥ मा ब्रह्मज्ञाना तेथें कोण पुसे तत्वतां। घर रिघोनी सायुज्यता येत असे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नामाची प्रौढी। ऋद्धि सिद्धि दडी घरीं देती ॥ ५ ॥

४७३ माझें मन राहो तुझे पायीं। वास पंढरीचा देईं ॥ १ ॥ जन्म देशी भलते परी। वाचे राम विठ्ठल हरी ॥ २ ॥ जन्मासी या भिणें। हें तों आम्हां लाजिरवाणें ॥ ३ ॥ मोक्ष मुक्तितें देवा। नको गोऊं तया ठाया ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनीं एका। संतसंग द्यावा निका ॥ ५ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४७४ मोक्ष मेल्या पाठीं आम्हांसी होईल। ऐसें जे म्हणतील अतिमूर्ख ॥ १ ॥ दीप गेल्यावरी कैंचा जी प्रकाश। झाका झाकी

त्यास कासयाची ॥ २ ॥ जंववरी देह आहे तंववरी साधन । करूनियां ज्ञान सिद्ध करा ॥ ३ ॥ गृह दग्ध न होतां शिंपिजे उदक । शेखीं तो निष्टक काय कीजे ॥ ४ ॥ आहे मी हा कोण करावा विचार । म्हणे ज्ञानेश्वर निवृत्तिचा ॥ ५ ॥

## श्रीमुक्ताबाई

४७५ मुक्तपणें ब्रीद बांधोनियां द्विज । नेणती ते बीज केशव हरी ॥ १ ॥ ज्याचेनि मुक्तता सर्वही पैं मुक्त । करूनियां रत न सेविती ॥ २ ॥ वेदीं बोलियेलें ब्रह्मार्पण भावें । सदा मुक्त व्हावें अरे जना ॥ ३ ॥ मुक्ताई मुक्त हरिनाम सेवित । अवघेंचि मुक्त सेवितां हरी ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

४७६ स्वर्गींचे अमर मागताती देवा । संतांची सेवा करावया ॥ १ ॥ पंढरीचें सुख देखोनी नयनीं । करिती विनवणी जोडुनी हात ॥ २ ॥ चारी मुक्ती तेथें हिंडती दीनरूप । येऊं नेदी समीप कोणी तयां ॥ ३ ॥ धिक्कारुनी तयां घालिती बाहेरी । मागुती पायांवरी लोळताती ॥ ४ ॥ वैष्णवां शरण येती काकुळती । आमुची ती गती काय सांगा ॥ ५ ॥ या सुखाचा थेंबुटा न मिळे ब्रह्मादिकां । तेथें सेना देखा सरता झाला ॥ ६ ॥

## श्रीचोखोबामहाराज.

४७७ न लगे भुक्ति मुक्ती वैकुंठीचा वास । सुखें पंढरीस राहीन देवा ॥ १ ॥ आणिक सांकडें पडोत नानापरी । परी मी पंढरी सोडोनी न वजे कोठें ॥ २ ॥ खावयासी जरी न मिळेचि अन्न । उदक सेवीन धणिवरी ॥ ३ ॥ कोणी निंदो कोणी म्हणोत कां वेडा । जेणें नव्हे पीडा भजनासी ॥ ४ ॥ चोखा म्हणे मज आहे हेंच सुख । आणिके ठायीं दुःख नानापरीचें ॥ ५ ॥

# कीर्तनपर

## श्रीतुकाराममहाराज

४७८ अवीट हें क्षीर हरिकथा माउली । सेवितां सेविली वैष्णवजनीं ॥ १ ॥ अमृत राहिलें लाजोनी माघारें । येणें रसें थोरें ब्रह्मानंदें ॥ २ ॥ पतित पातकी पावन पंगती । चतुर्भुज होती देवा ऐसे ॥ ३ ॥ सर्व सुखें तया मोहोरती ठाया । जेथें दाटणी या वैष्णवांची ॥ ४ ॥ निर्गुण हें सोंग धरिलें गुणवंत । धरूनियां प्रीत गाये नाचे ॥ ५ ॥ तुका म्हणे केली साधन गाळणी । सुलभ कीर्तनीं होउनि ठेला ॥ ६ ॥

४७९ आनंदें कीर्तन कथा करी घोष । आवडीचा रस प्रेम सुखें ॥ १ ॥ मज या आवडे वैष्णवांचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळा ॥ २ ॥ स्वल्प मंत्र वाचे वैसलासे निका । रामकृष्ण सखा नारायण ॥ ३ ॥ उच्चारितां दुजें वाटे मज लाज । उपदेशें काज आणिक नाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे चित्त रंगलेंसे ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ५ ॥

४८० कथा करोनियां द्रव्य घेती देती । तयां अधोगति नरकवास ॥ १ ॥ रवरव कुंभपाक भोगिती यातना । नये नारायणा करुणा त्यांची ॥ २ ॥ असिखड्गधारा छेदिती सर्वांग । तप्तभूमि अंग लोळविती ॥ ३ ॥ तुका म्हणे तया नरक न चुकती । सांपडले हातीं यमाचिया ॥ ४ ॥

४८१ कथा करोनियां मोल ज्यापें घेती । तेही दोघे जाती नरकामध्यें ॥ १ ॥ ब्रह्म पूर्ण करा ब्रह्म पूर्ण करा । अखंडित स्मरा रामनाम ॥ २ ॥ मधुर वाणीच्या नका पडों भरीं । जाल यमपुरी भोगावया ॥ ३ ॥ तुका म्हणे करी ब्रह्मांड ठेंगणें । हात पसरी जिणें धिग त्याचें ॥ ४ ॥

४८२ गायत्री विकोन पोट जे जाळिती । तयां होय गती यमलोकीं ॥ १ ॥ कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नर-

कपाता ॥ २ ॥ नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणा तयां गति कैसी होय ॥ ३ ॥ कैसें होय त्यांचें तेच हो जाणती । आम्हांसीं संगती नलगे त्यांची ॥ ४ ॥ आमुचा सांगाती आहे तो श्रीहरी । नलगे दुराचारी तुका म्हणे ॥ ५ ॥

४८३ जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ॥ १ ॥ बुका लावूं नये भाळा । माळ घालूं नये गळां ॥ २ ॥ तट्टा वृषभासी दाणा । तृण मागों नये जाणा ॥ ३ ॥ तुका म्हणे द्रव्य घेती । देती तेही नरका जाती ॥ ४ ॥

४८४ त्या हरिदासांची भेटी घेतां । नरका उभयतांसी जातां ॥ १ ॥ मातेपरीस थोरी कथा । भाड घेतां न लाजे ॥ २ ॥ देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ॥ ३ ॥ तुका म्हणे नरकगांवा । जाती हावा धरोनी ॥ ४ ॥

४८५ कथाकाळींची मर्यादा सांगतों ते भावें वंदा । प्रीतीनें गोविंदा हेंचि एक आवडे ॥ १ ॥ टाळ वाद्य नृत्य गीत अंतःकरणें प्रेम भरित । वाणिता तो कीर्त तद्भावने लेखावा ॥ २ ॥ नये आळसें मोडूं अंग कथे कानवडे ढुंग । हेळणेचा रंग दावी तो चांडाळ ॥ ३ ॥ तोंडी विडा माने ताठा थोरपणें घाली गेंठा । चित्त नेदी नामपाठा गोष्टी लावी तो चांडाळ ॥ ४ ॥ कथे इच्छी मान दावुनियां थोरपण । रजा संकोचून लुगडीं सांवरी तो चांडाळ ॥ ५ ॥ आपण बैसे बाजेवरी सामान्य हरिच्या दासां धरी । तरी तो सूळावरी वाहिजे निश्चयेंसी ॥ ६ ॥ येतां न करी नमस्कार कर जोडोनियां नम्र । न म्हणतां थोर आणिकां खेटी तो चांडाळ ॥ ७ ॥ तुका विनवी जना कथे नाणावें अवगुणा । करा नारायणा ऋणी समर्पक भावें ॥ ८ ॥

४८६ कथा देवाचें ध्यान कथा साधन मंडण । कथे ऐसें पुण्य आणिक नाहीं सर्वथा ॥ १ ॥ ऐसा साच खरा भाव । कथेमाजी उभा देव ॥ २ ॥ मंत्र स्वल्प जना उच्चारितां वाचे मना । म्हणतां नारायणा

क्षणें जळती महादोष ॥ ३ ॥ भावें करितां कीर्तन तरे तारी आणीक जन । भेटे नारायण संदेह नाहीं म्हणे तुका ॥ ४ ॥

४८७ कथा दुःख हरी कथा मुक्त करी । कथा याचि बरी विठोबाची ॥ १ ॥ कथा पाप नासी उद्धारिले दोषी । समाधि कथेसी मूढजना ॥ २ ॥ कथा तप ध्यान कथा अनुष्ठान। अमृत हें पान हरिकथा ॥ ३ ॥ कथा मंत्रजप कथा हरि ताप । कथा काळीं कांप कळिकाळासी ॥ ४ ॥ तुका म्हणे कथा देवाचेंही ध्यान । समाधि लागोन उभा तेथें ॥ ५ ॥

४८८ कथा त्रिवेणी संगम। देव भक्त आणि नाम॥ तेथींचें उत्तम । चरण रज वंदितां॥ १॥ जळती दोषांचे डोंगर। शुद्ध होती नारी नर॥ गाती ऐकती सादर । जे पवित्र हरिकथा ॥ २ ॥ तीर्थें तया ठाया । येती पुनीत व्हावया ॥ पर्वकाळ पायां । तळीं वसे वैष्णवां ॥ ३ ॥ अनुपम्य हा महिमा । नाहीं द्यावया उपमा ॥ तुका म्हणे ब्रह्मा । नेणे वर्णूं या सुखा ॥ ४ ॥

४८९ कथा हें भूषण जनांमध्यें सार । तरले अपार बहुत येणें ॥ १ ॥ नीचिये कुळींचा उंचा वंद्य होय । हरीचे जो गाय गुणानुवाद ॥ २ ॥ देव त्याची माथां वंदी पायधुळी । दीप जाला कुळीं वंशाचिये ॥ ३ ॥ त्याची निंदा करी त्याची कुष्ठ वाणी । मुख संवदणी रजकाची ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं चोरीचा व्यापार । विठ्ठलाचें सार नाम घ्यावें ॥ ५ ॥

४९० कीर्तन चांग कीर्तन चांग । होय अंग हरिरूप ॥ १ ॥ प्रेमछंदें नाचे डोले । हरपले देहभाव ॥ २ ॥ एकदेशी जीवकळा । हा सकळां सोयरा ॥ ३ ॥ तुका म्हणे उरला देव । गेला भेव त्या काळें ॥ ४ ॥

४९१ कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव संगीं आहे ॥ १ ॥ भक्त जाय सदा हरिकीर्ति गात । त्यासवें अनंत

हिंडतसे ॥ २ ॥ त्रैलोक्य भ्रमण करीत नारद । त्यासवें गोविंद फिरतसे ॥ ३ ॥ नारद मंजुळ सुस्वरें गीत गाये । मार्गीं चालताहे संगें हरि ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकांची प्रीति ऐसी ॥ ५ ॥

४९२ टाळघोळ सुख नामाचा गजर । घोषें जयजयकार ब्रह्मानंदु ॥ १ ॥ गरूडटके दिंडी पताकांचे भार । आनंद अपार ब्रह्मादिकां ॥ २ ॥ आनंदें वैष्णव जाती लोटांगणीं । एक एकाहुनि भद्रजाती ॥ ३ ॥ तेणें सुखें सुटे पाषाणा पाझर । नष्ट खळ नर शुद्ध होती ॥ ४ ॥ तुका म्हणे सोपें वैकुंठासी जातां । रामकृष्ण कथा हेचि वाट ॥ ५ ॥

४९३ दीन आणि दुर्बळांसी । सुखरासी हरिकथा ॥ १ ॥ तारूं भवसागरींचें । उंचनीच अधिकार ॥ २ ॥ चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनी ॥ ४ ॥

४९४ न राहे क्षण एक वैकुंठीं । क्षीरसागरीं त्रिपुटी । जाय तेथें दाटी । वैष्णवांची धांवोनी ॥ १ ॥ भाविक गे माये भोळें गुणांचें । आवडे तयाचें नाम घेतां तयासी ॥ २ ॥ जो नातुडे कवणेपरी । तपें दानें व्रतें थोरी । म्हणतां वाचे हरी । रामकृष्ण गोविंदा ॥ ३ ॥ चौदा भुवनें जया पोटीं । तो राहे भक्तांचिये कंठीं । करूनिया साटी । चित्त प्रेम दोहींची ॥ ४ ॥ जया रूप ना आकार । धरी नाना अवतार । घेतलीं हजार । नांवें ठेवूनि आपणां ॥ ५ ॥ ऐसा भक्तांचा ऋणी । पाहातां आगमीं पुराणीं । नाहीं तुका म्हणे ध्यानीं । तो कीर्तनीं नाचतसे ॥ ६ ॥

४९५ न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आम्हांसी हें सोपें गीतीं गातां ॥१॥ न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरि ॥ २ ॥ जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटीं कर उभा

विटे॥३॥ अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं। तो आम्हां संपुष्टीं भक्तिभावें॥४॥ तुका म्हणे वर्म जाणती लडिवाळें। जें होतीं निर्मळें अंतर्बाहीं॥५॥

४९६ नामाचें चिंतन प्रगट पसारा। असाल तें करा जेथें तेथें ॥१॥ सोडवील माझा स्वामी निश्चयेंसीं। प्रतिज्ञा हे दासीं केली आह्मीं ॥२॥ गुणदोष नाहीं पाहात कीर्तनीं। प्रेमें चक्रपाणी वश्य होय ॥३॥ तुका म्हणे कडु वाटतो प्रपंच। रोकडे रोमांच कंठ दाटे ॥४॥

४९७ यम सांगे दूतां। तुम्हां नाहीं तेथें सत्ता। जेथें होय कथा। सदा घोष नामाचा ॥१॥ नका जाऊं तयां गांवा। नाम धारकाच्या शिवां। सुदर्शन यावा। घरटी फिरे भोंवती ॥२॥ चक्र गदा घेऊनि हरि। उभा असे त्यांचे द्वारीं। लक्ष्मी कामारी। रिद्धि सिद्धि सहित ॥३॥ ते बळिया शिरोमणी। हरिभक्त ये मेदिनी। तुका म्हणे कानीं। यम सांगे दूतांचे ॥४॥

४९८ यारे नाचों अवघे जण। भावें प्रेमें परिपूर्ण ॥१॥ गाऊं पंढरीचा राणा। क्षेम देउनी संतजना ॥२॥ सुख फुकासाठीं। साधे हरिनाम बोभाटीं ॥३॥ प्रेम वांटितो उदार। देतां नाहीं साना थोर ॥४॥ पापें पळालीं बापुडीं। काळ झाला देशधडी ॥५॥ तुका म्हणे धन्य काळ। आजि प्रेमाचा सुकाळ ॥६॥

४९९ लटिकें तें ज्ञान लटिकें तें ध्यान। जरि हरिकीर्तन प्रिय नाहीं ॥१॥ लटिकेंचि दंभ घातलें दुकान। चाळविलें जन पोटासाठीं ॥२॥ लटिकेंचि केलें वेदपारायण। जरि नाहीं तो स्फुंदन प्रेम कथें ॥३॥ लटिकें तें तप लटिका तो जप। आळस निद्रा झोंप कथाकाळीं ॥४॥ नाम नावडे तो करील वोहरी। नाहीं त्याची खरी चित्तशुद्धि ॥५॥ तुका म्हणे ऐसीं गर्जतीं पुराणें। शिष्टांचीं वचनें मागिलाहीं ॥६॥

५०० साता दिवसांचा जरी झाला उपवासी। तरी कीर्तनासी

टाकूं नये ॥ १ ॥ फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सोडूं नये ॥ २ ॥ शरीराचे होत दोंनी तेही भाग । परि कीर्तनाचा रंग सोडों नये ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥ ४ ॥

५०१ सांगतां दुर्लभ ज्ञानाचिया गोष्टी । अनुभव तो पोटीं कैंचा घडे ॥ १ ॥ भजनाचे सोई जगा परिहार । नेणत्यां सादर चित्त कथे ॥ २ ॥ नाइकवे कानीं साधन उपाय । ऐकतो गाये हरुपें गीत ॥ ३ ॥ नव्हे आराणूक जावयाची वना । वेध कामिमना हरिकथेचा ॥ ४ ॥ काळाच्या साधना कोणा अंगीं बळ । चिंतना मंगल अष्टप्रहर ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हीं खेळों भातुकलें । विभागासी मुलें भोळीं येथें ॥६॥

५०२ सांडूनी कीर्तन न करीं आणीक काज । नाचेन निर्लज्ज तुझ्या रंगीं ॥ १ ॥ आवडीचें आर्त पुरवीं पंढरिराया । शरण तुझ्या पायां याचि लागीं ॥ २ ॥ टाळी वाहूनियां विठ्ठल म्हणेन । तेणें निवारीन भवश्रम ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा नुपेक्षावें आम्हां । न्यावें निजधामा आपुलिया ॥ ४ ॥

५०३ सोपें वर्म आम्हां सांगितलें संतीं । टाळ दिंडी हातीं घेऊनि नाचा ॥ १ ॥ समाधिचें सुख सांडा ओंवाळून । ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस ॥ २ ॥ घुढती घडे चढतें सेवन आगळें । भक्तिभाग्यबळें निर्भरता ॥ ३ ॥ उपजोंचि नये संदेह चित्तासी । मुक्ति च्यारी दासी हरिदासांच्या ॥ ४ ॥ तुका म्हणे मन पावोनि विश्रांति । त्रिविध नासती ताप क्षणें ॥ ५ ॥

५०४ स्वर्गींचे अमर इच्छिताती देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आम्हां ॥ १ ॥ नारायण नामें होऊं जीवन्मुक्त । कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ॥ २ ॥ वैकुंठींचें जन सदा चिंतिताती । कईं येथें येती हरिचे दास ॥ ३ ॥ यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥४॥ तुका म्हणे पावावया पैलपार । नाममंत्र सार भाविकासी ॥ ५ ॥

५०५ हरिकथेची आवडी देवा । करितो सेवा दासांची ॥ १ ॥ म्हणोनि हिंडे मागें मागें । घरटी जागे घालितसे ॥ २ ॥ निर्लज्ज भोजें नाचत रंगीं । भरतें अंगीं प्रेमाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे विकलें देवें । आपणाभावें संवसाटी ॥ ४ ॥

५०६ प्रेम अमृताची धार । वाहे देवाही समोर ॥ १ ॥ ऊर्ध्व-वाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळां तीर्थां ॥ २ ॥ शिवाचें जीवन । जाळी महादोष कीर्तन ॥ ३ ॥ तुका म्हणे हरि । इची स्तुती वाणी थोरी ॥ ४ ॥

५०७ हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ १ ॥ त्याची वाणी अमंगळ । कान उंदराचें बीळ ॥ २ ॥ सांडुनी हा रस । करिती आणीक सायास ॥ ३ ॥ तुका म्हणे पिसीं । वांयां गेलीं किती ऐसीं ॥ ४ ॥

५०८ काय ते विरक्ति न कळेचि आम्हा । जाणों एका नामा विठोबाच्या ॥ १ ॥ नाचेन मी सुखें वैष्णवांचे मेळीं । दिंडी टाळ घोळीं आनंदें या ॥ २ ॥ शांति क्षमा दया तें मी काय जाणें । विठ्ठल-कीर्तनें वांचूनियां ॥ ३ ॥ कासया उदास होऊं देहावरी । अमृतसागरीं बुडोनिया ॥ ४ ॥ कासया एकांत सेवूं तया वना । आनंद तो नामा-माजी असे ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हा आहे भरंवसा । विठ्ठल सरिसा चालतसे ॥ ६ ॥

५०९ संसाराचे अंगीं अवघींच व्यसनें । आम्ही या कीर्तनें शुद्ध जालों ॥ १ ॥ आतां हें सोंवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडि-येलें ॥ २ ॥ ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा ॥ ४ ॥

५१० घोंटवीन लाळ ब्रह्मज्ञान्या हातीं । मुक्तां आत्मस्थिति सांड-वीन ॥ १ ॥ ब्रह्मभूत काया होतसे कीर्तनीं । भाग्य तरी ऋणी देवा

ऐसा ॥ २ ॥ तीर्थभ्रामकासी आणीन आळस । कडु स्वर्गवास करिन भोग ॥ ३ ॥ सांडवीन तपोनिधां अभिमान । यज्ञ आणि दान लाजवीन ॥ ४ ॥ भक्तिभाग्यप्रेमा साधिन पुरुपार्थ । ब्रह्मींचा जो अर्थ निजठेवा ॥ ५ ॥ धन्य म्हणविन इहलोकीं लोकां । भाग्यें आम्हीं तुका देखियेला ॥ ६ ॥

५११ नमस्कार कीर्तनरंगा । संत श्रोते भाविक लिंगा । प्रेम चढो माझिया अंगा । देह निःसंगा होवोनियां ॥ १ ॥ आरंभीं नमितों देवता । कुळींचे कुळस्वामिणी आतां । मुख्य सद्गुरु तो दाता । चरणीं माथां जयाच्या ॥ २ ॥ चंडी विनायक मारुती । बहिरी हरीहराच्या मुर्ती । ब्रह्मरूप ब्रह्मींच्या मुर्ती । आदि शक्ती आदि माया ॥ ३ ॥ चोखोबा माझा गणपती । राधाई म्हारीण सरस्वती । गोरोबा बलभीम मारुति । अगाध कीर्ति जयाची ॥ ४ ॥ सांवता माझा काळबहिरी । उदर चिरोनियां करीं । पोटीं साठविला हरी । निजनिश्चयें ॥ ५ ॥ आदिनाथ निवृत्तिनाथ । ज्ञानराज महाविष्णुची ज्योत । सोपान ब्रह्मरूप मूर्त । आदिशक्ति मुक्ताई ॥ ६ ॥ नवविधभक्ति नवविधरत्न । आरंभीं करितों स्तवन । तुका म्हणे आलों शरण । करितों नमन सेवेसी ॥ ७ ॥

५१२ निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ॥ १ ॥ उभा राहोनियां मुखीं नाम वदे । नाचे हा गोविंद नाना छंदें ॥ २ ॥ मारगीं चालतां मुखीं नाम वाणीं । उभा चक्रपाणी मागेंपुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे यासी कीर्तनाची गोडी । प्रेमें घाली उडी नामासाठीं ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

५१३ हरिकीर्तनाच्या योगें । आम्हांसी जगें जाणिजे ॥ १ ॥ नाहीं तरी होतो ठावा । कोठें देवा कोणासी ॥ २ ॥ जेवीं वोहळासी प्रतिष्ठा ।

पावतां तटा गंगोदका ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रकाशदीप्ति । चंद्रज्योती वान्हिसंगें ॥ ४ ॥

५१४ ऐकतां श्रवणीं परमानंद । उपमर्दे कंद मायेचा ॥ १ ॥ घोष गजरें गर्जे वाचा । जो श्रुति शास्त्राचा गुह्यार्थ ॥ २ ॥ परम रसाळ मधुराक्षरें । चालती सुस्वरें हरिभजनें ॥ ३ ॥ निळा म्हणे सुमंगळ । ऐश्वर्य कल्लोळ प्रेमाचे ॥ ४ ॥

५१५ आवडोनी रूप मनीं । धरिलें वदनीं हरिनाम ॥ १ ॥ त्याचें सांग झालें सफळ । आलियाचें फळ नरदेहा ॥ २ ॥ रूचला संत-समागम । आपुलिया धर्म कुळाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे भगवत्कथा । गातां ऐकतां निजमोक्ष ॥ ४ ॥

५१६ भवरोगें जे पिडले लोक । तिहीं आवश्यक सेवावें ॥ १ ॥ महामात्रा हरिकीर्तन । उरलें रसायन निज निगुतीं ॥ २ ॥ मागें बहुतां गुणासी आलें । आरोग्याचि ठेविलें करूनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगतां फार । होईल विस्तार नामें त्यांचीं ॥ ४ ॥

५१७ आतां अवघे हरिचे जन । करा हो चिंतन नामाचें ॥ १ ॥ देव नुपेक्षील सर्वथा । करा कथा कीर्तनें ॥ २ ॥ टाळ मृदंग लावा भेरी । नाचा गजरीं हरिनामें ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठवासी । येती भेटीसी तुमचीये ॥ ४ ॥

५१८ देखोनियां संतमेळा । कीर्तनसोहळा धांव घाली ॥ १ ॥ ऐकावया आपुली नामें । गुणसंभ्रमें नित्य नवे ॥ २ ॥ वैसोनियां प्रेम वांटी । नाचे परवडी मग सवें ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या सुखें । वांटी हारिखें भुक्ति मुक्ति ॥ ४ ॥

५१९ जो जो काळ कीर्तनीं जाय । तो तो होय सार्थक ॥ १ ॥ घटिका पळही नवचे वांयां । चुकवी अपायापासुनी ॥ २ ॥ न लगे जन्मांतरा येणें । पुढती मरणें मागुतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा निका । उपाय नेटका सकळांसी ॥ ४ ॥

५२० सोहळा तो देखोनियां । लागती पायां मोक्ष मुक्ति ॥ १ ॥ जये रंगीं नाचे हरी । कीर्तन गजरीं सत्संगें ॥ २ ॥ तेथें कोण पाड येरा । साधन संभारा तर्कवादा ॥ ३ ॥ निळा म्हणे योगयाग । टाकती मुग आरोगुनीं ॥ ४ ॥

५२१ सुखें भिक्षा मागोन खावें । हरीचें करावें किर्तन ॥ १ ॥ कलियुगीं साधन सार । भवसिंधू पार पाववितें ॥ २ ॥ नेघोनियां गुणदोष । करावे घोष हरिनामाचे ॥ ३ ॥ निळा म्हणे सुगम सिद्धी । तुटती उपाधी सकळही ॥ ४ ॥

५२२ सांगों जातां न कळे वाचा । महिमा कथेचा अपार ॥ १ ॥ श्रवणें पठणें हरिची कीर्ती । नाना याति उद्धरल्या ॥ २ ॥ चतुष्पदें श्वानशुकरें । श्रवणद्वारें मुक्ति त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे कीटकपक्षां । कीर्तनें वृक्षां हरिप्राप्ती ॥ ४ ॥

५२३ श्रीहरिच्या संकीर्तनें । तुटलीं बंधनें बहुतांचीं ॥ १ ॥ होऊनियां उपरती । राजा परीक्षिती उद्धरला ॥ २ ॥ कीर्तनें नारद मुक्त शुक । आणि सनकादिक प्रल्हाद ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीची कथा । एकात्मता देवभक्तां ॥ ४ ॥

५२४ हरीची कथा अमृतरस । गोड ग्रास नामावळी ॥ १ ॥ तेणें करूं सर्वदा तृप्ती । क्षुधे निवृत्ती तृषेची ॥ २ ॥ अजर अमर होते काया । अविद्या माया निरसोनि ॥ ३ ॥ निळा म्हणे कीर्तनीं सिद्धी । लाभे समाधी हरिभक्तां ॥ ४ ॥

५२५ नारद वैष्णवांचा शिरोमणी । नाचे कीर्तनीं सर्वदा ॥ १ ॥ देवोचि त्याची पूजा करी । आणि नमस्कारी भेटतां ॥ २ ॥ दैत्यां घरीं बहुमान त्याचा । ऐसा कीर्तनाचा वडिवार ॥ ३ ॥ निळा म्हणे तिहीं लोकांत । कीर्तनें विख्यात हरिभक्त ॥ ४ ॥

५२६ कीर्तनरंगें रंगले जे जे । ते ते सहजें हरिप्रिय ॥ १ ॥ येर मुमुक्षु जे जे होती । कीर्तनें पावती ते लाभा ॥ २ ॥ महा अनुष्ठान

हरिची कथा । नित्य जोडतां सुखप्राप्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे कैवल्य-पद । पावती अभेद हरिकीर्ति ॥ ४ ॥

५२७ कीर्तनाची आवडी मोठी । धांवे पाठी वैष्णवा ॥ १ ॥ जेथें होती नामघोष । नाचे उदास ते ठायां ॥ २ ॥ ऐकोनियां आपुली कीर्ति । सुखें जगपती सुखावे ॥ ३ ॥ निळा म्हणे टाळिया छंदें । डुले आनंदें सुप्रेमें ॥ ४ ॥

५२८ कीर्तनें धुवट केलें लोकां । दोष कळंकापासुनी ॥ १ ॥ टाळिया हरिनामाच्या घोषें । पळती त्रासें कलिमल ॥ २ ॥ स्वानुभवें वेधल्या वृत्ती । श्रोतेहि होती चतुर्भुज ॥ ३ ॥ निळा म्हणे कीर्तनसुखें । हरिलीं दुःखें बहुतांचीं ॥ ४ ॥

५२९ कोणाचीहि न धरुनी आशा । भजावें जगदीशा कीर्तनें ॥ १ ॥ मग तो कृपेचा सागर । उतरील पार भवसिंधू ॥ २ ॥ तोडुनियां ममता जाळ । करील कृपाळ वरी कृपा ॥ ३ ॥ निळा म्हणे आवडी त्यासी । कीर्तनापाशीं तिष्ठतु ॥ ४ ॥

५३० जेणें कीर्तनीं धरिली निष्ठा । झाला वरिष्ठां वरिष्ठ तो ॥ १ ॥ पहा प्रल्हाद दैत्यवंशीं । झाला देवासी परमपूज्य ॥ २ ॥ नामा शिंपी विष्णुदास । यवन कबिरास बहुमान ॥ ३ ॥ निळा म्हणे कीर्तनरंगीं । रंगले जगीं धन्य झाले ॥ ४ ॥

५३१ धन्य रूप झाला काळ ॥ करितां कथा गदारोळ ॥ १ ॥ आजि पोखल्या आयणी । प्रेम सुखाचिया जेवणी ॥ २ ॥ होऊनी ठेला दिव्य रूप । पुण्य निरसोनियां पाप ॥ ३ ॥ निळा म्हणे निमग्नता । झाली मन बुद्धि चित्ता ॥ ४ ॥

५३२ पाहोनियां हरिकीर्तन । होती प्रसन्न देव तुम्हां ॥ १ ॥ सन-कादिक येती भेटी । कथा गोमटी ऐकावया ॥ २ ॥ संतमहंत येउनी पुढें । बैसती गाढे कीर्तनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंग । रंगीं रंग मेळवील ॥ ४ ॥

५३३ कथाश्रवणें स्वरूप सिद्धी । लागे समाधि सात्विका ॥ १॥ ऐसा लाभ जोडे जोडी । बैसतां आवडी हरिकथे ॥ २ ॥ कथा श्रवणें परिहार दोषां । होताति पाशमुक्त पापी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरिकथा श्रवण । करी बोळवण जन्म मृत्या ॥ ४ ॥

५३४ कथा श्रवणें विरक्ति जोडे । निजशांती वाढे उल्हासें ॥ १ ॥ कथा श्रवणें परमानंद । प्रगटे स्वानंद निजहृदयीं ॥ २ ॥ कथा श्रवणें उपाधी तुटे । भवाब्धी आटे निःशेष ॥ ३ ॥ निळा म्हणे कथाश्रवणें । हरती मरणें जन्म जरा ॥ ४ ॥

५३५ लोंढा आला सात्विकाचा । पूर अद्भुत या प्रेमाचा ॥ १ ॥ तेणें लागती वोसाणें । स्वानंदाचि नामस्मरणें ॥ २ ॥ मनोमीन तळपताती । गोड अर्थांतें कवाळिती ॥ ३ ॥ निळा म्हणे उभय तीरें । श्रोते वक्ते निर्मळ नीरें ॥ ४ ॥

५३६ नित्यानंदघोषें करितां हरीचें कीर्तन । श्रोते आणि वक्ते होती परम पावन ॥ १ ॥ आणिकही लोक तरती त्यांच्या सहवासें । भाळ्या भोळ्या भाविकांसी लाभ अनायासें ॥ २ ॥ जेथें नित्य नामघोष टाळिया गजर । तेथें रंगीं नृत्य करी रुक्मिणीवर ॥ ३ ॥ निळ म्हणे तोचि प्रसन्न होउनी दासासी । भुक्ति आणि मुक्ति ठेवी त्यांच्या सहवासीं ॥ ४ ॥

५३७ शिंपी सोनार चांभार । ब्राह्मणादि नारी नर ॥ १ ॥ हरीच्या कीर्तनें हरीचे भक्त । होऊनि ठेले जीवन्मुक्त ॥ २ ॥ सुतार कुंभार यवन । अंत्यजादी हीन जन ॥ ३ ॥ निळा म्हणे क्षत्रीय शूद्र । वैश्यहि पावले मुक्तिपद ॥ ४ ॥

५३८ वैराग्याचा मेरू तो गोराकुंभार । तोडियेले कर आणे-साठीं ॥ १ ॥ महाद्वारीं कथा श्रवण करितां । टाळी वाजावितां निघती नवे ॥ २ ॥ तुम्ही देवा कृपादृष्टी अवलोकिला । हृदयीं तो धरिला

प्रीतिकरीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तुम्हां दासाचा अभिमान। अवतार म्हणवून धरणें लागे ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

५३९ बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥ प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठलरखुमाई ॥ २ ॥ नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञान दीप लावूं जगीं ॥ ३ ॥ परेहुनि परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥ ४ ॥ सर्व सत्ता आली हातां । नामयाचा खेचरदाता ॥ ५ ॥

५४० सर्वांग साजिरीं आहे तीं इंद्रियें । तंव सावध होय हरीकथे ॥ १ ॥ कीर्तन नर्तन वाचे जनार्दन । न पवसी पतन येरझारीं ॥ २ ॥ पूर्ण मनोरथ घडती एका नामें । दाटेल सप्रेमें जीवनहेतु ॥ ३ ॥ नामा म्हणे विलास न करीं तूं आणिक । सर्वां सर्वां येक नाम असे ॥ ४ ॥

५४१ ऐकतां कीर्तन होती जीवनमुक्त । दाविसी अनंत नाममात्रें ॥ १ ॥ मृत्युलोकीं जो जन्म इच्छी नर । त्याच्या पुण्या पार कोण वाणी ॥ २ ॥ भक्तिसारामृत श्रेष्ठ कलियुगीं । उद्धारिले योगी ब्रह्मादिक ॥ ३ ॥ नामा म्हणे मज नाहीं चिंता भय । हृदयीं तुमचे पाय पुरे आतां ॥ ४ ॥

५४२ कीर्तनाच्या सुखें सुखी होतो देव । कोणतें वैभव वाणी आतां ॥ १ ॥ अंत्यज आणि जातिवंता । मुखीं नाम घेतां उडी घाली ॥ २ ॥ बैसोनि आसनीं आळवितां नाम । उभा सर्वोत्तम तयापुढें ॥ ३ ॥ प्रेमाचिया भरें उभ्यानें गर्जतां । नाचे हा अनंत तयासवें ॥ ४ ॥ नामा म्हणे तया कीर्तनाची गोडी । घालीतसे उडी नेटेंपाटें ॥ ५ ॥

५४३ काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंचनीच योनी हांहि नसे ॥ १ ॥ धरा नाम कंठीं सदा सर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥ २ ॥ कृपाळु कोंवसा सुखाचा सागर । करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥ नामा म्हणे फार सोपें हें साधन । वाचे नाम घेणें इतुकेंचि ॥ ४ ॥

५४४ साधावया स्वरूपसिद्धी । सिद्ध साधक समाधी । बैसोनी

ध्यानस्थ बुद्धी । परी तो हरी न सांपडे ॥ १ ॥ धन्य धन्य वैष्णवसंग । अखंड तेथें पांडुरंग । कीर्तनीं नाचतसे अभंग । अखंड काळ सर्वदा ॥२॥ नाम घेतां धांवे विठ्ठल । नलगे तप नलगे मोल । कष्ट न लगती बहुसाल । हा कृपाळु दीनाचा ॥ ३ ॥ नामा म्हणे भक्तीचें कारण । भक्तिसी तुष्टे नारायण । याचें करितां कीर्तन । आपेंआप तुष्टेल ॥ ४ ॥

५४५ पांडुरंगें प्राप्त होईल सकळ । चरणकमळ ध्यारे मनीं ॥ १ ॥ मनीं मानासिक न करावा कधीं । नाम ध्यारे आधीं केशवाचें ॥ २ ॥ केशवाचें नाम पावन पवित्र । महाभाष्य सूत्र हेंचि सांगे ॥ ३ ॥ नामा म्हणे तुम्ही करावें कीर्तन । पंढरीचें ध्यान चुकों नका ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

५४६ सगुण चरित्रें परम पवित्रें सादर वर्णावीं । निराभिमानें सज्जनवृंदें आधीं वंदावीं ॥ १ ॥ संतसंगें अंतररंगें नाम बोलावें । कीर्तनरंगीं देवासन्निध सुखें डोलावें ॥ २ ॥ भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या । मनोभावें वैराग्याच्या युक्ति विवराव्या ॥ ३॥ जेणें सत्वर मूर्ति ठसावें अंतरिं श्रीहरिची । ऐशी कीर्तन मर्यादा या संतांच्या घरची ॥ ४ ॥ श्रवणकीर्तनें अद्वैतभजनें वाजवी करटाळी । एकाजनार्दनीं मुक्त होय तत्काळीं ॥ ५ ॥

५४७ क्षीरसागर सांडोनि हरी । कीर्तनीं उभा सहपरीवारीं । लक्ष्मी गरुड कामारी । होती तया कीर्तनीं ॥ १ ॥ आलिया विघ्न निवारी आपण । शंखचक्र गदा हातीं घेऊन । सुदर्शन कौस्तुभ मंडित जाण । उभा असे चतुर्भुज ॥ २ ॥ गरुड तिष्ठे जोडिल्या करीं । लक्ष्मी तेथें कामारी । ऋद्धि सिद्धी सहपरिवारीं । तिष्ठताती स्वानंदें ॥ ३ ॥ किर्तन गजरें वाहे टाळी । महादोषांची होय होळी । एकाजनार्दनीं गदारोळी । नामोच्चार आनंदें ॥ ४ ॥

५४८ श्रीशंभुचें आराध्यदैवत । क्षणीं वैकुंठीं क्षणीं क्षीरसागरांत । जयालागीं योगी तप तपती समस्त । तो सांपडला आम्हां कीर्तन

रंगांत ॥ १ ॥ धन्य धन्य कीर्तन भूमंडळीं । महा दोषां होतसे होळी ॥ पूर्वज उद्धरती सकळी । वाहतां टाळी कीर्तनी ॥ २ ॥ पार्वतीसी गुज सांगे आपण । शंकर राजा बोले वचन । माझें आराध्य दैवत जाण । कीर्तन रंगणीं उभें आहे ॥ ३ ॥ मी त्रिशूळ पाशुपत घेऊनी करीं । कीर्तनाभोंवती घिरटी करी । विघ्ना हाणोनि लाथा निवारी । रक्षीं स्वयें हरिदासां ॥ ४ ॥ त्याचे चरणींचें रज वंदी आपण । हें पार्वतीसी सांगे गुह्य ज्ञान । एकाजनार्दनी शरण । कीर्तन रंगीं नाचतसे ॥ ५ ॥

५४९ कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहूनी घाली धांवा ॥ १ ॥ नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे ॥ २ ॥ भाळ्या भोळ्यासाठीं । धांवे त्यांच्या पाठोपाठीं ॥ ३ ॥ आपुलें सुख तया द्यावें । दुःख आपण भोगावें ॥ ४ ॥ दीनानाथ पतीत पावना । एकाजनार्दनीं वचना ॥ ५ ॥

५५० कीर्तनीं आवडी जया नरा देखा । चुकतील खेपा जन्म कोटी ॥ १ ॥ कीर्तनीं समाधी कीर्तनीं समाधी । तुटे आधीव्याधी कीर्तनेंची ॥ २ ॥ कीर्तनें बोध कीर्तनें सिद्धी । एका जनार्दनीं गोविंदी कीर्तनीं ऐक्य ॥ ३ ॥

५५१ देवासी तों मुख्य कीर्तनाची गोडी । म्हणोनियां उडी घाली स्वयें ॥ १ ॥ नावडे तया आणीक संकल्प । कीर्तनीं विकल्प करितां क्षोभे ॥ २ ॥ साबडे भाळे भोळे नाचताती रंगीं । प्रेम तें अंगीं देवाचिये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धांवे लवलाहे । न तो कांहीं पाहे आपणातें ॥ ४ ॥

५५२ धन्य भाग्याचे जन इहलोकीं । कीर्तनें जाले सुखी कृतकृत्य ॥ १ ॥ पातकी घातकी यासी सोपा पंथ । कीर्तनें सरते कलीमाजी ॥ २ ॥ योगयाग व्रत तप कल्पकोडी । कीर्तन श्रवण गोडी तेथें नाहीं ॥ ३ ॥ वेदशास्त्र पुराण श्रुतींचें अनुमोदन । करा रे कीर्तन कलीमाजी ॥ ४ ॥

एकाजनार्दनीं आल्हादें कीर्तन। करितां श्रोते वक्ते जाण पावन होती ॥ ५ ॥

५५३ तरले तरती भरंवसा। कीर्तन महिमा हा ऐसा ॥ १ ॥ म्हणोनियां हरीचे दास। कीर्तन करिती सावकाश ॥ २ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन। आनंदें होती ते पावन ॥ ३ ॥

५५४ धन्य धन्य तें शरीर। जेथें कथा निरंतर ॥ १ ॥ गुण गाती भगवंताचे। तेचि जाणावे देवाचे ॥ २ ॥ स्वयें बोलिले जगज्जीवन। थोर कलियुगीं कीर्तन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भले। हरि भक्तिनें उद्धरिले ॥ ४ ॥

५५५ कीर्तनाचें थोर सुख। यदुनायक राहे उभा ॥ १ ॥ भाळे भोळे घेती नाम। करिती आराम कीर्तन ॥ २ ॥ नाना साधनांचे वोढीं। न लगे सांकडीं सोसाव्या ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सोपें बहु। कीर्तनीं पाहूं देवातें ॥ ४ ॥

५५६ मधुपर्कादिक नावडे पूजन। आवडे कीर्तन भाविकांचें ॥१॥ शंखचक्रादिक नावडती मनीं। वोडवितसे पाणी भाजीपाना ॥ २ ॥ लक्ष्मीसारखी नावडती जीवा। आवडे या देवा तुळशी बुक्का ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनीं नाचे। आणिक सुख त्याचें नये मना ॥ ४ ॥

५५७ पुरुष अथवा नारी। नाचतो कीर्तनीं गजरीं ॥ १ ॥ तया कोण्ही जे हांसती। त्यांचे पूर्वज नरका जाती ॥ २ ॥ आपुली आपण। कीर्तनीं सोडवण ॥ ३ ॥ देहीं असोनी विदेहता। कीर्तनीं होय पैं तत्वतां ॥ ४ ॥ ऐसा कीर्तन महिमा। एकाजनार्दनीं उपमा ॥ ५ ॥

५५८ देवासी दुजें नावडे सर्वथा। करितां हरिकथा समाधान ॥ १ ॥ येऊनियां नाचे कीर्तनीं सर्वदा। निवारी आपदा सर्व त्याची ॥ २ ॥ भाविकांसाठीं मोठा लोभापर। नाचतो निर्भर कीर्तनांत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आवडे कीर्तन। म्हणोनी वैकुंठसदन नावडेची ॥ ४ ॥

५५९ देवासी प्रिय होय कीर्तन । नाचे येऊन आनंदें ॥ १ ॥ न विचारी यातीकुळ । असोत अमंगळ भलतैसे ॥ २ ॥ करती कीर्तन अनन्यभावें । ते पढीये जीवेंभावें ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । कुळें पावन होती कीर्तनीं ॥ ४ ॥

५६० हेंचि कलीमाजीं साधन । आवडी कीर्तन हरीचें ॥ १ ॥ न घडे योग याग तप । होय अनुताप कीर्तनीं ॥ २ ॥ भावभक्ति लागे हातीं । प्रेम धारिती कीर्तनीं ॥ ३ ॥ आवडी धरा हरिकीर्तनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

५६१ तुमचें चरित्र श्रवण । आवडी करूं तें कीर्तन ॥ १ ॥ संसार पुसोनियां वाव । निजपद देशी ठाव ॥ २ ॥ स्वभावें कीर्तन करितां । एवढा लाभ येत हातां ॥ ३ ॥ एका जनार्दनीं कीर्तन । होती पातकी पावन ॥ ४ ॥

५६२ आवडी करितां हरिकीर्तन । हृदयीं प्रगटे जनार्दन ॥ १ ॥ थोर कीर्तनाचें सुख । स्वयें तिष्ठे आपण देख ॥ २ ॥ घात आलिया निवारी । चक्रगदा घेउनी करीं ॥ ३ ॥ कीर्तनीं होऊनि सादर । एकाजनार्दनीं तत्पर ॥ ४ ॥

५६३ कीर्तनें सिद्धि कीर्तनें सिद्धि । कीर्तनें निरसे आधिव्याधी ॥ १ ॥ कीर्तनें काया कीर्तनें माया । कीर्तनें सर्व एके ठायां ॥ २ ॥ द्वंद्वद्वैत भेद नुरेचि ठाव । कीर्तनीं तिष्ठे उभाचि देव ॥ ३ ॥ निद्रे-माजी वासणे देवो । म्हणे मज ठावो कीर्तनी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनासाठीं । देव धांवे भक्तापाठीं ॥ ५ ॥

५६४ एक कीर्तन करितां पंढरीसी । सुकृताच्या राशी ब्रह्मा नेणें ॥ १ ॥ संतसमागम टाळघोळ नाद । ऐकतां गोविंद सुख पावे ॥ २ ॥ जनार्दनाचा एका करी विनवणी । मस्तक चरणीं ठेवितसे ॥ ३ ॥

५६५ जुनाट कीर्तन महिमा । तया काय देऊं उपमा ॥ १ ॥ धन्य धन्य हरिचे दास । करिती आस कीर्तनीं ॥ २ ॥ मागें तरलें पुढें

तरती । पहा प्रचीति पुराणीं ॥ ३ ॥ म्हणोनि एका काकुलती । कीर्तन करा दिनराती ॥ ४ ॥

९६६ कीर्तनें तोषे अधोक्षज । राखी लाज भक्तांची ॥ १ ॥ धांवे द्रौपदीचे पानासाठीं । भीड मोठी कीर्तनाची ॥ २ ॥ दहा गर्भवास सोसले । उणे नाहीं आलें भक्तांचें ॥ ३ ॥ एका विनवी जनार्दनीं । कीर्तनीं प्राणी धन्य होती ॥ ४ ॥

९६७ महा पापराशी तरले कीर्तनीं । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य जाले ॥ १ ॥ वाल्हा अजामेळ तारिली गणिका । त्रैलोक्यीं देखा सरते जाले ॥ २ ॥ कीर्तनें दोष पळती रानोरान । यापरतें दुजें आन नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन सार । तेणें पैलपार उतरलों ॥ ४ ॥

९६८ कीर्तनाची आवडी मोठी । प्रेमें देव घाली मिठी ॥ १ ॥ कीर्तन प्रिय पैं गोविंदा । आदरें पूजितो नारदा ॥ २ ॥ कीर्तन करितां अभेदु । आदरें रक्षिला प्रल्हादु ॥ ३ ॥ गजेंद्र करी नामस्मरण । धांवण्या धांवे नारायण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कळवळा । भक्तालागीं देव भोळा ॥ ५ ॥

९६९ अंतर शुद्धीचें कारण । वाचे करा हरीकीर्तन ॥ १ ॥ कीर्तनीं देवा आवडी कैशी । धेनु धांवे वत्सा जैशी ॥ २ ॥ कीर्तनीं तारिला वाल्हा कोळी । अजामेळ दोषी वळी ॥ ३ ॥ कीर्तनीं तारिली गणिका । नामस्मरणें मोक्ष देखा ॥ ४ ॥ ऐसी कीर्तनाची गोडी । एकाजनार्दनीं घाली उडी ॥ ५ ॥

९७० कीर्तनीं प्रल्हाद तरला । बिभिषण मुक्त जाला ॥ १ ॥ ऐसा कीर्तन महिमा । गणिका नेली निजधामा ॥ २ ॥ तारिले वानर असुर । कीर्तनीं पावन चराचर ॥ ३ ॥ गाई गोपाळ संवगडे । कीर्तनीं तरलें वाडेंकोडें ॥ ४ ॥ अजामेळ उद्धरिला । कीर्तनीं आल्हाद मला ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन । कलीं कलमष नाशी क्षण ॥ ६ ॥

९७१ कीर्तन श्रेष्ठ कलियुगीं सेवा । तरले पातकी ते देवा ॥ १ ॥

वाल्हा तारिला कीर्तनीं । पावन जाला त्रिभुवनीं ॥ २ ॥ गणिका कीर्तनें तरली । मोक्षधामा ती नेली ॥ ३ ॥ अजामेळ चोखा महार । कीर्तनीं तरले अपार ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन । तिन्ही लोक जाले पावन ॥ ५ ॥

५७२ वेदाचिया मतें विसरूनि कीर्तन । करती जे पठण शीण त्यांसी ॥ १ ॥ वेदाचा अर्थ न कळेची पाठका । कीर्तनीं नेटका भाव सोपा ॥ २ ॥ श्रुतीचेनी मतें पाहे तो उच्चार । परी सारासार विचार कीर्तनीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पुराणाच्या गोष्टी । कीर्तन वाक्पुटीं करा सुखें ॥ ४ ॥

५७३ नसे वैकुंठीं हरी । नाचे कीर्तनीं परोपरी । भक्तांबरोबरी । पाठीं धांवे तयाच्या ॥ १ ॥ म्हणोनी करावें कीर्तन । तेणें तुष्टे नारायण । मनोरथ करी पूर्ण । इच्छिले ते सर्वदा ॥ २ ॥ आणा अनुभव मनीं । करा कीर्तन अनुदिनीं । एकाजनार्दनीं । उभा असे कीर्तनीं ॥ ३ ॥

५७४ नेणें वेदशास्त्र पुराण पठन । तेणें नाम कीर्तन करावें ॥ १ ॥ कलीमाजी सोपा मार्ग । तरावया जग उत्तम हें ॥ २ ॥ नोहे यज्ञ याग योग व्रत । करावें व्रत एकादशी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सार । वाचे उच्चार हरिनाम ॥ ४ ॥

५७५ नरदेह उत्तम चांग । धरा लाग कीर्तनीं ॥ १ ॥ वांयां जाऊं नेदा घडी । करा जोडी कीर्तन ॥ २ ॥ क्षणभंगुर हा देहो । करा लाहो कीर्तनीं ॥ ३ ॥ संसार अवघा नासे । खरें दिसे कीर्तन ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनीं एका । उपाय निका कीर्तन ॥ ५ ॥

५७६ सप्रेम नाचोनी वाजवा टाळी । गर्जा हरिकथा नामावळी ॥ १ ॥ ऐशी कथेची आवडी । दोष गेले देशोधडी ॥ २ ॥ सेवितां कथामृतसार । दीन वदनें दिसे संसार ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेम । स्वयें सांगे पुरुषोत्तम ॥ ४ ॥

५७७ नसे वैकुंठीं अणुमात्र । नाचतां पवित्र कीर्तनीं ॥ १ ॥ त्याचा छंद माझे मनीं । अनुदिनीं कीर्तन ॥ २ ॥ नेणं कांहीं दुजे

आतां । कीर्तनापरता छंद नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वेध । कीर्तनछंद गोड देखा ॥ ४ ॥

५७८ करूनी हरिकीर्तन । तेथें सेविती जे अन्न ॥ १ ॥ ऐसे अभागी खळ । परम चांडाळ कलीयुगीं ॥ २ ॥ हरिकथा माउली । विकिताती अर्थभुली ॥ ३ ॥ पंच महापातक । तयां घडे दोष देख ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं । करा कीर्तन अनुदिनीं ॥ ५ ॥

५७९ करूनी कीर्तन मागती जे द्रव्य । तें जाणावें वैधव्य विधवेचें ॥ १ ॥ सर्व अलंकार शरीर शोभलें । वांयां परी गेलें कुंकूंहीन ॥ २ ॥ मानवानें भावें करावें कीर्तन । आनंदें नर्तन वैष्णवांपुढें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कामनीक कीर्तन । करितां पतन जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

५८० परंपरा कीर्तन चाली । मागून आली अनिवार ॥ १ ॥ उद्धवा सांगे जनार्दन । कीर्तन पावन कलीमाजीं ॥ २ ॥ अर्जुना तोचि उपदेश । कीर्तन उद्देश सर्वथा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तत्पर । कीर्तन करावें निरंतर ॥ ४ ॥

५८१ शाम चतुर्भुज पीतांबरधारी । शंखचक्र मिरवे करीं ॥ १ ॥ आला पुंडलीकाकारणें । आवडी कीर्तनें धरूनी ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस जालीं । न बैसे उभा समपाउलीं ॥ ३ ॥ कीर्तनी धरूनियां हेत । उभा राहिला तिष्ठत ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं । अनुदिनीं करा कीर्तन ॥ ५ ॥

५८२ कीर्तनाची देवा आवडी । म्हणोनी धांवे तो तांतडी ॥ १ ॥ सुख कीर्तनीं अद्भुत आहे । शंकरराज जाणताहे ॥ २ ॥ गोडी सेविती संतजन । येरां न कळे महिमान ॥ ३ ॥ ऐसा कीर्तनसोहळा । एकाजनार्दनीं पहा डोळां ॥ ४ ॥

५८३ हरीकीर्तन नामोच्चार । जे नर करिती वारंवार । तया नाहीं संसार । ब्रह्मादि देव वंदिती ॥ १ ॥ कीर्तनमहिमा नारदु । जाणतसे परमानंदु । जालासे सर्वां वंद्यु । देवां असुर मानवां ॥ २ ॥

कीर्तनमहिमा परीक्षिती। जाणतसे परम प्रीती । अंतीं सायुज्यता मुक्ति । पावती झाली ॥ ३ ॥ कीर्तनमहिमा जाणे शुक । जाणती ते व्यासादिक । वाल्मिकादि सर्व सुख । कीर्तनें सरते ॥ ४ ॥ कीर्तन-महिमा जाणे प्रल्हादु । तोडियेला मायाकंदु । कोरडे काष्टीं गोविंदु । प्रगटला ॥ ५ ॥ कीर्तनमाहिमा जाणे बळी । याचक झाला वनमाळी । एकाजनार्दनीं कली । कीर्तनें न पीडी ॥ ६ ॥

५८४ आणिक तें आम्हां न दिसे प्रमाण। कीर्तनावांचून आनु नेणों ॥ १ ॥ रामकृष्ण हरी विठ्ठल उच्चार । करूं हा गजर वाहूं टाळी ॥ २ ॥ आनंदें नामावळी गाऊं पैं कीर्तनीं । श्रुती टाळघोळ लाउनी गज-रेंसी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हाचि आम्हां छंद। वाउगा तो धंदा न करूं कांहीं ॥ ४ ॥

५८५ नारदें केलासे प्रश्न । सांगतसे जगजीवन । कलीमाजी प्रमाण । कीर्तन करावें ॥ १ ॥ महापापीया उद्धार । पावन करती हरिहर । ब्रह्मादि सामोर । लोटांगण घालिती ॥ २ ॥ श्रुतीस्मृति वाक्यार्थ । कीर्तन तोचि परमार्थ । शास्त्रांचा मथितार्थ । कीर्तन पसारा ॥ ३ ॥ एका शरण जनार्दन । कीर्तनें तरती विश्वजन । हें प्रभूचें वचन । धन्य धन्य मानावें ॥ ४ ॥

५८६ नावडे वैकुंठ शेषशयन । वैष्णवसदन आवडलें ॥ १ ॥ रमा म्हणे कैसी नवलपरी । देव भुलले वैष्णवा घरीं ॥ २ ॥ जो नातुडे ध्यानीं समाधीसाधनीं । तो स्वानंदें कीर्तनीं नाचतसे ॥ ३ ॥ जो यज्ञावदानीं कांहीं नेघे माये । तो द्वादशी क्षीराब्धी उभ्या उभ्या खाये ॥ ४ ॥ लक्ष्मी म्हणे देव आंतुडे कवणें बुद्धी । वैष्णवांची सेवा करावी त्रिशुद्धी ॥ ५ ॥ वैष्णवा घरीं लक्ष्मी कामारी । एकाजनार्दनीं देव दास्यत्व करी ॥ ६ ॥

५८७ मागणें तें आम्ही मागूं देवा । देईं हेवा कीर्तनीं ॥ १ ॥ दुजा हेत नाहीं मनीं । कीर्तनावांचुनी तुमचीया ॥ २ ॥ प्रेमें हरिदास

नाचत । कीर्तन होत गजरीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तन । पावन होती चराचर जाण ॥ ४ ॥

५८८ धन्य धन्य कीर्तन जगीं । संत तेची सभागी ॥ १ ॥ गाती कीर्तनीं उल्हास । सदा प्रेमें हरिदास ॥ २ ॥ नाहीं आणिक चिंतन । करती आदरें कीर्तन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । जालों कीर्तनीं पावन ॥ ४ ॥

५८९ या हो या चला जाऊं कीर्तना । आनंद तेणें मना नाचती वैष्णव ॥ १ ॥ रामकृष्ण हरी वासुदेवा । गाताती प्रेमभावा आवडी आदरें ॥ २ ॥ सुख तेथें शांति विरक्ति कोण पुसे । सबाह्य अभ्यंतरीं अवघा वासुदेव वसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वासुदेवीं मन । जनवन तेथें अवघा जनार्दन ॥ ४ ॥

५९० कीर्तन ते पूजा कीर्तन ते भक्ति । कीर्तनें होय मुक्ति सर्व जीवां ॥ १ ॥ पातकी चांडाळ असोत भलते । कीर्तनीं सरते कलि-युगीं ॥ २ ॥ कीर्तन श्रवण मनन पठण । कीर्तनें पावन तिन्ही लोक ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कीर्तनीं आवडी । वाळीतसे उडी वैकुंठाहुनी ॥ ४ ॥

५९१ आजी परमानंदु मानसीं । संत भेटतां सुखराशी । कीर्तनें तारिले सर्वांसी । विठ्ठलनाम स्मरणें ॥ १ ॥ धन्य धन्य विठ्ठल मंत्र । सोपा तीन अक्षरी पवित्र । कळिकाळ उघडोनि नेत्र । पाहूं न शके जयासी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शुद्ध भक्ती । कीर्तनें प्राप्त सर्व स्थिती । जयजय रामकृष्ण म्हणती । ते तरती कलीमाजी ॥ ३ ॥

५९२ नित्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला रंग । श्रोता आणि वक्ता स्वयें झाला श्रीरंग ॥ १ ॥ आल्हादें वैष्णव करती नामाचा घोष । हरिनाम गर्जतां गगनीं न माये हरुष ॥ २ ॥ पदोपदीं कीर्तनीं निवता-हे जनमन । आवडी भुकेली तिनें गिळिलें गगन ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गातां हरीचें नाम । निमालीं इंद्रियें विषय विसरलीं काम ॥ ४ ॥

५९३ भजन भावातें उपजवी । देव भक्ताते निपजवी ॥ १ ॥ ऐसा भजनेंचि देव केला । भक्त वडिल देव धाकुला ॥ २ ॥ भक्ताकारणें हा संकल्प । भक्त देवाचाही बाप ॥ ३ ॥ देव भक्ताचीये पोटीं। जाला म्हणोनी आवड मोठी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नवलावो । भक्तचि कैसा जाला देवो ॥ ५ ॥

५९४ जीऊ परमात्मा दोन्ही । ऐसे जाणते तेचि ज्ञानी ॥ १ ॥ ऐसें असोनी संपन्न । सदा करिती माझें भजन ॥ २ ॥ माझ्या भजना हातीं । उसंतु नाहीं दिवसरातीं ॥ ३ ॥ जन नोहे जनार्दन । एका-जनार्दनीं लोटांगण ॥ ४ ॥

५९५ नित्य हरीकथा वैष्णव सांगात । तोचि परमार्थ शुद्ध त्याचा ॥ १ ॥ नाहीं कधीं द्वैत सदा तें अद्वैत । अभेदरहित सर्वकाळ ॥ २ ॥ परमार्थ साधनी झिजवितसे अंग । वाउगा उद्योग न करी कांहीं ॥३॥ एकाजनार्दनीं ऐसा ज्याचा हेत । त्याचे मनोरथ पूर्ण होती ॥४॥

५९६ नाभीकमळीं चतुरानन । न कळे तया महिमान ॥ तो सावडें कीर्तन । तेथें नाचे सर्वदा ॥ १ ॥ नातुडे जो सदा ध्यानीं । योगयाग यज्ञहवनीं ॥ अष्टांगयोग करितां साधनीं । न लाभेचि सर्वथा ॥ २ ॥ भागले वेद गीती गातां । श्रमलीं शास्त्रें वेवादतां ॥ पुराणें तीं सर्वथा । तया न कळे महिमान ॥ ३ ॥ तो उभा भीमातीरीं । भक्त-करुणाकर श्रीहरी ॥ एकाजनार्दनीं विनंती करी । वास देईं हृदयीं ॥ ४ ॥

५९७ कर्मी गुंतले उत्तमोत्तम । भजनीं उद्धरिले अधमाधम ॥ १ ॥ भजनमहिमा निःसीम । अधमा पदवी हे उत्तम ॥ २ ॥ एकाजनार्दनीं भजन । पावन होती अधम जन ॥ ३ ॥

५९८ आमुच्या स्वहिता आम्हीं जागूं । वाउग्या न लागूं मार्गासी ॥ १ ॥ करूं पूजन संतसेवा । हेंचि देवा आवडतें ॥ २ ॥ तुळशी-माळा घालूं गळा । मस्तकीं टिळा चंदन ॥ ३ ॥ मुद्रा अलंकार

भूषण । करूं कीर्तन दिननिशीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं न सेवूं आन । वाहूं आण देवाची ॥ ५ ॥

५९९ येती कीर्तना आल्हादें । गाती नाचती परमानंदें । सुखाची तीं दोंदें । आनंदें तयासी ॥ १ ॥ धन्य धन्य कीर्तन । धन्य धन्य संतजन । जाले कीर्तनीं पावन । परमानंद गजरीं ॥ २ ॥ हरी कृष्ण गोविंद । हाचि तया नित्य छंद । तेणें जाय भेदाभेद । कीर्तन गजरीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सार । कीर्तनीं केलासे निर्धार । आणिक नाहीं दुजा विचार । कीर्तनावांचोनी ॥ ४ ॥

## श्रीनिवृत्तीनाथमहाराज

६०० पाहतां साधन विठ्ठलकीर्तन । भक्तसंजीवन आत्माराम ॥ १ ॥ विठ्ठल सधर भिवरा तें नीर । नाम निरंतर केशवाचें ॥ २ ॥ शिव सुरवर चिंतिती सुखार । कीर्तन विचार पंढरीसी ॥ ३ ॥ निवृत्ति कीर्तन दिनानिशीं ध्यान । मनाचें उन्मन इये रूपीं ॥ ४ ॥

६०१ भवजळ काया पंचतत्वमाया । भजन उपाया पंढरीरावो ॥ १ ॥ तारक पंढरी प्रसिद्ध भीमातीरीं । ब्रीदें चराचरीं बोले वेदु ॥ २ ॥ माया मोहजाळ ममता निखळ । सेवितां सकळ होय हरी ॥ ३ ॥ निवृत्तिचें फळ सकळ गोपाळ । तोडी मायाजाळ संकीर्तनें ॥ ४ ॥

६०२ नित्य हरिकथा नित्य नामावळी । वैष्णवाचे कुळीं धन्य जन्म ॥ १ ॥ म्हणोनि पंढरीं उपजावें संसारीं । प्रत्यक्ष श्रीहरी तीरीं उभा ॥ २ ॥ नित्यता दिवाळी नाहीं तेथें द्वैत । नित्यता अच्युत तिष्ठतसे ॥ ३ ॥ निवृत्ति सधर विष्णुमय सार । विठ्ठल आचार पंढरीये ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

६०३ प्रेमसुखें कीर्तन । आनंदें गाऊं हरीचे गुण ॥ १ ॥ धरिला वैष्णवांचा संग । नाहीं लाग कळीकाळा ॥ २ ॥ स्वल्प मंत्र हाचि

जाण । रामकृष्ण नारायण ॥ ३ ॥ वाचे न उच्चारीं कांहीं । याविण आणिक नाहीं ॥ ४ ॥ सेना म्हणे रंगलें ठायीं । माझें चित्त तुझे पायीं ॥ ५ ॥

६०४ सांडोनि कीर्तन । न करी आणिक साधन ॥ १ ॥ पुरवा आवडीचें आर्त । तुह्मां आलों शरणांगत ॥ २ ॥ मुखीं नाम वाहीन टाळी । नाचेन निर्लज्ज राउळीं ॥ ३ ॥ सेना म्हणे नुपेक्षावें । हेंचि मागें जीवें भावें ॥ ४ ॥

६०५ म्हणवितों विठोबाचा दास । शरण जाईन संतास ॥ १ ॥ सदा सुकाळ प्रेमाचा । नासे मळ दुष्ट बुद्धीचा ॥ २ ॥ ऐकत हरिचें कीर्तन । अभक्ति भक्ति लागे ज्ञान ॥ ३ ॥ उभा राहे कीर्तनांत । हर्षें डोले पंढरीनाथ ॥ ४ ॥ सेना म्हणे हें सुख । नाहीं ब्रह्मयासी देख ॥ ५ ॥

---

# एकविध

## श्रीतुकाराममहाराज

६०६ जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदों जिव्हे ॥ १ ॥ सकळां इंद्रियां हे माझी विनंती । नका होऊं परतीं पांडुरंगा ॥ २ ॥ आणिकांची मात नाइकावी कानीं । आणिक नयनीं न पाहावें ॥ ३ ॥ चित्ता तुवां पायीं रहावें अखंडित । होउनी निश्चित एकविध ॥ ४ ॥ चला हात पाय हेंचि काम करा । माझ्या नमस्कारा विठोबासी ॥ ५ ॥ तुका म्हणे तुम्हां भय काय करी । आमुचा कैवारी नारायण ॥ ६ ॥

६०७ भाग्यें ऐसी जाली जोडी । आतां घडी न विसंबे ॥ १ ॥

विटेवरी समचरण । संती खूण सांगितली ॥ २ ॥ अवघे आतां काम सारूं । हाचि करूं कैवाड ॥ ३ ॥ तुका म्हणे खंडू खेपा । पुढें पापपुण्याच्या ॥ ४ ॥

६०८ आम्हां भाविकांची जाती । एकविध जो श्रीपती । अळंकार युक्ति । सरो तेथें शकोचिना ॥ १ ॥ जाणे माउली त्या खुणा । क्षोभ उपजो नेदी मना । शांतवूनि स्तना । लावी अहो कृपाळे ॥ २ ॥ तुज अवघे होऊं येतें । परि मज वाटो नये चित्तें । उपासनेपरतें । नये कांहीं आवडो ॥ ३ ॥ करूं रूपाची कल्पना । मुखीं नाम नारायणा । तुका म्हणे जना । जळ स्थळ देखतां ॥ ४ ॥

६०९ एकविध आम्ही न धरूं पालट । न संडू हे वाट सांपडली ॥ १ ॥ म्हणवूनि केला पाहिजे सांभाळ । माझें बुद्धी बळ पाय तुझे॥२॥ बहुत बोलतां न कळे प्रकार । अंतरा अंतर साक्ष असे ॥ ३ ॥ तुका म्हणे अगा जीवांच्या जीवना । तूंचि नारायणा साक्षी माझा ॥ ४ ॥

६१० धीर तो कारण एकविधभाव । पतिव्रते नाहो सर्वभावें ॥ १ ॥ चातक हे जळ न पाहाती दृष्टी । वाट पाहे कंठीं प्राण मेघा ॥ २ ॥ सूर्य विकासिनी नेघे चंद्रामृत । वाट पाहे अस्त उदयाची ॥ ३ ॥ धेनु येऊं नेदी जवळी आणिकां । आपुल्या बाळकाविण वत्सा ॥ ४ ॥ तुका म्हणे नेम प्राणासवें साटी । तरीच या गोष्टी विठोबाची ॥ ५ ॥

६११ लौकिका पुरती नव्हे माझी सेवा । अनन्य केशवा दास तुझा ॥ १ ॥ म्हणऊनि करी पायांसवें आळी । आणीक वेगळी नेणें परी ॥ २ ॥ एकविध आम्ही स्वामिसेवेसाठीं । वरी तोचि पोटी एक भाव ॥ ३ ॥ तुका म्हणे करी सांगितलें काम । तुम्हां धर्माधर्म ठावे देवा ॥ ४ ॥

६१२ पतिव्रता नेणें आणिकांची स्तुती । सर्वभावें पति ध्यानीं मनीं ॥ १ ॥ तैसें माझें मन एकविध जालें । नावडे विठ्ठले विण

दुजें ॥ २ ॥ सूर्यविकासिनी नेघे चंद्रकळा । गाय ते कोकिळा वसं-
तेसी ॥ ३ ॥ तुका म्हणे बाळ मातेपुढें नाचे । बोल आणिकांचे नाव-
डती ॥ ४ ॥

६१३ आणिकांची स्तुति आम्हां ब्रह्महत्या । एकावांचुनी त्या पांडुरंगा ॥ १ ॥ आम्हा विष्णुदासां एकविध भाव । न म्हणों या देव आणिकांसीं ॥ २ ॥ शतखंड माझी होईल रसना । जरी या वचना पालटेन ॥ ३ ॥ तुका म्हणे मज आणिका संकल्पे । अवघींच पापें घडतील ॥ ४ ॥

६१४ पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हां नारायण तैशापरी ॥ १ ॥ सर्वभावें लोभ्या आवडे हें धन । आम्हा नारायण तैशापरी ॥२॥ तुका म्हणे एकविध जालें मन । विठ्ठलावांचून नेणे दुजें ॥ ३ ॥

६१५ काय करूं आन दैवतें । एकावीण पंढरीनाथें ॥ १ ॥ सरिता मिळाली सागरीं । आणिका नांवा कैंची उरी ॥ २ ॥ अनेक दीपांचा प्रकाश । सूर्य उगवतां नाश ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणें दुजें । एकावीण पंढरीराजें ॥ ४ ॥

६१६ आणीक दुसरें मज नाहीं आतां । नेमिलें या चित्तापासुनिया ॥ १ ॥ पांडुरंग ध्यानीं पांडुरंग मनीं । जागृती स्वप्नीं पांडुरंग ॥ २ ॥ पाडिले वळण इंद्रियां सकळा । भाव तो निराळा नाहीं दुजा ॥ ३ ॥ तुका म्हणे नेत्रीं केली ओळखण । तटस्थ हें ध्यान विटेवरी ॥ ४ ॥

६१७ न पूजीं आणिकां देवा नकरी त्यांची सेवा । न मनीं या केशवाविण दुजें ॥ १ ॥ काय उणे जालें मज तयापायीं । तें मी मागों काई कवणासी ॥ २ ॥ आणिकांची कीर्ती नाइकेन बोल । चाड या विठ्ठलेंविण नाहीं ॥ ३ ॥ न पाहे लोचनीं श्रीमुखावांचुनि । पंढरी सांडूनि नवजे कोठें ॥ ४ ॥ न करी कांहीं आस मुक्तीचे सायास ।

न मे संसारास येतां जातां ॥ ५ ॥ तुका म्हणे कांहीं व्हावें ऐसें जीवा । नाहीं या केशवाविण दुजे ॥ ६ ॥

६१८ कोणाचिया न पडों छंदा । गोविंदासी आळवूं ॥ १ ॥ बहुतांची बहु मतें । अवघे रिते पोकळ ॥ २ ॥ घटापटा डहुळी मन । होय सीण न करूं ते ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंग । भरूं भाग आला तो ॥ ४ ॥

६१९ न करीं पठन घोष अक्षरांचा । बीज मंत्र आमुचा पांडुरंग ॥ १ ॥ सर्वकाळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासी समाधि हे ॥ २ ॥ न करी भ्रमण न रिघें कपाटीं । जाईन तेथें दाटी वैष्णवांची ॥ ३ ॥ आन नेणें कांहीं नवजें तपासी । नाचें दिंडीपाशीं जागरणीं ॥ ४ ॥ उपवास व्रत न करी पारणें । रामकृष्ण म्हणे नारायण ॥ ५ ॥ आणिकांची स्तुति सेवा नेणें वाणूं । तुका म्हणे अनु दुजे नाहीं ॥ ६ ॥

६२० तूं माझा मायबाप सकळ वित्त गोत । तूंचि माझें हितकरिता देवा ॥ १ ॥ तूंचि माझा देव तूंचि माझा जीव । तूंचि माझा भाव पांडुरंगा ॥ २ ॥ तूंचि माझा आचार तूं माझा विचार । तूंचि सर्वभार चालविसी ॥ ३ ॥ सर्वभावें मज तूं होसी प्रमाण । ऐसी तुझी आण वाहतसे ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज विकला जीवभाव । कळेल तो उपाव करीं आतां ॥ ५ ॥

६२१ हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ २ ॥ हेंचि माझें कर्म हाचि माझा धर्म । हाचि नित्य नेम नाम तुझें ॥ ३ ॥ हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि तप ध्यान नाम तुझें ॥ ४ ॥ हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ५ ॥ हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम

तुझें ॥ ६ ॥ तुका म्हणे दुजे सांगायासि नाहीं । नामेंविण कांहीं धनवित्त ॥ ७ ॥

६२२ ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आन न करी काम जिव्हा मुखें ॥ १ ॥ पाहिन तुझे पाय ठेवीन मी डोई । पृथक तें कांहीं न करी आन ॥ २ ॥ तुझेचि गुणवाद आईकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥ ३ ॥ करिन सेवा करें चालेन मी पायीं । आणीक न वजे ठायीं तुजवीण ॥ ४ ॥ तुका म्हणे जीव ठेवीन मी पायीं । आणीक तें कांहीं देऊं कवणा ॥ ५ ॥

६२३ जप तप ध्यान न लगे धारणा । विठ्ठल कीर्तनामाजी उभा ॥ १ ॥ राहे माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥ २ ॥ कीर्तन समाधि साधन तें मुद्रा । राहतील थारा धरोनिया ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । ओळगती चारी ऋद्धि सिद्धि ॥ ४ ॥

६२४ बाळ मायेविण क्षणभरि न राहे । न देखतां होये कासाविस ॥ १ ॥ आणिक उदंड बुझाविती जरी । छंद त्या अंतरीं माउलीचा ॥ २ ॥ नावडती तया बोल आणिकांचे । देखोनिया नाचे माय दृष्टी ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । आणिकांचे बोली चाड नाहीं ॥ ४ ॥

६२५ सिद्धीचा दास नव्हे श्रुतीचा अंकिला । होइन विठ्ठला दास तुझा ॥ १ ॥ सर्वसुख असे माझिये मानसी । राहिलें तयासी नाश नाहीं ॥ २ ॥ नेणें पुण्य पाप न पाहे लोचनीं । आणिका वांचूनि पांडुरंगा ॥ ३ ॥ न करीं आस मुक्तीचे सायास । भक्तिप्रेमरस सांडुनियां ॥ ४ ॥ गर्भवासीं धाक नाहीं येतां जातां । हृदयीं राहतां नाम तुझें ॥ ५ ॥ तुका म्हणे झालों तुझाचि अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥ ६ ॥

६२६ हेंचि सर्व सुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वांयां

॥ १ ॥ हेंचि एक सर्व साधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥ २ ॥ न लगती कांहीं तपाचिया रासी । करणे वाराणसी नाना तीर्थें ॥ ३ ॥ कल्पना हे तिळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्याच्या ॥ ४ ॥ तुका म्हणे नामें देव नेदी भेटी । म्हणे त्याचे होंटीं कुष्ट होय ॥ ५ ॥

६२७ नव्हे जाखाई जोखाई । मायराणी मेसाबाई ॥ १ ॥ बळिया माझा पंढरिराव । जो ह्या देवांचाही देव ॥ २ ॥ रंडीचंडी शक्ति । मद्य मांसातें भक्षिती ॥ ३ ॥ बहिरव खंडेराव । रोटी सुटी साटीं देव ॥ ४ ॥ गणोबा विक्राळ । लाडु मोदकांचा काळ ॥ ५ ॥ मुंजा म्हैसासुरें । हे तों कोण लेखी पोरें ॥ ६ ॥ वेताळें फेताळें । जळो त्यांचें तोंड काळें ॥ ७ ॥ तुका म्हणे चित्तीं । धरा रखुमाईचा पति ॥ ८ ॥

६२८ विठ्ठल हा चित्तीं । गोड लागे गातां गीतीं ॥ १ ॥ आम्हा विठ्ठल जीवन । टाळ चिपुळिया धन ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल वाणी । अमृत हे संजीवनी ॥ ३ ॥ रंगला या रंगें । तुका विठ्ठल सर्वांगें ॥ ४ ॥

६२९ विठ्ठल सोयरा सज्जन सांगाती । विठ्ठल हा चित्तीं बैसलासे ॥ १ ॥ विठ्ठलें हें अंग व्यापिलें हे काया । विठ्ठल हे छाया माझी मज ॥ २ ॥ बैसला विठ्ठल जिव्हेचिया माथां । न वदे अन्यथा आन दुजें ॥ ३ ॥ सकळां इंद्रियां मन एक प्रधान । तेंही करी ध्यान विठोबाचें ॥ ४ ॥ तुका म्हणे या विठ्ठलासी आतां । नये विसंवतां माझें मज ॥ ५ ॥

६३० जिवींचा जिव्हाळा । पाहों आपुलिया डोळा ॥ १ ॥ आम्हा विठ्ठल एक देव । येर अवघेचि वाव ॥ २ ॥ पुंडलिकाचे पाठीं । उभा हात ठेवुनि कटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं । वाहूं रखुमाईचा पती ॥ ४ ॥

६३१ एक धरिला चित्तीं । आह्मी रखुमाईचा पती ॥ १ ॥ तेणें जालें अवघें काम । निवारला भवश्रम ॥ २ ॥ परद्रव्य परनारी ।

जाली विषाचियेपरी ॥ ३ ॥ तुका म्हणे फार । नाहीं लागला व्यवहार ॥ ४ ॥

६३२ एक गावें आह्मी विठोबाचें नाम । आणीकां पैं काम नाहीं आतां ॥ १ ॥ मोडूनिया वाटा सुक्ष्म दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा ॥ २ ॥ लावूनि मृदंग श्रुति टाळ घोष । सेवूं ब्रह्मरस आवडीनें ॥ ३ ॥ तुका म्हणे महा पातकी पतित । होती जीवन्मुक्त हेळामात्रें ॥ ४ ॥

६३३ जतन करीन जीवें । शुद्ध भावें करूनी ॥ १ ॥ विठ्ठल विठ्ठल हें धन । जीवन अंतकाळींचें ॥ २ ॥ वर्दळ हें संचित सारूं । बरवा करूं उदीम हा ॥ ३ ॥ तुका म्हणे हृदयपेटीं । ये संपुटीं सांठवूं ॥ ४ ॥

६३४ येणें बोधें आम्ही असों सर्व काळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ १ ॥ आम्ही भूमीवरी एक पैं देवाचें । निधान हें वाचे सांपडलें ॥ २ ॥ तरतील कुळें दोन्ही उभयतां । गातां आइकतां सुखरूप ॥ ३ ॥ न चळे हा मंत्र न म्हणे याती कुळ । न लगे काळवेळ विचारावी ॥ ४ ॥ तुका म्हणे माझा विठ्ठल विसांवा । सांठवूनि हांवा हृदयांत ॥ ५ ॥

६३५ माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव । आपणचि देव होय गुरू ॥ १ ॥ पढियें देहभाव पुरवी वासना । अंतीं तें आपणापाशीं न्यावे ॥ २ ॥ मागें पुढें उभा राहे सांभाळीत । आलिया आघात निवारावे ॥ ३ ॥ योगक्षेम त्याचें जाणें जडभारी । वाट दावी करीं धरूनिया ॥ ४ ॥ तुका म्हणे नाहीं विश्वास ज्या मनीं । पहावें पुराणीं विचारूनी ॥ ५ ॥

६३६ माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हाइली ॥ १ ॥ कुर्वाळुनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळुनी ॥ २ ॥ केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोवळी ॥ ३ ॥ तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥ ४ ॥

६३७ जळतें संचित । ऐसी आहे धर्मनीत ॥ १ ॥ माझ्या विठोबाचे पाय । वेळोवेळां मनीं ध्याय ॥ २ ॥ नेदी कर्म घडों । कोठें आडरानें पडो ॥ ३ ॥ तुका म्हणे मळ । राहो नेदी ताप जाळ ॥ ४ ॥

६३८ आनंद अद्वय नित्य निरामय । जें कां निजध्येय योगियांचे ॥ १ ॥ तें हें समचरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥ २ ॥ पुराणासी वाड श्रुति नेणती पार । तें झालें साकार पुंडलिका ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्यातें सनकादिक ध्यात । तें आमुचें कुळदैवत पांडुरंग ॥ ४ ॥

६३९ अद्वयाचि द्वय झालेंचि कारण । धरिलें नारायणें भक्तिसुख ॥ १ ॥ अपरोक्ष आकार झाला चतुर्भुज । एकतत्व बीज भिन्न नाहीं ॥ २ ॥ शून्य निरसूनी राहिलें निर्मळ । तें दिसे केवळ विटेवरीं ॥ ३ ॥ सुखें घ्यावें नाम वदनाही चाड । सरिता वापी आड एक पाणी ॥ ४ ॥ तुका म्हणे मीच आहे तेणें सुखें । भेट नाहीं मुखें नाम गातों ॥ ५ ॥

६४० आजी आनंदुरे एकी परमानंदुरे । जया श्रुति नेति नेति म्हणाति गोविंदुरे ॥ १ ॥ विठोबाचीं वेडीं आम्हा आनंदु सदा । गाऊं नाचूं वाहूं टाळी रंजवूं गोविंदा ॥ २ ॥ सदा सण सांत आम्हां नित्य दिवाळी । आनंदे निर्भर आमचा कैवारी बळी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं जन्ममरणाचा धाक । संत सनकादिक हे तों आमुचें कौतुक ॥ ४ ॥

६४१ तुझ्या नामाची आवडी । आम्हीं विठो तुझीं वेडीं ॥ १ ॥ आतां न वजों आणिका ठाया । गाऊं गीत लागों पायां ॥ २ ॥ काय वैकुंठ बापुडें । तुझ्या प्रेमसुखापुढें ॥ ३ ॥ संतसमागम मेळ । प्रेमसुखाचा सुकाळ ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझ्या पायीं । जन्ममरणा ठाव नाहीं ॥ ५ ॥

६४२ माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायांसी

न विसंबे ॥ १ ॥ विसरतां रूप क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ति सावळी ते ॥ २ ॥ विसरतां हरि क्षण एक घडी । अंतरली जोडी लक्षलाभ ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या विठोबाचे पाय । संजीवणी आहे हृदयामाजि ॥ ४ ॥

६४३ आठवींचि नेदी आवडी आणीक । भरूनियां लोक तिन्ही राहे ॥ १ ॥ मन धांवे तेथें तिचींचि दुमतें । संपूण आइतें सर्वकाळ ॥ २ ॥ नलगे वळावीं इंद्रियें धांवतां । ठाव नाहीं रिता उरों दिला ॥ ३ ॥ तुका म्हणे समपाउलांचा खुंट । केला बळकट हालों नेदी ॥ ४ ॥

६४४ आम्हीं नामाचे धारक । नेणों प्रकार आणीक । सव भावें एक । विठ्ठलचि प्रमाण ॥ १ ॥ नलगे जाणावें नेणावें । गावें आनंदें नाचावें । प्रेमसुख घ्यावें । वैष्णवांचे संगतीं ॥ २ ॥ भावबळें घालूं कास । लज्जा चिंता दवडूं आस । पायीं निजध्यास । म्हणों दास विष्णूचे ॥ ३ ॥ भय नाहीं जन्म घेतां । मोक्षसुखा हाणों लाता । तुका म्हणे सत्ता । निकट करूं सेवेची ॥ ४ ॥

श्री॥निळोबामहाराज

६४५ गण गोत अवघें धन । आम्हां चरण विठोबाचे ॥ १ ॥ आणखी दुजें नेणों कांहीं । चाडचि नाहीं धनमानें ॥ २ ॥ देवाविण वाटती ओस । वैकुंठ कैलास नावडती ॥ ३ ॥ निळा म्हणे आवडी जाणें । पुरवी खुणें जिवींचे तो ॥ ४ ॥

६४६ चित्तीं माझे पांडुरंग । बैसला अभंग न ढळेसा ॥ १ ॥ जातां दिवस जातां राती । स्वप्नीं जागृती सुषुप्ती तो ॥ २ ॥ देखतां डोळा ऐकतां कानीं । बोलतां वदनीं तोचि पुढें ॥ ३ ॥ निळा म्हणे बुद्धी मन । गेली विरोन त्यामाजी ॥ ४ ॥

६४७ जडला जीवीं तो नव्हेचि परता । चित्तीं चिंता व्यापूनियां ॥ १ ॥ बुद्धीमाजी याचेंचि ठाणें । रहाटे करणें अहोरात्रीं ॥ २ ॥

अंतःकरणीं धरिला थारा । आंतु शरीराबाहेरी हा ॥३॥ निळा म्हणे अवघाचि हरि । आम्हां घरीं दारीं दाटला ॥ ४ ॥

६४८ जाणीवाचि माझी गिळूनि ठेला । नेणीवेते प्याला निपटूनिया ॥ १ ॥ निढळवाणें मज करूनि ठेविलें । जीवाचेंही हरिलें जीवपण ॥ २ ॥ ज्ञानासी तो हा वाढोंचि नेदी । ग्रासिल्या उपाधी परमार्थिका ॥ ३ ॥ निळा म्हणे येणें नेले आपपर । मोडियेली थार दोहींकडे ॥ ४ ॥

६४९ झालें डोळियां पारणें । इंद्रियांही पुरतेपणें ॥ १ ॥ विठो देखतांचि दिठीं । जिवीं जिवा पडली मिठी ॥ २ ॥ बुद्धि निश्चयाचें घर । तेहि झाली तदाकार ॥ ३ ॥ निळा म्हणे काया वाचा । मन संकल्प हा तयाचा ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज.

६५० जे जे घडेल ते घडो । देह राहो अथवा पडो ॥ १ ॥ नाम न सोडी सर्वथा । दीनबंधु पंढरिनाथा ॥ २ ॥ जैसा जैसा असेल भोग । तैसा तैसा घडेल योग ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवाते । घडेल ते घडो या देहाते ॥ ४ ॥

६५१ तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल । देव विठ्ठल देवपूजा विठ्ठल ॥ १ ॥ माता विठ्ठल पिता विठ्ठल । बंधु विठ्ठल गोत्र विठ्ठल ॥ २ ॥ गुरु विठ्ठल गुरुदेवता विठ्ठल । निधान विठ्ठल निरंतर विठ्ठल ॥ ३ ॥ नामा म्हणे मज विठ्ठल सांपडला । म्हणोनी कळीकाळा पाड नाहीं ॥ ४ ॥

६५२ जीवप्राणें एक विठ्ठलची व्हावा । ऐसिया मी भावा रातलिया ॥ १ ॥ आवडे पंढरी आवडे चंद्रभागा । येती यमुना गंगा प्रतिदिनीं ॥ २ ॥ आवडे पद्मतीर्थ आवडे गरुडपार । राउळीं माहेर पांडुरंग ॥ ३ ॥ नामा म्हणे अहो विठाई रुक्माई। आणिकांपाशीं नाहीं चित्त माझे ॥ ४ ॥

६५३ न पाहें गे माय विठाईविण डोळां । सर्वस्वें कंटाळा आणि-

कांचा ॥ १ ॥ विठोबाविण कांहीं नायके मीं कानीं । जडली चरणीं चित्तवृत्ती ॥ २ ॥ आणिकांचे मार्गीं न चालोत पाय । जीव वोढे सये पांडुरंगा ॥ ३ ॥ नामा म्हणे करी आणिकांची पूजा । न करी गरुडध्वजा वांचूनिया ॥ ४ ॥

६९४ मान तोडावया कर शस्त्रांचें । कठिण बहुतांचें उभारिले ॥१॥ तरी न वदे न वदे आन । आन कांहीं या विठोबावांचून ॥ २ ॥ विठोबा-परते दैवत आहे म्हणती । ऐसें श्रुतिस्मृती जरी बोलती ॥ ३ ॥ तरी ते अपशब्द कानीं पडो न द्यावें । पाखांडी म्हणती जरी उगोचि असावे ॥४॥ ब्रह्मदेवेसी जालिया भेटी । तोहि जरी वदेल ऐसिया गोष्टी ॥५॥ या विठोबापरतें दैवत म्हणेल सृष्टी । चळला पोटीं निभ्रांत जाणा ॥ ६ ॥ कोटी कोटी ब्रह्मांडें एक एक रोमीं । व्यापूनियां व्योमीं वर्ततसे ॥ ७ ॥ तो हा माझा विठोबा सर्वांघटीं सम । न सांडावें वर्म म्हणे नामा ॥ ८ ॥

६९५ सर्वभावें तूतें जे ध्याती दातारा । त्याचिया संसारा तूंचि होसी ॥ १ ॥ ज्याचे चित्तीं नाहीं आणिक कांहीं काम । त्याचा योग-क्षेम तूंचि होसी ॥ २ ॥ ऐहिक परत्र जें कांहीं देखिजे । तें तुवां होईजे मायबापा ॥ ३ ॥ नामा म्हणे माझी भक्ति हे माउली । केशवा वाहिली क्षणमात्रें ॥ ४ ॥

६९६ आम्हां सांपडलें वर्म । करूं भागवतधर्म ॥ १ ॥ अवतार हा भेटला । बोलूं चालूं हा विसरला ॥ २ ॥ अरे हा भावाचा लंपट । सांडुनि आलासे वैकुंठ ॥ ३ ॥ संतसंगती साधावा । धरूनि हृदयीं बांधावा ॥४॥ नामा ह्मणे केउता जाय । आमुचा गळा त्याचे पाय॥५॥

६९७ जीव तूं प्राण तूं । आह्मां तूं गा विठ्ठला ॥ १ ॥ जनक तूं जननी तूं । सोयरा तूं गा विठ्ठला ॥ २ ॥ माझा गुरु तूं गुरुमंत्र तूं । सर्वस्व तूं माझें म्हणे नामा ॥ ३ ॥

६९८ तापत्रय अग्नीची जळतसे शेगडी । आहाळोनि कोरडी

झाली काया ॥ १ ॥ केव्हां करुणाघना बोळसी अंबरीं । निवविसी नरहरी कृपादृष्टी ॥ २ ॥ शोक मोहाचिया झळंबलों ज्वाळीं । क्रोधाचे काजळी पोळतसे ॥ ३ ॥ चिंतेचा वोणवा लागला चहूंकडा । जातों तळा बुडां धांव देवा ॥ ४ ॥ धांव धांव करुणाघना तुजविण । नामा म्हणे प्राण जातो माझा ॥ ५ ॥

६५९ धांवुनि जाईन श्रीमुख पाहीन । ईडा पीडा घेईन विठोबाची ॥ १ ॥ तया सुखा दृष्टि लागेल वो झणी । मग मी साजणी काय करूं ॥ २ ॥ म्हणोनि माझें चित्त व्यापिलें उद्वेगें । शिणलों मी उबगें जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ धरोनियां घालीं जीवाचे अंतरीं । आंतोनी बाहेरी जाऊं नेदीं ॥ ४ ॥ वासना पापिणी करील पायरव । मग हा अनुभव कोठें पाहूं ॥ ५ ॥ वृत्तिसहित करीन मनाचें सांडणें । न विसंबें प्राणे म्हणे नामा ॥ ६ ॥

६६० व्यापकापरीस मन म्यां केलें वाड । सांपडलें गोड प्रेमसुख ॥ १ ॥ जिकडे पाहे तिकडे विठोबा अवघा । भीमा चंद्रभागा पुंडलिक ॥ २ ॥ बाहेरीं भीतरीं सर्व निरंतरीं । हें ब्रह्मांड पंढरी झाली मज ॥ ३ ॥ महुरलें तरुवर फळीं पुष्पीं भार । तेंचि निर्विकार सनकादिक ॥ ४ ॥ आवडीचा आनंदु तोचि वेणुनादु । अनुभवें गोविंदु गोपवेशें ॥ ५ ॥ नामा म्हणे विठो भक्तीच्या वल्लभा । मागें पुढें उभा सांभाळित ॥ ६ ॥

६६१ तूं अवकाश मी भूमिका । तूं लिंग मी साळुंका । तूं समुद्र मी द्वारका । स्वयें दोन्ही ॥ १ ॥ तूं वृंदावन मी चिरी । तूं तुळशी मी मंजरी । तूं पावा मी मोहरी । स्वयें दोन्ही ॥ २ ॥ तुं चांद मी चांदणी । तुं नाग मी पद्मिणी । तुं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही ॥ ३ ॥ तूं नदी मी थडी । तूं तारूं मी सांगडी । तूं धनुष्य मी भातोडी । स्वयें दोन्ही ॥ ४ ॥ तूं वेद मी स्तविता । तूं शास्त्र मी गीता । तुं गंध मी अक्षता । स्वयें दोन्ही ॥ ५ ॥ नामा म्हणे पुरषो-

त्तमा । स्वयें जडलों तुझ्या प्रेमा । मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ॥ ६ ॥

६६२ भक्ति आम्हीं केली सांडुनी उद्वेग । पावलों सत्संग सुखप्रेमें ॥ १ ॥ प्रेम काय करी बहु दोष वारी । वैकुंठा माझारी वस्ती देसी ॥ २ ॥ सुख झालें आम्हा धरूं याचा संग । पळे भवभंग अस्नूनिया ॥ ३ ॥ नामा म्हणे सुख बहु झालें जीवा । घडलिया सेवा विठोबाची ॥ ४ ॥

६६३ जीवन्मुक्त केले नामाचे गजरीं । सेवक अधिकारी विठोबाचे ॥ १ ॥ कांहीं उतराई होऊं तुज देवा । उदारा केशवा मायबापा ॥ २ ॥ अंतरी देऊनि प्रेमाचा जिव्हाळा । मुक्तीचा सोहोळा भोगविसी ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हा दिनांचे माहेर । हृदयीं निरंतर ध्यान करूं ॥ ४ ॥

६६४ वारंवार काय विनवावें आतां । समजावें चित्ता आपुलिया ॥ १ ॥ तूं काय म्हणसी कंटाळेल हाची । जाईल उगाचि उठोनियां ॥ २ ॥ मजलागीं देवा जासी चुकवोनी । आणिन धरूनि तुजलागीं ॥ ३ ॥ दृढ भक्तिभाव प्रेमाचा हा दोरा । बांधीन सत्वर तुझे पायीं ॥ ४ ॥ नामा म्हणे बोल काय विठो आतां । भेटावें सर्वथा यांत बरें ॥ ५ ॥

६६५ देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥ चरण न सोडी सर्वथा । तुझी आण पंढरीनाथा ॥ २ ॥ वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवी माझा ॥ ४ ॥

६६६ तुझ्या चरणाचें तुटतां अनुसंधान । जाईल माझा प्राण तत्क्षणीं ॥ १ ॥ मग हें ब्रह्मज्ञान कोणापें सांगसी । विचारी मानसीं पांडुरंगा ॥ २ ॥ वदनीं तुझें नाम होतांची खंडणा । शतखंड रसना होईल माझी ॥ ३ ॥ सांवळें सुंदर रूप पाहतां तुझें दृष्टी । न देखतां

उन्मळती नयन हे ॥ ४ ॥ तुज परतें साध्य आणिक नाहीं साधन । साधक माझें मन होईल भ्रांत ॥ ५ ॥ नामा म्हणे केशवा अनाथाच्या नाथा । झणी माझा अंत पाहसी देवा ॥ ६ ॥

६६७ तुझिये चरणीं असती दोनी भाव । तरीच हा जीव नरककुंडी ॥ १ ॥ बोल बोले एक मनीं असे आणिक । तरी तयासी देख दोन बाप ॥ २ ॥ तुजवीण सुख आणिकांचें मानी । तरी मज जननी दोन देवा ॥ ३ ॥ नामा म्हणे माझा सत्याचा साहाकारी । आस मी न करी आणिकांची ॥ ४ ॥

६६८ आतां होणार तें हो कां पंढरीनाथा । न सोडी सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥ हृदयीं तुझें ध्यान मुखीं जपे नाम । हाचि नित्यनेम सर्व माझा ॥ २ ॥ आम्हीं तुझी देवा धरियेली कास । न करीं उदास पांडुरंगा ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा भक्तजन वत्सला । क्षण जीवावेगळा न करी मज ॥ ४ ॥

६६९ माझी कोण गती सांगा पंढरीनाथा । तारीसी अनाथा कीं बुडविसी ॥ १ ॥ मनापासोनीयां सांग मजप्रती । पुसें काकुळती जीवीचिया ॥ २ ॥ न बोलसी कां रे धरीला अबोला । कोणासी विठ्ठला शरण जाऊं ॥ ३ ॥ कोणासी सांकडे घालावें हें सांगा । नको करूं रागा दीनावरी ॥ ४ ॥ बाळकासी जैसी एकलीच माय । तैसे तुझे पाय आम्हांलागीं ॥ ५ ॥ नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । कृपाळुवा कांता रखुमाईच्या ॥ ६ ॥

६७० मायबापाची सांडूनिया आस । धरिली तुझी कास पांडुरंगा ॥ १ ॥ झणी पांडुरंगा उपेक्षिसी मातें । तरी हांसती तूंतें संतजन ॥ २ ॥ नामा म्हणे तुझीं पाउलें समान । तेथें माझें मन स्थिरावलें ॥ ३ ॥

६७१ पाहतां तुझे चरण हरली भवव्यथा । पुढती एक चिंता वाटतसे ॥ १ ॥ झणी मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या संतसंगा

कोठें पाहूं ॥ २ ॥ मग हे पंढरी आनंदसोहळा । कवणाचे डोळा पाहूं देवा ॥ ३ ॥ मग हे हरिकथा अमृतसंजीवनी । कवणाचे श्रवणीं ऐकों देवा ॥ ४ ॥ नामा म्हणे मज पंढरीची सोय । अनंत जन्म होय याचिलागीं ॥ ५ ॥

६७२ भक्तांची आवडी मोठी त्या देवासी । सद्भक्तिप्रेमासी लांचावला ॥ १ ॥ काय सांगूं आतां तयांचें कौतुक । जेथें ब्रह्मादिक स्तब्ध ठेले ॥ २ ॥ गज आणि गणिका भिल्लिणी कुंटिणी । नेल्या त्या विमानीं बैसोनिया ॥ ३ ॥ अजामीळ खळ कोळी तो वाल्मीक । तारिले अनेक एकसरा ॥ ४ ॥ धर्माचिये घरीं उच्छिष्टें काढी । जाहला बराडी देवराव ॥ ५ ॥ नामा म्हणे कांहीं मागेना तो देव । मुख्य पाहे भाव दृढ त्याचा ॥ ६ ॥

६७३ आम्हांसी चिंतन अवश्य श्रीरामा । आवडी आणिक आम्हां नाहीं दुजी ॥ १ ॥ वोळगलों हरि भूतभावा निर्धारीं । दिसे चराचरीं भावरूप ॥ २ ॥ जे जे पडे दृष्टी आणिक नाहीं सृष्टी । हरिरूपीं भेटी होचि दिसे ॥ ३ ॥ नामा म्हणे विठ्ठल सर्वांभूतीं आहे । आणिक उपाय न लगती ॥ ४ ॥

६७४ धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ १ ॥ कामधाम माझें केशवाचे पायीं । दिनानिसी पाहे हरपली ॥ २ ॥ शुक सनकादिक जेणें सुखें धाले । तें सुख राहिलें माझ्या मनीं ॥ ३ ॥ नामा म्हणे जगीं अलभ्य लाभ झाला । हरी सांपडला विटेवरी ॥ ४ ॥

६७५ तीर्थासी जाऊनि काय स्यां करावें । वाउगें हिंडावें पंथें तेणें ॥ १ ॥ माझें तीर्थ क्षेत्र पंढरी पैं जाणां । उघडें निधान दृष्टीपुढें ॥ २ ॥ मागे थोर थोरीं होचि पैं साधिलें । नाम्यासी दिधलें खेचर यानें ॥ ३ ॥

६७६ नामयानें बंदर घेतलें । विठ्ठलासी जीत धरिलें ॥ १ ॥ नामा

आला रे म्हणती । भेणें कळिकाळ कांपती ॥ २ ॥ भाव भक्ति करोनि कडी । विठ्ठल पायीं जडली वेडी ॥ ३ ॥ देह करोनि बंदिखाना । विठ्ठल सांठविलें निधाना ॥ ४ ॥ सोहं शब्दें मार केला । विठ्ठल काकुळती आला ॥ ५ ॥ नामा म्हणे विठ्ठलातें । जीव गेल्या न सोडीं तूंतें ॥ ६ ॥

६७७ माझा भाव तुझे चरणीं । तुझें रूप माझे मनीं ॥ १ ॥ सांपडलों एकमेकां । जन्मोजन्मीं नव्हे सुटका ॥ २ ॥ त्वां मज केलें रे विदेही । म्यां तुज धरिलें हृदयीं ॥ ३ ॥ त्वां तोडिली माझी माया । मी जडलों तुझ्या पायां ॥ ४ ॥ नामा म्हणे गा सुजाणा । सांगा ठकिलें कोणकोणा ॥ ५ ॥

६७८ मन झालें उन्मन वासना तल्लीन । देखिले हरिचरण सर्वांठायीं ॥ १ ॥ गुरुशिष्यमत हरपला दृष्टांत । प्रत्यक्ष त्वरित हरि झाला ॥ २ ॥ नामा पाहे देहीं तव उभा चहूं बाही । दीराद्रुमित दाही हरि दिसे ॥ ३ ॥

६७९ आम्ही देह केलें दुकान । तेथें सांठविलें ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ एके खेपे पैं लाभ झाला । आम्हां पंढरीनाथ भेटला ॥ २ ॥ पुण्य-सत्वाची केली सांगडी । ब्रह्म तुकून बांधली पुडी ॥ ३ ॥ तुझा दास मी वाणिया भला । नामा केशवचरणीं विनटला ॥ ४ ॥

६८० कोटी दिवाळ्या दसरे । आम्हां हेंचि झालें पुरे ॥ १ ॥ घरोघरीं ओवाळणी । विठ्ठल देखिला नयनीं ॥ २ ॥ झाला सुखाचा शेजार । करा नामाचा गजर ॥ ३ ॥ नामयाचा स्वामी आला । ब्रह्मादिकां आनंद झाला ॥ ४ ॥

६८१ मी माझें उरलें वाळक माय पोटीं । पाहे तंव कौतुकीं तेही नाहीं ॥ १ ॥ तेथीचें तेथें दंपत्य लोपलें । कळिकाळें मंथिलें नामें थोर ॥ २ ॥ तेंचि घेऊनि ठेलों मी येथें लोपलों । ब्रह्मींच गुंतलों

ब्रह्ममाळें ॥ ३ ॥ नामा म्हणे चैतन्य चैतन्या मिळालें । अरूपरूप ठेलें आपणांमाजी ॥ ४ ॥

६८२ कोटी सूर्यप्रभादीप्ती । गगनी झळकली अवचितीं ॥ १ ॥ संत नामया सांगती । पैल आला कमळापति ॥ २ ॥ वत्सालागीं जैसी धेनु । तैसा धावे जगजीवनु ॥ ३ ॥ गरूडाचे धुंदुवाती । दाही दिशा आक्रंदती ॥ ४ ॥ हरि कंठीची सुमनमाळा । सुटोनि आली भूमंडळा ॥ ५ ॥ सवें चाले सुदर्शन । भक्त करावया रक्षण ॥ ६ ॥ उचलोनि दोहीं बाहीं । नामा धरिला हृदयीं ॥ ७ ॥

६८३ ऐसें माझे मनी येतें पंढरीनाथा । न सोडी सर्वथा चरण तुझे ॥ १ ॥ यासि काय करूं सांगा जी गोपाळा । कां स्नेह लावियेला पूर्वीहुनी ॥ २ ॥ हृदयीं चित्तवृत्ति मनेंसि मिळोनी । अवघी तुझ्या चरणीं सुरवाडिली ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवा धरिली तुझी सेवा । सुखा अनुभवा अनुभविलें ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

६८४ दळितां कांडितां । तुज गाईन अनंता ॥ १ ॥ न विसंबें क्षणभरी । तुझें नाम गा मुरारी ॥ २ ॥ नित्य हाचि कारभार । मुखीं हरि निरंतर ॥ ३ ॥ मायबाप बंधु बाहेणी । तूं बा सखा चक्रपाणी ॥ ४ ॥ लक्ष लागलें चरणासी । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

६८५ चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥ स्नान करूं भिवरेसी । पुंडलिका पायापाशीं ॥ २ ॥ डोळे भरून पाहूं देवा । तेणें ईश्वर जीवा भावा ॥ ३ ॥ ऐसा निश्चय करुनी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

६८६ जनी म्हणे नामदेवासी । चला जाऊं पंढरिसी ॥ १ ॥ आला विषयाचा कंटाळा । जाऊं भेटूं त्या गोपाळा ॥ २ ॥ आवडीनें जगजेठी । गळा घालूनिया मिठी ॥ ३ ॥ आवडीनें गुज कानीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

६८७ जात्यावरील गीतासी । दळणमिशें गोवी दासी ॥ १ ॥ देहबुद्धीचें वैरण । बरवा दाणा हो निरसून ॥ २ ॥ नामाचा हो कोळी । गुरु आज्ञेत मी पाळी ॥ ३ ॥ मज भरंवसा नाम्याचा । गजर दासी जनीचा ॥ ४ ॥

६८८ तुझा लोभ नाहीं देवा । तुझी करीना मी सेवा ॥ १ ॥ नाहीं अंगीं थोरपण । मिथ्या धरिसी गुमान ॥ २ ॥ रागा येउनी काय करिसी । तुझें बळ आम्हांपाशीं ॥ ३ ॥ नाहीं सामर्थ्य तुज हरी । जनी म्हणे धरिली चोरी ॥ ४ ॥

६८९ तुझे चरणीं घालीन मिठी । चाड नाहीं रे वैकुंठीं ॥ १ ॥ सर्वभावें गाईन नाम । सखा तूंचि आत्माराम ॥ २ ॥ नित्य पाय वंदिन माथा । तेणें नासे भवभयव्यथा ॥ ३ ॥ रूप न्याहाळीन दृष्टी । सर्वसुखें सांगेन गोष्टी ॥ ४ ॥ दीनानाथा चक्रपाणी । दासी जनी लावी ध्यानीं ॥ ५ ॥

६९० माझें चित्त तुझे पायीं । ठेवीं वेळोवेळा डोई ॥ १ ॥ मुखीं उच्चार नामाचा । काया मनें जीवें वाचा ॥ २ ॥ धरणें तें ऐसें धरूं । जनी म्हणे विठ्ठल स्मरूं ॥ ३ ॥

६९१ आम्हीं पातकांच्या राशी । आलों तुझ्या पायापाशीं ॥ १ ॥ मना येईल तें तूं करीं । आतां तारीं अथवा मारी ॥ २ ॥ जनी म्हणे सृष्टीवरी । एक असती तूं बा हरी ॥ ३ ॥

६९२ नामयाचें ठेवणें जनीस लाधलें । धन सांपडलें विटेवरी ॥ १ ॥ धन्य माझा जन्म धन्य माझा वंश । धन्य विष्णुदास स्वामी माझा ॥ २ ॥ काम धाम माझे विठोबाचे पाय । दिवसानिशीं पाहे हारपली ॥ ३ ॥ माझ्या वडिलांचें दैवत तो हा पंढरीनाथ । तेणें माझा अर्थ पुरविला ॥ ४ ॥ संसाराचें सुख नेघे माझे चित्ती । तरीच पुनरावृत्ति चुकविल्या ॥ ५ ॥ नामयाचे जनी आनंद पै झाला । हृदयीं बिंबला पांडुरंग ॥ ६ ॥

६९३ आतां भीत नाहीं देवा । आदि अंत तुझा ठावा ॥ १ ॥ झालें नामाचेनि बळकट । तेणें वैकुंठ पायवाट ॥ २ ॥ ज्ञान वैराग्य विवेक बळें । तें तंव आम्हांसवे खेळे ॥ ३ ॥ दया क्षमा आम्हांपुढें । जनी म्हणे झाले वेडे ॥ ४ ॥

६९४ मनालागीं हाचि धंदा । राम कृष्ण हरि गोविंदा ॥ १ ॥ जिव्हे करूं नित्य नेम । सदा विठोबाचें नाम ॥ २ ॥ नामामध्यें नाम सार । जप करी निरंतर ॥ ३ ॥ म्हणे जनी नाम घेणें । नाम मंत्रें शंकर होणें ॥ ४ ॥

६९५ मनामागें मन लावूं । तेथें सर्व सुख पाहूं ॥ १ ॥ मग आम्हा काय उणें । दया करी नारायणें ॥ २ ॥ जनी म्हणे ऐसें मन । करूं देवा हो आधिन ॥ ३ ॥

६९६ आनंदाचे डोहीं । जो कां समुळ झाला नाहीं ॥ १ ॥ कीर्तनें जन्मला । हरिभक्तीनें शिंपिला ॥ २ ॥ आळवितसे अंतरीं । वाचा नाम लाहो करी ॥ ३ ॥ समुळ झाला नाहीं । देहें जनी विठ्ठलपायीं ॥ ४ ॥

६९७ आम्ही स्वर्गलोक मानूं जैसा ओक । देखोनिया सुख वैकुंठीचें ॥ १ ॥ न लगे वैकुंठ न वांछूं कैलास । सर्वस्वाची आस विठोपायीं ॥ २ ॥ न लगे संतति धन आणि मान । एक करणें ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥ सत्य कीं मायीक आमुचें बोलणें । तुमची तुम्हा आण सांगा हरी ॥ ४ ॥ जीव भाव आम्ही सांडूं ओवाळूनि । म्हणे दासी जनी नामयाची ॥ ५ ॥

६९८ मी तो समर्थाची दासी । मिठी घालीन पायासीं ॥ १ ॥ हाचि माझा दृढभाव । करीन नामाचा उत्सव ॥ २ ॥ आम्हा दासीस हें काम । मुखीं विठ्ठल हरि नाम ॥ ३ ॥ सर्व सुख पायीं लोळे । जनी संगे विठ्ठल बोले ॥ ४ ॥

## श्रीभानुदासमहाराज

६९९ जरि हें आकाश वर पडो पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये । वडवानळ त्रिभुवन खाये । तरी तुझीच वाट पाहे गा विठोबा ॥ १ ॥ न करीं आणिकांचा पांगिला । नामधारक तुझाची अंकिला ॥ २ ॥ सप्तसागर एकवट होती । जरी हे विरूनि जाय क्षिती । पंचमहाभूतें प्रळय पावती । परि मी तुझाची सांगाती गा विठोबा ॥ ३ ॥ भलतैसें वरपडो भारी । नाम न संडो नेमा न टळों निर्धारी । जैसी पतिव्रता प्राणेश्वरी । विनवी भानुदास म्हणे अवधारी गा विठोबा ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

७०० आम्हासी तो पुरे विठ्ठलची एक । वाउगाची देख दुजा न मनीं ॥ १ ॥ ध्यान धरूं विठ्ठल करूं तयाचें कीर्तन । आणिक चिंतन नाहीं दुजें ॥ २ ॥ ध्येय ध्याता ध्यान खुंटला पै शब्द । विठ्ठल उद्बोधसुख आम्हां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल भरला । रिता ठाव उरला कोठें सांगा ॥ ४ ॥

७०१ आम्हां नादीं विठ्ठलु छंदीं विठ्ठलु । हृत्पदीं विठ्ठलु मिळतसे ॥ १ ॥ आम्हां धातु विठ्ठलु मातु विठ्ठलु । गातु विठ्ठलु आनंदें ॥ २ ॥ आम्हां राग विठ्ठलु रंग विठ्ठलु । संग विठ्ठलु वैष्णवांचा ॥ ३ ॥ आम्हां ताल विठ्ठलु मेळ विठ्ठलु । कल्लोळ विठ्ठलु कीर्तनें ॥ ४ ॥ आम्हां श्रुती विठ्ठलु श्रोता विठ्ठलु । वक्ता विठ्ठलु वदनीं ॥ ५ ॥ आम्हा मनीं विठ्ठलु ध्यानीं विठ्ठलु । एकाजनार्दनीं अवघा विठ्ठलु ॥ ६ ॥

७०२ गातां एका ध्यातां एका । अंतरबाही पहातां एका ॥ १ ॥ अगुणी एका सगुणी एका । गुणातीत पाहातां एका ॥ २ ॥ जनीं एका वनीं एका । निरंजनी देखों एका ॥ ३ ॥ संतजन पढिये एका । जनार्दना कडीये एका ॥ ४ ॥

७०३ एक विठ्ठलचिंतन । आणिक दुजे नेघे मन । ऐसे घडतां

साधन । जोडे सर्व तयासी ॥ १ ॥ होचे एकाविधाभक्ति । येणे जोडे सर्व मुक्ती । पर्वकाळ विश्रांति । तेथें घेती सर्वदा ॥ २ ॥ तीर्थ वोढवती माथा । वंदिताती सर्वथा । तपांच्या चळथा । घडताती आपेआप ॥ ३ ॥ घडतें यज्ञाचें पुण्य । आणिक तया नाहीं बंधन । शरण एकाजनार्दन । निश्चय ऐसा जयाचा ॥ ४ ॥

७०४ देव विठ्ठल तीर्थ विठ्ठल । अवघा विठ्ठल भरलासे ॥ १ ॥ जन विठ्ठल वन विठ्ठल । जळीं स्थळीं विठ्ठल भरलासे ॥ २ ॥ भाव विठ्ठल देव विठ्ठल । अवघा विठ्ठल भरलासे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मनीं विठ्ठल । जप तप ध्यान विठ्ठल ॥ ४ ॥

७०५ एकपण पाहतां सृष्टी । भरला दृष्टी विठ्ठल ॥ १ ॥ नाहीं द्वैताची भावना । बैसला ध्याना विठ्ठल ॥ २ ॥ मीतूंपण वोस ठाव । बैसला सर्व विठ्ठल ॥ ३ ॥ ध्यानीं विठ्ठल मनीं विठ्ठल । एकाजनार्दनी अवघा विठ्ठल ॥ ४ ॥

७०६ रिता ठाव न दिसे पाहतां । भरला पुरता विठ्ठल ॥ १ ॥ जनीं वनीं विजनीं देखा । विठ्ठलसखा भरलासे ॥ २ ॥ पाहतां पाहणें परतलें । विठ्ठल व्यापिलें सर्वत्र ॥ ३ ॥ नाहीं पाहण्यासीं ठाव । अवघा भाव विठ्ठल ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं व्यापक । विठ्ठल देख त्रिभुवनीं ॥ ५ ॥

७०७ मागेंपुढें विठ्ठल भरला । रिता ठाव नाहीं उरला ॥ १ ॥ जिकडे पाहावें तिकडे आहे । दिशाद्रुम भरला पाहे ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सर्व देशीं । विठ्ठल व्यापक निश्चयेंशीं ॥ ३ ॥

७०८ विठलावांचुनीं आणिकाचें ध्यान । नाहीं आम्हां चिंतन दुजियाचें ॥ १ ॥ आमुचे कुळींचें विठ्ठल दैवत । कुळधर्म समस्त विठ्ठल देव ॥ २ ॥ विठलावांचुनि नेणों क्रिया कर्म । विठ्ठलावांचुनि धर्म दुजा नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनी विठ्ठल भरला । भरुनी उरला पंढरीये ॥ ४ ॥

७०९ गाऊं तरी एक विठ्ठलाचि गाऊं । ध्याऊं तरी एक विठ्ठलाचि ध्याऊं ॥ १ ॥ पाहूं तरी एक विठ्ठलची पाहूं । आणिका न गोऊं वासनाही ॥ २ ॥ आठवूं तो एक विठ्ठल आठवूं । आणिक न सांठवूं हृदयामाजीं ॥ ३ ॥ विठ्ठलावांचुनी मनीं नाहीं आन । सर्वभावें प्रमाण विठ्ठल मज ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं जडला जिव्हारीं । विठ्ठल चराचरीं व्यापूनि ठेला ॥ ५ ॥

## श्रीज्ञानदेवमहाराज

७१० काय करिसी सकळ देवांचे वैभव विलास । माझिया स्वामीविण ते अवघे उद्धस रया ॥ १ ॥ तपन त्या कमळा कमळीं विकासु । सुकवि मयंकु काय करिसी अरे वा सुधांशु ॥ २ ॥ साताही वारांचे दिवसु एकियाचि सुरिजे । तैसें सर्वां सर्वपण माजीयेन श्रीराजे ॥ ३ ॥ सर्वज्ञ सुंदर देव होतुकां भलतैसें । परि जडातें चेष्टवितें आणिकां पै नसे ॥ ४ ॥ जया नांव नाहीं रूप चिन्ह कांहीं । नाम रूप चिन्ह स्वयेंचि पाही ॥ ५ ॥ बापरखुमादेविवरु आहे तैसाचि पुरे । काय करिसी आणिक देवांची गोवा रे रया ॥ ६ ॥

७११ पूर्वदिशे भानु उगवला नळनी कमळणी कमळीं विकासु केला । उष्णकरु अस्तु जाला सीतकरु प्रवर्तला कमळणीं संकोचु केला गे बाइये ॥ १ ॥ पाढियंते मानसीं बहु वसे । असे दुरी तें जवळीच वसे रया ॥ २ ॥ दोलक्षीं सोम अंबरीं । त्याचे गुण उमटती सागरीं । आंवसे कळाहीनु येरु दिसे अंधारीं । तैसा समंधु ये शरीरीं रया ॥ ३ ॥ गगनीं बोळली घनुचरें तेणें क्षितीवरी नाचती मयुरें । सोम शीतपणें कळा मिरवी अमृत घेवों जाणती चकोर रया ॥ ४ ॥ वोळली स्वातीची अंबुटें तें तत्व झेलिती शुक्तिकासंपुटें । येरें नक्षत्रें वरुषती निकटें काय जळ तयाचें वोखटें रया ॥ ५ ॥ चातकु चंद्रातें चिंतितु तो तयाचे मनोरथ पुरवितु । बापरखुमादेविवरु विठ्ठलु तो मी सदा असे हृदयीं ध्यातु रया ॥ ६ ॥

७१२ पतीचा जिव्हाळा म्हणोनि सासुऱ्याचें साहिजे । येऱ्हवीं हें वाहिजे चामाची मोट ॥ १ ॥ न पाहे वास न धरी मनीं आस । वाया निकण भुस काय उपणिसी ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलाचि पुरे । चाड नाहीं आम्हां दुजेविण ॥ ३ ॥

७१३ आकार स्थूल नाशिवंत । हे तरी जाईल भूमिआंत । तयावरि हरि चालत । तेणें होईल कृतकृत्य ॥ १ ॥ देहो जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ धृ० ॥ दुजा गुण आपीं मिळे । तरि मी होईन गंगाजळे । हरिअभिषेक अनुदिनीं । सुखें सर्वांगावरी खेळे ॥२॥ तिजा गुण तेजरूप । तरी मी होईन महादीप । हरिरंगणीं दीपमाळा । दीप उजळीन समीप ॥ ३॥ वायु व्यापक चौथा गुण । तरि मी विंजणा होईन । हरि अष्टांगें निववीन मना । ऐशा दृढ धरिन खुणा ॥ ४ ॥ आकाश पांचवा गुण । तरी मी प्रासादीं राहेन । बापरखुमादेविवरा । अखंड तुझे अनुसंधान ॥ ५ ॥

## श्रीसेनामहाराज

७१४ आम्ही विष्णुचे दास । न मानूं आणिक देवास ॥ १ ॥ स्तुति आणिकांची करितां । ब्रह्महत्या पडे माथा ॥ २॥ तुजविण देव म्हणतां । अवघीं पापें पडो माथां ॥ ३ ॥ न करी पूजा आणि सेवन । सेना म्हणे तुझी आण ॥ ४ ॥

---

# करुणापर

## श्रीतुकाराममहाराज

७१५ कासया गा मज घातलें संसारीं । चित्त पायावरी नाहीं तुझ्या ॥ १ ॥ कासया गा मज घातलें या जन्मा । नाहीं तुझा प्रेमा नित्य नवा ॥ २ ॥ नामाविण माझी वाणी अमंगळ । ऐसा कां

चांडाळ निर्मियेलों ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी जळो जळो काया । विठ्ठल सखया वांचूनिया ॥ ४ ॥

७१६ झालिया दर्शन करीन मी सेवा । आणीकही देवा नलगे दुजें ॥ १ ॥ प्रारब्धाआधीन अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवीं पायीं ॥ २ ॥ ये गा ये गा ये गा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरीं देऊनि भेटी ॥ ३ ॥ आसावलें मन जीवनाचे ओढी । नामरूपें गोडी लावियेली ॥ ४ ॥ काय तुम्हांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसें ॥ ५ ॥ काय लोखंडाचे पाहे गुण दोष । सिवोन परीस सोनें करी ॥ ६ ॥ तुका म्हणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ॥ ७ ॥

७१७ इच्छिती तयांसी व्हावें जी अरूप । आम्हासी स्वरूपस्थिती चाड ॥ १ ॥ आतां नव्हे माझा भाव अनारिसा । पाउलांनीं इच्छा गोवियेली ॥ २ ॥ लेंकरासी कोठें जाणत्याची परी । करूं येतें दुरी धरावया ॥ ३ ॥ लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भंगू नको ॥ ४ ॥ घेसी आढेवेढे भुक्तीच्या अभिलासें । चाळवी जा पिसे ब्रह्मज्ञानी ॥ ५ ॥ तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस । पाडावया ओस चाळविसी ॥ ६ ॥

७१८ संसारतापें तापलों मी देवा । करितां या सेवा कुटुंबाची ॥ १ ॥ म्हणऊनी तुझे आठविले पाय । ये वो माझे माय पांडुरंगे ॥ २ ॥ बहुता जन्मींचा झालों भारवाही । सुटिजे हें नाहीं वर्म ठावें ॥ ३ ॥ वेढियेलों चोरीं अंतर्बाह्यात्कारी । कणव न करी कोणी माझी ॥ ४ ॥ बहु पांगविलों बहु नागविलों । बहु दिवस झालों कासावीस ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां धांव घाली वेगीं । ब्रीद तुझें जगीं दीनानाथा ॥ ६ ॥

७१९ नलगे मायेसी बाळ निरवावें । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥ १ ॥ मज कां लागला करणें विचार । ज्याचा जार भार

त्याचे माथां ॥ २ ॥ गोड घड त्यासी टेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ ३ ॥ खेळाया गुंतलें उमगूनी आणी । बैसोनियां स्तनीं लावी बळें ॥ ४ ॥ त्याच्या दुःखें पडे आपण खापरीं । लाहो तळीं वरीं होय जैसी ॥ ५ ॥ तुका म्हणे देह विसरे आपुला । आघात तो त्याला लागों नेदी ॥ ६ ॥

७२० न घडे मायबापें बाळकाचा घात । आपणा देखत होऊं नेदी ॥ १ ॥ कां मी मनीं चिंता वाहुं भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ॥ २ ॥ वर्म जाणें त्याच्या हिताचे उपाय । तान भूक वाहे कडिये खांदीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ॥ ४ ॥

७२१ नेणे गति काय कवण अधोगती । मानिली निश्चिंती तुझ्या पायीं ॥ १ ॥ कर्म धर्म कोण नेणे हा उपाव । तुझ्या पायीं भाव ठेवियेला ॥ २ ॥ नेणें निरसूं पाप पुण्य नेणें काय । म्हणऊनि पाय धरिले तुझे ॥ ३ ॥ वेडा मी अविचार न कळे विचार । तुज माझा भार पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज करितां नव्हे काय । माझा तो उपाय कवण तेथें ॥ ५ ॥

७२२ ऐसें भाग्य कंई लाहातां होईन । अवघे देखें जन ब्रह्मरूप ॥ १ ॥ मग तया सुखा अंत नाहीं पार । आनंदें सागर हेलावती ॥२॥ शांति क्षमा दया मूर्तिमंत अंगीं । परावृत्त संगीं कामादिका ॥ ३ ॥ विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगितो ज्वाळ अग्नि जैसा ॥ ४ ॥ भक्ति नवविधा भाव शुद्ध वरी । अळंकारावरी मुगुटमणी ॥ ५ ॥ तुका म्हणे माझी पुरवी वासना । कोण नारायणा तुजविण ॥ ६ ॥

७२३ न पाहें माघारें आतां परतोनी । संसारापासूनि विटला जीव ॥ १ ॥ सामोरें येऊनि कवळीं दातारा । काळाचा हाकारा न साहावे ॥२॥ सावधान चित्त होईल आधारें । खेळतांही बरें वाटईल

॥ ४ ॥ तुका म्हणे कंठ दाटला या सोसें । न पवेचि कैसें जवळी हें ॥ ५ ॥

७२४ सिणलों दातारा करितां येरझारा । आतां सोडवीं संसारा पासोनिया ॥ १ ॥ न सुटेचि बाकी नव्हे झाडापाडा । घातलासें खोडा हाडांचिया ॥ २ ॥ मायबापें माझीं जिवाचीं सांगाती । तीं देतील हातीं काळाचिया ॥ ३ ॥ पडताळूनि सुरी बैसली सेजारी । यमफांसा करीं घेऊनियां ॥ ४ ॥ पाठी पोटीं एकें लागलीं सरसीं । नेती नरकापाशीं ओढूनिया ॥ ५ ॥ जन साह्यभूत असें या सकळां । मी एक निराळा परदेशीं ॥ ६ ॥ कोणा काकुलती नाहीं कोणे परी । तुजविण हरी कृपाळुवा ॥ ७ ॥ तुका म्हणे मज तुझाचि भरंवसा । म्हणऊनि आशा मोकलिली ॥ ८ ॥

७२५ स्त्रीपुत्रादिकीं राहिला आदर । विषयीं पडिभर अतिशय ॥ १ ॥ आतां सोडवणें धांवा नारायणा । मज हे वासना अनावर ॥ २ ॥ येऊनियां आड ठाके लोकलाज । तें हें दिसे काज अंतरलें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां जेथें जेथें गोवा । तेथें तुम्हीं देवा सांभाळावें ॥ ४ ॥

७२६ कैसा तो देखिला होसील गोपाळीं । पुण्यवंतीं डोळीं नारायणा ॥ १ ॥ तेणें लोभें जीव झालासे बराडी । आम्ही ऐसी जोडी कई लाभों ॥ २ ॥ असेल तें कैसें दर्शनाचें सुख । अनुभवें श्रीमुख अनुभावितां ॥ ३ ॥ तुका म्हणे वाटे देसी आलिंगन । अवस्था ते क्षणक्षणा होते ॥ ४ ॥

७२७ ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठी लागे ॥ १ ॥ म्हणोनियां अवघे सांडिले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ २ ॥ वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकामधीं ॥ ३ ॥ पाहो गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखे चेष्टा विपरीत ॥ ४ ॥ आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । योगी करिती रागें गुरगुरू ॥ ५ ॥

तुका म्हणे मज कोणाचा पांगिला । नको वा विठ्ठला करूं आतां ॥६॥

७२८ काम क्रोध माझे जीताती शरीरीं । कोवळें ते वरी बोलतसें ॥ १ ॥ कैसा मी सरता झालों तुझ्या पायीं । पांडुरंगा कांहीं न कळे हें ॥ २ ॥ पुराणींची ग्वाही वदतील संत । तैसें नाहीं चित्त शुद्ध झालें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज आणूनि अनुभवा । दाखवीं हें देवा साच खरें ॥ ४ ॥

७२९ तुमचे स्तुतियोग्य कोठें माझी वाणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ १ ॥ भक्तिभाग्य तरी नेदीं तुळसी दळ । जोडून अंजुळ उभा असे ॥ २ ॥ कैचें भाग्य ऐसें पाविजे संनिध । नेणे पाळूं विध करुणा भाकीं ॥ ३ ॥ संतांचे सेवटीं उच्छिष्टाची आस । करुनियां वास पाहतसें ॥ ४ ॥ करीं इच्छा मज ह्मणोत आपुलें । एखादिया बोलें निमित्याच्या ॥ ५ ॥ तुका म्हणे शरण आलों हें साधन । करितों चिंतन रात्रंदिवस ॥ ६ ॥

७३० माझे मज कळों येती अवगुण । काय करूं मन अनावर ॥ १ ॥ आतां आड उभा राहे नारायणा । दयासिंधुपणा साच करीं ॥ २ ॥ वाचा वदे परी करणें कठीण । इंद्रिया आधीन झालों देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास । न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥

७३१ कनवाळू कृपाळु भक्तांलागीं मोही । गजेंद्राचा धांवा तुवां केला विठाई ॥ १ ॥ पांडुरंगे येवो पांडुरंगे । जीवाचे जिवलगे ये वो पांडुरंगे ॥ २ ॥ भक्तांच्या कैवारें कष्टलीस विठ्ठले । आंबऋषी कारणें जन्म दाहा घेतले ॥ ३ ॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार केला । विदारूनि दैत्य प्रेमपान्हा पाजिला ॥ ४ ॥ उपमन्याकारणें कैसी धांवसी लवलाहीं । पाजी प्रेमपान्हा क्षीरसागराठायीं ॥ ५ ॥ कौरवीं पांचाळी सभेमाजी आणिली । वस्त्रहरणीं वस्त्रें कैसी झाली माऊली ॥ ६ ॥ दुर्वास पातला धर्मा छळावया वनीं । धांवसी लव-

लाहीं शाखादेठ घेऊनि ॥ ७ ॥ कृपाळू माऊली भुक्तिमुक्ति भांडार । करी माझा अंगीकार तुका म्हणे विठ्ठले ॥ ८ ॥

७३२ माये मोकलिले कोठें जावें बाळें । आपुलिया बळें न वंचे तें ॥ १ ॥ रुसोनियां पळे सांडुनियां ताट । मागें पाहे वाट यावें ऐसी ॥ २ ॥ भांडवल आम्हा आळी करावी हें । आपणची माये धावसील ॥ ३ ॥ तुका म्हणे आळी करूनिया निकी । देसील भातुकी वुझाऊनि ॥ ४ ॥

७३३ धरूनियां सोई परतलें मन । अनुलक्षीं चरण करूनियां ॥ १ ॥ येई पांडुरंगे नेई सांभाळुनि । करुणावचनीं आळवितों ॥ २ ॥ बुद्धि झाली साह्य परि नाहीं बळ । अवलोकितों जळ वाहे नेत्रीं ॥ ३॥ न चलती पाय गळित झाली काया । म्हणऊनि दया येऊं द्यावी ॥४॥ दिशेच्या करितों वारियासी मात । जोडुनिया हात वाट पाहें ॥ ५ ॥ तुका म्हणे वेग करावा सत्वर । पावावया तीर भवनदीचें ॥ ६ ॥

७३४ मायबापापुढें लाडिकें लेकरूं । तैसे बोल करूं कवतुकें ॥ १ ॥ कृपावंता घालीं प्रेमपान्हारस । वोळली वोरस पांडुरंगा ॥ २ ॥ नाहीं धीर खुंटी जवळी हुबंरे । ठायींच पाखर कवाळिते ॥ ३ ॥ तुका म्हणे मज होऊं नेदी शीण । कळों नेदि भिन्न आहे ऐसें ॥ ४ ॥

७३५ तुझारे विसर नको माझिया जीवा । क्षण एक केशवा मायबापा ॥ १ ॥ जावो राहो देह आतां येचि घडी । कायसी आवडी याची मज ॥ २ ॥ कुश्चिल इंद्रियें आपुलिया गुणें । यांचिया पाळणें कोण हित ॥ ३ ॥ पुत्र पत्नी बंधु सोयरीं खाणोरीं । यांचा कोण धरी संग आतां ॥ ४ ॥ पिंड हा उसना आणिला पांचांचा । सेखीं लागे ज्याचा त्यासी देणें ॥ ५ ॥ तुका म्हणे नाहीं आणिक सोयरें । तुजविण दुसरें पांडुरंगा ॥ ६ ॥

७३६ आम्ही जाणावें तें काई तुझें वर्म कोणें ठायीं । अंतपार नाहीं ऐसें श्रुती बोलती ॥ १ ॥ होई मज तैसा मज तैसा साना

सकुमार हृषीकेशा । पुरवीं माझी आशा भुजा चारी दाखवीं ॥ २ ॥ खालता सप्तही पाताळा वरता स्वर्गाहूनि ढिसाळा । तो मी मशक डोळा कैसा पाहों आपुल्या ॥ ३ ॥ मज असे हा भरंवसा पढीयें होसी तयां तैसा । पंढरीनिवासा तुका म्हणे गा विठोबा ॥ ४ ॥

७३७ तुज घालोनियां पूजितों संपुष्टीं । परि तुझ्या पोटीं चवदा भुवनें ॥ १ ॥ तुज नाचऊनि दाखवूं कौतुका । परी रूपरेखा नाहीं तुज ॥ २ ॥ तुजलागीं आम्ही गात असों गीत । परी तूं अतीत शब्दाहूनि ॥ ३ ॥ तुजलागीं आम्हीं घातियेल्या माळा । परि तूं वेगळा कर्तृत्वासी ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां होऊनि परिमित । माझें कांहीं हित विचारावें ॥ ५ ॥

७३८ मौन कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देईं माझ्या ॥ १ ॥ तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य । तूं माझें प्राचीन पांडुरंगा ॥ २ ॥ तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूंचि नित्यनेम नारायणा ॥ ३ ॥ कृपावचनाची वाट पाहातसें । करूणावोरसें बोल कांहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोल सर्वोत्तमा मजसवें ॥ ५ ॥

७३९ कांजी आम्हां होतें दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥ १ ॥ पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळही ॥ २ ॥ कां जी आम्हांवरि आणिकांची सत्ता । तुम्हांसी असतां जवळिकें ॥ ३ ॥ तुका म्हणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥ ४ ॥

७४० कईं ऐसी दशा येईल माझ्या आंगा । चित्त पांडुरंगा स्फुरतसे ॥ १ ॥ नाठउनी देह पायांचें चिंतन । अवसान तें क्षण नाहीं मध्यें ॥ २ ॥ काय ऐसा पात्र होईन लाभासी । कईं हृषीकेशी तुष्टतिल ॥ ३ ॥ तुका म्हणे धन्य मानीन संचीत । घेईन नित्यानित्य प्रेमसुख ॥ ४ ॥

७४१ कोठें गुंतलासी योगीयांचे ध्यानीं। आनंदें कीर्तनीं पंढरीच्या ॥ १ ॥ काय काज कोठें पडलीसे गुंती। कानीं न पडती बोल माझे ॥ २ ॥ काय शेषशयनीं सुखनिद्रा आली। सोय कां सांडिली तुम्ही देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोठें गुंतलेती सांगा। किती पांडुरंगा वाट पाहूं ॥ ४ ॥

७४२ कोठें गुंतलासी कोणाच्या धांवया। आली देवराया निद्रा तुज ॥ १ ॥ कोठें गुंतलासी भक्तिप्रेमसुखें। न सुटती मुखें गोपिकांची ॥ २ ॥ काय पडलें तुज कोणाचें संकट। दुरी पंथवाट न चालवे ॥ ३ ॥ काय माझे तुज गुणदोष दिसती। म्हणोनि श्रीपती कोपलासी ॥ ४ ॥ काय झालें सांग माझीया कपाळा। उरला जीव डोळां तुका म्हणे ॥ ५ ॥

७४३ सत्य तूं सत्य तूं सत्य तूं विठ्ठला। कां गा हा दाविला जगदाकार ॥ १ ॥ सांभाळी सांभाळी आपुली हे माया। आम्हांसी कां भयाभीत केलें ॥ २ ॥ रूप नाहीं त्यासी ठेवियेलें नाम। लटकाची श्रम वाढविला ॥ ३ ॥ तुका म्हणे कां गा झालासी चतुर। होतासी निष्ठुर निर्विकार ॥ ४ ॥

७४४ तुज म्हणतील कृपेचा सागर। तरि कां केला धीर पांडुरंगा ॥ १ ॥ आझुनि कां नये तुज माझी दया। काय देवराया पाहातोसी ॥ २ ॥ आळवितों जैसें पाडस कुरंगिणी। पीडिलिया वनीं तानभूक ॥ ३ ॥ प्रेमरसपान्हा पाजी माझे आई। धावे वो विठाई वोरसोनि ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें कोण हरी दुःख। तुजविण एक पांडुरंगा ॥ ५ ॥

७४५ येईं गा विठ्ठला येईं गा विठ्ठला। प्राण हा फुटला आळवितां ॥ १ ॥ पडियेलों वनीं थोर चिंतवनी। उशीर कां अजुनी लावियेला ॥ २ ॥ काय तुज नाहीं लौकिकाचीं शंका। आपुल्या बाळका मोकलितां ॥ ३ ॥ तुका म्हणे बहु खंती वाटे जिवा। धरीयेलें देवा दुरी दिसे ॥ ४ ॥

७४६ माझ्या इंद्रियांसी लागलें भांडण । म्हणताती कान रसना धाली ॥ १ ॥ करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥ २ ॥ गुण गाये मुख आइकती कान । आमुचें कारण तैसें नव्हे ॥ ३ ॥ दर्शनें फिटे सकळांचा पांग । जेथें ज्याचा भाग घेईल तें ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसें करी नारायणा । माझी ही वासना ऐसी आहे ॥ ५ ॥

७४७ कां हों पांडुरंगा न करा धावणें । तरी मज कोणें सोडवावें ॥ १ ॥ तुझा म्हणवूनी आणिकापें उभा । राहों हे तों शोभा नेदीं आतां ॥ २ ॥ काळें पुरविली पाठी दुरवरी । पुढें पायां धीरीं राहों नेदी ॥ ३ ॥ नको आणूं माझें संचित मनासीं । पावन आहेसी पतिता तूं ॥ ४ ॥ तुका म्हणे चाले आणिकांची सत्ता । तुज आळवितां नवल हें ॥ ५ ॥

७४८ भागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आश्वासीजे ॥ १ ॥ देऊनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें हीं दातारें निववावीं ॥ २ ॥ अमृताची दृष्टी घालूनिया वरी । शीतळ हा करी जीव माझा ॥ ३ ॥ घेई उचलूनि पुसें तानभुक । पुसीं माझें मुख पितांबरें ॥ ४ ॥ बुझाओनी माझी धरी हनुवटी । ओंवाळुनी दिठी करूनी सांडी ॥ ५ ॥ तुका म्हणे बाप्पा अहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥ ६ ॥

७४९ येऊनी जाऊनी पाहें तुजकडे । पडिल्या सांकडें नारायणा ॥ १ ॥ आणीक कोणाचा मज नाहीं आधार । तुजवरी भार जीवें-भावें ॥ २ ॥ निष्ठुर अथवा होईं तूं कृपाळ । तुज सर्व काळ विसरेना ॥ ३ ॥ आपुलें वचन राहावें सांभाळून । तुम्हां आम्हां जाण पडिपाड ॥ ४ ॥ ज्याच्या वचनासी अंतर पडेल । बोल तो होईल तयाकडे ॥ ५ ॥ तुह्मां आम्हां तैसें नाहीं म्हणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥ ६ ॥

७५० बाळ मातेपाशीं सांगे तानभूक । उपायाचें दुःख काय जाणे ॥ १ ॥ तयापरी करी पाळण हें माझें । घेऊनियां ओझें सकळ भार ॥ २ ॥ कासया गुणदोष आणिसील मना । सर्व नारायणा अपराधी ॥ ३ ॥ सेवाहीन दीन पातकांची रासी । आतां विचारिसी काय ऐसें ॥ ४ ॥ जेणें काळें पायीं अनुसरलें चित्त । निर्धार हें हित झालें ऐसें ॥ ५ ॥ तुका म्हणे तुम्हीं तारिलें बहुतां । माझी कांहीं चिंता असो द्यावी ॥ ६ ॥

७५१ मागें शरणागत तारिले बहुत । ह्मणती दीनानाथ तुज देवा ॥ १ ॥ पाहिले अपराध नाहीं याती कुळ । तारिला अजामेळ गणिका भिल्ली ॥ २ ॥ आढळपदीं बाळ बैसविला ध्रुरु । क्षीराचा सागरु उपमन्या ॥ ३ ॥ गजेंद्रपशू नाडिला जळचरें । भवसिंधुपार उतरिला ॥ ४ ॥ प्रल्हाद अग्नींत राखिला जळांत । विषाचें अमृत तुझ्या नामें ॥ ५ ॥ पांडवां संकट पडतां जडभारी । त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ ६ ॥ तुका म्हणे तूं या अनाथाचा नाथ । ऐकोनियां मात शरण आलों ॥ ७ ॥

७५२ साच मज काय कळों नये देवा । काय तुझी सेवा काय नव्हे ॥ १ ॥ करावें तें बरें जेणें समाधान । सेवावें हें वन न बोलावें ॥ २ ॥ शुद्ध माझा भाव होईल तुझे पायीं । तरीच हें देई निवडूनी ॥ ३ ॥ उचित अनुचित कळों आली गोष्टी । तुझे कृपादृष्टी पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका म्हणे मज पायांसवें चाड । सांगसी तें गोड आहे मज ॥ ५ ॥

७५३ तुझा शरणांगत झालों मी अंकीत । करीं माझें हित पांडुरंगा ॥ १ ॥ पतितपावन तुझी ब्रीदावळी । तें आतां सांभाळी मायबापा ॥ २ ॥ अनाथाचा नाथ बोलतील संत । ऐकोनियां मात विश्वासलों ॥ ३ ॥ न करावी निरास न धरावें उदास । देई याच-

कास कृपादान ॥ ४ ॥ तुका म्हणे मी तो पातकांची राशी । देई पायापासीं ठाव देवा ॥ ५ ॥

७५४ नको ब्रह्मज्ञान आत्मस्थीती भाव । मी भक्त तूं देव ऐसें करी ॥ १ ॥ दावी रूप मज गोपिकारमणा । ठेवूं दे चरणावरी माथा ॥ २ ॥ पाहीन श्रीमुख देईन आलिंगन । जीवें निंबलोण उतरीन ॥३॥ पुसतां सांगेन हितगुज मात । बैसोनीं एकांत सुख गोष्टी ॥ ४ ॥ तुका म्हणे यासी न लावी उशीर । माझें अभ्यंतर जाणोनिया ॥ ५ ॥

७५५ तुझा दास ऐसा म्हणती लोकपाळ । म्हणऊनी सांभाळ करीं माझा ॥ १ ॥ अनाथाचा नाथ पतित पावन । हें आतां जतन करीं नाम ॥ २ ॥ माझे गुणदोष पाहतां नलगे अंत । ऐसें माझें चित्त मज ग्वाही ॥ ३ ॥ नेणें तुझी कैसी करावी हे सेवा । जाणसी तूं देवा अंतरींचे ॥ ४ ॥ तुका म्हणे तूं या कृपेचा सिंधु । तोडी भवबंधू माझा देवा ॥ ५ ॥

७५६ इतुलें करीं देवा ऐकें हें वचन । समूळ अभिमान जाळी माझा ॥ १ ॥ इतुलें करीं देवा ऐकें हें गोष्टी । सर्व समदृष्टी तुज देखें ॥ २ ॥ इतुलें करी देवा विनवितों तुज । संतचरणरज वंदीं माथा ॥ ३ ॥ इतुलें करी देवा ऐकें हे मात । हृदयीं पंढरीनाथ दिवसरात्रीं ॥ ४ ॥ भलतिया भावें तारीं पंढरीनाथा । तुका म्हणे आतां शरण आलों ॥ ५ ॥

७५७ कोण आम्हा पुसे सिणले भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ॥ १ ॥ कोणापाशीं आम्हीं सांगावें सुखदुःख । कोण तानभूक निवारील ॥ २ ॥ कोण या तापाचा करील परिहार । उतरील पार कोण दुजा ॥ ३ ॥ कोणापें इच्छेचें मागावें भातुकें । कोण कवतुकें बुझाविल ॥ ४ ॥ कोणावरी आम्हीं करावी हे सत्ता । होईल साहाता कोण दुजा ॥ ५ ॥ तुका म्हणे अगा स्वामी सर्वजाणा । दंडवत चरणा तुमच्या देवा ॥ ६ ॥

७५८ काय कीर्ति करूं लोक दंभ मान । दाखवी चरण तुझे मज ॥ १ ॥ मज आतां ऐसें नको करूं देवा । तुझा दास जावा वांयां-विण ॥ २ ॥ होईल थोरपण जाणीवेचा फार । दुरावेन दूर तुझ्या पायीं ॥ ३ ॥ अंतरींचा भाव काय कळे लोकां । एक मानीं एकां देखोदेखीं ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझे पाय आतुडती । ते मज विपत्ती गोड देवा ॥ ५ ॥

७५९ वेदपुरुष तरि नेती कां वचन । निवडोनि भिन्न दाखविलें ॥ १ ॥ तुझी वर्मे तूंचि दावूनि अनंता । होतासी नेणता कोणा गुणें ॥ २ ॥ यज्ञाचा भोक्ता तरि कां नव्हे सांग । उणे पडता अंग क्षोभ घडे ॥ ३ ॥ वससी तूं या भूतांचे अंतरी । तरि कां भेद हरि दावि-येला ॥ ४ ॥ तपातिर्थाटनें तुझे मुर्तिदान । तरि कां अभिमान आड येतो ॥ ५ ॥ आतां क्षमा कीजे विनवितो तुका । देऊनिया हाका उभा द्वारीं ॥ ६ ॥

७६० आमुची कां नये तुम्हासी करुणा । किती नारायणा आळ-वावें ॥ १ ॥ काय जाणा तुम्हीं दुर्बळांचें जिणें । वैभवाच्या गुणे आपुलिया ॥ २ ॥ देती घेती करिती खटपटा आणिकें । निराळा कौतुकें पाहोनिया ॥ ३ ॥ दिवस वोटी आम्ही धरियेलें माप । वाहतों संकल्प स्वहिताचा ॥ ४ ॥ तुका म्हणे मग देसीं कोण्या काळें । चुकुर दुर्बळें होतों आम्ही ॥ ५ ॥

७६१ आळवितां कंठ शोकला भीतर । आयुष्य वेंचे धीर नाहीं मना ॥ १ ॥ अझून कां नये हें तुझ्या अंतरा । दिनाच्या माहेरा पांडुरंगा ॥ २ ॥ धन दिसे डोळां दगडाचे परी । भोग ते शरीरीं विष झालें ॥ ३ ॥ चुकलों काय तें मज क्षमा करीं । आलिंगूनि हरी प्रेम द्यावें ॥ ४ ॥ अवस्था राहिली रूपाची अंतरी । बाहेर भीतरीं सर्व-काळ ॥ ५ ॥ तुका म्हणे माझे सकळ उपाय । पांडुरंगा पाय तुझे आतां ॥ ६ ॥

७६२ पोटीं शूळ अंगीं उटी चंदनाची । आवडी सुखाची कोण तया ॥ १ ॥ तैसें मज कांगा केलें पंढरिराया । लौकिक हा वांयां वाढविला ॥ २ ॥ ज्वारिलियापुढें वाढिलीं मिष्टान्नें । काय चवी तेणें घ्यावी त्यांची ॥ ३ ॥ तुका म्हणे मढें शृंगारिलें वरी । तेचि झालों परी मज देवा ॥ ४ ॥

७६३ आतां होईं माझे बुद्धीचा जनिता । आवरावें चित्ता पांडुरंगा ॥ १ ॥ येथूनियां कोठें न वजें बाहेरी । ऐसें मज धरीं सत्ताबळें ॥ २ ॥ अनावर गुण बहुतां जातींचे । न बोलावें वाचे ऐसें करीं ॥ ३ ॥ तुका म्हणे हित कोणिये जातीचें । तुज ठावें साचें मायबापा ॥ ४ ॥

७६४ प्रीतिचिया बोला नाहीं पेचपाड । भलतैसें गोड करूनि घेई ॥ १ ॥ तैसें विठ्ठलराया तुज मज आहे । आवडीनें गाय नाम तुझें ॥ २ ॥ वेडें वाकडें बाळकाचे बोल । करिती नवल मायबाप ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज येवो माझी दया । जीवींच्या सखया जिवलगा ॥ ४ ॥

७६५ पतित मी पापी शरण आलों तुज । राखीं माझी लाज पांडुरंगा ॥ १ ॥ तारियेले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥ २ ॥ द्रौपदी बहिणी वैरीं गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा ॥ ३ ॥ प्रल्हादाकारणें स्तंभीं अवतार । माझा कां विसर पांडुरंगा ॥ ४ ॥ सुदामा ब्राह्मण दारिद्रें पीडीला । आपणाऐसा केला पांडुरंगा ॥ ५ ॥ तुका म्हणे तुज शरण निजभावें । पाप निर्दाळावें पांडुरंगा ॥ ६ ॥

७६६ तुजलागीं माझा जीव झाला पिसा । अवलोकितां दिशा पांडुरंगा ॥ १ ॥ सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंद निरंतर हाचि मनीं ॥ २ ॥ आइकिलें कानीं तें रूप लोचन । देखावया सीण करिताती ॥ ३ ॥ प्राण हा विकळ होय कासाविस । जीवनाविण

मत्स्य तया परी ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां कोण तो उपाय । करूं तुझे पाय आतुडे तो ॥ ५ ॥

७६७ एक वेळा करीं या दुःखा वेगळें । दुरिताचे जाळें उगवूनि ॥ १ ॥ आठविन पाय हा माझा नवस । रात्री आणी दिवस पांडुरंगा ॥ २ ॥ बहु दूरवरि भोगाविलें भोगा । आतां पांडुरंगा सोडवावें ॥ ३ ॥ तुका म्हणे काया करीन कुरवंडी । ओंवाळूनि सांडीं मस्तक हें ॥ ४ ॥

७६८ आणीक म्यां कोणा यावें काकुळती । कोण कामा येती अंतकाळीं ॥ १ ॥ तूं वो माझी सखी होसी पांडुरंगे । लवकरी ये गे वाट पाहें ॥ २ ॥ काया वाचा मनें हेचि आस करी । पाऊलें गोजिरीं चिंतीतसें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी पुरवी हे आस । घाली ब्रह्मरस भोजन हें ॥ ४ ॥

७६९ पांडुरंगे पांडुरंगे । माझे गंगे माउलिये ॥ १ ॥ पान्हा वाली प्रेमधारा । पूर क्षीरा लोटों दे ॥ २ ॥ अंगें अंग मेळउनी । करीं धणी फेडाया ॥ ३ ॥ तुका म्हणे घेईन उड्या । सांडिन कुड्या भावना ॥ ४ ॥

७७० जाणतें लेकरूं । माता लागे दूर धरूं ॥ १ ॥ तैसें न करीं कृपावंते । पांडुरंगे माझे माते ॥ २ ॥ नाहीं मुक्ताफळा । भेटी मागुती त्या जळा ॥ ३ ॥ तुका म्हणे लोणी । ताक सांडी निवडूनि ॥ ४ ॥

७७१ गरुडाचे पायीं । ठेवीं वेळो वेळां डोई ॥ १ ॥ वेगें आणावा तो हरी । मज दीनातें उद्धरी ॥ २ ॥ पाय लक्ष्मीचे हाती । तिसी यावें काकुळती ॥ ३ ॥ तुका म्हणे शेषा । जागे करा हृषीकेशा ॥ ४ ॥

७७२ गंगा गेली सिंधुपाशीं । जरी तो ठाव नेदी तिशीं ॥ १ ॥ तिणें जावें कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥ २ ॥ जळ क्षोभलें जळचरा । माता बाळा नेदी थारा ॥ ३ ॥ तुका म्हणे आलों शरण । देवा त्वां कां धरिलें मौन ॥ ४ ॥

७७३ तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥ १ ॥ धरणें घेतलें दारांत । नको धरून उठवूं हात ॥ २ ॥ बहु झालो लंड । पायीं

घातली मुरकुंड ॥ ३ ॥ तुका म्हणे जगजीवना । ब्रीद राखीं नारायणा ॥ ४ ॥

७७४ शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ॥ १ ॥ भावें आलों लोटांगणीं । रूळें तुमचे चरणीं ॥ २ ॥ सांडियेली काया । वरि ओवाळूनि पायां ॥ ३ ॥ तुका म्हणे शीर । ठेवियेलें पायांवर ॥ ४ ॥

७७५ उच्चारूं यासाठीं । आम्ही नाम तुझे कंठीं ॥ १ ॥ येसी धांवत धांवत । माउलिये कृपावंत ॥ २ ॥ पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ॥ ३ ॥ तुका म्हणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगें ॥ ४ ॥

७७६ न करी उदास । माझी पुरवावी आस ॥ १ ॥ ऐका ऐका नारायणा । माझी परिसा विज्ञापना ॥ २ ॥ मायबाप बंधुजन । तूंचि सोयरा सज्जन ॥ ३ ॥ तुका म्हणे तुजविरहित । माझें कोण करी हित ॥ ४ ॥

७७७ बुद्धिहिन जडजीवा । नका देवा उपेक्षूं ॥ १ ॥ परिसावी विज्ञापना । आम्हां दीनां दासांची ॥ २ ॥ चिंतुनियां आले पाय । त्यांसी काय वंचन ॥ ३ ॥ तुका म्हणे पुरुषोत्तमा । करी क्षमा अपराध ॥ ४ ॥

७७८ धेनु चरे वनांतरीं । चित्त बाळकापें घरीं ॥ १ ॥ तैसें करीं वो माझें आई । ठाव देउनि राखे पायीं ॥ २ ॥ काढितां तळमळी । जिवनावेगळी मासोळी ॥ ३ ॥ तुका म्हणे कुडी । जीवाप्राणांची आवडी ॥ ४ ॥

७७९ येगा येगा पांडुरंगा । घेईं उचलुनी वोसंगा ॥ १ ॥ ऐसी असोनियां वेसी । दिसतों मी परदेसी ॥ २ ॥ उगवूनी गोवा । सोडवूनि न्यावें देवा ॥ ३ ॥ तुज आड कांहीं । बळ करी ऐसें नाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे हृषीकेशी । काय उशीर लाविलासी ॥ ५ ॥

७८० माझें जीवन तुझे पाय । कृपाळु तूं माझी माय ॥ १ ॥ नेदी

दिसों केवीलवाणें । पांडुरंगा तुझें तान्हें ॥ २ ॥ जन्ममरण तुजसाठीं । आणीक नेणें दुजी गोष्टी ॥ ३ ॥ तुका म्हणे तुजविण । कोण हरिल माझा सीण ॥ ४ ॥

७८१ आतां घेई माझें । भार सकळही ओझें ॥ १ ॥ काय करिसी होई वाड । आलों पोटासी दगड ॥ २ ॥ तूंचि डोळे वाती । होई दीपक सांगाती ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । विचाराया चाड नाहीं ॥ ४ ॥

७८२ संत मानितील मज । तेणें वाटतसे लाज ॥ १ ॥ तुम्हीं कृपा केली नाहीं । चित्त माझें मज ग्वाही ॥ २ ॥ गोविलों थोरिवा । दुःख वाटतसे जीवा ॥ ३ ॥ तुका म्हणे माया । आवरा हे पंढरीराया ॥ ४ ॥

७८३ पापाची मी राशी । सेवाचोर पायांपाशीं ॥ १ ॥ करा दंड नारायणा । माझ्या मानाची खंडणा ॥ २ ॥ जनाहातीं सेवा । घेतों लंडपणे देवा ॥ ३ ॥ देव ना संसार । तुका दोहींकडे चोर ॥ ४ ॥

७८४ गातों भाव नाहीं अंगीं । भूषण करावया जगीं ॥ १ ॥ परि तूं पतितपावन । करि साच हें वचन ॥ २ ॥ मुखें म्हणवितों दास । चित्तीं माया लोभ आस ॥ ३ ॥ तुका म्हणे दावीं वेष । तैसा अंतरी नाहीं लेश ॥ ४ ॥

७८५ करा नारायणा । माझ्या दुःखाची खंडणा ॥ १ ॥ वृत्ती राखा पायांपाशीं । वस्ती धरूनि मानसीं ॥ २ ॥ पाळोनिया ळळा । आतां पाववावे फळा ॥ ३ ॥ तुका म्हणे दीनें । त्यांचा हरातिया शीण ॥ ४ ॥

७८६ क्रियामतिहीन । एक मी गा तुझे दीन ॥ १ ॥ देवा करावा सांभाळ । वारी माझी तळमळ ॥२॥ नको माझे ठायीं । गुण दोष घालूं कांहीं ॥ ३ ॥ अपराधांच्या कोटी । तुका म्हणे घाला पोटीं ॥ ४ ॥

७८७ तुझे थोर थोर । भक्त करिती विचार ॥ १ ॥ जपतपादि साधनें । मज चिंतवेना मनें ॥ २ ॥ करुणावचनें । म्या भाकावीं

तुम्हां दीनें ॥ ३ ॥ तुका म्हणे घेई । माझें थोडें फार ठायीं ॥ ४ ॥

७८८ आयुष्य गेलें वायांविण । थोर झाली नागवण ॥ १ ॥ आतां धांवें धांवें तरी । काय पाहातोसी हरी ॥ २ ॥ माझे तुझे याचि गती । दिवस गेले तोंडीं माती ॥ ३ ॥ मन वाव घेऊं नेदी । बुडवूं पाहे भवनदी ॥ ४ ॥ पडिला विषयाचा घाला । तेणें नागविलें मला ॥ ५ ॥ शरण आलों आतां धांवें । तुका म्हणे मज पावें ॥ ६ ॥

७८९ विठ्ठल माझी माय । आम्हां सुखा उणें काय ॥ १ ॥ घेतों अमृताचि धनी । प्रेम वोसंडलें स्तनीं ॥ २ ॥ क्रीडों वैष्णवांच्या मेळीं । करूं आनंदाच्या जळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपावंत । ठेवी आम्हापाशीं चित्त ॥ ४ ॥

७९० कोड आवडीचें । पुरवीना बाळकाचें ॥ १ ॥ तेंव्हा कैसी ते माऊली । जाणा कशासाठीं व्याली ॥ २ ॥ वत्साचिये आसे । धेनु धांवेना वोरसें ॥ ३ ॥ तुका म्हणे घरीं । बाळ टाकिलें वानरीं ॥ ४ ॥

७९१ आपुल्या महिमानें । धातु परिसें केलें सोनें ॥ १ ॥ तैसे न मनीं माझें आतां । गुणदोष पंढरिनाथा ॥ २ ॥ गांवाखालील ओहळ । गंगा न मनी अमंगळ ॥ ३ ॥ तुका म्हणे माती । केली कस्तूरीनें सरती ॥ ४ ॥

७९२ कांहीं बोलिलें बोबडें । मायबापा तुम्हा पुढें । सलगी लाडें कोडें । मज क्षमा करावी ॥ १ ॥ काय जाणावा महिमा । तुमचा म्यां पुरुषोत्तमा । आवडीनें सीमा । सांडविली मज-हातीं ॥ २ ॥ घडे अवज्ञा सख्यत्वें । बाळें बापासी न भ्यावें । काय म्यां सांगावें । आहे ठावें तुम्हांसी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । प्रेम-लोभ न संडावा । पाळिला पाळावा । लळा पुढती आगळा ॥ ४ ॥

७९३ याती हीन मति हीन कर्म हीन माझें । सर्व लज्जा सांडो-नीयां शरण आलों तुज ॥ १ ॥ येई गा तूं मायबापा पंढरीच्या राया ।

तुजविण सीण वाटे क्षीण झाली काया ॥ २ ॥ दीननाथ दीनबंधू नाम तुम्हां साजे । पतितपावन नाम ऐसी ब्रीदावळी गाजे ॥ ३ ॥ विटेवरी नीट उभा कटावरी कर । तुका म्हणे हेंचि आम्हां ध्यान निरंतर ॥ ४ ॥

७९४ प्रपंच वोसरो । चित्त तुझे पायीं मुरो ॥ १ ॥ ऐसें करिगा पांडुरंगा । शुद्ध रंगवावें रंगा ॥ २ ॥ पुरे धुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥ ३ ॥ लटिकें तें फेडा । तुका म्हणे जाय पीडा ॥ ४ ॥

७९५ काय ज्ञानेश्वरीं उणें । तिहीं पाठविलें धरणें ॥ १ ॥ ऐकोनिया लिखीत । म्हूण जाणवली हे मात ॥ २ ॥ तरी जाणे धणी । वदे सेवकाची वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे ठेवा । होता सांभाळावें देवा ॥ ४ ॥

७९६ पाप ताप माझे गुणदोष निवारीं । कृष्णा विष्णु हरी नारायणा ॥ १ ॥ कामक्रोध वैरी घालोनी बाहेरी । तूं राहे अंतरीं पांडुरंगा ॥ २ ॥ करिशील तरी नव्हे कांहीं एक । निर्मिलें त्रैलोक्य हेळामात्रें ॥ ३ ॥ समर्थासी काय आह्मीं शिकवावें । तुका म्हणे यावें पांडुरंगा ॥ ४ ॥

७९७ बौद्ध अवतार माझिया अदृष्टा । मौन्य मुखें निष्ठा धरियेली ॥ १ ॥ लोकांचियेसाठीं शाम चतुर्भुज । संतांसवें गुज बोलतसां ॥ २ ॥ आलें कलियुग माझिया संचिता । डोळां हाकलिता न पडेसी ॥ ३ ॥ म्यांच तुझें काय केलें नारायणा । कां नये करुणा तुका म्हणे ॥ ४ ॥

७९८ तूं माऊलीहून मवाळ । चंद्राहूनि शीतळ । पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ॥ १ ॥ देऊं कासाची उपमा । दुजी तुज पुरुषोत्तमा । ओवाळूनि नामा । तुझ्यावरूनि टाकिलों ॥ २ ॥ तुवां केलेंरे अमृता । गोड त्या ही तूं परतां । पांचा तत्वांचा जनिता । सकळ सत्तानायक ॥ ३ ॥ कांहीं न बोलोनि आतां । उगाच चरणी

ठेवितों माथां । तुका म्हणे पंढरीनाथा । क्षमा करीं अपराध ॥ ४ ॥

७९९ मी अवगुणी अन्यायी । किती म्हणोन सांगो काई । आतां मज पायीं । ठाव देई विठ्ठले ॥ १ ॥ पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर । राहों नेदी स्थिर । एके ठायीं निश्चळ ॥ २ ॥ अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग । धरूं जातां संग । तव तो होतो बाधक ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । अवघी तोडी माझी चिंता । येऊनी पंढरीनाथा । वास करीं हृदयीं ॥ ४ ॥

८०० आळी करावी तें कळतें बाळका । बुझवावें हें का नेणा तुम्ही ॥ १ ॥ निवाड तो तेथें असे पायांपाशीं । तुम्हां आम्हां विशीं एके ठायीं ॥ २ ॥ आणीक तों आम्ही न देखोंसे झालें । जाणावें शिणलें भागलेंसें ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्हां लागतें सांगावें । अंतरींचें ठावें काय नाहीं ॥ ४ ॥

८०१ कासया वांचूनि झालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥ १ ॥ जातां भलें काय डोळियांचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥ २ ॥ काय मुख पेंव श्वापदाचें धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥ ४ ॥

८०२ बाळ माते निष्ठुर होये । परी ते स्नेह करीत आहे ॥ १ ॥ तैसा तूं गा पुरुषोत्तमा । घडी न विसंबसी आम्हां ॥ २ ॥ नेणती भागली । कडे घेतां अंग घाली ॥ ३ ॥ भूक साहे तहान । त्याचें राखे समाधान ॥ ४ ॥ त्याच्या दुःखें धाय । आपुला जीव देऊं पाहे ॥ ५ ॥ नांवें घाली उडी । तुका म्हणे प्राण काढी ॥ ६ ॥

## श्रीनिळोबामहाराज

८०३ दीनबंधू आत्मयारामा । सुखविश्रामा विश्वजनका ॥ १ ॥ परात्परा पुरुषोत्तमा । आगमा निगमा जगवंद्या ॥ २ ॥ निर्विकल्पा

निरंजना । सुखनिधाना गुणमुर्ती ॥ ३ ॥ आगा ये निळ्याच्या दातारा । रुक्मिणीवरा श्रीविठ्ठला ॥ ४ ॥

८०४ अगा ये भूवैकुंठपीठा । सकळावरिष्ठा देवाचिया ॥ १ ॥ अनाथ मी शरणागत । करा स्थापित निजसेवे ॥ २ ॥ षडगुणऐश्वर्य भाग्यवंता । अहो रमाकांता श्रीविठ्ठला ॥ ३ ॥ निळा म्हणे विश्वंभरा । करुणाकरा मज तारी ॥ ४ ॥

८०५ पांडुरंगा तुमची लिळा । विचित्र कळा जाणतीया ॥ १ ॥ म्हणोनियां शरणागत । देवहि अंकित ऋषि तुमचे ॥ २ ॥ हृत्कमळीं आराधिती । नित्य पूजिती दृढनिष्ठा ॥ ३ ॥ निळा म्हणे दर्शना येती । नाना स्तविती स्तुतीवादें ॥ ४ ॥

८०६ नारायणा तुमच्या चरणी । भुक्तिमुक्तिचिया खाणी ॥ १ ॥ मोक्ष सर्वदा तिष्ठत । चरणी जोडोनियां हस्तक ॥ २ ॥ ऋद्धि सिद्धि वोळंगती । चरणी तुमाचिया श्रीपती ॥ ३ ॥ निळा म्हणे अवलोकितां । पाऊलें सुकुमार सायुज्यता ॥ ४ ॥

८०७ गोपाळपुरनिवासिया । अगा ठाकलिया विटेवरी ॥ १ ॥ पद्मनाभा शेषशायना । अगा ये सूदना दैत्यकुळा ॥ २ ॥ चतुर्दश भुवना व्यापका देवा । माझिया भक्तिभावा चित्त द्यावें ॥ ३ ॥ निळा म्हणें अपरमिता । अगा ये अनंता महदादी ॥ ४ ॥

८०८ पांडुरंगा दयाघना । गुणनिधाना सुखसिंधु ॥ १ ॥ भाव माझा जाणोनियां । ठेवा जी पायां जवळिकें ॥ २ ॥ भक्तवत्सल मनमोहना । राजीवनयना निजात्मया ॥ ३ ॥ निळा म्हणे करुणाकरा । विश्वंभरा विश्वजनित्या ॥ ४ ॥

८०९ अनाथाची कोण पावविल हांक । तुम्ही तो नाईक ब्रह्मांडाचे ॥१॥ मी एक दुर्बळ येतों काकुलती । नेणाची श्रीपती काय करूं ॥२॥ कोण तुम्हांपाशीं जाणवील मात । होऊनि कृपावंत मजवरी ॥ ३ ॥ तुम्हासी तो धंदा बहुत बहुतांचा । तयामाजी कैसा आठव माझा ॥४॥

जेथें थोर थोर संत मुनीश्वर । सनकादिक सुरवर भीड त्यांची ॥५॥ निळा म्हणे व्यर्थ गेलों वायावीण । केला उरला शिण जन्मवरी ॥६॥

८१० आम्ही देवा भक्तीहीन । नेणों ज्ञान योगाचें ॥ १ ॥ म्हणोनि येतों काकुळतीं । पुढतोपुढती तुम्हांसीं ॥ २ ॥ भाव नाहीं न कळे ज्ञान । कैसें साधन करावें तें ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसराती । उद्वेग चित्तीं राहिला हा ॥ ४ ॥

८११ करूं येईल अंगिकार । तरि करा फार काय बोलों ॥ १ ॥ नाहीं घोकिलें ऐकीलें कांहीं । सेवा घडली नाहीं वैष्णवांची ॥ २ ॥ स्वधर्म विधि न कळे आचार । कैसा तो प्रकार साधनाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे आहे मूढ दगड । ठायींचीच जड बुद्धी माझी ॥ ४ ॥

८१२ काय नेणों आचरण केलें । जया अलिंगिलें हृदयेसी ॥ १ ॥ हे तो न कळे माझिये मती । याचीलागी चित्तीं व्याकूळ ॥ २ ॥ कोण्या भजनें प्रसन्न व्हाल । आपुला म्हणवाल शरणागत ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवाभीता । जेंवि कां सविता उबगला ॥ ४ ॥

८१३ कृपावंता दया मोठी । आदर पोटीं दासाचा ॥ १ ॥ म्हणोनियां सांभाळ करा । नेदा अविचारा आतळों ॥ २ ॥ आपुलीये सेवेवीण । न ठेवा क्षण पळ एक ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेमरसें । जेववा सरिसें सांगातें ॥ ४ ॥

८१४ सांगावें उगवुनी न कळे तयासी । तुम्ही तो मानसी साक्ष माझें ॥ १ ॥ विश्वाचे व्यापक चाळक चित्ताचे । साक्षी अंतरींचे जेथ तेथें ॥ २ ॥ ब्रह्मादिक देव तेहि आज्ञाधार । तुमचे किंकर काळ काम ॥ ३ ॥ निळा म्हणे माझा करा अंगिकार । हेचि निरंतर विनवितसें ॥ ४ ॥

८१५ एकदां तरी देखिल्याविण । कैसेंनि मी कोण ओळखें ॥ १ ॥ अमृताची ऐकिल्या गोडी । रसनें ते फुडी केंवि लाभे ॥ २ ॥

क्षीराब्धी हे शेषशयन । जगीं न देखोन अनोळखा ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यापरी देवा । नये स्वानुभवा काय करूं ॥ ४ ॥

८१६ मागें पाळिलीं पोशिलीं । अपत्यें त्वां वाढविलीं ॥ १ ॥ ऐसें बोलियेले संत । लटकी वाटे ते ते मात ॥ २ ॥ हें गे मजाचि उपेक्षिलें । नाहीं समाधान केलें ॥ ३ ॥ निळा म्हणे येऊनियां । भेटें पुरवीं माझ्यां थाया ॥ ४ ॥

८१७ केव्हां भेटी देसी जीवाच्या जीवना । सुखाच्या निधाना पांडुरंगा ॥ १ ॥ वोसरलें मन नित्य वाट पाहे । नयनीं निज नये दिवसरात्रीं ॥ २ ॥ आला जातो दिवस मास घटिका पळ । प्राण हा विव्हळ तुजलागीं ॥ ३ ॥ हुरहुरी चित्त सदा उत्कंठित । न पुरेचि हा हेत चिंता वाटे ॥ ४ ॥ केव्हां येईल सार्थकाची वेळ । येसी कृपाळ धांवोनिया ॥ ५ ॥ निळा म्हणे आतां न लावावा उशीर । भेटोनीं अंतर निववावें ॥ ६ ॥

८१८ कोठें विगुंतली । नेणो कोणें गोवियली ॥ १ ॥ माझी न करी आठवण । गेली बाळका विसरोन ॥ २ ॥ न लावावा उशीर । नेणो कां झाली निष्ठुर ॥ ३ ॥ निळा म्हणे काय माझें । फार मानियेलें ओझें ॥ ४ ॥

८१९ जरी अवगुणी अन्यायी । बाळा तुपेक्षी कीं आई ॥ १ ॥ झाल्या अपराधांच्या कोटी । घालुनिया सोह पोटीं ॥ २ ॥ कुरवाळूनी मोहे । तयां पाजी प्रेमपेहें ॥ ३ ॥ निळा म्हणे अंकीं । घेऊनी पहुडे परिअंकीं ॥ ४ ॥

८२० मोकलितां धाय । नाइकसी कैसी माय ॥ १ ॥ सांडियेलें दूर देशीं । नये करूणा कांहीं ऐशी ॥ २ ॥ वेष्टिलें श्वापदीं । अहंकारमोहमदीं ॥ ३ ॥ निळा म्हणे या वरी आई । धांव घाली वो विठाई ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज.

८२१ कांहो माझी सांडी केली हृषीकेशी । आम्ही कोणापाशीं तोंड वासूं ॥ १ ॥ किती देवा तुला यावें काकुळती । काय या संचितीं लिहिलें माझ्या ॥ २ ॥ ब्रीदाचा तोडर गर्जे त्रिभुवनीं । तूंचि एक धनी त्रैलोक्याचा ॥ ३ ॥ समूळ घेतला पृथ्वीचा भार । माझाचि जोजार काय तुज ॥ ४ ॥ नको पाहूं अंत पांडुरंगे आई । नामा हरीपायीं घाली मिठी ॥ ५ ॥

८२२ अनाथासी साह्य होसी नारायणा । करुणावचना बोलविसी ॥ १ ॥ पांडुरंगा कृपा करा मजवरी । पामरा उद्धरीं पाहतांची ॥ २ ॥ गणिके सत्वर मोक्षपद देसी । उपमन्युबाळासी क्षीरसिंधु ॥ ३ ॥ नामा म्हणे काय याति न विचारी । विदुराचे घरीं खासी कण्या ॥ ४ ॥

८२३ अनाथाचा नाथ भक्ताचा कैवारी । पुराणीं हे थोरी आयिकिली ॥ १ ॥ ऐकोनियां कीर्ति आलों तुजपाशीं । निवारी दुःखासी केशिराजा ॥ २ ॥ त्रिताप तापलों दुःखें आहळलों । कासाविस झालों दयासिंधू ॥ ३ ॥ तुजविण आतां कोणातें मी सांगूं । तोडीं हा उद्वेगु नारायणा ॥ ४ ॥ नामा म्हणे आतां नको पाहूं अंत । उद्धरीं त्वरीत पांडुरंगा ॥ ५ ॥

८२४ अग्निमाजि पडे बाळू । माता धांवे कनवाळू ॥ १ ॥ तैसा धांवें माझिया काजा । अंकिला मी दास तुझा ॥ २ ॥ सर्वेचि झेपावे पक्षिणी । पिलीं पडतांचि धरणी ॥ ३ ॥ भुकेलें वत्सरावे । धेनु हुंबरत धांवे ॥ ४ ॥ वणवा लागलासे वनीं । पाडस चिंतीत हरणी ॥ ५ ॥ नामा म्हणे मेघा जैसा । विनवितो चातक तैसा ॥ ६ ॥

८२५ धेनु विये वनीं तीसी कैची सुयणी । तरी तें वत्स स्तनीं लावी कवण ॥ १ ॥ भुजंगाची पिलीं उपजतांचि वेगळी । त्यासीं डंखुं शिकविलें हो कोणीं ॥ २ ॥ सहज लक्षण जयाचियें ठायीं । तो

आपुलिये सोई धांवतसे ॥ ३ ॥ उपजतांची फुल मोगऱ्याच्या माथां । त्यासी परिमळता कोणे लावियेली ॥ ४ ॥ कडु दुध्याच्या आळ्यासी साखर दुध घातलें । तें अधिकची कडुवाळें कवणें केलें ॥ ५ ॥ गाळिला तोडिला खंडाविखंडी । उंस न संडी सोय गोडीसी ॥ ६ ॥ नामा म्हणे तैसें आहे गा श्रीहरी । सोईचे व्यापारीं घेईन तूतें ॥ ७ ॥

८२६ कृपणाचें धन असे भूमिआंत । जेथें जाय चित्त तेथें राखी ध्यान ॥ १ ॥ ऐसी मज देवा लावावी संवय । हेंचि मज द्यावें पांडुरंगा ॥ २ ॥ जेथें जेथें मन जाईल हें माझें । तेथें तेथें तुझें रूप भासे ॥ ३ ॥ नामा म्हणे सर्वांपरी मी अज्ञान । विनवीं आस करून पांडुरंगा ॥ ४ ॥

८२७ तुझिया चरणाचें तुटतां अनुसंधान । नेलें माझें मन षड्-वर्गी ॥ १ ॥ धांव गा विठ्ठला सोडवीं आपुला दास । थोर कासावीस केलें बापा ॥ २ ॥ कर्म कुळाचार क्रोध हा अनिवार । मदें निरंतर भ्रांत केलें ॥ ३ ॥ मत्सरें तुजसीं दुराविलें देवा । लोभें केला गोंवा गर्भवासीं ॥ ४ ॥ दंभ रसातळीं जातसे घेऊनि । विश्वचक्षु होऊनि पाहासी कैसा ॥ ५ ॥ नामा म्हणे मज तुझाचि भरंवसा । अनाथा कुंवासा होसी देवा ॥ ६ ॥

८२८ संसारींच्या आह्या आहाळलों भारी । निववीं गा श्रीहरी अमृतदृष्टी ॥ १ ॥ अनाथ अपराधी दुर्बळ दुराचारी । कृपाळु वा हरी तारीं मज ॥ २ ॥ नामा म्हणे विठो कृपेचा कोंवळा । जाणसी कळवळा अनाथाचा ॥ ३ ॥

८२९ सांडोनि संसार झालों मी अंकित । ऐशियाचा अंत पाहूं नको ॥ १ ॥ पातकी मी सत्य पातकी मी सत्य । पातकी मी सत्य पांडुरंगा ॥ २ ॥ माझे गुण दोष न धरिसी चित्तीं । थोरपण ख्याति दावी आम्हां ॥ ३ ॥ ऐसा अपराध आणूं नको मना । पंढरीचा राणा म्हणोनिया ॥ ४ ॥

८३० वत्साकारणें मोहाळु गाय । अनुसरल्या पान्हाय ॥ १ ॥ तैसें

तुझे वांसरूं बांधलों मी असें । मज लावीं कासे आपुलिया ॥ २ ॥ मज बांधलें त्वां संसारखुंटी । माझी माऊली दूर वैकुंठीं ॥ ३ ॥ थोरु करी मना लाहो । तंव आणिकें नेती पान्हावो ॥ ४ ॥ थोरु नव्हे याचि परी । नामा विनवितसे मुरारी ॥ ५ ॥

८३१ विठ्ठल विद्रुदे पुंडलीकवरदे । अनंत अभेदें रूपें तुझीं ॥ १ ॥ येईगे विठ्ठले मजलागीं झडकरी । बुडतां भवसागरीं काढीं मज ॥ २ ॥ आकांता अवसरीं स्मरिलें गजेंद्रें । दीनानाथें ब्रिदें सत्य केलीं ॥ ३ ॥ स्मरली संकटीं द्रौपदी वनवासी । धांवोनि आलासी लवलाही ॥ ४ ॥ प्रल्हादें तुजलागीं स्मरिलें निर्वाणीं । संकटापासोनि राखियेलें ॥ ५ ॥ नामा म्हणे थोर पीडिलों गर्भवासें । अखंड पाहातसें वास तुझा ॥ ६ ॥

८३२ रमासिंधु माजी सौंदर्याची धणी । ब्रिदें चक्रपाणी मिरविसी ॥ १ ॥ मेघ देहाकृती घनःशाम मूर्ति । नटतसे भक्तीं भक्तजना ॥ २ ॥ भाक देऊनिया गौळीयाचे घरीं । गाइ निरंतरीं चारीतसे ॥ ३ ॥ इंद्र वेडावला मुनि थोर थोर । नकळेचि पार म्हणे नामा ॥ ४ ॥

८३३ पांचमुखीं रूद्र स्वयें करी स्तुति । चहूं मुखीं कीर्ति वर्णी ब्रह्मा ॥ १ ॥ देवी देव सर्व विस्मयो पावती । विठोबाची ख्याती कोण वानी ॥ २ ॥ परिक्षितीसाठीं प्राण त्यजी सर्व । रावणाचें गर्व स्वयें हाणी ॥ ३ ॥ नामा म्हणे तुज सकळ समान । माझे दोष गुण मानी काय ॥ ४ ॥

८३४ देशी परदेशी झालों तुजवीण । माझें समाधान कोण करी ॥ १ ॥ चातक चकोरापरी पाहें वास । तूं कांहो उदास पांडुरंगा ॥ २ ॥ नामा म्हणे चित्त देईं माझ्या बोला । जिव तो उरला निघों पाहे ॥ ३ ॥

८३५ मुंगीचिया गळां बांधोनिया मेरु । तेणें हा प्रकारू कळों आला ॥ १ ॥ माळियाचें पोरें लपविलें पोटीं । तेणें जगजेठी सुख मानीं ॥ २ ॥ कुलालाचे हातीं तुडविलें मूल । दाखवी नवल तयासाठीं

॥ ३ ॥ मजसाठीं काय धरिलेंसी मौन । धांव नारायणा नामा म्हणे ॥ ४ ॥

८३६ मज गांजिल्याचा धांवा । सावधान परिसावा ॥ १ ॥ विठो सुजाणाच्या राया । धांव माझ्या करुणालया ॥ २ ॥ मोहोपाशीं मज बांधिलें । थोर वैर त्वां साधिलें ॥ ३ ॥ माझें मन हें पामर । भ्रांत हिंडे दारोदार ॥ ४ ॥ नामा म्हणे काय करूं । तुजविण भूमिभारू ॥ ५ ॥

८३७ गुणदोष माझे पाहों नको आतां । तारिसी अनंता मज आतां ॥ १ ॥ अगाध महीमा काय वाणूं हरी । गोकुळाभितरीं गाई राखीं ॥ २ ॥ अंबऋषीसाठीं जन्म सोशियले । महत्त्वाचे केलें हुड स्वयें ॥ ३ ॥ नामा म्हणे तुझें नामाचेनि वळ । प्रसादें केवळ लाधलों मी ॥ ४ ॥

८३८ मीं तो तुझा दास न करीं उदास । माया मोहपाश तोडी देवा ॥ १ ॥ प्राण जावो पारे नको करूं त्याग । करी अंगसंग अंगिकार ॥ २ ॥ अंगीकारीं आतां अजामेळ अंती । समान श्रीपती सम करी ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसें वर्णावें म्या किती । नामें केली ख्याती चराचरीं ॥ ४ ॥

८३९ वानराच्या संगें स्वयें क्षेम देसी । मज हृषीकेशी न बोलावें ॥ १ ॥ रिसापाशीं सदा स्वभावें तुम्ही खेळा । माझिया कपाळा नातुडसी ॥ २ ॥ पक्षी जटायुचे लेकरु तूं होसी । माझ्या कां मनासीं नातुडसी ॥ ३ ॥ लावोनि चरण तारियली शिळा । कोळियाचा केला अंगीकार ॥ ४ ॥ नामा म्हणे तुम्हां सांगावें म्या किती । राग माना चित्तीं काय वाणुं ॥ ५ ॥

८४० पतितपावना धांवसी निर्वाणी । ब्रिद चक्रपाणी सत्य केलें ॥ १ ॥ काय अपराध. कोणाचे पाहिले । नाहीं तूं त्यागिलें नष्टखळां ॥ २ ॥ अजामेळासाठीं आहार वर्जिले । बीज तें भाजिलें भवमुळ

॥ ३ ॥ नामा म्हणे देवा नागवण बारे । आतां उणें पुरें पाहूं नको ॥ ४ ॥

८४१ जगत्रजीवना अगा नारायणा । का नये करुणा दासाची हे ॥ १ ॥ अच्युता केशवा येगा दिनानाथा । सर्वज्ञा समर्था कृपामूर्ती ॥ २ ॥ चिद्घना चिद्रूपा विरंचीच्या बापा । करावी जी कृपा सर्वांभूतीं ॥ ३ ॥ तुझें म्हणविलें उपेक्षिसी जरीं । नामा म्हणे हरी ब्रीद काय ॥ ४ ॥

८४२ विश्वंभर नाम तुझें कमळापती । जगीं श्रुतिस्मृति वाखाणिती ॥ १ ॥ गौळ्यांचे घरींचें दहीं लोणी चोरुनीं । खातां चक्रपाणी लाजसीना ॥ २ ॥ आतां दीनानाथा तुझें ब्रीद साचें । तरी भूषण आमुचें जतन करीं ॥ ३ ॥ येर ठेवाठेवी कायसी आतां । तुम्हां विनवितो नामा केशिराजा ॥ ४ ॥

८४३ वासरूं भोवें खुंटिया भोंवतें । आपआपणियांतें गोवियेलें ॥ १ ॥ तैसी परी मज झाली गा देवा । गुंतलों मी भावा लटिकिया ॥ २ ॥ नामा म्हणे केशवा तोडी का बंधनें । मी एक पोसणें भक्त तुझा ॥ ३ ॥

८४४ तुजविण आम्हां कोण हो पोशिता । अहो जी कृपावंता पंढरिराया ॥ १ ॥ न करीं विठ्ठला आतां लाजिरवाणें । मी तुझें पोसणें पांडुरंगा ॥ २ ॥ काकुलती कोणा येऊं हो मी आतां । अनाथाच्या नाथा विठ्ठला तूं ॥ ३ ॥ एक वेळ आतां पाहें मजकडे । नामा म्हणे वेडें रंक तुझें ॥ ४ ॥

८४५ आशा मनिशा तृष्णा लागलीसे पाठी । धांव जगजेठी स्वामी माझ्या ॥ १ ॥ गेलासि केउता वाढिलें दुश्चिता । अगा कृपावंता स्वामी माझ्या ॥ २ ॥ नामा म्हणे मज नाहीं कोण गत । तारिसी अनंता स्वामी माझ्या ॥ ३ ॥

८४६ माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायण

॥ १ ॥ नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करी अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥ अनाथाचा नाथ होशी तूं दयाळा । किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ॥ ३ ॥ नामा म्हणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां बरी ॥ ४ ॥

८४७ आरूष साबडें नेणें कांहीं वेडें । जन्मोनि साकडें केलें तुज ॥ १ ॥ जाणसी तें करी कृपाळु बा हरी । लाज सर्वांपरी आहे तुज॥२॥ मी तंव अपराधी असें लक्ष कोटी । म्हणतों जगजेठी दास तुझा ॥३॥ नाहीं तुझी सेवा केली मनोभावें । लोभदंभगर्वे भ्रांत झालों ॥ ४ ॥ कीर्ति म्या ऐकिली बहुतांच्या मुखीं । केली बहु स्तुती शरणागतें ॥ ५ ॥ नामा म्हणे मज मोकलीसी झणीं । अनाथ म्हणोनि शरण आलों ॥ ६ ॥

८४८ समर्थांचें बाळ पांघरे वाकळ । हांसती सकळ लाज कोणां ॥ १ ॥ देव असता दैन्य उरे कैचें बापा । आम्हांसि तूं कैसा विसर-लासी ॥ २ ॥ ऐसा तूं अविनाश त्रिभुवनींचा राजा । नामा म्हणे माझा तूंचि स्वामी ॥ ३ ॥

८४९ भिऊनि रिघीजे समर्थांचे पोटीं । विषयांची तो भेटी नको मज ॥ १ ॥ तैसा मी शरण आलोंसें केशवें । मज त्वां राखावें पायां-तळीं ॥ २ ॥ नको उदासीन राखों अभिमान । माझें आगमन विचारीं कां ॥ ३ ॥ तुझेनि होईल तेंच मी मागेन । न सोडीं चरण अहर्निशीं ॥ ४ ॥ अविद्या अपार संचरली देवा । आम्हासी कुढावा नाहीं कोणी ॥ ५ ॥ देवा आतां मज नको गर्भवास । नामा विष्णुदास विनवी-तसे ॥ ६ ॥

८५० देहाभिमानें पुरविली पाठी । कांहो जगजेठी नये कृपा ॥१॥ स्वात्मसुखासाठीं स्तुती करी ब्रह्मा । व्याधा निजधामा स्थिर पद ॥ २ ॥ काय करीतसे मातापितृभक्ति ।:तया जगत्पति नाचतसे ॥ ३ ॥ नाचती वैकुंठीं सर्व ऋषेश्वर । नामा म्हणे पार नाहीं नाहीं ॥ ४ ॥

८९१ विठ्ठल माउली कृपेची कोवळी । आठवितां घाली प्रेमपान्हां ॥ १ ॥ मज कां मोकलिलें कवणा निरविलें । कठिण कैसें झालें हृदय तुझें ॥ २ ॥ तुजविण जिवलग दुजें कोण होईल । तें माझें साहील जड भारी ॥ ३ ॥ तूं माझी माउली मी वो तुझा वत्स । परतों परतों वाट पाहों तुझी ॥ ४ ॥ माता मोहें कैसी न विसंबे सर्वथा । अंतरीची व्यथा कोण जाणे ॥ ५ ॥ नामा म्हणे विठ्ठले कां गे रूसलीसि । केव्हां सांभाळिसी अनाथनाथे ॥ ६ ॥

८९२ विठ्ठल माउली कृपेचि साउली । आठवितां घाली प्रेम-पान्हा ॥ १ ॥ न सांगतां सर्व जाणे तान्ह भूक । जवळी व्यापक न विसंबे ॥ २ ॥ माया मोह कैसा करावा सर्वथा । अंतरीची व्यथा तोचि जाणे ॥ ३ ॥ सुखशांतिरूपें लेवविली अंगीं । लागों नेदी धगी संसाराची ॥ ४ ॥ देऊनि अभय करें कुरवाळीं । करित साउली पितांबरें ॥ ५ ॥ मुखीं नाम माळा कीर्तन श्रवणीं । लेवविलीं लेणीं नवविध ॥ ६ ॥ नयनीं अंजन सुद्लें सावळें । समाधान झालें सर्व अंग ॥ ७ ॥ अच्युत अनंत सुवर्णाची पेटी । घातलिसे कंठीं निर्विकार ॥ ८ ॥ चतुर्भुज शोभा रूप मध्यें मणी । प्रभा त्रिभुवनीं विराजित ॥ ९ ॥ मुक्तलग शुद्ध बिंदुली गोजिरी । पद्महस्त शिरीं स्थापितसे ॥ १० ॥ संतपायरज कपाळीं टिळका । नाहीं भय शंका कळिकाळा ॥ ११ ॥ सगुण साजिरा कटीं कडदोरा । अवर्ण दुर्भरा दृढ बोधु ॥ १२ ॥ कामक्रोधादिक करूनि पुतळे । पाय जे घातले पायवाट ॥ १३ ॥ वासनेची दृष्टी लागेल त्या क्षणीं । उभा चक्रपाणी मागें पुढें ॥ १४ ॥ संतपायीं नामा शृंगारमंडितु । अखंड क्रीडतु महाद्वारीं ॥ १५ ॥

८९३ काय अपराध पाहसी कोणाचे । धांवे भाविकांचे काम-काजीं ॥ १ ॥ काय केशीराजा वाणुं मी दुबळें । शरणागता लळे पुरविशी ॥ २ ॥ पतीतपावन ब्रीद चराचरीं । तेथें मी भिकारी

कोणीकडे ॥ ३ ॥ नामा म्हणे तूंचि करिशी उद्धार । मज देवा पार नाहीं भाग्या ॥ ४ ॥

८५४ शरण आल्याचा न पाहसी अवगुण । कृपेचें लक्षण सहज आहे ॥ १ ॥ गजेंद्र गणिकेची राखिली त्वां लाज । सोडविला द्विज अजामिळ ॥ २ ॥ सांगणें हें काय तुम्हीं दिलें देवा । उदारा केशवा मायबापा ॥ ३ ॥ नामा म्हणे झणी अव्हेरिसी मज । जगीं होईल लाज थोर तुज ॥ ४ ॥

८५५ काया हरपे फुटूं नेदी । टाळ दिंडी वाहिन खांदी ॥ १ ॥ तूं वा माझा तूं वा माझा । तूं वा माझा केशिराजा ॥ २ ॥ आळवणीचा तूं वा वाचे । तेणें छंदें पै वा नाचें ॥ ३ ॥ तूं वा माझा मी दास तुझा । विनवितो नामा केशीराजा ॥ ४ ॥

८५६ अनंतजन्मींचें चुकवी सांकडें । काय मी वापुडें विनवूं कैसें ॥ १ ॥ सगुण गुणाची वोलिलीसे मूर्ति । राहो माझें चित्तीं निरंतर ॥ २ ॥ माझा मीच झालों सकळ व्यापारी । संसाराबाहेरी कोण काढी ॥ ३ ॥ नामा म्हणे नको गोवूं आशा । पावन परेशा केशिराजा ॥ ४ ॥

८५७ तुज न पोसवे दातारा । तरी ऐशा घाली चिरा । एका पोटा दुर्भर । अव्हेरूं नको दातारा ॥ १ ॥ तुज म्यां जीवीं अनुसरावें । तुम्हींही तसेंच अपंगावें । परी मी आणिकांचें न म्हणवावें । जन्मोजन्मीं दातारा ॥ २ ॥ विष्णुदास नामा म्हणे । मज उपेक्षिसी झणें । जन्मोजन्मींचें पोसणें । केशवा उणें येऊं न देई ॥ ३ ॥

८५८ काय करूं आतां देवा विश्वंभरा । मजलागीं थारा नाहीं कोठें ॥ १ ॥ उबगति सोयरीं धायरीं समस्त । काय करूं अंत पाहती माझा ॥ २ ॥ तूंचि मातापिता गुरू बंधु होसी । जाऊं मी कोणासी शरण आतां ॥ ३ ॥ पायीं थारा मागे नाम्याची विनंति । चित्त द्या श्रीपति आतां वेगें ॥ ४ ॥

८५९ नेणें भक्ति कांहीं करूं कैसी सेवा । हें तों मज देवा समजेना ॥ १ ॥ करूं कैसा जप करूं कैसें ध्यान । नाहीं माझें मन स्थिर देवा ॥ २ ॥ कामक्रोध यांची मोठी हे जाचणी । झालों वेडा रानीं समजेना ॥ ३ ॥ नामा म्हणे माझे सांवळे विठाबाई । येऊनिया राहीं ह्रदयामाजीं ॥ ४ ॥

८६० भागलासी देवा धांव धांवणिया । दाखावेसी पायां पांडुरंगा ॥ १ ॥ गजेंद्र गणिका तुम्हां श्रमविलें । मी काय उगलें परदेशी॥ २॥ सोळा सहस्र गोपी त्या उद्धरती । माझी कींव चित्तीं कां बा नये॥३॥ नामा म्हणे आम्हां पुरे तुझा संग । वारंवार मग वारी कोण ॥ ४ ॥

८६१ नावडे प्रपंच तापत्रय माया । येईं धांवोनिया केशीराजा ॥ १ ॥ भवभयें फार भ्यालों जन्मांतरा ।चौऱ्यांशीचा फेरा चुकावितों ॥ २ ॥ सत्कथा श्रवण नामसंकीर्तन । न घडे भजन मज देवा ॥ ३ ॥ नवविधा भक्ति कोणें केली कैसी । नामा म्हणे ऐसी दावीं सदा ॥४॥

८६२ क्षणीं दृष्टि लागो तुझ्या सगुणपणा । जेणें माझ्या मना बोध केला ॥ १ ॥ अनंता जन्मींचें विसरलों दुःख । पाहतां तुझें मुख पांडुरंगा ॥ २ ॥ योगियांच्या ध्यानीं ध्यातां नातुडसी । तो तूं आम्हांपाशीं मागें पुढें ॥ ३ ॥ नामा म्हणे जीवें करीन निंबलोण । विटेसहित चरण वोवाळीन ॥ ४ ॥

८६३ विषयीं आसक्त झालें माझें मन । न करीं तुझें ध्यान पंढरीराया ॥ १ ॥ नाथिलें संकल्प करी नानाविध । तेणें थोर खेद पावतसे ॥ १ ॥ ऐसा मी अपराधी दुराचारी देवा । भेटसी केशवा कवणेपरी ॥ ३ ॥ आयुष्य सरे परि न सरे कल्पना । भोगवी यातना नानाविध ॥ ४ ॥ जन्ममरण कष्ट भोगितां संकटीं । होतसे हिंपुटी येरझारीं ॥ ५ ॥ मायामोहरत भ्रांत माझें चित्त । चुकलों निजहित नारायणा ॥ ६ ॥ तूं अनाथ कैवारी म्हणोनी धांवा करी । सोडवीं मुरारी म्हणे नामा ॥ ७ ॥

## श्रीजनाबाई

८६४ येगे माझे विठाबाई। कृपादृष्टीनें तूं पाहीं ॥ १ ॥ तुजविण न सुचे कांही। आतां मी वो करूं काई ॥ २ ॥ माझा भाव तुजवरी। आतां रक्षीं नानापरी ॥ ३ ॥ येई सखये धांउनी। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

८६५ सख्या घेतलें पदरीं। आतां न टाकावें दुरीं ॥ १ ॥ थोरांचीं उचितें। हेंचि काय सांगों तूंतें ॥ २ ॥ ब्राह्मियाच्या ताता। सज्जना लक्ष्मुमीच्या कांता ॥ ३ ॥ आपुली म्हणवूनि। आपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

८६६ गंगा गेली सिंधूपाशीं। त्याणें अव्हेरिलें तिसी ॥ १ ॥ तरी तें सांगावें कवणाला। ऐसें बोलें बा विठ्ठला ॥ २ ॥ जळ कोपें जळचरा। माता अव्हेरी लेंकुरा ॥ ३ ॥ जनी म्हणे शरण आलें। अव्हेरितां ब्रीद गेलें ॥ ४ ॥

८६७ माझी आंधळ्याची काठी। आडकली कवणें बेटीं ॥ १ ॥ आतां सांगूं मी कवणासी। धांवे पावे हृषीकेशी ॥ २ ॥ तुजवांचूनी विठ्ठला। कोणी नाहींरे मजला ॥ ३ ॥ माथा ठेवीं तुझे चरणीं। म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

८६८ कां गा न येसी विठ्ठला। ऐसा कोण दोष मला ॥ १ ॥ माय बाप तुंचि धनी। मला सांभाळीं निर्वाणी ॥ २ ॥ त्वां बा उद्धरिले थोर। तेथें काय मी पामर ॥ ३ ॥ दिनानाथा दीनबंधू। जनी म्हणे कृपासिंधू ॥ ४ ॥

८६९ अगा रुक्मिणीनायका। सुरा असुरां प्रिय लोकां ॥ १ ॥ ते तूं धांवे माझे आई। सखे साजणी विठाबाई ॥ २ ॥ अगा शिवाचिया जपा। मदनताता निष्पापा ॥ ३ ॥ आपुली ह्मणवुनी। आपंगावी दासी जनी ॥ ४ ॥

८७० नाहीं केली तुझी सेवा। दुःख वाटतसे माझ्या जीवा

॥ १ ॥ नष्ट पापीण मी हीन । नाहीं केलें तुझें ध्यान ॥ २ ॥ जें जें दुःख झालें मला । तें त्वां सोसिलें विठ्ठला ॥ ३ ॥ रात्रंदिवस मज-पाशीं । दळूं कांडूं लागलासी ॥ ४ ॥ क्षमा करावी देवराया । दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

८७१ येरे येरे माझ्या रामा । मनमोहन मेघःश्यामा ॥ १ ॥ संत-मिसें भेटी । देईं देईं कृपागोष्टी ॥ २ ॥ आमची चुकवी जन्मव्याधी । आम्हा देईं हो समाधी ॥ ३ ॥ जनी म्हणे चक्रपाणी । करी ऐसी हो करणी ॥ ४ ॥

८७२ अहो नारायणा । मजवरी कृपा कां कराना ॥ १ ॥ मी तों अज्ञानाची राशी । म्हणोन आलें पायांपाशीं ॥ २ ॥ जनी म्हणे आतां । मज सोडवीं कृपावंता ॥ ३ ॥

८७३ आधीं घेतल पदरीं । आतां न धरावें दुरी ॥ १ ॥ तुम्हा थोराचें उचितें । हेंचि काय सांगूं तूंतें ॥ २ ॥ अहो ब्रह्मयाच्या ताता । सखया लक्ष्मीच्या कांता ॥ ३ ॥ दयेच्या सागरा । जनी म्हणे अमरेश्वरा ॥ ४ ॥

८७४ आम्ही जावें कवण्या ठाया । न बोलसी पंढरीराया ॥ १ ॥ सरिता गेली सिंधूपाशीं । जरी तो ठाव न दे तिसीं ॥ २ ॥ जळ कोपलें जळचरासी । माता न घे बाळकासी ॥ ३ ॥ म्हणे जनी आलें शरण । जरीं त्वां धरिलेंसे मौन ॥ ४ ॥

८७५ एक बापा हृषीकेशी । मज ठेवीं पायांपाशीं ॥ १ ॥ तुझें रूप पाहिन डोळां । मुखीं नाम वेळो वेळां ॥ २ ॥ हातीं धरिल्याचि लाज । माझें सर्व करीं काज ॥ ३ ॥ तुजविण देवराया । कोणीं नाही रे सखया ॥ ४ ॥ कमळापति कमळपाणी । दासी जनी लागे चरणी ॥ ५ ॥

८७६ पोट भरोनि व्यालासी । मज सांडुनी कोठें जासी ॥ १ ॥ धिरा धिरा पांडुरंगा । मज कां टाकिलें निसंगा ॥ २ ॥ ज्याचा जार

त्यासी भार । मजला नाहीं आणिक थार ॥ ३ ॥ विठावाई माय-
बहिणी । तुझे कृपें तरली जनी ॥ ४ ॥

८७७ अविद्येच्या वो रात्रीं । आडकलों अंधारीं ॥ १ ॥ तेथुनीं काढावें गोविंदा । यशोदेच्या परमानंदा ॥ २ ॥ तुझें सन्निधेचें पाशीं । ठाव नाहीं अविद्येसीं ॥ ३ ॥ तुझे संगती पावन । उद्धरिलें ब्रह्म पूर्ण ॥ ४ ॥ अजामेळ शुद्ध केला । म्हणे दासी जनी भला ॥ ५ ॥

८७८ धन्य कलत्र माय । सर्व जोडी तुझे पाय ॥ १ ॥ सखा तुजवीण पाहीं । दुजा कोणी मज नाहीं ॥ २ ॥ माझी न करावी सांडणी । म्हणे तुझी दासी जनी ॥ ३ ॥

८७९ रुक्मिणीच्या कुंका । सुरां अमरां प्रिय लोकां ॥ १ ॥ तूं धांव माझे आई । सखे साजणी विठाबाई ॥ २ ॥ शिवाचिया जपा । मदनताता या निष्पापा ॥ ३ ॥ दयेच्या सागरा । म्हणे जनी अमरेश्वरा ॥ ४ ॥

८८० मी वत्स माझी गाई । नये आतां करूं काई ॥ १ ॥ तुम्ही तरी सांगा कांहीं । शेखीं विनवा विठाबाई ॥ २ ॥ येई माझिये हरणी । चुकलें पाडस दासी जनी ॥ ३ ॥

८८१ सख्या पंढरीच्या राया । घडे दंडवत पायां ॥ १ ॥ ऐसें करीं अखंडीत । शुद्ध प्रेम शुद्ध चित्त ॥ २ ॥ वेध माझ्या चित्ता । हाचि लागो पंढरीनाथा ॥ ३ ॥ जाई ओवाळुनी । जन्मोजन्मी म्हणे जनी ॥ ४ ॥

८८२ कां गा उशिर लाविला । माझा विसर पडिला ॥ १ ॥ तुज-वरी संसार । वोळविलें घरदार ॥ २ ॥ तो तूं आपुल्या दासासी । म्हणे जनी विसंबसी ॥ ३ ॥

८८३ किती सांगूं तूतें । बुद्धि शिकवणें हें मातें ॥ १ ॥ सोमवं-शाच्या भूषणा । प्रतिपाळी हर्षें दीना ॥ २ ॥ शिकवावें तूतें । हाचि अपराध आमुतें ॥ ३ ॥ स्वामीलागीं धीट ऐसी । म्हणती शिकवी जनी दासी ॥ ४ ॥

८८४ शिणल्या बाह्या आतां । येऊनियां लावी हातां ॥ १ ॥ तूं माझें वो माहेर । काय पहातोसी अंतर ॥ २ ॥ वोवाळुनीं पायां । जिवेंभावें पंढरीराया ॥ ३ ॥ धर्मताता धर्म लेंकी । म्हणे जनी हे विलोकीं ॥ ४ ॥

८८५ योग न्यावा सिद्धि । सकळ गुणाचिया निधी ॥ १ ॥ अरूपाच्या रूपा । सांब राजाचिया जपा ॥ २ ॥ ब्रह्मियाच्या ताता । म्हणे जनी पंढरीनाथा ॥ ३ ॥

८८६ माय मेली बाप मेला । आतां सांभाळीं विठ्ठला ॥ १ ॥ मी तुझें गा लेकरूं । नको मजशीं अव्हेरूं ॥ २ ॥ मतिमंद मी तुझी दासी । ठाव द्यावा पायांपाशीं ॥ ३ ॥ तुजविण सखे कोण । माझें करील संरक्षण ॥ ४ ॥ अंत किती पाहासी देवा । थोर श्रम झाला जीवा ॥ ५ ॥ सकळ जीवाच्या जीवना । म्हणे जनी नारायणा ॥ ६ ॥

८८७ काय करूं या कर्मासीं । धांव पाव हृषिकेशी ॥ १ ॥ नाश होतो आयुष्याचा । तुझें नांव नये वाचा ॥ २ ॥ काय जिणें या देहाचें । अखंड अवघ्या रात्रीचें ॥ ३ ॥ व्यर्थ कष्टविली माता । तुझें नाम नये गातां ॥ ४ ॥ जन्ममरणाचें दुःख । म्हणे जनी दाखवी मुख ॥ ५ ॥

८८८ अहो ब्रह्मांडपाळका । ऐकें रुक्मिणीच्या कुंका ॥ १ ॥ देवा घेतलें पदरीं । तें तूं टाकूं नको दुरी ॥ २ ॥ होतें लोकांमध्यें निंद्य । तें त्वां जगांत केलें वंद्य ॥ ३ ॥ विनवीतसे दासी जनी । परिसावी माझी विनवणी ॥ ४ ॥

८८९ येईं जिवाचिया जीवा । रामा देवाचिया देवा ॥ १ ॥ सर्व देव बंदि पडिले । रामा तुम्हीं सोडविलें ॥ २ ॥ मारूनिया लंकापति । सोडविली सीतासती ॥ ३ ॥ देवा तुमची ऐसी ख्याती । रुद्रादिक ते वर्णिती ॥ ४ ॥

८९० शरण आलों नारायणा । आतां तारीं हो पावना ॥ १ ॥

शरण आला मारुतिराया । त्याची दिव्य केली काया ॥ २ ॥ शरण प्रल्हाद तो आला । हिरण्यकश्यपू मारीला ॥ ३ ॥ जनी म्हणे देवा शरण । व्हावें भल्यानें जाणोन ॥ ४ ॥

८९१ ऐक बापा माझ्या पंढरीच्या राया । कितना आल्यें या आर्तभूतां ॥ १ ॥ माझ्या दुणेदारा पुरवी त्याची आस । न करीं निरास आर्तभूतां ॥ २ ॥ त्रैलोक्याच्या राया सख्या उमरावा । अभय तो द्यावा कर तयां ॥ ३ ॥ जैसा चंद्रश्रवा सूर्यउच्चैश्रवा । अढळ पद ध्रुवा दिधलेंसें ॥ ४ ॥ उपमन्यु बाळका क्षीराचा सागरू । ऐसा तूं दातारू काय वानूं ॥ ५ ॥ म्हणे दासी जनी आलें या कितनीं । तया कंटाळुनी पिटूं नका ॥ ६ ॥

८९२ गजेंद्रासी उद्धरिलें । आम्हीं तुझें काय केलें ॥ १ ॥ तारिली गणिका । तिहीं लोकीं तुझा शिक्का ॥ २ ॥ वाल्हा कोळी अजामेळ । पापी केला पुण्यशीळ ॥ ३ ॥ गुणदोष मना नाणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

८९३ राजाई गोणाई । अखंडित तुझे पायीं ॥ १ ॥ मज ठेवियेलें द्वारीं । नीच म्हणोनि बाहेरीं ॥ २ ॥ नारा गोंदा महादा विठा । ठेवियलें अग्रवाटा ॥ ३ ॥ देवा केव्हां क्षेम देसी । आपुली म्हणोनि जनी दासी ॥ ४ ॥

८९४ काय करूं पंढरीनाथा । काळ साह्य नाहीं आतां ॥ १ ॥ मज टाकिलें परदेशीं । नारा विठा तुजपाशीं ॥ २ ॥ श्रम बहु जाला जिवा । आतां सांभाळी केशवा ॥ ३ ॥ कोण सखा तुजाविण । माझें करीं समाधान ॥ ४ ॥ हीन दिन तुझे पोटीं । जनी म्हणे द्यावी भेटी ॥ ५ ॥

८९५ आंधळ्याची काठी । अडकली कवणे बेटीं ॥ १ ॥ माझिये हरणी । गुंतलीस कोणे रानीं ॥ २ ॥ मुकें मी पाडस । चुकलें भोवें पाहें वास ॥ ३ ॥ तुजवीण काय करूं । प्राण किती कंठीं धरूं ॥ ४॥

आतां जीव जाऊं पाहे । धांव घालीं माझे आये ॥ ५ ॥ माझी भेटवा जननी । संतां विनवी दासी जनी ॥ ६ ॥

८९६ पाहतां पंढरिराया । त्याच्या मुक्ति लागे पायां ॥ १ ॥ पुरषार्थे चारी । त्याचें मोक्ष आर्जव करीं ॥ २ ॥ धनसंपत्तीचा दाता । होय पाहातां पंढरीनाथा ॥ ३ ॥ संतांचे चरणीं । लोळे नाचे दासी जनी ॥ ४ ॥

## श्रीभानुदासमहाराज.

८९७ अगा पंढरिनाथा ऐसें काय केलें । मज उपेक्षिलें अनाथासी ॥ १ ॥ त्रैलोक्याचे ठायीं मज नसे कोणी । ऐसें चक्रपाणी ठावें तुज ॥ २ ॥ कोणाचे आधारें असावें म्यां येथें । जन्माविलें व्यर्थ कां गा मज ॥ ३ ॥ आम्हासीं क्लेशांत बहु पाडियेलें । काय हातां आलें तुझ्या देवा ॥ ४ ॥ आमुच्या मनींचें अर्थ करितां पूर्ण । भानुदास म्हणे जाण दुजा कोण ॥ ५ ॥

८९८ तुम्ही कराल तें काय एक नोहे । ब्रह्मांड अवघें हें उभाराल ॥ १ ॥ तुझिया सत्तेनें सकळांचा प्राण । चालतसे जाण ब्रह्मांड हें ॥ २ ॥ तुझिया सामर्थ्या नाहीं अंतपार । तेथें मी किंकर काय जाणें ॥ ३ ॥ सर्व अपराधी शरण मी पतित । उपेक्षा त्वां माते न करावी ॥ ४ ॥ भानुदास म्हणे पुरवा मनोरथ । तुम्ही अनाथनाथ पांडुरंगा ॥ ५ ॥

८९९ चंचळ हें मन नावरे माझ्यानें । कामाच्या व्यसनें पीडितसे ॥ १ ॥ अविवेकाचें बळ झालें असे फार । धांवती षड्विकार सैरावैरां ॥ २ ॥ विवेकाची शक्ति होऊनियां क्षीण । सत्कर्मासी हीन बुद्धि झाली ॥ ३ ॥ चित्ताचा चालक अगा सूत्रधारी । भानुदासा हरी कृपा करी ॥ ४ ॥

९०० अधोगती आम्ही जावें पंढरीनाथा । ऐसें तुझ्या चित्ता आलें काय ॥ १ ॥ पडिलों पदरीं अन्यायी मी दीन । नेईं सांभाळून

कैसें तरीं ॥ २ ॥ मज अनाथाची परिसावी विनंती । भानुदास स्तुति करीतसे ॥ ३ ॥

९०१ ऐसियासी कृपा करावी त्वरीत । पुरवीं मनोरथ सर्व माझे ॥ १ ॥ काकुळती कवणा येऊं तुजविण । दुःखनिवारण कोण करी ॥ २ ॥ त्रैलोक्यपालन करिसी सर्व काळ । त्याहूनि आगळें हेंचि काय ॥ ३ ॥ तुझिया पायांचा मजला आधार । केवि तूं निष्ठुर जाहलासी ॥ ४ ॥ आमुचे अन्याय न धरावे चित्तीं । सर्व कृपामूर्ती पोटीं घाली ॥ ५ ॥ कर्म धर्म माझें उत्तम आचरण । न पाहे पावन करीं मज ॥ ६ ॥ भानुदास म्हणे कृपेचें पोसणें । परि नारायणें सांभाळावें ॥ ७ ॥

९०२ देवा कोठवरीं अंत पाहतोसी । प्राण कंठापाशीं ठेवियेला ॥ १ ॥ पळमात्र चित्ता नाहीं समाधान । चिंतेनें व्यापून घेतलेंसे ॥ २ ॥ नानापरींचें दुःख येवोनी आदळत । शोकें व्याकुळ चित्त होत असे ॥ ३ ॥ यासी तो उपाय न कळेचि मज । शरण आलों तुज देवराया ॥ ४ ॥ इच्छा पुरवुनी सुखरूप ठेवीं । भानुदास पायीं ठाव मागें ॥ ५ ॥

९०३ मज निरविलें कोणाचिये हातीं । वैकुंठीं श्रीपती राहिलासी ॥ १ ॥ कोणी नाहीं मज ठाऊक तुजला । संकटाचा घाला कैसा केला ॥ २ ॥ दुरीं टाकुनिया केलेंसे निष्ठुर । दुःखानें बेजार केलें मज ॥ ३ ॥ काय राग आला तुझिया मनांत । तयामुळें शोकांत पाडियेलें ॥ ४ ॥ अन्यायाची राशी देहाचि सगळा । हा राग गोपाळा न मानावा ॥ ५ ॥ क्षमा करी माझे सर्व अपराध । न धरावा भेद कांहीं देवा ॥ ६ ॥ भानुदास म्हणे अंगिकार त्वरित । करूनी आनंदांत ठेवा पायीं ॥ ७ ॥

९०४ पतीत म्हणोनि झालों शरणागत । अनाथाचा नाथ म्हणती तुम्हां ॥ १ ॥ तें आपलें ब्रीद सांभाळीं अनंता । नको पा परता दास

तुझा ॥ २ ॥ तुझा दास म्हणोनि जगीं जाहली मात । अनाथाचा नाथ तूंतें म्हणती ॥ ३ ॥ भानुदास म्हणे सांभाळी वचन । पतीत-पावन ब्रीद जगीं ॥ ४ ॥

९०५ अनाथाचा नाथ भक्ताचा कैवारी । ऐसें चराचरीं ब्रीद गाजे ॥ १ ॥ तें आम्हां सांपडलें सोपें वर्म हातां । म्हणोनि अच्युता बोलतसों ॥ २ ॥ आम्ही पतीतांनीं घालावें सांकडें । उगवणे कोडें तुमचे हातीं ॥ ३ ॥ भानुदास विनवी चरणीं ठेवुनीं माथा । सांभाळीं अनाथनाथा आम्हांलागीं ॥ ४ ॥

९०६ दीन आम्हीं रंक पतीत पतीत । पावन तूं अनंत स्वामी माझा ॥ १ ॥ धरिला भरंवसा नामावरी चित्त । नाहीं दुजा हेत मनीं कांहीं ॥ २ ॥ देणें घेणें नको पुरला मनोरथ । बोलणें ती मात वेगळी असे ॥ ३ ॥ भानुदास म्हणे अहो पंढरीराया । कृपा करीं सखया धरीं हातीं ॥ ४ ॥

९०७ अहो पांडुरंगा पतीतपावना । आमुची विज्ञापना एक असे ॥ १ ॥ नामाचा उच्चार संतांचा सांगात । पुरवावा हेत जन्मो-जन्मीं ॥ २ ॥ भलतीये याती भलतीये कुळीं । जन्म दे निर्धारीं देवराया ॥ ३ ॥ भानुदास म्हणे दुजा नको धंदा । रात्रंदिवस गोविंदा वाचे नाम ॥ ४ ॥

९०८ भाकितों करुणा पंढरीच्या राया । अगा यादवराया श्रीकृष्णरामा ॥ १ ॥ तूं माय माऊली जीवीं जीवनकळा । भक्ताचा लळा पुरवीसी ॥ २ ॥ आवडे सावडे भक्ताचें कीर्तन । नाचसी येऊन निरभिमानें ॥ ३ ॥ भानुदास म्हणे पुरवी माझे लळे । विठ्ठले सांवळे माऊलीये ॥ ४ ॥

९०९ वेदांत सिद्धांत ऐकोनिया गोष्टी । मन झालें चावटी देव-राया ॥ १ ॥ परि त्याचा बोध नये कांहीं चित्ता । फजिती तत्वता

मागें पुढें ॥ २ ॥ संसाराचें जाळें पडतसे गुंतीं । करितां कुंथाकुंथी न निघेचि ॥ ३ ॥ भानुदास म्हणे सांवळ्या श्रीरामा । देईं तुझा प्रेमा दुजें नको ॥ ४ ॥

९१० माझा तो भरंवसा तुझे नामीं आहे । येणें कार्य होय आमुचें देवा ॥ १ ॥ तूं जगाचें जीवन मनाचें मोहन । ब्रह्मसनातन तूंचि देवा ॥ २ ॥ स्थावर जंगम जगीं प्रकाशला । हा अचोज अबोला दिसे देवा ॥ ३ ॥ भानुदास म्हणे विश्रांतिसी स्थान । पंढरीवांचून दुजे नाहीं ॥ ४ ॥

९११ तुझिया रूपाची आवडी मज देवा । वाचेसी तो हेवा रामनाम ॥ १ ॥ श्रवणीं ऐकेन तुमचे पोंवाडे । दुजें वाडेकोडें न करी कांहीं ॥ २ ॥ चरणें प्रदक्षणा घालीन लोटांगणा । वंदिन चरणा संतांचिया ॥ ३ ॥ भानुदास म्हणे हीच मति स्थिर । राम नाम निर्धार गाईन मुखीं ॥ ४ ॥

९१२ एकाचिये घरीं द्वारपाळ होय । एकासी ते पाहे खांदा वाहे ॥ १ ॥ एकाचिया घरीं उच्छिष्ट तें काढी । एकाची आवडी उभा राहे ॥ २ ॥ एका घरीं कण्या आवडीनें खाये । एका घरीं न जाये बोलावितां ॥ ३ ॥ एकाचिये घरीं उच्छिष्ट भातुकें । खाय कवतुकें मिटक्या मारी ॥ ४ ॥ भानुदास म्हणे आवडीच्या सुखा भुलोनिया देखा लोणी खाये ॥ ५ ॥

९१३ शेंबडीं वाकुडीं गौळियांचीं पोरें । तेथें नाचे निर्धारें आवडीनें ॥ १ ॥ जाणते वेदांती न करिती तिकडे तोंड । म्हणे हे तों होती भांड शाब्दिक ते ॥ २ ॥ चोरितांना लोणी बांधिती गौळणी । तेथें काकळूनि पाय धरी ॥ ३ ॥ यज्ञाचे ठायीं अवदान नेघे । विदुरासी मागे आणी कण्या ॥ ४ ॥ भानूदास म्हणे जाणते नेणते । दोनी ते सरते होती पायीं ॥ ५ ॥

९१४ तुम्ही कृपानिधी संत । मी पतीत अन्यायी ॥ १ ॥ सलगी

बोलियेलों फार । न कळे निर्धार योग्यता ॥ २ ॥ ह्मणवी दास तुमचा देवा । करितां हेवा पुढिल्याचा ॥ ३ ॥ उच्छिष्ट प्रसादाची आस । म्हणे भानुदास तुमचा ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

९१५ धांव नारायणा । माझ्या दुःखाच्या निरसना ॥ १ ॥ संसारें मी कष्टलों । तुजलागीं शरण आलों ॥ २ ॥ कोण सोडविल आतां । तुजविण जी अनंता ॥ ३ ॥ तूंचि मायबापा । निवारिसी सर्व तापा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं पाय । धरूनियां चित्तीं राहे ॥ ५ ॥

९१६ धांवें धांवें श्रीहरी । निवारी संसार बोहरी ॥ १ ॥ आड-लियाचा विसावा । धांवे पावें तूं केशवा ॥ २ ॥ तूं दीनदयाळ हरी । आपुलें आम्हां जतन करीं ॥ ३ ॥ अंकित भक्ताचा । ऐसी बोले वेदवाचा ॥ ४ ॥ एकाएकी जनार्दनी । आठ सहस्र बोले वाणी ॥ ५ ॥

९१७ तुजविण आह्मां कोण आहे देवा । धांव यादवराया मायबापा ॥ १ ॥ पडिलोंसें डोहीं प्रपंच आवर्ती । कोण करी शांति तुज-विण ॥ २ ॥ जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सोडवी दातारा मायबापा ॥ ३ ॥ एकाजनार्दनी धांवे लवलाही । येवोनियां हृदयीं ठाव देईं ॥ ४ ॥

९१८ तुमच्या चरणांपरतें । शरण न जाय आणिकांतें ॥ १ ॥ ऐसे चरण पावन । उद्धरले असंख्य जन ॥ २ ॥. चरणरजाचें ध्यान । शंकर करितो आपण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । धरिले चरण न सोडी जाण ॥ ४ ॥

९१९ कृपाळु माधव तूं मुरारी । अच्युता अनंता श्रीहरी ॥ १ ॥ तुम्हीं तारिलें अहिल्येसीं । उद्धारिलें अजामेळासीं ॥ २ ॥ महा दोषांची दोषश्रेणी । ती तारिली कुंटणी ॥ ३ ॥ रामनाम जपे अनुदिनीं । शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

९२० शरणागता कृपाळू उदार पंढरिराणा । जाणतसे खुणा अंतरींच्या ॥ १ ॥ तिहीं त्रिभुवनीं चाले एक सत्ता । म्हणोनि तत्त्वतां कींव भाकीं ॥ २ ॥ करुणाकर तुम्ही भक्तांचें जीवन । हें आम्हां वचन श्रुतिवाक्य ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आलोंसे शरण । काया वाचा मन जडलें पायीं ॥ ४ ॥

९२१ तुम्ही कृपाळ कृपाळ । विश्वजनप्रतिपाळ ॥ १ ॥ म्हणोनीं येतों काकुळतीं । कृपाळूवा श्रीपती ॥ २ ॥ एकाजनार्दनीं देवा । सर्व सारूनी पायीं ठेवा ॥ ३ ॥

९२२ कैं मनींची इच्छा पुरेल ही धांव । पाहीन पंढरीराव जाऊनियां ॥ १ ॥ आलीया जन्माचें होईल सार्थक । निवारेल दुःख भय पीडा ॥ २ ॥ कैं हें मस्तक ठेवीन चरणीं । पाहीन डोळे भरूनि श्रीमुख तें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कैं होईन पात्र । नासेल समस्त तापत्रय ॥ ४ ॥

९२३ माहेरींची वास पाहीन मी डोळां । संतांचा पैं मेळा येतां देखें ॥ १ ॥ घालुनी दंडवत लागेन मी पायीं । जीव हा उतराई करूनि सांडीं ॥ २ ॥ कुर्वंडीन काया तयावरून भावें । जीवें वोवाळावें जीवलगा ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी प्रेमें करती वारी । तयांची मी थोरी काय वानूं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धन्य ते देवाचे । निरंतर वाचे विठ्ठलनाम ॥ ५ ॥

९२४ आम्ही दीन तूं दीनांनाथ । तिहीं लोकीं तुझी मात ॥ १ ॥ आम्ही पतीत तूं पावन । ऐसें साजे नामाभिधान ॥ २ ॥ आम्ही अनाथ तूं कैवारी । ऐसी तुझी आहे थोरी ॥ ३ ॥ आम्ही दीन तूं वत्सल । ऐकिला तो ऐसा बोल ॥ ४ ॥ नको धरूं दुजें आतां । कृपाळू तूं दीनानाथा ॥ ५ ॥ एका शरण जनार्दनीं । ऐसें चालत आलें दुरूनी ॥ ६ ॥

९२५ अनाथाचा नाथ दीनाचा दयाळ । म्हणवोनी सांभाळ करीं

माझा ॥ १ ॥ तुज ऐसा देव नाहीं त्रिभुवनीं । म्हणवोनी चरणीं विनटलों ॥ २ ॥ बापा जनार्दना कृपा करीं दान । सांभाळीं वचन आपुलें तें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भेटी देईं देवा । संतांपाईं भावा मिठी पडो ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

९२६ मी माझें करुनि देह चालविसी वायां । आतां जेथिचा तेथें निमोनि जाय ऐसें कीजें देवराया ॥ १ ॥ जंव जंव गोड तंव तंव जाड । जाड गोड दोन्ही नको रया ॥ २ ॥ त्रिगुण वोझें जडपण रचुनि लोटुनि देसी महापुरीं । आवर्त वोळसा पडिलीया मग तेथें कैंची असे उरी रया ॥ ३ ॥ ऐसें लटिकेंचि गार्‍हाणें देवां मी किती । तंव तुज नये काकुलती । बापरखुमादेविवरा विठ्ठला । म्यां तुजमाजी घेतली सुति रया ॥ ४ ॥

९२७ परिमळाची धांव भ्रमर ओढी । तैसी तुझी गोडी लागो मज ॥ १ ॥ आविट गे माय विटेना । जवळीं आहे परि भेटेना ॥ २ ॥ तृषा लागलिया जीवनातें ओढीं । तैसी तुझी गोडी लागो या जिवा ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलीं आवडी । गोडियेसी गोडी मिळोन गेली ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

९२८ शरण जाऊं कोणासीं । तुजाविण हृषीकेशी ॥ १ ॥ पाहतां नाहीं त्रिभूवनी । दुजा तुज ऐसा कोणी ॥ २ ॥ पाहिला शोधुनी । वेद शास्त्र पुराणीं ॥ ३ ॥ सेना म्हणे पंढरिराया । शरण सांभाळी सखया ॥ ४ ॥

९२९ अन्यायी अन्यायी । किती म्हणोन सांगो काई ॥ १ ॥ तूं तो उदराचा राणा । क्षमा करी नारायणा ॥ २ ॥ काम क्रोध लोभ मोहो । नाडिलों याचेनि पहा हो ॥ ३ ॥ नावडे संतसंगती । नाहीं केली

हरी भक्ती ॥ ४ ॥ निंदा केली भाविकांची । चित्तीं आस धनाची ॥ ५ ॥ सेना पायाचा पुतळा । तुज शरण जी दयाळा ॥ ६ ॥

९३० तूं जीवींचें जाणसी । मुखें बोलावें मानसीं ॥ १ ॥ आतां भाकितों करुणा । नको मोकलूं नारायणा ॥ २ ॥ आपुलें केलें न चले कांहीं । साधन वाउगें पाहीं ॥ ३ ॥ सेना म्हणे आशा कांही । नाहीं देहाची पाहीं ॥ ४ ॥

९३१ बुडतों भवसागरीं । मज काढीं बा मुरारी ॥ १ ॥ आतां न मानी भार कांहीं । माझी पाहीं माऊली ॥ २ ॥ करीं जतन ब्रीदावळी । वागविशी तें सांभाळी ॥ ३ ॥ मी महादोषी चांडाळ । सेना म्हणे तूं दयाळ ॥ ४ ॥

९३२ अगा पंढरीनाथा । शरण आलों कृपावंता ॥ १ ॥ याचा धरीं अभिमान । सत्य करावें वचन ॥ २ ॥ गीता भागवतीं । स्वयें बोले रमापती ॥ ३ ॥ म्हणती दीनानाथ । हेंचि सांभाळी कीं व्रत ॥ ४ ॥ मोकलितां दुरीं । सेना न ठेवीची उरी ॥ ५ ॥

९३३ लेकुराची आळी मायबापापुढें । पुरवी लाड कोड लळे त्याचे ॥ १ ॥ करावा सांभाळ सर्वस्वी गा आतां । कांहो अव्हेरितां जवळींचा ॥ २ ॥ आम्हांवरी चाले सत्ता आणिकांची । थोरींव तुमची काय मग ॥ ३ ॥ आला सेना न्हावी पायांपें जवळीं । आतां टाळाटाळी नका करूं ॥ ४ ॥

९३४ आम्हां एकाविध भाविकांची जाती । न जाणे निश्चितीं दुजें कांहीं ॥ १ ॥ खुण जाणे चित्तीं क्षोभ उपजेना । कळवळुनि स्तना लावी पाळी ॥ २ ॥ अवघे होऊ येतें तुज वाटे चित्तें । उपासनें परतें नावडे कांहीं ॥ ३ ॥ डोळा मुख पाहूं मुखी नाम गांऊं । सेना म्हणे पाहूं जळीं स्थळीं ॥ ४ ॥

९३५ आंगिकार केला । भार चालवी विठ्ठला ॥ १ ॥ संतीं सांगितलें । तें म्या हृदयीं धरिलें ॥ २ ॥ तारिला आजामिळ । महा पापी

की चांडाळ ॥ ३ ॥ पतितपावन । करीं नाम हें जतन ॥ ४ ॥ वागवी अभिमान । सेना न्हावी यातीहीन ॥ ५ ॥

९३६ ऐशी आवडी आहे माझ्या जीवा । तुजसी केशवा निवेदिलें ॥ १ ॥ पांडुरंगा ऐसें वाटतसे जीवा । करीन संतसेवा अहर्निशीं ॥ २ ॥ नलगे वित्त गोत वैकुंठीं राहणें । सायुज्यसदनीं चाड नाहीं ॥ ३ ॥ करुणास्वरें सेना बाहात विठ्ठला । हेतु पुरविला आवडीचा ॥ ४ ॥

९३७ स्तुति करूं ऐसा नाहीं अधिकार । शिणला फणीवर वर्णवेना ॥ १ ॥ तेथें मी सरता होइन कैशापरी । वर्णावया हरी कीर्ति तुझी ॥ २ ॥ अठराही भागले सहाही शिणले । चाऱ्हीही राहिले मौन्यची ॥ २ ॥ रुक्मादेवीवरें अंगिकार केला । निवांत राहिला सेना न्हावी ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज.

९३८ आतां याचा अर्थ पुरे पुरे देवा । येऊंद्या कनवळा तुम्हांलागी ॥ १ ॥ गुंतलोंसें काढा यांतोनीं बाहेरी । माझें तो हरि कांहीं न चाले ॥ २ ॥ वारंवार करुणा करितों देवराया । कां न ये कनवळा तुम्हांलागीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे आतां न करा उदास । पुरवावी आस मायबापा ॥ ४ ॥

९३९ आतां कासया हा दाखवितां खेळ । म्या तंव सकळ जाणितला ॥ १ ॥ जेथें ब्रह्मादिक वेडे पिसे झाले । न कळे वहिलें तयांलागीं ॥ २ ॥ कोणासी हा पार न कळे तुमचा । काय बोलों वाचा कीर्ति तुमची ॥ ३ ॥ चोखा म्हणे तुमचा अविट हा खेळ । भुललें सकळ ब्रह्मांडाचें ॥ ४ ॥

९४० कांहीं तरी अभय न मिळे उत्तर । ऐसे कां निष्ठुर झाला तुम्हीं ॥ १ ॥ मी तो कळवळोनीं मारितसें हाक । तुह्मां पडे धाक कासयाचा ॥ २ ॥ बोलोनी उत्तरें करीं समाधान । येवढेंचि दान

मज द्यावें ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझी पुरवावी आस । न करीं उदास माझे माये ॥ ४ ॥

९४१ समर्थासी रंकें शिकवण जैशी । माझी वाणी तैशी बड-बड ॥ १ ॥ शुभ हें अशुभ न कळे बोलतां । परि करी सत्ता लंड-पणें ॥ २ ॥ उच्छिष्टाची आशा भुंकतसे श्वान । तैसा मी एक दीन आहे तुमचा ॥ ३ ॥ चोखा म्हणे एका घासाची चाकरी । करितों मी द्वारीं तुमचीया ॥ ४ ॥

९४२ अगाध हे कीर्ति विठ्ठला तुमची । महिमा आणिकाची काय सांगों ॥ १ ॥ पुराणें भागली नेति नेति शब्द । श्रुतीचा अनु-वाद खुंटलासे ॥ २ ॥ शेषादिकां जेथें न कळेचि अंत । तेथें मी पतित काय वानूं ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझा नाहीं अधिकार । कैसा हा विचार होईल नेणों ॥ ४ ॥

९४३ धरोनिया आशा टाकिलासे ठाव । अवघाचि वाव झाला दिसे ॥ १ ॥ कवणासी सांकडें सांगूं पंढरीराया । कांहो नये दया माझी तुम्हां ॥ २ ॥ बाळकाचे परी लडिवाळपणें । तुमचें पोसणें मी तों देवा ॥ ३ ॥ चोखा म्हणे मज तुम्ही मोकलितां । काय आमुची कथा आतां चाले ॥ ४ ॥

९४४ सुखाचिया लागीं करितों उपाव । तो अवघेंचि वाव दिसो येतें ॥ १ ॥ करितां तळमळ मन हें राहिना । अनावर जाणा वासना हे ॥ २ ॥ अवघेंचि साकडें दिसोनियां आलें । न बोलवें तें भलें कोणा पुढें ॥ ३ ॥ चोखा म्हणे मी पडिलों गुन्हाडीं । सोडवी तातडी यातूनियां ॥ ४ ॥

९४५ बहु कनवाळू होसी गा देवराया । म्हणोनीं सखया शरण आलों ॥ १ ॥ निवारी या तापापासोनीं सोडवी । करूणा भाकावी किती तुम्हां ॥ २ ॥ माझीयाचि काजा विलंब दातारा । कां न करीं

त्वरा देवराया ॥ ३ ॥ चोखा म्हणे बहु पडिलों काचणीं । सोडवी चक्रपाणी वेगीं आतां ॥ ४ ॥

९४६ कोण माझा आतां करील परिहार । तुजविण डोंगर उतरी कोण ॥ १ ॥ तूं वो माझी माय तूं वो माझी माय । दाखवीं गे पाय झडकरी ॥ २ ॥ बहुत कनवाळा तुझिया गा पोटीं । आतां नको तुटी करूं सेवा ॥ ३ ॥ चोखा म्हणे मज ठ्यावें पदरांत । ठेवा माझें चित्त तुमचे पायीं ॥ ४ ॥

९४७ अहो करूणाकरा रूक्मिणीच्या वरा । उदारा धीरा पांडुरंगा ॥ १ ॥ काय म्यां पामरें वानावें जाणावें । न कळे कैसें गावें नाम तुमचें ॥ २ ॥ विधि अविधि कोणता प्रकार । नेणों न कळे साचार मजलागीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे मज कांहींच न कळे । उगाचि मी लोळे महाद्वारी ॥ ४ ॥

९४८ असें करणें होतें तुला । तरी कां जन्म दिला मला ॥ १ ॥ जन्म देवोनी सांडिलें । कांहो निष्ठुर मन केलें ॥ २ ॥ कोठें गेला माझें वेळीं । केलें कोणाचें सांभाळीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे देवा । नका मोकलुं केशवा ॥ ४ ॥

९४९ जनक तूं माझा जननी जगाची । करूणा आमुची कां हो नये ॥ १ ॥ कासया संसार लावियेला पाठीं । पडलीसे तुटी तुमची माझी ॥ २ ॥ जन्म जरा मरण आम्हां सुखदुःख । पहासी कौतुक काय देवा ॥ ३ ॥ गाहिंवरुनी चोखा उभा महाद्वारी । विनवी जोडोनि करीं विठोबासी ॥ ४ ॥

९५० हीनयाती माझी देवा । कैसी घडे तुझी सेवा ॥ १ ॥ मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटूं कवण्या रीती ॥ २ ॥ माझा लागतांचि कर । सिंतोडा घेताती करार ॥ ३ ॥ माझ्या गोविंदा गोपाळा । करूणा भाकी चोखामेळा ॥ ४ ॥

९५१ जन्माची वेरझारी । तुम्हांविण कोण वारी ॥ जाचलों

संसारी । सोडवण करी देवराया ॥ १ ॥ शरण शरण पंढरीराया । तुम्हां आलों यादवराया ॥ निवारोनियां भया । मज तारा या सागरीं ॥ २ ॥ तुम्हांविण माझें कोडें । कोण निवारी सांकडें । मी तों झालों असे वेडें । उपाव पुढें सुचेना ॥ ३ ॥ चोखा म्हणे दीनानाथा । आतां निवारीं हे भवव्यथा । म्हणोनी ठेवितसें माथा । चरणावरी विठ्ठच्या ॥ ४ ॥

९५२ काय मातेसी बाळ शिकवावें । आपुल्या स्वभावें वोढतसे ॥ १ ॥ तैसाच प्रकार तुमचीये घरीं । ऐसीच निर्धारीं आली वाट ॥ २ ॥ तेंचि आजी दिसे वोखटें कां झालें । संचिताचें बळें दिसें ऐसें ॥ ३ ॥ चोखा म्हणे हा तों तुम्हां नाहीं बोल । आमुचें सखोल कर्म दिसे ॥ ४ ॥

## श्रीकान्होपात्रा.

९५३ वर्म वैरीयाचे हातीं । देऊं नको श्रीपती ॥ १ ॥ तूं तों अनाथाचा नाथ । दीनदयाळ कृपावंत ॥ २ ॥ वेद पुराणें गर्जती । साही शास्त्रें विवादती ॥ ३ ॥ चरणीं ब्रीद वागविसी । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥

९५४ जीवींचें जीवलगे माझे कृष्णाई कान्हाई । सांवळे डोळसे करूणा येऊं दे कांहीं ॥ १ ॥ आला अपवाद याती संबंध लौकीक पाहीं । सांवळे डोळसे करूणा येऊंदे कांहीं ॥ २ ॥ दीनोद्धार ऐसें वेदशास्त्रें गर्जती पाही । सांवळे डोळसे करूणा येऊं दे कांहीं ॥ ३ ॥ शरण कान्होपात्रा तुजला वेळोवेळा पाहीं । सांवळे डोळसे करूणा येऊं दे कांहीं ॥ ४ ॥

९५५ अगा वैकुंठीच्या राया । अगा विठ्ठल सखया ॥ १ ॥ अगा नारायणा । अगा वसुदेवनंदना ॥ २ ॥ अगा पुंडलीक वरदा । अगा विष्णु तूं गोविंदा ॥ ३ ॥ अगा रखुमाईच्या कांता । कान्होपात्रा राखी आतां ॥ ४ ॥

९५६ पतित तूं पावना । म्हणविसी नारायणा ॥ १ ॥ तरी सांभाळीं वचन । ब्रीद वागविसी जाण ॥ २ ॥ याती शुद्ध नाहीं भाव । दुष्ट आचरण स्वभाव ॥ ३ ॥ मुखीं नाम नाहीं । कान्होपात्रा शरण पायीं ॥ ४ ॥

९५७ माझें माहेर पंढरी । सुखें नांदू भीमातीरीं ॥ १ ॥ येथें आहे मायबाप । हरे ताप दरूशनें ॥ २ ॥ निवारिली तळमळ चिंता । गेली व्यथा अंतरींची ॥ ३ ॥ कैशी विटेवरी शोभली । पाहूनि कान्होपात्रा धाली ॥ ४ ॥

९५८ दीन पतित अन्यायी । शरण आलें विठाबाई ॥ १ ॥ मी तों आहे यातीहीन । न कळे कांहीं आचरण ॥ २ ॥ मज अधिकार नाहीं । भेटी देई विठाबाई ॥ ३ ॥ ठाव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥

### श्रीनरहरीसोनार.

९५९ काय तुझी थोरी वर्णूं मी पामर । होसी दयाकर कृपानिधी ॥ १ ॥ तुजसरशी दया नाहीं आणिकाशी । असे हृषीकेशी नवल एक ॥ २ ॥ जन हो जोडी करा नाम कंठीं धरा । जेणें चुके फेरा गर्भवासी ॥ ३ ॥ नरदेहीं साधन समता भावभक्ती । निजध्यास चित्तीं संतसेवा ॥ ४ ॥ गुरुपदीं निश्चळ परब्रम्ह पाहे । नरहरी राहे एकचित्तें ॥ ५ ॥

---

## मागणीपर अभंग.

### श्रीतुकाराममहाराज

९६० अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ॥ १ ॥ करूनी उचित देई हेंचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥ २ ॥ देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवूनि निराळा दावीं मज ॥ ३ ॥ तुका

म्हणे आहे तुझें हें सकळ । कोणें एके काळें देईं मज ॥ ४ ॥

९६१ समचरण दृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी हरी वृत्ति राहो ॥ १ ॥ आणिक नलगे मायिक पदार्थ । तेथें माझें आर्त नको देवा ॥ २ ॥ ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें चित्त झणीं जडों देसी ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जें जें कर्म धर्म नाशवंत ॥ ४ ॥

९६२ सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती । रखुमाईच्या पती सोयरिया ॥ १ ॥ गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्व काळ ॥ २ ॥ विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजि ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं न मागें आणिक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥ ४ ॥

९६३ वारंवार हाचि न पडावा विसर । वसावें अंतर तुमच्या गुणीं ॥ १ ॥ इच्छेचा ये दाता तूं एक समर्था । अगा कृपावंता माय-बापा ॥ २ ॥ लाभाचिये वोढी उताविळ मन । त्यापरि चिंतन चरणाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा । पांडुरंगे द्यावा शीघ्र आतां ॥ ४ ॥

९६४ पावलें पावलें तुझें आम्हां सर्व । दुजा नको भाव होऊं देऊं ॥ १ ॥ जेथें तेथें देखें तुझींच पाउलें । त्रिभुवन संचलें विठ्ठलागा ॥२॥ भेदाभेद मतें भ्रमाचे संवाद । आम्हां नको वाद त्यांशीं देऊं ॥ ३ ॥ तुका म्हणे अणु तुजविण नाहीं । नभाहुनि पाहीं वाढ आहे ॥ ४ ॥

९६५ वाळूनियां जन सांडीं मज दूरी । करिसील हरी ऐसें कधीं ॥ १ ॥ आठवीन पाय धरूनि अनुताप । वाहे जळ झोंप नाहीं डोळां ॥ २ ॥ नावडती जीवा आणिक प्रकार । आवडी ते फार एकांताची ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसी धरितों वासना । होईं नारायणा साह्य मज ॥ ४ ॥

९६६ होईल तो भोग भोगीन आपुला । न घालीं विठ्ठला भार तुज ॥ १ ॥ तुम्हां पासाव हें इच्छितसें दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम

॥ २ ॥ नयें काकुलती गर्भवासासाठीं । न धरी हें पोटीं भय कांहीं ॥३॥ तुका म्हणे मज उदंड एवढें । नाचेन मी पुढें मायबापा ॥ ४ ॥

९६७ कानडीनें केला मऱ्हाठा भ्रतार । एकाचें उत्तर एका नये ॥ १ ॥ तैसें मज नको करूं कमळापति । देईं या संगति सज्जनांची ॥ २ ॥ तिनें पाचारिलें इलबा म्हणोन । येरु पळे आण झाली आतां ॥ ३ ॥ तुका म्हणे येर येरा जें विच्छिन्न । तेथें वाढे शीण सुखा-पोटीं ॥ ४ ॥

९६८ नाम आठवितां सद्गदित कंठीं । प्रेम वाढे पोटीं ऐसें करीं ॥ १ ॥ रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांगही गात्रीं प्रेम तुझें॥२॥ सर्वही शरीर वेंचो या कीर्तनीं । गाऊं निशिदिनीं नाम तुझें ॥ ३ ॥ तुका म्हणे दुजें न करी कल्पांतीं । सर्वदा विश्रांति संतांपायीं ॥ ४ ॥

९६९ अनाथ परदेशी हीन दीन भोळें । उगलेंचि लोळें तुझे रंगीं ॥ १ ॥ आपुलें म्हणावें मज नुपेक्षावें । प्रेमसुख द्यावें मायबापा ॥२॥ कासवीचे परी दृष्टि पाहें मज । विज्ञानीं उमज दावूनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझा झालों शरणागत । काया वाचा चित्त दुजें नाहीं॥४॥

९७० कांजी तुम्ही ऐसें नव्हे कृपावंत । निवे माझें चित्त ठायीं-च्या ठायीं ॥ १ ॥ कांहीं सम नये विषम अंतरा । शांताचा तो बरा ऐसा योग ॥ २ ॥ दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्व दातारें राखावीं तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण म्हणवूनी ॥ ४ ॥

९७१ येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥ १ ॥ आतां माझा जीव घेउनीयां बळी । बैसावावें वोळी संतांचिये ॥ २ ॥ विस्तारिली वाचा फळेंवीण वेल । कोरडेचि बोल फोल वांझे ॥ ३ ॥ तुका म्हणे आलों निर्वाणाचे वरी । राहों नेदीं उरी नारायणा ॥ ४ ॥

९७२ सांवळें सुंदर रूप मनोहर । राहो निरंतर हृदयीं माझे ॥ १ ॥

आणिक कांहीं इच्छा आम्हां नाहीं चाड । तुझें नाम गोड पांडुरंगें ॥ २ ॥ जन्मोजन्मीं ऐसें मागितलें तुज । आम्हांसी सहज द्यावें आतां ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज ऐसे दयाळ । धुंडितां सकळ नाहीं आम्हां ॥ ४ ॥

९७३ मोक्षाचें आम्हासी नाहीं अवघड । तो असे उघड गांठेळीस ॥१॥ भक्तीचे सोहळे होतील जीवासी । नवल तेविशीं पुरवितां ॥ २ ॥ ज्याचें त्यासी देणें कोणतें उचित । मानूनियां हित घेतों सुखें ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखें देई संवसार । आवडीसी थार करी माझे ॥ ४ ॥

९७४ पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥ १ ॥ प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥ २ ॥ सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर झाले तरी ॥ ४ ॥

९७५ नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असों द्यावी ॥ १ ॥ सरलिया भोग येईन शेवटीं । पायापें या भेटीं अनुसंधानें ॥ २ ॥ आतां मजसाठीं याल आकारास । रोकडी हे आस नाहीं देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे मुखीं असो तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ ॥ ४ ॥

९७६ इच्छेपाशीं आलों फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीचे ॥ १ ॥ द्यावें लवकरी मागितलें दान । मुळींचें जतन करूनी असे ॥ २ ॥ उपाय हे करीं एकाचि वचना । दावूनियां खुणा ठाया येतों ॥ ३ ॥ तुका म्हणे किती गांठी तुजपाशीं । जगाच्या तोडिसी चिंतनानें ॥ ४ ॥

९७७ लडिवाळ म्हणोनी निष्ठुर न बोला । परी सांभाळीला लागे घात ॥ १ ॥ बहु वागवीत आणिलें दुरूनी । दिसांची पोसनी बहु आहे ॥ २ ॥ नाहीं लागों दिला आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजतो

॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्हीं कृपावंत हरी । शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥ ४ ॥

९७८ जेणें माझें चित्त राहे तुझ्या पायीं । अखंड तें देइ प्रेमसुख ॥ १ ॥ देहभाव राख दीन करूनियां । जनाचारी वायां जाय तैसा ॥ २ ॥ द्रव्य दारा नको मानाची आवडी । कवणेविशीं गोडी प्रपंचाची । ३ ॥ तुझें नाम माझें धरूनियां चित्त । एकांत लोकांत सदा राहो ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझे जडोनियां पायीं । झालों उतराई पांडुरंगा ॥ ५ ॥

९७९ माझे हातीं आहे करावें चिंतन । तुम्ही कृपादान प्रेम द्यावें ॥ १ ॥ मागतियां भांडवल आळवण । नामाची जतन दातियासी ॥ २ ॥ बाळक धांवोनी आड निघे स्तनीं । घालावा जननी कृपे पान्हां ॥ ३ ॥ तैशापरी पुढें तुझिया मी आशे । धांवोनि वोरसे देई भेटी ॥ ४ ॥ तुका म्हणे करी कांसवीचे परी । आहे सूत्रदोरी तुझे हातीं ॥ ५ ॥

९८० अमृताचीं फळें अमृताची वेली । तेचि पुढें चाली बीजाचीहि ॥ १ ॥ ऐसियांचा संग देईं नारायणा । ओलावा वचना जयांचिया ॥ २ ॥ उत्तम सेवन सितळ कंठासी । पुष्टी कांती तैसी दिसे वरी ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसें होईजेत संगें । वास लागे अंगें चंदनाच्या ॥ ४ ॥

९८१ नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥ १ ॥ न यो काम क्रोध द्वेष निंदा द्वंद्व । अवघा गोविंद निःसंदेह ॥ २ ॥ असावें म्यां सदा विषयीं विरक्त । काया वाचा चित्त तुझे पायीं ॥ ३ ॥ करोनियां साह्य पुरवीं मनोरथ । व्हावें कृपावंत तुका म्हणे ॥ ४ ॥

९८२ नावडावें जन नावडावा मान । करूनि प्रमाण तूंचि होईं ॥ १ ॥ सोडवूनि देहसंबंध व्यसनें । ऐसी नारायणें कृपा कीजे ॥ २ ॥

नावडावें रूप नावडावें रस । अवघी राहो आस पायांपाशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां आपुलिया सत्ता । करूनि अनंता ठेवा ऐसें ॥ ४ ॥

९८३ आतां काढाकाढी करीं वा पंढरीराया । नाहीं तरी वायां गेलों दास ॥ १ ॥ जाणतां बैसलों दगडाचे नावे । तिचा तो स्वभाव प्राण घ्यावा ॥ २ ॥ मनाचा संकल्प इंद्रियांची ओढी । पतनाची जोडी वरी हांव ॥ ३ ॥ तुका म्हणे झाली अंधळ्याची परी । आतां मज हरी वाट दावीं ॥ ४ ॥

९८४ लाज वाटे पुढें तोंड दाखवितां । परि जाऊं आतां कोणापाशीं ॥ १ ॥ चुकलिया काम मागतो मुशारा । लाज फजितखोरा नाहीं मज ॥ २ ॥ पाय सोडूनियां फिरतों वासर । स्वामिसेवे चोर होऊनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे मज पाहिजे दंडिलें । पुढें हें घडलें न पाहिजे ॥ ४ ॥

९८५ आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा एका भावें ॥ १ ॥ तरीच हरिचे दास म्हणवितां श्लाघिजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥ २ ॥ गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मागों तुज ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा ऐसियांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

९८६ मातेची अवस्था काय जाणे बाळ । तिसी तों सकळ चिंता त्याची ॥ १ ॥ ऐसा परस्परें आहे हा विचार । भोपळ्याच्या तारा दगडासी ॥ १ ॥ भुजंग पोटाळी चंदनाचें अंग । निवे परी संग नव्हे तैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे करीं परिसाचे परी । मज ठेवा सरी लोखंडाचे ॥ ४ ॥

९८७ किती तुजपासीं देऊं परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ १ ॥ आतां माझे हातीं देईं माझें हित । करीं माझें चित्त समाधान ॥ २ ॥ राग आला तरी कापूं नये मान । बाळा मायेविण

कोण दुजें ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा होईल लौकिक । मागे वाळ भीक समर्थाचें ॥ ४ ॥

९८८ पोट धालें मग नलगे परती । जालिया निश्चिती खेळ गोड ॥ १ ॥ आपुलिया हातें देईं वो कवळ । विठ्ठल शीतळ जीवनावरी ॥ २ ॥ घराचा विसर होईल आनंद । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे तोंच वरी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥ ४ ॥

९८९ सारीन तें आतां एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळों वेळां ॥ १ ॥ शेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पांडुरंगे ॥ २ ॥ वंचूं नये आतां कांहींच प्रकार । धाकल्याचें थोर जाल्यावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां बहु चाळवावें । कांहीं नेदी ठावें उरों मागें ॥ ४ ॥

९९० नाहीं तुम्हां कांहीं लाविलें मागणें । कांटाळयाच्या भेणें त्रासलेती ॥ १ ॥ एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखों कांहीं ॥ २ ॥ पायांच्या वियोगें प्राणासवसाटीं । नेघेवेसी तुटी झाली आतां ॥ ३ ॥ तुका म्हणे तुह्मां मागणें तें आतां । हेंचि कृपावंता चरणीं वास ॥ ४ ॥

९९१ नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥ १ ॥ दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ॥ २ ॥ तुका म्हणे तुझें झालिया दर्शन । मग निवारण होईल सर्व ॥ ३ ॥

९९२ हरि तुझें नाम गाईन अखंड । याविण पाखंड नेणें कांहीं ॥ १ ॥ अंतरीं विश्वास अखंड नामाचा । काया मनें वाचा देईं हेंचि ॥ २ ॥ तुका म्हणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥ ३ ॥

९९३ हेंचि सुख पुढें मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान

॥ १ ॥ जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥ २ ॥ दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥ ३ ॥ अभय देऊनी करावें सादर । क्षण तो विसर पडों नेदीं ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्हीं जे जे इच्छा करूं । ते ते कल्पतरू पुरवावी ॥ ५ ॥

९९४ एकांतीचें सुख देईं मज देवा । आघात या जीवा चुकवूनी ॥ १ ॥ ध्यानीं रूप वाचे नाम निरंतर । आपुला विसर पडों नेदीं ॥ २ ॥ मायबाळा भेटी सुखाची आवडी । तैसी मज गोडी देईं देवा ॥ ३ ॥ कीर्ती ऐकोनियां जालों शरणागत । दासाचें तूं हित करितोसि ॥ ४ ॥ तुका म्हणे मी तों दीन पापराशी । घालावें पाठीशीं मायबापा ॥ ५ ॥

९९५ येणें मुखें तुझे वर्णी गुण नाम । तेंचि मज प्रेम देईं देवा ॥ १ ॥ डोळे भरूनियां पाहें तुझें मुख । तेंचि मज सुख देईं देवा ॥ २ ॥ कान भरोनिया ऐके तुझी कीर्ती । ते मज विश्रांति देईं देवा ॥ ३ ॥ बाहें रंगीं टाळी नाचेन उदास । हें देईं हातांस पायां बळ ॥ ४ ॥ तुका म्हणे माझा सकळ देहभाव । आणीक नको टाव चिंतूं यासी ॥ ५ ॥

९९६ त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागों दे ममता तुझे पायीं ॥ १ ॥ एकाचि मागणें देईं तुझी गोडी । नलगे आवडी आणिकाची ॥ २ ॥ तुझें नाम गुण वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगी ॥ ३ ॥ बापा विठ्ठलराया हेंचि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ॥ ४ ॥ आवडीसारिखें मागितलें जरी । तुका म्हणे करीं समाधान ॥ ५ ॥

९९७ आमुची कृपाळू तूं होसी माउली । विठ्ठले साउली शरणागता ॥ १ ॥ प्रेमपान्हा स्तनीं सदा सर्वकाळ । दृष्टि हे निर्मळ अमृताची ॥ २ ॥ भूक तान दुःख वाटों नेदीं शीण । अंतरींचा गुण

जाणोनियां ॥ ३ ॥ आशा तृष्णा माया चिंता दवडीं दूरी । ठाव आम्हां करी खेळावया ॥ ४ ॥ तुका म्हणे लावीं संतांचा सांगात । जेथें न पवे हात कळीकाळाचा ॥ ५ ॥

९९८ मानावया जग व्हावी द्रव्यमाया । नाहीं हें माझिया जीवा चाड ॥ १ ॥ तुझ्या पायांसाठीं केली आराणूक । आतां कांहीं एक नको दुजें ॥ २ ॥ करूनियां कृपा करीं अंगीकार । न लावीं उशीर आतां देवा ॥ ३ ॥ नव्हे साच कांहीं कळों आलें मना । म्हणोनि वासना आवारिली ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां मनोरथ सिद्धी । माझे कृपानिधी पाववावे ॥ ५ ॥

९९९ नलगे देवा तुझें आम्हांसी वैकुंठ । सायुज्याचा पट नलगे मज ॥ १ ॥ देईं तुझें नाम मज सर्वकाळीं । मागणें वनमाळी हेंचि तुज ॥ २ ॥ नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम ध्याती ॥ ३ ॥ सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताति गजर रामनामें ॥ ४ ॥ तुका म्हणे हरी देईं तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ॥ ५ ॥

१००० विश्वास धरूनि राहिलों निवांत । ठेवूनियां चित्त तुझे पायीं ॥ १ ॥ तरावें बुडावें तुझिया वचनें । निर्धार हा मनें केला माझ्या ॥ २ ॥ न कळे हें मज साच चाळविलें । देसी तें उगलें घेईन देवा ॥ ३ ॥ मागणें तें सरे ऐसें करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥ ४ ॥ करावें कांहीं कीं पहावें उगलें । तुका म्हणे बोलें पांडुरंगा ॥ ५ ॥

१००१ कृपाळू म्हणोनि बोलती पुराणें । निर्धार वचनें यांचीं मज ॥ १ ॥ आणीक उपाय नेणोंचि मी कांहीं । तुझें वर्म ठायीं पडे तैसें ॥ २ ॥ नये धड कांहीं बोलतां वचन । रिघालों शरण सर्वभावें ॥ ३ ॥ कृपा करिसी तरी थोडें तुज काम । माझा तरी श्रम बहु हरे

॥ ४ ॥ तुका म्हणे मज दाखवीं श्रीमुख। हरेल या भूक डोळियांची ॥ ५ ॥

१००२ मायबळें कैसा जालासी लहान। मागें संतीं ध्यान वर्णियेलें ॥ १ ॥ तें मज उचित करूनियां देवा। दाखवीं केशवा मायबापा ॥ २ ॥ पाहोनियां डोळां बोलेन मी गोष्टी। आलिंगुनी मिठी देईन पायीं ॥ ३ ॥ चरणीं दृष्टि उभा राहेन समोर। जोडोनियां कर पुढें दोन्ही ॥ ४ ॥ तुका म्हणे उत्कंठित हे वासना। पुरवीं नारायणा आर्त माझें ॥ ५ ॥

१००३ मागता भिकारी जालों तुझे द्वारीं। देईं मज हरी कृपादान ॥ १ ॥ प्रेम प्रीति नाम उचित करावें। भावें संचरावें हृदयामाजी ॥ २ ॥ सर्वभावें शरण आलों पांडुरंगा। कृपाळु तूं जगामाजी एक ॥ ३ ॥ तापत्रयें माझी तापविली काया। शीतळ व्हावया पाय तुझे ॥ ४ ॥ संबंधीं जनवाद पीडिलों परोपरी। अंतरलों दूरी तुजसी तेणें ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां तुझा शरणागत। करावें सनाथ मायबापा ॥ ६ ॥

१००४ न म्हणे कवणा सिद्ध साधक गव्हार। अवघा विश्वंभर वांचूनियां ॥ १ ॥ ऐसें माझे बुद्धि काया वाचा मन। लावीं तुझें ध्यान पांडुरंगा ॥ २ ॥ गातां प्रेमगुण शंका माझ्या मनीं। नाचतां रंगणीं नाठवावी ॥ ३ ॥ देईं चरणसेवा भूतांचें भजन। वर्ण अभिमान सांडवूनि ॥ ४ ॥ आशापाश माझी तोडीं माया चिंता। तुजविण व्यथा नको कांहीं ॥ ५ ॥ तुका म्हणे सर्व भाव तुझे पायीं। राहे ऐसें देईं प्रेम देवा ॥ ६ ॥

१००५ देवा आतां ऐसा करीं उपकार। देहाचा विसर पाडीं मज ॥ १ ॥ तरीच हा जीव सुख पावे माझा। बरें केशीराजा कळों आलें ॥ २ ॥ ठाव देईं चित्ता राखें पायांपाशीं। सकळ वृत्तींसी अखंडित ॥ ३ ॥ आस भय चिंता लाज काम क्रोध। तोडावा संबंध यांचा माझा ॥ ४ ॥ मागणें तें एक हेंचि आहे आतां। नाम मुखीं संतसंग

देईं ॥ ५ ॥ तुका म्हणे नको वरपंग देवा । घ्यावी माझी सेवा भाव-शुद्ध ॥ ६ ॥

१००६ चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणावरी माथा ॥ १ ॥ वेळोवेळां देईं क्षेम आलिंगन । वरी अवलोकन कृपा दृष्टी ॥२॥ प्रक्षाळूं दे पाय बैसें माजघरीं । चित्त स्थिर करीं पांडुरंगा ॥ ३ ॥ आहे त्या संचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥४॥ करुणाकरें नाहीं कळों दिलें वर्म । दुरी होतां श्रम कोण वारी ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां आवडीच्या सत्ता । बोलिलों अनंता करवीन तें ॥६॥

१००७ तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ॥ १ ॥ हें मज देईं हें मज देईं । आणिक दुजे कांहीं न मागें तुज ॥ २ ॥ बहिर कान तुझी कीर्ति नाइकतां । पाय न देखतां जात डोळे ॥ ३ ॥ मना तुझें ध्यांन नाहीं नित्य काळ । धिग तें चांडाळ जळो जळो ॥ ४ ॥ हातपाय तेणें पंथें न चालतां । जावो ते अनंता गळोनियां ॥ ५ ॥ तुजविण जिणें नाहीं मज चाड । तुका म्हणे गोड नाम तुझें ॥ ६ ॥

१००८ तुझ्या रूपें माझी काया । भरो द्यावी पंढरिराया । दर्पणींची छाया । एका रूपें भिन्नत्व ॥ १ ॥ सुख पडिलें सांटवण । सत्ता वेचे शनें शनें । अडचणीचे कोन । चारी मार्ग उगवले ॥ २ ॥ वसो डोळ्यांची बाहुली । कवळे भिन्न छाया झाली । कृष्णांजन चाली । नव्हे परती माघारी ॥ ३ ॥ जीव ठसावला शिवें । मना आलें तेथें जावें । फांटा पडिला नांवें । तुका म्हणे खंडलें ॥ ४ ॥

१००९ जळो माझी ऐसी बुद्धी । मज घालीं तुजमधीं । आवडी हे विधि । निषेधींची चांगली ॥ १ ॥ तूं स्वामी मी सेवक । उंच पद निंच एक । ऐसें करावें कौतुक । नको करूं खंडणा ॥ २ ॥ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता निराळा । तेणें गोडी निवडिली ॥ ३ ॥ हिरा शोभला कोंदणें । अळंकारीं मिरवे सोनें ।

एक असतां तेणें । काय दुजें जाणावें ॥ ४ ॥ उष्णें छाये सुख वाटे । बाळें माते पान्हा फुटे । एका एक भेटे । कोण सुख त्या काळीं ॥५॥ तुका म्हणे हित । हेंचि मानी माझें चित्त । नव्हे आतां मुक्त । ऐसा जाला भरंवसा ॥ ६ ॥

१०१० दुडीवर दुडी । चाले मोकळी गुजरी ॥ १ ॥ ध्यान लागों ऐसें हरी । तुझे चरणीं तैशापरी ॥ २ ॥ आवंतण्याची आस । जैसी लागे दुर्बळास ॥ ३ ॥ लोभ्या कळांतराची आस । वोटें मोजी दिवस मास ॥ ४ ॥ तुका म्हणे पंढरिनाथा । मजला आणिक नको व्यथा ॥५॥

१०११ काय बोलों सांगा । याउपरी पांडुरंगा ॥ १ ॥ कांहीं आधारावांचून । पुढें न चले वचन ॥ २ ॥ वाढे ऐसा रस । कांहीं करावा सौरस ॥ ३ ॥ भक्ति भाग्य सीमा । द्यावा जोडोनियां प्रेमा ॥ ४ ॥ कोरड्या उत्तरीं । नका गौरवूं वैखरी ॥ ५ ॥ करी विज्ञापना । तुका प्रसादाची दाना ॥ ६ ॥

१०१२ राहाणें तें पायांपाशीं । आणिकां रसीं विटोनी ॥ १ ॥ ऐसा धीर देईं मना । नारायणा विनवितों ॥ २ ॥ अंतरीं तों तुझा वास । आणिकां नास कारणां ॥ ३ ॥ तुका म्हणे शेवटींचें । वाटे साचें राखावें ॥ ४ ॥

१०१३ चिंतनाची जोडी । हाचि लाभ घडोघडी ॥ १ ॥ तुम्हीं वसूनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥ २ ॥ जेथे जेथें जाय मन । आड घाला सुदर्शन ॥ ३ ॥ तुका म्हणे भोजें । मग मी नाचेन निर्लज्ज ॥ ४ ॥

१०१४ देव वसे चित्तीं । त्याची घडावी संगती ॥ १ ॥ ऐसें आवडतें मना । देवा पुरवावी वासना ॥ २ ॥ संतजनासवें भेटी । नव्हों अंगसंगें तुटी ॥ ३ ॥ तुका म्हणे जिणें । भलें संतसंघट्टणें ॥ ४ ॥

१०१५ जेणें होय हित । तें तूं जाणसी उचित ॥ १ ॥ मज नको लावूं तैसें । वायां जाये ऐसें पिसें ॥ २ ॥ धरितोसी सत्ता । होसी

सकळ जाणता ॥ ३ ॥ चतुराच्या राया । अंगीकारावें तुकया ॥ ४ ॥

१०१६ दुर्बुद्धि ते मना । कदा नुपजो नारायणा ॥ १ ॥ आतां मज ऐसें करीं । तुझे पाय चित्तीं धरीं ॥ २ ॥ उपजला भावो । तुमचे कृपें सिद्धी जावो ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । लाभ नाहीं यापरता॥४॥

१०१७ अहो कृपावंता । होईं बुद्धीचा ये दाता ॥ १ ॥ जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं भार ॥ २ ॥ वदवी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । माझें अंतर वसवा ॥ ४ ॥

१०१८ आतां माझ्या मायबापा । तूं या पापा प्रायश्चित्त ॥ १ ॥ फजित हे केले खळ । तो विटाळ निवारीं ॥ २ ॥ प्रेमा आतां पाजी रस । करीं वास अंतरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । जिवलगा माझिया ॥ ४ ॥

१०१९ धर्माची तूं मूर्ती । पापपुण्य तुझे हातीं ॥ १ ॥ मज सोडवीं दातारा । कर्मापासूनि दुस्तरा ॥ २ ॥ करिसी अंगीकार । तरी काय माझा भार ॥ ३ ॥ जिवींच्या जीवना । तुका म्हणे नारायणा ॥ ४ ॥

१०२० मज दास करीं त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥ १ ॥ मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ २ ॥ नीचवृत्ती काम । परी मुखीं तुझें नाम ॥ ३ ॥ तुका म्हणे सेवे । माझे संकल्प वेचावे ॥४॥

१०२१ काय दिनकरा । केला कोंवड्यानें खरा ॥ १ ॥ कां हो ऐसा संत ठेवा । भार माझे माथां देवा ॥ २ ॥ आडविलें तरी दासीं । का मरती उपवासी ॥ ३ ॥ तुका म्हणे हातीं । कळा सकळ अनंतीं ॥४॥

१०२२ नसे तरी मनीं नसो । परी वाचे तरी वसो ॥ १ ॥ देह पडो या चिंतनें । विठ्ठलनामसंकीर्तनें ॥ २ ॥ दंभास्थितीं भलत्या भावें । मज हरीजन म्हणावे ॥ ३ ॥ तुका म्हणे काळें तरी । मज सांभाळील हरी ॥ ४ ॥

१०२३ ठाकलोंसे द्वारीं । उभा याचक भिकारी ॥ १ ॥ मज भीक

कांहीं देवा । प्रेमभातुकें पाठवा ॥३॥ याचकाचा भार । घेऊं नये येरझार ॥ ४ ॥ तुका म्हणे दान । सेवा घेतल्यावांचून ॥ ४ ॥

१०२४ वायां जातों देवा । नेणें भक्ति करूं सेवा ॥ १ ॥ आतां जोडोनियां हात । उभा राहिलों निवांत ॥ २ ॥ करावें तें काय । न कळे अवलोकितां पाय ॥ ३ ॥ तुका म्हणे दान । दिलें पदरीं घेईन ॥ ४ ॥

१०२५ तान्हेल्याची धणी । फिटे गंगा नव्हे उणी ॥ १ ॥ माझे मनोरथ सिद्धी । पाववावे कृपानिधि ॥ २ ॥ तूं तो उदारांचा राणा । माझी अल्पाचि वासना ॥ ३ ॥ कृपादृष्टी पाहें । तुका म्हणे होईं साह्ये ॥ ४ ॥

१०२६ सद्गदित कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥१॥ चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥ २ ॥ नेत्रीं जळ वाहो सदां । आनंदाचे रोमांच ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ४ ॥

१०२७ करूं जातां सन्निधान । क्षणीं जन पालटे ॥ १ ॥ आतां गोमटे ते पाय । तुझे माय विठ्ठले ॥ २ ॥ हरिदासांचा समागम । अंगीं प्रेम विसांवे ॥ ३ ॥ तुका म्हणे हेंचि मन । इच्छादान मागतसे ॥ ४ ॥

१०२८ हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥ १ ॥ म्हणसी कांहीं मागा । हेंचि देगा पांडुरंगा ॥ २ ॥ संतां लोटांगणीं । जातां लाजों नको मनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगीं । शक्ति देईं नाचें रंगीं ॥ ४ ॥

१०२९ कंठीं राहो नाम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ १ ॥ ऐसें द्यावें कांहीं दान । आलों पतित शरण ॥ २ ॥ संतांचिये पायीं । वेळोवेळां ठेवीं डोई ॥ ३ ॥ तुका म्हणे तरें । भवसिंधु एका सरें ॥ ४ ॥

१०३० रणीं निघतां शूर न पाहे माघारें । ऐसा मज धीरें राख आतां ॥ १ ॥ संसारा हातीं अंतरलों दुरी । आतां कृपा करीं नारायणा ॥ २ ॥ वागवितों तुझिया नामाचें हत्यार । हाचि वढिवार मिरवितों ॥३॥ तुका म्हणे मज फिरतां माघारें । तेथें उणें पुरें तुम्हां जाणा ॥४॥

१०३१ राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडुरंगा ॥ १ ॥ लक्ष्मीनिवासा पाहें दीनबंधु । तुझा लागो छंदु सदा मज ॥ २ ॥ तुझे नामीं प्रेम देईं अखंडित । नेणें तप व्रत दान कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें हेंचि गा मागणें । अखंडही गाणें नाम तुझें ॥ ४ ॥

१०३२ पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहुनी अंधळा बराच मी ॥ १ ॥ निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनी ठेवीं देवा ॥ २ ॥ अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहुनि मुका बराच मी ॥ ३ ॥ नको मज कधीं परस्त्रीसंगती । जनांतून माती उठतां भली ॥ ४ ॥ तुका म्हणे मज अवघ्याचा कंटाळा । तूं एक गोपाळा आवडसी ॥ ५ ॥

१०३३ पुत्राची वारता । शुभ ऐके जेवीं माता ॥ १ ॥ तैसें राहो माझें मन । गातां ऐकतां हरिगुण ॥ २ ॥ नादें लुब्ध झाला मृग । देह विसरला अंग ॥ ३ ॥ तुका म्हणे पाहे । कासवीचें पिलें माये ॥ ४ ॥

१०३४ अवघीं भूतें साम्या आलीं । देखिलीं म्यां कैं होतीं ॥ १ ॥ विश्वास तो खरा मग । पांडुरंगकृपेचा ॥ २ ॥ माझी कोणी न धरो शंका । विश्व हो कां लोकां निर्द्वंद्व ॥ ३ ॥ तुका म्हणे जें जें भेटे । तें तें वाटे मी ऐसें ॥ ४ ॥

१०३५ कथेची सामग्री । देह अवसानावरी ॥ १ ॥ नको जाऊं देऊं भंगा । गात्रें माझीं पांडुरंगा ॥ २ ॥ आयुष्य करीं उणें । परि मज आवडो कीर्तन ॥ ३ ॥ तुका म्हणे हानी । यावेगळी मना नाणीं ॥ ४ ॥

१०३६ सेवीन उच्छिष्ट लोळेन अंगणीं । वैष्णवां चरणीं होईन जोडा ॥ १ ॥ ऐसें जन्म आतां मज देईं देवा । आवडी हे जीवा सर्वकाळ ॥ २ ॥ त्यांचे चरणरज येती अंगावरी । वंदीत ते शिरीं

जाइन मागें ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें राहिलासे भाव । सकळही वाव जाणोनियां ॥ ४ ॥

१०३७ केला तैसा अंगीकार । माझा भार चालवीं ॥ १ ॥ होऊं अंतराय बुद्धी । कृपानिधी नेदावी ॥ २ ॥ आम्ही तरी जड जीव । कैंचा भाव पुरता ॥ ३ ॥ अनन्यभावें घ्यावी सेवा । आम्हां देवा घडेसी ॥ ४ ॥ तुझीं आम्हीं शरणागतें । कृपावंतें रक्षीजे ॥ ५ ॥ तुका म्हणे भाकूं कींव । असों जीव जड आम्हीं ॥ ६ ॥

१०३८ पुरली धांव कडिये घेईं । पुढें पायीं न चलवीं ॥ १ ॥ कृपाळुवे पांडुरंगे । अंगसंगे जिवलगे ॥ २ ॥ अवघी निवारावी भूक । अवघ्या दुःख जन्माचें ॥ ३ ॥ तुका म्हणे बोलवेना । लावीं स्तना ईश्वरे ॥ ४ ॥

१०३९ पढियंतें आम्ही तुजपाशीं मागावें । जीवींचें सांगावें हितगुज ॥ १ ॥ पाळशील लळे दीन वो वत्सले । विठ्ठले कृपाळे जननिये ॥ २ ॥ जीव भाव तुझ्या ठेवियेला पायीं । तूंचि सर्वांठायीं एक आम्हां ॥ ३ ॥ दुजियाचा संग लागो नेदीं वारा । नाहीं जात घरा आणिकांच्या ॥ ४ ॥ सर्व सत्ता एकी आहे तुजपाशीं । ठावें आहे देसी मागेन तें ॥ ५ ॥ म्हणउनि पुढें मांडियेली आळी थिंकोनिया चोळी डोळे तुका ॥ ६ ॥

१०४० आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ १ ॥ उभारोनि बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥ २ ॥ ना भी ना भी या उत्तरें । करुणाकरें शांतवीजे ॥ ३ ॥ तुका म्हणे केली आस । तो हा दिस फळाचा ॥ ४ ॥

१०४१ पुढिलांचें इच्छीं फळ । नाहीं बळ तें अंगीं ॥ १ ॥ संत गेले तया ठाया । देवराया पाववीं ॥ २ ॥ ज्येष्ठांची कां आम्हां जोडी । परवडी न लभों ॥ ३ ॥ तुका म्हणे करीं कोड । पुरवीं लाड आमुचा ॥ ४ ॥

१०४२ जेणें वेळ लागे । ऐसें सांडीं पांडुरंगें ॥ १ ॥ कंठ कंठा मिळों देईं । माझा वोरस तूं घेईं ॥ २ ॥ नको पीतांबर । सांवरू हे अळंकार ॥ ३ ॥ टाकीं वो भातुकें । लौकिकाचें कवतुकें ॥ ४ ॥ हातां पायां नको । कांहीं वेगळालें राखों ॥ ५ ॥ तुका म्हणे यावरी । मग सुखें अळंकारी ॥ ६ ॥

१०४३ उपासाशेवटीं अन्नासवें भेटी । तैसी माझी मिठी पडो पायीं ॥ १ ॥ पुरवीं वासना साच सर्व जाणा । आम्हां नारायणा अंकितांची ॥ २ ॥ बहु दिस पुत्रा मातेसवें भेटी । तैसा दाटो पोटीं प्रीति उभड ॥ ३ ॥ तुका म्हणे धन कृपणा सोइरें । यापरी दुसरें नहो आतां ॥ ४ ॥

१०४४ करीं ऐसें जागें । वेळोवेळां पायां लागें ॥ १ ॥ प्रेम झोंबे कंठीं । देह धरणिये लोटी ॥ २ ॥ राहे लोकाचार । पडे अवघा विसर ॥ ३ ॥ तुका म्हणे ध्यावें । तुज व्यभिचारभावें ॥ ४ ॥

१०४५ आपुलिया हिता जो असे जागता । धन्य माता पिता तयाचिया ॥ १ ॥ कुळीं कन्या पुत्र होतीं जीं सात्विक । तयाचा हरिख वाटे देवा ॥ २ ॥ गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोवाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज घडो त्यांची सेवा । तरी माझ्या दैवा पार नाहीं ॥ ४ ॥

## श्री कान्होबामहाराज.

१०४६ वचन ऐका कमळापती । मज रंकाची विनंती ॥ १ ॥ कर जोडितों कथेकाळीं । आपण असावें जवळी ॥ २ ॥ घेईं घेईं माझी भाक । जरी कां मागेन आणिक ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे देवा । शब्द इतुकाची राखावा ॥ ४ ॥

१०४७ करूनी उचित । प्रेम घाली हृदयांत ॥ १ ॥ आलों दान मागायास । थोरी करूनियां आस ॥ २ ॥ चिंतनसमयीं । सेवा आपुलीच देईं ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे भावा । मज निरवावें देवा ॥ ४ ॥

१०४८ आतां मागतों तें ऐक नारायणा। भावपूर्वक मनापासू-नियां ॥ १ ॥ असों दे मोकळी जिव्हा जरी गाईल गुण। नाहीं तरी खिळुन टाकीं परतीं ॥ २ ॥ मातेचिया परि देखती परनारी। ठेवीं नेत्र तरी नाहीं तरी नको ॥ ३ ॥ तरी वरें कांटाळा करिती निंदा स्तुतीचा। नाहीं तरि कानांचाही देख द्वेल ॥ ४ ॥ सकळ इंद्रियांचा निग्रह करूनि एक। राखावीं पृथक तोडोनि भ्रम ॥ ५ ॥ तुकायाबंधु म्हणे तेचि वाट प्राणां। पडतां नारायणा विसर तुझा ॥ ६ ॥

## श्री निळोबामहाराज

१०४९ निरोप मागावया संत। आले राउळा समस्त ॥ १ ॥ चरणीं ठेऊनियां माथा। विनविती पंढरिनाथा ॥ २ ॥ म्हणती कृपा असों द्यावी। उपेक्षा आमची न करावी ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरी-नाथा। वियोग न साहे सर्वथा ॥ ४ ॥

१०५० पंढरिहूनि गांवा जातां। वाटे खंती पंढरिनाथा ॥ १ ॥ आतां बोळवीत यावें। आमुच्या गांवा आम्हांसवें ॥ २ ॥ तुम्हां-लागीं प्राण फुटे। वियोगदुःखें पूर लोटे ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरी-नाथा। चला गांवा आमच्या आतां ॥ ४ ॥

१०५१ आतां माझा अंगिकार। करा थार पायापें ॥ १ ॥ लाऊ-नियां आपुल्या गुणीं। माझी वाणी रंजवा ॥ २ ॥ बाळी भोळी करीन सेवा। तुमची देवा ते घ्यावी ॥ ३ ॥ निळा म्हणे विनवूं नेणें। तरी पोसणें मी तुमचें ॥ ४ ॥

१०५२ आम्हीं न मागों ऐसा कधीं। कृपानिधी वर द्याल ॥ १ ॥ आपुल्या पायीं वसवा चित्त। माझें अखंडित दुजें न मागों ॥ २ ॥ युगें जातां कल्प कोडी। न करूं जोडी आणीक ॥ ३ ॥ निळा म्हणे राहो ध्यानीं। तुमचें मनीं रूपडें ॥ ४ ॥

१०५३ आम्ही नेणों भाव कैसा भक्तिरस। म्हणवूं तुमचे दास एक्यागुणें ॥ १ ॥ मुखें गाऊं नाम पवाडे श्रीहरी। उभे महाद्वारीं

ठाकोनियां ॥ २ ॥ नेणो ज्ञान ध्यान मंत्र योगकळा । आसन मुद्रा डोळा लक्ष कैसें ॥ ३ ॥ तत्त्व संख्या नेणो नित्यानित्य ज्ञान । आठवूं चरण सकुमार ते ॥ ४ ॥ निळा म्हणे अगा रुक्मादेवीवरा । आतां उचित करा आपुलें ते ॥ ५ ॥

१०५४ त्रिभुवनपती अहो देवा । दीनबांधवा विठोजी ॥ १ ॥ भावा माझ्या द्या जी थार । आपल्या निरंतर चरणांपें ॥ २ ॥ तेणें सार्थक होईल काळ । सुमंगळ देह माझा ॥ ३ ॥ निळा म्हणे सुफळ जिणें । होईल स्मरणें नामाचिया ॥ ४ ॥

१०५५ दंभ मान नका । देऊं वैकुंठनायका ॥ १ ॥ तुमचीं गाऊं द्या निश्चळ । गुण नामें सर्वकाळ ॥ २ ॥ शांती क्षमा दया । त्याहि नका पंढरीराया ॥ ३ ॥ निळा म्हणे निरुपाधी । ठेवा माझी चरणीं बुद्धि ॥ ४ ॥

१०५६ माझें मस्तक तुझे पायीं । ऐसें करींगा विठाबाई ॥ १ ॥ अहर्निशीं तुझें ध्यान । मुखें नाम संकीर्तन ॥ २ ॥ हृदयीं वसावें येऊन । करीं माझें समाधान ॥ ३ ॥ निळा म्हणे हे वासना । माझी पुरवीं नारायणा ॥ ४ ॥

१०५७ विश्वास अंतरींचा जाणोनी । नाम ठेवा माझ्या वदनीं । रूप मनाचे आसनीं । कृपा करोनी बैसवा ॥ १ ॥ करीन तैसी घ्यावी सेवा । विश्वास पालटों न द्यावा । आइका विनविलें तें देवा । अहो पंढरीनिवासा ॥ २ ॥ माझिये बुद्धीसी धैर्य द्यावें । सेवेसी इंद्रियां राबवावें । आपुलीये कीर्तनीं राखावें । प्रेम माझें सर्वदा ॥ ३ ॥ गर्व अभिमान दवडावा । आळस निद्रा परती ठेवा । विसर तुमचा न पडे देवा । देईं सेवा हें दान ॥ ४ ॥ निळा म्हणे कृपासिंधू । तुम्हीं साचार दीनबंधू । अहा म्हणोनी घेतला छंदू । येवढें आर्त पुरवावें ॥ ५ ॥

१०५८ विश्वास माझा जतन करा । विश्वंभरा पायापें ॥ १ ॥ मी तुम्हां न वजें दुरी । ठेवीन वरी जीवभाव ॥ २ ॥ आळवीन उत्तम

नामें । तुमचीच प्रेमें सन्मुख ॥ ३ ॥ निळा म्हणे कूर्मदृष्टी । करा वृष्टी अमृतें ॥ ४ ॥

१०५९ सेल दिली मागा ऐसी । जें जें तुम्हांसी आवडे ॥ १ ॥ तरी द्याहो आपुलें नाम । अखंडित प्रेम नैसर्गिक ॥ २ ॥ सर्वकाळ राहो चित्तीं । सगुण मूर्ति तुमची हे ॥ ३ ॥ निळा म्हणे नित्य नवी । कीर्तनीं द्यावी निज आवडी ॥ ४ ॥

१०६० मागण्याची न करूं गोष्टी । तुम्हां पोटीं भय वाटे ॥ १ ॥ नामाचि तुमचें पुरे देवा । न करूं हेवा आणिक ॥ २ ॥ माझें आहे स्वाधीन मन । न इच्छी मान धन कांहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्य साचा । हाचि संकल्पाचा निर्धार ॥ ४ ॥

१०६१ तुमचे चरणीं राहो मन । करा हें दान कृपेचें ॥ १ ॥ नामीं तुमचे रंगो वाचा । अंगीं प्रेमाचा अविर्भाव ॥ २ ॥ हृदयीं तुमची राहो मूर्ति । वाचे कीर्ति पवाडे ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेवा ठायीं । जीवभाव पायीं आपुलिये ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१०६२ चौऱ्याशीं लक्ष जन्म हिंडतां । घोंगडें अनंता जर्जर झालें ॥ १ ॥ जेथें जाय तेथें तुटाचि हे पडे । मुद्दल न घडे काय करूं ॥ २ ॥ संचित आटलें व्यवसाय खुंटले । म्हणोनि ठाकिलें द्वार तुझें ॥ ३ ॥ नामा म्हणे विठोबा जरी होसी जाणता । तरी या बोला उचिता प्रेम देईं ॥ ४ ॥

१०६३ घोंगडें हें नव्हे धडूत पैं माझें । पांघुरतां ओझें होत असे ॥ १ ॥ घे आपुलें घोंगडें देईं माझा पावा । अझुनि कां चाळवा केशिराजा ॥ २ ॥ विष्णुदास नामा केशवा विनवी । ऐहिक्य परत्र नाहीं चाड मज ॥ ३ ॥

१०६४ देवा दिवस गेले वांयांविण । हरिसी न रिघतां शरण । बाळकत्व अज्ञानपण । तैं आठवण नव्होचि ॥ १ ॥ आला तारुण्याचा

अवसरु । सर्वांचि विषयाचा पडिभरु । काम क्रोध मदमत्सरू । अति व्यापारु तृष्णेचा ॥ २ ॥ सत्रांचि वृद्धत्व पातलें । सकळ इंद्रियें सांडियलें । देह न करी म्हणितलें । अंतर पडलें भक्तीसी ॥ ३ ॥ देवा हित कांहीं नव्हे माझें । दास्यत्व न घडोचि तुझें । आयुष्य गेलें वायां काजें । धरणिये ओझें पैं झालें ॥ ४ ॥ पुनरपि जन्मा येणें मागुता । कवण जाणे कैसी व्यवस्था । कैसा देह लाधेल अनंता । केव्हां तव चरणीं येईल ॥ ५ ॥ आतां मज करूं नको उदास । तुझिया नामाचा विश्वास । हृदयीं नांदे हृषीकेश । विष्णुदास म्हणे नामा ॥ ६ ॥

१०६५ मज चालतां आयुष्यपंथें । तारुण्यवन पातलें तेथें । मदमत्सरादि श्वापदें बहुतें । आलीं कळकळीत मजपाशीं ॥ १ ॥ तीं धांवती पाठोपाठीं । पाहें तंव विषयाचे घाटीं । काम क्रोध व्याघ्रांची वाटीं । देखोनि पोटीं रिघाले पाय ॥ २ ॥ मग स्वधर्ममार्गीं रिघालों । तंव अहंकार तस्करें आकळिलों । राहें राहें म्हणोनि उभा केलों । तेणें अंतरलो स्वामिया ॥ ३ ॥ जंव क्षण एक उघडिले डोळे । पाहे तंव कंठ व्यापिला व्याळें । मायामोहसर्पीं डांखिलें । त्यांचिये गरळें झळंबलों ॥ ४ ॥ जंव न पावेल शेवटील लहरी । तंव धांव उपाव करी । विष्णुदास नामा धांवे पुकारी । माझा कैवारी केशिराज ॥ ५ ॥

१०६६ अंतकाळीं मी परदेशी । ऐसें जाणोनि मानसीं । म्हणोनियां हृषीकेशी । शरण तुजासि मी आलों ॥ १ ॥ नव मास गर्भवासीं । कष्ट झाले त्या मातेसी । ते निष्ठुर झाली कैसी । अंतीं दूर राहिली ॥ २ ॥ जीवीं बापासि आवड । मुखीं घालोनी करी कोड । जेव्हां लागली यमओढ । तेव्हां दूरी टाकिलें ॥ ३ ॥ बहिणी बंधूचा कळवळा । तें तूं जाणसी रे दयाळा । जेव्हां लागली यमशृंखला । तेव्हां दूर राहिलीं ॥ ४ ॥ कन्या पुत्रादिक बाळें । हीं तंव स्नेहाचीं स्नेहाळें । तुझ्या दर्शनाहून व्याकुळ । अंतीं दूर राहिलीं ॥ ५ ॥ देह गृहाची कामिनी । ते तंव राहिली भवनीं । मी तंव जळतसे स्मशानीं ।

अग्निसवें येकला ॥ ६ ॥ मित्र आले गोत्रज आले । तेहि स्मशानीं परतले । शेवटीं टाकोनियां गेले । मजलागीं स्मशानीं ॥ ७ ॥ ऐसा जाणोनि निर्धार । मग मज आला गहिंवर । तंव दाही दिशा अंधः-कार । मग मज कांहीं न सुचे ॥ ८ ॥ ऐसें जाणोनि निर्वाण पाहीं । मनुष्य जन्म मागुता नाहीं । नामा म्हणे तुझे पायीं । ठाव देई विठोबा ॥ ९ ॥

१०६७ सांडोनि संसार झालों मी अंकित । ऐसियाचा अंत पाहूं नको ॥ १ ॥ पातकी मी सत्य पातकी मी सत्य । पातकी मी सत्य पांडुरंगा ॥ २ ॥ माझे गुण दोष न धरिसी चित्तीं । थोरपण ख्याति दावी आम्हां ॥ ३ ॥ ऐसा अपराध आणुं नको मना । पंढरीचा राणा म्हणोनियां ॥ ४ ॥

१०६८ आपुले रूपीं मज लपवीं निरंतर । सबाह्यभीतर आड राखीं ॥ १ ॥ परि तुज मज असावा संवादु । भ्रांति माया बाधु काय करी ॥ २ ॥ काम क्रोध लोभ दंभ मद मत्सर । हे वैरी अपार मारीं माझे ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्ही जन्मजन्मांतरींचे । पोसणें घरींचे दास तुझे ॥ ४ ॥

१०६९ घालुनि आसन साधिला पवन । घेतलें जीवन अंत-रिक्षीं ॥ १ ॥ परहस्तें तृप्ति नव्हे जी दातारा । कृपा करुणा करा केशिराजा ॥ २ ॥ जीवांचें जीवन सर्वांचें कारण । धांव मजलागुन केशिराजा ॥ ३ ॥ अनाथाचा नाथ हें ब्रीद साचार । झणीं माझा अव्हेर करिसी देवा ॥ ४ ॥ विष्णुदास नामा अंकियेला तुझा । निववी केशि-राजा प्रेमसुखें ॥ ५ ॥

१०७० संसार संकटें रिघालों पाठिसीं । आतां झणीं देसी त्याचे हातीं ॥ १ ॥ ब्रिदें बडिवार ऐकोनियां फार । रिघों आम्ही द्वार विठोबाचें ॥ २ ॥ आणिकाहि वार्ता सांगों काय आतां । पंढरीच्या

नाथा परिसावें ॥ ३ ॥ अमृत पाजणें प्रीतीनें भक्तासी । सत्य हृषी-केशी नामा म्हणे ॥ ४ ॥

१०७१ अमृताहूनि गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ॥ १ ॥ सांग पंढरिराया काय करूं यासी । कां रूप ध्यानासि नये तुझें ॥ २ ॥ कीर्तनीं बैसतां निद्रें नागविलें । मन माझें भुललें विषयसुखा ॥ ३ ॥ हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ति । नये माझ्या चित्तीं नामा म्हणे ॥ ४ ॥

१०७२ कीटकीतें भयें स्वयें भृंगी ध्यातां । तैसा तूं अनंता करीं आतां ॥ १ ॥ भजनें पाठविलें श्रीहरि रूपासी । नेतो वैकुंठासी नारायण ॥ २ ॥ नाम नारायण अंतीं उद्धारक । नामा म्हणे देख भाक माझी ॥ ३ ॥

१०७३ जीवन्मुक्त झाले नामाचे गजरीं । सर्वे अधिकारी वैकुं-ठीचे ॥ १ ॥ देईं देवा मज प्रेमाचा जिव्हाळा । मुक्तीचा सोहळा अखंडीत ॥ २ ॥ सगुण भक्तीस साक्ष काय जाण । कर्म नारायण कर्मनिष्ठ ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा नये अनुमाना । वर्णितां पुराणां ठक पडे ॥ ४ ॥

१०७४ मन नेणें तुझिया मनाचा विश्वास । येर तो हव्यास गोड वाटे ॥ १ ॥ तुझें प्रेम नेणें तुझें प्रेम नेणें । सांग काय करणें केशीराजा ॥ २ ॥ घातलें संसारीं कर्माचें भांडारीं । कृपा नरहरी करी मज ॥ ३ ॥ नामा म्हणें मी ठायींचाचि अपराधी । केशवा काहीं बुद्धि सांगा मज ॥ ४ ॥

१०७५ अगे तूं माउली संताची साउली । आठवितां घाली प्रेम पान्हा ॥ १ ॥ प्रेमपान्हा पाजीं अगे माझे आई । धांवे वो विठाई वोरसोनी ॥ २ ॥ येतों काकुळती प्रेमपान्हासाठीं । उभा तो धुर्जटी मागें पुढें ॥ ३ ॥ नामा म्हणे आस पुरवावी माझी । तान्हुलिया पाजी प्रेमपान्हा ॥ ४ ॥

१०७६ येईं गे विठ्ठले अनाथाचे नाथे। माझे कुळदैवते पंढरीचे ॥ १ ॥ पंचही प्राणांचा उजळोनी दीप। सुंदर श्रीमुख ओवाळीन ॥ २ ॥ मनाचा प्रसाद तुजलागीं केला। रंगभोग आपुला घेऊनि राहे ॥ ३ ॥ आनंदाचा भोग घालीन आसनीं। वैकुंठवासिनी तुझ्या नांवें ॥ ४ ॥ आपुलें म्हणवावें सनाथ करावें। भावें संचरावें हृदय घटीं ॥ ५ ॥ नामा म्हणे माझे पुरवीं मनोरथ। देईं सदोदित प्रेम-कळा ॥ ६ ॥

१०७७ कृपावंत समर्थ म्हणूनि करीं आर्त। येईन सांवरत पांडुरंगे ॥ १ ॥ मज कां विसंबली विठ्ठल माउली। तनु तृषावली जीवनेविण ॥ २ ॥ तूं माझें जीवन नाम जनार्दन। हृदयीं भरी पूर्ण प्रेमरस ॥ ३ ॥ अमृताच्या करें कांसवीच्या भरें। कुरवाळीं त्वरें देह माझा ॥ ४ ॥ पूर्ण पान्हा देईं निववीं हृदयीं। येईं हो कान्हाई सांवळिये ॥ ५ ॥ नामा म्हणे पावे जीवा शीण न साहे। वेगीं लवलाहे पाजी पान्हा ॥ ६ ॥

१०७८ तूं माझी माऊली मी वो तुझा तान्हा। पाजीं प्रेमपान्हा पांडुरंगे ॥ १ ॥ तूं माझी गाऊली मी तुझें वासरूं। नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥ २ ॥ तूं माझी हरिणी मी तुझें पाडस। तोडीं भवपाश पांडुरंगे ॥ ३ ॥ तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज। चारा घालीं मज पांडुरंगे ॥ ४ ॥. नामा म्हणे होसी भक्तीचा वल्लभ। मागें पुढें उभा सांभाळिसी ॥ ५ ॥

१०७९ हेंचि मागतसें तुज। वनीं जन्म देईं मज ॥ १ ॥ सुखें करोनि राहेन। तुझे पाहीन चरण ॥ २ ॥ शीण बहुत पावलों। आतां तुजपाशीं आलों ॥ ३ ॥ न करीं अव्हेर। दास तुझा मीं किंकर ॥ ४ ॥ येत काकुळती। नामा म्हणे देवाप्रती ॥ ५ ॥

१०८० विसांवा विठ्ठल सुखाची साऊली। प्रेमपान्हा घालीं भक्तांवरी ॥ १ ॥ दाखवीं चरण दाखवीं चरण। दाखवीं चरण नारायणा ॥ २ ॥ विठ्ठल आचार विठ्ठल विचार। दावीं निरंतर पाय

आतां ॥ ३ ॥ नामा म्हणे नित्य बुडालों संसारीं । धांवोनियां धरी हातीं मज ॥ ४ ॥

१०८१ उडाली पक्षिणी गेली अंतराळीं । चित्त बाळाजवळी ठेवोनियां ॥ १ ॥ तैसें माझें मन राहो कां इश्वरीं । मग सुखें संसारीं असेन कां ॥ २ ॥ धेनु चरे वनीं वत्स असे घरीं । चित्त वत्सावरी ठेवूनि फिरे ॥ ३ ॥ दुडीवरी दुडी सखिसीं गोष्टि करी । चित्त दुडीवरी ठेवूनियां ॥ ४ ॥ विष्णुदास नामा विनवी परोपरी । हें प्रेम श्रीहरी द्यावें मज ॥ ५ ॥

१०८२ येईं वो कृपावंते अनाथःचे नाथे । निवारीं भवव्यथे पांडु-रंगे ॥ १ ॥ मी बाळक भूकाळू तूं माऊली कृपाळु । करीं माझा सांभाळु पंढरीराया ॥ २ ॥ माझें माहेर पैं नित्य आठवे अंतरीं । सखा विटेवरी पांडुरंग ॥ ३ ॥ मी देह तूं चैतन्य मी क्षुधार्थि तूं अन्न । तृषार्थी तूं जीवन पांडुरंगा ॥ ४ ॥ मी चकोर तूं चंद्र मी सरिता तूं सागर । मी याचक तूं दातार पांडुरंगा ॥ ५ ॥ मी धनलोभी शुद्ध तूं पूर्ण कनककुंभ । मी मगर तूं अंभ पांडुरंगा ॥ ६ ॥ मी चातक तूं मेघ मी प्रवृत्ति तूं बोध । मी शुष्कनदी तूं ओघ पांडुरंगा ॥ ७ ॥ मी दोषी तूं तारक मी भृत्य तूं नायक । मी प्रजा तूं पाळक पांडुरंगा ॥ ८ ॥ मी पाडस तूं कुरंगिणी मी अंडज तूं पक्षिणी । मी अपत्य तूं जननी पांडुरंगा ॥ ९ ॥ मी भक्ति तूं निजसोय मी ध्यान तूं ध्येय । मी आडळ तूं साह्य पांडुरंगा ॥ १० ॥ ऐसी जे जे माझी विनंती ते तुजाचि लक्ष्मि-पती । नित्य सुख सांगाती पांडुरंगा ॥ ११ ॥ शीघ्र येईं वो श्रीरंगे भक्त मानस रंगे । प्रेमपान्हा देगे नामदेवा ॥ १२ ॥

१०८३ तुझें प्रेम माझे हृदया आवडी । चरण मी न सोडीं पांडुरंगा ॥ १ ॥ कशासाठीं शीण थोडक्या कारणें । काय तुज उणें होय देवा ॥ २ ॥ चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा

न्यून होती ॥ ३ ॥ नामा म्हणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहें ॥ ४ ॥

१०८४ नामयाचें प्रेम केशवाचि जाणे । केशवासी राहणें नाम्या-पाशीं ॥ १ ॥ केशव तोचि नामा नामा तोचि केशव । प्रेमभक्ति भाव मागतसे ॥ २ ॥ विष्णुदास नामा उभा केशवद्वारीं । प्रेमाची शिदोरी मागतसे ॥ ३ ॥

१०८५ जाणीव शाहणीव वाहियलें ओझें । तेणें चरण तुझे अंतरले ॥ १ ॥ आतां नेणतेंचि करीं मज हरी । लौकिकाबाहेरी घालीं मज ॥ २ ॥ तुझिया नामाचें लागों दे गा पिसें । देहीं देह न दिसे ऐसें करीं ॥ ३ ॥ नामा म्हणे तुज एकांतें मी जाणें । रहित कारणें कल्पनेसी ॥ ४ ॥

१०८६ पाहुनि न दिसे लौकिका व्यवहारीं । ऐसा तूं अंतरीं लपवीं मज ॥ १ ॥ परि तुझ्या चरणीं माझें अनुसंधान । तरी प्रेम पावन देईं देवा ॥ २ ॥ मनाचिये वृत्ति अखंड तूं राहोनी । झेंपावती झणीं काम क्रोध ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसें पावसी तूं मातें । तरी मी जीवें तूंतें न विसंबे ॥ ४ ॥

१०८७ वेदपरायण मनीं तो ब्राह्मण । चित्त समाधान संतुष्ट सदा ॥ १ ॥ येरा माझें नमन सर्वसाधारण । ग्रंथाचे राखण म्हणोनियां ॥ २ ॥ शास्त्रज्ञपंडित तोचि मी बहुमानी । जो आपणातें जाणोनि तन्मय झाला ॥ ३ ॥ पुराणिक ऐसा मानितो कृतार्थ । विषयीं विरक्त विधी पाळी ॥ ४ ॥ मानीं तो हरिदास ज्या नामीं विश्वास । मी त्याचा दास देहें भावें ॥ ५ ॥ नामा म्हणे ऐसें कईं भेटविसी विठ्ठला । त्या-लागीं फुटला प्राण माझा ॥ ६ ॥

१०८८ बाहेरीं भीतरीं तुजचि मी देखें । चित्त तेणें सुखें वेडावलें ॥ १ ॥ संतसंगें मज पालट हा झाला । पाहतां विठ्ठला रूप तुझें ॥ २ ॥ मीपणासहित आनंदीं बुडालें । न निघे कांहीं केलें चित्त माझें ॥ ३ ॥

नामा म्हणे एक उरलीसे वासना । स्वामिसेवकपणा देईं देवा ॥ ४ ॥

१०८९ मी असे तेथें मग तूं कैंचा । हा उपजत ठायींचा तोडी वेलू ॥ १ ॥ आपुलें करोनीं ठेवीं तुझे चरणीं । न मानिती कोणी क्षितीमाजीं ॥ २ ॥ सेवा तुझी देईं नको दुजेपण । येर तो अभिमान खंडीं माझा ॥ ३ ॥ देवा आवडसी माझिया जीवा । सुखरूप केशवा विठ्ठलराजा ॥ ४ ॥

१०९० मनें ध्यान करणें वाचे उच्चारणें । नयनें तुज पाहणें हेंचि देईं ॥ १ ॥ करें पुजा करणें माथा चरणीं ठेवणें । श्रवणीं गुण ऐकणें हेंचि देईं ॥ २ ॥ षट्चक्रावरी मार्ग बावन्न अक्षरीं । निरालंब निरंतरीं भेटी देईं ॥ ३ ॥ मनसा वाचा कर्म आणि दश इंद्रियें । तुझ्या चरणीं दृढ होय ऐसें करीं ॥ ४ ॥ डावी उजवीकडे आणि मागें पुढें । अंतीं चरण जोडे ऐसें करीं ॥ ५ ॥ नामा म्हणे केशवा तुझी मज गोडी । जन्मोजन्मीं जोडी हेचि देईं ॥ ६ ॥

१०९१ काळ देहासी आला खाऊं । आम्ही आनंदें नाचूं गाऊं ॥ १ ॥ कोणे वेळे काय गाणें । हें तों भगवंता मी नेणें ॥ २ ॥ टाळ मृदंग दक्षिणेकडे । माझें गाणें पश्चिमेकडे ॥ ३ ॥ नामा म्हणे बा केशवा । जन्मोजन्मीं द्यावी सेवा ॥ ४ ॥

१०९२ तूं एक सज्ञान मी एक अज्ञान । तुझें नाम जाण विस्तारीलें ॥ १ ॥ आतां करिसी काय आतां करिसी काय । सांपडली सोय रामचंद्रा ॥ २ ॥ चरणीं जें आहे ती माझी माय । ईश्वरू तो वाहे शिरकमळीं ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा न सोडीं मी भावा । जन्मोजन्मीं सेवा द्यावी तुझी ॥ ४ ॥

१०९३ स्वामि एक व्हावा तुजाचि सारिखा । करीं निज सेवका जगद्वंद्य ॥ १ ॥ देऊनी प्रेमातें पाळिसी तूं बाळें । न करिसी जीवावेगळें क्षणभरी ॥ २ ॥ बळी भीष्म नारद उद्धव रुक्मांगद । हनुमंत

प्रल्हाद अंबऋषि ॥ ३ ॥ नामा म्हणे हेंचि देईं जन्मोजन्मीं । मी दास तूं स्वामि केशिराजा ॥ ४ ॥

१०९४ हेचि माझी संध्या हेंचि माझें ध्यान । तुझ्या पायीं मन लागो देवा ॥ १ ॥ हेचि माझी रिद्धि हेचि माझी सिद्धि । अखंड समाधी पाय तुझे ॥ २ ॥ नामा म्हणे हेंचि देईं गा श्रीपती । कथेची विश्रांति जन्मोजन्मीं ॥ ३ ॥

१०९५ पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणिक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥ हेंचि घडो मज जन्मजन्मांतरीं । मागणें श्रीहरी नाहीं दुजें॥२॥ मुखीं नाम सदा संतांचें दर्शन । जनीं जनार्दन ऐसा भाव ॥ ३ ॥ नामा म्हणे तुझें नित्य महाद्वारीं । कीर्तन गजरीं सप्रेमाचें ॥ ४ ॥

१०९६ आम्हीं दिला जीव तुझिया कीर्तनें । पांगुळलीं मनें योगियांचीं ॥ १ ॥ न बोलवे वाचा न बोलवे कांहीं । आपेआप पाहीं ठाकलोंसे ॥ २ ॥ ऐसें तुझें नाम दे गोड गा देवा । घाली वा केशवा हृदयामाजी ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हां सांपडलें वर्म । नित्य वाचे नाम रामकृष्ण ॥ ४ ॥

१०९७ आसनीं शयनीं भोजनीं मनीं ध्यानी । तुझे चरण दोन्हीं देईं मज ॥ १ ॥ पातक कल्मष समूळाचि छेदूं । मज परमानंदु तुझे नामीं ॥ २ ॥ ध्यानीं हृषीकेशा भक्तजनपरेषा । अनाथा कोंवसा गोवाळिया ॥ ३ ॥ विष्णुदास नामा विनवी मेघःश्यामा । संसारींच्या श्रमा तारीं देवा ॥ ४ ॥

१०९८ सगुण निर्गुण श्रुति ज्या बोलती । तो तूं माझे चित्तीं पंढरिराया ॥ १ ॥ आहेसि तितुकें तूंचि सर्वांगत । मी काय अनाथ वर्णूं तुज॥२॥ चरणींची आवडी न संडावी मनें । यापरि पोषणें मायबापा ॥ ३ ॥ साक्ष भीमरथी संत पुंडलीक । नाम्यातें आणीक नलगे कांहीं ॥ ४ ॥

१०९९ बाहेरी भितरी पाहतां दिसे एकु । उभा असे व्यापकु पंढ-

रीराव ॥ १ ॥ पंढरीचा राणा विटेवरी जाणा । जीवींचिया खुणा भक्तां सांगे ॥ २ ॥ गुंतलों संसारीं भरलों कर्मभांडारीं । विषया-माझारि मोहियेलें ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवा माझें उणें न पाहीं । चरणसेवा देईं जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

११०० हेंचि देवा पैं मागत । चरणसेवा अखंडित ॥ १ ॥ वास द्यावा पंढरीचा । सदा संग हरिदासांचा ॥ २ ॥ जन्म होका भलते याति । परि मी न चुकें हरिभक्ति ॥३॥ नामा म्हणे कमळापती । हेंचि द्यावें पुढता पुढती ॥ ४ ॥

११०१ नेणें मन कांहीं विश्वास नामाचा । गोसावी आमुचा पांडु-रंग ॥ १ ॥ संसारीं पडलो कर्माचे भांडारीं । कृपा निरंतरीं करी मज ॥ २ ॥ नेणें तुझें ध्यान नेणें तुझें प्रेम । दावी मज वर्म सेवकासी ॥३॥ नामा म्हणे माझे गुणदोष कांहीं । ठाव तुझे पायीं देईं मज ॥ ४ ॥

११०२ आम्ही विष्णुदास सांडिली वासना । तुम्ही नारायणा कळों आलां ॥ १ ॥ अज्ञान बाळक ठकाविला धुरु । तैसा मी अधीरु नव्हे देवा ॥ २ ॥ उपमन्या बाळका दुधाचा पैं छंद । तैसा मी मति-मंद नोहे देवा ॥ ३ ॥ शरण आला तुज मूर्ख बिभीषण । लंकाराज्य तेणें मागितलें ॥ ४ ॥ नामा म्हणे तुझें नलगे आम्हां कांहीं । वास सदा देईं चरणाजवळी ॥ ५ ॥

११०३ होइन संतांचा बोळगणा । दास डिंगर पोसणा ॥ १ ॥ प्रेम द्यावें नारायणा । भूतदया परिपूर्णा ॥ २ ॥ संतचरणींचे रज । हेंचि सर्व तीर्थ मज ॥ ३ ॥ सेवीन संतउच्छावळी । तेणें पवित्र माझी कुळी ॥ ४ ॥ राखेन संताचें मी द्वार । तें मज वैकुंठाहूनि थोर ॥ ५ ॥ नामा म्हणे पंढरीनाथा । न मागें आन कांहीं सर्वथा ॥ ६ ॥

११०४ प्रपंचीं कां मातें करिसी उदासिन । तरी तुझें ध्यान लागों मना ॥ १ हेंचि तुज मागणें जन्मजन्मांतरीं । न मागतां अंतरीं प्रगट होसी ॥ २ ॥ इंद्रियांचे व्यापार अवघेचि तोडीं । प्रेमरस गोडी देईं

मातें ॥ ३ ॥ नामा म्हणे शरण आलों मी केशवा । हाचि तूं पुरवावा मनोरथ॥ ४ ॥

११०५ पुलक धर्म रोमांच नाहीं जंव उठले । सजळ नाहीं झालें नयन जंव ॥ १ ॥ हरिभक्तीचें सुख कळलें जे म्हणती । लटिकें बोलिजेति उभयलोकीं ॥ २ ॥ ऐसा भक्तिप्रेमा देईं जी देवा । सर्वभावें सेवा घडे तुझी ॥ ३ ॥ श्रवणीं ऐकतां नाम वाचे भव बोले । नाहीं सुखावलें मन त्याचें ॥ ४ ॥ श्रीहरीचें नाम म्हणवितां न म्हणे । सहज उच्चारणें कैंचे त्यासी ॥ ५ ॥ दर्दुरा चोरापरी जिव्हा चटचटी । नाम सांडोनी गोष्टी राज्याची करी ॥ ६ ॥ देवाच्या मूर्ति संत महंत देखोनी । न वचे लोटांगणीं भावें त्यासी ॥ ७ ॥ न लावी त्यांचे रज टकमका पाहात । बुजवण जैसें सेत राखे तैसें ॥ ८ ॥ ऐसें कैक प्राणी आहेत मूढमती । हित सांगतां चित्तीं दुःख वाटे ॥ ९ ॥ नामा म्हणे केशवा मी तुझें दीन । नेणें तुजवांचोन आन दुजें ॥ १० ॥

११०६ माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पती ॥ १ ॥ मेघ वर्षे शीळधारीं । तेथें चातक चंचुभरी ॥ २ ॥ महा डोह गंगाजळ । तृप्त एखादा अंजुळ ॥ ३ ॥ साखरेची साठी । तेथें मुंगीची मुखवटी ॥ ४ ॥ नामा म्हणे मी सेवेसीं । तूं तो उदाराचा राशी ॥ ५ ॥

११०७ पतितपावन नाम ऐकुनी आलों मी द्वारा । पतीतपावन नव्हसी म्हणुनी जातों माघारा ॥ १ ॥ घ्यावें तेव्हां द्यावें ऐसा अससी उदार । काय धरुनि देवा तुझें कृपणाचें द्वार ॥ २ ॥ सोडीं ब्रीद देवा आतां नव्हेसि अभिमानी । पतीतपावन नाम तुझें ठेवियलें कोणीं ॥ ३ ॥ झेंगट घेऊनी हातीं दंवडी पीटीन तिहीं लोकीं । पतितपावन देवा परी तूं मोठा घातकी ॥ ४ ॥ नामा म्हणे देवा

तुझें न लगे मज कांहीं । प्रेम असोंदे चित्तीं म्हणुनि लागतसें पायीं ॥ ५ ॥

११०८ मनुष्य करिसी तरी भक्तीचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ १ ॥ श्वान करिसी तरी अच्छिष्टाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ २ ॥ पाक्षि करिसी तरी चारियाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसे ऐसें करीं ॥ ३ ॥ झाड करिसी तरी तुळसीचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ४ ॥ वृक्ष करिसी तरी मंडप मेखाचेनि मिषें । तुझें द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ५ ॥ पाषाण करिसी तरी रंग शिळेचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ६ ॥ उदक करिसी तरी सडियाचेनि मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करी ॥ ७ ॥ नामा म्हणे विठो कीर्तनाचेति मिषें । तुझे द्वारीं वसें ऐसें करीं ॥ ८ ॥

११०९ काय मागूं विठ्ठल धुरे । एक तुळशीदळ पुरे ॥ १ ॥ मागूं मुगुट माथाचा । तरी तो आणिला इंद्राचा ॥ २ ॥ मागूं कुंडलें कर्णींचीं । तरी तीं आणिलीं कर्णाचीं ॥ ३ ॥ मागूं पितांबर शेला । तरी तो कासेसी कासिला ॥ ४ ॥ मागूं पादुका चरणींच्या । तरी त्या आणिल्या शेषाच्या ॥ ५ ॥ मागूं तोडर पायींचा । धाक जाईल असुरांचा ॥ ६ ॥ मागूं जातां लक्ष्मीसी । रिद्धिसिद्धी जिच्या दासी ॥ ७ ॥ मागूं म्हणे शंख जरी । तरी तो मिरवे तुमच्या करीं ॥ ८ ॥ मागों सुदर्शन दळ । त्या शस्त्राचें तुह्मां बळ ॥ ९ ॥ मागों वैजयंती माळ । तरी शून्य दिसेल वक्षस्थळ ॥ १० ॥ कारण तेंचि मागितलें । नामया केशवाचें प्रेम दिलें ॥ ११ ॥ नामा म्हणे कांहीं न मागों । तुझे चरणीं लक्ष लागो ॥ १२ ॥

१११० डोळे शिणले पाहतां वाटुली । अवस्था दाटली हृदयामाजीं ॥ १ ॥ तूं माझी जननी सरसीये सांगातिणी । विठ्ठले धांवोनी देई क्षेम ॥ २ ॥ तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । क्षुधें पीडिलों मज विसरलीसी ॥ ३ ॥ तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । गुंता भवपाश

सोडीं माझा ॥ ४ ॥ तूं माझी माउली मी तुझी तान्हुली । वोरस वो घाली प्रेमपान्हा ॥ ५ ॥ नामा म्हणे आस पुरवावी माझी । तान्हुल्या पाजीं प्रेमपान्हा ॥ ६ ॥

## श्रीजनाबाई

१११११ ऐसा वर देई हरी । गाई नाम निरंतरीं ॥ १ ॥ पुरवीं आस माझी देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ २ ॥ हेंचि आहे माझे मनीं । कृपा करीं चक्रपाणी ॥ ३ ॥ रूप न्याहाळूनियां डोळां । मुखीं नाम लागो चाळा ॥ ४ ॥ उदाराच्या राया । दासी जनी लागे पायां ॥ ५ ॥

१११२ साधु आणि संत । जन्म द्यावा जी कलींत ॥ १ ॥ मागणें तें हेचि देवा । कृपा करी हो केशवा ॥ २ ॥ संत दयाळ परम । तया साक्षी नारायण ॥ ३ ॥ जनी म्हणे ऐसे साधू । तयापाशीं तूं गोविंदू ॥ ४ ॥

१११३ विटेवरी ब्रह्म दिस । साधु संतांचा रहिवास ॥ १ ॥ देव भावाचा अंकित । जाणे दासाचें तें चित्त ॥ २ ॥ भक्ति जनी मागे देवा । तिचा मनोरथ पुरवा ॥ ३ ॥

१११४ देवा देई गर्भवास । तरीच पुरेल माझी आस ॥ १ ॥ परि हे देखा रे पंढरी । सेवा नामयाचे द्वारीं ॥ २ ॥ करी पक्षि कां शुकर । श्वान श्वापद मार्जार ॥ ३ ॥ ऐसी आशा हे मानसीं । म्हणे नामयाची दासी ॥ ४ ॥

१११५ रुक्माई आईचें आहे ऐसें भाग्य । असावें आरोग्य चिरकाळ ॥ १ ॥ सख्या पुंडलिका आवडतें स्थळ । असावें चिरकाळ स्वस्ति क्षेम ॥ २ ॥ अहो संतजन ज्या आवडतें धन । असावें कल्याण चिरकाळ ॥ ३ ॥ जन्मोजन्मीं हेंचि मागें गोविंदासी । म्हणे जनी दासी नामयाची ॥ ४ ॥

१११६ द्वारकेच्या राया । बुद्धि देगा नाम गाया ॥ १ ॥ मतिमंद तुझी दासी । ठाव देई चरणांपासीं ॥ २ ॥ तुझे पदरीं पडलें खरी ।

आतां सांभाळ करीं हरी ॥ ३ ॥ न कळे हरीची करणी । म्हणे नाम-
याची जनी ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज.

१११७ माझें मन अति चंचल । त्यासी बांधा तुम्हीं सबळ ॥ १ ॥
मग तें कोठें नव जाय । तुमचे सोडोनियां पाय ॥ २ ॥ सुखदुःखाचें
कारण । मनाचि हें अधिष्ठान ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । मनें
मनासी बंधन ॥ ४ ॥

१११८ मागणें तें एक आम्हांप्रती द्यावें । निरंतर यावें जाग-
रणा ॥ १ ॥ या हरिदासांचा संग बरवा । आनंद राघवा गाऊं गीतीं
॥ २ ॥ जो न लभे तप तीर्थदानीं । तो हरिकीर्तनीं तिष्ठतसे ॥ ३ ॥
जनार्दनाचा एका म्हणे । कृपा करणें जागरणें ॥ ४ ॥

१११९ आमुच्या निजसुखधामा । तुझे चरण पुरुषोत्तमा ॥ १ ॥
आम्हावरी कृपा करा । उद्धारा दातारा दीनासी ॥ २ ॥ देऊनियां
नामकीर्ति । वसवा मूर्ति हृदयीं ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । ठाव
मागतसे चरणीं ॥ ४ ॥

११२० नाम धारकाचा । दास होईन मी साचा ॥ १ ॥ आणीक
नको थोरपण । वाचे वदों त्याचे गुण ॥ २ ॥ नामीं सदा वसों हेत ।
हेंचि मागणें मागत ॥ ३ ॥ हेंची द्यावें कृपादान । एका जनार्दनीं
शरण ॥ ४ ॥

११२१ वरपांग सोंग नको माळा मुद्रा । ठाव संतपदीं देईं
देवा ॥ १ ॥ प्रेमभाव देईं प्रेमभाव देईं । मागणें दुजें नाहीं आणिक
तें ॥ २ ॥ नाम मुखीं सदा संतांचा सांगात । प्रेम हृदयांत विठो-
बाचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हा माझा निर्धार । जन्माची वेरझार
तोडी देवा ॥ ४ ॥

११२२ तुमच्या सेवेचा महिमा । मज न कळे पुरुषोत्तमा ॥ १ ॥
पूजा करणें कवणें रीती । नेणें जपमाळ हातीं ॥ २ ॥ स्नानसंध्या न

कळे कांहीं । मन असो तुझे पायीं ॥ ३ ॥ तुम्हां मागणे इतुकें । एकाजनार्दनीं द्यावें कौतुकें ॥ ४ ॥

११२३ सर्वांभूतीं तुझें रूप । हृदयीं सिद्धची स्वरूप ॥ १ ॥ इतुलें देईं अधोक्षजा । नाहीं तर घोट भरीन तुझा ॥ २ ॥ सकळांहुनी करी सान । सकळिकीं समसमान ॥ ३ ॥ सदा द्यावा संतसंग । अखंड कीर्तनीं अनुराग ॥ ४ ॥ निःशेष दवडोनिया स्वार्थ । अवघा करी परमार्थ ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं मागें । नाहीं तरी घाला घालीन अंगे ॥ ६ ॥

११२४ भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा । अभिमान नित्य नवा तयामाजीं ॥ १ ॥ प्रेमसुख देईं प्रेमसुख देईं । प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ २ ॥ रांडिवेनें जेविं शृंगारू केला । प्रेमेंविण जाला ज्ञानी तैसा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेम अति गोड । अनुभवी सुरवाड जाणतील ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज.

११२५ आल्हादपण काय सांगशी देवा । मन वैसें भावा तैसे करीं ॥ १ ॥ हा घोडा हा राऊत करूनियां दावा । मग पदीं वैसवा ब्रह्माचिये ॥ २ ॥ मी डोलेन आनंदें तुमचेनि प्रसादें । रत्न जेंवि अंधें देखियलें ॥ ३ ॥ करा तत्त्वीं सौरसु म्हणे निवृत्तीदासु । जेथें रात्री दिवसु अथिचिना ॥ ४ ॥

११२६ नामरूपीं प्रीति कीं ध्यानीं सगुणमूर्ति । हेचि तुझी यशकीर्ति जाणोनियां ॥ हृदयीं तुझें रूप मुखीं नामघोष । नैवेद्य प्रसाद जठरीं आम्हां ॥ निर्माल्य मस्तकीं वंदूं तुमचे चरण । हाचि अच्युता तुमचा महिमा रया ॥ १ ॥ अखंड नाम वाचे हेंचि तप साचें । तेंचि स्वरूप दिसें हृदयीं तुझें ॥ २ ॥ तुझें नाम निर्धारितां हेंचि गा तप आतां । काया वाचा मनें न विसंबे तत्त्वतां । म्हणोनि आसनीं पंथीं शयनीं जडे पडा भलतैसें परि नाम न संडी अनंता । जीवाचिया जीवना

सगुणगुणनिधाना हेंचि प्रेम देईं निजभक्तां रया ३ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला आनंद सुखाचिया वोवरा । पाहें तंव भरला दशादिशां दुसरा न दिसे सोयरा । तेंवि गुणनाम कीर्ति तेचि आम्हां मूर्ति हृदयीं न विसंवे दातारा । येणें निवृत्तिरायें खुणा दाऊनि सकळ आतां जोडलासी माहेरा रया ॥ ४ ॥

११२७ भेटी जाली धुरेसी । पालटू जाला या जीवासी । लोहो लागलें परिसेसीं । तें सुवर्ण जालें ॥ ऐसा गुणागुणाचा दाता । तो विश्व व्यापिलेरे अनंता । काय पाहतोसि आतां । विमानीं वाट पाहातुसें ॥ १ ॥ तरि मी गुंतलों दातारा । येऊनियां संसारा ॥ ध्रु ॥ नट घेऊनियां अंगवणी । करूं नेणें संपादणी । एकत्र जालें लवण पाणी । तें मिळोनि गेलें ॥ ऐसा बहुतां गुणांचा दाता । तो विश्व व्यापिलेरे अनंता । काय बा पाहातोसि आतां । आपुल्यासारिखें करीं बापा ॥ २ ॥ चंद्र चकोरा नावडे । सेखीं होणार तेंचि घडे । वृथा वेंचितासि खडे । परिस म्हणोनि ठेविसी ॥ आतां असो हा डांगोरा । शरण रिघों रखुमादेविवरा । अरे अरे विठोजी दातारा । नवजे घरा आणिकांच्या ॥ ३ ॥

११२८ आठवी तंव तूंचि जवळिकें नाठविसी तरी निजसुखें । आठवाना विसरूपाहे नंव सगुणाचि हृदयीं एक रया ॥ १ ॥ तुझ्या नामाचा आठऊ रूपाचा आठऊ । ध्यानाचा आठऊ असो मना ॥ २ ॥ विसरू पडो संसाराचा आठऊ हो तुझिया रूपाचा । येथें नामरूप ठसा हृदयीं राहो ॥ जिवाचिया जिवलगा माझिया श्रीरंगा । गोडी घेऊनिया द्वैत नाहीं पाहो रया ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला सगुणीं सुमनीं गुंफिलें । प्रीति आवडे तों कोदाटलें सुमनीं हें विरालें ॥ ४ ॥ जाली नामरूपीं ऐक्यभेटी । नामरूप सार जाणोनि जीवन संसारा जाली तुटी रया ॥ ५ ॥

११२९ होरे तूं विठ्ठला होरे तूं विठ्ठला । होरे तूं विठ्ठला होरे तूं गोपाळा

क्षेम देईं रे वेल्हाळा ॥ १ ॥ तुज पाहतां भुलली पैं चित्ता । काय करूं मी आतां येईं पंढरीनाथा ॥ २ ॥ पिसुणें परावीं मज काय करावीं । तुजची आठवीं श्रीचरण दाखवीं ॥ ३ ॥ तुजविण वेल्हाळा कैं सुख सोहळा । रखुमादेवीवरा विठ्ठला शेजे नलगे डोळां ॥ ४ ॥

११३० माझिये हृदयीं वुंथी तें डोळ्यां सगुण प्रीति । वाचे नाम संपत्ति ऐसेंचि असो । म्हणौनि तुझें नाम आवडे हेंचि प्रेम न विसंबे वर्म निजध्यास रया ॥ १ ॥ श्रवण नाम गोडी श्रवण नाम गोडी । हीच आवडी देईं मना ॥ २ ॥ तुझिये सगुण वुंथीचा वासु व्हावा माझ्या हृदयीं ऐसा निज सुखाचिया निजध्यास । तुझिये आवडी अनुसंधान तुझिया स्वरूपीं मन डोळां वैसो । कां ध्यान हेंचि रूप हेंचि निज आवडी देईं कां दातारा चुकवीं येरझारा गर्भवास ॥ ३ ॥ म्हणोनि रखुमादेवीवरा विठ्ठला उदारा भावें जोडलासि आम्हां । श्रुति पुराणें वर्णिती नेति नेति तुझा महिमा । तुझें नाम रूप सुंदर हेंचि निरंतर देईं आम्हां सर्वोत्तमा रया ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

११३१ आलिंगन भेटी । मग चरणीं घाली मिठी ॥ १ ॥ ऐसा माझा भोळा भाव । पंढरिराव जाणता ॥ २ ॥ घेतलें हिरोनी । सीणभाग चक्रपाणी ॥ ३ ॥ सेना म्हणे मायबापें । द्यावें भातें हें आतां ॥ ४ ॥

११३२ ऐसी आवडी आहे जीवा । कैं पाहीन केशवा ॥ १ ॥ माझी पुरवा वासना । सिद्धी न्यावी नारायणा ॥ २ ॥ नलगे वित्त धन । मुखीं नाम नारायणा ॥ ३ ॥ सेना म्हणे कमळापति । हेंचि द्यावें पुढतापुढती ॥ ४ ॥

११३३ सुखें घाली जन्मासी । हेंचि बरें कीं मानसीं ॥ १ ॥ वारी करीन पंढरीची । जोडी ही माझी साची ॥ २ ॥ हरिदासाची

करीन सेवा । तेणें सुख थोर जीवा ॥ ३ ॥ सेना म्हणे सर्व संग । केला त्याग यासाठीं ॥ ४ ॥

११३४ चित्तीं पाय रूप डोळां । मुखीं नाम वेळोवेळां ॥ १ ॥ हेंचि मागें तुजपाशीं । भाव खरा कीं जाणसी ॥ २ ॥ हें उचित तुमचें । कोड पुरवा बालकाचें ॥ ३ ॥ नको देऊं अंतर । सेना लोळे पायांवर ॥ ४ ॥

११३५ आतां ऐसे करीगा देवा । तुझी घडो पायसेवा ॥ १ ॥ मनामाजी दुर्बुद्धी । न द्यावी माउलिये कधीं ॥ २ ॥ चित्तीं भाव जो धरिला । सिद्धी न्यावाजी विठ्ठला ॥ ३ ॥ सेना म्हणे याविण कांहीं । लाभ दुसरा नाहीं ॥ ४ ॥

११३६ हंबरोनि येती । वत्सा धेनु पान्हा देती ॥ १ ॥ तुम्हीं करावा सांभाळ । माझा अवघा सकळ ॥ २ ॥ विसरली भूक तान । तुमचे देखिल्या चरण ॥ ३ ॥ सेना म्हणे प्रेम भातुकें । द्यावें आतां हें कौतुकें ॥ ४ ॥

११३७ तुम्हीं करा कृपादान । येईन धाऊन पायापें ॥ १ ॥ घेईन संताची भेटी । सांगेन सुखाचिये गोष्टी ॥ २ ॥ जैसे मातेपाशीं बाळ । सांगे जीवीचें सकळ ॥ ३ ॥ सेना म्हणे हरे ताप । मायबाप देखुनी ॥ ४ ॥

११३८ देई मज जन्म देवा । करीन सेवा आवडी ॥ १ ॥ करीन संतांचें पूजन । मुखीं नाम नारायण ॥ २ ॥ असो भलते ठायीं । सुख-दुःखा चाड नाहीं ॥ ३ ॥ मोक्ष सायुज्यता । सेना म्हणे नये चित्ता ॥ ४ ॥

११३९ ही माझी मिरासी । पांडुरंग पायापासी ॥ १ ॥ करीन आपुलें जतन । वागावितों अभिमान ॥ २ ॥ जुनाट जुगादीचें । वाडिलें साधियेलें साचें ॥ ३ ॥ सेना म्हणे कमळापती । पुरातन हे माझी वृत्ती ॥ ४ ॥

### श्रीचोखोबामहाराज.

११४० अवघें मंगळ तुमचें गुण नाम । माझा तो श्रम पाहतां जाये ॥ १ ॥ गोड हें गोजिरें नाम तुमचें देवा । आठव हा द्यावा मजलागीं ॥ २ ॥ यापरतें मागणें दुजें नाहीं आतां । पुरवावी अनाथनाथा आळी माझी ॥ ३ ॥ चोखा म्हणे देवा होउनी उदार । ठेवा कृपाकर माथां माझ्या ॥ ४ ॥

११४१ अहो पंढरीराया विनवितों तुज । अखंड संतरज लागो मज ॥ १ ॥ नामाची आवडी उच्चार हा कंठीं । करीं कृपादृष्टी मजवरी ॥ २ ॥ पंगतीचें शेष उच्छिष्ट प्रसाद । तेणें सर्व बाध हरे माझा ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझा हाचि नवस । पुरवा सावकाश देवराया ॥ ४ ॥

---

## भक्तांपाशीं देवाचें मागणें.

### श्रीनिळोबामहाराज.

११४२ राहेन आतां तुमच्या संगें । हेंचि मागें भक्तांसी ॥ १ ॥ हेंचि द्या आतां उदारपणें । माझें करणें रूप नांव ॥ २ ॥ विश्रांतीचें माझें घर । तुम्ही जें शरीर धरिलें तें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तांपाशीं । भाकी ऐशी कींव देव ॥ ४ ॥

---

## देवापाशीं भक्तांचें मागणें.

### श्रीनिळोबामहाराज.

११४३ भक्त म्हणति अहो देवा । वियोग न व्हावा तुह्मां आह्मां ॥ १ ॥ इतुकेनिचि दोघेहि सुखी । मिसळतां एकाएकीं संतुष्ट ॥ २ ॥

आम्हीं गाऊं तुमचे गुण । करावें श्रवण सादर तुम्हीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कमळापती । आहे हातीं तुमच्या हें ॥ ४ ॥

११४४ देव हांसोनि बोलती । नको येऊं काकुलती ॥ १ ॥ आम्हीं रंजवूं आपणीयां । तुझिये वाचे चेतवूनियां ॥ २ ॥ न लगे कांहीं परिहार । देणें तुज धरीं धीर ॥ ३ ॥ निळा म्हणे चरणांवरी । माथा ठेवुनी करी पुढें कथा ॥ ४ ॥

११४५ भक्त उत्तीर्णत्वालागीं । राहिला युगीं युगें जातां ॥ १ ॥ न फिटे तरी त्याचें ऋण । भक्त संपन्न वैभवें ॥ २ ॥ देती अन्न आच्छादन । म्हणती येथून नवजावें ॥ ३ ॥ निळा म्हणे केला उभा । जो या नभा व्यापक ॥ ४ ॥

११४६ इंद्र चंद्र महेंद्र सर्व । मानवती देव हरीभक्तां ॥ १ ॥ म्हणती इहींचि केला ऋणी । चक्रपाणी कीर्तनें ॥ २ ॥ नेदी तिये वैकुंठवासी । आपणाचि पाशीं गोवियेला ॥ ३ ॥ निळा म्हणे हे सदैव संदा । कीर्तनें गोविंदा रंजाविती ॥ ४ ॥

११४७ संतभेटीचें आरत । उभाचि राहिला तिष्ठत ॥ १ ॥ बाप कृपाळु श्रीहरी । वाट पाहे निरंतरीं ॥ २ ॥ धांव घालूनियां पुढें । आलिंगी त्यां वाडेंकोडें ॥ ३ ॥ निळा म्हणे नवाचि नित्य । सोहळा भक्तांचा करीत ॥ ४ ॥

११४८ सद्गदित झाले कंठ । नेत्रीं अश्रु चालती लोट ॥ १ ॥ एकचि परी देवा भक्ता । बाधी वियोगाची व्यथा ॥ २ ॥ देव स्फुंदे भक्त रडे । एक पाहती एकाकडे ॥ ३ ॥ निळा म्हणे न सुटे मिठी । येरयेरां पडिली गांठी ॥ ४ ॥

११४९ कल्पोकल्पीं युगायुगीं । व्यवसाय हाचि तुम्हांलागीं ॥ १ ॥ करावें दासाचें पाळण । निवारूनि त्याचा शीण ॥ २ ॥ निद्रा आळस कांहीं नेणां । हेंचि वाहीं नारायणा ॥ ३ ॥ निळा म्हणे करुणा पोटीं । धरिली नित्य याचिसाटीं ॥ ४ ॥

११५० एक एकाहुनी आगळे। ओविलें संत कंठमाळे ॥ १ ॥ तेणें विराजलेती हरी । प्रभा फाकली दिगांतवरी ॥ २ ॥ संतचरित्रें सुंदरें। परिधान केलीं दिव्यांबरें ॥ ३ ॥ संतनामें निळा म्हणे। मुगुट कुंडलें करकंकणें ॥ ४ ॥

---

# देवभक्तांची एकरूपता.

## श्रीनिळोबामहाराज.

१०५१ ठायींचा हा ऋणानुबंध । प्रीतिवाद उभयतां ॥ १ ॥ म्हणोनि एक एकाधीन । जाणती उणखूण येरयेरां ॥ २ ॥ देव जाणें अंतरींचें। केलें भक्तांचें प्रतिपादी ॥ ३ ॥ निळा म्हणे भिन्नभाव । नाहीं देव-भक्तांचा ॥ ४ ॥

११५२ एक बैसे सिंहासनीं। कर जोडोनी एक उभा ॥ १ ॥ एक पूजा स्वीकारीत । एक करीत निजांगें ॥ २ ॥ मुळीं पाहतां दोघे एक। परी कौतुक दाखविलें ॥ ३ ॥ निळा म्हणे सेवक स्वामी । पुरुषोत्तमीं हें मिथ्या ॥ ४ ॥

११५३ स्वामी एक म्हणवी दास। आवडीस रूप केलें ॥ १ ॥ मुळींचें दोघां एकपण । परी हें भिन्न दाखविलें ॥ २ ॥ एक म्हणे धांवा धांवा। एक कुडावा करी त्याचा ॥ ३ ॥ निळा म्हणे नवल वाटे। साने मोठे नव्हती हे ॥ ४ ॥

११५४ भक्त देवालागीं झुरे। देव भक्तातेंचि स्मरे ॥ १ ॥ जेविं माउलियेतें बाळ। माय बाळातें स्नेहाळ ॥ २ ॥ येरयेरां नव्हती भिन्न । सर्वकाळीं सन्निधान ॥ ३ ॥ निळा म्हणे लवणा नीरा। जेवीं सोनें अळंकारा ॥ ४ ॥

११५५ भिन्न दावूनियां एक। एकीं भिन्नत्वाचें बीक ॥ १ ॥ जेविं बिंब प्रतिबिंब । दोन्ही एकचि ते स्वयंभ ॥ २ ॥ जैसी गोडी आणि

गूळ । कापूर तोचि परिमळ ॥ ३ ॥ निळा म्हणे देवभक्ता । निवडी कोण भिन्न आतां ॥ ४ ॥

११५६ एक एका अवलोकिती । एक मिसळती एकांत ॥ १ ॥ संत तेचि झाले देव । संतीं देव विराजे ॥ २ ॥ येरयेरां मिठी पडे । आतां निवडे तें कैसें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तिसुखें । झालें सारखे उभयतां ॥ ४ ॥

११५७ सोडुनी तया न वचे दुरी । त्याचा करी प्रतिपक्ष ॥ १ ॥ म्हणे मी त्यांचा तेही माझे । नव्हती दुजे कल्पांतीं ॥ २ ॥ मी तूं म्हणतां वेगळे न हों । मुळींचे आहों एकाएकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे देवभक्तां । एकात्मता ठायींची ॥ ४ ॥

११५८ भक्तीं देवातें पूजिलें । देवें भक्तां सन्मानिलें ॥ १ ॥ ऐसे भजती येरयेरां । जैसें जळ आणि जळगारा ॥ २ ॥ भक्त देवाजवळी बैसे । देव भक्ताघरीं वसे ॥ ३ ॥ निळा म्हणे देवा भक्तां । सर्वकाळीं एकात्मता ॥ ४ ॥

११५९ देव तोचि भक्त नाहीं वेगळीक । जळगार उदक जयापरी ॥ १ ॥ येरयेरांमाजी एकपणीं भिन्न । करूनी सौजन्य भोगिताती ॥ २ ॥ सौरभ्य चंदन परिमळ सुमन । नव्हती ते भिन्न एकमेकां ॥ ३ ॥ निळा म्हणे रत्ना जेविं रत्नकीळ । दो नांवीं निर्मळ एकी शिळा ॥ ४ ॥

११६० भक्त पूजिती भगवंता । भगवंत पूजी आपुल्या भक्ता ॥१॥ ऐसा प्रीतीचा कळवळा । परस्परें हा सोहळा ॥ २ ॥ भक्त देवातेंचि उमगी । देवही धांवे तयालागीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकीं एक । वसोनि भिन्नत्वाचें बीक ॥ ४ ॥

११६१ देवामाजीं भक्त असे । भक्ताअंगीं देव दिसे ॥ १ ॥ ऐशी परस्परें मिळणी । जेविं प्रभा आणि तरणी ॥ २ ॥ भक्त देवातेंचि

भजती। देवें भक्तीं ठेविली प्रीति ॥ ३ ॥ निळा म्हणे एकवंकी। जैसा अळंकार कनकीं ॥ ४ ॥

११६२ देव घरा आला। भक्तीं सन्मानें पूजिला ॥ १ ॥ पाहुणेर पंगती। संत द्विजवृंद शोभती ॥ २ ॥ पुढें आरंभूनी कथा। बुका माळा गंधाक्षता ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मानंदें। नाचती उभयतां आनंदें ॥ ४ ॥

११६३ देव चालिला सांगातें। भक्त जाती ज्या ज्या पंथें ॥ १ ॥ परम आनंद उभयतांसी। देवभक्तां सुखाच्या राशी ॥ २ ॥ चालतां मारगीं। कथा कीर्तन प्रसंगीं ॥ ३ ॥ निळा म्हणे देवभक्तां। परम विश्रांति चालतां ॥ ४ ॥

११६४ देवा भक्तां भिन्नपण। देखती जन मूर्ख ते ॥ १ ॥ साविता तोचि नारायण। वेदप्रमाण हा अर्थ ॥ २ ॥ म्हणती व्यासोनारायण। मिथ्या वदती हें काय ॥ ३ ॥ निळा म्हणे अर्जुनकृष्ण। नरनारायण भिन्न तनु ॥ ४ ॥

११६५ देवाभेटीं संतपण विरे। देवपण नुरे संतभेटी ॥ १ ॥ ब्रह्मानंदें निमग्न झाले। आप विसरले आपणा ॥ २ ॥ भक्तीचे आवडी झाले भिन्न। एकाचि जीवप्राण उभयतां ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वसुखा लोभा। एकचि प्रभा दों ठायीं ॥ ४ ॥

११६६ म्हणवूनि तुम्हां नित्य आठविती। याहो याहो म्हणती पांडुरंगा ॥ १ ॥ तुम्ही धांवोनियां येतां वरावरी। पुरवितां श्रीहरी आर्त त्यांचे ॥ २ ॥ न साहे वियोग तुह्मां उभयतां। देवां आणि भक्तां एकवंकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दोन्ही पिंड एक जीव। जाणती हा भाव निगमादिक ॥ ४ ॥

# भक्तांचा देवाशीं लडिवाळपणा

## श्रीनिळोबामहाराज.

११६७ भक्तभावांच्या संपत्ती । भोगा ऐश्वर्यें श्रीपती ॥ १ ॥ करा त्यांचें समाधान । न सांडितां सिंहासन ॥ २ ॥ केली नामाची घोकणी । जिहीं तुमच्या चक्रपाणी ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेविली जिहीं । निष्ठा अखंड तुमचे पायीं ॥ ४ ॥

११६८ देव अंगें निराभास । भक्त रूपस चांगला ॥ १ ॥ म्हणोनियां ते आणिती रूपा । दर्पणीं पहा पां जेविं नभ ॥ २ ॥ नामें रूपें मंडित केला । शृंगारिला अळंकारें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्त जनक । देव बाळक या हेतु ॥ ४ ॥

११६९ एका एकपण । न संपडे दुजेनविण ॥ १ ॥ म्हणोनियां भक्त केला । आधीं मग देव जाहला ॥ २ ॥ फुला आधीं फळ । नव्होचि मुळेंवीण डाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे लेंक । होता बापपणा बीक ॥ ४ ॥

११७० भक्तांवीण देवालागीं । पुसतें जगीं कोण दुजें ॥ १ ॥ नामही नव्हतें रूपही नव्हतें । कैसेनि जाणतें कोण तया ॥ २ ॥ परेही परता परदेशीं होता । केला भक्तीं सरता आपुल्या बळें ॥ ३ ॥ निळा म्हणे तो देवसा केला । भक्तीं आणिला नामरूपा ॥ ४ ॥

११७१ भक्तांवीण देवा कोण । सोयरा सज्जन तिहीं लोकीं ॥ १ ॥ यालागीं त्यांचीच वास पाहे । आज्ञेंत राहे भक्तांचिया ॥ २ ॥ आवडी ऐसीं रूपें धरीं । भक्तांचें करी सांगितलें ॥ ३ ॥ निळा म्हणे लोकीं तिहीं । भक्तावीण आप्त नाहीं देवा ॥ ४ ॥

११७२ आधीं भक्त पाठीं देव । प्रगटे भाव देखोनी ॥ १ ॥ काचोळी पाठीं कण । भूस निकण मग दाणा ॥ २ ॥ आधीं तंतू

पाठीं वस्त्र । कनका अळंकार रूप करी ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तां-
वीण । कैचें देवपण देवासी ॥ ४ ॥

११७३ ऐसें ऐकुनियां उत्तर । देव म्हणे उदार धीर तुम्ही ॥ १ ॥
तुमच्याचि काजा रूपासी येणें । मजलागीं धरणें अवतार ॥ २ ॥
तुम्ही माझे मी तुमचा । आहेचि ठायींचा ऋणानुबंध ॥ ३ ॥ निळा
म्हणे देवभक्तां । ऐसी एकात्मता हो सरली ॥ ४ ॥

११७४ कांहीं काय मांडेल जेव्हां । मजाचे प्रगट होणें तेव्हां
॥ १ ॥ जवळीच आहे भेऊं नका । माझिया बळें दुर्जन लोकां ॥ २ ॥
तुम्हां गांजिती द्वेषिती । त्यांची समूळ विनश्याति ॥ ३ ॥ निळा
म्हणे भगवद्वाणी । ऐसी प्रविष्ट झाली श्रवणीं ॥ ४ ॥

११७५ तुम्हीं दिधलें वैकुंठभुवन । शेषशयन मजलागीं ॥ १ ॥
नाहीं तरी जाणता कोण । होतों निर्गुण निराभास ॥ २ ॥ नामरूप
कैचें मज । तुम्ही चित्तें सहज वाढविलें ॥ ३ ॥ निळा म्हणे आपुल्या
दासां । देतो ऐसा वडिवार ॥ ४ ॥

११७६ जिवलग माझे गडी । न गमे घडी तुम्हांविण ॥ १ ॥
सांगा जे जे मनोरथ । पुरवीन आर्त तुमचे ते ॥ २ ॥ नका आतां
उदासीन । करूं मन मजवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरी ऐसा । करी
लालसा दासांची ॥ ४ ॥

११७७ देव आदरें म्हणे भक्तां । घ्या हो भुक्तिमुक्ति आतां ॥ १ ॥
भक्त म्हणती नेघों देवा । पुरे आम्हां तुझीच सेवा ॥ २ ॥ ऋद्धिसिद्धी
तरी घ्यारे । भक्त त्यागिती धिक्कारें ॥ ३ ॥ निळा म्हणे करुनी साटी ।
बैसले चरणीं घालुनी मिठी ॥ ४ ॥

११७८ भक्तसेवेच्या उपकारें । बहुत आभारें दाटलों ॥ १ ॥
काय उत्तीर्ण व्हावें यासी । रुक्माईसी विचारी ॥ २ ॥ देतां कांहींच
न घेती । उदासवृत्ती सर्वदां ॥ ३ ॥ निळा म्हणे जिवींच जडले ।
तिहीं मज केलें अंकित ॥ ४ ॥

११७९ ऐसा देव देखोनि भक्तां । म्हणे मी आतां केउता पळों ॥ १ ॥ जीवेंसीचे इहीं केली साठी । सोडवितां मिठी न सोडिती ॥ २ ॥ भुक्तिमुक्ति देतां यांसी । परी हे उदासी न घेती त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तीं मोकलितां आशा । देवाचि फांसा पडिलों म्हणे॥४॥

११८० देव म्हणे भक्तहो कांहीं तरी घ्यारे । ते म्हणती उरे शीणाचि घेतां ॥ १ ॥ याल तरी नेईन वैकुंठलोका । ते म्हणती नका बंदिखान ते ॥ २ ॥ ऋद्धि सिद्धि देईन तुम्हां । ते म्हणती आम्हां विटाळ तो ॥ ३ ॥ विचारी देव करावें कैसें । कैवल्यही ऐसें नेघों म्हणती ॥ ४ ॥ आतां आवडेल तरी तें मागा । देईन सांगा जीवींचें ॥ ५ ॥ निळा म्हणे हृदयीं ध्यान । द्या हो जीवन नाम तुमचें ॥ ६ ॥

११८१ देव म्हणे भक्तराजा । अव्हेर माझा न करावा ॥ १ ॥ भोजनकाळीं पाचारावें । मजही घ्यावें सांगातें ॥२॥ भोजनीं तुमच्या तृप्ती मज । काजें काज तुमाचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतर नका । असों एकएका माझारीं ॥ ४ ॥

११८२ निर्भय असा माझ्या बळें । कळिकाळें तीं रंकें ॥ १ ॥ सुखें करा हरीची कथा । तुमची चिंता मज आहे ॥ २ ॥ पाचाराल तेचि घडी । येईन तांतडी धांवत ॥ ३ ॥ निळा म्हणे अमृतवचनें । दे वरदानें दासांसी ॥ ४ ॥

११८३ पासुनी तुम्हां न वजे दुरी । क्षण घटिकाभरी वेगळा ॥ १ ॥ चालतां तुम्हां धांवे पुढें । मागेंहि वोढे सरिसाचि ॥ २ ॥ निजल्या जवळी तुम्हां उभा । भक्तिलोभा गुंतलों ॥ ३ ॥ निळा म्हणे करुनि साटी । तुम्हां कल्पकोटी न विसंबे ॥ ४ ॥

११८४ पुसे क्षेम भक्तांलागीं । म्हणतसे मार्गीं श्रमलेती ॥ १ ॥ प्रतिवरुषीं भेटी देतां । सांभाळितां येउनी ॥ २ ॥ नाहीं तुमचे उत्तीर्ण झालों । कधीं आलों गांवासी ॥ ३ ॥ निळा म्हणे आभारला । प्रसन्न झाला दासासी ॥ ४ ॥

११८५ भक्तीं आराधिला देव । जाणवला भाव देवासी तो ॥ १ ॥ बहुत बरवें म्हणती भक्ता । न वजे परता जवळूनियां ॥ २ ॥ सुखी असा माझ्या बळें । पुरवीन लळे इच्छाल ते ॥३॥ निळा म्हणे कृपाळु हरी । भक्तावरी तुष्टमान ॥ ४ ॥

११८६ देवाचें वर्म सांपडला भाव । नवजाय जवळुनी अडकला देव ॥ १ ॥ देव म्हणे माझी नव्होचे सुटका । भावेंविण म्हणती देवोचि लटिका ॥ २ ॥ वर्म हें यासी दाविलें कोणें । संतासी ठाउकें येर कोणीही नेणे ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तासी तिहींच दाविलें । न सोडिती आतां जिवेंसीं बांधलें ॥ ४ ॥

११८७ भक्तिभाव बळकावला । देव धांवला सोडवणें ॥१॥ म्हणें मज घ्या पालटासी । सोडा भावासी जाऊं द्या ॥ २ ॥ ते म्हणती तूं लटिका देवो । आम्ही धरिला भावो न सोडूं ॥ ३ ॥ निळा म्हणे भावासाठीं । पडली मिठी देव न सुटे ॥ ४ ॥

११८८ भक्तिभावाचि बांधिला गांठी । आला उठाउठी देव तेथें ॥ १ ॥ म्हणे मज घ्या सोडा यासी । ते म्हणती ठकिसी नेघों तुज ॥ २ ॥ लटिकीच माया धरिशील रूपें । लपशील खोपें रिघोनियां॥३॥ न सोडूं भाव जाई तूं आतां । विनवी देव भक्तां काकुळती ॥ ४ ॥ भावही घ्यारे भक्तिही घ्यारे । मजही घ्यारे तुमचाचि मी ॥ ५॥ निळा म्हणे साधिलें काज । भक्तीं आपुली पैज जिंकियली ॥ ६ ॥

११८९ भक्तघरींचें करीन काम । त्याचेंचि नाम वागवीन ॥ १ ॥ भक्तरूपें विराजलों । स्थिरावलों हृदयीं त्या ॥ २ ॥ भक्तसुखें सुखावत । त्यांच्याचि क्रीडत देहसंगें ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसा देव । दाखवी प्रभाव आपुला ॥ ४ ॥

११९० भक्त देव देवतार्चन । भक्त माझें पूजाध्यान ॥ १ ॥ भक्तांविणें भजों कोणा । म्हणे वैकुंठींचा राणा ॥ २ ॥ भक्त माझा विधि-

जप । भक्तचि योग याग तप ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तांवरी । ऐसी निष्ठा सांगे हरी ॥ ४ ॥

११९१ म्हणे मी येईन तुम्हांसवें । गांवा न्यावें आपुलिया ॥ १ ॥ ठाकेल ते करीन सेवा। माझा न करावा अव्हेर ॥२॥ राहेन तुमाचिये संगतीं । सुख विश्रांति कारणें ॥ ३ ॥ निळा म्हणे येणें रूपा । तुमची कृपा देव म्हणे ॥ ४ ॥

११९२ भक्तांचिया गांवा आला । देव परमानंदें धाला ॥ १ ॥ म्हणे नवजाये येथुनी । आतां भक्तांसी टाकुनी ॥ २ ॥ शीण माझा हरला भाग ।गोड वाटे यांचा संग ॥ ३ ॥ निळा म्हणे विजयी झाले । देवां भक्त घेउनी आले ॥ ४ ॥

११९३ धीट अधिकार कापिले । बधिर बोलके तोतिरे ॥ १ ॥ भाविकांचा गोड भावो । देखोनि सवें नाचे देवो ॥ २ ॥ म्हणे धन्य तुमचें कर्म । अवघें माझे ठायीं प्रेम ॥ ३ ॥ निळा म्हणे तुम्हांविण । दुजें आप्त मज ते कोण ॥ ४ ॥

---

# भक्तवत्सलता.

## श्रीतुकाराममहाराज.

११९४ भक्त देवाघरिंचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥ १ ॥ येरयेरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥ २ ॥ देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ४ ॥

११९५ आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥ १ ॥ वेडा झाला वेडा झाला । लांचावला भक्तीसी ॥ २ ॥ निचाड हा चाड धरी । तुळसी करीं दळ मागे ॥ ३ ॥ धरिला मग न करी बळ । तुका म्हणे कळ पायीं ॥ ४ ॥

११९६ अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ॥ १ ॥ देव सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ॥ २ ॥ आपुल्याच वैभवें । शृंगारावें निर्मळ ॥ ३ ॥ तुका म्हणे जेवी सवें । प्रेम द्यावें प्रीतीचें ॥४॥

११९७ गौळियांचीं ताकापिरें । काय पोरें चांगलीं ॥ १ ॥ येवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ॥ २ ॥ काय उपास पाडिले होते । कण्यां भक्षी विदुराच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे कुब्जा दासी । रूपरासी हीनकळा ॥ ४ ॥

११९८ विश्वाचा जनिता । म्हणे यशोदेसी माता ॥ १ ॥ ऐसा भक्तांचा अंकित । लागे तैसी लावी प्रीत ॥२॥ निष्काम निराळा । गोपी लावियेल्या चाळा ॥ ३ ॥ तुका म्हणे आलें । रूपा अव्यक्त चांगलें ॥४॥

११९९ भक्त समागमें सर्वभावें हरी । न सांगतां करी सर्व काम ॥ १ ॥ सांठविला राहे हृदयसंपुष्टीं । बाहेर धाकुटी मुर्ति उभा ॥ २ ॥ मागण्याची वास पाहे सुखाकडे । चिंतिल्या रोकडे मनोरथ ॥ ३ ॥ तुका म्हणे जीव भाव देवापायीं । ठेवूनियां कांहीं न मागती ॥ ४ ॥

१२०० भक्तांह्मनि देवा आवडतें काइ । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ १ ॥ नावडे वैकुंठ क्षीराचा सागर । धरोनी अंतर राहे दासा ॥ २ ॥ सर्वभावें त्याचें सर्वस्वही गोड । तुळसीदळ कोड करूनी घ्यावें ॥३॥ सर्वस्वें त्याचा म्हणवी विकिला । चित्त द्यावें बोला सांगितल्या ॥ ४ ॥ तुका म्हणे भक्तिसुखाचा बांधिला । आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥ ५ ॥

१२०१ प्रमाण हे त्याच्या बोला । देव भक्तांचा अंकिला ॥ १ ॥ न पुसतां जातां नये । खालीं बैसतांही भिये ॥ २ ॥ अवघा त्याचा होत । जीव भावाही सहित ॥ ३ ॥ वदे उपाचाराची वाणी । कांहीं माग म्हणऊनि ॥ ४ ॥ उदासीनाच्या लागें । तुका म्हणे धांवें मागें ॥ ५ ॥

१२०२ भक्तवत्सल दिनानाथ । तिहीं लोकीं ज्याची मात ॥ १ ॥ तो हा पुंडलिकासाठीं । आला उभा वाळवंटीं ॥ २ ॥ गर्भवासा धरी । अंबऋषीच्या कैवारीं ॥ ३ ॥ सकळां देवां अधिष्ठान । एका

मंत्रासी कारण ॥ ४ ॥ तुका म्हणे ध्यानीं। ज्यासी ध्यातो शूळपाणी ॥ ५ ॥

१२०३ उदार कृपाळ अनाथांचा नाथ। ऐकसील मात शरणागतां ॥ १ ॥ सर्व भार माथां चालविसी त्यांचा। अनुसरली वाचा काया मनें ॥ २ ॥ पाचारितां उभा राहसी जवळी। पाहिजे ते काळीं पुरवावें ॥ ३ ॥ चालतांही पंथ सांभाळीसी वाटे। वारिसील कांटे खडे हातें ॥ ४ ॥ तुका म्हणे चिंता नाहीं तुझ्या दासां। तूं त्यांचा कोवसा सर्वभावें ॥ ५ ॥

१२०४ गजेंद्र पशु आप्तें मोकलिला। तो तुज स्मरला पांडुरंगा ॥ १ ॥ त्यासाठीं गरुड सांडुनि धांवसी। माया झळंबसी दीनानाथा ॥ २ ॥ धेनु वत्सावरी झेंप घाली जैसी। तैसें गजेंद्रासी सोडविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रीद बांधलें यासाठीं। भक्तांसी संकटीं रक्षावया ॥ ४ ॥

१२०५ आडलिया जना होसी साहाकारी। अंधळिया करीं काठी तूंचि ॥ १ ॥ आडिले गांजिले पीडिले संसारीं। त्यांचा तूं कैवारी नारायणा ॥ २ ॥ प्रल्हाद महासंकटीं रक्षिला। तुम्हीं आपंगिला नानापरी ॥ ३ ॥ आपुलेंचि अंग तुम्ही वोढाविलें। त्याचें निवारिलें महादुःख ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझे कृपे पार नाहीं। माझे विठाबाई जननीये ॥ ५ ॥

१२०६ मानी भक्तांचे उपकार। ऋणिया म्हणवी निरंतर। केला निर्गुणीं आकार। कीर्ति मुखें वर्णितां ॥ १ ॥ म्हणोनि जया जे वासना। ते पुरवितो पंढरीराणा। जाला भक्तांचा आंदणा। ते उपकार फेडावया ॥ २ ॥ अंबऋषीकारणें जन्म घेतले नारायणें। एवढें भक्तीचें लाहणें। दास्य करी दासाचें ॥ ३ ॥ म्हणियें करितां शंका न धरी। रक्षपाळ बळिच्या द्वारीं। भक्तीचा आभारी। रीग न पुरे जावया ॥ ४ ॥ अर्जुनाचे रथवारू। ते वागवी सर्वेश्वरु। एवढे भक्तीचे उप-

कारु। मागें मागें हिंडतसे ॥ ५ ॥ पुंडलिकाचे द्वारीं । समपाऊलीं विटेवरी। न वजे कट करी। धरूनि तेथें राहिला ॥ ६ ॥ भावभक्तीचा अंकित। नाम साजे दिनानाथ। म्हणोनि राहिला निवांत। तुका चरण धरोनी ॥ ७ ॥

## श्रीनिळोबामहाराज.

१२०७ बहुतें आळीकरें। इनें वाढविलीं लेंकुरें ॥ १ ॥ आहे आधिलाचि अभ्यास। नव्हे कोणाही उदास ॥ २ ॥ अपत्य पाळवी। तया खाववी जेववी ॥ ३ ॥ निळा म्हणे घरीं। तया न विसंबे दारीं ॥ ४ ॥

१२०८ देवासी दासाचा कळवळा। माये बाळावरी जैसा ॥ १ ॥ नेदी मोडों भूक तहान। करें कुरवाळून स्तन पाजी ॥ २ ॥ दिठावेल म्हणोनी प्राण। निंबलोण उतरी त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे करूनी कोड। पाळी लाड प्रीतीनें ॥ ४ ॥

१२०९ भक्तांचिये भुके। प्रेम वागविसी भातुकें ॥ १ ॥ घालूनियां निज मुखीं। एकाएकीं करिसी सुखी ॥ २ ॥ पुरवुनी आळी। घेसी कडिये तेचि वेळीं ॥ ३ ॥ निळा म्हणे बापमाय। एका अंगें दोन्हीं होय ॥ ४ ॥

१२१० देऊनियां आपुलें प्रेम। करी भक्तांचा संभ्रम ॥ १ ॥ आधीं निष्काम संपत्ती। तया वोपी भुक्ति मुक्ति ॥ २ ॥ निश्चळ शांति क्षमा दया। सेवेलागीं अर्पी तया ॥ ३ ॥ निळा म्हणे महा भाग्य। तें त्या समर्पी वैराग्य ॥ ४ ॥

१२११ भावें पाचारितां। विठ्ठल नामें आळवितां ॥ १ ॥ येसी धांवत धांवत। माउली तूं कृपावंत ॥२॥ देसी प्रेमपान्हा। मुखीं घालूनियां स्तना ॥ ३ ॥ निळा म्हणे घेसी। तया अंकीं खेळविसी ॥ ४ ॥

१२१२ भक्तांचिसाटीं रूपें धरी। पवाडे करी असंख्य ॥ १ ॥ भक्तांसी मानी आपुलें सखे। नेदी पारिखे दिसों त्या ॥ २ ॥ कृपा-

वस्त्र पांघुरवी । जवळी बैसवी आपणा ॥ ३ ॥ निळा म्हणे तृप्तीवरी । ब्रह्मरस भरी मुखांत ॥ ४ ॥

१२१३ नेदी त्या दुसरें । लागों आणिकाचें वारें ॥ १ ॥ युगायुगीं त्याचा । म्हणवी सोयरा निजाचा ॥ २ ॥ लेवउनी लेणीं । मिरवी अळंकार भूषणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे शांति दया । वोपी भुक्ति मुक्ति तया ॥ ४ ॥

१२१४ मागें पुढें उभा राहे । भरुनी पाहे डोळे त्या ॥ १ ॥ प्रेमासी दृष्टी लागेल म्हणें । उतरी निंबलोण वरुनियां ॥ २ ॥ पोटीं त्याला परम प्रीती । आळंगी श्रीपती हृदयेंसी ॥ ३ ॥ निळा म्हणे करुणा बहुत । झाला या मोहित भक्तांसी ॥ ४ ॥

१२१५ सदा सेवकांचा लाड । पुरवा करूनियां कोड ॥ १ ॥ जेंवि कृपावंत माय । तान्हयाच्या घाणि धाय ॥ २ ॥ खावया जेववा । लेणीं लुगडींहि त्या पुरवा ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवानिशीं । नेणा विसंबों तयासी ॥ ४ ॥

१२१६ नाहीं तेंचि आणुनी ठेवी । चाड जिवीं जे वाटे ॥ १ ॥ समयाचे समयावरी । निर्माण करी आणि पुरवी ॥ २ ॥ नेदी दिसों केविलवाणें । मिरवी भूषणें निजांगींचीं ॥ ३ ॥ निळा म्हणे गुंतला भाके । धांवे हाके पाचारितां ॥ ४ ॥

१२१७ म्हणवी कामारी । दास्य करी त्यांच्या द्वारीं ॥ १ ॥ ऐसा भक्तांसी भुलला । नाम गातां आतुडला ॥ २ ॥ नेणे त्याविण आणीक । शेषशाई वैकुंठलोक ॥ ३ ॥ निळा म्हणे निःसीम भावें । भजले विके त्यांच्या नांवें ॥ ४ ॥

१२१८ जिहीं जोडिला विश्वासें । निजनिष्ठेच्या मानसें ॥ १ ॥ मुखें आळविलें नाम । याचें धरूनियां प्रेम ॥ २ ॥ बैसली आवडी । याच्या पायीं दिली बुडी ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याच्या घरा । धांवे करी येरझारा ॥ ४ ॥

१२१९ देवादेव मुगुटमणी । करी टेहणी दासा घरीं ॥ १ ॥ शीण त्या होऊं नेदी भाग । वोढवी अंग त्या अंगीं ॥ २ ॥ शुभाशुभ त्याचीं कर्में । वारूनी दुर्गमें सुखी करी ॥ ३ ॥ निळा म्हणे आपणासरी । करूनियां करी बहुमान ॥ ४ ॥

१२२० कळासलेती युगायुगीं । नेणा शीणभाग अंगीं ॥ १ ॥ भक्ताचिये हाक सवे । क्षणें तेथेंचि प्रगट व्हावें ॥ २ ॥ निरसूनियां मोह मळ । पदीं रक्षावें निश्चळ ॥ ३ ॥ निळा म्हणे यश कीर्ति । देउनि सुखाची संपत्ती ॥ ४ ॥

१२२१ परम कृपावंत हरी । दीनोद्धारीं तिष्ठतु ॥ १ ॥ भुक्तिमुक्ति घेउनी हातीं । द्यावया प्रति निजदासा ॥ २ ॥ चारी मार्ग अवलोकित । येती वागवित आर्त त्यांचें ॥ ३ ॥ निळा म्हणे सगुण वेषें । उभाचि असे ईटेवरी ॥ ४ ॥

१२२२ अनुरागें भजती देवा । त्यांच्या भावा साक्षी तो ॥ १ ॥ म्हणोनियां मागें पुढें । धांवें कोडें सांभाळी ॥ २ ॥ भुके तानें करी चिंता । लागों नेदी त्यां ऊनवारा ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतरसाक्षी । सदा कैं पक्षी दासाचा ॥ ४ ॥

१२२३ निजभक्ताची आवडी । सांभाळी त्या घडीघडी ॥ १ ॥ राखोनियां भूक तान । करी त्याचा बहुमान ॥ २ ॥ वस्त्रें भूषणें धुरवी । चिंता त्याची वाहे जीवीं ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याचें उणें । नेदी पडों कवण्या गुणें ॥ ॥ ४ ॥

१२२४ बरें जाणवलें मग । करी येउनियां लगबग ॥ १ ॥ अवलोकुनी कृपादृष्टी । धरी कवळूनियां पोटीं ॥ २ ॥ वोरसली मोहें । लावी स्तनीं पाजी पेहे ॥ ३ ॥ निळा म्हणे दुरी । न वजे बैसोनियां घरीं॥४॥

१२२५ न विसंबे त्यां घटिका पळ । त्याचिपाशीं सर्वकाळ ॥ १ ॥ उत्तीर्णत्वाखागीं हरि । त्याची परिचर्या करी ॥ २ ॥ न म्हणे दिवस

रात्री कांहीं । संचरोनी वसे त्याच्या देहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तां घरी । गुणें नामें रूपें हरी ॥ ४ ॥

१२२६ भक्तांचिये मनीं जैसें । करी हा तैसें वर्तन ॥१॥ नेदी होऊं आज्ञाभंग । वोढवी सर्वांग सेवेसी ॥ २ ॥ स्तंभीं पाचारितां हाके । होउनी ठाके नरहरी ॥ ३ ॥ निळा म्हणे उभा द्वारीं । केला विटेवरी मग ठाके ॥ ४ ॥

१२२७ जे जे होऊनिया अनुरक्त । झाले विरक्त हरिनामें ॥ १ ॥ त्यांचे अंगीं विसावला । हृदयींचे राहिला प्रगटोनि ॥ २ ॥ नेदी उरों दुसरेपणें । त्यांचेनि प्राणे जीवें जितु ॥ ३ ॥ निळा म्हणे घालुनि मिठी । त्यातें कल्पकोटी न विसंबे ॥ ४ ॥

१२२८ भाव शुद्ध तरी । प्रगटे येवूनि अंतरीं ॥ १ ॥ उरों नेदी तया भिन्न । करी आपणा समान ॥ २ ॥ भरोनियां सृष्टीं । आपणचि त्या पाठीपोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे राहे । कवळूनियां अंतर्बाह्य ॥ ४ ॥

१२२९ आपणासमान केलें त्यासी । धरिलें ज्यासी निज हातीं ॥ १ ॥ ऐसा देवो कृपासिंधु । म्हणोनि बंधु दीनांचा ॥ २ ॥ हीनत्व देखोनि भक्तां अंगीं । लाजे जगीं त्याचेनि ॥ ३ ॥ निळा म्हणे करुनी थोर । चालती बडिवार निजांगें ॥ ४ ॥

१२३० भक्तांचाचि वोरस देवा । धांवे सेवा करूं त्यांची ॥ १ ॥ जें जें गोड वाटे मनीं । तें तें वदनीं भरे तयां ॥ २ ॥ अपूर्ण तेथें पूर्ण करी । पुरवी कामारी होउनी ॥ ३ ॥ निळा म्हणे रक्षी हेत । उभा तिष्ठत त्यांपाशीं ॥ ४ ॥

१२३१ परम विश्रांति पावलीं । अवघीं येणें सुखी केलीं ॥ १ ॥ आवडी वंदिती पूजिती । दर्शना जे याच्या येती ॥ २ ॥ नाम उच्चारिती वाचे । नित्य कोड करी त्यांचें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तासाठीं । धरी रूपें अनंतकोटी ॥ ४ ॥

१२३२ भाविकाची आवडी देवा । करी सेवा निजप्रीतीं ॥ १ ॥ हिंडे तया मागे पुढे । नाशी कोडें सकळही ॥ २ ॥ घरीं दारीं वसे हरी । विश्वंभरीं भाव ज्या ॥ ३ ॥ निळा म्हणे संदेह नाहीं । भक्तां पाही यावरी ॥ ४ ॥

१२३३ धांवोनियां झोंबे कंठीं । कृपादृष्टी अवलोकी ॥ १ ॥ म्हणे श्रमलेती मार्गी येतां । बैसा आतां अविश्रम ॥ २ ॥ घडी घडी जिवींची मात । सांगे पुसे आर्त आवडीचें ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपाघनें । बहुत मानें गौरविलें ॥ ४ ॥

१२३४ भक्त करिती तैसा होय । ठेविला ठाय तया स्थळीं ॥ १ ॥ पाचारिती भाविती जेथें । प्रगटे तेथें रूप धरी ॥ २ ॥ जे जे उपचार करिती भक्त । ते ते स्वीकारित बाळापरी ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तांपाशीं । नाहीं यासी दुराग्रह ॥ ४ ॥

१२३५ राहिला उभा विटेवरी । भक्तकैवारी म्हणउनी ॥ १ ॥ जे जे येती ज्या ज्या भावें । तें त्यां द्यावें न बोलतां ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति वांटी एका । लाविल्या फुका रिद्धिसिद्धि ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वाधिकारी । प्रेमभांडारी भक्त केले ॥ ४ ॥

१२३६ अंतर कोणा नेदी सहसा । आपुलिया दासा सांभाळी ॥ १ ॥ परम कृपावंत हरि । नामोच्चारीं प्रगट होय ॥ २ ॥ त्याची निष्ठा बाणली ज्यासी । कदापि त्यासी न विसंबे ॥ ३ ॥ निळा म्हणे जवळचि राहे । ऐसा भक्तमोहें मोहितु ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज.

१२३७ तुझें भक्तिसुख द्यावें मज प्रेम । वसो तुझें नाम माझे मुखीं ॥ १ ॥ सद्भक्ति विचार राहो माझे चित्तीं । हेंचि कृपामूर्ति द्यावें मज ॥ २ ॥ तुझा दास जनीं म्हणवितों विख्यात । पसारिला हात फिरवूं नको ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा इतुकें द्यावे मज । ऐकोनि केशव-राज काय बोले ॥ ४ ॥

१२३८ घेरे घेरे नाम्या दिलें माझें प्रेम । घोकीं माझें नाम सर्वकाळ ॥ १ ॥ शिरावरी हात ठेवितसे माझा । अभिमान तुझा गेला म्हणुनि ॥ २ ॥ भक्तिसुख देवें दिलें नामयातें । नामा परमामृतें तृप्त झाला ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा झालों मी पावन । माझें तुजविण कोण आहे ॥ ४ ॥

१२३९ मायबापांपरीस लोभ तुझा हरी । आहे मजवरी केशिराजा ॥ १ ॥ आतां जाणसी तें कृपाळुवा करीं । लाज सर्व हरी आहे तुज ॥ २ ॥ माझें जातिकुळ नाहीं त्वां पुशिलें । अन्याय साहिले कोट्यानकोटी ॥ ३ ॥ जन्मोजन्मीं मज घातलें पाठिसी । संकटीं रक्षिसी नारायणा ॥ ४ ॥ देऊनि प्रेमभातें पाळिलें पैं मातें । साउली तेव्हां ते केली देवा ॥ ५ ॥ जे खूण जाणती तेचि माझे सखे । मी तुझें लाडकें म्हणवीं देवा ॥ ६ ॥ नामा म्हणे कांहीं होऊं उतराई । पुढें जन्म नाहीं ऐसें केलें ॥ ७ ॥

१२४० दाही दिशा पाहतां दिसती निर्मळ । स्फुरण वक्षःस्थळ होत असे ॥ १ ॥ येईल माझा विठो देईल आलिंगन । जीवें निंबलोण करीन त्यासी ॥ २ ॥ प्रेमपूर भरतें सुखसिंधू लोटली । माउली भेटली जिवलग ॥ ३ ॥ धरूनि हनुवटी सांगेल गुज गोष्टी । पाहील कृपादृष्टी माझें म्हणुनि ॥ ४ ॥ प्रीतीचे पडिभरें कुर्वाळील मज । सांगेन निजगुज संसारींचें ॥ ५ ॥ हर्षे निर्भर नामा निवाला निवाडे । नाचे संतांपुढें सांगेन गुज ॥ ६ ॥

१२४१ काशिये कनोजा द्वारके गुजरु । कानडा विठ्ठल पंढरीये ॥ १ ॥ मायबापें माझी विठ्ठलरुक्मिणी । द्वारकापाटणी माहियेर ॥ २ ॥ पर्वतशिखरीं ब्रीद नारायण । सोयरा सज्जन पंढरीये ॥ ३ ॥ बारसी भगवंत तेरसी तिखया । विठ्ठलु सोयरीया पांडुरंगा ॥ ४ ॥ विटेवरी नीट समचरणी उभा । पुंडलिकाचे लोभा भक्तिलागीं ॥ ५ ॥ विष्णुदास नामा चरणीं उतावेळु । करावा सांभाळु अपत्याचा ॥ ६ ॥

१२४२ स्फुंदत स्फुंदत नामा उभा महाद्वारीं। दृष्टी पायावरी विठोबाच्या ॥ १ ॥ देखोनि केशवें उभारिल्या बाहे। पालवितु आहे पीतांबरें ॥ २ ॥ संसारावरी रुसलासे नामा। दाटलासे प्रेमा ओसंडत ॥ ३ ॥ येई नाम्या तुज धरीन पोटाशीं। कोणें गांजिलासी दुराचारें ॥ ४ ॥ ऐके वो रुक्मिणी अंजारूनि तुम्ही। वोसंगा घेऊनि आळवावा ॥ ५ ॥ जगत्र जननी संभ्रमें करूनि। प्रीतिपान्हा स्तनीं वोसंडला ॥ ६ ॥ वोसरला नामा घेतलासे करीं। मुख पितांबरें पुसीतसे ॥ ७ ॥ कवणें तुझें चित्तीं लावियला चाळा। न देखतां डोळा स्फुंदतसे ॥ ८ ॥ बुझाविला नामा दाटलासे प्रेमा। हांसे सत्यभामा काय झालें ॥ ९ ॥ कोण कुळीं नामा काय लोभ याचा। तूं स्वामी दीनाचा पांडुरंग ॥ १० ॥

१२४३ करुणोचि उत्तरें बोले नामदेव। ऐकोनि पंढरीराव हांसिन्नले ॥ १ ॥ मग हें विवंचना सांगे रखुमाईसी। म्हणे नामयासि आणा वेगी ॥ २ ॥ मग रखुमाई चरणीं ठेवुनि माथा। म्हणे आणाजी समर्था नामयासी ॥ ३ ॥ मग पंढरीराव रखुमाई ज्ञानदेव। पुंडलीक समुदाय चालिलासे ॥ ४ ॥ येऊनि नाम्यापाशीं उभे पै ठाकलें। पुंडलीक बोले नामयासि ॥ ५ ॥ धन्य नामदेवा तुझा एक भाव। सहित पंढरीराव आले येथें ॥ ६ ॥ पीतांबर छाया रूप प्रगट केलें। नामया आलिंगलें पंढरीरायें ॥ ७ ॥ कडे घेऊनि नामा रखुमाई जननी। प्रेमपान्हा वोसंडोनि पाजी तया ॥ ८ ॥ नामयासी घेऊनि आले पंढरीसी। वैकुंठ ओंवरीसी कळस केला ॥ ९ ॥

१२४४ राजमंदिराभितरीं रुक्मिणी सेजेवरी। नामा परसासरी वोळगो आले ॥ १ ॥ नामया देखोनि झडकरी उठली। आड उभी ठेली जाऊनियां ॥ २ ॥ अचळ सारिसा करी शृंग माथावरी। पाहें पां निदसुरी होती कैसी ॥ ३ ॥ मी म्हणे नावेक लागेल वेळ यातें।

तंव अवचितें देखियेलें ॥ ४ ॥ कनक परयेळीं घेउनी आरती करी । ओंवाळिलें हरी नामयासहित ॥ ५ ॥

१२४५ सर्व जीव तूं झालासी आपण । आह्मीं कां पतीत तूं कैसा पावन ॥ १ ॥। मन इंद्रियें तूंची झालासी चाळिता । आमुच्या ठायीं कोणें ठेविली सत्ता ॥ २ ॥ सुवर्णाच्या पोटीं झाला अलंकार । एकी मला वाणिती साचार ॥ ३ ॥ गंगासिंधु मिळणी झाली सहस्र-मुख । ओघ तो उदक अन्य नाहीं ॥ ४ ॥ बीजाचिया पोटीं वटाचा विस्तार । सर्व तो आकार तुझाची असे ॥ ५ ॥ नामा म्हणे सर्व तुझेंचि करणें । उगें खवळून घेऊं नको देणें ॥ ६ ॥

१२४६ आपुल्या सुखाचा देईन मी वांटा । जरी येसी वैकुंठा एक वेळ ॥ १ ॥ आपुलें निजपदीं तुज बैसवीन । उभा मी राहीन मागें पुढें ॥ २ ॥ पितांबर छाया करीन तुजवरी । जीवें क्षणभरी विसंबेना ॥ ३ ॥ अंबऋषी प्रल्हाद रुक्मांगद । त्याह्नि निजपद देईन तुज ॥ ४ ॥ ऐसा धीर नाम्यां होता माझ्या मनीं । परी तूं सर्वांहुनि उदासीन ॥ ५ ॥ नामा म्हणे केशवा नलगे माझ्या चित्तीं । मज आहे विश्रांति तुझ्या नामीं ॥ ६ ॥

१२४७ घेऊनिया नाम्या बैससील किती । पहाशील स्थिति अंतरीची ॥ १ ॥ कांहींच न होसी विचारी मानसीं । चैतन्यतत्वासि शुद्धबुद्ध ॥ २ ॥ क्रियाकर्मकर्ता नव्हेसी सर्वथा । आहे सर्वगता रूप तुझें ॥ ३ ॥ भजतां भजन पूजितातो पूज्य । हेंही काय तुज अति चिंता ॥ ४ ॥ ज्ञाता ज्ञान ज्ञेय ध्याता ध्यान ध्येय । नाथिलें उपाय नाहीं तुज ॥ ५ ॥ नामा म्हणे मज नकळेचि देवा । मज देईं सेवा जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

१२४८ ऐसा नामा बोले आनंदें करोनी । तंव देव विचारून बोलियेले ॥ १ ॥ भला भला नाम्या शहाणा झालासी । कां रे हे न येसी सांग मज ॥ २ ॥ येरू म्हणे देवा अवघेंचि नेश्वर । तूंचि एक सार

पुरे आम्हां ॥ ३॥ अनंत ब्रह्मांडे कोटी वसती रोमरंध्री । त्या चरणाचे अग्रीं वसो आम्ही ॥ ४ ॥ पुंडलिक जाणे त्याचे गुह्य गुज । उमजोन तुज काय सांगो ॥५॥ नामा म्हणे धरूं मुळ सोय चोखडी । ब्रह्मांडा-येवढी नलगे पृथ्वी ॥ ६ ॥

१२४९ जन्ममरणाच्या खुंटती लहरी । वांयां कां येरझारी सीणतोसि ॥ १ ॥ सांगेन तें करीं मन मुळीं आंवरीं । एकांतीं क्षणभरी चल जाऊं ॥ २ ॥ आकारलें तितुकें आहे नाशिवंत । देव आणि भक्त कैंचे तेथे ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवा असो तुझें गुज । तुजवांचोनि मज नकळे कांहीं ॥ ४ ॥

१२५० वतन आमुचीं मिरासी पंढरी । विठोबाचे घरीं नांदणूक ॥ १ ॥ सेवा करूं नित्य नाचूं महाद्वारीं । नामाची उजरी जागऊं तेथें ॥ २ ॥ साधुसंतां शरण जाऊं मनोभावें । प्रसाद स्वभावें देती मज ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे । संतपाय हिरे देती वरू ॥४॥

१२५१ सहज तुझें सुख आहे तुजजवळी । वांयां मृगजळीं बुडों नको ॥ १ ॥ सोय धरीं वेगीं होय पां सावध । अनुभवी आनंद स्वस्वरूपीं ॥ २ ॥ हा जगडंबर पसरला पाल्हाळ । मायामय सकळ स्वप्न सर्व ॥ ३ ॥ शरीरसंपत्तीचा मानसी निर्धार । तों हे क्षणभंगुर सत्य जाण ॥ ४ ॥ आपुले साउली जासी बैसावया । कोण तापलीया निववी तुज ॥ ५ ॥ नामा म्हणे केशवा असो तुझें ज्ञान । देवा तुज-वांचून नकळे कांहीं ॥ ६ ॥

१२५२ महाद्वारीं सुख असें या सुखाचें । लागती संतांचे चरण-रज ॥ १ ॥ म्हणोनिया स्थळ पाहिलें निवांत । झालें चित्त तेथें समाधान ॥ २ ॥ सकळ वैष्णवांसहित वोळवण करा । तुम्हीं हो दातारा मजलागीं ॥ ३ ॥ देव म्हणे नाम्या राहें पक्षभरीं । पुरतील अंतरीं कोड तुझें ॥ ४ ॥

१२५३ भूमी लोळे नामा कंठ सद्गदित। डोळ्या स्त्रवत अश्रुजळ ॥ १ ॥ इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम। नाम्यासी सप्रेमें उचलिलें ॥ २ ॥ नाम्या तुज वाटतसें दुःख। संसाराचा शोक तुज झाला ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा तुज ऐसा दाता। मज भवव्यथा कवणेपरी ॥ ४ ॥

१२५४ स्फुंदस्फुंदोन नामा उभा महाद्वारीं। चित्त पायावरीं विठोबाच्या ॥ १ ॥ उभा दीनानाथ उभारुनी बाहे। पालवीत आहे पीतांबरें ॥ २ ॥ आरता येरे नामया धरिला पोटासीं। कोणें गांजिलासी दुर्जनानें ॥ ३ ॥ अंतरींचें सांग पडे माझ्या मागें। कां करिशी उद्वेग संसारींचे ॥ ४ ॥ नामा म्हणे विठो असें मी नेणता। आठवीं पंढरिनाथा वेळोवेळां ॥ ५ ॥

१२५५ भीत नाहीं भीत नाहीं। अखंडाहि सावध ॥ १ ॥ उघड समाधि उघड समाधि। अंतरबुद्धी निर्मळ ॥ २ ॥ गोंविसी कासया गोंविसी कासया। पंढरीराया सांभाळीं ॥ ३ ॥ नामा म्हणे जगज्जीवना। नारायणा सांभाळीं ॥ ४ ॥

१२५६ सांवळी श्रीमूर्ति हृदयीं बिंबली। तरी पालटली देहबुद्धि ॥ १ ॥ धन्य माझा जन्म धन्य माझा भाव। ध्यानीं केशीराज नांदतसे ॥ २ ॥ आशा तृष्णा कैशा मावळल्या देहीं। बुडोनियां पायीं ठेलें चित्त ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसी विश्रांति पैं झाली। हृदयीं न्याहाळी केशीराज ॥ ४ ॥

१२५७ आषाढी कार्तिकी विसरूं नका मज। सांगतसें गुज पांडुरंग ॥ १ ॥ पतितपावन मी तो आहे खरा। तुमचेनि बरा दिसतसें ॥ २ ॥ तुम्ही जातां गांवा हुरहुर माझे जीवा। भेटेल केधवां मजलागीं ॥ ३ ॥ धांवोनियां देव गळां घाली मिठी। स्फुंदस्फुंदून गोष्टी बोलतसे ॥ ४ ॥ तिहीं त्रिभुवनीं मज नाहीं कोणी। म्हणे चक्रपाणी नामयासी ॥ ५ ॥

१२५८ या भक्तांच्या कैवारें तुज कें वाटला शीण । व्रत आचरतां अंबऋषी झालासे क्षीण ॥ रुक्मांगद प्रल्हादा कष्टविले म्हणून । तो तुज शीण वाटला म्हणोनि राहिलासी मौन ॥ १ ॥ कटिसूत्रावरी कर कांगा तिष्ठसी उभा । शिणलासी पंढरीराया रखुमादेवीवरवल्लभा ॥ २ ॥ शंखासुरानें वेद नेले दिलें ब्रम्हयानें गाऱ्हाणें । जमदग्नीचे पोटीं तुज काई पडिलें धांवणे ॥ वरुषला शिळाधारी जाहलें गोकुळा राखण । तो तुज शीण वाटला झालें उग्रडपण ॥ ३ ॥ ध्रुवउपमन्युनें तुजसवें घेतली आळी । गजेंद्रा आकांत पावलासी वनमाळी ॥ सांडोनि क्षीरसागर आला पुंडलीकाजवळी । कधीं मज संभोगप्रेमें न धरवे उखळीं ॥ ४ ॥ ब्रह्मयानें वत्सें नेलीं गौळियां होऊं नेदी ज्ञान । गोपाळ गाई वत्स इतुका झालासि आपण । सोडविलें नीळकंठा ब्रह्मकपोलापासून ॥ ५ ॥ गयासुर लवणासुर कागासुराचे आश्रमीं । पृथ्वी निष्टंक केली दुखावला श्रीचरणीं ॥ वधुनि हिरण्यकश्यपु जानुवरि धरिला शिरी । तो तुज शीण वाटला म्हणुनि कोमायिला श्रीवदनीं ॥ ६ ॥ काय पूतनेनें विष पाजिलें रसना झाली कडुवट । रिठा रगडिला दाढे फणसेमाजि तिखट ॥ अवंचक जयंतु वामकरें मारिला शकट । रक्षिलें शरणागता पडले कष्टावरी कष्ट ॥ ७ ॥ भिवरातें चंद्रभागा तुझे चरणीं गंगा माय । युगें झाली अठ्ठावीस अजुनि उभा आहे ॥ कटावरी कर ठेवुनि वाट भक्ताची पाहे । नामा म्हणे न बोलसी तुझें केलें स्यां काय ॥ ८ ॥

१२५९ धना जाट घरीं नित्य उभा हरी । एकनाथाघरीं धोतरें धूत ॥१॥ कबीराची पांजणी करी चक्रपाणी । जनीसवें शेणी वेंचूं लागे ॥२॥ चोखल्याचें शेत पेरी श्रीअनंत । नामयासांगातें केशव हरी ॥ ३ ॥ गोऱ्या कुंभाराचीं मडकीं घडी अंगें । चोखामेळ्यासंगें ढोरें ओढी ॥ ४ ॥ रोहिदासाचें कुंड धुतो श्रीगोपाळ । सांवत्याचा मळा खुरपूं

लागे ॥ ५ ॥ नामा म्हणे देव भक्तांचा वल्लभ । मागें पुढें उभा पांडुरंग ॥ ६ ॥

१२६० पांडवभाग्याची वर्णावया थोरी । शेषाची वैखरी न वर्णवे ॥ १ ॥ पीतांबर कास घालुनि वनमाळी । काढी उष्टावळी आवडीनें ॥ २ ॥ विधीचा जनक रमा ज्याची दासी । ध्यान अहर्निशीं करी शिव ॥ ३ ॥ रोमीं जयाचे ब्रह्मांडें अनंत । चारी वेदां अंत न कळे ज्याचा ॥ ४ ॥ नामा म्हणे राबे भक्तांचिये घरीं । भाव देखोनि हरी भुलतसे ॥ ५ ॥

१२६१ देवा पांडुरंगा वासुदेवा हरी । गोविंदा मुरारी नारायणा ॥१॥ नारायणा कृष्णा कमललोचना । माधवा प्रद्युम्ना रावणारी ॥२॥ रावणारी होसी जानकी टाकूनी । हिंडसी अंगणीं अर्जुनाच्या ॥ ३ ॥ अर्जुनाच्या घरीं अंगें घोडे धुसी । लज्जा द्रौपदीची राखियेली ॥ ४॥ राखशील द्वार बळी भक्तिवंता । नामा म्हणे आतां काय सांगूं ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

१२६२ झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपाणी ॥ १ ॥ पाटी घेऊनियां शिरीं । नेऊनियां टाकी दुरी ॥ २॥ ऐसा भक्तिसी भुलला । नीच कामें करूं लागला ॥ ३ ॥ जनी म्हणे विठोबाला । काय उतराई होऊं तुला ॥ ४ ॥

१२६३ पूर्वी काय तप नेणें पैं हो केलें । निधान जोडिलें पंढरीचें ॥ १ ॥ येऊनियां देव दळूं लागे अंगें । रखुमाईचा संग दूर केला ॥ २ ॥ तैसाचि पैं संगें येऊनि बाहेरी । वेचोनियां भरी शेणी अंगें ॥ ३ ॥ ओझें झालें म्हणूनि पाठी पितांबरी । घेऊनियां घरीं आणितसे ॥ ४ ॥ ऐसें जेथें काम करी चक्रपाणी । तेथें कैची जनी नामयाची ॥ ५ ॥

१२६४ एकटी तूं गाणें गासी । दुजा शब्द उमटे पाशी ॥ १ ॥ कोण गे तुझ्याबरोबरी । गाणें गाती निरंतरी ॥ २ ॥ पांडुरंग माझा

पिता । रखुमाई झाली माता ॥ ३ ॥ ऐशियाच्या घरीं आले । जनी म्हणे धन्य झालें ॥ ४ ॥

१२६५ जनी डोईनें गांजली । विठाबाई धांवियेली ॥ १ ॥ देव हातें बुचडा सोडी । उवा मारीतसे तांतडी ॥ २ ॥ केश विंचरूनी मोकळे केले । जनी म्हणे निर्मळ झालें ॥ ३ ॥

१२६६ जनी बैसली न्हायाला । पाणी नाहीं विसणाला ॥ १ ॥ घागर घेऊनि पाण्या गेली । मागें मागें धांव घाली ॥ २ ॥ घागर घेऊनियां हातीं । पाणी रांजणांत ओती ॥ ३ ॥ ऐशा येरझाऱ्या केल्या । रांजण घागरीं भरिल्या ॥ ४ ॥ पाणी पुरे पांडुरंगा । दासी जनीच्या अंतरंगा ॥ ५ ॥

१२६७ एके दिवशीं न्हावयास । पाणी नव्हते विसणास ॥ १ ॥ देव धांवोनियां आले । शीतळ उदक घे घे बोले ॥ २ ॥ आपुल्या हातें विसणी । घाली जनीच्या डोयीं पाणी ॥ ३ ॥ माझ्या डोईच्या केसांस । न्हाणें नव्हते फार दिवस ॥ ४ ॥ तेणें मुरडी केशांस । कां ह्मणे उगीच बैस ॥ ५ ॥ आपुल्या हातें वेणी घाली । जनी ह्मणे माय झाली ॥ ६ ॥

१२६८ तुळशीचें वनीं । जनी उकलीत वेणी ॥ १ ॥ हातीं घेऊनियां लोणी । डोई चोळी चक्रपाणी ॥ २ ॥ माझे जनीला नाहीं कोणी । म्हणुनी देव घाली पाणी ॥ ३ ॥ जनी सांगे सर्व लोकां । न्हाऊं घाली माझा सखा ॥ ४ ॥

१२६९ साळी सडायास काढी । पुढें जाउनी उखळी झाडी ॥ १ ॥ कांडितां कांडितां । शीण आला पंढरीनाथा ॥ २ ॥ सर्व अंगीं घाम आला । तेणें पितांबर भिजला ॥ ३ ॥ पायीं पैंजण हातीं कडीं । कोंडा पांखडुनि काढी ॥ ४ ॥ हाता आला असे फोड । जनी म्हणे मुसळ सोड ॥ ५ ॥

१२७० ज्याचा सखा हरी । त्यावरी विश्व कृपा करी ॥ १ ॥ उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघाताचें ॥ २ ॥ तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥ आंगा आपुले ओढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥ ४ ॥ ऐसा अंकित भक्तांसी । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

१२७१ पक्षी जाय दिगंतरा । बाळकांसी आणी चारा ॥ १ ॥ घार हिंडते आकाशीं । झांप घाली पिल्लांपासी ॥ २ ॥ माता गुंतली कामासी । चित्त तिचें बाळापाशीं ॥ ३ ॥ वानर हिंडे झाडावरी । पिलीं बांधुनी उदरीं ॥ ४ ॥ तैसी आम्हासी विठ्ठल माये । जनी वेळोवेळां पाहे ॥ ५ ॥

१२७२ भक्त जें जें कर्म करिती । तें तूं होसी कृपामूर्ती ॥ १ ॥ हें तो नवल नव्हे देवा । भुललासी भक्तिभावा ॥ २ ॥ वाग्दोर धरूनी दांतीं । चारी घोडे चहूं हातीं ॥ ३ ॥ धूर्ता लाज नाहीं तुला । दासी जनी म्हणे भला ॥ ४ ॥

१२७३ देव भावाचा लंपट । सोडुनी आला हो वैकुंठ ॥ १ ॥ पुंडलिकापुढें उभा । समचरणांवरी शोभा ॥ २ ॥ हातीं चक्र पायीं वांकी । मुख भक्ताचें अवलोकी ॥ ३ ॥ उभा बैसे न सर्वथा । पाहे कोडें भक्तकथा ॥ ४ ॥ सर्व सुखाचा सागर । जनी म्हणे शारंगधर ॥ ५ ॥

१२७४ दुःशासन द्रौपदीसी । घेउनी आला तो सभेसी ॥ १ ॥ दुर्योधन आज्ञा करी । नग्न करावी सुंदरी ॥ २ ॥ आतां उपाय कृष्णा काय । धांवे माझे विठ्ठल माय ॥ ३ ॥ निरी ओढितां दुर्जन । झालें आणिक निर्माण ॥ ४ ॥ ऐसीं असंख्य फेडिलीं । देवीं तितुकीं पुरविलीं ॥ ५ ॥ तया संतां राखिलें कैसें । जनी मनीं प्रेमें हांसे ॥ ६ ॥

१२७५ ब्राह्मणाचें पोर । मागे दूध रडे फार ॥ १ ॥ माता म्हणे बालकासी । दूध मागें देवापाशीं ॥ २ ॥ क्षिराब्धीची वाटी । म्हणे जनी लावी ओठीं ॥ ३ ॥

१२७६ पंढरीच्या राया । माझी विनवणी पायां ॥ १ ॥ काय वर्णूं हरीच्या गोष्टी । अनंत ब्रह्मांडे याचे पोटीं ॥ २ ॥ सेना न्हावी याचे घरीं । अखंड रावे विठ्ठल हरी ॥ ३ ॥ राम चिंता ध्यानीं मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१२७७ भिल्लणीची फळें कैशीं । चाखोनी वाहातसे देवासी ॥ १ ॥ भावें तिचीं अंगिकारी । सर्वांहुनी कृपा करी ॥ २ ॥ गुज वान्नरासी पुसावें । राक्षसांतें हो जिंकावें ॥ ३ ॥ वान्नर अवघे. भुभुःकार । बोल-ताती रामासमोर ॥ ४ ॥ आज्ञा करावी आम्हांसी । रावण आणितों तुम्हांपासीं ॥ ५ ॥ तुझ्या नामाच्या प्रतापें । हनुमंत गेला जी संतापें ॥ ६ ॥ सीताशुद्धि करुनी आला । दासी जनीस आनंद झाला ॥ ७ ॥

१२७८ यातीहीन चोखामेळा । त्यासी भक्तांचा कळवळा ॥ १ ॥ त्याचा झाला म्हणीयारा । राहे घरीं घरीं थारा ॥ २ ॥ देह बाटविला त्याणें । हांसे जनी गाय गाणें ॥ ३ ॥

१२७९ चोखामेळा संत भला । तेणें देव भुलवीला ॥ १ ॥ भक्ति आहे ज्याची मोठी । त्याला पावतो संकटीं ॥ २ ॥ चोख्यामेळ्याची करणी । तेणें देव केला ऋणी ॥ ३ ॥ लागा विठ्ठल चरणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१२८० माळियाचा लेक झाला । सेखी कुर्म्यालागीं गेला ॥ १ ॥ चांभाऱ्यानें जानव्यासी । काढोन दाविलें भटांसी ॥ २ ॥ तुरका घरीं विणी । म्हणे नामयाची जनी ॥ ३ ॥

१२८१ माझा लोभ नाहीं देवा । तुझी करीं ना मी सेवा ॥ १ ॥ नाहीं अंगीं थोरपण । मिथ्या धरिसी गुमान ॥ २ ॥ रागा येऊनि

काय करिसी । तुझें बळ आम्हांपासीं ॥ ३ ॥ नाहीं सामर्थ्य तुज हरी । जनी म्हणे धरिला चोरीं ॥ ४ ॥

१२८२ द्रौपदीकारण । पाठीराखा नारायण ॥ १ ॥ गोरा कुंभाराच्या संग । चिखल तुडवूं लागे अंगें ॥ २ ॥ कबिराच्या बैसोनि पाठीं । शेले विणितां सांगे गोष्टी ॥ ३ ॥ चोखामेळ्यासाठीं । ढोरें ओढी जगजेठी ॥ ४ ॥ जनीसंगें दळूं लागे । सुरवर म्हणती धन्य भाग्यें ॥ ५ ॥

१२८३ देव भक्तांचा अंकित । कामें त्याची सदा करित ॥ १ ॥ त्याचें पडों नेदी उणे । होय रक्षिता आपण ॥ २ ॥ जनी म्हणे भक्तिभाव । देवदास ऐक्य जीव ॥ ३ ॥

१२८४ जेवीं जेवीं बा मुरारी । तुज वाढिली शिदोरी ॥ १ ॥ कनकाचें ताटीं । रत्नजडित ठेविली वाटी ॥ २ ॥ आमुचें ब्रह्म सारंगपाणीं । हिंडतसे रानोरानीं ॥ ३ ॥ गोपाळांचे मेळीं । हरि खेळे चेंडूफळी ॥ ४ ॥ तुळसीचे वनीं । उभी राहे दासी जनी ॥ ५ ॥

१२८५ जनी म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवींच्या जीवलगा । विनवितें सांगा । महिमा साधुसंतांचा ॥ १ ॥ कैसी वसविली पंढरी । काय महिमा भीमातीरीं । पुंडलिकाच्या द्वारीं । कां उभा राहिलासी ॥ २ ॥ कैसा आला हा गोविंद । कैसा झाला वेणुनाद । येउनी नारद । कां राहिला ॥ ३ ॥ कृपा करा नारायणा । सांगा अंतरींच्या खुणा । येऊं दे करुणा । दासी जनी विनवितसे ॥ ४ ॥

१२८६ दुर्योधना मारी । पांडवासी रक्षी हरी ॥ १ ॥ पांडव वनवासी जाये । तयापाठीं देव आहे ॥ २ ॥ उणें न पडे तयांचें । काम पुरवी हो मनाचे ॥ ३ ॥ जनी म्हणे विदुराच्या । कण्या भक्षी हो प्रीतीच्या ॥ ४ ॥

१२८७ भक्तीसाठीं याति नाहीं । नाहीं तयासी ते सोई ॥ १ ॥ रोहिदास तो चांभार । त्याचा करी कारभार ॥ २ ॥ जो कां भक्त याति-

हीन । देव करी त्याचा मान ॥ ३ ॥ त्यासी भक्ताचा आधार । वाट पाहे निरंतर ॥ ४ ॥ जनी म्हणे भक्तासाठीं । विठो सदा गोण्या लोटी ॥ ५ ॥

१२८८ चोखामेळा अनामिक । भक्तराज तोचि एक ॥ १ ॥ परब्रह्म त्याचे घरीं । न सांगतां काम करी ॥ २ ॥ रोहिदास तो चांभार । पाहे मोमिन कबीर ॥ ३ ॥ नेमी जनी नीच दासी । रंगीं वेढी नागरापिशी ॥ ४ ॥

१२८९ देव तारक तारक । देव दुष्टांसी मारक ॥ १ ॥ गीतेमध्यें आदिअंत । ऐसें बोले तो भगवंत ॥ २ ॥ शत्रुलागीं आधीं मारी । भक्त संकटीं रक्षी हरी ॥ ३ ॥ जनी म्हणे कृपा करी । भाव पाहोन अंतरीं ॥ ४ ॥

१२९० अहो द्रौपदीच्या बंधू । तारक देवा कृपासिंधू ॥ १ ॥ पांचाळीसी वस्त्रें देत । पुरवितो जगन्नाथ ॥ २ ॥ जनी म्हणे भाग्यवंत । तिच्या भावाचा अंकित ॥ ३ ॥

१२९१ खांदी ऋषि तो चालिला । बळीनें द्वारपाळ केला ॥ १ ॥ ऐसा भक्ताआधीन होसी । त्याच्या वचनीं वर्तसी ॥ २ ॥ कष्टी होतां अंबऋषी । त्याचे गर्भवास सोसी ॥ ३ ॥ सर्व दुःखासी साहिलें । जनी म्हणे दळण केलें ॥ ४ ॥

१२९२ ऐशापरी पांडवांतें । रक्षियेलें दीनानाथें ॥ १ ॥ शंखचक्र आयुधें करीं । छाया पितांबरे करी ॥ २ ॥ हस्त ठेऊनियां माथां । सुखी असा निर्भयचित्ता ॥ ३ ॥ आज्ञा घेउनी सर्वांची । देव गेले द्वारकेसी ॥ ४ ॥ सरला थालिपाक आतां । पुढें सावधान श्रोता ॥ ५ ॥ कथा पुढील गहन । घोषयात्रा निरूपण ॥ ६ ॥ येथुनी अध्याय कळस । जनी म्हणे झाला रस ॥ ७ ॥

१२९३ कोणे एके दिवशीं । विठो गेला जनीपाशीं ॥ १ ॥ हळूच मागतो खायासी । काय देऊं बा मी तुसी ॥ २ ॥ हातीं धरून नेला

आंत । वाढी पंचामृत भात ॥ ३ ॥ प्रेमसुखाचा ढेकर दिला । जनी म्हणे विठो धाला ॥ ४ ॥

१२९४ एके दिवशीं वाडियांत । देव आले अवचित ॥ १ ॥ अवघीं पायांस लागली । देवें त्यांवरी कृपा केली ॥ २ ॥ बाहेर कामासी गुंतल्यें । देवें मजला विचारिलें ॥ ३ ॥ बाहेर आहेस बो बोलती । देव मजला हाटाकिती ॥ ४ ॥ हात धुऊनि जवळ गेल्यें । कोण गे जनी हांसून बोले ॥ ५ ॥

१२९५ दळण्याच्या मिषें । विठ्ठल सावकाशें ॥ १ ॥ देहबुद्धीचें वैरण । द्वैत खडा रे निसून ॥ २ ॥ एकलीच गातां । दुजा साद उमटतां ॥ ३ ॥ कोण तुझे बरोबरी । साद देतो निरंतरीं ॥ ४ ॥ खूण कळली नामदेवा । विठ्ठल श्रोता जनीच्या भावा ॥ ५ ॥

१२९६ मग हांसोनि सकळी । पाहूं देव कैसा बळी ॥ १ ॥ आले नामदेवा घरीं । प्रेमें भुललासे हरी ॥ २ ॥ घाली जातिया वैरण । गाय आवडीचें गाण ॥ ३ ॥ पुढें देखे ज्ञानेश्वरा । देव झालासे घाबरा ॥ ४ ॥ जनी म्हणे पंढरीनाथा । जाय राउळासी आतां ॥ ५ ॥

१२९७ निवृत्ति पुसत । कोठें होते पंढरिनाथ ॥ १ ॥ खूण कळली हृषिकेशीं । सांगो नको निवृत्तीसी ॥ २ ॥ उत्तर दिलें ज्ञानदेवें । नवल केवढें सांगावें ॥ ३ ॥ शिव वंदी पायवणी । नये योगियांचे ध्यानीं ॥ ४ ॥ द्वारीं उभे ब्रह्मादिक । गुण गाती सकळिक ॥ ५ ॥ जनीसवें दळी देव । तिचा देखोनियां भाव ॥ ६ ॥

१२९८ काकड आरती । करावया कमळापती ॥ १ ॥ भक्त मिळाले सकळ । रितें देखिलें देऊळ ॥ २ ॥ ज्ञानेश्वर बोले । आतां देव कोठें गेलें ॥ ३ ॥ ठावें जाहलें अंतरीं । देव दळी जनी घरीं ॥ ४ ॥

१२९९ जाय जाय राउळासी । नको येऊं आम्हांपाशीं ॥ १ ॥ जाऊं आम्ही बरोबर । झाला तिचा हो चाकर ॥ २ ॥ तिजसंगें

काम करी । ऐसे जाणा देव हरी ॥ ३ ॥ चहूं हातीं धुणें केलें । जनी म्हणे बरें झालें ॥ ४ ॥

१३०० आतां पुरे हा संसार । कोठें फेडूं उपकार ॥ १ ॥ सांडुनियां थोरपण । करी दळण कांडण ॥ २ ॥ नारिरूप होउनी हरी । माझें न्हाणें धुणें करी ॥ ३ ॥ राना जाये वेंची शेणी । शेखी वाहे घरीं पाणी ॥ ४ ॥ ठाव मागें पायापाशीं । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

१३०१ धुणें घेऊनि कांखेसी । जनी गेली उपवासी ॥ १ ॥ मागें विठ्ठल धांवला । म्हणे कां टाकिलें मला ॥ २ ॥ कां गा धांवोनि आलासी । जाय जाय राउळासी ॥ ३ ॥ चहूं हातें धुणे केलें । जनी म्हणे बरें झालें ॥ ४ ॥

१३०२ जनी जाय शेणासाठीं । उभा आहे तिच्या पाठीं ॥ १ ॥ पितांबराची कांस खोवी । मागें चाले जनाबाई ॥ २ ॥ गौऱ्या वेंचूनि बांधिली मोट । जनी म्हणे द्यावी गांठ ॥ ३ ॥ मोट उचलून डोईवर घेई । मागें चाले जनाबाई ॥ ४ ॥

१३०३ राना गेली शेणीसाठीं । वेंचू लागे विठो पाठीं ॥ १ ॥ पितांबर ओचे खोंवी । पायीं शोभा पारखावी ॥ २ ॥ रितीं बांधिताचि मोट । जनी म्हणे द्यावी भेट ॥ ३ ॥

१३०४ जनीचिया बोलें करी नित्य काम । वसवी तिचें धाम लक्ष्मीसी ॥ १ ॥ जनीचिया गोष्टी प्रेम ज्याचें मनीं । तयाचें चरणीं ओढवी माथा ॥ २ ॥ महेशादि देव तेहि तया ध्याती । जे आवडे गाती जनी ध्याती ॥ ३ ॥

१३०५ आई मेली बाप मेला । मज सांभाळी विठ्ठला ॥ १ ॥ हरी रे मज कोणी नाहीं । माझी खात असे डोई ॥ २ ॥ विठ्ठल म्हणे रुक्मिणी । माझे जनीला नाहीं कोणी ॥ ३ ॥ हातीं घेउनी तेलफणी । केंस विंचरून घाली वेणी ॥ ४ ॥ वेणी घालुन दिधली गांठ । जनी

म्हणे चोळबा पाठ ॥ ५ ॥ जनी म्हणे बा गोपाळा । करी दुबळीचा सोहळा ॥ ६ ॥

१३०६ एक प्रहर रात्र झाली । फेरी विठ्ठलाची आली ॥ १ ॥ नामा म्हणे जनी पाहे । द्वारीं उभा कोण आहे ॥ २ ॥ प्रभा घरांत दाटली । एक सराद सुटली ॥ ३ ॥ एकमेकां आलिंगन । नामा म्हणे जनो धन्य ॥ ४ ॥

१३०७ जनी जाय पाणीयासी । मागें धांवे हृषिकेशी ॥ १ ॥ पाय भिजों नेदी हात । माथां घागरी वहात ॥ २ ॥ पाणी रांजणांत भरी । सडासारवण करी ॥ ३ ॥ धुणें धुऊनियां आणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१३०८ माझा नामा मज देईं । जीव देईन तुझे पायीं ॥ १ ॥ पुंडलिका भुलविलें । तैसें माझिया बाळा केलें ॥ २ ॥ तें गा न चले मजपाशीं । दे गा माझ्या नामयासी ॥ ३ ॥ तुझ्यासंगें जे जे गेले । ते त्वां जितेचि मारिले ॥ ४ ॥ विठ्ठल म्हणे गोणाबाई । नामा तुझा घेवोनियां जाई ॥ ५ ॥ हातीं धरोनियां आली । दासी जनी आनंदली ॥ ६ ॥

१३०९ लोलो लागला अंबेचा । विठाबाई आनंदीचा ॥ १ ॥ आदि ठाणें पंढरपूर । नांदे कान्हाई सुंदर ॥ २ ॥ गोणाईनें नवस केला । देवा पुत्र देईं मला ॥ ३ ॥ शुद्ध देखोनियां भाव । पोटीं आले नामदेव ॥ ४ ॥ दामाशेटी हरुषला । दासी जनीस आनंद झाला ॥ ५ ॥

१३१० नामदेवा पुत्र झाला । विठो बारशासी आला ॥ १ ॥ आंगडें टोपडें पेहरण । शेला मुंडासा घेऊन ॥ २ ॥ माझ्या जीवीच्या जीवना । नाम ठेवी नारायणा ॥ ३ ॥ जनी म्हणे पांडुरंगा । नांव काय ठेऊं सांगा ॥ ४ ॥

१३११ हाटीं जायाचि तांतडी । नामा होता पैलथडी ॥ १ ॥ म्हणे

जागे आणा त्यासी । नाहीं तरी मी उपवासी ॥ २ ॥ जनी धांवत चालली । मागें विठ्ठल माउली ॥ ३ ॥

१३१२ पुंडलिकापाशीं । नामा उभा कीर्तनासी ॥ १ ॥ येऊनियां पांडुरंगें । स्वयें टाळ धरी अंगें ॥ २ ॥ गाऊं लागे बरोबरी । नाहीं बोलायाची उरी ॥ ३ ॥ स्वर देवाचा उमटला । दासी जनीनें ओळखिला ॥ ४ ॥

१३१३ राधा आणि मुरारी । क्रीडा कुंजवनीं करी ॥ १ ॥ राधा डुल्लत डुल्लत । आली निजभुवनांत ॥ २ ॥ सुमनाचे सेजेवरी । राधा आणि तो मुरारी ॥ ३ ॥ आवडीनें विडे देत । दासी जनी उभी तेथ ॥ ४ ॥

१३१४ जिव्हा लागली नामस्मरणीं । रित्या मापें भरी गोणी ॥१॥ नित्यनेमाची लाखोली । गुण आज्ञेनें मी पाळी ॥ २ ॥ मज भरंवसा नामाचा । गजर नामाच्या दासीचा ॥ ३ ॥ विटेवरी ब्रह्म दिसे । जनी त्याला पाहतसे ॥ ४ ॥

१३१५ एके रात्रीचे समयीं । देव आले लवलाहीं ॥ १ ॥ सुखशेजे पहुडले । जनीसवें गुज बोले ॥२॥ गुज बोलतां बोलतां । निद्रा आली अवचिता ॥ ३ ॥ उठा उठा चक्रपाणी । उजाडलें म्हणे जनी ॥ ४ ॥

१३१६ पदक माळा सकलाद । तेथें टाकिलीं गोविंदें ॥ १ ॥ देव तांतडी निघाले । वाकळ घेउनी पळाले ॥ २ ॥ भक्त येती महाद्वारीं । चोर पडले देव्हारीं ॥ ३ ॥ नवल झालें पंढरपुरीं । देव राबे दासी घरीं ॥ ४ ॥ त्रिभुवनांत मात गेली । दासी जनी प्रगटली ॥ ५ ॥

१३१७ प्रेमभावें तुम्हीं नाचा । रामरंगें रंगो वाचा ॥ १ ॥ हेंचि मागों देवाजीला । आवडी शांती खरें बोला ॥ २ ॥ जैसी माय तान्हयातें । खेळउनी चुंबी त्यातें ॥ ३ ॥ तैंवि तुम्ही संतजना । सर्वी धरावी भावना ॥ ४ ॥ हरि कोठवळा झाला । म्हणे जनी भक्तीं केला ॥ ५ ॥

१३१८ अर्थ जे काढिती उपनिषदांमाजी । सांडोनियां गोड भाजी घेती माठ ॥ १ ॥ भूगोलाचा स्वामी सुप्रसन्न झाला । त्यासी मागे गोळा भाजीचा तो ॥ २ ॥ पुंडलिकें धन जोडिलें असतां । प्रार्थोनियां देतां न घेती हे ॥ ३ ॥ मग गडी हो पाहे देवाचि येथोनीं । जवळी होती जनी फावलें तिये ॥ ४ ॥

१३१९ वेदांतीं हें बोलिले । सिद्धांतीं हें नेमियेलें ॥ १ ॥ लागा लागा भक्तिवाटा । धरा हेंचि नेमनिष्ठा ॥ २ ॥ वेदबाह्य तें कर्म । सांडीं न करीं अधर्म ॥ ३ ॥ तोचि एक होय ज्ञानी । देवनिष्ठ म्हणे जनी ॥ ४ ॥

१३२० जनीचें बोलणें वाची नित्य कोणी । तयाचे आंगणीं तिष्ठतसे ॥ १ ॥ जनीचिया पदां अखंडित गाये । तयाचे मी पाये वंदी माथां ॥ २ ॥ जनीचें आवडे जयासी वचन । तयासी नारायण कृपा करी ॥ ३ ॥ पांडुरंग म्हणे एक ज्ञानदेवा । ऐसा वर द्यावा जनीसाठीं ॥ ४ ॥

१३२१ जन्म खातां उष्टावळी । सदा राखी चंद्रावळी ॥ १ ॥ राही-रुक्मिणीचा कांत । भक्तिसाठीं कण्या खात ॥ २ ॥ देव भुलले पांडुरंग । ऐसा जाणावा श्रीरंग ॥ ३ ॥ जनी म्हणे देवराज । करी भक्ताचें हो काज ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज.

१३२२ जीं जीं भक्त बोलती वचनें । तीं तीं प्रमाण करणें देवा ॥ १ ॥ याजसाठीं अवतार । धरी मत्स्य कांसव सुकर ॥ २ ॥ भक्तवचना उणेपण । येऊं नेदी जाण निर्धार ॥ ३ ॥ स्वयें गर्भवास सोशी । अंबऋषिकारणें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ब्रीद साचा । वागवी भक्ताचा अभिमान ॥ ५ ॥

१३२३ भक्तालागीं अणुमात्र व्यथा । ते न साहवे भगवंता ॥ १ ॥ करूनी सर्वांगाचा वोढा । निवारीतसे भक्तपीडा ॥ २ ॥ होउनी भक्ताचा अंकितु । सारथीपणे तो करीतु ॥ ३ ॥ प्रल्हादासी दुःख

मोठें । होतांची काष्टीं प्रगटे ॥ ४ ॥ ऐसा अंकित चक्रपाणी । एका शरण जनार्दनी ॥ ५ ॥

१३२४ भक्तपणा सान नव्हेरे भाई । भक्ताचे पाय देवाचे हृदयीं ॥ १ ॥ भक्त तोचि देव भक्त तोचि देव । जाणती हा भाव अनुभवी ॥ २ ॥ दान सर्वस्वें उदार बळी । त्याचे द्वार राखे रुदा वनमाळी ॥ ३ ॥ एकाजनार्दनी मिती नाहीं भावा । देवाचि करितो भक्ताची सेवा ॥ ४ ॥

१३२५ मिठी घालूनियां भक्तां । म्हणे शिणलेती आतां ॥ १ ॥ धावे चुरावया चरण । ऐसा लाघवी आपण ॥ २ ॥ योगियासीं भेटी नाहीं । तो आवडीनें कवळी बाही ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भोळा । भक्तां आलिंगी सांवळा ॥ ४ ॥

१३२६ अष्टांगयोग साधिती साधनीं । तो हरिकीर्तनीं नाचे बापा ॥ १ ॥ यज्ञादिकीं अवदान नेघे वो माये । तो उभा राहुनि क्षिरापती खाये ॥ २ ॥ पवन कोंडोनि योगी जाती निराकारीं । तो हरी घर्माघरीं पाणी वाहे ॥ ३ ॥ सनकसनंदन जया ध्याताती आवडी । तो अर्जुनाचीं घोडीं धुतो हरी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भक्तांचा अंकीत । म्हणोनि तिष्ठत विटेवरी ॥ ५ ॥

१३२७ देवासी आवडे भक्तसमागम । त्याचें सर्व काम करी अंगें ॥ १ ॥ भक्तकाजालागीं अवतार धरी । नांदे भक्तांघरीं स्वयें देव ॥ २ ॥ भक्तांविण देवा कांहींचि नावडे । भक्त तो आवडे सर्वकाळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्तांचा अंकित । देव सदोदित स्वयें होत ॥ ४ ॥

१३२८ नातुडे जो योगी ध्याना । तो समचरणा पंढरीये ॥ १ ॥ भोळा सुलभ भाविकांसी । दर्शनें सर्वांसी सारखा ॥ २ ॥ अभेदाच्या न धांवे मागें । भाविकां लागे पाठोपाठीं ॥ ३ ॥ शुद्ध देखतांचि भाव । एकाजनार्दनीं उभा देव ॥ ४ ॥

१३२९ उदार देव उदार देव । नाशी भेव भक्तांचें ॥ १ ॥ प्रल्हादाचे निवारी घात । राखिला जळांत अग्नीसी ॥ २ ॥ पांडवांचे करी काम । निवारी दुर्गम स्वअंगें ॥ ३ ॥ गौळियांचीं गुरें राखी । आपण शेखीं एकला ॥ ४ ॥ येतां शरण एकपणें । एकाजनार्दनीं ऐसें देणें ॥ ५ ॥

१३३० दयाळु उदार पंढरीराव । भाकितां कींव पुरवी इच्छा ॥ १ ॥ ऐसा याचा अनुभव । आहे ठाव मागोनियां ॥ २ ॥ जे जे होती शरणांगत । पुरवी आर्त तयांचे ॥ ३ ॥ उपमन्यु ध्रुव बाळ । दिधलें अढळपद त्यातें ॥ ४ ॥ पुराणीं तो व्यासें बहु । वर्णिले दावूं कासया ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं एकचि भाव । तेणें देव तुष्टत ॥ ६ ॥

१३३१ खुर्पु लागे सांवत्यासी । न पाहे यातीसी कारण ॥ १ ॥ घडी मडकें कुंभाराचें । चोख्यामेळ्याचें ढोरें वोढी ॥ २ ॥ सजन-कसायाचें विकी मांस । दामाजीचा दास स्वयें होय ॥ ३ ॥ एका जनार्दनीं जनीसंगें । दळूं कांडू लागे आपण ॥ ४ ॥

१३३२ देखावया भक्तपण । रूप धरिलें सगुण ॥ १ ॥ तो हा पंढरीचा राणा । वेदा अनुमाना नये तो ॥ २ ॥ भाविकांचे पाठी-मागें । धांवे लागें लवलाहीं ॥ ३ ॥ खाये तुळशीपत्र पान । न म्हणे सान थोडें तें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं हरि । आपुली थोरी विसरे ॥ ५ ॥

१३३३ दहा अवतार घेत भक्तांचिया काजा । तो हा विटेवरी राजा पंढरीचा ॥ १ ॥ भक्तांचें उणें न पाहे आपण । उच्छिष्ट काढी धर्माघरीं न लाजे जाण ॥ २ ॥ अर्जुनाची घोडीं रणांगणीं धुतलीं । भक्ता नये उणे कृपेची माउली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्तांचिया काजा । विटेवरी उभा राहिला सहजा ॥ ४ ॥

१३३४ एकपणें एकला दिसे । उभा असे विटेवरी ॥ १ ॥ नेणती

यासाठीं लहान । होय आपण स्वइच्छें ॥ २ ॥ जाणतांचे लागे चाड । न धरी भीड तयाची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । भवमोचन तारक ॥ ४ ॥

१३३५ ज्याची प्रतिज्ञा निर्धारीं । देवा हरी आणियेलें ॥ १ ॥ तो हा शांतनूचा रावो । भीष्म देवो संग्रामीं ॥ २ ॥ शस्त्र न धरी ऐसा बोल । साचा केला संग्रामीं ॥ ३ ॥ विकळ पडतांचि अर्जुन । धरिलें सुदर्शन हस्तकीं ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कळवळा । एकाजनार्दनीं पाळी लळा ॥ ५ ॥

१३३६ कासया साधन तपाचिया हावा । पाचारितां धांवा येतो लवलाही ॥ १ ॥ ऐसा अंकिला धांवे वचनासाठीं । पहा जगजेठी भक्तकाजा ॥ २ ॥ संकटीं पडली गजानकामिठी । धांवे उठाउठी त्रीदासाठीं ॥ ३ ॥ अळीकर धोंकुट ध्रुव वैसे वनीं । तयासी तत्क्षणीं अढळ केले ॥ ४ ॥ पडतां संकट द्रौपदी करी धांवा । धांवे लवलाह्या सारुनी ताट ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भक्तकाज कैवारी । धांवे सत्वरीं आपुल्या लाजा ॥ ६ ॥

१३३७ ज्ञानराजासाठीं स्वयें भिंत वोढी । विसरुनी प्रौढी थोरपण ॥ १ ॥ तो हा महाराज चंद्रभागे तीरीं । कट धरुनी करीं तिष्ठतसे ॥ २ ॥ नामदेवासाठीं जेवी दहींभात । न पाहे उचित आन दुजें ॥ ३ ॥ गोरियाचें घरीं स्वयें मडकीं घडी । चोखियाचीं वोढी गुरें ढोरें ॥ ४ ॥ सांवत्या माळ्यासी खुरपूं लागे अंगें । कबीराचे मागें शेले विणी ॥ ५ ॥ रोहिदासासवें चर्म रंगूं लागे । सजण कसायाचें अंगें मांस विकी ॥ ६ ॥ नरहरी सोनारा घडूं फुंकूं लागे । दामाजीचा वेगें पाडेवार ॥ ७ ॥ जनाबाईसाठीं वेंचितसे शेणी । एकाजनार्दनीं धन्य महिमा ॥ ८ ॥

१३३८ मानी भक्तांचे उपकार । धरी गौळयाघरीं अवतार ॥ १ ॥ प्रेमें नाना छंदें नाचे । उणें पडों नेदी साचे ॥ २ ॥ अंगें धांव घाली ।

ऐशी कृपेची माऊली ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साचा । देव अंकित भक्तांचा ॥ ४ ॥

१३३९ वत्साचिये लळे जैसी । धेनू अपैशी येत घरां ॥ १ ॥ तैसा भक्तांघरीं नारायण । धांवे आपण वोढीनें ॥ २ ॥ मुंगियांच्या घरा मूळ । धाडी समूळ कोण तो ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देव । घेत धांव आपणचि ॥ ४ ॥

१३४० चातकाची तहान किती । तृप्ति करूनि निववी क्षिती ॥ १ ॥ धेनु वत्सातें वोरसे । घरीं दुभतें पुरवी जैसें ॥ २ ॥ पक्वान्न सेवूं नेणती बाळें । माता मुखीं घाली वळें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं बोले । एकपण माझें नेलें ॥ ४ ॥

१३४१ भक्त अर्पितां सुमनमाळा । घाली आवडीनें गळां ॥ १ ॥ ऐसा आवडीचा भुकाळू । श्रीविठ्ठलु दीनदयाळु ॥ २ ॥ भक्त भावार्थें अर्पितां । ते आवडे पंढरीनाथा ॥ ३ ॥ भक्तासाठीं विटेवर । समपद कटीं कर ॥ ४ ॥ ऐशी कृपेची कोंवळी । एकाजनार्दनीं माउली ॥ ५ ॥

१३४२ भक्तदरुशनें देव ते तोषती । तेणें आनंद चित्तीं देवाचिये ॥ १ ॥ भक्तांची स्तुति देवासी आनंद । भक्तनिंदा होतां देवा येतसे क्रोध ॥ २ ॥ भक्त संतोषतां देवासी सुख । एकाजनार्दनीं देवा भक्तांचा संतोष ॥ ३ ॥

१३४३ देव पुजिती आपुले भक्ता । मज वाढविलें म्हणे उचिता ॥ १ ॥ ऐसा मानी उपकार । देव भक्तीं केला थोर ॥ २ ॥ देवा अंगीं नाहीं बळ । भक्त भक्तीनें सबळ ॥ ३ ॥ देव एक देशीं वसे । भक्त नांदती समरसें ॥ ४ ॥ भक्ताची देवा आवडी । उणें पडों नेदी अर्ध घडी ॥ ५ ॥ नाहीं लाज अभिमान देवा । एकाजनार्दनीं करी सेवा ॥ ६ ॥

१३४४ भक्ताविण देवा । कैचें एकपण सेवा ॥ १ ॥ भक्ताची सेवा

देव करी । देव तिष्ठे भक्तद्वारीं ॥ २ ॥ भक्ताचे अंकित । लक्ष्मीसह देव होत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्त । देवा हृदयीं धरीत ॥ ४ ॥

१३४५ भक्ताची अणुमात्र व्यथा । न सहावे भगवंता ॥ १ ॥ अंबऋषीसाठीं । गर्भवासा येत पोटीं ॥ २ ॥ प्रल्हादाकारणें । सहस्त्र स्तंभीं गुरगुरणें ॥ ३ ॥ गोपाळ राखिले वनांतरीं । तेथें उचलिला गिरी ॥ ४ ॥ राखिले पांडव जोहरीं । काढिले बाहेरी विवरद्वारें ॥ ५ ॥ ऐसा भक्तांचा अंकित । एकाजनार्दनीं तया ध्यात ॥ ६ ॥

१३४६ उतरावया धराभार । घेतिला अवतार इहीं जगीं ॥ १ ॥ ते हे बळिये रामकृष्ण । केलें कंदन दैत्यांसी ॥ २ ॥ केला जो जो कीर्तिघोष । उच्चारितां निर्दोष होती प्राणी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कृपाळु । भक्त स्नेहाळु समर्थ ते ॥ ४ ॥

१३४७ उतरावया धराभार । धरी अवतार कृपाळु ॥ १ ॥ पाळी-तसे भक्तलळा । नोहे वेगळा वेगळीक ॥ २ ॥ जया आवडे जें कांहीं । देतां न म्हणे थोडें कांहीं ॥ ३ ॥ पुरवी इच्छा जैसी आहे । मच्छ कच्छ तयासाठीं होय ॥ ४ ॥ ऐसा कृपेचा कोंवळा । एकाजनार्दनीं पाहूं डोळा ॥ ५ ॥

१३४८ साचपणें देवा शरण पैं जाती । तया वैकुंठपती विसरेना ॥ १ ॥ जैसी कन्या दूर देशीं एकटी । रात्रंदिवस संकटीं घोकी माय-बाप ॥ २ ॥ पतिव्रतेचें सर्व मन पति पायीं । तैसा देव ठायीं तिष्ठतसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मज हा अनुभव । जनार्दनें देव दाखविला ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज.

१३४९ एकदा ऐसें नवल झालें । देव अकल्पित आले ॥ १ ॥ येवोनि बैसले परवरी । म्हणे देईं कांहीं नेहरी ॥ २ ॥ जनी म्हणे देवराया । आपुल्या हातें घेईं सखया ॥ ३ ॥ देवें अवघें पाहिलें । तों झाकणीं झाकण ठेविलें ॥ ४ ॥ लाहे लाहे देव गेला । झाकणी कण्या घेउनी आला ॥ ५ ॥ धरोनी जनीचा हात । घास घालीत मुखांत

॥ ६ ॥ दोघे जेवोनियां धाले । तृप्तीचे ते ढेकर दिले ॥ ७ ॥ चोखा उभा तो बाहेरी । उष्ट्यासाठीं पदर पसरी ॥ ८ ॥

१३५० घराहि झाडणें साळीहि कांडणें । केर तो भरणें अंगणींचा ॥ १ ॥ आणितसे पाणी वेगें चक्रपाणी । घालितसे वेणी आपुले हातें ॥ २ ॥ बैसोनी निवांत पाहात केशांत । उवा ते मारीत लाहे लाहे ॥ ३ ॥ चोखा म्हणे हें तो प्रेमाचें काज । न धरी कांहीं लाज थोरीवीची ॥ ४ ॥

१३५१ काय दुकाळें झालेंसे भुकाळु । म्हणोनियां दळूं लागे जनीसी ॥ १ ॥ सिळे ते वाळले कुटके तियेचे । पांचा सातां दिवसांचे खाय सुके ॥ २ ॥ मोडकें खाटलें वाकळेची शेज । तेथें तुज निज आली देवा ॥ ३ ॥ पाहांटे वेचोनी आणितसे सेणी । चोखा म्हणे धणी आमुचा तो ॥ ४ ॥

१३५२ नामदेवाहातीं स्वयें दूध पेला । अपमान केला बादशाहाचा ॥ १ ॥ करितां कीर्तन देऊळ फिरविलें । प्रत्यक्ष दाविलें अवंढ्यासी ॥ २ ॥ अकबरें गाय वत्स मारियेलें । कीर्तनीं उठाविलें नामदेवें ॥ ३ ॥ परिसा भागवतें परिस पैं दिधला । राजाईनें ठेविला आपणापासीं ॥ ४ ॥ तयालागीं वाळुवंटीं परिस केले । अज्ञान निरसिलें परिसीयाचें ॥ ५ ॥ चोखा म्हणे ऐसी कृपेची माउली । आम्हां ती वोळली जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

१३५३ शीणले वेद चारी । साही नेणती निर्धारीं ॥ १ ॥ तो आपुलिया लाजा । धांवे भक्ताचिया काजा ॥ २ ॥ ज्ञानियाची भिंत वोढी । गोरियाचें मडकें घडी ॥ ३ ॥ माळि सावत्यास । खुर्पूं लागे सावकाश ॥ ४ ॥ ऐसा भक्तांचा अंकिला । चोखा म्हणे भला भला ॥ ५ ॥

१३५४ ऐसा आवडी भुकेला । भक्तिसाठीं लाचावला ॥१॥ अवघें ठेविलें परतें । थोरपण हें निरुतें ॥ २ ॥ मानापमान न पाहे कांहीं ।

झुलला भक्तिभावाठायीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे नवल कळा । नानापरी दावी लीळा ॥ ४ ॥

१३५५ पुढें आतां मज उपजवी पंढरी । अथवा हरिदासाघरीं देई जन्म ॥ १ ॥ हेंचि वारंवार मागणें तुम्हां देवा । विसावीया जीवा मायबापा ॥ २ ॥ अंतकाळीं मज परदेशी केलें । माझेंचि फळलें पाप दिसे ॥ ३ ॥ चोखा म्हणे विठ्ठला हेंचि मज देई । जन्मोजन्मीं देई सेवा माझी ॥ ४ ॥

१३५६ राहिली वासना पायांसवें चाड । आन नाहीं कोड माझें कांहीं ॥ १ ॥ तुमची कृपादृष्टी असावी मजवरी । आणि नामया सेजारी सुखवस्ती ॥ २ ॥ महाद्वारापुढें मज ठाव द्यावा । हेंचि केशवा मागतसे ॥ ३ ॥ चोखा म्हणे आजि वाटतें उदास । घडिये घडिये आस पंढरीची ॥ ४ ॥

१३५७ जीवींचा जिवलग प्राणाचा तो प्राण । धरीन चरण जीवें भावें ॥ १ ॥ आषाढी कार्तिकी पंढरीची वारी । होईन तया घरीं पशु-याती ॥ २ ॥ विठ्ठलनामाचा छंद जया मनीं । संसार काचणी तया नाहीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे नाहीं दुजा छंद मनीं । जागृती स्वप्नीं पंढरीराव ॥ ४ ॥

१३५८ आम्हा आनंद झाला आम्हां आनंद झाला । देवोचि देखिला देहामाजी ॥ १ ॥ देखणें उडालें पाहाणें लपालें । देवें नवल केलें देहामाजी ॥ २ ॥ मागें पुढें देव रिता ठाव कोठें । हृदयीं भेटे देहीं देवो ॥ ३ ॥ चोखा म्हणे देव देखिला पंढरी । उभा भीमातीरीं विटेवरी ॥ ४ ॥

---

# भेटीपर

## श्रीतुकाराममहाराज.

१३५९ कर कटावरी तुळसीच्या माळा। ऐसे रूप डोळां दावीं हरी ॥ १ ॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी। ऐसें रूप हरी दावी डोळां ॥ २ ॥ कटीं पीतांबर कास मिरवली। दाखवीं वहिली ऐसी मूर्ती ॥३॥ गरूडपारावरी उभा राहिलासी। आठवे मानसीं तेंचि रूप ॥ ४ ॥ झुरोनि पांझरा होऊं पाहे आतां। येईं पंढरीनाथा भेटावया ॥ ५ ॥ तुका म्हणे माझी पुरवावी आस। विनंती उदास करूं नये ॥ ६ ॥

१३६० वाट्ठुली पाहतां सिणले डोळुले। दाविसी पाउलें कैंवो डोळां ॥ १ ॥ तूं माय माउली कृपेची साउली। विठ्ठले पाहिली वास तुझी ॥ २ ॥ कां वा मोकलिलें कवणा निरविलें। कठीण कैसें झालें हृदय तुझें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या। तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥ ४ ॥

१३६१ भक्त प्रतिपाळे दीन वो वात्सले। विठ्ठले कृपाळे होसी माये ॥ १ ॥ पडिला विसर माझा काय गुणें। कपाळ हें उणें काय करूं ॥ २ ॥ तुका म्हणे माझें जाळूनि संचित। करीं वो उचित भेट देईं ॥ ३ ॥

१३६२ तुजविण मज कोण वो सोयरें। आणीक दुसरें पांडुरंगे ॥ १ ॥ लागलीसे आस पाहें तुझी वास। रात्री वो दिवस लेखीं बोटीं ॥ २ ॥ काम गोड मज न लगे हा धंदा। तुका म्हणे सदा हेंचि ध्यान ॥ ३ ॥

१३६३ न लगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान। गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥ लागला उशीर पतित पावना। विसरोनि वचना गेलासि या ॥ २ ॥ जाळोनि संसार बैसलों अंगणीं। तुझें नाहीं मनीं मानसीं

हें ॥ ३ ॥ तुका म्हणे नको रागेजूं विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां ॥ ४ ॥

१३६४ धांव घाली आई । आतां पाहातेसी काइ ॥ १ ॥ धीर नाहीं माझे पोटीं । झालों वियोगें हिंपुटी ॥ २ ॥ करावें शीतळ । बहु झाली हळहळ ॥ ३ ॥ तुका म्हणे डोइ । कई ठेवीन हे पायीं ॥ ४ ॥

१३६५ कान्हयारे जगजेठी । देईं भेटी एक वेळे ॥ १ ॥ काय मोकलिलें वनीं । सावजांनीं वेढिलें ॥ २ ॥ येथवरी होता संग । अंगे अंग लपाविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे पाहिलें मागें । एवढ्या वेगें अंतरला ॥ ४ ॥

१३६६ भेटीची आवडी उतावीळ मन । लागलेसे ध्यान जीवीं जीवा ॥ १ ॥ आतां आवडीचा पुरवावा सोहळा । येउनी गोपाळा क्षेम देई ॥ २ ॥ नेत्र उन्मळित राहिले ताटस्त । गंगा अश्रुपात वहावली ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही करा साचपणा । मुळींच्या वचना आपुलिया ॥ ४ ॥

१३६७ मी तंव बैसलों धरूनिया ध्यास । न करीं उदास पांडुरंगा ॥ १ ॥ नको आतां मज दवडूं श्रीहरी । मागाया भिकारी जालों दास ॥ २ ॥ भुकेलों कृपेच्या वचना कारणें । आशा नारायणें पुरवावी ॥ ३ ॥ तुका म्हणे येऊनिया देईं भेटी । कुरवाळुनी पोटीं धरी मज ॥ ४ ॥

१३६८ धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोबासी ॥ १ ॥ संल्कप तो नाहीं दुजा । महाराजा विनावितों ॥ २ ॥ पायांवरीं ठेविन भाळ । येणें सकळ पावलों ॥ ३ ॥ तुका म्हणे डोळेभरी । पाहीन हरी श्रीमुख ॥ ४ ॥

१३६९ भेटीलागीं पंढरीनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ १ ॥ कें कृपा करिसी नेणें । मज दीनाचें धांवणें ॥ २ ॥ सिणलें

माझें मन । वाट पाहतां लोचन ॥ ३ ॥ तुका म्हणे भूक । तुझें पहावया मुख ॥ ४ ॥

१३७० भेटीवांचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुलती याजसाठीं ॥ १ ॥ भेटोनियां बोलों आवडीचें गुज । आनंदाच्या भोजें जेवूं संगें ॥ २ ॥ मायलेकरांसी नाहीं दुजी परी । जेवूं बरोबरी बैसोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें अंतरींचे आर्त । यावें जी त्वरीत नारायणा ॥ ४ ॥

१३७१ कन्या सासुऱ्यासी जाये । मागें परोतोनी पाहे ॥ १ ॥ तैसें जालें माझ्या जीवा । केव्हां भेटसी केशवा ॥ २ ॥ चुकलिया माये । बाळ हुरू हुरू पाहे ॥ ३ ॥ जीवना वेगळी मासोळी । तैसा तुका तळमळी ॥ ४ ॥

१३७२ पंढरीची वाट पाहें निरंतर । निढळावरी कर ठेवूनिया ॥ १ ॥ जातियां निरोप पाठवी माहेरा । कां मज सासुरा सांडियेलें ॥ २ ॥ पैल कोण दिसे गरुडाचें वारिकें । विठ्ठला सारिखें चतुर्भुज ॥ ३ ॥ तुका म्हणे धीर नाहीं माझ्या जीवा । भेटसी केधवा पांडुरंगा ॥ ४ ॥

१३७३ काय तुझें वेंचे मज भेटी देतां । वचन बोलतां एक दोन ॥ १ ॥ काय तुझें रूप घेतों मी चोरोनि । त्या भेणें लपोनि राहिलासी ॥ २ ॥ काय तुझें आम्हां करावें वैकुंठ । भेवों नको भेट आतां मज ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परि आहे आवडी दर्शनाची ॥ ४ ॥

१३७४ वाट पाहें हरी कां नये आजूनी । निष्ठुर कां मनीं धरियेलें ॥ १ ॥ काय करूं धीर होत नाहीं जीवा । काय आड ठेवा उभा ठेला ॥ २ ॥ नाहीं माझा धांवा पडियेला कानीं । कोठें चक्रपाणी गुंतलेती ॥ ३ ॥ नाहीं आलें कळों अंतरा अंतर । कृपावंत फार ऐकतों ॥ ४ ॥ बहुतां दिसांचे राहिलें भातुकें । नाहीं कवतुकें कुरवा-

ळिलें ॥ ५ ॥ तुका म्हणे देई एक वेळा भेटी । शीतळ हे पोटीं होईल मग ॥ ६ ॥

१३७५ नाहीं बळ योग अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥ १ ॥ तुझिये भेटीचें प्रेम अंतरंगी । नाहीं बळ अंगी भजनाचें ॥ २ ॥ काय पांडुरंगा करूं वा विचार । झुरतें अंतर भेटा-वया ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगा वडिलपणें बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणा ॥ ४ ॥

१३७६ न लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनिया ॥ १ ॥ म्हणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणीकांचें ॥ २ ॥ काय तीं महत्त्व करावी मान्यता । तुज न देखतां पांडु-रंगा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज भेटल्यावांचूनि । न राहें त्याह्नि होईन वेडा ॥ ४ ॥

१३७७ स्वामीसी संकट पडे ज गोष्टीचें । काय त्या प्रेमाचे सुख मज ॥ १ ॥ दुखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुज-पाशीं ॥ २ ॥ रिद्धिसिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस यांची जीवें ॥ ३ ॥ तुका म्हणे एके वेळे देई भेटी । वोरसोनि पोटीं आलिंगावें ॥ ४ ॥

१३७८ भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥ १ ॥ पूर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥ दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली । पहातसे वाटुली पंढरीची ॥ ३ ॥ भुकेलिया बाळ अति शोक करी । वाट पाहे परी माउलीची ॥ ४ ॥ तुका म्हणे मज लागलीसे भूक । धांवूनि श्रीमुख दावी देवा ॥ ५ ॥

१३७९ लोकमान देहसुख । संपत्ति उपभोग अनेक । विटंबना दुःख । तुझिये भेटी वांचून ॥ १ ॥ तरी मज ये भेट ये भेट । काय ठाकलासी नीट थोर । पुण्यवीट । तुज दैवांचि लाधली ॥ २ ॥ काय

ब्रह्मज्ञान करूं कोरडें। रितें मावेचें मापाडें। भेटीविण कुडें। तुझिये अवघें मज वाटे ॥ ३ ॥ आत्मस्थितीचा विचार। काय करूं हा उद्धार। न देखतां धीर। चतुर्भुज मज नाहीं ॥ ४ ॥ रिद्धि सिद्धि काय करूं। अथवा आगम विचारूं। भेटीविण भारु। तुझिये वाटे मज यांचा ॥ ५ ॥ तुजवांचूनि कांहीं व्हावें। ऐसें नको माझिया जीवें। तुका म्हणे द्यावें। दरुषण पायांचें ॥ ६ ॥

१३८० मातेविण बाळा। आणीक न माने सोहळा ॥ १ ॥ तैसें जालें माझ्या चित्ता। तुजविण पंढरिनाथा ॥ २ ॥ वाट पाहे मेघा बिंदु। नेघे चातक सरिता सिंधु ॥ ३ ॥ सारसांसी निशीं। ध्यान रवीच्या प्रकाशीं ॥ ४ ॥ जीवनाविण मास्य। जैसें धेनूलागीं वत्स ॥ ५ ॥ पतिव्रते जिणें। भ्रताराच्या वर्तमानें ॥ ६ ॥ कृपणाचें धन। लोभालागीं जैसें मन ॥७॥ तुका म्हणे काय। तुजविण प्राण राहे ॥८॥

१३८१ डोळियां पाझर कंठ माझा दाटी। येईं वो देईं भेटी पांडुरंगे ॥ १ ॥ बहु दिस टाकिलें निरास कां केलें। कोठें वो गुंतलें चित्त तुझें ॥ २ ॥ बहु धंदा तुज नाहीं वो आठव। राहिलासे जीव माझा कंठीं ॥ ३ ॥ पंढरीस जाती वारकरी संतां। निरोप बहुतां हातीं धाडीं ॥ ४ ॥ तुजविण कोण सांवा धांवा करी। येईं वो झडकरी पांडुरंगे ॥ ५ ॥ काय तुझी वाट पाहों कोठवरी। कृपाळुवा परी विसरलासी ॥ ६ ॥ एक वेळ माझा धरूनि आठव। तुका म्हणे ये वो न्यावयासी ॥ ७ ॥

१३८२ तुमची तों भेटी नव्हे ऐसी झाली। कोरडीच बोली ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ आतां न बोलावें ऐसें वाटे देवा। संग न करावा कोणासवें ॥ २ ॥ तुम्हा निमित्यासी सांपडलें अंग। नेदावा हा संग विचारिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी राहिली वासना। आवडी दर्शनाचीच होती ॥ ४ ॥

१३८३ चिन्हें उमटती अंगीं । शकुनाजोगीं उत्तम ॥ १ ॥ आठवला मायबाप । येईल काय मूळ नेणों ॥ २ ॥ उत्कंठित झालें मन । तेचि खूण तेथींची ॥ ३ ॥ तुका म्हणे कामावारीं । आळस घरीं करमेना ॥ ४ ॥

१३८४ बारे पांडुरंगा केव्हां येसी भेटी । जाहलों हिंपुटी तुजविण ॥१॥ तुजविण सखें न वाटे मज कोणी । वाटतें चरणीं घालूं मिठी ॥२॥ ओवाळावी काया चरणांवरोनी । केव्हां चक्रपाणी भेटशील ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी पुरवावी आवडी । वेगीं घालीं उडी नारायणा ॥४॥

१३८५ अपराध झाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥ १ ॥ तुझे लडिवाळ तुज कृपा यावी । म्यां वाट पहावी कवणाची ॥२॥ मायबाप माझा रुक्मादेवीवर । हा दृढ निर्धार अंतरीचा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोणे गोष्टीचें संकट । न घालीं मज भेट नारायणा ॥४॥

१३८६ आतां तुज मज नाहीं दुजेपण । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ १ ॥ तुज रूप रेखा नाम गुण नाहीं । एक स्थान पाहीं गांव सींव ॥ २ ॥ नावडे संगती तुज दुजयाची । आपल्या भक्तांचीं प्रीति तुम्हां ॥ ३ ॥ परी आम्हांसाठीं होसील सगुण । स्तंभासी फोडून जयापरी ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसें तुज काय उणें । देईं दरुषण चरणांचें ॥ ५ ॥

१३८७ येईं गे विठ्ठले विश्वजीवनकळे । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥ १ ॥ येईंगे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ॥ २ ॥ नलगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥ ३ ॥ तुका म्हणे धांव घालीं कृष्णाबाई । क्षेम चहूं बाहीं देईं मज ॥ ४ ॥

१३८८ काय पाहतोसी कृपेच्या सागरा । नराच्या नरेंद्रा पांडुरंगा ॥ १ ॥ नामाचा प्रताप ब्रीदाचा बडिवार । करावा साचार नारायणा ॥ २ ॥ कलीमाजीं देव बौध्यरूप झाला । जगाचिया बोला

लागूं नका ॥ ३ ॥ माय पुत्रा काय मारूं पाहे कळी । जगाची टवाळी काय काज ॥ ४ ॥ तुका म्हणे याहो कृपेच्या सागरा । रखुमादेवीवरा मायबापा ॥ ५ ॥

१३८९ होचि वेळा देवा नका मागें घेऊं । तुम्हांवीण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥ नारायणा येरे पाहें विचारून । तुजाविण कोण आहे मज ॥ २ ॥ रात्रंदिवस तुज आठवूनि आहे । पाहतोसी काय सत्व माझें ॥ ३ ॥ तुका म्हणे किती येऊं काकुलती । कांहीं माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ४ ॥

१३९० काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥ नुलंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥ आता कैंचा मज सखा नारायण । गेला अंतरोन पांडुरंग ॥ ३ ॥ तुका म्हणे व्यर्थ मोलाचें शरीर । गेलें हा विचार कळों आला ॥ ४ ॥

१३९१ बोले तैसा चाले । त्याची वंदीन पाउलें ॥ १ ॥ अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥ त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥ तुका म्हणे देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

१३९२ पाहे तिकडे दिशा ओस । अवघी आस पायापें ॥ १ ॥ मनिचें साच होईल कई । प्रेम देई भेटोनी ॥ २ ॥ सर्वांपरी पांगुळ असे । न कळे कैसें तें तुम्हां ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपावंता । तूं तो दाता दीनांचा ॥ ४ ॥

१३९३ यई वो येई वो येई धांवोनियां । विलंब कां वांयां लावियेला कृपाळे ॥ १ ॥ विठाबाई विश्वंभरे भवच्छेदके । कोठें गुंतलीस अगे विश्वव्यापके ॥ २ ॥ न करी न करी न करी आतां आळस अव्हेरु । व्हावया प्रगट कैंचें दुरी अंतरू ॥ ३ ॥ नेघ नेघे नेघे माझी वाचा विसांवा । तुका म्हणे हंवा हंवा हंवा साधावा ॥ ४ ॥

१३९४ क्षण क्षणां जीवा वाटतसे खंती। आठवती चित्तीं पाय देवा ॥ १ ॥ येईं वो येईं वो येईं लवलाही। आलिंगूनि बाहीं क्षेम देईं ॥ २ ॥ उताविळ मन पंथ अवलोकीं। आठवे ते चुकी काय झाली ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या जीवीच्या जीवना। घाला नारायणा उडी वेगीं ॥ ४ ॥

१३९५ धांव धांव गरुडध्वजा। आम्हा अनाथांच्या काजा ॥ १ ॥ बहु झालों कासावीस। म्हणूनी पाहें तुझी वास ॥ २ ॥ पाहें पाहें त्या मारगें। कोणी येतें माझ्या लागें ॥ ३ ॥ असोनियां ऐसा। तुज सारिखा कोंवसा ॥ ४ ॥ न लावावा उशीर। नेणों काहो केला धीर ॥ ५ ॥ तुका म्हणे चाली। नको चालूं धांव घाली ॥ ६ ॥

## श्रीनिळोबामहाराज

१३९६ भक्तप्रिये येवो आई। विठाबाई कृपाळे ॥ १ ॥ न साहे वियोग प्राण फुटे। उदास वाटे तुजाविण ॥ २ ॥ कोणा जीवन भोजन मागों। कोणा सांगों जड भारी ॥ ३ ॥ निळा म्हणे धांवोनि यावें। मज हें द्यावें जीवदान ॥ ४ ॥

१३९७ दृष्टी देखावासाचि वाटे। हृदय फुटे त्यालागीं ॥ १ ॥ उभा कटावरी कर। मूर्ति सकुमार गोमटी ॥ २ ॥ भेटीलागीं मन व्याकूळ। न लोटे पळ युग वाटे ॥ ३ ॥ निळा म्हणे न तुटे आधी। कृपानिधी न भेटतां ॥ ४ ॥

१३९८ दोहीं डोळां घालूनी वाती। पाहे वाट दिवस राती ॥ १ ॥ केव्हां येशील धांवोनी। प्रेमपान्हा पाजिसी स्तनी ॥ २ ॥ पांचाहि प्राण ठेविले कंठीं। तुजचि भेटावया साठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे माझी आई। न धरी निष्ठुर वो विठाबाई ॥ ४ ॥

१३९९ वियोगाच्या दुःखें। आळवितों करुणा मुखें ॥ १ ॥ कृपावंते माझे आई। धांव घाली वो विठाई ॥ २ ॥ देऊनियां भेटी। आतां

अवलोकावें दिठी ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रेमपान्हा । पाजीं लावूनियां स्तना ॥ ४ ॥

१४०० धांवोनियां येसी । प्रेमपान्हा तूं पाजिसी ॥ १ ॥ तरीच वांचतील प्राण । नाहीं तरी आलें मरण ॥ २ ॥ मायेवीण बाळा । वरी कोणाचा कळवळा ॥ ३ ॥ निळा म्हणे निज निगुती । पाळण पोषण तुझ्या हातीं ॥ ४ ॥

१४०१ प्रेमभातें तुम्हां हातीं । आम्हीं नेणतीं भुकेलों ॥ १ ॥ झडकरी आतां भोजन घाला । उशीर झाला मग काय ॥ २ ॥ क्षुधा पीडिलों जातील प्राण । मग धांवोन काय फळ ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंते । ये वो माते विठ्ठले ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१४०२ देवा निढळावरी हात दोनी । पाहें चक्रपाणी वाट तुझी ॥ १ ॥ धांव गा धांव गा सख्या पांडुरंगा । जीवीं जीवलगा मायबापा ॥ २ ॥ तुजविण ओस दिसती दाही दिशा । धांव जगदीशा मजसाठीं ॥ ३ ॥ नामा म्हणे काय बैसलों निवांत । धांवतो अनंत भक्तांसाठीं ॥ ४ ॥

१४०३ कस्तुरीचा टिळा रेखिला कपाळीं । तेणें ते शोभली मूर्ति बरी ॥ १ ॥ बरवा बरवा विठ्ठलगे बाई । वर्णावया साहि शिणताती ॥ २ ॥ श्रीवत्सलांछन वैजयंती गळां । नेसला पाटोळा तेजःपुंज ॥ ३ ॥ पाउलें समान विटेवरी नीट । नामा म्हणे भेट घ्यावी त्यांची ॥ ४ ॥

१४०४ भेटीलागीं जीवा लागलीसे आस । पाहे रात्रंदिवस वाट तुझी ॥ १ ॥ पौर्णिमेचा चंद्रमा चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥ २ ॥ दिवाळीच्या मूळा मोठी आस केली । पाहतां वाट्ली मायबापा ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्ही लेकराची जाति । भेटावया खंती वाटतसे ॥ ४ ॥

१४०५ संसार षड्चक्रीं पडिलों महाडोहीं । सोडवण्या येईं पांडुरंगा ॥ १ ॥ दवडादवडी धांव दवडादवडी धांव । नको भक्तिभाव पाहों माझा ॥ २ ॥ माझी चित्तवृत्ति अज्ञान हे गाई । व्याघ्रें धरिली आहे अहंकारें ॥ ३ ॥ पंचाननीं मज घेतलें वेढोनि । नेताति काढोनि प्राण माझा ॥ ४ ॥ गजेंद्राकारणें घातली तुवां उडी । तैसा लवडसवडी पावें मज ॥ ५ ॥ नामा म्हणे मज तुझाचि आधार । पोसणा डिंगर जन्मोजन्मीं ॥ ६ ॥

१४०६ कां गा मोकलीलें माझिया विठ्ठला । धांवा तुझा केला मायबापा ॥ १ ॥ त्रितापें तापलों बहु गा पोळलों । चिखलीं पडिलों दिनानाथा ॥ २ ॥ यालागीं तुजला भाकितां करुणा । धांवसी निर्वाणा पांडुरंगा ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा । रुक्मिणीच्या कांता घालीं उडी ॥ ४ ॥

१४०७ आस धरोनि पोटीं दिवस लेखीं बोटीं । प्राण ठेऊनि कंठीं वाट पाहे ॥ १ ॥ भेटसी केधवां माझ्या जीवलगा । येईं पांडुरंगा मायबापा ॥ २ ॥ चित्त निरंतर तुझ्या महाद्वारीं । अखंड पंढरी हृदयीं वसे ॥ ३ ॥ श्रीमुख साजिरें कुंडलें गोमटीं । तेथें माझी दृष्टि वैसलीसे ॥ ४ ॥ कटीं कर वीटे सम चरण साजिरे । देखावया झुरे मन माझें ॥ ५ ॥ आसुवें दाटलीं नेत्रपातें बाहे । नामा वाट पाहे रात्रंदिवस ॥ ६ ॥

१४०८ नेत्र तान्हेले पाजी पाणी । पंढरपूरचे मायवहिणी ॥ १ ॥ बाळ पालखीं करी सोर । माते आला निद्रा भर ॥ २ ॥ जागी न होसी गे माय । प्राण जातो करूं काय ॥ ३ ॥ नामा म्हणे चक्रपाणी । चरणीं घातली लोळणी ॥ ४ ॥

१४०९ पक्षिणी प्रभातीं चारियासी जाये । पिलूं वाट पाहे उपवासी ॥ १ ॥ तैसें माझें मन करी वो तुझी आस । चरण रात्रंदिवस चिंतीतसे ॥ २ ॥ तान्हे वत्स घरीं बांधलेंसे देवा । तया हृदयीं धांवा

माउलीचा ॥ ३ ॥ नामा म्हणे केशवा तूं माझा सोईरा । झणीं मज न अव्हेरा अनाथ नाथा ॥ ४ ॥

१४१० रात्रंदिवस खंती वाटे माझे जीवी । अनुदिनीं आठवी चरण तुझे ॥ १ ॥ नेरे पांडुरंगा आपुलिया गांवा । तूं माझा विसावा जीवलग ॥ २ ॥ मी एक बापुडें रंकाह्लानि रंक । त्रिभुवननायक कीर्ति तुझी ॥ ३ ॥ मी तुझें पोसणें दास पें दुर्बळ । तूं दिनवत्सल स्वामि माझा ॥ ४ ॥ तुझें मी अनाथ चरणीं ठेवीं माथा । सांभाळीं समर्था ब्रीद तुझें ॥ ५ ॥ नामा म्हणे विठो झालों कासावीस । पुरवी माझी आस मायबापा ॥ ६ ॥

१४११ वाल्मिकादि भीष्म द्रोण कृपाचार्य । द्रुपदतनया दिली भेटी ॥ १ ॥ उद्धव नारद अंबरिष शुक । बळी ध्रुवादिक आले भेटी ॥ २ ॥ देवी देवऋषि गोपाळां सहित । भाष्यकारें नीत शुद्ध केली ॥ ३ ॥ नामा म्हणे आतां पाहूं नको देश । पतितास यश तुझें नामीं ॥ ४ ॥

१४१२ येईना अर्जुनी श्रीकृष्ण सदना । गोंवळा रक्षण मायबाप ॥१॥ कृपा करा देवा कृपा करा देवा । कृपा करा देवा पांडुरंगा ॥ २ ॥ लावूनिया आशा फिरविशी दिशा । प्रेमभाव कैसा दावी आतां ॥३॥ बाळे भोळे जन करिती विनंती । मोकलिसी अंती म्हणे नामा ॥ ४ ॥

१४१३ नको गा मोकलूं दीना पंढरिनाथा । तुजविण आतां कोण धांवे ॥ १ ॥ अपराधाच्या कोटी पाहूं नको कांहीं । येई गे विठाबाई झडकरी ॥ २ ॥ माझ्या दोषांसाठीं पाठमोरा होसी । पावन ब्रिदासी लागे बोल ॥ ३ ॥ नामा म्हणे जननी तूंचि चराचर । तारिले अपार जडजीव ॥ ४ ॥

१४१४ पाहूं द्यारे मज विठोबाचें मुख । लागलीसे भूक डोळां माझ्या ॥ १ ॥ कस्तुरी कुंकुम भरोनिया तार्टी । अंगी बरवी उटी गोपाळाच्या ॥ २ ॥ जाई जुई पुष्पें गुंफोनिया माळा । घालूं घननिळा

आवडीनें ॥ ३ ॥ नामा म्हणे विठो पंढरीचा राणा । डोळियां पारणा होत असे ॥ ४ ॥

१४१५ तुझा विष्णुदास म्हणताती जगीं । नाहीं माझे अंगीं प्रेमभावो ॥ १ ॥ तेणें थोर लाज वाटे पंढरिराया । ये माझ्या हृदया एक वेळा ॥ २ ॥ द्वैताद्वैत भाव आहे माझे ठायीं । अनुभव नाहीं स्वरूपाचा ॥ ३ ॥ देखावेखी बैसे संतांचे संगती । नाहीं माझें चित्तीं ध्यान तुझें ॥ ४ ॥ नामा म्हणे माझा उजळ करीं माथा । भेटी देउनी संतां निरवीं मज ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई.

१४१६ तुझे पाय रूप डोळां । नाहीं देखिलें गोपाळा ॥ १ ॥ काय करूं या कमासी । नाश होतो आयुष्यासी ॥ २ ॥ जन्मा येऊनिया दुःख । नाहीं पाहिलें श्रीमुख ॥ ३ ॥ लळे पुरविसी आमुचे । म्हणे जनी ब्रीद साचें ॥ ४ ॥

१४१७ वाट पहातें मी डोळां । कां गा नयेसी विठ्ठला ॥ १ ॥ तूं वो माझी निज जननी । मज कां टाकियलें वनीं ॥ २ ॥ धीर किती धरूं आतां । कव घाली पंढरिनाथा ॥ ३ ॥ मला आवड भेटीची । धनी घेईन पायांची ॥ ४ ॥ सर्व जिवांचे स्वामिणी । म्हणे जनी मायबाहिणी ॥ ५ ॥

१४१८ हात निढळावरी ठेवुनी । वाट पाहे चक्रपाणी ॥ १ ॥ धांव धांव पांडुरंगे । सखे जिवलगे अंतरंगे ॥ २ ॥ तुजवांचुनि दाहि दिशा । वाट पाहतें जगदीशा ॥ ३ ॥ हांसं करूं नको जनासीं । म्हणे नामयाची दासी ॥ ४ ॥

१४१९ येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ १ ॥ भीमा आणि चंद्रभागा । तुझे चरणीच्या गंगा ॥ २ ॥ इतुक्या सहित त्वां बा यावें । माझे रंगणी नाचावें ॥ ३ ॥ माझा रंग तुझिया गुणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१४२० आतां वाट पाहूं किती । देवा रुक्माईच्या पती ॥ १ ॥ येई येई पांडुरंगे । भेटी देई मज संगें ॥ २ ॥ मी बा बुडतें भवजळीं । सांग बरवी ब्रिदावळी ॥ ३ ॥ राग न धरावा मनी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१४२१ विठोबारायाच्या अगा लेकवळा । जाऊनी कळवळा सांगा माझा ॥ १ ॥ विठोबारायाच्या अगा मुख्य प्राणा । भेटवी निधाना आपुलिया ॥ २ ॥ अगे क्षेत्र माये सखे पंढरीये । मोकालेते पाय जीव जातो ॥ ३ ॥ विश्वाचिये माते सुखाचें अमृत । सखा पंढरीनाथ विनवी तरी ॥ ४ ॥ तूं मायबहिणी देवाचे रुक्मिणी । धरोनियां जनी घालीं पायीं ॥ ५ ॥

१४२२ कां गे निष्ठुर झालीसी । मुक्या बाळातें सांडिसी ॥ १ ॥ तुजवांचोनियां माये । जीव माझा जावों पाहे ॥ २ ॥ मी वत्स माझी माय । नये आतां करूं काय ॥ ३ ॥ प्राण धरियेला कंठीं । जनी म्हणे देई भेटी ॥ ४ ॥

१४२३ माझिये जननी हरिणी । गुंतलीस कवणें वनीं ॥ १ ॥ मुकें तुझें मी पाडस । चुकलें माये पाहे त्यास ॥ २ ॥ चुकली माझिये हारिणी । फिरतसे रानोरानीं ॥ ३ ॥ आतां भेटवा जननी । विनावितसे दासी जनी ॥ ४ ॥

१४२४ धन्य ते पंढरी धन्य ते पंढरीनाथ । तेणें हो पतित उद्धरिले ॥ १ ॥ धन्य नामदेव धन्य पंढरिनाथ । तयानें अनाथ उद्धरिले ॥ २ ॥ धन्य ज्ञानेश्वर धन्य त्याचा भाव । त्याचे पाय देव आम्हां भेटी ॥ ३ ॥ नामयाची जनी पालट पैं झाला । भेटावया आला पांडुरंग ॥ ४ ॥

१४२५ चिंतनी चित्ताला । लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥ उन्मनी सुखांत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥ कवटाळुनी भेटी पोटीं । जनी म्हणे सांगूं गोष्टी ॥ ३ ॥

१४२६ देहाचा पालट विठोबाचे भेटी । जळलवणा गांठी पडोन ठेली ॥ १ ॥ धन्य मायबाप नामदेव माझा । तेणें पंढरिराजा दाखविलें ॥ २ ॥ रात्रंदिवस भाव विठ्ठलाचें पायीं । चित्त ठायींचें ठायीं मावळलें ॥ ३ ॥ नामयाचे जनी आनंद पै झाला । भेटावया आला पांडुरंग ॥ ४ ॥

१४२७ पुंडलिकें नवल केलें । गोपिगोपाळ आणिलें ॥ १ ॥ हेंचि देई हृषिकेशी । तुझें नाम अहर्निशी ॥ २ ॥ नलगे आणिक प्रकार । मुखीं हरी निरंतर ॥ ३ ॥ रूप न्याहाळिन डोळां । पुढें नाचेन वेळोवेळां ॥ ४ ॥ सर्वांठायीं तुज पाहें । ऐसें देऊनि करीं साह्य ॥ ५ ॥ धांवा करितां रात्र झाली । दासी जनीसी भेट दिली ॥ ६ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१४२८ कृपाळु माउली उभी भिमातटीं । लागलीसे आशा जीवासी मोठी ॥ १ ॥ कई भेटेल माझा मायबाप । उजळोनीं दीप वोवाळीन श्रीमुख ॥ २ ॥ शून्यस्थावर व्यापूनी वेगळा राहे । एका जनार्दनीं वंदीन त्याचे पाय ॥ ३ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

१४२९ रंगा येईवो ये रंगा येईवो ये । विठाई किठाई माझे कृष्णाई कान्हाई ॥ १ ॥ वैकुंठवासिनी वो जगत्जननी वो । तुझा वेधु माझे मनीं वो ॥ २ ॥ कटी कर विराजित मुगुट रत्न जडित । पीतांबरु कासिला तैसा येईका धांवत ॥ ३ ॥ विश्वरूप विश्वंभरे कमळनयनें कमळाकरे वो । तुझें ध्यान लागो बापरखुमादेविवरे वो ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

१४३० देहूडे ठाण सकुमार गोजिरें । कल्पद्रुमातळीं उभा देखि-

लारे ॥ १ ॥ मनी वेध लागला त्या गोपाळाचा । जो जिवलग गोप गोपिकेचा ॥ २ ॥ जी सावळी सगुण घनानंद मूर्ति । पाहतां वेधली माझी चित्तवृत्ती ॥ ३ ॥ जो उभाचि राहिला व्यापुनी सकळ । भेटिलागी सेना व्हावी उतावीळ ॥ ४ ॥

१४३१ चित्त नाहीं हातीं । करूं जातां हरिभक्ति ॥ १ ॥ मज इतुकी वासना । भेटी द्यावी नारायणा ॥ २ ॥ कोण जाणे दान धर्म । नव्हे स्वतंत्र कैचें कर्म ॥ ३ ॥ सेना म्हणे सांगें मात । जेणें माझें होय हित ॥ ४ ॥

१४३२ एकिलें मागें तारिलें बहुतां । धांवसी कीं आतां नाम घेतां ॥ १ ॥ बरव्यापरी मज ऐसें कळों आलें । म्हणउनी विठ्ठले करीं धांवा ॥ २ ॥ पाडिला विसरू माझा तुजलागी । आतां पांडुरंगीं करणें काय ॥ ३ ॥ तुजलागि माझी नयेचि करुणा । धरिलें कीं जाण दुरी मज ॥ ४ ॥ सेना म्हणे आतां सांभाळीं नारायणा । जाऊं पाहे प्राण तुजसाठीं ॥ ५ ॥

## श्रीचोखोबामहाराज

१४३३ अहो पतितपावना पंढरीच्या राया । भक्त विसाविया मायबापा ॥ १ ॥ धांवे दुडदुडा आपुलिया काजा । येई गरुडध्वजा मायबापा ॥ २ ॥ दाही दिशा उदास तुम्हांवण झाल्या । न करी पांगिला दुजीयासी ॥ ३ ॥ चोखा म्हणे मज दावीं आतां वाट । मग मी बोभाट न करी कांहीं ॥ ४ ॥

१४३४ धांव घाली विठु आतां चालू नको मंद । बडवे मज मारिती ऐसा कांहीं तरी अपराध ॥ १ ॥ विठोबाचा हार तुझे कंठीं कैसा आला । शिव्या देती महारा म्हणती देव बाटविला ॥ २ ॥ अहोजी महाराज तुमचे द्वारींचा कुतरा । नकाजी मोकलूं चक्रपाणी जिमेदारा ॥ ३ ॥ जोडूनिया कर चोखा विनवितो देवा । बोलिलों उत्तरं परि राग नसावा ॥ ४ ॥

१४३५ नेत्रीं अश्रुधारा उभा भीमातिरीं। लक्ष चरणावरी ठेवोनिया ॥ १ ॥ कां गा मोकलीलें न येसी गा देवा। काय मी केशवा चुकलोंसे ॥ २ ॥ नेणें करूं भक्ती नेणें करूं सेवा। न येसी तूं देवा कळलें मज ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझ्या जीवींचा विसांवा। पोकारितां धांवा म्हणोनिया ॥ ४ ॥

---

## सलगीपर

### श्रीतुकाराममहाराज

१४३६ ऐसा हा लौकिक कदा राखवेना। पतितपावना देवराया ॥ १ ॥ संसार करितां म्हणती हा दोषी। टाकितां आळसी पोटपोसा ॥ २ ॥ आचार करितां म्हणती हा पसारा। न करितां नरा निंदिताती ॥ ३ ॥ संतसंग करितां म्हणती हा उपदेशी। येरा अभाग्यासी ज्ञान नाहीं ॥ ४ ॥ धन नाहीं त्यासी ठायींचा करंटा। समर्थासी ताठा लाविताती ॥ ५ ॥ बहु बोलों जातां म्हणती हा वाचाळ। न बोलतां सकळ म्हणती गर्वी ॥ ६ ॥ भेटीसी न वजतां म्हणती हा निष्ठुर। येतां जातां घर बुडाविलें ॥ ७ ॥ लग्न करूं जातां म्हणती हा मातला। न करितां जाला नपुंसक ॥ ८ ॥ निपुत्रिका म्हणती पहा हो चांडाळ। पातकाचें मूळ पोरवडा ॥ ९ ॥ लोक जैसा ओक धरितां धरवेना। अभक्ता जिरेना संतसंग ॥ १० ॥ तुका म्हणे आतां ऐकावें वचन। त्यजुनियां जन भक्ति करा ॥ ११ ॥

१४३७ जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें। अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥ जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती। सांडोनि पळती रांडा पोरें ॥ २ ॥ बाइल म्हणे खर मरता तरी बरें। नासिलें हें घर थुंकोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी। तुज चक्रपाणी-वांचूनियां ॥ ४ ॥

१४३८ आपुलें गांवींचें न देखेसें झालें। परदेसी एकलें किती करूं ॥ १ ॥ म्हणऊनी पाहें मूळ येतां वाटे। जीवलग भेटे कोणी तरी ॥ २ ॥ पाहतां अवघ्या दिसतील दिशा। सकळही वोसा दृष्टी-पुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे कोणी न सांगे वारता। तुझी वाटे चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

१४३९ आवडी धरूनि करूं गेलों लाड। भक्ति प्रेमकोड न पुरेचि ॥ १ ॥ म्हणऊनि जीव ठेला आसावोनि। खेद होतो मनीं बहुसाल ॥ २ ॥ वेठी ऐसें वाटे निर्फळ कारण। शीतळ होऊन खोडावलों ॥ ३ ॥ तुका म्हणे सरतें नव्हेचि पायांपें। वळ केलें पापें नव्हेचि भेटी ॥ ४ ॥

१४४० लागों नेदी बोल पायां तुझ्या हरी। जीव जावो परी न करीं आन ॥ १ ॥ परनारी मज रखुमाईसमान। वमनाहूनि धन नीच मानीं ॥ २ ॥ तुका म्हणे याची लाज असे कोणा। सहकारी दीना ज्याची तया ॥ ३ ॥

१४४१ काय मागें आम्ही गुंतलों काशांनीं। पुढें वाहों मनीं धाक देवा ॥ १ ॥ कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे। भेटोनियां काय द्यावें आम्हां ॥ २ ॥ घेउनि धरणें बैसती उपवासी। हट आम्हांपासीं नाहीं तैसा ॥ ३ ॥ तांतडी तयांनीं केली विटंबना। आम्हां नारायणा काय उणें ॥ ४ ॥ नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा। जीव भाव आमुचा देऊं तुज ॥ ५ ॥ तुका म्हणे काय मानेल तें आतां। तूं घेईं अनंता सर्व माझें ॥ ६ ॥

१४४२ आपण चाळक बुद्धीच्या संचारा। आम्हांसी वेव्हारा पात्र केलें ॥ १ ॥ काय जालें तरी नेघां तुम्ही भार। आणीक कोणा थोर म्हणों सांगा ॥ २ ॥ पंच भूतें तंव चर्माचिया मोटा। येथें खरा खोटा कोण भाव ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं बोलावया जागा। कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ४ ॥

१४४३ मज त्याची भीड नुलंघवे देवा । जो म्हणे केशवा दास तुझा ॥ १ ॥ मज आवडती बहु तैसे जन । करिती कीर्तन कथा तुझी ॥ २ ॥ सांडूनियां लाज नाचेन त्यांपुढें । आइकती कोडें नाम तुझें ॥ ३ ॥ नलगे उपचार होईन भिकारी । वैष्णवांच्या घरीं उष्टावळी ॥ ४ ॥ तुका म्हणे जाणों उचित अनुचित । विचारूनि हित तेंचि करूं ॥ ५ ॥

१४४४ कवण जन्मता कवण जन्मविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ १ ॥ कवण हा दाता कवण हा मागता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ २ ॥ कवण भोगिता कवण भोगविता । न कळे कृपावंता माव तुझी ॥ ३ ॥ कवण तें रूप कवण अरूपता । न कळे कृपावंता माव तुझी ॥४॥ सर्वां ठायीं तूंचि सर्वही जालासी । तुका म्हणे यासी दुजें नाहीं ॥ ५ ॥

१४४५ जन मानवलें वरी बाह्यात्कारीं । तैसा मी अंतरीं नाहीं झालों ॥ १ ॥ म्हणुनी पंढरीनाथा वाटतसे चिंता । प्रगट बोलतां लाज वाटे ॥ २ ॥ संतां ब्रह्मरूप जाले अवघे जन । ते माझे अवगुण न देखती ॥ ३ ॥ तुका म्हणे मी तों आपणांसी ठावा । आहें बरा देवा जैसा तैसा ॥ ४ ॥

१४४६ म्हणवितों दास न करितां सेवा । लंडपणें देवा पोट भरीं ॥ १ ॥ खोटें कोठें सरे तुझे पायांपाशीं । अंतर जाणसी पांडु-रंगा ॥ २ ॥ आचरण खोटें आपणासी ठावें । लटिकें बोलावें दुसरें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा आहें अपराधी । असो कृपानिधी तुम्हां ठावा ॥ ४ ॥

१४४७ जेथें पाहें तेथें कांडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ॥ १ ॥ काय सांगों देवा भुलले जीव । बहु यांची येतसे कींव ॥ २ ॥ वेठीचें मोटळें लाटेकांचे फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे

॥ ३ ॥ तुका म्हणे जन कां उगोचि खोल। जवळी दाखवी आपणां बोल ॥ ४ ॥

१४४८ काय तुझे उपकार पांडुरंगा। सांगों मी या जगामाजी आतां ॥ १ ॥ जतन हें माझें करूनि संचित। दिलें अवचित आणूनियां ॥ २ ॥ घडल्या दोषांचे न घालीच भरी। आली यास थोरी कृपा देवा ॥ ३ ॥ नव्हतें ठाउकें आइकिलें नाहीं। न मागतां पाहीं दान दिलें ॥ ४ ॥ तुका म्हणे याच्या उपकारासाठीं। नाहीं माझे गांठीं कांहीं एक ॥ ५ ॥

१४४९ पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला। तेथें मी विठ्ठला काय बोलों ॥ १ ॥ कांद्याचा खाणार चोजवी कस्तुरी। आपण भिकारी अर्थ नेणे ॥ २ ॥ न कळे ते मज पुसती छळूनी। लागतां चरणीं न सोडिती ॥ ३ ॥ तुझ्या पायांविण दुजें नेणें कांहीं। तूंचि सर्वांठायीं एक मज ॥ ४ ॥ तुका म्हणे खीळ पडो त्यांच्या तोंडा। किती बोलों भांडां वादकांशीं ॥ ५ ॥

१४५० कोणाच्या आधारें करूं मी विचार। कोण देईल धीर माझ्या जीवा ॥ १ ॥ शास्त्रज्ञ पंडित नव्हे मी वाचक। यातिशुद्ध एक ठाव नाहीं ॥ २ ॥ कलियुगीं बहु कुशल हे जन। छळितील गुण तुझे गातां ॥ ३ ॥ मज हा संदेह झाला दोहीं सवा। भजन करूं देवा किंवा नको ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां दुरावितां जन। किंवा हें मरण भलें दोन्ही ॥ ५ ॥

१४५१ तुजविण वानीं आणिकांची थोरी। तरी माझी हरि जिव्हा झडो ॥ १ ॥ तुजविण चित्ता आवडे आणीक। तरी हा मस्तक भंगो माझा ॥ २ ॥ नेत्रीं आणिकांसी पाहीन आवडी। जात तेचि घडी चांडाळ हे ॥ ३ ॥ कथामृतपान न करिती श्रवण। काय प्रयोजन मग यांचें ॥ ४ ॥ तुका म्हणे काय वांचून कारण। तुज एक क्षण विसंबतां ॥ ५ ॥

१४५२ तुज काय करूं मज एक सार । अमृतनागर नाम तुझें ॥ १ ॥ काय येणें उणें आम्हां तयापोटीं । गोंवितां हे कंठीं कामधेनु ॥ २ ॥ नोळखे तानुलें माय एसी कोण । वोरसे देखून शोक त्याचा ॥ ३ ॥ जो नाहीं देखिला याचक नयनीं । तो पावे घेउनी लज्जा दान ॥ ४ ॥ नामासाठीं प्राण सांडियेला रणीं । शूर ते भांडणीं न फिरती ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हीं गातां गीतीं भला । भेटूनि विठ्ठला काय चाड ॥ ६ ॥

१४५३ जन्ममरणांची कायसी चिंता । तुझ्या शरणागतां पंढरीराया ॥ १ ॥ वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय कवणा ॥ २ ॥ हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार । तेथें कोण पार संसाराचा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझ्या चरणांची पाखर । असतां कळिकाळ पायांतळीं ॥ ४ ॥

१४५४ दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ॥ १ ॥ कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ॥२॥ आणिकांचीं येती अंतरा अंतरें । सुख दुःख बरें वाईट तें ॥ ३ ॥ तुका म्हणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥ ४ ॥

१४५५ खेळतां निजभावें समर्थाचा बाळ । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥ १ ॥ तरीं लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानावीण ॥ २ ॥ अवघीच दिशा असावी मोकळी । मायबाप बळी म्हणउनि ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें ऐसें आहे देवा । म्हणऊनि सेवा समर्पिली ॥ ४ ॥

१४५६ बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आम्ही अविश्वासी सर्वभावें ॥ १ ॥ दंभें करी भक्ती सोंग दावी जना । अंतरीं भावना वेगळिया ॥ २ ॥ चित्ताचा तूं साक्षी तुज कळे सर्व । किती करूं गर्व आतां पुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा तूं काय करीसी । कर्मा दुस्तरासी आमुचिया ॥ ४ ॥

१४५७ समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ॥ १ ॥ न पाहे तयाचे गुण दोष अन्याय । सुख देउनि साहे दुःख त्याचें ॥ २ ॥ मान भलेपण नाहीं फुकासाठीं । जयावरी गांठीं झीज साहे ॥ ३ ॥ तुका म्हणे हें तूं सर्वही जाणसी । मज अधीरासी धीर नाहीं ॥ ४ ॥

१४५८ आवडी धरोनी आलेती आकारा । केला हा पसारा याजसाठीं ॥ १ ॥ तें मी तुझें नाम गाइन आवडी । क्षण एक घडी विसंबेना ॥ २ ॥ वर्म जाणावें हा मुख्य धर्मसार । अवघे प्रकार तयापासीं ॥ ३ ॥ वेगळ्या विचारें वेगळाले भाव । धरायासीं ठाव बहु नाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवळुनी धाकुटी मूर्ती जीवें ॥ ५ ॥

१४५९ कैसी करूं आतां सांग तुझी सेवा । शद्बज्ञानें देवा नाश केला ॥ १ ॥ आतां तुझें वर्म न कळे अनंता । तुज न सांगतां वुडूं पाहे ॥ २ ॥ संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासीं म्हणती एक ॥ ३ ॥ बुडविली भक्ति म्हणती पाषाण । पिंडाचें पाळण स्थापूनियां ॥ ४ ॥ न करावी कथा म्हणती एकादशी । भजनाची निसी मांडियेली ॥ ५ ॥ न जावें देउळा म्हणती देव घरीं । बुडविलें या परी तुका म्हणे ॥ ६ ॥

१४६० कैसें करूं ध्यान कैसा पाहों तुज । वर्म दावीं मज याचकासी ॥ १ ॥ कैसी भक्ति करूं सांग तुझी सेवा । कोण्या भावें देवा आतुडसी ॥ २ ॥ कैसी कीर्ती वाणूं कैसा लक्षा आणूं । जाणुं हा कवणु कैसा तुज ॥ ३ ॥ कैसा गाऊं गीतीं कैसा ध्याऊं चित्तीं । कैसी स्थिती मती दावीं मज ॥ ४ ॥ तुका म्हणे जैसें दास केलें देवा । तैसें हें अनुभवा आणीं मज ॥ ५ ॥

१४६१ त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥ १ ॥ ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणा-

वरी मिठी ॥ २ ॥ कई तें सुंदर देखोनि रुपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ॥ ३ ॥ नाहीं पूर्वपुण्य मज पामरासी । म्हणोनि पायांसी अंतरलों ॥ ४ ॥ अलभ्य लाभ कैंचा संचिता वेगळा । विनवी गोपाळा दास तुका ॥ ५ ॥

१४६२ नामाचा महिमा बोलिलों उत्कर्ष । अंगा कांहीं रस नयेचि तो ॥ १ ॥ कैसें समाधान राहे पांडुरंगा । नलगेचि अंगा आणी कांहीं ॥ २ ॥ लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचें तें फिकें वेवसाव ॥ ३ ॥ तुका म्हणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरी माझ्या ॥ ४ ॥

१४६३ म्हणउनि काय जीऊं भक्तपणें । जायांचीं भूषणें अळंकार ॥ १ ॥ आपुल्या कष्टाची करूनियां जोडी । मिरविन उघडी इच्छावसें ॥ २ ॥ तुके तरी तुकीं खऱ्याचें उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोटवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे पुढें आणि मागें फांस । पावे ऐसा नास न करीं देवा ॥ ४ ॥

१४६४ सोंवळा होऊं तों वोंवळें जडलें । सांडीमांडीं बोल तोंडी बीजीं ॥ १ ॥ एकसरी केली कळिवरें साटी । आतां नको तुटी पायांसवें ॥ २ ॥ संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मूळ मरणाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे हें तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

१४६५ काय करूं आतां धरूनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥ १ ॥ नव्हे जगीं कोणीं मुकियाचा जाण । सार्थक लाजोन नव्हे हित ॥ २ ॥ आलें तें उत्तर बोलें स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे मना समर्थासी गांठी । घालावी हें मांडी थापटूनी ॥ ४ ॥

१४६६ मी त्यांसी अनन्य तीं कोणा असती । ऐसें तंव चित्तीं विचारावें ॥ १ ॥ आहे तो विचारू आपणयापाशीं । कळा बिंबा-

ऐसी प्रतीबिंबीं ॥ २ ॥ शुभ शकून तो शुभ लाभें फळे । पुढिल तें कळे अनुभवें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पायीं ॥ ४ ॥

१४६७ उगेंचि हें मन राहातें निश्चळ । तरी कां तळमळ लाट होती ॥ १ ॥ काय तुमचीं नेणों कवतुक विंदानें । सर्वोत्तमपणें खेळतसां ॥ २ ॥ नानाछंदें आम्हां नाचवावें जीवा । वाढवाव्या हांवा भलत्यापुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही आपुली प्रतिष्ठा । वाढवा-वया चेष्टा करीतसां ॥ ४ ॥

१४६८ काय आतां आम्हीं पोटाचि भरावें । जग चाळवावें भक्त म्हूण ॥ १ ॥ ऐसा तरी एक सांगा जी विचार । बहु होतों फार कासावीस ॥ २ ॥ काय कवित्वाची घालूनियां रूढी । करूं जोडा-जोडी अक्षरांची ॥ ३ ॥ तुका म्हणे काय गुंपोनी दुकाना । राहों नारायणा करूनी घात ॥ ४ ॥

१४६९ जनीं जनार्दन ऐकतों हे मात । कैसा तो वृत्तांत न कळे आम्हां ॥ १ ॥ जन्म जरा मरण कवण भोगी भोग । व्याधि नाना रोग सुखदुःखें ॥ २ ॥ पापपुण्यें शुद्धाशुद्ध आचरणें । हीं कोणा-कारणें कवणें केलीं ॥ ३ ॥ आम्हां मरण नाश तूं तंव अविनाश । कैसा हा विश्वास साच मानूं ॥ ४ ॥ तुका म्हणे तूंचि निवडीं हें गुढार । दाखवीं साचार तेंचि मज ॥ ५ ॥

१४७० मनवाचातीत तुझें हें स्वरूप । म्हणोनियां माप भक्ति केलें ॥ १ ॥ भक्तिचिया मापें मोजितों अनंता । इतरानें तत्त्वता न मोजवे ॥ २ ॥ योग याग तपें देहाचिया योगें । ज्ञानाचिया लागें न [illegible]ीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हीं भोळ्या भावें सेवा । घ्यावी जी [illegible]ीं ॥ ४ ॥

[illegible]व्हे ऐसें कांहीं नाहीं । डोंगराची राई रंक [illegible] करितां तुज कांहीं । अवघड नाहीं

पांडुरंगा ॥ २ ॥ सोळा सहस्र नारी ब्रह्मचारी कैसा । निराहारी दुर्वासा नवल नव्हे ॥ ३ ॥ पंचभ्रतारांची द्रौपदी ते सती । करितां पितृशांती पुण्य धर्मा ॥ ४ ॥ दशरथा पातकें ब्रह्महत्ये ऐसीं । नवल त्याचे कुशीं जन्म तुझा ॥ ५ ॥ मुनेश्वरा नाहीं दोष अणुमात्र । भांडवितां सूत्र वध होती ॥ ६ ॥ तुका म्हणे माझे दोष ते कायी । सरता तुझे पायीं जालों देवा ॥ ७ ॥

१४७२ तुम्हांसी न कळे सांगा काय एक । कासया संकल्प वागवूं मी ॥ १ ॥ आहे तेथें सत्ता ठेविलें स्थापूनी । प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा ॥ २ ॥ कृपा झाली मग नलगे अंगसंग । निजध्यासें रंग चढता राहे ॥ ३ ॥ तुका म्हणे मागें बोलिलों तें वाव । आतां हाचि भाव दृढ झाला ॥ ४ ॥

१४७३ ऐकें पांडुरंगा वचन माझें एक । जालों मी सेवक दास तुझा ॥ १ ॥ कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥ २ ॥ दंभ मान माझा करूं पाहे घात । झालियाही थीत कारणाचा ॥ ३ ॥ हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसों पाहे ॥ ४ ॥ तुका म्हणे मज विघडतां क्षण । नलगे जतन करीं देवा ॥ ५ ॥

१४७४ पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचितें ॥ १ ॥ एक नाहीं एकाऐसें । दावी कैसे शुद्ध हीन ॥ २ ॥ पंचभूतें एकी राशी । सूत्रें कैसीं खेळवी ॥ ३ ॥ तुका म्हणे जो जे जाती । तैसी स्थिति येतसे ॥ ४ ॥

१४७५ आगी लागो तया सुखा । जेणें हरि नये मुखा ॥ १ ॥ मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं ॥ २ ॥ जळो तें [illegible] धन संपत्ति उत्तम कुळ ॥ ३ ॥ तुका म्हणे दे[illegible] सेवा ॥ ४ ॥

१४७६ धन्य वा ह्या ऐशा नारी । [illegible]

नियां तुजपाशीं । येतां त्यांसी न कळतां ॥ २ ॥ दोन्हीं ठायीं समाधान । सम कठिण बहुतचि ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवासाठीं । दुर्लभ भेटी ते देवा ॥ ४ ॥

१४७७ चरणाचा महिमा । हा तो तुझ्या पुरुषोत्तमा ॥ १ ॥ अंध पारखी माणिकें । बोलविशी स्पष्ट मुकें ॥ २ ॥ काय नाहीं सत्ता । तुझ्या हातीं पंढरीनाथा ॥ ३ ॥ तुका म्हणे मूढा । मज चेष्टविलें जडा ॥ ४ ॥

१४७८ कैसीं दिसों बरीं । आम्ही आळवितां हरि ॥ १ ॥ नाहीं सोंग अलंकार । दास जाला संवसार ॥ २ ॥ दुःख आम्हां नाहीं चिंता । हरिचे दास म्हणवितां ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । ऐसीं झालों करितां सेवा ॥ ४ ॥

१४७९ माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥ १ ॥ ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥ २ ॥ येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसीं ॥ ३ ॥ तुका म्हणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥ ४ ॥

१४८० मागायाची नाहीं इच्छा । जो मी ऐसा संकोचों ॥ १ ॥ लटाकियाची न करूं स्तुति । इच्छा चित्तीं धरूनी ॥ २ ॥ हिशेबें तें आलें घ्यावें । हें तों ठावें सकळांसी ॥ ३ ॥ तुका म्हणे स्वामिसेवा । येथें देवा काशाची ॥ ४ ॥

१४८१ आम्ही बोलों तें तुज कळे । एक दोहीं ठायीं खेळे ॥ १ ॥ काय परिहाराच काम । जाणे अंतरींचें राम ॥ २ ॥ कळोनिया काय चाड । माझी लोकांसी बडबड ॥ ३ ॥ कारण सर्वं एका । अवघें आहे म्हणे तुका ॥ ४ ॥

१४८२ कौतुकाची सृष्टी । कौतुकेंचि केली कष्टी ॥ १ ॥ मोडे तरी भलें खेळ । फांके फांकिल्या कोल्हाळ ॥ २ ॥ जाणणियासाठीं ।

भय सामावलें पोटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे चेता । होणें तें तूंच आइता ॥ ४ ॥

१४८३ कोण आमचीं योगतपें । करूं वापें जाणावीं ॥ १ ॥ गीत संतसंगें गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ॥ २ ॥ आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ॥ ३ ॥ तुका म्हणे इंद्रियांसी । येचि रसीं रंगवूं ॥ ४ ॥

१४८४ कळों आलें तुझें जिणें । देवा तूं माझें पोसणें ॥ १ ॥ वाट पाहासी आमची । सत्ता सतंत कईंची ॥ २ ॥ वोलवितां यावें रूपा । सदा निर्गुणींचि लपा ॥ ३ ॥ तुका म्हणे तूं परदेशी । येथें आम्हां अंगे जिसी ॥ ४ ॥

१४८५ प्रीती करी सत्ता । बाळा भीती मातापिता ॥ १ ॥ काय चाले त्याशीं बळ । आळी करितां कोल्हाळ ॥ २ ॥ पदरीं घाली मिठी । खेदी मागें पुढें लोटी ॥ ३ ॥ बोले मना आलें । तुका साहिलें विठ्ठलें ॥ ४ ॥

१४८६ राहे उभा वादावादीं । तरी फंदीं सांपडे ॥ १ ॥ लव्हाळ्यासी कोठें बळ । करिल जळ आपुलें ॥ २ ॥ कठिणासी बळ जोडा । नम्र पीडा देखेना ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व रसीं । मिळे त्यासी गोत तें ॥ ४ ॥

१४८७ सोळा सहस्र होऊं येतें । भरलें रितें आम्हांपें ॥ १ ॥ ऐसें तुम्हां ठायाठाव । देव म्हूण संपादे ॥ २ ॥ कैंची चिरामध्यें चिरें । मना बरें आलें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । अंगसंगा भिन्न परा ॥ ४ ॥

१४८८ भला म्हणे जन । परि नाहीं समाधान ॥ १ ॥ माझें तळमळी चित्त । अंतरलें दिसे हित ॥ २ ॥ कृपेचा आधार । नाहीं दंभ झाला भार ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपे । अंतराय कोण्या पापें ॥ ४ ॥

१४८९ काय माता विसरे बाळा । कळवळा प्रीतीचा ॥ १ ॥

आवडीनें गळां मिठी । घाली उठी बैसवी ॥ २ ॥ लावूं धांवे मुख स्तना । नये मना निराळें ॥ ३ ॥ भावंडांचें भातें दावी। आपुलें लावी त्यास जी ॥ ४ ॥ माझें थोडें त्याचें फार। उत्तर हें वाढवी ॥ ५ ॥ तुका म्हणे नारायणा। तुम्हीं जाणा बुझावूं ॥ ६ ॥

१४९० माता कापी गळा । तेथें कोण राखी बाळा ॥ १ ॥ हें कां नेणा नारायणा । मज चाळवितां दीना ॥ २ ॥ नागवी धावणें । तेथें साह्य व्हावें कोणें ॥ ३ ॥ राजा सर्व हरी । तेथें दुजा कोण वारी ॥ ४ ॥ तुझ्या केल्यावीण । नव्हे स्थिर वश मन ॥ ५ ॥ तुका म्हणे हरी । सूत्र तुम्हां हातीं दोरी ॥ ६ ॥

१४९१ हे माझी मिराशी । ठाव तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥ याचा धरीन अभिमान । करीन आपुलें जतन ॥ २ ॥ देऊनियां जीव । बळी साधिला हा ठाव ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । जुन्हाट हे माझी सेवा ॥ ४ ॥

१४९२ दीप घेऊनियां धुंडिती अंधार । भेटे हा विचार अघटीत ॥ १ ॥ विष्णुदास आम्ही न भ्यों कळिकाळा । भुलों मृगजळा न घडे तें ॥ २ ॥ उधळतां माती रविकळा न मळे। हें कैसें न कळे भाग्यहीना ॥ ३ ॥ तुका म्हणे तृणें झांके हुताशन । हें तव वचन वाउगोंचे ॥ ४ ॥

१४९३ बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ १ ॥ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ २ ॥ स्तुति निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥ ३ ॥ तुका म्हणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥ ४ ॥

१४९४ कोण जाणे कोणा घडे उपासना । कोण या वचनाप्रति पावे ॥ १ ॥ आतां माझा श्रोता वक्ता तूंचि देवा । करावी ते सेवा तुझीच म्यां ॥ २ ॥ कुशळ चतुर येथें न सरते । करितील रिते तर्क मतें ॥ ३ ॥ तुका म्हणे जालें पेणें एके घरीं । मज आणि हरी तुम्हां गांठी ॥ ४ ॥

१४९५ माझें मज आतां न देखे निरसतां म्हणवूनि आधार

केला। संसाराची आस सांडूनि लौकिक जीवभाव तुज दिला। नव्हती माझी कोणी मी कवणाचा अर्थ मोहो सांडवला। तारीं मारीं करीं भलतें दातारा होउन तुझा आतां ठेलों रे ॥ १ ॥ असो माझें कोडें तुज हें सांकडें मी असेन निवाडें सुखरूप। बाळकासी चिंता काय पोटवेथा जया शिरीं मायबाप ॥ २ ॥ पापपुण्यें श्रुति आटिल्या शास्त्रांस न लगेचि ठाव। विधिनिषेधें गोविलीं पुराणें वेदांसी तो अहंभाव। ओंकाराचें मूळ व्यापिलें माया तेथें न धरवेच भाव। म्हणवून कावाड सांडिलें उपसतां धरिलें तुझेंचि नांव ॥ ३ ॥ तनमन-इंद्रियें ठेवूनि राहिलों सर्व आशा तुझे पायीं। तप तीर्थ दान करवूं कवणाहातीं अधीन तें मज काई। आहिक्य परत्रें चाड नाहीं सर्वथा जन्म सदा मज देईं। मायामोहपारा करीं विष तैसें तुका म्हणे माझ्या ठायीं ॥ ४ ॥

१४९६ कवतुकवाणी बोलतसें लाडें। आरुष वांकडें करूनि मुख ॥ १ ॥ दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका। जननीबाळकामध्यें भेद ॥ २ ॥ सलगी दुरूनि जवळी पाचारूं। धांवोनिया करूं अंग-संग ॥ ३ ॥ धरूनि पालव मागतां भातुक। आवडीचें निकें प्रेमसुख ॥ ४ ॥ तुका म्हणे तुज आमचीच गोडी। ऐसी हे आवडी कळों आली ॥ ५ ॥

१४९७ आवडी कां ठेवूं। बैसोनियां संगें जेवूं ॥ १ ॥ मागें नको ठेवूं उरी। माझी आण तुजवरी ॥ २ ॥ देखिले प्रकार। त्याचे पाहेन साचार ॥ ३ ॥ तुका म्हणे बाळीं। केली चाहाडी सकळीं ॥ ४ ॥

१४९८ तुम्हां आम्हां सरी। येथें कईंच्या या परी ॥ १ ॥ स्वामि-सेवा अळंकार। नाहीं आवाडिये थार ॥ २ ॥ खुंटलिया वाचा। मग हा आनंद कईंचा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोडें। आम्हीं नाचों तुज-पुढें ॥ ४ ॥

१४९९ आळवितां बाळें। माते तें सुख आगळें ॥ १ ॥ द्यावें

आवडी भातुकें । पाहे निवे कवतुकें ॥ २ ॥ लेववूनि अळंकार । दृष्टि करावी सादर ॥ ३ ॥ आपुलिया पदीं । बैसवूनि कोडें वंदी ॥ ४ ॥ नेदी लागों दिठी । उचलोनि लावी कंठीं ॥ ५ ॥ तुका म्हणे लाभा । वारी घ्यावें पद्मनाभा ॥ ६ ॥

१५०० जन पूजी याचा मज कां आभार । हा तुम्ही विचार जाणा देवा ॥ १ ॥ पत्र कोण मानी वांदितील सिक्का । गौरव सेवका त्याचिमुळें ॥ २ ॥ मी मीपणें होतों जनासधीं आधीं । कोणें दिलें कधीं काय तेव्हां ॥ ३ ॥ आतां तूं भोगितां सर्व नारायणा । नको आम्हां दीनां पीडा करूं ॥ ४ ॥ आपुलिया हातें देसील मुशारा । तुका म्हणे खरा तोचि आम्हां ॥ ५ ॥

१५०१ बाळ काय जाणे जीवनउपाय । मायबाप वाहे सर्व चिंता ॥ १ ॥ आइतें भोजन खेळणें अंतरीं । अंकिताचे शिरीं भार नाहीं ॥ २ ॥ आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता । आमुची ते सत्ता तयावरी ॥ ४ ॥

## श्रीकान्होबामहाराज.

१५०२ अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ॥ १ ॥ म्हणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळीं धरिलीं एकें दुरी ॥ २ ॥ एकां सुख द्यावें घेऊनी वोसंगा । एके दारीं गळा श्रमविती ॥ ३ ॥ एकां नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अन्न करितील ॥ ४ ॥ एकें वाटतील न वजावीं दूर । एकांचा मत्सर जवळी येतां ॥ ५ ॥ तुकयाबंधु म्हणे नावडती त्यांस । कासया व्यालास नारायणा ॥ ६ ॥

१५०३ कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ । म्हणवितोसी परि केवळ । गळेकाटु दिसतोसी ॥ १ ॥ काय केलें होतें आम्हीं । सांग तुझें एक ये जन्मीं । जालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया

॥ २ ॥ भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा । करुनी बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे भला । कैसें म्हणताती तुजला । जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहीं तरी ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज.

१५०४ देवा आम्हीं तुम्हां दिलें थोरपण । मानीं हें वचन सत्य माझें ॥१॥ पतीत अमंगळ तुम्हां झालों सहाय्य । विचारुनि पाहे खरें खोटें ॥२॥ रोग व्याधि पीडा जनासि नसतां । कोण पाचारिता वैद्यालागीं ॥ ३ ॥ कल्पनेचें भूत झडपी या संसारीं । मानें पंचाक्षरी पाचारितां ॥ ४ ॥ नामा म्हणे विठो दैव येतें घरा । नको लावूं दारा पांडुरंगा ॥ ५ ॥

१५०५ वाघाचियां गळां शेळी बांधोनियां । तैसी तुझी माया लोभापर ॥ १ ॥ कां मज संसारीं घालितोसि देवा । कैसें तुझिया जीवा गोड वाटे ॥ २ ॥ विषयाचे कल्लोळ पाजिसी केवळ । हृदय कोमळ कैसें तुझें ॥ ३ ॥ नामा म्हणे मज आदि अंतु एकु । जननी जनकु पंढरिरावो ॥ ४ ॥

१५०६ जाणसी तें करीं कृपाळुवा हरी । लाज सर्वांपरी आहे तुज ॥ १ ॥ आरुष साबडें मी कांहीं नेणें वेडें । जन्मोजन्मीं सांकडें केलें तुज ॥ २ ॥ बहुकीर्ति ऐकिली बहुतांचे मुखीं । बहुत केले सुखी शरणागत ॥ ३ ॥ नाहीं तुझी सेवा केली मनोभावें । लोभ दंभ गर्व भ्रांति सदा ॥ ४ ॥ नामा म्हणे मज होताती विपत्ति । सोडवीं श्रीपति येथोनियां ॥ ५ ॥

१५०७ उालिसा प्रपंच परि हा लटिका । तेणें तुज व्यापका झांकियलें ॥ १ ॥ तैसियाच्या मज घालोनियां खेवा । स्वामिद्रोहि देवा करिसी कैसा ॥ २ ॥ मेरुचिया गळां बांधोनि मशक । पाहसी

कवतुक अनाथनाथा ॥ ३ ॥ नामा म्हणे देवा कळली तुझी माव । माझा मी उपाव करीन आतां ॥ ४ ॥

१५०८ लपालासि तरी नाम कैसें नेसी । आम्ही अहर्निशीं नाम गाऊं ॥ १ ॥ आम्हापासूनियां जातां नये तुज । तें हें वर्म बीज नाम घोकूं ॥ २ ॥ आम्हासी तों तुझें नामचि पाहिजे । मग भेटी सहजें देणें लागे ॥ ३ ॥ भोळीं भक्त आम्ही चुकलों होतों वर्म । सांपडलें नाम नामयासी ॥ ४ ॥

१५०९ घेसी तेव्हां देसी ऐसा अससी उदारा । काय जाऊनियां तुझे कृपणाचे द्वारा ॥ १ ॥ उच्छिष्टाचीं शितें न टाकिसी बाहेरी । कोणी दिधली देवा एवढी भूषणाची थोरी ॥ २ ॥ सोडीं ब्रीद देवा आतां नव्हेसी अभिमानी । पतीतपावन नाम तुझें ठेवियेलें कोणीं॥३॥ नामा म्हणे देवा तुझें नलगे मज कांहीं । प्रेम असों द्यावें कीर्तनाचे ठायीं ॥ ४ ॥

१५१० प्रेमपिसें भरलें अंगीं । गीतसंगें नाचों रंगीं ॥ १ ॥ कोण वेळे काय गाणें । हें तों भगवंता मी नेणें ॥ २ ॥ वारा वाजे भलतया । तैसी माझी रंग छाया ॥ ३ ॥ टाळ मृदंग दक्षिणेकडे । आम्ही गातों पश्चिमेकडे ॥ ४ ॥ बोले बाळक बोबडें । तरीं तें जननीये आवडे ॥ ५ ॥ नामा म्हणे गा केशवा । जन्मोजन्मीं देईं सेवा ॥ ६ ॥

१५११ तुझ्या पायीं चित्त रंगलेसें माझें । नाहीं केशीराजें ऐसें केलें ॥ १ ॥ उठवितां काय होईल संतोष । मज अभाग्यास मोकलिलें ॥ २ ॥ प्रपंच कावाडीं घाली मज दृढ । नको वाडें कोडें झणीं देवा ॥ ३ ॥ नामा शिंपयाचा विनवी समस्तां । नको भंगूं आतां प्रेमपान्हा ॥ ४ ॥

१५१२ आम्ही शरणांगतीं सांडिली वासना । ते त्वां नारायणा अंगीकारिली ॥ १ ॥ म्हणोनी प्रसन्न व्हावया आमुतें । वोरसल्या

चित्तें चालविसी ॥ २ ॥ अज्ञान बाळकु ठकविला ध्रुरु । तैसा मी अधिरु नव्हे जाण ॥ ३ ॥ लंकापती केला तुवां बिभीषण । झालासी उत्तीर्ण वाचा ऋणें ॥ ४ ॥ उपमन्यें घेतला दुग्धाचाची छंद । तैसा बुद्धिमंद नव्हे जाण ॥ ५ ॥ नामा म्हणे तैसा नव्हे मी अज्ञान । माग तुज देईन शरीर अवघें ॥ ६ ॥

१५१३ छंदाधिस्थ हें मन माझें पंढरिनाथा । न सोडीं सर्वथा पाय तुझे ॥ १ ॥ यासि काय करूं सांगा जी विठ्ठला । स्नेह कां लाविला पूर्वींहुनि ॥ २ ॥ कांसवीची पिलें राहोनि निराळीं । दृष्टि पान्हावली अमृतमय ॥ ३ ॥ तैसा मी जवळानि असेन हो दूरी । दृष्टि मजवरी असो द्यावी ॥ ४ ॥ तान्हें वत्स घरीं वनीं धेनू चरे । परतोनि हंबरे क्षणक्षणां ॥ ५ ॥ नामा म्हणे सलगी करीन निकट । झणे मज वैकुंठपद देसीं ॥ ६ ॥

## श्रीजनाबाई

१५१४ पुण्यवंत पाताळ लोकीं नेला । दरिद्री तो भाग्यवंत केला । चोरट्याचा बहुमान वाढविला । कीर्तिवानाचा अपमान केला ॥ १ ॥ धुंद झाला तुझा दरबार ॥ धृ० ॥ वैरियासी दिधली मोक्ष-सिद्धि । कपाटेया दिधली महानिधी । सेवकाच्या ढुंगा न मिळे चिंधी । चाळकासी त्रैलोक्य भावें वंदी ॥ २ ॥ पतिव्रता ती वृथा गुंतविली । वेश्या गणिका ती सत्यलोका नेली । कळी स्वकुळा लावियेली । यादववृंदा ही गोष्ट बरी नाहीं केली ॥ ३ ॥ सत्ववा-नाचा बहु केला छळ । कीर्तिवानाचें मारियेलें बाळ । सखा म्हण-विसी त्याचें नासी बळ । जनी म्हणे मी जाणें तुझे खेळ ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१५१६ उपमन्यु प्रल्हाद तारिले आळीकें । मी तुझें लाडकें सानपणें ॥ १ ॥ नेणतीयासी धांवसी तूं त्वरा । शाहणे वेरझारा

स्मरताती ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शरण एकपणीं । नेणतां जाणतां चरणीं तुझे देवा ॥ ३ ॥

१५१७ पोटींचें बाळ अवगुणीं वोखटें । परी मायबापा स्नेह पैं मोठें ॥ १ ॥ यापरि उदरा आलों जी स्वामी । अवगुणाचा तरी नुपेक्षा तुम्ही ॥ २ ॥ गुण नाहीं तेथें कर्म कैंचीं घड । तरी मायबापा वाटतसे कोड ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उदरस्थ साचें । म्हणोनी हरिदासा कौतुक त्याचें ॥ ४ ॥

१५१८ शरणागता कृपाळु उदार पंढरीनाथा । जाणतसे खुणा अंतरीच्या ॥ १ ॥ तिहीं त्रिभुवनीं चाले एक सत्ता । म्हणोनि तत्त्वतां कींव भाकीं ॥ २ ॥ करुणाकर तुम्ही भक्तांचें जीवन । हें आम्हां वचन श्रुतिवाक्य ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आलोंसे शरण । कायावाचा मन जडलें पायीं ॥ ४ ॥

१५१९ आम्हां तुमचा भरंवसा । सांभाळावें जगदीशा ॥ १ ॥ आपुली आपण जतन करा । ब्रीदावळी हे दातारा ॥ २ ॥ आम्ही पतितांनीं कोडें । तुम्हां घातलें सांकडें ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । मोक्ष मुक्ती तुमचे चरणीं ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

१५२० यम नियम पाप पुण्य आम्हांसी आपण भलतेंचि करिसी । तुझिया थोरपणा विह्लनि असावें कवणें शंकावें रायासी ॥ प्रत्यक्ष जगीं बाटली नारी तिचें स्मरण लोकांसी । पुराणें डांगोरा पिटिताती हें पतिव्रतापण तयेसी ॥ १ ॥ आवडे तें करिसी देवा कवण करीं तुझा हेवारे ॥ धृ० ॥ बहुता परी उणें ऐकिजे पांडवा सांगो या गोष्टी । पांचापासूनि जन्मले पांचैजण एका पत्नीच्या पाठीं । गोत्रवध करूनि राज्य करिती विश्वासि वंद्य शेवटीं । जन्मेजया ऐसें बोलिला सत्य तो पापिया जाला कुष्टी ॥ २ ॥ प्राण जाई तंव बोभाइला तुज पतन तया दशरथा । गणिका एक पाखिरू पोखिलें

होतें पाचारिलें प्राण जातां । कीं तयेसी उर्ध्वगति ऐसीं बोलती पुराणें कासया न मिळे पाहतां । बोलणें खुंटलें तुजपासीं देवा वेव्हारु नाहीं सर्वथा ॥ ३ ॥ तपाचा जो राशी पुण्यपणें थोर । तीर्थरूप सर्वा तीर्थमंत्राचा अवतार । देव आणि शक्ति सूर्य तैसा विचारितां ॥ तो मांडव्य ऋषि वाहला शूळीं एक उ जाला वधिला । पुत्रा पाचारिलें पापियें दुर्जनें तो वैकुंठीं आजामेळु सरता-रे रे ॥ ४ ॥ यज्ञ मुखीं अवदानें देती त्या करिसी वांकडें तोंड । लोणी चोरावया जासी घरोघरीं उघाडिसी त्यांचीं कवाड । छप्पन्न कोटि यादव संगाति हे तुझे ते त्वां केलें शापावरपडे । कोळियानें तुज विंधिलें पायीं त्यासी सायुज्यता कोडेंरें ॥ ५ ॥ अष्टांगयोगें शरीर दंडिलें तुजलागीं जालीं पिसीं । पुत्रदाराधन सांडुनियां जन हिंड-ताती वनवासी । ध्याती वाती पूजिती तूंतें त्यांसि निजपद सायासी । विष पाजूं आली पूतना राक्षसी सायुज्यता देणें तियेसी रया ॥ ६ ॥ वारया मोट बांधेल कोण आकाशा कुंप कायसा । सुर्या-पुढें दिवा लाऊनियां चालणें वाऊगाची शिण जैसा । विचित्र तुझें रूप अव्हेरून जासी सर्वज्ञा । ज्ञानदेव म्हणे देवादिदेवा जग भांबा-वलें ऐसिया मावा रया ॥ ७ ॥

१५२१ तुझी सेवा करीन मनाभावें वो । माझें मन गोविंदीं रंगलें वो ॥ १ ॥ नवसीये नवसिये माझे नवसीये वो । पंढरीचे दैवतें विठ्ठलें नवसिये वो ॥ २ ॥ बापरखुमादेविवरें विठ्ठलें वो । चित्त चैतन्य चोरूनि नेलें वो ॥ ३ ॥

१५२२ फळाचें बीज कीं बीजाचें फळ । म्हणोनि पत्र पुष्प मूळ चोजवेना ॥ १ ॥ ऐसी हे रचना नकळे गा देवा । सिद्धांतु अनु-भवा साक्ष देतो ॥ २ ॥ मृत्तिकेची पृथ्वी कीं पृथ्वीची मृत्तिका । या गाति अनेकां चोजवेना ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु निरंतरी । बाह्य-अभ्यंतरी नांदुतसे ॥ ४ ॥

१५२३ तुझिया गुणासाठीं लागलों भजनापाठीं । तुझी सगुण गोठीं हृदयीं वसे ॥ मी म्हणे तें जीवन कीं निर्गुण चैतन्यघन । व्याप्य व्यापक स्थान दुजें नाहीं ॥ विश्वाकारें जगडंबरला । जो श्रुति नेति नेति म्हणोनि ठेला ॥ हेंची भावें विचारी भला । परि दृष्टी सगुण हृदयींची हे खूण परी न विसंबे तुझीया पायां रया ॥ १ ॥ तूं एकुची एकला बाहिजु भीतरी । कोणा द्वैतपरी सांगों बापा ॥ धृ० ॥ म्हणोनि परापर स्थूळसूक्ष्म विचार । तो तुझा सगुणची आधार मज वाटे ॥ म्हणोनि ते तुझी बुंथी हेचि उरो आम्हां स्थिती । कीं द्वैताद्वैत भ्रांती न लगे मना ॥ २ ॥ ते तुझेनि सुखें पडिपाडे आणि हें मनची स्वयें उजाडे । जेथें थोडें बहू न निवडे ऐसें जालें । तेथें आपुलिये अंगा विसर पडोनि ठेलें । शेखीं सोंगचि तुझें दुणावलें रया ॥ ३ ॥ या मनाची भ्रांती फेडावया तो तुझा सगुणभाव मज गोड लागे । पाहाते पाहाणियामाजी स्वयेंची विस्तारलासी कीं देखणेंची तेणें होऊनी अंगें । त्रिपुटीसहित शून्याशून्य निमाले ॐकार मागींही हे नचले । रखुमादेविवरु विठ्ठलें उदारें सुख भोगिजे येणें अंगें रया ॥ ४ ॥

१५२४ काळा पैं गोवळु काळासि आलोट । नामामृतें पाठ भक्ता देहीं ॥ १ ॥ नित्य सुख आन्हां तपांचिया कोडी । न लागती परवडी व्रतें तीर्थें ॥ २ ॥ सुलभ सोपारा सर्वांघटीं अससी । साधुसंगें दिससी आम्हां रया ॥ ३ ॥ चैतन्याशेजारीं मन पैं मुरालें । सांवळें सानुलें हृदयघटीं ॥ ४ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठलराज । निवृत्तीनें बीज सांगितलें ॥ ५ ॥

१५२५ अवघां डोळां तुज म्यां पाहावें । अवघां श्रवणीं तुजाचि ऐकावें ॥ १ ॥ अवघी मूर्ति तुजपैं ध्यावें । अवघां चरणीं तुझ्या पंथीं चालावें ॥ २ ॥ रखुमादेविवरु अदट दाविला । माझ्या देहीं वाढला ब्रह्माकारें ॥ ३ ॥

१५२६ कांहीं न करिजे ते तुझी सेवा । कांहीं न होसी तें तूं देवा ॥ १ ॥ नेणिजे तें तुझें रूप । जाणिजे तितुकें पाप गा देवा ॥ २ ॥ स्तुति करणें ते तुझी निंदा । स्तुति जोगा नव्हेसि गोविंदा ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठला । एवढा साभिलाषु कां दाविला ॥ ४ ॥

१५२७ निमीष नलगे मन वेधितां । येवढी तुझी स्वरूपता ॥ १ ॥ विठोबा नेणों कैसी भेटी । उरणें नाहीं जिवेसाठीं ॥ २ ॥ उरलें उपाधि कारणें । तें त्वां नेमिलें दरुशनें ॥ ३ ॥ निवृत्तिदासा वेगळें । सांगावया नाहीं उरलें ॥ ४ ॥

१५२८ पावलोंजी म्हणे देखिलें जें देखणें । गेली आधीं तेणें दृष्टि माझी ॥ १ ॥ उचललिया बाह्या क्षेम देईन तया । गेली माझी माया देहत्यागें ॥ २ ॥ आनंदें स्फुदंत येती अश्रुपात । अगा गुरुनाथ देवराया ॥ ३ ॥ निवृत्तिदास म्हणे तूतें जिवें वोवाळिलें । शिर निरोपिलें तुझ्या चरणीं ॥ ४ ॥

१५२९ पाहे पां ध्वजेचें चिरगूट । राया जतन करितां कष्ट ॥ १ ॥ तैसा मी एक पतीत । परि तुझा मुद्रांकित ॥ २ ॥ मसी पत्र तें केवढें । रावो चालवी आपुल्या पाडें ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरदा । सांभाळावें आपुल्या ब्रिदा ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज.

१५३० पुत्राचिया ओढी बाप करी जोडी । वाळवुनि कुरवंडी आपणा करी ॥ १ ॥ मिरासीचा धनी करूनि ठेविला । भार तो वाहिला कडिये खांदी ॥ २ ॥ घाली अलंकार कौतुक डोळा पाहे । ठेवा दावी काय आहे तोची ॥ ३ ॥ दुजियांनीं कोणी गांजितां तयासी । उदार जीवासी सेना म्हणे ॥ ४ ॥

१५३१ असतां वैकुंठासी । काय सांगे ऋषीकेशी । जाऊनि मृत्यु लोकासी । जन भक्तिसी लावीं कां ॥ १ ॥ आज्ञा वंदुनीया शिरीं । जन्मलों न्हावीयाचे उदरीं । वाचे नाम निरंतरीं । रामकृष्ण गोविंद

॥२॥ कलियुगामाजी जाण। सोपें हेंचि साधन। रामकृष्ण नारायण। ऐसें पुरुषोत्तम सांगत ॥ ३ ॥ सेना म्हणे देवाधिदेवा। आम्हीं करावी तुझी सेवा। हेंचि मागतों केशवा। नित्य रहावें मजपाशीं ॥४॥

१५३२ स्वभावें गाईन। आवडीनें तुझें नाम ॥ १ ॥ हाचि माझा निर्धार। न करी आणिक विचार ॥ २ ॥ लोळेन तुझिये आंगणीं। निर्लज्ज होऊनि मनीं ॥ ३ ॥ रंगीं नाचेन मना ऐसें। पाहिन श्रीमुख सरिसें ॥ ४ ॥ सेना म्हणे संकल्प जीवा। हाचि निर्धार हेवा ॥ ५ ॥

## श्रीचोखामहाराज.

१५३३ आपुल्या आपण सांभाळोनी घ्यावें। आहे नाहीं ठावें तुम्हां सर्व॥ १ ॥ वांयाचि करणें लौकिकाचा गोवा। कोटवरी देवा बोलणें हें ॥ २ ॥ अंगा नाहीं आलें तंव तें साहालें। खादलें पचलें तरी तें हित ॥ ३ ॥ चोखा म्हणे तुमचें तुम्हासी सांगणें। माझें यांत उणें काय होतें ॥ ४ ॥

१५३४ ऊंस डोंगा परी रस नव्हे डोंगा। काय भुललासी वरलीया रंगा ॥ १ ॥ कमान डोंगी परी तीर नोहे डोंगा। काय भुललासी वरलिये रंगा ॥ २ ॥ नदी डोंगी परी जळ नव्हे डोंगे। काय भुललासी वरलिया रंगें ॥ ३ ॥ चोखा डोंगा परी भाव नव्हे डोंगा। काय भुललासी वरलिया रंगा ॥ ४ ॥

१५३५ यातीहीन मज म्हणती देवा। न कळे करूं तुमची सेवा ॥ १ ॥ आम्हां नीचाचें तें काम। वाचे गावें सदा नाम ॥ २ ॥ उच्छीष्टाची आस। संत दासाचा मी दास ॥ ३ ॥ चोखा म्हणे नारायणा। पदरीं घेतलें मज दीना ॥ ४ ॥

## श्रीनरहरीसोनारमहाराज.

१५३६ देवा तुझा मी सोनार। तुझे नामाचा व्यवहार ॥ १ ॥ देह बागेसरी जाण। अंतरात्मा नाम सोनें ॥ २ ॥ त्रिगुणाची करुनी

मूस । आंत ओतिला ब्रह्मरस ॥ ३ ॥ जीव शिव करूनी फुंकी । रात्रं-दिवस ठोकाठोकी ॥ ४ ॥ विवेक हातवडा घेऊन । कामक्रोध केला चूर्ण ॥ ५ ॥ मन बुद्धीची कातरी । रामनाम सोनें चोरी ॥ ६ ॥ ज्ञान ताजवा घेउन हातीं । दोन्ही अक्षरें जोखिती ॥ ७ ॥ खांद्या वाहोनी पोतडी । उतरला पैलथडी ॥ ८ ॥ नरहरी सोनार हरीचा दास । भजन करी रात्रंदिवस ॥ ९ ॥

---

# प्रेमकलहपर

## श्रीतुकाराममहाराज

१५३७ देवासीं पैं भांडों एकचित्त करूनी । आम्हासी सज्जनीं सांगितलें ॥ १ ॥ आम्हां काय आतां देवें आडो परी । भेटी नेदी तरी सुखें नेदो ॥ २ ॥ तोचि नांदो सदा हरि पैं वैकूंठीं । आम्हां देशवटी देवो सुखें ॥ ३ ॥ देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी तो एकला राहो आतां ॥ ४ ॥ चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षे गाऊं गीत गोविंदाचें ॥ ५ ॥ तुका म्हणे सर्व देवाची नष्टाई । आम्ही सुखें पाहीं डुलतसों ॥ ६ ॥

१५३८ निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग । आहे लागभाग ठायीं-चाची ॥ १ ॥ तूं माझी जननी तूं माझा जनिता । रखुमाईच्या कांता पांडुरंगा ॥ २ ॥ मुळींच्या ठेवण्या आहे अधिकार । दुरावोनि दूर गेलों होतों ॥ ३ ॥ पोटींच्या आठवा पाडिला विसर । कांहीं आला भार माथां तेणें ॥ ४ ॥ राखिला हा होता बहु चोंघाचार । साक्षीनें वेव्हार निवडिला ॥ ५ ॥ तुका म्हणे कांहीं बोलणें नलगे आतां पांडुरंगे तूं मी ऐसें ॥ ६ ॥

१५३९ पांडुरंगें पाहा खादलीसे रडी । परि नाम शेंडी धरिलं आम्हीं ॥ १ ॥ आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजि-

खतोरें येथें ॥ २ ॥ कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आम्ही पातकीहि ॥ ३ ॥ याचें पावनपण सोडवा जी तुम्ही । पतित-पावन आम्ही आहों खरे ॥ ४ ॥ आम्ही तंव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्ही मेलों तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥ ६ ॥

१५४० आमचा तूं ऋणी ठायींचाचि देवा । मागावया ठेवा आलों द्वारा ॥ १ ॥ वर्म तुझें आम्हां सांपडलें हातीं । धरियेलें चित्तीं दृढ पाय ॥ २ ॥ वैसलों धरणें कोंडोनियां द्वारीं । आंतूनि बाहेरी येवों नेदीं ॥ ३ ॥ तुज मज सरी होईल या विचारें । जळो भांडखोरें निलाजिरीं ॥ ४ ॥ भांडवल माझें मिरविसी जनीं । सहस्र वोवणी नाममाळा ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हीं केली जीवें साटी । तुह्मां आम्हां तुटी घालूं आतां ॥ ६ ॥

१५४१ जेणें तुज झालें रूप आणि नांव । पतित हें दैव तुझें आम्ही ॥ १ ॥ नाहीं तरी तुज कोण हें पुसतें । निराकारी तेथें एकाएकीं ॥ २ ॥ अंधारें दीपातें आणियेली शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची ॥ ३ ॥ धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावें तें ॥ ४ ॥ अमृतासी मोल विषाचिये गुणें । पितळें तरी सोनें उंच निंच ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्हीं असोनियां जाण । तुज देवपण आणियेलें ॥ ६ ॥

१५४२ धरूनि पालव असुडीन करें । मग काय वरें दिसे लोकीं ॥ १ ॥ काय तें विचारा ठायींचें आपणां । जो हा नारायणा अवकाश ॥ २ ॥ अंतर पायांसी तोंवरी या गोष्टी । पडिलिया मिठी हालों नेदीं ॥ ३ ॥ रुसलेती तरी होइल बुझावणी । तांतडी करूनि साधावें हें ॥ ४ ॥ सांपडलिया आधीं कारणासी ठाव । येथें करूं भाव दृढ आतां ॥ ५ ॥ तुका म्हणे तुझे ठाउके वोभाट । मग खटपट चुकली ते ॥ ६ ॥

१५४३ तुझें म्हणवितां काय नाश झाला । ऐकें वा विठ्ठला कीर्ति तुझी ॥१॥ परी तुज नाहीं आमुचे उपकार । नामरूपा थार केलियाचे ॥ २ ॥ समूळीं संसार केला देशधडी । सांडिली आवडी ममतेची ॥ ३ ॥ लोभ दंभ काम क्रोध अहंकार । यांसीं नाहीं थार ऐसें केलें ॥ ४ ॥ मृत्तिका पाषाण तैसें केलें धन । आपलें तें कोण पर नेणों ॥ ५ तुका म्हणे झालों देहासीं उदार । आणिक विचार काय तेथें ॥ ६

१५४४ कोण पर्वकाळ पहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ॥ १ ॥ पाठवीं भातुकें प्रेमें झडकरी । नको राखों उरी पांडुरंगा ॥२॥ धरावा कोप मजवरी कांहीं । अवगुणी अन्यायी म्हणोनियां ॥ ३ काय रडवीसी नेणतियां पोरां । जाणतियां थोराचियापरी ॥ ४ काय उभी कर ठेवूनियां कटीं । बुझावीं धाकुटीं लडिवाळें ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां पडरासी पिळा । घालोनि निराळा नव्हे मग ॥ ६ ॥

१५४५ कैसा कृपाळू हें न कळसी देवा । न बोलसी सेवा घेसी माझी ॥१॥ काय ऐसें बळ आहे तुजपाशीं । पाहों हा रिघसी कोणा-आड ॥ २ ॥ पाडियेला ठायीं तुझा थारा मारा । अवघा दातारा लपसी तो ॥ ३॥ आतां तुम्हां आम्हां उरी तोंचि वरें । काय हीं उत्तरें वाढवूनी ॥ ४ ॥ तुका म्हणे मज साह्य जाले संत । म्हणऊनि मात फावली हे ॥ ५ ॥

१५४६ आम्ही नरका जातां काय येईल तुझ्या हाता । ऐसा तूं अनंता विचारी पां ॥ १ ॥ तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळ कृपानिधी ॥ २ ॥ तुझें पावनपण न चले आम्हांसीं । ऐसें हृषीकेशी कळों आलें ॥ ३ ॥ आम्ही दुःख पावों जन्म मरण व्यथा । काय तुझ्या हाता येत असे ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्हीं खादली हो रडी । आम्हीं धरली शेंडी नाम तुझें ॥ ५ ॥

१५४७ आतां सांडूं तरी हातीं ना पदरीं । सखीं सहोदरीं मोकलिलों ॥ १ ॥ जनाचारामध्यें उडाला मातेरा । झालों निलाजिरा

म्हणवूनि ॥ २ ॥ कोणाचिया दारा जावेनासें झालें । त्यांच विटं-विलें आपणांसी ॥३॥ कोण झाला माझे बुद्धिसी संचार । नाहीं कोठें थार ऐसें झालें ॥ ४ ॥ तुका म्हणे तूज भक्त झाले फार । म्हणोनियां थार नाहीं येथें ॥ ५ ॥

ज १५४८ आम्हीं पतितांनीं घालावें सांकडें । तुम्हां लागे कोडें उगवणें ॥ १ ॥ आचरतां दोष न धरूं सांभाळ । निवाड उकल तुम्हां हातीं ॥ २ ॥ न घेतां कवडी करावा कुढावा । पाचारितां देवा नामासाठीं ॥ ३ ॥ दयासिंधु नाम पतितपावन । हें आम्हां वचन सांपडलें ॥ ४ ॥ तुका म्हणे करूं अन्यायाच्या कोटी । कृपा-वंत पोटीं तूंचि देवा ॥ ५ ॥

१५४९ जे केली आळी ते अवघी गेली वायां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ १ ॥ काय समाधान केलें कोणे वेळे । कोणें माझे लळे पाळियेले ॥ २ ॥ आभासही नाहीं स्वप्नीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां काय चिंता ॥ ३ ॥ आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी झाले ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां नाहीं भरंवसा । मोक-लीसी ऐसा वाटतोसी ॥ ५ ॥

१५५० काय विनवावें कोण तो निवाड । केलें माझ्या कोड वच-नाचें ॥ १ ॥ अहो कृपानिधि गुणांच्या निधाना । माझ्या अनुमाना नयेचि हें ॥ २ ॥ वहुत करुणा केलसें भापण । एकही वचन नाहीं आलें ॥ ३ ॥ माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिती मानिली होती ऐसी ॥ ४ ॥ तुका म्हणे माझी उरली ते आटी । अभय कर कटीं न देखेंचि ॥ ५ ॥

१५५१ तुम्हां आम्हां तुटी होईल यावरी । ऐसें मज हरी दिस-तसे ॥ १ ॥ वचनाचा कांहीं न देखों आधार । करावा हा धीर कोठवरी ॥ २ ॥ सारिलें संचित होतें गांठीं कांहीं । पुढें ऋण तेंही नेदी कोणी ॥ ३ ॥ जावेंचि नलगे कोणाचिया घरा । उडाला मातेरा

तुझ्या संगें ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्हां हाचि लाभ झाला । मनुष्य-धर्म गेला पांडुरंगा ॥ ५ ॥

१५५२ तरि कां मागें वांयां कीर्ती वाढविली । जनांत आपुली ब्रिदावळी ॥ १ ॥ साच करितां आतां फिरसी माघारा । ठायींच्या दातारा नेणवेचि ॥ २ ॥ संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगईन ॥ ३ ॥ घेईन डांगोरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथांचा नाथ ऐसा ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्ही राहिलों मरोनीं । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥ ५ ॥

१५५३ कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काज जीव ठेवूं आतां ॥ १ ॥ काय तूं करिसी माझिया संचिता । धिग हें अनंता झालें जिणें ॥ २ ॥ पतितपावन राहिलों या आशा । आइकोनि ठसा कीर्ति तुझी ॥ ३ ॥ आतां कोण करी माझा अंगिकार । कळलें निष्ठुर झालासी तूं ॥ ४ ॥ तुका म्हणे माझी मांडिली निरास । करितों जीवा नास तुजसाठीं ॥ ५ ॥

१५५४ जाय परतें काय आणिला कांटाळा । बोला एक वेळा ऐसें तरी ॥ १ ॥ कांहो केली तुम्ही निष्ठुरता देवा । मानेना हे सेवा करितों ते ॥ २ ॥ भाग्यवंत त्यांसी सांगितल्या गोष्टी । तें नाहीं अदृष्टीं आमुचिया ॥ ३ ॥ तुज ऐसा स्वामी असोनि मस्तकीं । होतसे या चुकी संचिताची ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्हांपासूनि अंतर । न पडे नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ५ ॥

१५५५ परिस काय धातु सोनें न करितु । फेडितो निभ्रांतु लोहपांगु ॥ १ ॥ काय तयाहूनि झालासी बापुडें । फेडिता सांकडें माझें एक ॥ २ ॥ कल्पतरु कोड पुरवितो रोकडा । चिंतामणि खडा चिंतिलें तें ॥ ३ ॥ चंदनाच्या वासें वसतां चंदन । होती काष्ठ आन वृक्षयाती ॥ ४ ॥ काय त्याचें उणें झालें त्यासी देतां । विचारी अनंता तुका म्हणे ॥ ५ ॥

१५५६ आम्ही म्हणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥ १ ॥ हागे माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥ २ ॥ आम्ही तुज असों देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥ ३ ॥ तुका म्हणे मज धरियेलें बळें । पंचभूतीं खळें करुनियां ॥ ४ ॥

१५५७ कामक्रोध माझे लावियेले पाठीं । बहुत हिंपुटी झालों देवा ॥ १ ॥ आवरितां तुझे तुज नावरती । थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें ॥ २ ॥ तुझिया विनोदें आम्हां प्राणासाटीं । भयभीत पोटीं सदा दुःखी ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हांसे कोण समर्थासी ॥ ४ ॥

१५५८ तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥ १ ॥ काय जाणों देवा होसील निजला । नेणोंजी विठ्ठला मायबापा ॥ २ ॥ भवबंधनाचे तुटतील फांसे । तें येथें असे अव्हेरिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें दचकलें मन । वाटे वांयांविण श्रम केला ॥ ४ ॥

१५५९ निर्गुणाचें घ्यावें गुणासी दर्शन । एकाएकीं भिन्न भेद घडे ॥ १ ॥ तुम्हां आम्हां आतां न पडे यावरी । आहों तैंचि वरीं जेथें तेथें ॥ २ ॥ आपणापासुनी नसावें अंतर । वेचिलें उत्तर म्हणउनि ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगा आली कठिणता । आमच्या अनंता तुम्हां ऐसी ॥ ४ ॥

१५६० सेवकासी आज्ञा निरोपासी काम । स्वामीचे ते धर्म स्वामी जाणे ॥ १ ॥ मनाचिये मुळीं रहावें बैसोन । आकर्षावे गुण पायांपाशीं ॥ २ ॥ भेटीचे तांतडी करितसें लाहो । ओंवाळावा देहो ऐसें वाटे ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें करावें कारण । आपुलें जतन ब्रीद करा ॥ ४ ॥

१५६१ आम्ही भाविकें हे काय जाणों खोडी । आइकोनि प्रौढी

विनविलें ॥ १ ॥ नाहीं ऐसें येथें जालेती असतां । वाढविली चिंता अधिक सोसें ॥ २ ॥ न कळेचि आधीं करितां विचार । न धरितां धीर आहाचता ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां वचनें वचन । वाढेल तीक्षण बुद्धि जाली ॥ ४ ॥

१५६२ नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केली पुढें ॥ १ ॥ अपराध कीजे घडला तो क्षमा । सिकवा उत्तमा आमुचिया ॥ २ ॥ धरूं धावें आगी पोळेल तें नेणे । ओढिलिया होणें माते वाळा ॥ ३ ॥ तुका म्हणे भार ज्याचा जार त्यासी । प्रवीण येविशीं असा तुम्ही ॥ ४ ॥

१५६३ पापी म्हणों तरी आठवितों पाय । दोष बळी काय तयाहूनि ॥ १ ॥ ऐशा विचाराची घालूनि कोंडणी । काय चक्रपाणी पहातोसी ॥ २ ॥ एक वेळ जेणें पुत्राच्या उद्देशें । घेतल्याचें कैसें नेलें दुःख ॥ ३ ॥ तुका म्हणे अहो वैकुंठनायका । चिंता कां सेवका तुमचिया ॥ ४ ॥

१५६४ कवणाशीं भांडों कोण माझें साहे । कोण मज आहे तुजविण ॥ १ ॥ धरिलें उदास दुरदुरांतरें । सांडी एकसरें केली माझी ॥ २ ॥ आइकोन माझे नाइकसी बोल । देखोनियां खोळ बुंथी ऐसी ॥ ३ ॥ तुका म्हणे एके गांवींची वसती । म्हणऊनि खंती वाटे देवा ॥ ४ ॥

१५६५ सेवकें करावें सांगितलें काम । सिक्याच्या तो धर्म स्वामी राखे ॥ १ ॥ काय देवा नेणों आलें गांडेपण । तुम्ही शक्तिहीन झाले दिसां ॥ २ ॥ विष्णुदास आम्ही निर्भर ज्या बळें । तें दिसे या काळें अव्हेरिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे मूळ पाठवा लौकरी । किंवा करूं हरी काय सांगा ॥ ४ ॥

१५६६ आतां नको चुकों आपुल्या उचिता । उदारा या कांता रखुमाईच्या ॥ १ ॥ आचरावे दोष हें आम्हां विहित । तारावे पतित

तुमचें तें ॥ २ ॥ आम्ही तों आपुलें केलेंसे जतन । घडो तुम्हांकून घडेल तें ॥ ३ ॥ तुका म्हणे विठो चतुरांच्या राया । आहे तें कासया मोडों देसी ॥ ४ ॥

१५६७ स्वप्नींचें हें धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये ॥ १ ॥ आजुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी ॥ २ ॥ बोलोनियां फेडा जीवींची काजळी । पाहेन कोमळीं चरणांवुजें ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥ ४ ॥

१५६८ आपुल्या आपण उगवा लिगाड । काय माझें जड करून घ्याल ॥ १ ॥ उद्धारासी काय उधाराचें काम । वाढवूंचि श्रम नये देवा ॥ २ ॥ करा आतां मजसाठीं वाड पोट । ठाव नाहीं तंट झाले लोकीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बाकी झडलियावरी । न पडे व्यवहारीं संचिताचे ॥ ४ ॥

१५६९ तुझिया विनोदें आम्हांसीं मरण । सोसियेला सीण बहु फेरे ॥ १ ॥ आतां आपणाचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥ २ ॥ वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म सांपडलें सोपें । गोवियेलों पापें पुण्यें होतों ॥ ४ ॥

१५७० धरूनियां मनीं बोलिलों संकल्प । होसी तरि व.प सिद्धी पाव ॥ १ ॥ उत्कंठा हे आजी झाली माझे पोटीं । मोकलिली गोष्टी टाळाटाळ ॥ २ ॥ माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधि उत्तर न साहे पैं ॥ ३ ॥ तुका म्हणे जरी दिली आठवण । तरि अभिमान धरीं याचा ॥ ४ ॥

१५७१ सांडावीं हे भीड अधमाचे चाळे । मद्यपी बरळे भलत्या छंदें ॥ १ ॥ ऐसे तंव तुम्ही नाहीं जी दिसत । कां हें अनुचित वदलेत ॥ २ ॥ फांटा झाला त्यासी नाहीं वोढावारा । वेरसाचे खरा

हा तो गुण ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं ज्याच्या बापा ताळा । तो देखे विटाळा संतां आंगीं ॥ ४ ॥

१५७२ करवा उद्धार किंवा घ्यावी हारी । एका बोला स्थिरी राहें देवा ॥ १ ॥ निरसनें माझा होईल संदेह । अवघेंचि आहे मूळ पायीं ॥ २ ॥ राहिलों चिकटून कांहींचि न कळे । कोणा नेणों काळें उदय भाग्य ॥ ३ ॥ तुका म्हणे बहु उद्वेगला जीव । भाकीतसें कींव देवराया ॥ ४ ॥

१५७३ झड मारोनियां बैसलों पंगती । उठवितां फजिती दातयाची ॥ १ ॥ काय तें उचित तुम्हां कां न कळे । कां हो झांका डोळे पांडुरंगा ॥ २ ॥ घेईन इच्छेनें मागोनि सकळ । नाहीं नव्हे काळ बोलायाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे झालों माना अधिकारी । नाहीं लोक परी लाज देवा ॥ ४ ॥

१५७४ करावा कांटाळा नव्हे हें उचित । आधींच कां प्रीत लावियेली ॥ १ ॥ जाणतसां तुम्हो रूपाचें लाघव । आपुलाले जीव घेतें ऐसा ॥ २ ॥ काय म्हणऊनि आलेती आकारा । आम्हां उजगरा करावया ॥ ३ ॥ तुका म्हणे भीड होती आजिवरी । आतां देवा उरी कोण ठेवी ॥ ४ ॥

१५७५ संदेह निरसे तरि रुचिकर । फिक्यासी आदर चवी नाहीं ॥ १ ॥ आतां नको मज खोट्यानें फटवूं । कोठें येऊं जाऊं वेळोवेळां ॥ २ ॥ गेला तरि काय जीवाचें सांकडें । वांचउनि पुढें काय काज ॥ ३ ॥ तुका म्हणे कसीं निवडा जी वरें । केलीं तैसीं पोरें आळी पायीं ॥ ४ ॥

१५७६ प्रीतिभंग माझा केला पांडुरंगा । भक्तिरस सांगा कां जी तुम्हो ॥ १ ॥ म्हणउनि कांहीं न ठेवींचि उरी । आलों वर्मावरी एकाएकीं ॥ २ ॥ न देखोंचि कांहीं परतो माघारी । उरली ते उरीं

नाहीं मुळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आला अंतरासी खंड । तरि माझें तोंड खवाळिलें ॥ ४ ॥

१५७७ आहे तेंचि आम्ही मागों तुजपाशीं । न हों तुज ऐसीं क्रियानष्ट ॥ १ ॥ न बोलावीं वर्मे तोंच बरें दिसे । प्रकट ते कैसे गुण करूं ॥ २ ॥ एका ऐसें एका द्यावयाचा मोळा । कां तुम्हां गोपाळा नाहीं ऐसा ॥ ३ ॥ तुका म्हणे लोकां नाहीं कळों आलें । करावें आपुलें जतन तों ॥ ४ ॥

१५७८ मज ऐसें कोण उद्धरीलें सांगा । ब्रीदें पांडुरंगा बोलतसां ॥ १ ॥ हातींच्या कांकणां कासया आरसा । उरलों मी जैसा तैसा आहें ॥ २ ॥ धन्वंतरी हरी रोग्याचिये वेथे । तें तों कांहीं येथें न देखिजे ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं अनुभव अंगें । वचन वाउगें कोण मानी ॥ ४ ॥

१५७९ आमुचिया भावें तुज देवपण । तें कां विसरोन राहिलासी ॥ १ ॥ समर्थासी नाहीं उपकार स्मरण । दिल्या आठवण वांचोनियां ॥ २ ॥ चळण वळण सेवकाच्या वळें । निर्गुणाचे मुळें सांभाळावें ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां आलों खंडावरी । प्रेम देऊनि हरी बुझवावें ॥ ४ ॥

१५८० धिग जिणें त्याचा स्वामी हीनवर । मरण तें वरें भलें मग ॥ १ ॥ आइकाजी देवा ऐसी आहे नीत । काय तें उचित सांभाळावें ॥ २ ॥ देशोदेशीं धाक जयाच्या उत्तरें । तयाचें कुतरें परि भलें ॥ ३ ॥ तुका म्हणे हें कां सुचलें उत्तर । जाणोनि अंतर ओळखावें ॥ ४ ॥

१५८१ जगीं मान्य केलें हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे पुढें ॥ १ ॥ करितां कवित्व जोडितों अक्षरें । येणें काय पुरें झालें माझें ॥ २ ॥ तोंवरि हे माझी न सरे करकर । जों नव्हे विचार तुझ्या मुखें

॥ ३ ॥ तुका म्हणे तुज पुंडलिकाची आण। जरि कांहीं वंचन करिसी मज ॥ ४ ॥

१५८२ आमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धि योगा नये ॥ १ ॥ काय या राहिलें विनोदावांचून । आपुलिया भिन्न केलें आम्हां ॥ २ ॥ कोठें मूर्तिमंत दावीं पुण्यपाप। काशासी संकल्प वाहावीसी ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां आवरावा चेडा । लटिकाच पोडा पांडुरंगा ॥ ४ ॥

१५८३ तुम्ही बैसलेती निर्गुणाचे खोळे। आम्हां कां हे डोळे कान दिले ॥ १ ॥ नाइकवे तुझी अपकीर्ति देवा । अव्हेरिली सेवा न देखवे ॥ २ ॥ आपुले पोटीं तो राखियेला वाव । आम्हांसी कां भाव अल्प दिला ॥ ३ ॥ तुका म्हणे दुःखी असें हें कळों द्या । पुढिलिया धंद्या मन नेघे ॥ ४ ॥

१५८४ निष्ठुर यासाठीं करितों भाषण । आहेसी तूं सर्वजाण दाता ॥ १ ॥ ऐसें कोण दुःख आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ २ ॥ बैसलासी केणें करूनी एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ॥ ३ ॥ तुका म्हणे आलें अवघेंचि पांयांपें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ४ ॥

१५८५ वृत्तीवरि आम्हां येणें कशासाठीं । एवढी हे आटी सोसावया ॥ १ ॥ जाणतसां परी नेणते जी देवा । भ्रमाचि वरवा राखावा तो ॥ २ ॥ मोडूनि क्षरलों अभेदाची मूस । तुम्हां कां आळस वोडवला ॥ ३ ॥ तुका म्हणे होई लवकरि उदार । लांवणीचें फार काम नाहीं ॥ ४ ॥

१५८६ सुलभ कीर्तनें दिलें ठसावूनि । करितां धरणी उरी कोण ॥ १ ॥ आतां न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥ २ ॥ एका नेमें कोठें दुसरा पालट । पादर तो धीट म्हणती त्यासी

॥ ३ ॥ तुका म्हणे किती बोलसील उणें । एकाच वचनें खंड करीं ॥ ४ ॥

१५८७ देऊनियां प्रेम मागितलें चित्त । झाली फिटाफिटा तुम्हां आम्हां ॥ १ ॥ काशानें उदार तुम्हांसी म्हणावें । एक नेसी भावें एक देसी ॥ २ ॥ देऊनियां थोडें नेसील हें फार । कुंठिसी विचार अवघियांचा ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां भांडवल चित्त । देउनी दुश्चित पाडियेलें ॥ ४ ॥

१५८८ तुजच पासाव झालोंसें निर्माण । असावें तें भिन्न कासयानें ॥ १ ॥ पाहावाजी ठायीं करूनि विचार । न्यून कोठें फार असेचिना ॥ २ ॥ ठेविलिये ठायीं आशेचें पाळण । करूनि जतन राहिलोंसें ॥३॥ तुका म्हणे आतां बोलतसें स्पष्ट । जालों क्रियानष्ट तुम्हां ऐसें ॥ ४ ॥

१५८९ कांहो तुम्ही माझी वदविली वाणी । नेदा हे निवडूनि पांडुरंगा ॥ १ ॥ आणीक स्यां कोणां पुसावा विचार । समुळीं संसार दुराविला ॥ २ ॥ स्वामिसेवा म्हूण घेतली पदरीं । सांगितलें करीं कारण तें ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं शिकविलें जेणें । तो याच्या वचनें उगा राहे ॥ ४ ॥

१५९० माझा तुम्हीं देवा केला अंगीकार । हें मज साचार कैसें कळे ॥ १ ॥ कांहो कांहीं माझ्या नये अनुभवा । विचारितां देवा आहे तैसा ॥ २ ॥ लौकिकाचा मज लाविसी आभार । शिरोरत्नभार दुःखाचा हा ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं पालट अंतरीं । तेथें दिसे हरी ठकाठकी ॥ ४ ॥

१५९१ हरि तूं निष्ठुर निर्गुण । नाहीं माया बहु कठिण । नव्हे तें करिसी आन । कवणें नाहीं केलें तें ॥ १ ॥ घेऊनि हरिश्चंद्राचें वैभव । राज्य घोडे भाग्य सर्व । पुत्र पत्नी जीव । डोंबाघरीं वोपविलीं ॥ २ ॥ नळा दमयंतीचा योग । विघडिला त्यांचा संग । ऐसें जाणे जग । पुराणें ही बोलती ॥ ३ ॥ राजा शिबी चक्रवर्ती । कृपाळु दयाळु

भूतीं । तुळविलें अंतीं । तुळे मास तयाचें ॥ ४ ॥ कर्ण भिडतां समरंगणीं । बाणीं व्यापियेला रणीं । मागसी पाडोनी । तेथें दांत तयाचे ॥ ५ ॥ बळी सर्वस्वें उदार । जेणें उभारिला कर । करूनि काहार । तो पाताळीं घातला ॥ ६ ॥ श्रियाळाच्या घरीं । धरणें मांडिलें मुरारी । मारविलें करीं । त्याचें बाळ त्या हातीं ॥ ७ ॥ तुज भावें जे भजती । त्यांच्या संसारा हे गति । ठाव नाहीं पुढती । तुका म्हणे करिसी तें ॥ ८ ॥

१५९२ आम्हि भाव जाणों देवा । न कळती तुझिया मावा । गणिकेचा कुडावा । पतना न्यावा दशरथ ॥ १ ॥ तरी म्यां काय गा करावें । कोण्या रीतीं तुज पावे । न संगतां ठावें । तुम्हांविण न पडे ॥ २ ॥ दोनी फांकलिया वाटा । गोवी केली खटापटा । नव्हे धीर फांटा । आडरानें भरती ॥ ३ ॥ तुका म्हणे माझे डोळे । तुझे देखती हे चाळे । आतां येणें वेळें । चरण जीवें न सोडीं ॥ ४ ॥

१५९३ दुर्बळाचें कोण । एके घालुनियां मन । राहिलें कारण । तयावांचुनि काय तें ॥ १ ॥ कळों आलें अनुभवें । पांडुरंगा माझ्या जीवें । न सांगतां ठावें । पडे चर्या देखोनि ॥ २ ॥ काम क्रोध माझ्या देहीं । भेदाभेद गेले नाहीं । होतें तेथें कांहीं । तुज कृपा करितां ॥ ३ ॥ हें तों नव्हे उचित । नुपेक्षावे शरणागत । तुका म्हणे रीत । तुमची आम्हा न कळे ॥ ४ ॥

१५९४ कां हो वाढवितां देवा । मज घरीं समजावा । केवढा हो गोवा । फार केलें थोड्याचें ॥ १ ॥ ठेवीन पायांवरी डोई । यासी तुमचें वेंचे काई । झालों उतराई । जाणा एकएकांचे ॥ २ ॥ निवाड आपणियांपाशीं । असोन कां व्हावें अपेसी । होती गांठी तैसी । सोडुनियां ठेविली ॥ ३ ॥ तुका म्हणे गोड । होतें झालीया निवाड । दर्शनेंही चाड । आवडीच वाढेल ॥ ४ ॥

१५९५ पाहा किती आले । शरण समानचि केले । नाहीं विचा-

रिले । गुणदोष कोणांचे ॥ १ ॥ मज सेवटींचा द्यावा । ठाव तयांचिये देवा । नाहीं करीत हेवा । कांहीं थोरपणाचा ॥ २ ॥ नाहीं पाहिला आचार । कुळगोत्रांचा विचार । फेडूं आला भार । मग न म्हणे दगड ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व जाणा । तुझ्या आल्यावरी मना । केला तो उगाणा । घडल्या महादोषांचा ॥ ४ ॥

१५९६ प्रीतीचा कलह । पद्रासी घाली पीळ । सरो नेदी वाळ । मागें पुढें पित्यासी ॥ १ ॥ काय लागे त्यासीं बळ । हेडावितां कोण काळ । गोविलें सबळ । जाळीं स्नेह सूत्राचीं ॥ २ ॥ सलगी दिला लाड । बोले तें तें वाटे गोड । करी बुझावोनि कोड । हातीं देऊनि सातुकें ॥ ३ ॥ तुका म्हणे बोल कोणा । हे कां नेणां नारायणा । सलगीच्या वचना । कैचें उपजे विषम ॥ ४ ॥

१५९७ अनुभव तो नाहीं तुमाचिया दर्शनें । अइकिलें कानें वदे वाणी ॥ १ ॥ जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतां मांडेपुरी काय होतें ॥ २ ॥ नाहीं नाहीं गेली तळमळ दातारा । कांजी हरिहरा चाळाविलें ॥ ३ ॥ पत्रीं कुशलता भेटी अनादर । काय तें उत्तर येईल मानूं ॥ ४ ॥ अंतरीं सबाह्यीं कां नाहीं सारिखें । धरूनि पारिखें वर्ततसां ॥ ५ ॥ आलों आलां ऐसी दाउनियां आस । वाहो बुडतयास काय द्यावें ॥ ६ ॥ तुका म्हणे अहो चतुराशिरोमणी । किती माझी वाणी तुम्ही कोठें ॥ ७ ॥

१५९८ चित्त तुझ्या पायीं । ठेवुनि झालों उतराई ॥ १ ॥ परी तूं खोटा केशीराजा । अंतपार न कळे तुझा ॥ २ ॥ आम्ही सर्वस्वें उदार । तुज देऊनियां धीर ॥ ३ ॥ इंद्रियांची होळी । संवसार दिला बळी ॥ ४ ॥ न पडे विसर । तुझा आम्हां निरंतर ॥ ५ ॥ प्रेम एकासाठीं । तुका म्हणे न वेचे गांठीं ॥ ६ ॥

१५९९ देवा तुज मज पण । पाहों आगळा तो कोण ॥ १ ॥ तरी साच मी पतित । तूंचि खोटा दिनानाथ ॥ २ ॥ ग्वाही साधुसंत जन ।

करुनि अंगीं लावीन ॥ ३ ॥ आम्हीं धरिले भेदाभेद । तुज नव्हे त्याचा छेद ॥ ४ ॥ न चले कांहीं तुझें त्यास । आम्हीं वळकाविले दोष ॥ ५ ॥ दिशा भरल्या माझ्या मनें । लपलासी त्याच्या भेणें ॥ ६ ॥ तुका म्हणे चित्त । करी तुझी माझी नीत ॥ ७ ॥

१६०० माझीं मेलीं बहुवरी । तूं कां जैसा तैसा हरी ॥ १ ॥ विटों कैसा वांचलासी । आतां सांग मजपाशीं ॥ २ ॥ तुज देखतांचि माझा । बाप गेला आजा पणजा ॥ ३ ॥ आम्हां लागलेंसे पाठीं । बाळत्व तारुण्य काठी ॥ ४ ॥ तुज फावलें तें मागें । कोणी नसतां वादीलागें ॥ ५ ॥ तुका म्हणे तुझ्या अंगीं । मज देखतां लागलीं अवघीं ॥ ६ ॥

१६०१ आम्हीं याची केली सांडी । कोठें तोंडीं लागावें ॥ १ ॥ आहे तैसा असो आतां । चिंतें चिंता वाढते ॥ २ ॥ बोलिल्याचा मानी सीण । भिन्न भिन्न राहावें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हांपाशीं । धीरा ऐसी जतन ॥ ४ ॥

१६०२ धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तो त्याच्या दुःखें धामेजना ॥ १ ॥ इंगळासी सन्निधान अतित्याइ । क्षेम देतां काई सुख वाटे ॥ २ ॥ सप्रेमें कुरवाळी महाफणी व्याळ । आपुली तो ढाळ सांडी केवीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला । तयाचा अबोला आकाशासी ॥ ४ ॥

१६०३ मजशीं पुरे न पडे वादें । सुख दोहींच्या संवादें ॥ १ ॥ तुंचि आगळा काशानें । शिर काय पायांविणें ॥ २ ॥ वाहों तुझा भार । दुःख साहोनि अपार ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं भेद । देवा करूं नये वाद ॥ ४ ॥

१६०४ आम्ही पापी तूं पावन । हें तों पूर्वापार जाण ॥ १ ॥ नवें करूं नये जुनें । सांभाळावें ज्याचें तेणें ॥ २ ॥ मिरासीचा ठाव । राखा करुनि उपाव ॥ ३ ॥ वादें मारी हाका । देवा आइकवी तुका ॥ ४ ॥

१६०५ जैसीं तैसीं तरी । शरणागतें तुझीं हरी ॥ १ ॥ आतां न पाहिजे केलें । ब्रीद लटिकें आपुलें ॥ २ ॥ शुद्ध नाहीं चित्त । परी म्हणवितों भक्त ॥ ३ ॥ मज कोण पुसे रंका । नाम सांगे तुझें तुका ॥ ४ ॥

१६०६ समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा जन देवा ॥ १ ॥ अवगुणी जरी झालें तें वोंगळ । करावा सांभाळ लागे त्याचा ॥ २ ॥ तुका म्हणे तैसा मी एक पतित । परि मुद्रांकित झालों तुझा ॥ ३ ॥

१६०७ ऐसें कोण पाप वळी । जें जवळी येऊं नेदी ॥ १ ॥ तुम्हां तंव होईल ठावें । नेदावें कां कळों हें ॥ २ ॥ कोण झाला अंतराय । कां ते पाय अंतरले ॥ ३ ॥ तुका म्हणे निमित्याचा । आला सुचा अनुभव ॥ ४ ॥

१६०८ घालुनियां कास । वळें आलों मागायास ॥ १ ॥ प्रेमें देई पाठवूनी । पांडुरंगा सेवाऋणी ॥ २ ॥ होईं रे शहाणा । कळों नेदावें या जना ॥ ३ ॥ तुका म्हणे पायीं । जडलों मग उरलें काई ॥ ४ ॥

१६०९ आम्हीं घ्यावें तुझें नाम । तुम्ही आम्हां द्यावें प्रेम ॥ १ ॥ ऐसें निवाडिलें मुळीं । संतीं बैसोनि सकळीं ॥ २ ॥ माझी डोई पायां-वरी । तुम्हीं न धरावें दुरी ॥ ३ ॥ तुका म्हणे केला । खंड दोघांचा विठ्ठला ॥ ४ ॥

१६१० अंधळ्याची काठी । हिरोनियां कडा लोटी ॥ १ ॥ हे कां देखण्या उचित । लाभ किंवा कांहीं हित ॥ २ ॥ साकर म्हणोनि माती । चाळवूनि द्यावी हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे वाटे । देवा पसरावे सराटे ॥ ४ ॥

१६११ माझ्या वडिलांची मिरासी देवा । तुझी चरण सेवा पांडु-रंगा ॥ १ ॥ उपवास पारणें राखिला दारवंटा । केला भोगवटा

आम्हांलागीं ॥ २ ॥ वंशपरंपरा दास मी अंकित । तुका मोकलीतां लाज कोणा ॥ ३ ॥

१६१२ जरि मी नव्हतों पतित । तरि तूं पावन कैंचा येथ ॥ १ ॥ म्हणोनि माझें नाम आधीं । मग तूं पावन कृपानिधी ॥ २ ॥ लोहो महिमान परिसा । नाहीं तरी दगड तैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे याचकभावें । कल्पतरु मान पावें ॥ ४ ॥

१६१३ जाणोनी अंतर । टाळिसील करकर ॥ १ ॥ तुज लागली हे खोडी । पांडुरंगा बहु कुडी ॥ २ ॥ उठविसी दारीं । धरणें एखादियापरी ॥ ३ ॥ तुका म्हणे पाय । कैसे सोडीन तें पाहें ॥ ४ ॥

श्रीनिळोबामहाराज

१६१४ न कळती तुझिया भावा । दैत्यां देवां आणि मानवां ॥१॥ कैसें तुझें रुप नाम । कोण कुळ याति धर्म ॥ २ ॥ जागृत आहेसी कीं निजलेला । उपवासीची कीं धाला ॥ ३ ॥ निळा म्हणे जित कीं मेला । न वजसी कोणीही देखिला ॥ ४ ॥

१६१५ येतो जातो ना दिसे परी । नित्य व्यभिचारी चित्ताचा ॥ १ ॥ ऐसाचि याचा चोरटा खेळ । आहे चक्रचाळ मुळींचाची ॥ २ ॥ नेदी कळों न दावीच अंग । उमटोंचि माग कैसा तो ॥ ३ ॥ निळा म्हणे सायास करितां । होतात वृथा आमुचे ते ॥ ४ ॥

१६१६ एकपणाचा घेऊनि त्रास । नेदीच दुसऱ्यास आड येऊं ॥ १ ॥ ऐसा मुळींचाचि चोरटा हरि । चोरिचि वरी मन याचें ॥ २ ॥ पंचामृतें पांचहि विषयें । चाटूनियां जाय वरावरी ॥ ३ ॥ निळा म्हणे याचे शोधितांहि मार्ग । न लगोचि अनंग हातींचि हा ॥ ४ ॥

१६१७ गोविलें इंद्रियां । पाय दिठी दावूनियां ॥ १ ॥ ऐसा लाघवी नाटकी । चोर चैतन्य चेटकी ॥ २ ॥ गुणीं गुणांचा वोतला । रूपा-

कृती उभा ठेला ॥ ३ ॥ निळा म्हणे पुंडलीकें । आणिला भुलवावया लोकें ॥ ४ ॥

१६१८ जिहीं अवलोकिला डोळां । हरिल्या त्यांच्या जीवनकळा ॥ १ ॥ ऐसा अनादि हा बुडवणा । आहे ठावा विचक्षणा ॥ २ ॥ चित्त वित्तें आपणा ऐसें । करूनि टेवी निजध्यासें ॥ ३ ॥ निळा म्हणे पाडिल्या गांठी । न सोडी नष्ट हा शेवटीं ॥ ४ ॥

१६१९ तुम्हां आम्हां नित्य भेटी । नाहीं तुटी कल्पांतीं ॥ १ ॥ प्रभा केविं सांडी भानु । हुताशनु दिपनातें ॥ २ ॥ मृत्तिकेतें करूनि घट्ट । कैंचा पट्ट तंतूविण ॥ ३ ॥ निळा म्हणे आम्हावीण । नाहींच देवपण तुम्हांसी ॥ ४ ॥

१६२० वेडें वांकुडें बोलिलें । निळा पाहिजे उपसाहिलें ॥ १ ॥ देवा तुम्ही रमाकांत । भक्त तुमचे चरणांकित ॥ २ ॥ सूर्य जेवीं नव्हे किरण । सागर लहरी तो समान ॥ ३ ॥ निळा म्हणे तूं व्यापक । भक्त एकदेशी क्षुल्लक ॥ ४ ॥

१६२१ आणिकांसी सांगे आशेचें बंधन । सदाचा बराडी असोनी आपण ॥ १ ॥ काय म्हणावें यावरि आतां । नष्टाचा परमनष्ट हाचि हा पाहतां ॥ २ ॥ भक्ताच्या हाताची पहातसे वास । कांहीं देतील म्हणउनी टोकताचि बैसे ॥ ३ ॥ जळ फळ पुष्प देतां कांहींचि न सोडी । देऊं जातांचि घाली हा तोंडीं ॥ ४ ॥ आशेचा बांधला देव हा कैसा । काय निवारील आमुची आशा ॥ ५ ॥ भक्त नेदिती तें उपवासी बैसे । काय खाईल जवळी कांहींचि या नसे ॥ ६ ॥ निळा म्हणे हा अनाथ बापुडा । जाणती संत परि न बोलती भीडा ॥ ७ ॥

१६२२ ऐकोनि संत हांसतील । तुम्हांसी येईल मग लाज ॥ १ ॥ कौल दिला राहे सुखें । न म्हणे मुखें दे ऐसें ॥ २ ॥ मागावें तें आम्हांचि जवळी । आहे नामावळी पढों सुखें ॥ ३ ॥ आणिखी तुमची

नाहीं आशा । ठेवा कैशा मुक्तिहि त्या ॥ ४ ॥ निळा म्हणे आपुल्याचि सुखें । असों हरिखें अखंडित ॥ ५ ॥

१६२३ तुम्हीं देवा कृपावंत । आम्ही अनाथ दुर्बळें ॥ १ ॥ म्हणोनियां थोरपण तुम्हां । येतें पुरुषोत्तमा आमुचेनि ॥ २ ॥ समानपणें असतों तरी । तुमची थोरी न दिसती ॥ ३ ॥ निळा म्हणे लोखंडें जैसा । दिधला परिसा वडिवार ॥ ४ ॥

१६२४ हरूनियां घ्यावें चित्त । अवघेंचि वित्त धन माझें ॥ १ ॥ हें तों उचित तुम्हां । पुरुषोत्तमा विचारा ॥ २ ॥ दर्शनाचें हेंचि फळ । सोडावें निढळ करूनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे होईल टीका । माजी या लोका तुमचीच ॥ ४ ॥

१६२५ देवपण तुम्ही गमाविलें देवा । नाइकोनी धांवा येणें काळें ॥ १ ॥ न करा धांवणें केल्या कंठस्फोट । क्रिया ऐसी नष्ट धरियेली ॥ २ ॥ प्रेतापाशीं हाका देतां तें नाईकें । थोठावला ठाके शोक नाना ॥ ३ ॥ निळा म्हणे नये करूं आतां आस । तुमची हें चित्तास कळों आलें ॥ ४ ॥

१६२६ नसतां गुण स्वाभाविक । वस्तूचि तरि निरर्थक ॥ १ ॥ तेवीं देवा देवपण । नसतां अंगीं तो पाषाण ॥ २ ॥ विना परिमळें कस्तुरी । मृत्तिकाचि तें निजनिर्धारीं ॥ ३ ॥ निळा म्हणे न मारी जिवा । तरी तें विषचि नव्हे तेव्हां ॥ ४ ॥

१६२७ भक्तिपंथें न चले कोणीं । वाट जाईल मोडोनी ॥ १ ॥ जरि अनाथा धांवणें । न कराल तुम्ही थोरपणें ॥ २ ॥ आमचा जन्म वांयां गेला । शब्द तुम्हासी लागला ॥ ३ ॥ निळा म्हणे नव्हे भली । पुढें वाट खोळंबली ॥ ४ ॥

१६२८ मृत्यूची अवस्था नेणेंचि अमृत । पीडा भाग्यवंत दरिद्राची ॥ १ ॥ तैसें तुम्ही नेणा आमुचे तळमळे । भोगितां सोहळे आपुलेचि ॥ २ ॥ सिंधु काय जाणे तहानेचि बाधा । पयोनिधि क्षुधा कैसी असे

॥ ३ ॥ निळा म्हणे रवी न देखे अंधारें। उष्मा सुधाकारें कवणे काळीं ॥ ४ ॥

१६२९ येईल चित्तासी तें करा। तुम्ही आतां विश्वंभरा ॥ १ ॥ आमुचें वायां गेलें जिणें । नांदा तुम्ही देवपणें ॥ २ ॥ केली आम्ही तोंडपिटी । फजिती व्हावया शेवटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे निजाभिमान। तुम्हीं सांडिला इमान ॥ ४ ॥

१६३० लोभियाने धन केलें भूमिगत। दगडही थित घालुनी वरी ॥ १ ॥ तैसें तुम्हीं देवा केलें आपणासी । कळंक यशासी लावियेला ॥ २ ॥ बुडविलें राज्य रायें सुरापानें । नसतां सावधान राज्यकार्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे आळसें बुडविला संसार। न गमतां व्यवहार साउकारें ॥ ४ ॥

१६३१ वांयां संतांची ही बोली । वचनें त्यांचीं लाजविलीं ॥ १ ॥ लटिकाचि केला कीर्तिघोष । येथें तो अवघीच निरास ॥ २ ॥ माझाचि मज अनुभव झाला । नाहीं सावा धांवा केला ॥ ३ ॥ निळा म्हणे पालट बुद्धि । दिसे तुमची कृपानिधी ॥ ४ ॥

१६३२ सांडियलें बाळा । कैसी निष्ठुर वेल्हाळा ॥ १ ॥ ऐसीं बोलतील सकळें । नारी नर हांसती बाळें ॥ २ ॥ माय नव्हे म्हणती लांव । ऐसें उपहासिती सर्व ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्व जनीं । ऐसी होईल टेहणी ॥ ४ ॥

१६३३ बोलिलों तें क्षमा करा । विश्वंभरा अपराध ॥ १ ॥ सेवकांनीं कीजे सेवा । तुम्हीं तों देवा देवोचि ॥ २ ॥ चावळलों तें सलगी केली । उपसाहिली पाहिजे ॥ ३ ॥ निळा म्हणे न कळे लीला। अकळ कळा तुमची ते ॥ ४ ॥

१६३४ असों चरणावरी तुमच्या ठेऊनियां मन । करूनियां कीर्तन रूपीं तुमाचिया दृष्टी ॥ १ ॥ होईल ते हो कैसी आमुची गती । नेणों योग युक्ती तप साधन दुसरें ॥ २ ॥ सांगितलें संतीं करा

नामाचा घोक। नलगे मग आणिक कृपा करील श्रीहरी ॥ ३॥ निळा म्हणे विश्वासें त्या राहिलों ठायीं। ठेऊनियां पायीं जीव भाव सकळ ॥ ४ ॥

१६३५ आणिक तों युक्ति नाहीं माझ्या हातीं। आहें मूढमती म्हणूनियां ॥ १ ॥ वारंवार तुम्हां करितों सुचना। नामें दयाघना उच्चारुनी ॥ २ ॥ पतितपावन ऐसी ब्रिदावळी। रुळते पायांतळीं प्रतिज्ञेची ॥ ३ ॥ निळा म्हणे तिचा प्रताप दाखवा। माझा हा निरसावा अहंभाव ॥ ४ ॥

१६३६ संतवचनें खरीं होती। वाढेल जगीं तुमची कीर्ति ॥ १ ॥ जरी माझें समाधान। कराल देउनी आलिंगन ॥ २ ॥ नाहीं तुम्हां जाणें येणें। कांहीं कोठूनियां धांवणें ॥ ३ ॥ निळा म्हणे विश्वंभरा। प्रकटा हृदयीं वास करा ॥ ४ ॥

१६३७ नामें आळवितां ओठीं। तुम्हां पोटीं भय वाटे ॥ १ ॥ नेणों कांहीं मागतील। किंकर येतील वैकुंठा ॥ २ ॥ काय वाटूं किती देऊं। म्हणोनियां जिऊ निबुजला ॥ ३ ॥ ऐसें जाणोनी लपालेती। घेतलें चित्तीं भय वाटे ॥ ४ ॥ याचिलागीं उत्तर न द्या। कळलें गोविंदा मनोगत ॥ ५ ॥ निळा म्हणे सुखी असा। न मागों सहसा आण तुमची ॥ ६ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१६३८ आम्हांपासीं काय मागसी तूं देवा। नाहीं भक्तिभाव भांडवल ॥ १ ॥ भांडवल गांठीं देखोनि साचार। सुदाम्याची फार पाठ घेसी ॥ २ ॥ घेसी सोडूनियां पोहे मुठीभर। हिडसावल्या कर नामा म्हणे ॥ ३ ॥

१६३९ अपराध कोटि हेचि माझी जोडी। पावनत्व प्रौढि नाम तुझें ॥ १ ॥ द्रौपदी संकटीं वस्त्रें पुरविलीं। धांव त्वां घेतली गजेंद्रासी ॥ २ ॥ उपमन्या लागीं आळी पुरविली। अढळपदीं दिधली

वस्ती ध्रुवा ॥ ३ ॥ नामा म्हणे करा करुणा केशवा । तूं माझा विसांवा पांडुरंगा ॥ ४ ॥

१६४० बरें आम्हा कळो आलें देवपण । आतां गुज कोण राखे तुझें ॥ १ ॥ मारिलें कां देवा मज आजिवरी । आतां बरोबरी तुज मज ॥ २ ॥ जें आम्हीं बोलतों आहे तुझे आंगीं । देईन प्रसंगे शिव्या तुज ॥ ३ ॥ निलाजऱ्या तुज नाहीं यातिकुळ । चोरटा शिंदळ ठावा जना ॥ ४ ॥ नामा म्हणे मज खवळिलें भांडा । आतां धीर तोंडा न धरवे ॥ ५ ॥

१६४१ दास झाल्यावरी करिसी उदास । मनीं तें तुम्हांस आणीं देवा ॥ १ ॥ सोशिले प्रवास जन्म जन्मांतर । करिसी अव्हेर आम्हांलागीं ॥ २ ॥ भार खांद्यावरी घेउनी हिंडवी । होसी मज-विशीं पाठमोरा ॥ ३ ॥ श्रुति सावकाश गाती इतिहास । काय कासाविस होय तुम्हां ॥ ४ ॥ नामा म्हणे नको वाउगे उदीम । न सोडीं मी नाम केल्या कांहीं ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

१६४२ अरे विठ्या विठ्या । मूळ मायेच्या कारट्या ॥ १ ॥ तुझी रांड रंडकी झाली । जन्मसावित्री चुडा ल्याली ॥ २ ॥ तुझें गेलें मढें । तुला पाहून काळ रडे ॥ ३ ॥ उभी राहुनी अंगणीं । शिव्या देत दासी जनी ॥ ४ ॥

## श्रीकान्होपात्रा

१६४३ पतितपावन म्हणविसी आधीं । तरी कां उपाधी भक्ता-मागें ॥ १ ॥ तुझें म्हणवितां दुजें अंगसंग । उणेपणा सांग कोणा-कडे ॥ २ ॥ सिंहाचें भातुकें जंबुक पैं नेतां । थोराचिया माथां

लाज वाटे ॥ ३ ॥ म्हणे कान्होपात्रा देह समर्पणें । करावा जतन ब्रिदासाठीं ॥ ४ ॥



# श्रीविठ्ठलपर

## श्रीतुकाराममहाराज

१६४४ माउलीसी सांगे कोण । प्रेमें वाढवीत तान्हया ॥ १ ॥ अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ॥ २ ॥ मायबापाची उपमा । तुज देऊं मेघश्यामा ॥ ३ ॥ तेही साजेना पाहतां । जीवलगा पंढरिनाथा ॥ ४ ॥ माय पाळी संसारीं । परलोकीं राहे दूरी ॥ ५ ॥ तैसा नव्हेसी अनंता । काळावरी तुझी सत्ता ॥ ६ ॥ तुका म्हणे नारायणा । तुम्हां बहुत करूणा ॥ ७ ॥

१६४५ धर्म रक्षावया अवतार घेसी । आपुल्या पाळिसी भक्तजना ॥ १ ॥ अंबऋषीसाठीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळीले कितीएक ॥ २ ॥ धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तूं बोल साच करीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधु ॥ ४ ॥

१६४६ साधावया भक्तिकाज । नाहीं लाज धरीत ॥ १ ॥ ऐशियासी शरण जावें । शक्ती जीवें न वंची ॥२॥ भीष्म पण केला खरा । धनुर्धरा रक्षिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे साक्ष हातीं । तों म्यां चित्तीं धरियेला ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

१६४७ भक्त-कृपाळू माउली । कटीं कर उभी ठेली ॥१॥ मोहें पाहे मुखाकडे । भेटावया वाडेंकोडें ॥ २ ॥ परम प्रीतीचा वोरस । सदा-

सर्वदा उल्हास ॥ ३ ॥ निळा म्हणे सुप्रसन्न । भक्तांलागीं हास्य-वदन ॥ ४ ॥

१६४८ मुसावलें मुसें । प्रेम भक्तांचे वोरसें ॥ १ ॥ धरूनियां विठ्ठलरूप । इटे ठाकले चिद्रूप ॥ २ ॥ सांवळें सुंदर । कसुनियां पीतांबर ॥ ३ ॥ निळा म्हणे पदकें गळा । वैजयंती सुमनमाळा ॥ ४ ॥

१६४९ ऐसा उदार देवादेवो । पंढरिरावो सुखसिंधु ॥ १ ॥ ज्याचें देणें न सरे कधीं । कल्पावधी पर्यंत ॥ २ ॥ देवां दैत्यां शेषादिकां । सप्तहिलोकां मानवांसी ॥ ३ ॥ निळा म्हणे ठाया ठावो । जाणें भावो अंतरिंचा ॥ ४ ॥

१६५० गाउनियां आल्हर मुखें । निजीं निजवी त्या सुखें ॥ १ ॥ आवडि ते नीच नवी । वस्त्रें अळंकार लेववी ॥ २ ॥ माझे दिठावेल झणे । उतरी वरुनी निंबलोणें ॥ ३ ॥ निळा म्हणे आई । परम कृपाळू विठाई ॥ ४ ॥

१६५१ ऐशी विठाई माउली । अनाथां कृपेची साउली ॥ १ ॥ उभी असे निरंतर । ठेऊनियां कटीं कर ॥ २ ॥ देउनी प्रेमाचें भातुकें । दासां अवलोकी कौतुकें ॥ ३ ॥ निळा म्हणे महिमा इचा । वर्णितां कुंठित वेदवाचा ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१६५२ विठ्ठलासी पाहें विठ्ठलासी ध्यायें । विठ्ठलासी गायें सर्वकाळ ॥ १ ॥ विठ्ठल हा वृत्ति विठ्ठल जपणें । चित्त वित्त मनें सर्वकाळ ॥ २ ॥ सबाह्य विठ्ठल दाटे घनवट । दशादिशा अफाट विठ्ठलाचि ॥ ३ ॥ नामा म्हणे तुम्ही विठ्ठल होऊन । अभंग भजन करीतसां ॥ ४ ॥

१६५३ तुझें तुज सांकडें पडलें थोर कोडें । तें करी माजीवडे ब्रह्मार्पण ॥ १ ॥ ब्रह्म हरी ध्याई मन ठेवीं ठायीं । विठ्ठलाच्या पायीं दिनानिशीं ॥ २ ॥ अनुभव राहणी विठ्ठल निशाणी । घडेल पर्वणी

नित्यकाळ ॥ ३ नामा म्हणे सुघड मन करीं वाड । इंद्रियांची चाड धरूं नको ॥ ४ ॥

१६५४ पांडुरंगें प्राप्त होईल सकळ । चरणकमळ ध्यारे मनीं ॥ १ ॥ मनीं मानासिक न करावा कधीं । नाम ध्यारे आधीं केशवाचें ॥ २ ॥ केशवाचें नाम पावन पवित्र । महाभाष्यसूत्र हेंचि सांगे ॥ ३ ॥ नामा म्हणे तुम्हो करावें कीर्तन । पंढरीचें ध्यान चुकों नका ॥ ४ ॥

१६५५ मायेचा कळवळा मायाचि जाणे । तैसें मी तान्हें माउलिये ॥ १ ॥ विठ्ठल श्रीरंग डोळस प्रसन्न । नित्य अमृतघन वोळला सदा ॥ २ ॥ जननीजनक तूंचि वो मुकुंदा । नाम हें गोविंद शुद्धरसु ॥ ३ ॥ येईं वो केशवे नित्य नामरूपें । मी तुज आलापें आळवीत ॥ ४ ॥ माधवा श्रीधरा वेगीं येईं त्वरें । मज वो नावरे प्रेमवेधु ॥ ५ ॥ नामा म्हणे तूं जीवन आमुचें । नित्य केशवाचें प्रेम मज ॥ ६ ॥

१६५६ केशवासी पाहे केशवासी ध्याये । केशवासी गायें सर्वकाळ ॥ १ ॥ केशव हाचि वृत्तीसह मन । केशवासी ध्यान सर्वकाळ ॥ २ ॥ सबाह्य अंतरीं सांडीना कोणासी । जाणों अंतरासी साक्षभूत ॥ ३ ॥ नामा म्हणे तूं केशव होऊनी । पंढरी पाटणीं नांद बापा ॥ ४ ॥

१६५७ विठोबाचे पाय जन्मोनी जोडावे । संबंधी तोडावे कामक्रोध ॥ १ ॥ ऐक्य सुख घ्यावें एकविध भावें । प्रेम न संडावें आवडीचें ॥ २ ॥ अनंत जन्मा यावें ऐसें भाग्य व्हावें । एकवेळां जावें पंढरीसी ॥ ३ ॥ वृत्तिसहित मन पायींच ठेवावें । अद्वैत भोगावें प्रेमसुख ॥ ४ ॥ देहीं देहभाव प्रकृति दंडावे । सांडणें सांडावें ओवाळूनी ॥ ५ ॥ नामा म्हणे ऐसें घेतलें माझ्या जीवें । विठोबा पुरवावें आर्त माझें ॥ ६ ॥

१६५८ भक्तीची अपेक्षा धरोनी अंतरीं । राहे भीमातीरीं पंढरीये ॥ १ ॥ अठ्ठावीस युगें गेलीं विचारितां । निगम सर्वथा नव्हे देखा ॥ २ ॥ कटीं कर उभा शिणलें शरीर । धरोनियां निर्धार भक्तिभावो ॥ ३ ॥ नामा म्हणे आतां नको खटपट । आमुचे बोभाट नको पाहूं ॥ ४ ॥

१६५९ विठ्ठल आवडी प्रेमभावो । विठ्ठलनामाचा रे टाहो । तुटला हा संदेहो । भव मूळव्याधींचा ॥ १ ॥ म्हणा नरहरी उच्चार । कृष्ण हरी श्रीधर । हेंचि नाम आम्हां सार । संसार तरावया ॥ २ ॥ एकतत्त्व त्रिभुवनीं । हेंचि आम्हां हरीपर्वणी । जे गाइजे पुराणीं । वेदशास्त्रांसहित ॥ ३ ॥ नेणों नामाविण कांहीं । विठ्ठल कृष्ण लवलाहीं । नामा म्हणे तरलों पाहीं । विठ्ठल विठ्ठल म्हणतांचि ॥ ४ ॥

१६६० विठ्ठल आमुचें सुखाचें जीवन । विठ्ठल स्मरण प्रेमपान्हा ॥ १ ॥ विठ्ठलचि ध्यावों विठ्ठलचि गावों । विठ्ठलचि पाहों सर्वांभूतीं ॥ २ ॥ विठ्ठलापरतें न दिसे सर्वथा । कल्प येतां जातां गर्भवास ॥ ३ ॥ नामा म्हणे चित्तीं आहे सुखरूप । संकल्पविकल्प मावळती ॥ ४ ॥

१६६१ निर्गुणाचें वैभव आलें भक्तिमिषें । तें हें विठ्ठलवेषें अवतरलें ॥ १ ॥ बरवियाः बरवें पाहतां नित्य नवें । हृदयीं ध्यातां निवे त्रिविधताप ॥ २ ॥ चोविसांवेगळें सहस्रां आगळें । निर्गुणा निराळें शुद्धबुद्ध ॥ ३ ॥ वेदां मौन पडे श्रुतीसी कानडें । वर्णितां कुवाडें पुराणासी ॥ ४ ॥ भावाचें आळूक भुललें भक्तिसुखें । धरिलें पुंडलिकें साधूनियां ॥ ५ ॥ नामा म्हणे आम्हां अनाथां लागुनी । निढारलें नयनीं वाट पाहे ॥ ६ ॥

१६६२ ज्ञानियांचें ज्ञेय ध्यानियांचें ध्येय । पुंडलिकाचें प्रिय सुखवस्तु ॥ १ ॥ तें हें समचरण उभें विटेवरी । पहा भीमातीरीं विठ्ठलरूप ॥ २ ॥ जें तपस्वीयांचें तप जें जपकांचें जाप्य । योगे-

यांचें गोप्य परमधाम ॥ ३ ॥ जें तेजकांचें तेज जें गुरुमंत्राचे गुज। जें पूजकांचे पूज्य कुलदैवत ॥ ४ ॥ जें जीवनातें जीववितें पवनातें निववितें । जें भक्तांचें उगवतें मायाजाळ ॥ ५ ॥ नामा म्हणे तें सुखाचि आयतें । जोडलें पुंडलिकातें भाग्ययोगें ॥ ६ ॥

१६६३ वेडावली वाचा वेदांची बोलतां । देवां पाहूं जातां अनिर्वाच्य ॥ १ ॥ अनिर्वाच्य वाचा बोलावया गेली । जिव्हा हे चिरली भूधराची ॥ २ ॥ भूधराची जिव्हा झालीसे कुंठित । नामा म्हणे अंत नलगे त्याचा ॥ ३ ॥

१६६४ हवा हवा म्हणताती श्रुती । परि त्या नेणती भुललीया ॥ १ ॥ तुझिया रूपा नेणती अगा कमळापती । बाळक म्हणती गौळियाचें ॥ २ ॥ विष्णुदास नामयानें दावियेल्या खुणा । पंढरीचा राणा श्रीविठ्ठल ॥ ३ ॥

१६६५ जेथें नाहीं कांहीं नाम रूप गुण । बोलती निर्गुण तयालागीं ॥ १ ॥ तोचि गोकुळांत होउनी गोवळ । म्हणवितो बाळ यशोदेचा ॥ २ ॥ चिन्मय चिद्रूप अक्षय अपार । परेहूनि पर ह्मणती ज्यातें ॥ ३ ॥ सर्वां भूतांचें फुटकिये खोळें । भरलें न गळे आत्मपणें ॥ ४ ॥ आनंदी आनंद मातला अपार । वेदालाही पार नाहीं ज्याचा ॥ ५ ॥ नामा म्हणे सर्व रूपें जें रूपस । गोकुळीं विलास मांडियेला ॥ ६ ॥

१६६६ पुष्पासी परिमळु दूध घृत मेळु । ऊंस तो रसाळु बीज नाहीं ॥ १ ॥ तैसें परब्रह्म आहे तें निर्वाण । वर्णितां पुराण न पडे ठायीं ॥ २ ॥ दीपाचीही दीप्ति दर्पणाची कांति । तैसी ब्रह्ममति कवण जाणे ॥ ३ ॥ नामा म्हणे जैसें सर्वांघटीं आकाश । केशव परमहंस तैसा जाणे ॥ ४ ॥

१६६७ निर्गुण सगुण नाहीं ज्या आकार । होउनी साकार तोचि ठेला ॥ १ ॥ जळीं जळगार दिसे जैशापरी । तैसा निराकारीं

साकार हा ॥ २ ॥ सुवर्ण कीं धन धन कीं सुवर्ण । निर्गुणीं सगुण ययापरी ॥ ३ ॥ ऐसा पूर्णपणें सहजीं सहज । सखा केशिराज प्रगटला ॥ ४ ॥ पांडुरंगीं अंगें सर्व झालें जग । निववी सर्वांग नामा म्हणे ॥ ५ ॥

१६६८ आपणाचि कर्ता आपणाचि मित्र । आपण सर्वत्र हरी झाला ॥ १ ॥ साधन साधितां हरी दिसे पूर्ण । प्रपंच हें भान न देखें डोळां ॥ २ ॥ किमर्थ हें टवाळ मायामोहजाळ । वायांच पाल्हाळ कोरडे करा ॥ ३ ॥ नामा म्हणे सखोल विठ्ठल पूर्ण बोल । उच्चारितां मोल नलगे कांहीं ॥ ४ ॥

१६६९ एक तत्त्व एकाकार सर्व देशीं । एक तो नेमेंसीं सकळ जनीं ॥ १ ॥ ऐसें ब्रह्म पहा आहे सर्व एक । नलगे विवेक करणें कांहीं ॥ २ ॥ मिथ्या हें डंबर माया मथितार्थ । हरी हाचि स्वार्थ वेगीं करीं ॥ ३ ॥ नामा म्हणे समर्थ बोलिला तो वेद । नाहीं भेदाभेद ब्रह्मपणीं ॥ ४ ॥

१६७० ज्ञान सत्य मुक्त शुद्ध बुद्ध युक्त । कारण रहित निरंजन ॥ १ ॥ तें आम्हीं देखिलें चर्मचक्षु दृष्टी । उभा वाळवंटीं पंढरीये ॥ २ ॥ वेदां अगोचर तया सहस्रमुखा । तें झालें पुंडलीका लोभापर ॥ ३ ॥ परतल्या श्रुति म्हणती नेति नेति । आम्हां गातां गीतीं सांपडलें ॥ ४ ॥ स्वरूपाचा निर्धार बोलती पुराणें । शिणलीं दरुशनें विवादती ॥ ५ ॥ नामा म्हणे यांसी भावाचि कारण । पावावया चरण केशवाचे ॥ ६ ॥

१६७१ देख देख देख पैल पैल । पैल उभा असे विटेवरी ॥ १ ॥ खोळे बुंथीचा आकारु झळके पीतांबरु । सौभाग्यसुंदरु विठ्ठलदेव ॥ २ ॥ दान दीक्षा गुरू नामया दातारु । धरावया नागरू केशिराज ॥ ३ ॥

१६७२ निर्गुण सगुण नव्हे तें समान। तैसें तेंही जाण योगाभ्यासीं ॥ १ ॥ प्रल्हादासी हरी शंख चक्र गदा। सगुण गोविंदा शोभतसे ॥ २ ॥ अर्जुनासी देव उभा पाचारासी। सखा उद्धवासी साक्ष दावी ॥ ३ ॥ नामा म्हणे माझा केशिराज भोळा। दाविसी गोपाळा बाळलीला ॥ ४ ॥

१६७३ अमरांचें ठेवणें विश्वाचें जीवन। सौभाग्य लावण्य रखुमाईचें ॥ १ ॥ धन्य गौळियां जिणें कृष्ण बाळपण। यशोदानंदन क्रीडा करी ॥ २ ॥ अंगें स्थूळपणें ब्रह्म खेळा येणें। लीला सामावणें रोमरंध्रीं ॥ ३ ॥ विष्णुदास नामा देवांचि लाहणें। ज्या घरीं खेळणें परब्रह्म ॥ ४ ॥

१६७४ डोलत डोलत टकमक चाले। गोजिरीं पाउलें टाकूनियां ॥ १ ॥ पायीं रुणझुण वाजताती वाळे। गोपी पाहतां डोळे मन निवे ॥ २ ॥ सांवळें सगुण मानस मोहन। गोपी रंजवण नामा म्हणे ॥ ३ ॥

१६७५ यमुने पावळीं देखियेली मूर्ती। तळपती दीप्ति तेजोमय ॥ १ ॥ सांवळें सुंदर ओंकार वर्तुळ। मध्यें घननीळ पाचारितो ॥ २ ॥ सुरंग ओतिली प्रेमतनु छाया। तेणें तुझी माया काय वाणूं ॥ ३ ॥ नामा म्हणे विठो चातुर्य करुणा। गुणागुणीं किरणा प्रभा भासे ॥ ४ ॥

१६७६ प्रथम अवतारीं देव मच्छ आले सागरीं। वधोनी शंखासुर वैरी आणिले वेद ॥ १ ॥ कूर्म अवतारीं सांवारिली सृष्टी। वराहद्विज नेहटो धरणीधरू ॥ २ ॥ प्रल्हाद कैवारा स्तंभाभीतरी। वळी बंधन हरी प्रगट झाला ॥ ३ ॥ रेणुकानंदन द्विजकुळपाळण। त्रिंबक भजन रघुनाथ ॥ ४ ॥ गोकुळीं अवतारु सोळा सहस्त्र वरु। आपण योगेश्वरु बौध्यरूपी ॥ ५ ॥ कल्की अवतारु वदतसे वरु। नामया दातारु केशिराज ॥ ६ ॥

१६७७ कमळगर्भा मनीं थोर चिंता करी। पद्म ठसेवरी उमट-
ताती ॥ १ ॥ नीलोत्पल जैसे चरण वानूं कैसे। सकुमार राजस
विठ्ठलाचे ॥ २ ॥ लावण्यसागरू रूप पाहों ठेली। दृष्टि पैं खुंटली
रुक्मिणीची ॥ ३ ॥ नामा म्हणे विठोचे चरण सुकुमार। तेथें वाहे
धार गंगादेवी ॥ ४ ॥

१६७८ मत्स्य कच्छ क्रोड मृग तें खुजट। जेथूनि प्रगट झालीं
रूपें ॥ १ ॥ तेंचि ब्रह्म उभें भिंवरेच्या तीरीं। हात कटावरी ठेऊ-
नियां ॥ २ ॥ मातृघाती हिंडे वनीं जो रडत। चोर जार घात करी
दुष्ट ॥ ३ ॥ दिगंबर अश्वारूढ खड्गधारी। पृथ्वीचा जो करी ग्रास
एक ॥ ४ ॥ नामा म्हणे मुंगी आदि ब्रह्मवरी। नाना अवतारीं एक-
लाची ॥ ५ ॥

१६७९ परब्रह्ममूर्ति सांवळें सगुण। पंढरी निधान वाळुवंटीं
॥ १ ॥ आनंद अमृत बोळला दरुशन। तुटेल बंधन हेळामात्रें ॥ २ ॥
नामा म्हणे नको नामीं सदा मन। उभा नारायण भेटी पुरे ॥ ३ ॥

१६८० कस्तूरी कुंकुम रेखे लाल टिळा। केशराची उटी सर्वां-
गासी ॥ १ ॥ पाहिला पाहिला माझा पांडुरंग। जीवीं जिवलग डोळे-
भरी ॥ २ ॥ हार शोभे गळां मंजुरीचा तुरा। कर्ण रत्न फळा झळा-
ळित ॥ ३ ॥ विटेवरी नीट गोमटीं पाउलें। त्यांवरी ठेविलें मस्तक
म्यां ॥ ४ ॥ नामयाची धणी भुकेली ते धाली। आनंद दिवाळी आजि
झाली ॥ ५ ॥

१६८१ शांति भीमातीरीं भक्ति पंढरपुरीं। प्रेम विटेवरी देखियेलें
॥ १ ॥ देखिला गे माय देखिला गे माय। देखिला गे माय पंढरीये
॥ २ ॥ नामरूपातीत नित्य सदोदित। जेथें विरे चित्त योगियांचें
॥ ३ ॥ दुरी ना जवळी त्रिपुटीवेगळा। केशव भेटला नामा म्हणे ॥ ४ ॥

१६८२ केशवाच्या नामीं लागलेंसे ध्यान। देखिल्या नयन तदा-
कार ॥ १ ॥ जया तया म्हणे माझा चक्रपाणी। जाय लोटांगणीं सर्व-

भावें ॥ २ ॥ प्रेम वोथरत नामाचेनि छंदें । हृदय प्रेमानंदें वोसंडत ॥ ३ ॥ धांवुनि येऊनि चरणांजवळी । वंदी पायधुळी सर्वभावें ॥ ४ ॥ घनःश्याम मूर्ति सुंदर सांवळी । ध्यान हृदयकमळीं नित्य राहे ॥ ५ ॥ भाग्यवंत नामा भक्तां शिरोमणी । अखंड उन्मनी भोगितसे ॥ ६ ॥

१६८३ जीव विठ्ठल आत्मा विठ्ठल । परमात्मा विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ जनक विठ्ठल जननी विठ्ठल । सोयरा विठ्ठल सांगाती ॥ २ ॥ अहिक्य विठ्ठल परत्र विठ्ठल । निरंतर विठ्ठल तारिता ॥ ३ ॥ नाम विठ्ठल रूप विठ्ठल । पतीतपावन विठ्ठल विठ्ठल नामा ॥ ४ ॥

१६८४ मातापिता बंधुभागिनी इष्टमित्र विठ्ठला तूं रे ॥ ध्रु ॥ बापा यावें भेटावें विसांवा माझा गा तूं । माझा कुळाचार माहेर रे जिव्हार विठ्ठला तूं ॥ १ ॥ माझें विद्याधन आयुष्य आरोग्यता विठ्ठला तूं गा । माझें तप व्रत तीर्थ दान पुण्य विठोबा तूं गा ॥ २ ॥ माझा गुरुमंत्र दैवत आगमनिगम विठ्ठला तूं गा । भूपति सुरपति ब्रह्ममूर्ति विठोबा तूं गा ॥ ३ ॥ माझा आचार विचार सत्यवाद धीर धर्म विठोबा तूं गा । यशकीर्ति निवृत्ति आतां माझी तृप्ति विठोबा तूं गा ॥ ४ ॥ माझे यमनियम प्राणायाम प्रत्याहार विठोबा तूं गा । नामा म्हणे विठोबा केशव परमात्मा माझा तूं गा ॥ ५ ॥

१६८५ बरवेंपणें बरवा बाप मदनाचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव ॥ १ ॥ उदारपणें उदार दाता त्रैलोक्याचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव ॥ २ ॥ झुंजार आणि शूर अरि त्या दैत्यांचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव ॥ ३ ॥ चतुरपणें चतुर बाप ब्रह्मयाचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव ॥ ४ ॥ पवित्रपणें पवित्र उद्धार तीर्थांचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव ॥ ५ ॥ नामा म्हणे आधार सकळां जीवांचा । तो स्वामी आमुचा पंढरीराव ॥ ६ ॥

१६८६ दीनांची माउली । आजि म्यां देखिली ॥ १ ॥ कटीं ठेउ-

नियां कर । उभी राहे विटेवर ॥ २ ॥ मुगुट रत्नांचा साजिरा । वरी मोतियांचा तुरा ॥ ३ ॥ रूप लावण्य गोजिरें । हृदयीं पदक साजिरें ॥ ४ ॥ कांसे पिंवळा पीतांबर । चरणीं ब्रीदाचा तोडर ॥ ५ ॥ भक्तां कृपेची साउली । नामा वंदी पायधुळी ॥ ६ ॥

१६८७ आषाढी कार्तिकी हेचि आम्हां सुगी । शोभा पांडुरंगीं घनवटे ॥ १ ॥ संतांचीं दर्शनें हेचि पीक जाण । देतां आलिंगन देह निवे ॥ २ ॥ देह निवे किती नवल सांगावें । जीवासी दुणावे ब्रह्मानंद ॥ ३ ॥ नामा म्हणे यासी मूळ पांडुरंग । त्याचेनि अव्यंग सुख आम्हां ॥ ४ ॥

१६८८ आवडे जें जीवा तें पंढरीये उभें । पुंडलीकें लोभें राहविलें ॥ १ ॥ जोडूनि पाउलें ठेवियलीं विटे । करद्वय गोमटे कटावरी ॥ २ ॥ कान मुख डोळे न म्हणती पुरे । सेवितां न पुरे धणी मना ॥ ३ ॥ गोड लागे पोट न भरे न धाय । भुकेलीच राहे भूक सदा ॥ ४ ॥ नामा म्हणे संतसंगती विश्वास । घेऊं अनुभवास फार फार ॥ ५ ॥

१६८९ भजूं एका विठोबास । आणिक न करूं अभ्यास ॥ १ ॥ येथें साधन आहे एक । पाहों विठोबाचें मुख ॥ २ ॥ वर्णूं हरीचे पवाडे । काळ लावूं देशधडे ॥ ३ ॥ नामा विष्णुदास म्हणे । ऐसें करूं हरिकीर्तन ॥ ४ ॥

१६९० विठ्ठल कानडें बोलूं जाणे । त्याची भाषा पुंडलीक नेणें ॥ १ ॥ युगें अठावीस झालीं । दोघां नाहीं बोलाबोली ॥ २ ॥ कर ठेउनी कटावरी । उभा भिंवरेच्या तीरीं ॥ ३ ॥ नामा म्हणे स्वामी माझा । उभा भक्तांचिया काजा ॥ ४ ॥

१६९१ ध्यान धारणा नलगे टाळी । विठो पहावा उघडे डोळीं ॥ १ ॥ विठो समाधीचें सुख । पाहतां हरे तहानभूक ॥ २ ॥ नामा म्हणे न करीं कांहीं । चित्त रंगलें हरीचे पायीं ॥ ३ ॥

१६९२ येतियां पुसे जातियां धाडी निरोप । पंढरपुरीं आहे माझा मायबाप ॥ १ ॥ येईं विठाबाई आई माउलिये । निढळावरी कर ठेउनी पालवीये ॥ २ ॥ पिंवळा पीतांबर गगनीं झळकला । गरूडावरी बैसोनी माझा कैवारी आला ॥ ३ ॥ डोळ्यांतील बाहुली माझी विठाई झाली । घनानंद मूर्ति माझ्या ध्यानासी आली ॥ ४ ॥ विठोबाचें राज्य आम्हां नित्य दिवाळी । विष्णुदास नामा जीवेंभावें ओंवाळी ॥ ५ ॥

१६९३ अवघें तीर्थ तीर्थरूप । परी तें विठ्ठल चरणींचें स्वरूप । विठ्ठल देखिलिया निष्पाप । जीवजंतु होताती ॥ १ ॥ एवढें क्षेत्र पांडुरंग । सर्वां तीर्थांमाजीं अभंग । धरिलिया संतसंग । महादोष हरताती ॥ २ ॥ हरीकीर्तन करीं वेगीं । हेंचि उद्धरील जगालागीं । जे जे सरले पांडुरंगीं । ते ते गेले वैकुंठीं ॥ ३ ॥ नामा जपे सदा काळीं । रामकृष्ण नामावळी । विठ्ठल विठ्ठल हृदयकमळीं । जपतसे सर्वदां ॥ ४ ॥

१६९४ अनंत म्हणती माझीया स्वामीतें । अनंत गुण त्यातें म्हणोनियां ॥ १ ॥ पतित पावन म्हणती माझिया स्वामीतें । उद्धरी पतितातें म्हणोनियां ॥ २ ॥ विश्वंभर म्हणती माझिया स्वामीतें । पोशितो विश्वातें म्हणोनियां ॥ ३ ॥ जगजीवन म्हणती माझिया स्वामीतें । जीवन जगातें म्हणोनियां ॥ ४ ॥ हृषीकेशी म्हणती माझिया स्वामीतें । चाळी इंद्रियातें म्हणोनियां ॥ ५ ॥ नामा म्हणे केशव म्हणती स्वामीतें । नासितो क्लेशातें म्हणोनियां ॥ ६ ॥

## श्रीविट्ठलस्तुती

१६९५ वेदां न कळे पार श्रुतीसी अगोचर। उपनिषदां सार न कळेचि ॥ १ ॥ तो हरी गोकुळीं वसुदेवकुळीं । यशोदेजवळी बाळकृष्ण ॥ २ ॥ ब्रह्मादिक वंदिती शिवादिक ध्याती। शास्त्रांसी तो गती नेणवेचि ॥ ३ ॥ योग्यांचें चिंतन मुनींचें अंजन। शेषादिकां ध्यान सदां ज्याचें ॥ ४ ॥ पुराणें भागलीं आचारें श्रमलीं। बोलत राहिलीं साधुवृंदें ॥ ५ ॥ नामा म्हणे तो हा विठ्ठल पंढरी । नाममात्रें तारी सकळांसी ॥ ६ ॥

१६९६ सहस्र तोंडाचा तोही भागियेला । अंत नाहीं ज्याला गुणालागीं ॥ १ ॥ तेथें मी पामर काय बोलूं वाणी । तुझी कीर्ति जनीं काय कैसी ॥ २ ॥ यथामति कांहीं बोलियलों बोल । तोचि हा विठ्ठल नामा म्हणे ॥ ३ ॥

१६९७ नामाचा गजर गर्जे भीमातीर । महिमा साजे थोर तुज एका ॥ १ ॥ रिद्धि सिद्धि दासी अंगण झाडिती । उच्छिष्टें काढिती मुक्ती चारी ॥ २ ॥ चारी वेद भाट होउनी गर्जती। सनकादिक गाती कीर्ति तुझी ॥ ३ ॥ सुरवरांचे भार अंगणीं लोळती । चरणरज क्षिति शिव वंदी ॥ ४ ॥ नामा म्हणे देव ऐसा हो कृपाळु । करी तो सांभाळू अनाथांचा ॥ ५ ॥

१६९८ अगणित गुण वर्णिती पुराणें । पंढरीचे राणे ख्याती जगीं ॥ १ ॥ अलक्ष भेटी लक्षिताची नाहीं । पुंडलीकें कांहीं तप केलें ॥ २ ॥ युगें गलीं अठ्ठावीस ते अजुनी । उभा चक्रपाणी राहिलासे ॥ ३ ॥ वेद म्हणती नेती पुराणें तें किती । भांबावल्या मती नामा म्हणे ॥ ४ ॥

१६९९ फेडूनि पीतांबर उभा दिगंबर । कटीं ठेउनी कर वाळवंटीं ॥ १ ॥ मोतियांचे हार सांडूनि रत्नकीळा । तुळशीच्या माळा गळां घाली ॥ २ ॥ पर्यंक शयन शेषाचें आसन । सांडूनि निधान उभें

विटे ॥ ३ ॥ सांडूनियां भक्त सनकादिकीं प्रेमा । कलियुगीं नामा आवडला ॥ ४ ॥

१७०० पुंडलीकाचें भेटी आणि भिंवरेचे तटीं । परब्रह्म उभें वाळुवंटीं माये ॥ १ ॥ उभा विटेवरी कर ठेउनी कटावरी । उभा भीमातीरीं जगजेठी गे माये ॥ २ ॥ विठ्ठल कान्हा चरणीं वांकी तोडर । कांसे पीतांबर पदकलीला मनोहर गे माये ॥ ३ ॥ कान्हा विठ्ठल कान्हा प्रसन्नवदन थोरा । जो आर्थी करुणाकरा हरि नामया दातारा ॥ ४ ॥

१७०१ देहुडाचरणु वाजवितो वेणु । गोपिकारमणु स्वामी माझा ॥ १ ॥ देखिला गे माये यमुनेच्या तीरीं । हात खांद्यावरी राधिकेच्या ॥ २ ॥ गुंजावर्ण डोळे माथा बावरझोटी । मयूरपिच्छ वेठी शोभतसे ॥ ३ ॥ सगुण मेघश्याम लावण्यसुंदर । नामया दातार केशवराज ॥ ४ ॥

१७०२ हरि भोळा हरि भोळा । आम्हीं डोळां पाहिला ॥ १ ॥ हरि श्रेष्ठ हरि श्रेष्ठ । आम्हां कष्ट नाहीं ते ॥ २ ॥ हरि उदार हरि उदार । आम्हां धीर होइना ॥ ३ ॥ नामा म्हणे हरी दाता । आम्हां दासां रक्षितो ॥ ४ ॥

१७०३ अनंता श्रीधरा गोविंदा केशवा । मुकुंदा माधवा नारायणा ॥ १ ॥ देवकीतनया गोपिकारमणा । भक्तउद्धरणा त्रिविक्रमा ॥ २ ॥ मकर कुंडलें श्रवणीं शोभती । एकावळी दीप्ति तेजें भारी ॥ ३ ॥ नामा म्हणे तुझा नकळेचि पार । भजा निरंतर सर्वकाळ ॥ ४ ॥

१७०४ उभा विटेवरी भक्तांचा कैवारी । भेटावया उभारी दोन्ही बाह्या ॥ १ ॥ गुणदोष त्याचे न पाहेचि डोळां । भेटे वेळोवेळां केशिराज ॥ २ ॥ ऐसा दयावंत घेतो समाचारु । लहान आणि थोरु सांभाळितो ॥ ३ ॥ सर्वांलागीं देतो समान दर्शन । उभा तो आपण

समपायीं ॥ ४ ॥ नामा म्हणे तया भक्तांची आवडी । भेटावया कडाडी उभा ठेला ॥ ५ ॥

१७०५ तुझिया सत्तेनें वेदांसी बोलणें । सूर्यासी चालणें तुझिया सत्ते ॥ १ ॥ ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हें जाणोनी शरण आलों ॥ २ ॥ मेघांनीं वर्षावें पर्वतीं बैसावें । वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥ नामा म्हणे कांहीं न हाले साचार । प्रभु तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

१७०६ अच्युता अनंता श्रीधरा माधवा । देवा आदिदेवा पांडुरंगा ॥ १ ॥ कृष्णा विष्णु हरी गोविंदा वामना । तूंचि नारायणा नामधारी ॥ २ ॥ मुकुंदा मुरारी प्रद्युम्ना केशवा । नाम सदाशिवा शांतरूपा ॥ ३ ॥ रूपातीत हरी दाखवी सगुण । निरंतर ध्यान करी नामा ॥ ४ ॥

१७०८ अनंत हे कळा अनंत हे लीळा । अनंत जयाला वेद गाती ॥ १ ॥ तोचि पांडुरंग पंढरीचा राजा । धणी झाला वोजा भाववळें ॥ २ ॥ अनंत जयाच्या सेवा वोजावणी । नामरूप गुणीं नामातीत ॥ ३ ॥ नामा म्हणे अंत असेना जो कांहीं । सांपडतो पाहीं पंढरीये ॥ ४ ॥

१७०९ देव दाखवी असा नाहीं गुरु । जेथें जाय तेथें दगड शेंदुरू ॥ १ ॥ देव दगडाचा बोलेल कैंचा । कोणे काळीं त्यास फुटेल वाचा ॥ २ ॥ देव देव करितां शिणलें माझें मन । जेथें जाय तेथें पूजा पाषाण ॥ ३ ॥ नामा तोचि देव हृदयीं पाहे । नामा केशवाचे न सोडी पाये ॥ ४ ॥

१७१० नेणती साही शास्त्रें तुज केशिराजा । स्वरूपें कुबजा काय होती ॥ १ ॥ न मागें मी तैसा न मागें मी तैसा । न मागें मी तैसा कदाकाळीं ॥ २ ॥ कौरवांचे काजीं घेसी गाढेपण । धर्माघरीं पूर्ण घोडे धुसी ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हीं कीर्ति वाखाणावी । भक्तांसी गोसावी होसी देवा ॥ ४ ॥

१७११ काय वानूं आतां पायांचा महिमा । जेथें झाली सीमा बोलायाची ॥ १ ॥ विठोबाचे पाय आठवितां मनीं । गेलें हारपोनी भवभय ॥ २ ॥ पाय नारदानें हृदयीं धरितां । ब्रह्मांडीं मान्यता झाली त्याची ॥ ३ ॥ सनकादिकांलागीं पाय वज्रकवच । ब्रह्मादि देवांस पद जेणें ॥ ४ ॥ लागतांचि पाय शिळा दिव्य झाली । पाषाण तारिले उदकावरी ॥ ५ ॥ पाय ते रमेचे सौभाग्य साजिरें । योगि ऋषीश्वर थोर जेणें ॥ ६ ॥ नामा ह्मणे मनीं पाय सर्वकाळ । ह्मणोनि सुकाळ आनंदाचा ॥ ७ ॥

१७१२ उभा भीमातीरीं कर कटावरी । राहे निरंतरी भक्तांपुढें ॥ १ ॥ भक्तभाग्य थोर नव्हे कधीं प्राप्ती । जाणोनी श्रीपती गुज बोले ॥ १ ॥ गणिका गजेंद्र उद्धव नारद । आपण गोविंद मिळोनियां ॥ ३ ॥ समुद्रमंथनीं उभा करोनियां । लागतसे पायां नामा ह्मणे ॥ ४ ॥

१७१३ भरतें त्यागिली जननी । ख्याति झाली त्रिभुवनीं ॥ १ ॥ ऐसी भक्ति तुझी हरी । जगीं करंटा न करी ॥ २ ॥ बंधु अवज्ञा बिभीषणा । प्रगट झाला रामराणा ॥ ३ ॥ प्रल्हाद पितृआज्ञा न करी । स्तंभीं प्रगटला नरहरी ॥ ४ ॥ पति अवज्ञा ऋषिपत्न्यांसी । कृष्णदर्शन पूर्ण त्यांसी ॥ ५ ॥ नामा ह्मणे भक्ता अवरोधी पाहीं । त्यासी त्यजिल्या दोष नाहीं ॥ ६ ॥

१७१४ सगुण तें ब्रह्म ईटेवरी नीट । कोणया प्राणीं कष्ट होऊं नेदी ॥ १ ॥ देऊनियां क्षेम देह पालटीसी । वृद्ध रूप होसी कर्णासाठीं ॥२॥ भजन भक्तांचें मानिसी वचन । नाम नारायण ह्मणे कां रे ॥ ३ ॥ उफराटी वदवी वाल्मिका नामाख्या । शतकोटी संख्या प्रविस्तार ॥ ४ ॥ नामा ह्मणे देवा भक्तिचें पैं पिसें । त्यालागीं हव्यासें होसी जाण ॥ ५ ॥

१७१५ पांडुरंगा नमूं परात्परा नमूं । सगुणासी नमूं साक्षिभूता

॥ १ ॥ समस्त संबंध साधियेले हरी । रावणादि वैरी उद्धरिले ॥ २ ॥ नामरूपातीता नाहीं भेटाभेट । म्हटलें आहे नीट नामा म्हणे ॥ ३ ॥

१७१६ सगुण समान भजती अंतरीं । सर्व भूतांतरीं असे एक ॥ १ ॥ पहा कोळियाची काय सांगों कीर्ति । विद्या अभ्यासिती मूर्ति-पुढें ॥ २ ॥ द्रौपदीचे घरीं होते उपवासी । देंठही लाविसी अकस्मात ॥ ३ ॥ नामा म्हणे जाण प्रारब्ध कारण । पांडुरंगाविण गती नाहीं ॥ ४॥

१७१७ एक अंजनीं उत्पन्न । एका खांबीं अवतरण ॥ १ ॥ ते पावले दोघेजण । नरसिंह हनुमंत आपण ॥ २ ॥ एक सिंहनाद करी । एक भुभुःकार करी ॥ ३ ॥ एक सीताशुद्धी करी । एक प्रल्हादा कैवारी ॥ ४ ॥ एक बाळब्रह्मचारी । एका अर्धांगी सुंदरी ॥ ५ ॥ एक रुद्राचा अवतारु । एक नामया दातारु ॥ ६ ॥

१७१८ प्रल्हादादिकांचें अंतरींचें ध्यान । तें पंढरीये निधान उभें असे ॥ १ ॥ सर्व जण जया नेणते जाहले । सुख दाखाविलें पुंडलीका ॥ २ ॥ वेदांचें जें सार श्रुतीचें जिव्हार । तेंचि कटीं कर उभें असे ॥ ३ ॥ ज्ञानाचें जीवन वैराग्या भूषण । तें सुखनिधान विटेवरी ॥ ४ ॥ शुद्धबुद्ध मुक्त समाधीचें सुख । तें उभें प्रत्यक्ष वाळुवंटीं ॥ ५ ॥ हृदयीं धरूनि नामा निजबोधें निमाला । शीण हारपला संसाराचा ॥ ६ ॥

१७१९ हरी गातां बरवा ऐकतां बरवा । हृदयीं ध्यातां बरवा बाइयांनों ॥ १ ॥ केशव पैं देणें केशव पैं घेणें । केशव करणें धंदा आम्हीं ॥ २ ॥ चंद्रबिंबाची कुरवंडी ओवाळूं श्रीमुखावरी । मदन हा जिव्हारीं लाजियेला ॥ ३ ॥ नामा म्हणे निवाविलें सकळ इंद्रियांतें । म्हणोन त्या केशवातें शरण जा रे ॥ ४ ॥

१७२० केशव पैं मुक्ति केशव पैं भक्ति । केशव विश्रांति पंढरीये ॥ १ ॥ केशव लौकिकीं केशव व्यवहारीं । केशव निर्धारीं नाम तुझें ॥ २ ॥ नामा म्हणे अगा केशव बोळला । भावासी भुलला वाळुवंटीं ॥ ३ ॥

१७२१ वेदासी कानडा श्रुतीसी कानडा । विठ्ठल उघडा पंढरीये ॥ १ ॥ नाम बरवें रूप बरवें । दर्शन बरवें कानडियाचें ॥ २ ॥ नामा म्हणे तुझें अवघेंचि बरवें । त्याहुनि बरवें प्रेम तुझें ॥ ३ ॥

१७२२ पंढरी ध्यानियां ध्यातां लक्षा न ये । आम्हां वाट पाहे अनाथांची ॥ १ ॥ जपकांचें जाप्य नाना मंत्रमय । आम्हां भक्ति प्रिय भावें सारी ॥ २ ॥ पुंडलीकासाठीं वोळला वोरसें । नेणां काय कैसें प्रेम त्याचें ॥ ३ ॥ नामा म्हणे जीवें करूं निंबलोण । क्षणीं नारायणा दिठावसी ॥ ४ ॥

१७२३ सगुण संपन्न पंढरीच्या राया । आमुच्या स्वामिया केशिराजा ॥ १ ॥ राम कृष्ण हरी श्रीधरा मुकुंदा । सज्जनीं स्वानंदा सर्वातीता ॥ २ ॥ गोविंद गोपाळ गोपवेषधारी । गोवर्धन धरी नखावरी ॥ ३ ॥ दुष्ट दुर्जनासी दुःख फार चित्ता । पावन पतीतां नामा म्हणे ॥ ४ ॥

१७२४ परब्रह्म अविनाश आणि आनंदघन । त्याहूनि चरण गोड तुझे ॥ १ ॥ तें जीवीं न सोडी अगा पंढरीनाथा । जाणसी तत्वतां हृदय माझें ॥ २ ॥ परात्पर ध्याइजे आणि अपरंपर । त्याचेंही जिव्हार पाय तुझे ॥ ३ ॥ सच्चिदानंदघन जेथें हरपे मन । त्याहूनी चरण गोड तुझे ॥ ४ ॥ नामा म्हणे तुझीं पाउलें सकुमार । तें माझें माहेर विटेवरी ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

१७२५ भला भला पुंडलीका । तुझ्या भावार्थाचा शिक्का ॥ १ ॥ भलें घालूनियां कोडें । परब्रह्म दारापुढें ॥ २ ॥ घाव घातला निशाणी । ख्याति केली त्रिभुवनीं ॥ ३ ॥ जनी म्हणे पुंडलीका । धन्य तूंचि तिहीं लोकां ॥ ४ ॥

१७२६ पंढरीचें सुख पुंडलीकासी आलें । तेणें हें वाढिलें भक्तालागीं ॥ १ ॥ भुक्ति मुक्ति वरदान दिधलें । तेंही नाहीं ठेविलें आप-

णापाशीं ॥ २ ॥ उदार चक्रवर्ती बाप पुंडलीक । नामें विश्वलोक उद्धरिले ॥ ३ ॥

१७२७ ऐसा आहे पांडुरंग । भोग भोगुनी निःसंग ॥ १ ॥ अविद्येनें नवल केलें । मिथ्या सत्यत्व दाविलें ॥ २ ॥ जैसी वांझेची संतती । तैसी संसार उत्पत्ती ॥ ३ ॥ तेथें कैंची वा धरिसी । ब्रह्मीं पूर्ण जनी दासी ॥ ४ ॥

१७२८ स्मरतांचि पावसी । तरी भक्तांसी लाधसी ॥ १ ॥ ऐसा नाहीं न घडे देवा । वायां कोण करी सेवा ॥ २ ॥ न पुरतां आस । कोण पुसे देवास ॥ ३ ॥ कोठें चक्रपाणी । तुज आधीं लाही जनी ॥ ४ ॥

१७२९ बाप रखुमाबाई वर । माझें निजाचें माहेर ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपूर । जग मुक्तीचें माहेर ॥ २ ॥ तेथें मुक्ति नाहीं म्हणे । जनीं न पाहे त्याचें वदन ॥ ३ ॥

१७३० देव देखिला देखिला । नामें ओळखुनी ठेविला ॥ १ ॥ तो हा विटेवरी देव । सर्व सुखाचा केशव ॥ २ ॥ जनी म्हणे पूर्णकाम । विठ्ठल देवाचा विश्राम ॥ ३ ॥

१७३१ आळवितां धांव घाली । ऐसी प्रेमाची भुकेली ॥ १ ॥ तें हे यशोदेच्या बाळा । बरवी पाहतसे डोळां ॥ २ ॥ विटेवरी उभा नीट । केली पुंडलीकें धीट ॥ ३ ॥ स्वानंदाचें लेणें त्याली । पाहून दासी जनी धाली ॥ ४ ॥

१७३२ स्तन पाजायासी । आली होती ते मावसी ॥ १ ॥ तिच्या उरावरी लोळे । विठो माझा क्रीडा खेळे ॥ २ ॥ मेलें मेलें कृष्णनाथा । सोडीं सोडीं रे अनंता ॥ ३ ॥ लिंगदेह विरविरलें । जनी म्हणे या विठ्ठलें ॥ ४ ॥

१७३३ विठो माझा लेंकुरवाळा । संगें गोपाळांचा मेळा ॥ १ ॥ निवृत्ती हा खांद्यावरी । सोपानाचा हात धरी ॥ २ ॥ पुढें चाले ज्ञाने-

श्वर । मागे मुक्ताई सुंदर ॥ ३ ॥ गोराकुंभार मांडीवरी । चोखा जीवाबरोबरी ॥ ४ ॥ वांका कांडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥ ५ ॥ जनी म्हणे गोपाळा । करी भक्तांचा सोहळा ॥ ६ ॥

१७३४ स्त्रीजन्म म्हणवुनी न व्हावें उदास । साधु संतां ऐसें केलें जनीं ॥ १ ॥ संतांचे घरची दासी मी आंकेली । विठोबानें दिली प्रेमकळा ॥ २ ॥ विदुर सात्त्विक माझिये कुळीचा । अंगिकार त्याचा केला देवें ॥ ३ ॥ न विचारितां कुळ गणिका उद्धरिली । नामें सरती केली तिहीं लोकीं ॥ ४ ॥ ऋषींचीं कुळें उच्चारिलीं जेणें । स्वर्गावरी तेणें वस्ती केली ॥ ५ ॥ नामयाची जनी भक्तितें सादर । माझें तें साचार विटेवरी ॥ ६ ॥

## श्रीभानुदासमहाराज

१७३५ अनादि परब्रह्म जें कां निजधाम । ते ही मूर्ति मेघश्याम विटेवरी ॥ १ ॥ जें दुर्लभ तिहीं लोकां न कळे ब्रह्मादिकां । तपें पुंडलीका जोडलेंसे ॥ २ ॥ जयातें पाहतां श्रुती परतल्या नेति नेति । ते हे परब्रह्म मूर्ति विटेवरी ॥ ३ ॥ वेदां मौन पडे श्रुतीसी सांकडें । वर्णितां कुवाडें पुराणांसी ॥ ४ ॥ ज्ञानियांचें ज्ञान मुनिजनांचें ध्यान । तें परब्रह्म निधान विटेवरी ॥ ५ ॥ पुंढलीकाचें तपें जोडलासे ठेवा । भानुदास देवा सेवा मागे ॥ ६ ॥

१७३६ अद्वय आनंद तो हा परमानंद । शोभे सच्चिदानंद विटेवरी ॥ १ ॥ सांवळें रूपडें गुणा अगोचर । उभा कटीं कर ठेवुनि विटे ॥ २ ॥ पीतांबर परिधान चंदनाची उटी । रूळे माळ कंठीं वैजयंती ॥ ३ ॥ भानुदास म्हणे ब्रह्म अगोचर । नेणवे विचार ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

१७३७ वेदीं सांगितलें श्रुति अनुवादलें । तें ब्रह्म कोंदलें पंढरीये ॥ १ ॥ वाळुवंटीं बुंथी श्रीविठ्ठलनामें । सनकादिक प्रेमें गाती जया

॥ २ ॥ भानुदास म्हणें तो हरि देखिला । हृदयीं सांठविला आनंद-भरित ॥ ३ ॥

१७३८ चंद्रभागेतिरीं उभा विटेवरी । विठ्ठल राज्य करी पंढरीये ॥१॥ ऋद्धि सिद्धि धृती वोळंगती परिवार । न साहती अवसर ब्रह्मादिकां ॥ २ ॥ सांडोनी तितुलें यथाबीजें केलें । कवणें चाळविलें कानाडियासी ॥ ३ ॥ उष्णोदक मार्जन सुगंधचर्चन । भीवरा चंदन पाट वाहे ॥ ४ ॥ रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनका । कामारी आणिका येती सर्व ॥ ५ ॥ कनकाचे परियेळीं रत्नाचे दीपक । सुंदर श्रीमुख ओवाळिती ॥ ६ ॥ संतभागवत सकळ पारुषले । निःशब्द होउनी ठेले तुजवीण ॥ ७ ॥ रुक्मावाई ती झालीसे उदास । पुंडलीका कैसें पाडिलें मौन ॥ ८ ॥ येसो तरी येईं पंढरीच्या राया । अगा कृपावर्या पांडुरंगा ॥ ९ ॥ धन्य पंढरपूर विश्रांति माहेर । धन्य भीमातीर वाळुवंट ॥ १० ॥ भानुदास म्हणे चला आम्हांसवें । वाचा ऋण देवें आठवावें ॥ ११ ॥

१७३९ जैसा उपनिषदांचा गाभा । तैसा विटेवरी उभा । अंगींचिया दिव्य प्रभा । धवाळिलें विश्व ॥ १ ॥ उगवती या सुरज्या । नवरत्नें बांधूं पूजा । मुगुटीं भाव पैं दुजा । उपमा नाहीं ॥ २ ॥ दोन्ही कर कटीं । पीतांबर माळ गांठी । माळ वैजयंती कंठीं । कौस्तुभ झळके ॥ ३ ॥ कल्पद्रुम छत्राकार । तळीं त्रिभंगी विढार । मुरली वाजवी मधुर । श्रुती अनुरागें ॥ ४ ॥ वेणूचेनि गोडपणें । पवन पांगुळला तेणें । तोही निवे एक गुणें । अमृतधारीं ॥ ५ ॥ अहो लेणियाचें लेणें । नादसुखासी पैं उणें । विश्व बोधिलें येणें । गोपाळवेषें ॥ ६ ॥ पुंडलीकाचेनि भावें । श्रीविठ्ठल येणें नांवें । भानुदास म्हणे देवें । जोडलें आम्हां ॥ ७ ॥

१७४० शंखचक्रगदाधरू । कांसे सुरंग पीतांबरू । चरणीं ब्रीदाचा तोडरू । असुरावरी काढीतसे ॥ १ ॥ बरवा बरवा कोसि-

राजु । गरुडवाहन चतुर्भुजु । कंठीं कौस्तुभ झळके विजु । मेघः-शाम देखोनी ॥ २ ॥ करी सृष्टीची रचना । नाभीं जन्म चतुरानना । जग हें वाखाणी मदना । तें लेंकरूं तयाचें ॥ ३ ॥ कमळा विलासली पायीं । आर्त तुळशीचें ठायीं । ब्रह्मादिकां अवसरू नाहीं । तो यशोदे वोसंगा ॥ ४ ॥ उपमा द्यावी कवणें अंगा । चरणीं जन्मली पैं गंगा । सोळा सहस्र संभोगा । नित्य न पुरती कामिनी ॥ ५ ॥ अधिष्ठान गोदातीरीं । रिद्धिसिद्धी तिष्ठती द्वारीं । भानुदास पूजा करी । वाक्पुष्पें अनुपम्य ॥ ६ ॥

१७४१ लावण्य रूपडें पहा डोळे भरी । मूर्ति हे गोजिरी विटेवरी ॥ १ ॥ राहीरखुमाई सत्यभामा आई । गरुड हनुमंत ठायीं उभे असती ॥ २ ॥ चंद्रभागा तीर्थ पुंडलिक मुनी । दक्षणवाहिनी शोभतसे ॥ ३ ॥ वेणुनाद काला गोपाळ करिती । भानुदास तृप्ति पाहोनियां ॥ ४ ॥

१७४२ उन्मनी समाधी नाठवे मनासी । पाहतां विठोबासी सुख बहु ॥ १ ॥ आनंदी आनंद अवघा परमानंद । आनंदाचा कंद विठोबा दिसे ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहतां सांठवे रूप मनीं ॥ ३ ॥ नित्यता दिवाळी नित्यता दसरा । पाहतां साजिरा विठ्ठलदेव ॥ ४ ॥ भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

१७४३ वेदशास्त्रांचें सार । तो हा विठ्ठल विटेवर ॥ १ ॥ पुढें शोभे चंद्रभागा । स्नानें उद्धार या जगा ॥ २ ॥ पद्मतळें गोपाळपुर । भक्त आणि हरीहर ॥ ३ ॥ भानुदास जोडोनी हात । उभा सामोरा तिष्ठत ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१७४४ द्वारकेहुनी जगजेठी । आला पुंडलीकाचे भेटी । पाउलें सरळ गोमटीं । बाळ सूर्यापरी ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग । बाळरूप

सवेग। गाई गोप संवगडे लाग। मिळोनी सकळांसहित ॥ २ ॥ पाहतां पुंडलीकाचें वदन। वेडावलें भक्ताचें भूषण। केलेंसें खेवण। समचरणीं विटेवरी ॥ ३ ॥ न वैसे अद्यापि खालीं। ऐशी कृपेची माउली। एकाजनार्दनीं आली। भक्तिकाजा विठ्ठल ॥ ४ ॥

१७४५ जोडोनियां हात दोन्ही। पुंडलीक मुनी विनवीत ॥ १ ॥ आहां तैसें उगेचि रहा। माझिये पहा प्रेमासी ॥ २ ॥ जे जे येती ज्या ज्या भावें। ते ते तारावे कृपाळुवा ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं। बाह्या पसरूनी हरी बोले ॥ ४ ॥

१७४६ धन्य धन्य पुंडलीका। तारिले लोकां सकळां ॥ १ ॥ तुझे भाके गुंतुनी येथें। तारीन पतीत युगायुगीं ॥ २ ॥ भोळेभाळे येतील जैसे। दरुशनें ते तैसे वैकुंठीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देउनी वर। राहे विटेवर मग उभा ॥ ४ ॥

१७४७ उभा पुंडलीकापुढें। कटीं कर ठेउनी रूपडें ॥ १ ॥ पाहतां वेडावलें मन। शिवा लागलेंसें ध्यान ॥ २ ॥ सनकादिक वेडावले। ते पुंडलीकें भुलविले ॥ ३ ॥ भक्तां देखोनि भुलला। एकाजनार्दनीं सांवळा ॥ ४ ॥

१७४८ घेऊनियां परिवारा। आला असे पंढरपुरा ॥ १ ॥ भक्त पुंडलीकासाठीं। उभा ठेउनी कर कटीं ॥ २ ॥ केशर कस्तूरी चंदन टिळा। कासे शोभे सोनसळा ॥ ३ ॥ वामांकीं शोभे रुक्मिणी। शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

१७४९ आला पुंडलीकासाठीं। उभा सम पाये विटीं ॥ १ ॥ विठु मदनाचा पुतळा। भुलवणा तो सकळां ॥ २ ॥ आराध्य दैवत शिवाचें। कीर्तनीं उघडाचि नाचे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मन। वोवाळावें पायांवरून ॥ ४ ॥

१७५० ज्याचे पुराणीं पोवाडे। तो हा उभा वाडेंकोडें ॥ १ ॥ कटीं कर ठेउनी गाढा। पाहे दिगंबर उघडा ॥ २ ॥ धरुनी पुंडली-

काची आस । युगें जाहलीं अठ्ठावीस ॥ ३ ॥ तो हा देव शिरोमणी । एका शरण जनार्दनीं ॥ ४ ॥

१७५१ सुकुमार हरीचीं पाउलें । सुंदर हरीचीं पाउलें ॥ १ ॥ भीमातटीं देखिलें । वोळलें तें पुंडलीका ॥ २ ॥ शेषशायनीं जीं पाउलें । लक्ष्मी करीं तीं पाउलें ॥ ३ ॥ गरुडपृष्ठीं जीं पाउलें । बळी यागीं तीं पाउलें ॥ ४ ॥ विटेवरी जीं पाउलें । एकाजनार्दनीं तीं पाउलें ॥ ५ ॥

१७५२ तारावया भोळे भक्त । कृपावंत पंढरीनाथ ॥ १ ॥ करुनी मीस पुंडलीकाचें । उभा उगाचि विटेवरी दिसे ॥ २ ॥ ऐसा भक्तांसी भुलला । तारावया उभा ठेला ॥ ३ ॥ जनीं जनार्दन । शरण एका जनार्दन ॥ ४ ॥

१७५३ या पाउलांसाठीं लक्ष्मी पिशी । सनकादिक वेडावले मानसीं ॥ १ ॥ सुख जोडलें पुंडलीकासी । विटेवरी हृषीकेशी ॥ २ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । धन्य धन्य पुंडलीका ॥ ३ ॥

१७५४ सकळीं ध्याइला सकळीं पाहिला । परी असे भरला जैसा तैसा ॥ १ ॥ युगायुगीं मीनले व्यापारीं । परी न पवेचि सरी पुंडलीका ॥ २ ॥ मापें केलीं परी नये अनुमाना । योगियांच्या ध्याना वोथंवला ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मापाचि आटलें । मोजणें खुंटाविलें पुंडलीकें ॥ ४ ॥

१७५५ पुंडलीकें उभा केला । भक्त भावाचा अंकिला ॥ १ ॥ युगें झालीं अठ्ठावीस । उभा मर्यादा पाठीस ॥ २ ॥ सम पाउलीं उभा । कटीं कर कर्दळी गाभा ॥ ३ ॥ गळां वैजयंती माळ । मुगुट दिसतो तेजाळ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शोभा । विठ्ठल विटेवरी उभा ॥ ५ ॥

१७५६ युगें अठ्ठावीस झालीं । परी न वैसे तो खालीं ॥ १ ॥ कोण पुण्य न कळे माय । विटे लाधले या विठ्ठलाचे पाय ॥ २ ॥ नाहीं बोलाचाली मौन धरियेलें । कैसें चाळाविलें पुंडलीकें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विटेवर । दोन्ही कटीं ठेविले कर ॥ ४ ॥

१७५७ स्थूळ ना सूक्ष्म कारण ना महाकारण। यापरता वेगळाचि आहे जाण गे माये ॥ १ ॥ पुंडलीकाचे प्रेमें मौनस्थ उभा। कोण्हा न बोले उगला उभा ठेला गे माय ॥ २ ॥ निंद्य वंद्य जगीं यावें भेटीलागीं। दरुशनें उद्धार वेगीं तया गे माय ॥ ३ ॥ ऐसा लाघवी खेळ खेळोनी निराळा। एकाजनार्दनीं डोळां देखिला गे माय ॥ ४ ॥

१७५८ विठ्ठल रुक्मिणी राही सत्यभामा। एकरूपी परमात्मा पंढरीये ॥ १ ॥ कैवल्य उघडें क्षीरसागर निवासी। तपें पुंडलीकासी वश्य झालें ॥ २ ॥ अणुरेणुपासोनी भरूनि उरला। तो म्यां देखियेला पंढरीये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सांवळा श्रीकृष्ण। जनीं जनार्दन पूर्ण भरला ॥ ४ ॥

१७५९ विठ्ठल सांवळा पंढरीये उभा। धन्य त्याची शोभा शोभतसे ॥ १ ॥ पुंडलीका मागें कर ठेऊनी कटीं। समपाय विटीं देखियेला ॥ २ ॥ राही रखुमाई शोभती त्या बाहीं। वैष्णव दोहीं बाहीं गरूडपारीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाहूनियां ध्यान। मनाचें उन्मन होत असे ॥ ४ ॥

१७६० एकरूप मन झालेंसें दोघांचें। देव आणि भक्तांचें रूप एका ॥ १ ॥ पुंडलीका कारणें समुच्चय उभा। त्रैलोक्याची शोभा पांडुरंग ॥ २ ॥ ध्यातां चित्त निवे पाहतां टसावे। एकाजनार्दनीं सांठवे हृदयीं रूप ॥ ३ ॥

१७६१ विठ्ठल पुंडलीकासाठीं। उभा राहिला वाळुवंटीं। कर ठेउनीयां कटीं। भक्तांसाठीं अद्यापि ॥ १ ॥ न कळे तयाचें महिमान। वेदां पडिलेंसे मौन। शास्त्रांचें भांडण। परस्परें खुंटलें ॥ २ ॥ नेणवे तो सोळां बारां। आणीक साहां ते अठरां। पंचविसांसी पुरा। न कळे बरा छत्तिसां ॥ ३ ॥ ऐसा त्रिवाचावेगळा। परमानंदाचा पुतळा। एकाजनार्दनीं डोळां। देखिला देव ॥ ४ ॥

१७६२ सगुण रूपडें अद्वैत बुंथी। घेउनी पंढरीप्रती उभा

विटे ॥ १ ॥ डोळियांची धणी पाहतां न पुरे । मनाचि चांचरे पाहतां पाहतां ॥ २ ॥ रूप आकारलें पुंडलीकाचे भेटी । उभें असे तटीं भिवरेच्या ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उपाधीनिराळा । उभा तो सांवळा विटेवरी ॥ ४ ॥

१७६३ क्षीरसागरींचें निजरूपडें । पुंडलीकाचेनि पडिपाडें । उभें असे तें रोकडें । पंढरीये गोजिरें ॥ १ ॥ पहा पहा डोळेभरी । शंख चक्र मिरवे करीं । कास कसिली पीतांबरीं । हृदयावरी वैजयंती ॥ २ ॥ भीमरथी वाहे पुढां । करीत पापाचा रगडा । पुंडलीकाचे भिडा । उभा उगा राहिला ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । त्रैलोक्याचा जो धनी । नाचतो कीर्तनीं । भक्तां मागें सर्वदां ॥ ४ ॥

१७६४ येऊनियां पंढरपुरा । उभा सामोरा पुंडलीका ॥ १ ॥ उभारुनी बाह्या हात । भक्तां इच्छिलें तें देत ॥ २ ॥ भलते याती नारीनर । दरुशनें उद्धार सर्वांसी ॥ ३ ॥ साक्ष भीमरथी आई । एकाजनार्दनीं पाहीं ॥ ४ ॥

१७६५ कर कटावरी वैजयंती माळा । तो हरी डोळां देखियेला ॥ १ ॥ रूप सांवळें शोभे विटेवरी । तो हरी डोळेभरी देखियेला ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाहतां रूपडें । त्रिभुवन थोकडें दिसतसे ॥ ३ ॥

१७६६ सकळ देवांचा नियंता । माझा विठ्ठल मातापिता ॥ १ ॥ तो हा उभा विटेवरी । कट धरुनियां करीं ॥ २ ॥ मिरवे वैजयंती माळा । केशर कस्तुरीचा टिळा ॥ ३ ॥ मकराकार कुंडलें । करीं शंखचक्र शोभले ॥ ४ ॥ एका शरण जनार्दनीं । विठ्ठल पाहे ध्यानीं मनीं ॥ ५ ॥

१७६७ शोभती दोन्ही कटीं कर । रूप सांवळें सुंदर । केशराची उटी नागर । गळां माळ वैजयंती ॥ १ ॥ वेधें वेधक हा कान्हा । पहा वेधतुसे मना । न बैसेचि ध्याना । योगियांच्या सर्वदा ॥ २ ॥ उभारूनी दोन्ही बाह्या । भाविकांची वाट पाहे । शहाणे न लभती पाये ।

तया स्थळीं जाउनी ॥ ३ ॥ ऐसा उदार मोक्षदानी । गोपी वेधक चक्रपाणी । शरण एकाजनार्दनीं । नाठवे दुजें सर्वदा ॥ ४ ॥

१७६८ उभा विटेवरी । कट धरूनियां करीं । भीमा तो सामोरी । वहात आहे ॥ १ ॥ जाऊं तया ठाया । आनंद तेणें काया । वैष्णवांचिया पाया । लोटांगणीं ॥ २ ॥ कर्माकर्म नाहीं वाद । भेदभ्रम नाहीं भेद । वैष्णवाचा छंद । नाम गाती आनंदें ॥ ३ ॥ सुख अनुपम्य अभेदें । एकाजनार्दनीं छंदें । गातां नाचतां आल्हादें । प्रेम जोडे ॥ ४ ॥

१७६९ योगियांचा योग साधन तें चांग । तो पांडुरंग विटेवरी ॥ १ ॥ मुमुक्षु संपदा ज्ञानियाचा बांधा । तो पांडुरंग बोधा विटेवरी ॥ २ ॥ सच्चिदानंदघन अमृत मधुसूदन । एकाजनार्दन विटेवरी ॥ ३ ॥

१७७० वेदांचें सार निगमाचें माहेर । तो हा परात्पर उभा विटे ॥ १ ॥ शास्त्रांचे निजघर पुराणांचें निजसार । तो हा विश्वंभर उभा विटे ॥ २ ॥ काळाचा तो काळ भक्तांचा प्रतिपाळ । तो हा दीनदयाळ उभा विटे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शोभे दिनमणी । भक्तभाग्यधणी पंढरीये ॥ ४ ॥

१७७१ रोकडेंचि ब्रह्म ब्रह्मज्ञानाचें गोंढुळें । तें उभें असे ठेलें पंढरीये ॥ १ ॥ नये अनुमाना वेदांत सिद्धांतियां । मा ब्रह्मज्ञानिया कोण पुसे ॥ २ ॥ चारी वाचा जेथें कुंठित पैं जाहल्या । मौन त्या राहिल्या वेदश्रुती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं साराचें हें सार । परब्रह्म निर्धार पंढरीये ॥ ४ ॥

१७७२ सिद्धसाधक जया हृदयीं ध्याती । तो गोपिकेचा पती विठ्ठलराव ॥ १ ॥ सांवळें सांवळें रूप तें सांवळें । देखतांचि डोळे प्रेमयुक्त ॥ २ ॥ जीवाचें जीवन मनाचें उन्मन । तें चैतन्यघन पूर्ण विटेवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आनंद अद्वय । न कळे त्याची सोय ब्रह्मादिकां ॥ ४ ॥

१७७३ एकपणें देव विटेवरी उभा । चैतन्याचा गाभा पांडुरंग ॥ १ ॥ मानसमोहन भक्तांचें जीवन । योगियांचें ध्यान पांडुरंग ॥ २ ॥ अनाथा कोंवसा ध्यानीं नारायण । सुखाचो सांठवण पांडुरंग ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आनंदाचा कंद । पाहतां आनंद पांडुरंग ॥ ४ ॥

१७७४ सर्वां आदि मूळ नकळे अकळ । तो भक्तप्रतिपाळ भीमा-तीरीं ॥ १ ॥ योगियांच्या ध्याना नये अनुमाना । कैलासींचा राणा ध्यात ज्यासी ॥ २ ॥ शुकादिकां ज्यांचा वेध अहर्निशीं । तो उभा हृषीकेशी विटेवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्म परिपूर्ण । सगुण निर्गुण तोचि एक ॥ ४ ॥

१७७५ सगुण निर्गुण वुंथीचें आवरण । ब्रह्म सनातन पंढरीये ॥ १ ॥ तो हा श्रीहरी नंदाचा खिल्लारी । योगी चराचरीं ध्याती जया ॥ २ ॥ शिवाचें जें ध्येय मुनीजनांचे ध्यान । ब्रह्म परिपूर्ण पंढरीये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अठरां निराळा । लाविलासे चाळा सहाचहूंसी ॥ ४ ॥

१७७६ देवो न कळे अभाविकां । उघड पंढरीसी देखा । भोळे सकळां भाविकां । ठाउका असे ॥ १ ॥ न कळे तयाचें विंदान । भेटी जातां वेधी मन । तोडीत बंधन । संसाराचें क्षणार्धें ॥ २ ॥ रूप पाहतां गोजिरें । आवडे डोळियां साजिरें । चित्त तेथें झुरे । पायांपें सकळ ॥ ३ ॥ तुटे काम आणि क्रोध । अवघा तो परमानंद । एकाजनार्दनीं गोविंद । अभेदपणें पाहतां ॥ ४ ॥

१७७७ न कळे जयाचें महिमान । वेदश्रुतींसी पडलें मौन । वेडावलें दरुशन । जयालागीं पाहतां ॥ १ ॥ तोचि उभा विटेवरी । भक्तकरुणाकर हरी । रुक्मिणी निर्धारीं । वामभागीं शोभत ॥ २ ॥ गरुड सन्मुख उभा । शोभे चैतन्याचा गाभा । नभीं लोपली तेज-प्रभा । ऐसा उभा विठ्ठल ॥ ३ ॥ मन धांतां न धाये । दृष्टि पाहतां न समाये । एकाजगार्दनीं पाय । वंदू त्याचे आवडी ॥ ४ ॥

१७७८ चित्त वेधियेलें नंदाच्या नंदनें । मोहियेले ध्यानें योगिराज ॥ १ ॥ सगुण सुंदर पाहतां मनोहर । सबाह्य अभ्यंतर व्यापियेलें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सांवळें चैतन्य । श्रीगुरुची खूण विटेवरी ॥ ३ ॥

१७७९ हृदयस्थ आत्माराम नेणती । मूर्ख ते फिरती तीर्थाटणीं ॥ १ ॥ काय तयां भ्रांति पडलीसे जीवां । देवाधिदेवा विसरती ॥ २ ॥ विश्वाचा तो आत्मा उभा विटेवरी । भक्तकाज कैवारी पांडुरंग ॥ ३ ॥ प्रणवापैलीकडे वैखरीये कानडें । भाग्य तें केवढें पुंडलीकाचें ॥ ४ ॥ तयाचिया लोभा गुंतुनी राहिले । अठ्ठावीस युग झाले न बैसे खालीं ॥ ५ ॥ सन्मुख चंद्रभागा संतांचा सोहळा । एकाजनार्दनीं डोळां पाहूं चला ॥ ६ ॥

१७८० माझ्या वडिलांचें दैवत । कृपाळु हा पंढरीनाथ ॥ १ ॥ पंढरीसी जाऊं चला । भेटूं रखुमाईविठ्ठला ॥ २ ॥ पुंडलीकें बरवें केलें । कैसें भक्तीनें गोविलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नीट । पायीं जडलीसे वीट ॥ ४ ॥

१७८१ ध्येयध्याताध्यान विठ्ठल संपूर्ण । ज्ञेय ज्ञाता पूर्ण विठ्ठल माझा ॥ १ ॥ योगयाग तप विठ्ठल नाम जप । पुण्य आणि पाप विठ्ठल बोला ॥ २ ॥ उन्मनी साधिली विठ्ठल बोला वाणी । तारील निर्वाणीं विठ्ठल माझा ॥ ३ ॥ मज भरंवसा कायामनेंवाचा । एकाजनार्दनीं त्याचा शरणांगत ॥ ४ ॥

१७८२ सोलींव ब्रह्मज्ञान सांगत जे गोष्टी । तें उघडें नाचे दृष्टी संतारंगें ॥ १ ॥ गळां तुळशीहार मुद्रांचे शृंगार । नामाचा गजर टाळ घोळ ॥ २ ॥ दिंडी गरुडटक्के मकरंद वैभव । हरुषें नाचे देव तया सुखीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुखाची मांदूस । जनार्दनें समरस केलें मज ॥ ४ ॥

१७८३ त्वंपद तत्पद असिपद यावेगळा दिसे । खोळ बुंथी घेउनी विटेवरी उभा असे गे माय ॥ १ ॥ वेडावला पुंडलीकें उभा केला ।

तेथोनी कोठें न जाय गे माय ॥ २ ॥ भक्ता अभयकर देतुसे अवलीळा । मेळवोनी मेळा वैष्णवांचा गे माय ॥ ३ ॥ पुंडलीकें मोहिला उभा उगाचि केला । एकाजनार्दनीं ठसावला रूपेंवीण गे माय ॥ ४ ॥

१७८४ जो हा उद्गार प्रसवे ॐकार । तें रूप सुंदर विटेवरी ॥ १ ॥ ध्याता ध्यान ध्येय जेथें पैं खुंटलें । तें रूप प्रगटलें पंढरीये ॥ २ ॥ ज्ञेयज्ञाताज्ञान प्रेमाचें आथिलें । तें रूप सानुलें पंढरीये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रूपाचें रूपस । वैकुंठनिवास पंढरीये ॥ ४ ॥

१७८५ जयाकारणें श्रमले भांडती । वेदादिकां न कळे मति । तो वोळला सगुण मूर्ति । पुंडलीका कारणें ॥ १ ॥ धन्य धन्य पावन देख । पुण्यभूमि पावन सुरेख । तया गातां होतसे हर्ष । प्रेमानंदें डुलती ॥ २ ॥ एकाजनार्दनीं शरण । पहातां पहातां वेधलें मन । मोक्ष मुक्ति कर जोडून । उभे तिष्ठत सर्वदां ॥ ३ ॥

१७८६ रामकृष्ण नाम । कथा करूं कीर्तन ॥ १ ॥ हाचि आम्हां मंत्र । सोपा दिसे सर्वत्र ॥ २ ॥ संतांचे संगती । मुखीं नामामृत तृप्ती ॥ ३ ॥ वसो कीर्तनीं सदा । माझी मती गोविंदा ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका । म्हणे माझी कींव भाका ॥ ५ ॥

१७८७ आजी देखिलीं पाउलें । तेणें डोळे धन्य जाहले ॥ १ ॥ मागील शीणभारु । पाहतां न दिसे निर्धारू ॥ २ ॥ जन्माचें तें फळ । आजी जाहलें सुफळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं डोळां । विठ्ठल देखिला सांवळा ॥ ४ ॥

१७८८ वेदीं जैसा वर्णिला । तैसा विटेवरी देखिला ॥ १ ॥ पुराणें सांगती ज्या गोष्टी । तो विटेवरी जगजेठी ॥ २ ॥ शास्त्रें वेवादती पाहीं । तोचि विटे समपाईं ॥ ३ ॥ न कळे न कळे आगमा । निगमांही न कळे सीमा ॥ ४ ॥ जाला अंकित आपण । एकाजनार्दनीं शरण ॥ ५ ॥

१७८९ जगासी भुलवणा भाविकांचे मन । तो जनार्दन विटेवरी ॥ १ ॥ कामारी कामारी ऋद्धिसिद्धी घरीं । तो परमात्मा श्रीहरी विटेवरी ॥ २ ॥ सनकसनंदन संपुष्टीं ध्याती। ती अंतर्ज्योती विटेवरी ॥ ३ ॥ सांवळें सगुण निर्गुणाचे गुण । एकाजनार्दन विटेवरी ॥ ४ ॥

१७९० निवृत्ति शोभे मुगुटाकार । ज्ञान सोपान वटेश्वर ॥ १ ॥ विठ्ठ पंढरीचे राणे । ल्याले भक्तांची भूषणें ॥ २ ॥ खेचर विसा जगमित्रनागा । कुंडलें जोडा विठोबाजोगा ॥ ३ ॥ बाहु शोभे बाहुवट । गोरा सांवता दिग्पाट ॥ ४ ॥ कंठीं जाणा एकविंद । तो हा जोगा परमानंद ॥ ५ ॥ गळा शोभे वैजयंती । तिसी मुक्ताई म्हणती ॥ ६ ॥ अखंड शोभे माझ्या बापा । पदकीं शोभे नामा शिंपा ॥ ७ ॥ कटीं सुत्र कटावरी । तो हा सोनार नरहरी ॥ ८ ॥ कांसे कासिला पिंतांबर । तो हा जाणावा कबीर ॥ ९ ॥ जानु जघन सरळ । ते हि कान्हुपात्रा विशाळ ॥ १० ॥ दंतपंक्तीचा झळाळ । तो हा कान्हया रसाळ ॥ ११ ॥ चरणींच्या क्षुद्र घंटा । नामयाचा नारा विठा ॥ १२॥ वाम चरणीं तोडर । परसा रूळतो किंकर ॥ १३ ॥ चरणीं विट निर्मळ । तो हा झाला चोखामेळ ॥ १४ ॥ चरणातळील उर्ध्व रेखा । जाला जनार्दन एका ॥ १५ ॥

## श्रीनिवृत्तिमहाराज.

१७९१ सर्व काम धन सर्व सिद्ध पूर्ण । पतीतपावन हरी एकु ॥ १ ॥ तें रूप पंढरी पुंडलीका बोळलें । आणुनि ठेविलें भीमातीरीं ॥ २ ॥ नलगती त्या सिद्धि करणें उपाधी । नित्य चित्तशुद्धी विठ्ठलनामें ॥ ३ ॥ कळिकाळासी त्रासु चित्तीं हृषीकेशु । उगवला दिवसु सोनियाचा ॥ ४ ॥ त्रिभुवनीं थोर क्षेत्र पैं सार ।विठ्ठल उच्चार भीमातीरीं ॥ ५ ॥ निवृत्ति तत्पर निवाला सत्वर । नित्यता आचार विष्णुमय ॥ ६ ॥

१७९२ उघडें स्वरूप प्रत्यक्षाचे दीप । नाम घेतां पाप हरे जना

॥ १ ॥ तें रूप विठ्ठल विनट सकळ । सेवा दिनकाळ पंढरीयेसी ॥२॥ रजतमें दुरी नामाची माधुरी । निशाणी एकसरी रामकृष्ण ॥ ३ ॥ भवाब्धितारक नावाडा विवेक । पुंडलिक देख सेवितुसे॥ ४ ॥ विश्व हें तारिलें नामाचि पिकलें । केशवीं रंगले मन हेतु ॥ ५ ॥ निवृत्ति विठ्ठल सेवितु सकळ । दिन काळ फळ आत्माराम ॥ ६ ॥

१७९३ जनांसी तारक विठ्ठल हाचि एक । केलासे विवेक सनकादिकीं ॥ १ ॥ तें रूप पंढरी वोळलेंसे देखा । द्वैताची पैं शाखा तोडियेली ॥ २ ॥ उगवलें बिंब अद्वैत स्वयंभ । नाम हें सुलभ विठ्ठलराज ॥ ३ ॥ निवृत्तीचें गूज विठ्ठल सहज । गयनीराजें मज सांगितलें ॥ ४ ॥

१७९४ हरीविणें व्यर्थ आचार समर्थ । हरि हेंचि हित अरे जना ॥ १ ॥ तें रूप पंढरी पुंडलीकसंगें । एका नामें पांग पाश तोडी ॥ २ ॥ सर्व ब्रह्मार्पण कर्म करी जाण । वेदमतें खूण ऐसी असे ॥ ३ ॥ निवृत्तीचा देव सर्व हा गोविंद । नाहीं भिन्नभेद विश्वीं इये ॥ ४ ॥

१७९५ वोळलें दुभतें सर्वांसि पुरतें । प्रेमाचें भरतें वैष्णवांसी ॥ १ ॥ लोळती चरणीं वैष्णव गोमटे । पुंडलीकपेठे हरी आला ॥ २॥ सोपान खेचर ज्ञानदेव लाठा । देताती वैकुंठा क्षेम सदा ॥ ३ ॥ निवृत्तीनें हृदयीं पूजिलें तें रूप । प्रत्यक्ष स्वरूप विठ्ठलराज ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

१७९६ सर्वादि सर्वसाक्षी तो। विश्वंभर खदिवद तो गे बाई ॥ १ ॥ आनंद आनंद तो । प्रबोधा प्रबोध तो गे बाई ॥ २ ॥ रखुमादेवीवरु तो । विटेवरी उभा तो गे बाई ॥ ३ ॥

१७९७ कांहीं नव्हे तो । अमूर्ता मूर्त तो गे बाई ॥ १ ॥ सहजा सहज तो । सहज सुखनिधान तो गे बाई ॥ २ ॥ रखुमादेवीवरु तो पुंडलीकवरद तो गे बाई ॥ ३ ॥

१७९८ निजगुज्ञा गूज तो। मोहना मोहन तो गे बाई ॥ १ ॥ बोधाबोध बोधविता तो। द्वैताद्वैत अद्वैत तो गे बाई ॥ २ ॥ रखुमादेवीवरु तो। सर्वादि सर्वेश्वरु तो गे बाई ॥ ३ ॥

१७९९ निजब्रह्म ब्रह्म तो। ब्रह्मादिकां वंद्य तो गे बाई ॥ १ ॥ अचिंत चिंतन तो। सारासार गुह्य तो गे बाई ॥ २ ॥ बाप रखुमादेवीवरु विठ्ठलु तो। जनीं वनीं कृपाळु तो गे बाई ॥ ३ ॥

१८०० राम बरवा कृष्ण बरवा। सुंदर बरवा बाइयांनो ॥ १ ॥ केशव बरवा माधव बरवा। गोपाळ बरवा बाइयांनो ॥ २ ॥ बाप रखुमादेवीवरु त्रिभुवनीं गरुवा। विठ्ठलु बरवा बाइयांनो ॥ ३ ॥

१८०१ चतुरपणें चतुराननु पैं भागला। शिवुपणें शिवरूपु पैं जाहला ॥ १ ॥ हरिपणें हरि अंग रिघाला। या तिहींचा मेळा न दिसे गे माये ॥ २ ॥ रखुमादेवीवरु तिहीं गुणां वेगळा। शक्ति नव्हे दादुला गे माये ॥ ३ ॥

१८०२ स्वर्ग जयाची साळोंखा। समुद्र पाळो पिंड रेखा। शेषासारिखी बैसका। जो आधार तिहीं लोकां ॥ १ ॥ लिंग देखिलें देखिलें। त्रिभुवनीं विस्तारलें ॥ २ ॥ मेघधारीं तपन केलें। तारापुष्पीं वरि पूजिलें। चंद्रफळ ज्या वाहिलें। ओवाळिलें रविदीपें ॥ ३ ॥ आतमनैवेद्य समर्पिलें। ब्रह्मानंदीं मग वंदिलें। ज्योतिर्लिंग मग ध्याइलें। ज्ञानदेवीं हृदयीं ॥ ४ ॥

१८०३ मूळ ना ढाळ शाखा न पल्लव। तो हा कैसा देव आला घरा ॥ १ ॥ निर्गुणपणें उभा सगुणपणें शोभा। जीवशिवीं प्रभा दावितांहे ॥ २ ॥ नकळे याची गती नकळे याची लीळा। आपेंआप सोहळा भोगिताहे ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे न कळे याची थोरी। आपण चराचरीं नांदताहे ॥ ४ ॥

१८०४ क्षीरसागरींचें निजरूपडें। पाहतां पारखिया त्रिभुवनीं न संपडे। तें उभें आहे वाडेंकोडें। पुंडलीकाचे आवडी ॥ १ ॥ मेघ-

श्याम घेउनियां बुंथी । जयातें श्रुती पैं वानिती । कीं ते पुराणासी वाडे । तें पंढरीये उभें असे कानडें गे माये ॥ २ ॥ आवडीच्या वाल्भें गोजाविलें गोजिरें । पाहतां साजिरें त्रिभुवना एक गें माये ॥ ३ ॥ जें सकळ मंगळदायकाचें प्रेमें आथिलें । कीं ब्रह्मरसाचें वोतिलें घोसुलें । ब्रह्मविद्येचें सार मथिलें । देखा सकळ आगमींचें संचलें । कीं बाप-रखुमादेवीवरु विठ्ठल नामें मढिलें । श्रीगुरु निवृत्तीनें दिधलें प्रेम-खूण रया ॥ ४ ॥

१८०५ नेणों विठो मार्ग चुकले । उघडे पंढरपुरा आले । भक्त पुंडलीकें देखिलें । उभें केलें विटेवरी ॥ १ ॥ तो हा विठोबा निधान । ज्याचें ब्रह्मादिकां ध्यान । पाउलें समान । विटेवरी शोभलीं ॥ २ ॥ रूप पाहतां तरी डोळसु । सुंदर पाहतां गोपवेषु । महिमा वर्णितां महेशु । जेणें मस्तकीं वंदिला ॥ ३ ॥ भक्ति देखोनि लांचावला । जाऊं नेदी उभा केला । निवृत्तिदास म्हणे रे विठ्ठला । जन्मोजन्मीं न विसंबे ॥ ४ ॥

१८०६ आनंदाच्या तारीं अमृताची वाटी । विवेक तारूं घोटी रसनाबळें ॥ १ ॥ तें हें रूपडें रूपस विठ्ठल । पुंडलीकें वहुसाल प्रार्थियेलें ॥ २ ॥ तारावया जन व्हावया पावन । जडमूढ अज्ञान हरिपाठें ॥ ३ ॥ कर्म धर्म करितां शिणलीं येतां जातां । मग पुंडलीकें अनंता प्रार्थियेलें ॥ ४ ॥ येऊनियां श्रीहरी भीमेच्या तीरीं । सुदर्शना-वरी पंढरी उभविली ॥ ५ ॥ अमरतरुवर तीर्थ सरोवर । वेणुनाद श्रीधर खेळताती ॥ ६ ॥ बागडे गाती हरी वांकुल्या कुसरी । तेथें पुंडलीक परोपरी स्तवन करी ॥ ७ ॥ धन्य पंढरीनगरी फावली चराचरीं । धन्य जो भूमीवरी दृष्टीभरी हरी देखे ॥ ८ ॥ ज्ञानदेवा बीज विठ्ठल केशिराज । नव्हे हें नवल चोज प्रत्यक्ष हरी ॥ ९ ॥

१८०७ दुजें द्वैत सांडी एकतत्त्व मांडी । अद्वैत ब्रह्मांडीं पैसु कीजे ॥ १ ॥ तें रूप पंढरी पुंडलीका द्वारीं । मुक्तिमार्ग चारी वश्य

रया ॥ २ ॥ अनंतीं अनंत वोतिलें संचित । वैकुंठ अद्भुत उभें असे ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं ध्यान मनमौन्य चरण । आपणाचि मग्न तेथें जाले ॥ ४ ॥

१८०८ जयातें पाहतां परतला आगमु । निगमा नाकळे दुर्गमु । सिद्धसाधक निरुतें वर्मु । न पडे ठायीं सर्वथा ॥ १ ॥ तें या पुंडलीका वोळलें । प्रेमप्रीतीनें घोळलें । भक्तिमातेनें चाळविलें । आधीन केलें आपणया ॥ २ ॥ जें माये अविद्ये वेगळें । गुणत्रया नातळे । काळें गोरें ना सांवळें । निर्धारितां नेणवे ॥ ३ ॥ जें द्वैताद्वैताहूनि परतें । जें सुखातें वाढवितें । योगी लक्षीं लक्षित ज्यातें । परी नेणवे सर्वथा ॥ ४ ॥ जें रूपा अरूपा वेगळें । सहस्त्रनामांहूनि आगळें । परम कृपेचें कोंवळें । क्रियाकर्मविरहित ॥ ५ ॥ जें ब्रह्मरसाचें गोठलें । तें पंढरीये प्रगटलें । बापरखुमादेवीवरु विठ्ठलें । नामें आथिलें चोखडें रया ॥ ६ ॥

१८०९ जन्मोजन्मींच्या सायासीं । विठ्ठल लाधला पुंडलीकासी ॥ १ ॥ पूर्वी पुण्य केलें वो माये । विटे लाधले या विठोबाचे पाय ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु आहे । तया तीर्था केधवां जाती पाये ॥ ३ ॥

१८१० आनु नेणें कांहीं । विठ्ठल स्मरें देहभावीं ॥ १ ॥ पुंडलीका हें चिंतन । म्हणोनि विटेवरी हें ब्रह्म ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु शाहाणे । विठ्ठलु पाहुणे पुंडलीक ॥ ३ ॥

१८११ वाराणसी यात्रे जाईन । प्रयागतीर्थ पाहीन । त्रिवेणीये स्नान करीन । परी मी वीट नव्हेन ॥ १ ॥ विठोबा पायींची वीट । मी कईंवा होईन ॥ ध्रु० ॥ गोदावरी यात्रे जाईन । बारा वरुषांचें फळ लाहीन । अञ्जकतीर्थीं स्नान करीन । परि मी वीट नव्हेन ॥ २ ॥ मल्लिकार्जुन यात्रे जाईन । श्रीशैल्य शिखर पाहीन । पाताळ गंगे स्नान करीन । परि मी वीट नव्हेन ॥ ३ ॥ मातापुर यात्रे जाईन । सह्याद्रि पर्वत पाहीन । गहनगंगे स्नान करीन । परि मी वीट नव्हेन ॥ ४ ॥ कोल्हापुर यात्रे जाईन । महालक्ष्मी पाहीन । विशाळतीर्थीं

स्नान करीन । परि मी वीट नव्हेन ॥ ५ ॥ एका अंगुष्ठीं तप करीन । पृथ्वी पात्रचि लाहीन । देह कर्वतीं देईन । परि मी वीट नव्हेन ॥ ६ ॥ बहुतां पुण्याच्या सायासीं । चरण जोडले विटेसी । निवृत्तिदास म्हणे परियेसीं । परि मी वीट नव्हेन ॥ ७ ॥

१८१२ माझे जीवींची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी ॥ १ ॥ पांडुरंगीं मन रंगलें । गोविंदाचे गुणीं वेधलें ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहतां रूप आनंद साठवे ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु सगुण निर्गुण । रूप विटेवरी दाविलें खूण ॥ ४ ॥

१८१३ योगियां दुर्लभ तो म्यां देखिला साजणी । पाहतां पाहतां मना न पुरे धणी ॥ १ ॥ देखिला देखिला गे माये देवांचा देव । फिटला संदेहो निमालें दुजेंपण ॥ २ ॥ अनंतरूपें अनंतवेषें देखिलें म्यां त्यासी । बापरखुमादेवीवर खूण बाणली कैसी ॥ ३ ॥

१८१४ सगुण निर्गुण दोन्ही विलक्षण । ब्रह्म सनातन विठ्ठल हा ॥ १ ॥ पतीत पावन मानस मोहन । ब्रह्मसनातन विठ्ठल हा ॥ २ ॥ ध्येय ध्याता ध्यान चित्त निरंजन । ब्रह्मसनातन विठ्ठल हा ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे आनंद चिद्घन । ब्रह्मसनातन विठ्ठल हा ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

१८१५ जेथें वेदां न कळे पार । पुराणांसी अगोचर ॥ १ ॥ तो हा पंढरीराणा । बहु आवडतो मना ॥ २ ॥ सहा शास्त्रें शिणलीं । मग मौनचि राहिलीं ॥ ३ ॥ सेना म्हणे मायबाप । उभा कटीं ठेउनी हात ॥ ४ ॥

## श्रीकान्होपात्रा

१८१६ माझ्या जीवींचें जीवन । तो विठ्ठल निधान ॥ १ ॥ उभा असे विटेवरी । वांटी प्रेमाची सिदोरी ॥ २ ॥ आलीयाची धणी । निवा-

रितो चक्रपाणी ॥ ३ ॥ भेटा दयेच्या सागरा । विनवितसे कान्होपात्रा ॥ ४ ॥

## श्रीचोखामहाराज

१८१७ मज तों नवल वाटतसे जीवीं । आपुली पदवी विसरलें ॥ १ ॥ कवणिया सुखा परब्रह्म भुललें । गुंतोनी राहिलें भक्तभाकें ॥ २ ॥ निर्गुण होतें तें सगुण पैं झालें । विसरोनी गेलें आपआपणा ॥ ३ ॥ चोखा म्हणे कैसा हा नवलाव । देवाधिदेव वेडावला ॥ ४ ॥

१८१८ आपुलिया सुखा आपणाचि आला । उगलाचि ठेला विटेवरी ॥ १ ॥ तें हें सगुणरूप चतुर्भुज मूर्ती । शंख चक्र हातीं गदा पद्म ॥ २ ॥ किरीट कुंडलें वैजयंती माळा । कासे सोनसळा तेज फांके ॥ ३ ॥ चोखा म्हणे सर्व सुखाचें आगर । रूप मनोहर गोजिरें तें ॥ ४ ॥

१८१९ ज्या सुखाकारणें योगी शिणताती । परी नव्हे प्राप्ती तयालागीं ॥ १ ॥ तें प्रेमभावें पुंडलीका वोळलें । उघडेंचि आलें पंढरीये ॥ २ ॥ कर ठेवोनी कटीं उभा पाठीमागें । भक्तांचिया पांगें न बैसेचि ॥ ३ ॥ युगें अठ्ठावीस होवोनियां गेले । नाहीं पालटले अद्यापवरी ॥ ४ ॥ चोखा म्हणे ऐसा कृपाळु श्रीहरी । कीर्ति चराचरीं वानिताती ॥ ५ ॥

१८२० दुर्लभ होतें तें सुलभ पैं झालें । आपण नटलें सगुणरूप ॥ १ ॥ धरोनी आवडी पंढरीये आलें । उभेंचि राहिलें कर कटीं ॥ २ ॥ युगें अपरंपार न कळे ज्याचा पार । वैष्णवांचा भार शोभतसे ॥ ३ ॥ दिंड्या गरुडटके पताका शोभती । वागडे नाचती हरिदास ॥ ४ ॥ चोखा म्हणे ऐसें धरोनियां भीड । उभाउभी कोड पुरवीतो ॥ ५ ॥

१८२१ देखिला देखिला योगियांचा रावो । रुक्मादेवीनाहो पंढरीचा ॥ १ ॥ पुंडलीकासाठीं युगें अठ्ठावीस । धरूनी बाळवेष

भीमातटीं ॥ २ ॥ गाई गोपाळ वत्सें वैष्णवांचा मेळ । नाचती गोपाळ विठ्ठलछंदें ॥ ३ ॥ चोखामेळा तेथें वंदितो चरण । घाली लोटांगण महाद्वारीं ॥ ४ ॥

१८२२ मुळींचा संचला आला गेला कोठें । पुंडलीक पेठे विटेवरी ॥ १ ॥ विठोबा देखणा विठोबा देखणा । योगियांचा राणा पंढरीये ॥ २ ॥ भाविकां कारणें उभारोनी हात । वाट जो पहात अनुदिनीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे ऐसा भक्तांचा कृपाळ । दीनांचा दयाळ पंढरीये ॥ ४ ॥

१८२३ अवघा प्रेमाचा पुतळा । विठ्ठल पहा उघडा डोळां ॥ १ ॥ जन्ममरणाची येरझारी । तुटे भवभय निर्धारीं ॥ २ ॥ ऐसा प्रताप आगळा । गाये नाचे चोखामेळा ॥ ३ ॥

## श्रीकर्ममेळा

१८२४ तुमचा तों कळला भाव । माझा झाला पारखा ठाव ॥ १ ॥ घेवोनी बैसलासि ठेवणें । माझें द्यावें मजकारणें ॥ २ ॥ कायसा करिसी वादावाद । मुळींच खुंटलासे भेद ॥ ३ ॥ कर्ममेळा म्हणे हरी । तुम्हां मज नाहीं उरी ॥ ४ ॥

१८२५ अखंड तें मन ठेविलें चरणीं । आणिक तें ध्यानीं आहे माझें ॥ १ ॥ गोड गोजिरीं विठोबाचीं पाउलें । सुखें म्यां ठेविलें मस्तकासी ॥ २ ॥ वायां तोंडपिटी करा कशासाठीं । तुमची तो रहाटी कळों आली ॥ ३ ॥ कर्ममेळा म्हणे लोटांगण पायीं । मागणें तें देई हेंचि एक ॥ ४ ॥

---

# पंढरीपर

## श्रीतुकाराममहाराज

१८२६ करा करा लागपाठ । धरा पंढरीची वाट । जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ॥ १ ॥ दुजा ऐसा नाहीं कोणी । जो

या काढी भयांतूनि । करा म्हणऊनि । हा विचार ठायींचा ॥ २ ॥ होती गात्रें बेंबळीं । दिवस अस्तमानाकाळीं । हात पाय टाळीं । जों मोकळीं आहेती ॥ ३ ॥ कां रे घेतलासी सोसें । तुज वाट-ताहे कैसें । तुका म्हणे ऐसें । पुढें कैं लाहासी ॥ ४ ॥

१८२७ जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥१॥ सांडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥ २ ॥ खांद्या पताकांचे भार । तुळसीमाळा आणि अबीर ॥ ३ ॥ साधुसंतांच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥ ४ ॥

१८२८ जारे तुम्ही पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ १ ॥ गुण दोष नाणी मना । करी आपणांसारिखे ॥ २ ॥ उभारोनि उभा कर । भव पार उतराया ॥ ३ ॥ तुका म्हणे तांतड मोठी । झाली भेटी उदंड ॥ ४ ॥

१८२९ पंढरीसी जारे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडु-रंग ॥ १ ॥ वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तांतडी उता-वीळ ॥ २ ॥ मागील परिहार पुढें नाहीं सीण । जालिया दर्शन एक-वेळा ॥ ३ ॥ तुका म्हणे नेदी आणिकांचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ४ ॥

१८३० होय होय वारकरी । पाहें पाहें रे पंढरी ॥१॥ काय करावीं साधनें । फळ अवघेंचि तेणें ॥ २ ॥ अभिमान नुरे । कोड अवघेंचि पुरे ॥ ३ ॥ तुका म्हणे डोळां । विठो बैसला सांवळा ॥ ४ ॥

१८३१ पुण्य उभें राहो आतां । संतांचें याकारणें ॥ १ ॥ पंढरीचे लागा वाटे । सखा भेटे विठ्ठल ॥ २ ॥ संकल्प हे यावे फळा । कळ-वळा बहुतांचा ॥ ३ ॥ तुका म्हणे होउनि क्षमा । पुरुषोत्तमा अप-राध ॥ ४ ॥

१८३२ बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोयरा करी आतां ॥ १ ॥ करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ

सांडीं आतां ॥ २ ॥ सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥ ३ ॥ पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरी ॥ ४ ॥ विटेवरी नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंद नामघोषें ॥ ५ ॥

१८३३ जाती पंढरीस । म्हणे जाईन तयास ॥ १ ॥ तया आहे संवसार । ऐसें बोले तो माहार ॥ २ ॥ असो नसो भाव । जो हा देखे पंढरीराव ॥ ३ ॥ चंद्रभागे न्हाती । तुका म्हणे भलते याती ॥४॥

१८३४ चला पंढरीसी जाऊं । रखुमादेवीवरा पाहूं ॥ १ ॥ डोळे निवतील कान । मना तेथें समाधान ॥ २ ॥ संतां महंतां होतील भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ ३ ॥ तें तीर्थांचें माहेर । सर्व सुखाचें भांडार ॥ ४ ॥ जन्म नाहीं रे आणीक । तुका म्हणे माझी भाक ॥ ५ ॥

१८३५ आमुची मिरास पंढरी । आमुचें घर भीमातीरीं ॥ १ ॥ पांडुरंग आमुचा पिता । रखुमाबाई आमुची माता ॥ २ ॥ भाऊ पुंडलीक मुनि । चंद्रभागा आमुची बहिणी ॥३॥ तुका जुनाट मिरासी । ठाव दिला पायांपाशीं ॥ ४ ॥

१८३६ पंढरीची वारी आहे माझे घरीं । आणीक न करीं तीर्थ व्रत ॥ १ ॥ व्रत एकादशी करीन उपवासी । गाईन अहर्निशीं मुखीं नाम ॥ २ ॥ नाम विठोबाचें घेईन मी वाचे । बीज कल्पांतीचें तुका म्हणे ॥ ३ ॥

१८३७ पावलों पंढरी वैकुंठभुवन । धन्य आजि दीन सोनियाचा ॥ १ ॥ पावलों पंढरी आनंदगजरें । वाजतील तुरें शंख भेरी ॥ २ ॥ पावलों पंढरी क्षेम आलिंगनीं । संत या सज्जनीं निवाविलों ॥ ३ ॥ पावलों पंढरी पार नाहीं सुखा । भेटला हा सखा मायबाप ॥ ४ ॥ पावलों पंढरी येरझार खुंटली । माउली वोळली प्रेमपान्हा ॥ ५ ॥ पावलों पंढरी आपुलें माहेर । नाहीं संवसार तुका म्हणे ॥ ६ ॥

१८३८ आम्हीं ज्याचे दास । त्याचा पंढरिये वास ॥ १ ॥ तो हा देवाचाही देव । काय कळिकाळाचा भेव ॥ २ ॥ वेद जया गाती । श्रुति म्हणती नेति नेति ॥ ३ ॥ तुका म्हणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥ ४ ॥

१८३९ सुखरूप ऐसा दुजा कोण सांगा। माझ्या पांडुरंगा सारिखा तो ॥१॥ नलगे दंडण मुंडण तें कांहीं। साधनाची नाहीं आटाआटी ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान विधी तो हरिकथा। समाधान चित्ता सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे काला वैकुंठीं दुर्लभ। विशेष तो लाभ संतसंग ॥ ४ ॥

१८४० पंढरीये माझें माहेर साजणी। ओंवीये कांडणीं गाऊं गीत ॥ १ ॥ राही रखुमाई सत्यभामा माता। पांडुरंग पिता माहियेर ॥ २ ॥ उद्धव अक्रूर व्यास अंबऋषि । भाई नारदासी गौरवीन ॥ ३ ॥ गरुड बंधु लडिवाळ पुंडलीक । यांचें कवतुक वाटे मज ॥ ४ ॥ मज बहु गोत संत आणि महंत । नित्य आठवीत ओवियेसी ॥ ५ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान चांगया। जिवलगा माझिया नामदेवा ॥ ६ ॥ नागो जनमित्रा नरहरी सोनारा। रोहिदास कबिरा सोईरिया ॥ ७ ॥ परसा भागवता सुरदास सांवता। गाईन नेणतां सकळांसी ॥ ८ ॥ चोखामेळा संत जिवाचे सोईरे। न पडे विसर यांचा मज ॥ ९ ॥ जिवींच्या जीवना एकाजनार्दना। पाटका कन्हया मिराबाई ॥ १० ॥ आणीकही संत महानुभाव मुनि। सकळां चरणीं जीव माझा ॥ ११ ॥ आनंदें ओवियां गाईन मी त्यांसी। जाती पंढरीसी वारकरी ॥ १२ ॥ तुका म्हणे माझा बळिया बापमाय। हर्षें नांदताहे घराचारी ॥ १३ ॥

१८४१ सिंचन करितां मूळ। वृक्ष ओलावे सकळ ॥ १ ॥ नको पृथकाचे भरीं। पडों एक मूळ धरीं ॥ २ ॥ पाणचोऱ्याचें दार। वरिल दाटावें तें थोर ॥ ३ ॥ वश झाला राजा। मग आपुल्या

त्या प्रजा ॥ ४ ॥ एक चिंतामणी । फिटे सर्व सुख धणी ॥ ५ ॥ तुका म्हणे धांवा । आहे पंढरी विसांवा ॥ ६ ॥

१८४२ सुख पंढरीसी आलें । पुंडलीकें सांठविलें ॥ १ ॥ आतां धांवा माझे बाप । जिव्हा घेऊनियां माप ॥ २ ॥ करा एक खेप । मग नलगे हिंडावें ॥ ३ ॥ विषय गुंडूनि पसारा । धांव घ्यारे पंढरपुरा ॥ ४ ॥ आयुष्य वेंचे जंव आहे । तोंचि धांवोनियां जावें ॥ ५ ॥ आळस न करीं या लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ६ ॥

१८४३ पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला ॥ १ ॥ नव्हती हे अहाच बोल । मोकळे फोल कवित्व ॥ २ ॥ भावें घ्यारें भावें घ्यारें । एकदा जारे पंढरिये ॥ ३ ॥ भाग्यें आलेति मनुष्य देहा । तो हा पाहा विठ्ठल ॥ ४ ॥ पापपुण्या करील झाडा । जाइल पीडा जन्माची ॥ ५ ॥ घ्यावी हातीं टाळदिंडी । गावे तोंडीं गुणवाद ॥ ६ ॥ तुका म्हणे वटापटा । नलगे वाटा शोधाव्या ॥ ७ ॥

१८४४ धरितां ये पंढरीची वाट । नाहीं संकट मुक्तीचें ॥ १ ॥ वंद्यें येती देव पदें । त्या आनंदें उत्साहें ॥ २ ॥ नृत्यछंदें उडती रज । जे सहज चालतां ॥ ३ ॥ तुका म्हणे गरुडटके । वैष्णव निके संभ्रम ॥ ४ ॥

१८४५ तिळ एक अर्ध राई । सीतबुंध पावे काई । तया सुखा नाहीं । अंतपार पाहतां ॥ १ ॥ म्हणउनी करा लाहो । नका मागें पुढें पाहों । अवघ्यामध्यें आहों । अवघे सावचित्त तों ॥ २ ॥ तीर्थें न येती तुळणी । आजि या सुखाची धणी । जे काशी गयेहुनी । जीं आगळीं असती ॥ ३ ॥ येथें धरी लाज । वर्णा अभिमान काज । नाडला सहज । तुका म्हणे तो येथें ॥ ४ ॥

१८४६ तारूं लागलें बंदरीं । चंद्रभागेचिये तिरीं ॥ १ ॥ लुटा लुटा संतजन । अमुप हें रासी धन ॥ २ ॥ झाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ ३ ॥ तुका जवळी हमाल । भार चालवी विठ्ठल ॥ ४ ॥

१८४७ आषाढी निकट । आणि कार्तिकीचा हाट ॥ १ ॥ पुरे दोन्हीच बाजार । न लगे आणीक व्यापार ॥ २ ॥ तेंचि द्यावें तेंचि घ्यावें । कैवल्याच्या रासी भावें ॥ ३ कांहीं कोणा नेणे । विठोबांच्यानि तुका म्हणे ॥ ४ ॥

१८४८ न सरे लुटितां मागें बहुता जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥ १ ॥ सिद्ध महामुनि साधक संपन्न । तिहीं हें जतन केलें होतें ॥ २ ॥ पायाळाच्या गुणें पडिलें ठाउकें । जगा पुंडलीकें दाखविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे तेथें होतों मी दुबळा । आलें या कपाळा थोडें बहु ॥ ४ ॥

१८४९ जया दोषां परिहार । नाहीं नाहीं धुंडितां शास्त्र । ते हरती अपार । पंढरपुर देखलिया ॥ १ ॥ धन्य धन्य भीमातीर । चंद्रभागा सरोवर । पद्मतीर्थी विठ्ठल वीर । क्रीडास्थळ वेणुनादीं ॥२॥ सकळ तीर्थांचें माहेर । भूवैकुंठ निर्विकार । होतो नामाचा गजर । असुर काळ कांपती ॥ ३ ॥ नाहीं उपमा द्यावया । सम तुल्य आणिका ठाया । धन्य भाग्य जयां । जे पंढरपुर देखती ॥४॥ उपजोनि संसारीं । एक वेळ पाहें पंढरी । महा दोषां कैंची उरी । देवभक्त देखिलिया ॥ ५ ॥ ऐसी विष्णुची नगरी । चतुर्भुज नरनारी । सुदर्शन घरटी करी । रीग न पुरे कळिकाळा ॥ ६ ॥ तें सुख वर्णावया गति । एवढी कैंची मज मति । जे पंढरपुरा जाती । ते पावती वैकुंठ ॥ ७ ॥ तुका म्हणे या शब्दाचा । जया विश्वास नाहीं साचा । तो अधम जन्मांतरीचा । तया पंढरी नावडे ॥ ८ ॥

१८५० आवडे पंढरी भीमा पांडुरंग । चंद्रभागा लिंग पुंडलीक ॥ १ ॥ कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरविती ॥ २ ॥ तुका म्हणे जीवा थोर जालें सुख । नाठवे हे भूक तान कांहीं ॥ ३ ॥

१८५१ पंढरीचे वारकारी । ते अधिकारी मोक्षाचे ॥ १ ॥ पुंड-

लिका दिला वर । करुणाकरें विठ्ठलें ॥ २ ॥ मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लावूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे खरें झालें । एका बोलें संतांच्या ॥ ४ ॥

१८९२ आलें भरा केणें । येरझार चुके जेणें ॥१॥ उभें केलें विटेवरी । पेंठ इनाम पंढरी ॥ २ ॥ वाहाती मारग । अवघें मोहोरलें जग ॥ ३ ॥ तुका म्हणे माप । खरें आणा माझे बाप ॥ ४ ॥

१८९३ उठाउठीं अभिमान । जाय ऐसें स्थळ कोण ॥ १ ॥ तें या पंढरीस घडे । खळां पाझर रोकडे ॥ २ ॥ नेत्रीं अश्रूचिया धारा । कोठें रोमांच शरीरा ॥ ३ ॥ तुका म्हणे काला । कोठें अभेद देखिला ॥ ४ ॥

१८९४ सकळही पापें गेलीं दिगंतरीं । वैकुंठ पंढरी देखिलिया ॥ १ ॥ सकळही तीर्थें घडलीं एकवेळा । चंद्रभागा डोळा देखिलिया ॥ २ ॥ सकळही संतां एक वेळां भेटी । पुंडलिक दृष्टी देखिलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे जन्मा आल्याचें सार्थक । विठ्ठलचि एक देखिलिया ॥ ४ ॥

१८९५ उदारचक्रवर्ती । वैकुंठीचा भूपती । पुंडलिकाचिया प्रीती । विटेवरी राहिला ॥ १ ॥ सर्व सिद्धींचा दातार । सवें आणिला परिवार । भक्तां अभयकर । घ्या घ्या ऐसें म्हणतसे ॥ २ ॥ जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षी देवां संस्थापिलें । एकवीस स्वर्गांचें धरिलें । सत्तामात्रें आपुलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपावंत । इच्छिले पुरवी अर्थ । रिद्धिसिद्धि मुक्ती देत । शेखीं संग आपुला ॥ ४ ॥

१८९६ धन्य पुंडलिका बहु बरें केलें । निधान आणिलें पंढरीये ॥ १ ॥ न करी आळस आलिया संसारीं । पाहें पां पंढरी भूवैकुंठ ॥ २ ॥ न पवीजे केल्या तपांचिया रासी । तें जन लोकांसी दाखाविलें ॥ ३ ॥ सर्वोत्तम तीर्थ क्षेत्र आणि देव । शास्त्रांनीं हा भाव निवडिला ॥ ४ ॥ विष्णुपद गया रामनाम काशी । अवघीं पायांपाशीं

विठोबाच्या ॥ ५ ॥ तुका म्हणे मोक्ष देखिल्या कळस । तात्काळ हा नास अहंकाराचा ॥ ६ ॥

१८५७ वैकुंठा जावया तपाचे सायास । करणें जीव नास नलगे कांहीं ॥ १ ॥ तया पुंडलिकें केला उपकार । फेडावया भार पृथीवीचा ॥ २ ॥ तुका म्हणे सोपी केली पायवाट । पंढरी वैकुंठ भूमीवरी ॥ ३ ॥

१८५८ पंढरीचें भूत मोठें । आल्या गेल्या झडपी वाटे ॥ १ ॥ बहु खेचरीच रान । जातां वेडें होय मन ॥ २ ॥ तेथें जाऊं नका कोणी । गेलें नाहीं आलें परतोनी ॥ ३ ॥ तुका पंढरीसी गेला । पुन्हां जन्मा नाहीं आला ॥ ४ ॥

१८५९ पंढरीचा महिमा । देतां आणीक उपमा ॥ १ ॥ ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभीं भेटे ॥ २ ॥ आहेति सकळ । तीर्थें काळें देती फळ ॥ ३ ॥ तुका म्हणे पेठ । भूमीवरी हे वैकुंठ ॥ ४ ॥

१८६० पंढरी पंढरी । म्हणतां पापाची बोहरी ॥ १ ॥ धन्य धन्य जगीं ठाव । होतो नामाचा उत्साव ॥ २ ॥ रिद्धिसिद्धि लोटांगणी । प्रेमसुखाचिया खाणी ॥ ३ ॥ अधिक अक्षरानें एका । भूवैकुंठ म्हणे तुका ॥ ४ ॥

१८६१ पंढरीसी जाय । तो विसरे बापमाय ॥ १ ॥ अवघा होय पांडुरंग । राहे धरूनियां अंग ॥ २ ॥ नलगे धन मान । देहभावें उदासीन ॥ ३ ॥ तुका म्हणे मळ । नासी तात्काळ तें स्थळ ॥ ४ ॥

१८६२ पंढरीचा वास धन्य तेथीं प्राणी । अमृताची वाणी दिव्य देह ॥ १ ॥ मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरी दयारूप ॥ २ ॥ शांति क्षमा अंगीं विरक्ती सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं वर्ण अभिमान । अवघे जीवनमुक्त लोक ॥ ४ ॥

१८६३ धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलीकें ॥ १ ॥ धन्य तोही लोक अवघा दैवाचा । सूकाळ प्रेमाचा घरोघरीं

॥ २ ॥ धन्य तेहि भूमी धन्य तरुवर। धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥ ३ ॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान। आनंदें भुवन गर्जतसे ॥ ४ ॥ धन्य पशु पक्षी कीटक पाषाण। अवघा नारायण अवतरलासे ॥ ५ ॥ तुका म्हणे धन्य संसारातें आलीं। हरिरंगी रंगलीं सर्वभावें ॥ ६ ॥

१८६४ धन्य तो ग्राम जेथें हरिदास। धन्य तोचि वास भाग्य तया ॥ १ ॥ ब्रह्मज्ञान तेथें असे घरोघरीं। धन्य त्या नरनारी चतुर्भुज ॥ २ ॥ नाहीं पापा रीघ काळाचें जीवन। हरिनाम कीर्तन घरोघरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तिहीं तारिलें सकळां। आपल्या कोटी कुळा सहित जीव ॥ ४ ॥

१८६५ धन्य धन्य ज्यास पंढरीसी वास। धन्य ते जन्मास प्राणी आले ॥ १ ॥ चंहूं खाणीमध्यें होत कोणी एक। त्रिगुण कीटक पक्षीराज ॥ २ ॥ उत्तम चांडाळ नर नारी बाळ। अवघेचि सकळ चतुर्भूज ॥ ३ ॥ अवघा विठ्ठल तेथें दुजा नाहीं। भरला अंतर्बाहीं सदोदित ॥ ४ ॥ तुका म्हणे तेथें होउनी राहेन। सांडोवा पाषाण पंढरीचा ॥ ५ ॥

१८६६ सुरवर येती तीर्थें नित्यकाळ। पेठ त्या निर्मळ चंद्रभागा ॥ १ ॥ साक्षभूत नव्हे सांगितली मात। महिमा अत्यद्भुत वर्णवेना ॥ २ ॥ पंचक्रोशीमाजी रीघ नाहीं दोषा। जळती आपैसा अघोर ते. ॥ ३ ॥ निर्विषय नर चतुर्भुज नारी। अवघा घरोघरीं ब्रह्मानंदु ॥ ४ ॥ तुका म्हणे ज्यापें नाहीं पुण्यलेश। जा रे पंढरीस घेई कोटी ॥ ५ ॥

१८६७ वाराणसी गया पाहिली द्वारका। परी नये तुका पंढरीच्या ॥ १ ॥ पंढरीसी नाहीं कोणा अभिमान। पांयां पडे जन एकमेकां ॥ २ ॥ तुका म्हणें जाय एक वेळ पंढरी। तयाचिये घरीं यम न ये ॥ ४ ॥

१८६८ तीर्थें केलीं कोटीवरी। नाहीं देखिली पंढरी ॥ १ ॥

जळो त्याचें ज्यालेपण । न देखेचि समचरण ॥ २ ॥ योगयाग अनंत केले । नाहीं समचरण देखिले ॥ ३ ॥ तुका म्हणे विठ्ठलपायीं । अनंत तीर्थं घडिलीं पाहीं ॥ ४ ॥

१८६९ जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न मनी तो ॥ १ ॥ सुलभ माय पंढरीराणा । पुरवी खुणा अंतरींच्या ॥ २ ॥ जन्मांतरीच्या पुण्यरासी । वारी त्यासी पंढरीची ॥ ३ ॥ बाहेर येतां प्राण फुटे । रडे दाटे गहिवरें ॥ ४ ॥ दधि मंगळ भोजन सारा । म्हणती करा मुरडींव ॥ ५ ॥ मागुता हा पाहों ठाव । पंढरीराव दर्शनें ॥ ६ ॥ तुका म्हणे भूवैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥ ७ ॥

१८७० आणीक ऐसें कोठें सांगा । पांडुरंगा सारिखें ॥ १ ॥ दैवत ये भूमंडळीं । उद्धार कळी पाववितें ॥ २ ॥ कोठें कांहीं कोठें कांहीं । शोध ठायीं स्थळासी ॥ ३ ॥ अन्यत्रींचें तीर्थी नासे । तीर्थी वसे वज्रलेप ॥ ४ ॥ पांडुरंगींचें पांडुरंगीं । पाप अंगीं राहेना ॥ ५ ॥ ऐसें हरें गिरिजेप्रती । गुह्यस्थिती सांगितली ॥ ६ ॥ तुका म्हणे तीर्थ क्षेत्र । सर्वत्र हें दैवत ॥ ७ ॥

१८७१ कासया करावे तपाचे डोंगर । आणिक अपार दुःख रासी ॥ १ ॥ कासया फिरावे अनेक ते देश । दावितील आस पुढें लाभ ॥ २ ॥ कासया पुजावीं अनेक दैवतें । पोट भरे तेथें लाभ नाहीं ॥ ३ ॥ कासया करावे मुक्तीचे सायास । मिळे पंढरीस फुका-साठीं ॥ ४ ॥ तुका म्हणे करीं कीर्तन पसारा । लाभ येईल घरा पाहिजे तो ॥ ५ ॥

१८७२ पंढरीस जावें ऐसें माझें मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ॥ १ ॥ नलगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्नी-चिया ॥ २ ॥ तुका म्हणे त्याचे पाहिलिया पाय । मग दुःख जाय सर्व माझें ॥ ३ ॥

१८७३ पंढरीस जातें निरोप आइका । वैकुंठनायका क्षेम सांगा ॥ १ ॥ अनाथांचा नाथ हें तुझें वचन । धांवें नको दीन गांजों देऊं ॥ २ ॥ ग्रासिलें भुजंगें सर्पें महाकाळें । न दिसे हें जाळें उगवतां ॥ ३ ॥ कामक्रोधसुनीं श्वापदीं बहुतीं । वेढलों आवर्ती मायेचिये ॥ ४ ॥ मृगजळ नदी बुडविना तरी । आणुनियां वरी तळा नेते ॥ ५ ॥ तुका म्हणे तुवां धरिलें उदास । तरी पाहों वास कवणाची ॥ ६ ॥

१८७४ संपत्ति सोहळा नावडे मनाला । लागला टकळा पंढरीचा ॥ १ ॥ जावें पंढरीसी आवडी मनासी । कधीं एकादशी आषाढी हे ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसें आर्त ज्याचे मनीं । त्याची चक्रपाणी वाट पाहे ॥ ३ ॥

१८७५ साधन संपत्ति हेंचि माझें धन । सकळ चरण विठोबाचे ॥ १ ॥ शीतळ हा पंथ माहेराची वाट । जवळीच नीट सुखरूप ॥ २ ॥ वैष्णवांचा संग रामनाम गाणें । मंडित भूषणें अळंकार ॥ ३ ॥ भवनदी आड नव्हतीसी जाली । कोरडीच चाली जावें पायीं ॥ ४ ॥ मायबाप दोघे पाहातील वाट । ठेवूनियां कटीं कर उभी ॥ ५ ॥ तुका म्हणे केव्हां देखेन कळस । पळालीं आळस निद्रा भूक ॥ ६ ॥

१८७६ संतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥ १ ॥ तैसें प्रेमळाचें अवघेंचि गोड । पुरवितो कोड पांडुरंग ॥ २ ॥ सेवा करी साहे निष्ठुर उत्तर । त्याचे वाहे बरें तेंच मनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे इच्छावसें खेळ खेळे । चिंता ते सकळ कांहीं नेणें ॥ ४ ॥

१८७७ सांवळें रूपडें चोरटें चित्ताचें । उभें पंढरीचे विटेवरी ॥ १ ॥ डोळियांची धणी पाहतां न पुरे । तयालागीं झुरे मन माझें ॥ २ ॥ आन गोड कांहीं न लगे संसारीं । राहिले अंतरीं पाय

तुझें ॥ ३ ॥ प्राण रिघों पाहे कुडी हे सांडुनी। श्रीमुख नयनीं न देखतां ॥ ४ ॥ चित्त मोहियेलें नंदाच्या नंदनें। तुका म्हणे येणें गरुडध्वजें ॥ ५ ॥

१८७८ दोन्ही हात ठेवुनि कटीं। उभा भीवरेच्या तटीं। कष्टलासी साठीं। भक्तिकाजें विठ्ठला ॥ १ ॥ भागलासी मायबापा। बहु श्रम केल्या खेपा। आम्हांलागीं सोपा। दैत्यां काळ कृतांत ॥ २ ॥ होतासी क्षीरसागरीं। मही दाटली असुरीं। म्हणोनियां घरीं। गौळियांचें अवतार ॥ ३ ॥ केला पुंडलिकें गोवा। तुज पंढरीये देवा। तुका म्हणे भावा। साठीं हातीं सांपडसी ॥ ४ ॥

१८७९ दुःखाचिये साठीं तेथें मिळे सुख। अनाथाची भूक दैन्य जाय ॥ १ ॥ उदाराचा राणा पंढरीस आहे। उभारोनि बाहे पालवितो ॥ २ ॥ जाणतियाहूनि नेणत्याची गोडी। आलिंगी आवडी करूनियां ॥ ३ ॥ शीण घेऊनियां प्रेम देतो साठी। न विचारी तुटी लाभा कांहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे असों अनाथ दुबळीं। आह्मांसी तो पाळी पांडुरंग ॥ ५ ॥

१८८० धरियेलीं सोंगें। येणें अवघीं पांडुरंगें ॥ १ ॥ तें हें ब्रह्म विटेवरी। उभें चंद्रभागेतिरीं ॥ २ ॥ अंतर्व्यापी वाहे। धांडोळितां कोठें नोहे ॥ ३ ॥ योग याग तपें। ज्याकारणें दानजपें ॥ ४ ॥ दिलें नेदीजती। भोग सकळ ज्या होती ॥ ५ ॥ अवघी लीला पाहे। तुका म्हणे दासां साहे ॥ ६ ॥

१८८१ तीर्थांचें जें मूळ व्रताचें जें फळ। ब्रह्म तें केवळ पंढरिये ॥ १ ॥ तें आम्हीं देखिलें आपुल्या नयनीं। फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ २ ॥ जीवांचें जीवन सुखाचें सेजार। उभें कटीं कर ठेवूनियां ॥ ३ ॥ जगाचा जनिता कृपेचा सागर। दीनां लोभपर दुष्टां काळ ॥ ४ ॥ सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं। आकार निर्गुणीं

तोचि असे ॥ ५ ॥ तुका म्हणे नाहीं श्रुती आतुडलें । आम्हां सांपडलें गीतीं गातां ॥ ६ ॥

१८८२ आणिकांची सेवा करावी शरीरें । तीं येथें उत्तरें कोरडींच ॥ १ ॥ ऐसा पांडुरंग सुलभ सोपारा । नेघे येरझारा सेवकांच्या ॥ २ ॥ आणिकांचे भेटी आडकाठी पडे । येथें तें न घडे वचनही ॥ ३ ॥ आणिकांचें देणें काळीं पोट भरे । येथील न सरे कल्पांतींही ॥ ४ ॥ आणिकें दंडिती चुकलिया सेवा । येथें सोस हेवा नाहीं दोन्हीं ॥ ५ ॥ तुका म्हणे करी आपणासारिखें । उद्धरी पारिखें उंच नीच ॥ ६ ॥

१८८३ आम्ही आळीकरें । प्रेमसुखाचीं लेंकुरें ॥ १ ॥ पायीं गोविली वासना । तुच्छ केलें ब्रह्मज्ञाना ॥ २ ॥ येतां पाहें मूळां । वाट पंढरीची डोळां ॥ ३ ॥ तुका म्हणे स्थळ । मग मी पाहेन सकळ ॥ ४ ॥

१८८४ जाली हरिकथा रंग वोसरला । उचितासी आला पांडुरंग ॥ १ ॥ वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेईं रे तूं आतां धणीवरी ॥ २ ॥ प्रेम देऊनियां अवघीं सुखी केलीं । जीं होतीं रंगलीं विठ्ठलीं तीं ॥ ३ ॥ तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं । म्हणउनि पुढती आणियेलें ॥ ४ ॥

१८८५ पांडुरंगा ऐसा सांडुनि वेव्हारा । आणिकांचीं करा आस वांयां ॥ १ ॥ बहुतांसी दिला उद्धार उदारें । निवडीना खरें खोटें कांहीं ॥ २ ॥ याचिया अंकिता वैकुंठ बंदर । आणीक वेव्हार चालतीना ॥ ३ ॥ तुका म्हणे माझे हातींचें वजन । यासीं बोल कोण ठेवूं सके ॥ ४ ॥

१८८६ ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं स्मरावा ॥ १ ॥ सम पाय कर कटीं । उभा तटीं भिवरेच्या ॥ २ ॥ पाहिलिया वेध

लावी। बैसे जीवीं जडोनी ॥ ३ ॥ तुका म्हणे भक्तिकाजा। धांवे लाजा लवलाहे ॥ ४ ॥

१८८७ लाघवी सूत्रधारी दोरी नाचवी कुसरी। उपजवी पाळूनि संहारी नानापरिंचीं लाघवें ॥ १ ॥ पुरोनि पंढरिये उरलें भक्तिसुखें लांचावलें। उभें नीटाचि राहिलें कर कटीं न बैसे ॥ २ ॥ बहु काळें ना सांवळें बहु कठिण ना कोवळें। गुणत्रयावेगळें बहु वळें आथिलें ॥ ३ ॥ असोनि नसे सकळां मधीं मना अगोचर बुद्धि। स्वामी माझा कृपानिधि तुका म्हणे विठ्ठल ॥ ४ ॥

१८८८ पंढरीस घडे आतित्यायें मृत्य। तो जाय पातित अधः-पाता ॥ १ ॥ दुराचारें मोक्ष सुखाचे वसती। भोळी बाळमूर्ति पांडुरंग ॥ २ ॥ केला न साहावे तीर्थं उपवास। कथेविण दोष साधन तें ॥ ३ ॥ कालियापें भेद मानितां निवडे। श्रोत्रियांसी जोडे अंत्यजता ॥ ४ ॥ माहेरीं सलज्ज ते जाणा सिंदळी। काळिमा काजळी पावविते ॥ ५ ॥ तुका म्हणे तेथें विश्वास जतन। पुरे भीमा-स्नान सम पाय ॥ ६ ॥

१८८९ कार्तिकीचा सोहळा। चला जाऊं पाहूं डोळां। आलें वैकुंठ जवळां। पंढरीये सन्निध ॥ १ ॥ पीक पिकलें घुमरी। प्रेम न समाये अंबरीं। अवघी मातली पंढरी। घरोघरीं सुकाळ ॥ २ ॥ चालती स्थिर स्थिर। गरुड टकयांचे भार। गर्जती गंभीर। टाळ श्रुति मृदंग ॥ ३ ॥ मिळालिया भद्रजाती। कैशा आनंदें डुलती। शूर उठावती। एका एक आगळे ॥ ४ ॥ नामामृत कल्लोळ। वृंदें कोंदलीं सकळ। आलें वैष्णवदळ। कळिकाळ कांपती ॥ ५ ॥ आस करिती ब्रह्मादिक। देखुनि वाळवंटींचें सुख। धन्य धन्य मृत्युलोक। म्हणती भाग्याचा कैसा ॥ ६ ॥ मरण मुक्ति वाराणसी। पितृऋण गया नासी। उधार नाहीं पंढरीसी। पायांपाशीं विठोबाच्या ॥ ७ ॥ तुका म्हणे आतां। काय करणें आम्हां चिंता। सकळ सिद्धींचा दाता। तो सर्वथा नुपेक्षी ॥ ८ ॥

१८९० सदैव हे वारकरी । जे पंढरी देखती ॥ १ ॥ पदोपदीं विठ्ठल वाचा । त्यांसी कैंचा संसार ॥ २ ॥ दोष पळाले पळाले । पैल आले हरिदास ॥ ३ ॥ प्रेमभातें भरलें अंगीं । निर्लज्ज रंगीं नाचती ॥ ४ ॥ गोपीचंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरविती ॥ ५ ॥ दुर्बळ या शक्तीहीना । त्याही जना पुरता ॥ ६ ॥ तुका म्हणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा ॥ ७ ॥

१८९१ काशी यात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ॥ १ ॥ काशी देह विटंबणें द्वारके जाळणें। पंढरीसी होणें ब्रह्मरूप ॥ २ ॥ अठरा पगड याती सकळहि वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसी ॥ ३ ॥ तुका म्हणे असो अथवा नसो भाव । दर्शनें पंढरिराव मोक्ष देतो ॥ ४ ॥

१८९२ होईन भिकारी । पंढरीचा वारकरी ॥ १ ॥ हाचि माझा नेम धर्म । मुखीं विठोबाचें नाम ॥ २ ॥ हेचि माझी उपासना । लागेन संतांच्या चरणां ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । हेचि माझी भोळी सेवा ॥ ४ ॥

१८९३ संत पंढरीस जाती । निरोप धाडीं तयां हातीं ॥ १ ॥ माझा न पडावा विसर । तुका विनवितो किंकर ॥ २ ॥ केरसुणी महाद्वारीं । तें मी असें निरंतरीं ॥ ३ ॥ तुमचे पायीं पायतन । मोचे माझे तन मन ॥ ४ ॥ तांबुलाची पिकधरणी । ते मी असें मुख पसरूनि ॥ ५ ॥ तुमची विष्ठा पंढरीराया । ते सारसुवी माझी काया ॥ ६ ॥ लागती पादुका । तें मी तळील मृत्तिका ॥ ७ ॥ तुका म्हणे पंढरीनाथा । दुजें न धरावें सर्वथा ॥ ८ ॥

१८९४ बाप माझा दिनानाथ । वाट भक्तांची पहात ॥ १ ॥ कर ठेवुनियां कटीं । उभा चंद्रभागे तटीं ॥ २ ॥ गळां वैजयंती माळा । रूपें डोळस सांवळा ॥ ३ ॥ तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाह्या ॥ ४ ॥

१८९५ सकळ तीर्थांहूनि। पंढरीनाथ मुगुटमणी ॥ १ ॥ धन्य धन्य पंढरी। जे मोक्षाची अक्षय पुरी ॥ २ ॥ विश्रांतीचा ठाव। तो हा माझा पंढरीराव ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगे स्पष्ट। दुजी पंढरी वैकुंठ ॥ ४ ॥

१८९६ मूर्तिमंत देव नांदतो पंढरी। येर ते दिगांतरीं प्रतिमारूप ॥ १ ॥ जाउनियां वना करावें कीर्तन। मानुनी पाषाण विठ्ठलरूप ॥ २ ॥ तुका म्हणे मुख्य पाहिजे हा भाव। भावापासी देव शीघ्र उभा ॥ ३ ॥

१८९७ उमा रमा एकी सरी। वाराणसी ते पंढरी ॥ १ ॥ दोघे सारिखे सारिखे। विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ २ ॥ तेथें असे भागीरथी। येथें जाणा भीमरथी ॥ ३ ॥ वाराणशी त्रिशुळावरि। सुदर्शनावरी पंढरी ॥ ४ ॥ मनकर्णिका मनोहर। चंद्रभागा सरोवर ॥ ५ ॥ वाराणशी भैरव काळ। पुंडलीक क्षेत्र पाळ ॥ ६ ॥ धुंडिराज दंडपाणी। उभा गरुड कर जोडुनी ॥ ७ ॥ गया तेचि गोपाळपुर। प्रयाग निरा नरसिंपुर ॥ ८ ॥ तेथें असती गयावळ। येथें गाई आणि गोपाळ ॥ ९ ॥ शमीपत्र पिंड देती। येथें काला निजसुख प्राप्ती ॥ १० ॥ संतजनीं केला काला। तुका प्रसाद लाधला ॥ ११ ॥

१८९८ जनाचिया मना जावें कासियेसी। माझी वाराणसी पांडुरंग ॥ १ ॥ तेथें भागीरथी येथें भीमरथी। अधिक म्हणती चंद्रभागा ॥ २ ॥ तेथें माधवराव येथें यादवराव। जाणोनियां भाव पुंडलीकाचा ॥ ३ ॥ विष्णुपद गया तेचि येथें आहे। प्रत्यक्ष हें पाहे विटेवरी ॥ ४ ॥ तुका म्हणे हेचि प्रपंच उद्धरी। आतां पंढरपुरी घडो वापा ॥ ५ ॥

१८९९ धन्य झालों हो संसारीं। आम्ही देखिली पंढरी ॥ १ ॥ चंद्रभागे करूं स्नान। पुंडलीकाचें दर्शन ॥ २ ॥ करूं क्षेत्र प्रदक्षिणा। भेटूं संत या सज्जनां ॥ ३ ॥ उभे राहूं गरुडपारीं। डोळे भरोनि पाहों हरी ॥ ४ ॥ तुका म्हणे वाळवंटीं। महालाभ फुकासाठीं ॥ ५ ॥

१९०० डोळियांचें दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीये ॥ १ ॥ काय तें वानावें वाचेचे पालवें । वेदा न बोलवे रूप ज्याचें ॥ २ ॥ आनंदाच्या रसें अतीव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥ ३ ॥ तुका म्हणे मी तों सगळाच विरालों । विठ्ठलचि झालों दर्शनानें ॥ ४ ॥

१९०१ पंढरीची वारी जयांचिये घरीं । पाय धुळी शिरीं वंदिन त्यांची ॥ १ ॥ दासाचा मी दास पोसणा डिंगर । आतां बहु फार काय बोलों ॥ २ ॥ जातीचें मी हीन न कळे भजन । म्हणोनि संतचरण इच्छीतसें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज म्हणावें आपुलें । बहुतां तारिलें संतजनीं ॥ ४ ॥

१९०२ कुळींचें दैवत ज्याचें पंढरीनाथ । होईन दासीसूत त्याचे घरीं ॥ १ ॥ शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं । करीं भलते ठायीं दास तुझा ॥ २ ॥ पंढरीस कोणी जाती वारकरी । होईन त्यांचे घरीं पशुयाति ॥ ३ ॥ विठ्ठल चिंतन दिवसरात्रीं ध्यान । होईन पायतन त्याचे पायीं ॥ ४ ॥ तुळशीवृंदावन जयाचे अंगणीं । होईन केरसुणी त्याचे घरीं ॥ ५ ॥ तुका म्हणे हाचि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिका गती चाड मज ॥ ६ ॥

१९०३ नाहीं अंगीं भक्ति विरक्ति वैराग्य । पुण्य गांठीं भाग्य जया कांहीं ॥ १ ॥ तेणें जावें वेगीं आतांचि पंढरी । आलीयाची वारि सफळ होय ॥ २ ॥ ऐसें कथीं तुम्हां देव तीर्थ घडे । नांदतें उघडें परब्रह्म ॥ ३ ॥ एक वेळ आला मनुष्याच्या जन्मा । पुर्वीलिया कर्मा नाश येथें ॥ ४ ॥ तुका म्हणे घेई घेई बापा भेटी । मागलिया तुटी होय पापा ॥ ५ ॥

१९०४ उदंड देखिले उदंड ऐकिले । विशेष वर्णिले थोर थोर ॥ १ ॥ उदंडाची कीर्ति गाइली पुराणीं । निर्धार वेदांनीं केला ज्याचा ॥ २ ॥ ऐसा देव क्षेत्र संत हरीजन । नामसंकीर्तन कोठें

आहे ॥ ३ ॥ चंद्रभागा तीर्थ वाहे सरोवर । धन्य भीमातीर पुण्य रूप ॥ ४ ॥ पुंडलिका महा भक्तराज थोर । सर्व सुरवर येती भेटी ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसें रम्य वाळवंट । देखिलें हें कोठें सांगा मज ॥ ६ ॥

१९०५ प्रत्यक्ष हा देव पंढरीस आहे । कृपावंत होय नामें एका ॥ १ ॥ मूर्तीमंत तीर्थ नामा रूपीं वाहे । उपमावें काय चंद्रभागे ॥ २ ॥ स्वर्गीचे अमर राहती वस्तीसी । पुंडलिकापाशीं संत साधू ॥ ३ ॥ मूर्तिमंत गाई आणि हे गोपाळ । तुका म्हणे बाळमूर्ती उभी ॥ ४ ॥

१९०६ गोदा तापी वेणी पुष्कर त्रिवेणी । वर्णिली पुराणीं कीर्ति यांची ॥ १ ॥ तीर्थ तीर्थराज श्रेष्ठ भीमरथी । शंकरें पार्वती सांगितलें ॥ २ ॥ देव तीर्था नित्य मिळोनियां येती । सुस्नात ते होती चंद्रभागे ॥ ३ ॥ पुंडलिकापुढें तीर्थ शिरोमणी । माध्यान्हासी पाणी चढतसे ॥ ४ ॥ तुका म्हणे तेथें जडजीव प्राणी । जाती उद्धरोनी वैकुंठासी ॥ ५ ॥

१९०७ उदंड पाहिली उदंड ऐकिली । उदंड वर्णिली क्षेत्र ख्याती ॥ १ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसें भीमातीर । ऐसा विटेवर देव कोठें ॥ २ ॥ ऐसे संतजन ऐसे हरीदास । ऐसा नामघोष सांगा कोठें ॥ ३ ॥ ऐसा पुंडलीक ऐसें वाळवंट । ऐसी मुक्तिपेठ सांगा कोठें ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्हा अनाथाकारणें । पंढरी निर्माण केली देवें ॥ ५ ॥

१९०८ पूर्वपुण्य असे जयाचे पदरीं । तोचि वारकरी पंढरीचा ॥ १ ॥ वैकुंठीचे सोहळे पंढरीस घ्यावे । चंद्रभागे नहावें एकादशी ॥ २ ॥ द्वादशी व्रत घडलें जयासी । त्यानें पूर्वजांसी सोडविलें ॥ ३ ॥ सोडविलें नाना संकटांपासोन । बोलती पुराणें तुका म्हणे ॥ ४ ॥

१९०९ आत्म उदधीमधून । विश्व लहरीमधून ॥ १ ॥ झालें सोनियाचे नग । नगा अंगीं सोनें चांग ॥ २ ॥ तेंवि सगुण निर्गुण । पांडुरंग माझा पूर्ण ॥ ३ ॥ तुका म्हणे पूर्णपणीं । दोघे विठ्ठल रुक्मिणी ॥ ४ ॥

१९१० स्वयंभु आमुचा विटेवरी उभा । चैतन्याचा गाभा पांडुरंग ॥ १ ॥ नाहीं घडविला नाहीं बैसविला । पुंडलिका आला भेटाचया ॥ २ ॥ द्वारकेची अवघी संपत्ती घेऊनी । उभा चक्रपाणी पंढरीसी ॥ ३ ॥ तुका म्हणे मूर्ती घडली जे म्हणती । त्यांच्या मुखाप्रती किडे पडो ॥ ४ ॥

१९११ उभें चंद्रभागेतीरीं । कट धरोनियां करीं । पाउलें गोजिरीं । विटेवरी शोभलीं ॥ १ ॥ त्याचा छंद माझ्या जीवा । काया वाचा मनें हेवा । संचिताचा ठेवा । जोडी हातीं लागली ॥ २ ॥ रूप डोळियां आवडे । कीर्ति श्रवणीं पवाडे । मस्तक नावडे । उठों पायांवरोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम । ज्याचें नासी क्रोध काम । हरि भवश्रम । उच्चारितां वाचेसी ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

१९१२ नामरूप नातळे ज्यासी । परात्पर ऐसी वदती ॥ १ ॥ तो हा आला पंढरपुरा । समाचारा भक्तांच्या ॥ २ ॥ ओळखिला पुंडलिकें । केलें निकें पूजन ॥ ३ ॥ निळा म्हणे विटेवरी । स्थापिला तिरीं चंद्रभागे ॥ ४ ॥

१९१३ सांगतां महिमा पंढरीचा । अपार वाचा वेदांचिये ॥ १ ॥ सहजचि क्षेत्रा जाईन म्हणतां । धांवे सायुज्यता सामोरी ॥ २ ॥ विठ्ठलराज देखतां दिठी । दास वैकुंठीं तेचि क्षणीं ॥ ३ ॥ निळा म्हणे आलिंगन । देतां समाधान जिवशिवा ॥ ४ ॥

१९१४ राही रुक्मिणी सत्यभामा । पुरुषोत्तमा वाम सव्य ॥ १ ॥ पुंडलिक दृष्टीपुढें । उभे देहुडे सनकादिक ॥ २ ॥ जय विजय महा-

द्वारीं । गरुड शेजारी हनुमंत ॥ ३ ॥ निळा म्हणे भोंवते संत । कीर्तनें करीत चौफेरी ॥ ४ ॥

१९१५ नारद येऊनि पंढरियेसी । स्थळ पुंडलिकासी मागती ॥ १ ॥ भीमा पुष्पावती संगम । योजिला आश्रम तयाप्रती ॥ २ ॥ विष्णुपदें उमटलीं जेथें । कराविला तेथें राहिवास ॥ ३ ॥ निळा म्हणे पिंडदान । करिती सज्जन जे स्थळीं ॥ ४ ॥

१९१६ भुक्तिमुक्तींचें माहेर । वसविलें पंढरपुर ॥ १ ॥ सुख विश्रांतीसी आलें । संतां पाचारिलें सज्जनां ॥ २ ॥ कथाकीर्तनें सोहळा । छबिने मेळा पताकांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे पंचक्रोशी । नामें घोषीं दुमदुमित ॥ ४ ॥

१९१७ पंढरिये केला वास । निज भक्तांस तारावया ॥ १ ॥ म्हणे यारे अवघे वर्ण । आदिब्राह्मण करूनियां ॥ २ ॥ जया वैकुंठासी जाणें । तया येणें हें पंढरी ॥ ३ ॥ निळा म्हणे सुकाळ केला । भक्तां वोळला कुवासा ॥ ४ ॥

१९१८ नाना लोक धावोनि येती । राशी भरिती आइत्या ॥ १ ॥ घेऊनि जातां विश्वजना । नव्होचि उणा माल फार ॥ २ ॥ युगें गेलीं वहाती लोक । न सरेचि पीक वोसंडलें ॥ ३ ॥ निळा म्हणे पुंडलिकें । केलीं लोकें सभाग्य ॥ ४ ॥

१९१९ सुकृताचा होता सांठा । भूवैकुंठा ते आले ॥ १ ॥ सन्मुख देव भेटे तया । लागती पायां भाग्याचे ॥ २ ॥ न्याहाळिती दृष्टि मुख । कैवल्यसुख तुच्छ पुढें ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मानंदा । झाले तत्पदा अधिकारी ॥ ४ ॥

१९२० संत येताती सनकादिक । सोहळा पाहों तो कौतुक ॥ १ ॥ चंद्रभागे निमज्जन । परिसों हरीचें कीर्तन ॥ २ ॥ संत सज्जनाचिया भेटी । करूं स्वानंदाची लुटी ॥ ३ ॥ निळा म्हणे पंढरपुरीं । सेत्रूं काला वांटिती हरी ॥ ४ ॥

१९२१ पुढारले विठ्ठल हरी । केली नगरी वैकुंठ ॥ १ ॥ सुदर्शन ठेविलें तळीं । म्हणे कल्पजळीं बुडों नेदी ॥ २ ॥ तैसेंचि धरिलें क्षेत्रावरी । म्हणती हे नगरी रक्षावी ॥ ३ ॥ निळा म्हणे या पुंडलिकें । यापरी लोकें उद्धरिलीं ॥ ४ ॥

१९२२ जो देखे एकदां तरी । हें पंढरी वैकुंठ ॥ १ ॥ मुक्ती तया आली हाता । नाहीं चिंता मोक्षाची ॥ २ ॥ याचिये मार्गीं पाऊल पडे । तेव्हांचि जोडे यात्रा त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रत्यक्ष भेटी । ते तो लुटी निजानंदा ॥ ४ ॥

१९२३ करूनि चंद्रभागे स्नान । अभिवंदन पुंडलिका ॥ १ ॥ पुढें जाति विठोबासी । वैकुंठवासी ते होती ॥ २ ॥ कथाश्रवण प्रदक्षणा । नाहीं गणना सुकृता त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे पूर्वजेंसी । होती विमानेंसी प्रविष्ट ॥ ४ ॥

१९२४ पंढरिये अनुष्ठान केलें चंद्रें । अलंकापुरीं इंद्रें तपश्चर्या ॥ १ ॥ तेथें इंदु निष्कलंक अंगें । येथें आरोग्य भगें सुरेंद्रता ॥ २ ॥ हरिहररूपें पंढरीरावो । येथे तिन्ही देवो सिद्धरूपें ॥ ३ ॥ निळा म्हणे तेथें भक्ती । येथें विरक्ती प्रगटली ॥ ४ ॥

१९२५ झाली भाग्याची उजरी । दृष्टी देखतांचि पंढरी ॥ १ ॥ ठेविले तो कर कटीं । जेणे अवलोकिला दिठी ॥ २ ॥ चंद्रभागे केलें स्नान । भक्तां पुंडलिकाचें दर्शन ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठासी । प्राणी होईल तो निश्चयेंसी ॥ ४ ॥

१९२६ जाऊनियां भीमातटीं । नाचों वाळवंटीं पंढरिये ॥ १ ॥ होतील लाभाचिया कोटी । पहातां दृष्टी विठ्ठला ॥ २ ॥ भुक्तिमुक्ति आपुल्या सुखें । येती हरिखें सामोऱ्या ॥ ३ ॥ निळा म्हणे परमार्थ धणी । होईल आयणी फिटोनी ॥ ४ ॥

१९२७ झाली कीर्तनाची दाटी । चंद्रभागे वाळवंटीं ॥ १ ॥ संत गर्जती आनंदें । हरिचीं नामें नाना छंदें ॥ २ ॥ टाळ मृदंग झण-

स्कार । नामें कोंदलें अंबर ॥ ३ ॥ निळा म्हणे वैकुंठवासी । झाला सुलभ हरिभक्तांसी ॥ ४ ॥

१९२८ जाईन म्हणतांचि पंढरपुरा । कळिकाळा दरारा उपजे मनीं ॥ १ ॥ यमधर्माचिया दंडासी चुकला । आणि पूज्यमान झाला तिहीं लोकां ॥ २ ॥ विधी म्हणे तया निषेधुची नाहीं । कर्माकर्म-प्रवाही न पडेचि तो ॥ ३ ॥ निळा म्हणे तेणें आनंदवुनी सकळां । नेले आपुल्या कुळा वैकुंठासी ॥ ४ ॥

१९२९ कोलें पिकली परलोक पेठें । हे भूवैकुंठ पंढरी ॥ १ ॥ नाम मुद्रा खरें नाणें । घेणें देणें लाभवरी ॥ २ ॥ ब्रह्मानंदें भरिलीं पोतीं । प्रेमें उथळती सीगवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाऊं हाटा । करूं सांटा न सरेसा ॥ ४ ॥

१९३० देव भक्ताचा सोहळा । वाचे गाती वेळोवेळां ॥१॥ म्हणती धन्य पंढरपुर । पुंडलीक मुनीवर ॥ २ ॥ चंद्रभागा पद्मतीर्थ । वेणुनादीं जन कृतार्थ ॥ ३ ॥ निळा म्हणे पांडुरंगा । भेटी तापत्रय भंगा ॥ ४ ॥

१९३१ पुंडलीक पांडुरंग । संतसंग पद्माळें ॥ १ ॥ चंद्रभागा वाळ-वंट । भूवैकुंठ पंढरी ॥ २ ॥ वेणुनाद गोपाळपुर । पुष्पावती सारसंगम ॥ ३ ॥ निळा म्हणे झाला मेळा । या भूगोळा उद्धार ॥ ४ ॥

१९३२ उमटलीं खडकावरी । पदें गोजिरीं विष्णूचीं ॥ १ ॥ देखो-नियां ते सात्विक जन । करिती पिंडदान तये पदीं ॥ २ ॥ पंढरिये नारदाश्रमीं । भीमासंगमीं पुष्पावती ॥ ३ ॥ निळा म्हणे दक्षिण गया । उद्धारावया पूर्वजां ॥ ४ ॥

१९३३ उमटलीं विष्णुपदें । गयावर्जनी जे प्रसिद्धें ॥ १ ॥ नारद क्षेत्रीं पंढरपुरीं । अद्भुत पदांची त्या थोरी ॥ १ ॥ ऋणत्रया मुक्त जन । देतां पदीं पिंडदान ॥ ३ ॥ निळा म्हणे गोपाळपुरीं । विठ्ठल वेणुवादन करी ॥ ४ ॥

१९३४ वेणुनादीं लाभे काला। उणें त्याला मग काय ॥ १ ॥ ब्रह्मानंदें कोंदे सृष्टी। शांताचि ओंटीं लागतां ॥ २ ॥ देतां पदीं पिंड-दाना। पितृगणा उद्धार ॥ ३ ॥ निळा म्हणे देवचि ऋणी। एक स्नानीं पन्नाला ॥ ४ ॥

१९३५ पंढरीये पांडुरंग। भोंवता संग संतांचा ॥ १ ॥ मिळवू-नियां संतमेळा। मध्यें सांवळा शोभत ॥ २ ॥ एकला एकाचि पुंड-लिका। जोडी त्रैलोक्या पुरविली ॥ ३ ॥ निळा म्हणे न सरे तरी। अद्यापिवरी तैसेंचि ॥ ४ ॥

१९३६ रूपीं गुंतलीं मानसें। ध्यानीं मुनिजनां ज्याचें पिसें। तोचि हें सुंदर स्वरूप कैसें। धरिलें भक्त कैवारा ॥ १ ॥ अंगी चंद-नाची उटी। तुळशीमाळा हार कंठीं। बुका शोभला ललाटीं। रत्नें मुगुटीं झळकती ॥ २ ॥ कर्णीं कुंडलें सुढाळें। नेत्र उत्फुल्लीत जैशीं कमळें। दंत हिरियाचीं छिद्रळें। सोलींव तैसें झळकती ॥ ३ ॥ कंठीं कौस्तुभ आणि पदकें। श्रीवत्सलांछन हृदयीं निकें। एकावळी त्यावरी झळके। मुक्त मोतियें वाटोळीं ॥ ४ ॥ हात ठेवुनी कटावरी। कांसे पितांबराची परी। नाना ठसे उमटले वरी। मेखळा रत्नें वरवंटा ॥ ५ ॥ चरण सकुमार साजिरे। पाउलें अत्यंत गोजिरे। वांकी घुंगरु झणत्कारें। करिती चेहरे आनंदा ॥ ६ ॥ संत समुदाय देवढे। गर्जती गुणनाम पवाडे। वैष्णव नाचती वागडे। ब्रह्मानंद पिकला ॥ ७ ॥ राही रुक्मिणी सत्यभामा। परिवार वेष्टित पुरुषोत्तमा। अगाध पंढरिये हा महिमा। देव विमानीं दाटले ॥ ८ ॥ निळा म्हणे पुरला हेत। ठेविलें पायांपासीं चित्त। सांठवूनियां हृदयांत। रूप पावलों विश्रांती ॥ ९ ॥

१९३७ संत सनकादिक देव। भेटावया आले सर्व ॥ १ ॥ देवा भक्तांतें पूजिती। महिमा अद्भुत तो वर्णिती ॥ २ ॥ पावन केलीं पुंडलिकें। म्हणती नरनारी बाळकें ॥ ३ ॥ निळा ऐकोनियां वाणी। मिठी घालुं धांवे चरणीं ॥ ४ ॥

१९३८ योगी चिंतिती चिंतनीं। ध्यानीं मनीं रूप ज्याचें ॥ १ ॥ तो हा अकल्पिताचि आला। उभा केला पुंडलिकें ॥ २ ॥ हृत्कमळीं चतुरानन। ज्यातें स्तवून पूजितु ॥ ३ ॥ निळा म्हणे शिवहि चिंती। ज्यातें एकांती सर्वदा ॥ ४ ॥

१९३९ पुंडलीकें पिकविलें। विश्वा पुरलें न्यावया ॥ १ ॥ त्रैलोक्यमणी लागला हातीं। लोक ते किती नेतील ॥ २ ॥ विश्वनिर्मिता ज्याचे द्वारीं। निरंतरीं तिष्ठत ॥ ३ ॥ निळा म्हणे भाग्य त्याचें। अपार वाचे न वर्णवे ॥ ४ ॥

१९४० एकंदर देवें आज्ञा केली। पुंडलीका दिधली निजभाक ॥ १ ॥ जे जे तुझिया क्षेत्रासी येती। त्यां त्यां उत्तम गति पाठवीं ॥ २ ॥ उत्तम अधम न म्हणे कांहीं। रिगाचि नाहीं दोषा येथें ॥ ३ ॥ निळा म्हणे हे पंचक्रोशीं। जाणा वाराणसी समान ॥ ४ ॥

१९४१ याज्ञिक मंत्रें अवदान देती। त्याहूनी अधिक या उच्छिष्टा चोराची प्रीती ॥ १ ॥ हे काय अवगुण नव्हती सांगा। प्रत्यक्ष ठाऊकेचि आहेती जगा ॥ २ ॥ सांडूनियां सेजे लक्ष्मी ऐसी। भोगितो विद्रूप कौंसाची दासी ॥ ३ ॥ घरींची दहीं दुधें या न लगती गोडें। चोरटा लोकांची मोडितो कवाडें ॥ ४ ॥ श्रुतिस्मृतीचीहीं वचनें नेघोनियां कानीं। हांसे श्लाघे शिव्या देतां गवळणी ॥ ५ ॥ निळा म्हणे याची खोडीचि हे ऐशी। ते बोलोनि काय मानली यासी ॥ ६ ॥

१९४२ सर्वांतरीं वास याचा। महदादी अणूचा हृदयस्थ ॥ १ ॥ नाहीं दुरी जवळी ऐसा। कोंदोनी दिशा भरलासे ॥ २ ॥ एकवीस ही स्वर्गांपरी। पाताळाभीतरीं भूमंडळा ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वांतरीं। वसोनी विटेवरी ठाकला ॥ ४ ॥

१९४३ सांगतों हें मनीं धरा। हित करा आपुलें ॥ १ ॥ जारे पंढरीसी आधीं। कृपानिधी भेटेल ॥ २ ॥ अवघींच सुखें अलौकिकें।

देईल एके दर्शनें ॥ ३ ॥ निळा म्हणे रिद्धिसिद्धी । मुक्ति पदीं लागती ॥ ४ ॥

१९४४ ऐसे याचे आकळ खेळ । जाणतां पांगुळ वेदश्रुति ॥ १ ॥ काय फोडूनि चांदिण्या केल्या । गगनीं बांधल्या कीं मुक्त ॥ २ ॥ कासयांचे पर्वत धोंडे । घडिले अपाडे अमर्याद ॥ ३ ॥ निळा म्हणे पर्जन्य धारा । केल्या अपारा त्या कैशा ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

१९४५ पंढरी हें क्षेत्र पावन पवित्र । महिमा विचित्र त्रिभुवनीं ॥ १ ॥ पाहिलिया क्षणीं नासती पातकें । ऐसियासी तुके दुजें कोण ॥ २ ॥ तृणपाक्षि सर्व झाले ऋषि देव । पहाती वैभव पंढरीचें ॥ ३ ॥ भूमि ते राहिली विष्णु चक्रावरी । वैकुंठिंची परी सर्व येथें ॥ ४ ॥ टाळ नृत्य घोष पताकांचे भार । गर्जे भीमातीर सर्वकाळ ॥ ५ ॥ पुंडलिकासाठीं ठाके केशिराज । भेटीनें सायुज्य त्यास देती ॥ ६ ॥ स्नाने उद्धरती दर्शनें प्रशस्तीं । वाचे नाम कीर्ति विठोबाची ॥ ७ ॥ नामा म्हणे लाभ थोर हा जोडतो । पंढरीसी येतो प्राणी त्यासी ॥ ८ ॥

१९४६ पंढरीचें सुख आनंदें गर्जती । ध्यातसे पार्वती अखंडित ॥ १ ॥ भीमातीरीं उभा सखा पांडुरंग । देई अंगसंग अखंडित ॥ २ ॥ उशीर झाला काय काम काजा । यावें अधोक्षजा अनिरूद्धा ॥ ३ ॥ नामा म्हणे पाहा पंढरीमाझारी । केशीराज तारी एकसरा ॥ ४ ॥

१९४७ ऐका पंढरीचें महिमान । राउळें तितुकें प्रमाण । तेथील तृण आणि पाषाण । तेहि देव जाणावे ॥ १ ॥ ऐसी पंढरी मनीं जे ध्याती । त्यांसी तिहीं लोकीं गति । ते आणिका तीर्था जाती । तीर्थें वंदिती तयांसी ॥ २ ॥ वाराणसीं चालिजे मासा । गोदावरी एक दिवसा । पंढरी पाऊल पारयिसो । ऐसा ठसा नामाचा ॥ ३ ॥ ऐसें

शंकर सांगे ऋषींजवळीं। सकळ तिर्थें माध्यानकाळीं। येती पुंडलीका-जवळी । करिती अंघोळी वंदिती चरण ॥ ४ ॥ ऐसेनि तिर्थी पाप झडे । असत्य बोलतां जिव्हा झडे । नामा विनवी संतांपुढें । पंढरी पेठ न संडावी ॥ ५ ॥

१९४८ अनंत तीर्थांच माहेर । अनंत रूपांचें सार । अनंता अनंत अपार । तो हा कटीं कर विटे उभा ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग । सकळ दोषां होय भंग । पूर्वज उद्धरती सांग । पंढरपुर देखिलिया ॥ २ ॥ निरा भिवरा पडतां दृष्टी । स्नान करितां शुद्ध सृष्टि । अंतीं तों वैकुंठप्राप्ती । ऐसें परमेष्टि बोलिला ॥ ३ ॥ तेथें एक शीत दिधल्या अन्न । कोटीकुळांचें होय उद्धरण । कोटियाग केलें दान । ऐसें महिमान ये तीर्थींचें ॥ ४ ॥ नामा म्हणे धन्य जन्म । ज्यासी पंढरीचा नेम । तयां अंतीं पुरुषोत्तम । जीवें भावे न विसंबे ॥ ५ ॥

१९४९ ऐसें तीर्थ कोणी दाखवा गोमटें । जेथ प्रत्यक्ष हें भेटे परब्रह्म ॥ १ ॥ कोठें ऐसें क्षेत्र आहे त्रिभुवनीं । सकळां शिरोमणि चंद्रभागा ॥ २ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवावें एक । देखतांचि सुख पावे मन ॥ ३ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा साजिरें । सदा प्रेमपुरें वोसंडत ॥ ४ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुलभ । जेथें समारंभ हरिकथेचा ॥ ५ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा निर्मळ । परब्रह्म केवळ सकळां जीवां ॥ ६ ॥ नामा म्हणे आम्हा दीनांचें माहेर । धन्य पंढरपुर गीतीं गातां ॥ ७ ॥

१९५० सांडूनि पंढरी जासी आणिका तीर्था । लाज तुझ्या चित्ता कैसी नये ॥ १ ॥ त्रिभुवनिचीं तीर्थें झालीं तीं मळीण । व्हावया पावन आलीं येथें ॥ २ ॥ एवढा ब्रह्मानंद कैंचा आणिका ठायीं । जो या आहे पायीं विठोबाच्या ॥ ३ ॥ काळ मृत्यु दोन्ही घालोनि पायांतळीं । वाजलिया टाळी कीर्तन संगें ॥ ४ ॥ नित्य नवी दिवाळी सुखाचा सोहळा । भोगिजे अवलीळा संतसंगें ॥ ५ ॥ धर्म अर्थ काम

मोक्ष मुक्ति चारी । देतो हा मुरारी नामें एका ॥ ६ ॥ नामा म्हणे चला जाऊं पंढरिये । पाहूं वापमाये पांडुरंग ॥ ७ ॥

१९५१ पाहातां देऊळाची पाठ । तीर्थे घडलीं तीनशें साठ ॥ १ ॥ स्नान करितां पन्हाळें । उद्धरती सर्व कुळें ॥ २ ॥ सन्मुख हा पाहात विठाई । त्यासी उपमा द्यावया नाहीं ॥ ३ ॥ ऐसा पंढरीचा महिमा । काय वर्णूं म्हणे नामा ॥ ४ ॥

१९५२ आधीं रचिली पंढरी । मग वैकुंठ नगरी ॥ १ ॥ जेव्हां नव्हतें चराचर । तैं होतें पंढरपुर ॥ २ ॥ जेव्हां नव्हती गोदा गंगा । तेव्हां होती चंद्रभागा ॥ ३ ॥ चंद्रभागेचे तटीं । धन्य पंढरी गोमटी ॥ ४ ॥ नासिलिया भूमंडळ । उरे पंढरीमंडळ ॥ ५ ॥ असे सुदर्शना-वरी । म्हणूनि अविनाश पंढरी ॥ ६ ॥ नामा म्हणे वा श्रीहरी । त म्यां देखिली पंढरी ॥ ७ ॥

१९५३ सुखालागीं करिसी तळमळ । तरी तूं पंढरीसी जाय एक वेळ ॥ १ ॥ मग तूं अवघाची सुखरूप होसी । जन्मोजन्मींचें दुःख विसरसी ॥ २ ॥ चंद्रभागे करितां एक स्नान । तुझे दोष पळती रानो-रान ॥ ३ ॥ लोटांगण घालितां महाद्वारीं । कान धरोनि नाचतां गरुडपारीं ॥ ४ ॥ नामा म्हणे उपमा काय द्यावी । माझ्या विठोबाची आलावला घ्यावी ॥ ५ ॥

१९५४ पैल ते पंढरी पैल ते पंढरी । पांढरीवरी काळी वसविली ॥ १ ॥ सांवळें हें ब्रह्म सुनिळ हें ब्रह्म । विद्युल्लता ब्रह्म पाहूं चला ॥ २ ॥ नामा म्हणे माझा विठ्ठल हा डोळा । अर्धमात्रे जवळा पाहूं चला ॥ ३ ॥

१९५५ झळझळित सोनसळा । कळस देखिला सोज्वळा ॥ १ ॥ बरवें बरवें पंढरपुर । विठोबारायाचें नगर ॥ २ ॥ अरे हें माहेर संतांचें । नामयास्वामी केशवाचें ॥ ३ ॥

१९५६ विठोबाच्या गांवा जाईन धांवोनी । घालीन लोळणी

चरणांवरी ॥ १ ॥ शिणभाग दवडिला म्हणेल । जीविंचें पुसेल जड-भारी ॥ २ ॥ हरुषें लोळत जाईन महाद्वारां । भेटाया सामोरा येईल मज ॥ ३ ॥ उचलोनी सीस पुसील आदरें । मुख पीतांबरें पुसिल माझें ॥ ४ ॥ धरोनि हनुवटी उठवील हस्तकीं । ठेवील मस्तकीं अभयकर ॥ ५ ॥ राई रखुमाई माता सत्यभामा । कडे घेऊनि नामा स्तनीं लावी ॥ ६ ॥

१९५७ धांऊनियां मिठी घालीन संतचरणीं । सांगेन वचनीं मनिचें गुज ॥ १ ॥ विठोबाचे गांवा न्यारे एकवेळां । फार आहळला जीव माझा ॥ २ ॥ आनंदाचें जीवन पाहेन श्रीमुख । शोक मोह दुःख हरती माझे ॥ ३ ॥ विटेसहित चरण देईन आलिंगनु । तेणें माझी तनु ओल्हावेल ॥ ४ ॥ तुम्ही आवडते हरीचें अंतरंग । माझे जीवलग प्राणसखे ॥ ५ ॥ नामा म्हणे विठोवा कृपेची माउली । तेव्हां ते साउली करील मज ॥ ६ ॥

१९५८ ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुलभ । जेथें समारंभ हरि-कथेचा ॥ १ ॥ तें एक पंढरी विख्यात त्रिभुवनीं । सकळां शिरोमणी चंद्रभागा ॥ २ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा सुखरूप । जेथें त्रिविध ताप हारपती ॥ ३ ॥ ऐसें तीर्थ कोणीं दाखवा सुंदर । गरुड टकेभार विराजती ॥ ४ ॥ ऐसें तीर्थ कोणी दाखवा निर्मळ । जेथें नासे मळ दुष्टबुद्धि ॥ ५ ॥ नामा म्हणे संतजनांचें माहेर । गातां मनोहर गोड वाटे ॥ ६ ॥

१९५९ सर्व सुखरासी भिवरेचे तीरीं । आमुची पंढरी काम-धेनू ॥ १ ॥ प्रेमामृतें दुभे सदा संतजनां । वोसंडतो पान्हा नित्य नवा ॥ २ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष चान्ही थानें । दोहोणार धन्य पुंडलीक ॥ ३ ॥ जयाचें दुभतें नित्य नवें वाढतें । वहु पंढरीतें पूर्व-पुण्य ॥ ४ ॥ भक्तिचेनि वळें भावाचेंनि मेळें । देखोनियां वोले बहु

फार ॥ ५ ॥ भाग्यवंत नामा तें क्षीर लाधला । प्रेमें वोसंडला गर्जे नाम ॥ ६ ॥

१९६० पंढरीचें प्रेम आहे ज्याचे जीवीं । त्यांची नित्य नवी करीन आशा ॥ १ ॥ ते माझे सोइरे सुखाचे सद्गुरु । भवसिंधुचा पारु उतरतो ॥ २ ॥ माझ्या विठोबाच्या नामीं ज्यां विश्वास । होइन त्यांचा दास आवडीचा ॥ ३ ॥ माझ्या विठोबाच्या चरणीं ज्यांचा भाव । दारवंटा पाय धरीन त्यांचे ॥ ४ ॥ माझ्या विठोबाचें ध्यान ज्यांचें मनीं । सांडोवा अंगणीं होईन त्यांचें ॥ ५ ॥ ऐसे सर्वभावें माझ्या विठोबा शरण । त्यांचे वंदीन चरण नामा म्हणे ॥ ६ ॥

१९६१ आम्हीं स्वर्गसुख मानूं जैसा ओक । देखोनियां सुख पंढरीचें ॥ १ ॥ नलगे वैकुंठ न वांछूं कैलास । सर्वस्वाची आस देवापायीं ॥ २ ॥ नलगे संतति आणि धन मान । एक असे ध्यान विठोबाचें ॥ ३ ॥ सत्य कीं मायिक आमुचें बोलणें । तुझी तुज आण सांग हरि ॥ ४ ॥ जीवभाव आम्ही सांडूं ओंवाळुनी । नामा लोटांगणी महाद्वारीं ॥ ५ ॥

१९६२ वैकुंठासी आम्हां नको धाडूं हरी । वास दे पंढरी सर्वकाळ ॥ १ ॥ वैकुंठ कोपट जुनाट झोंपडी । नको अडाअडी घालूं आम्हां ॥ २ ॥ वैकुंठीं जाऊनि काय वा करावें । उगोचि वैसावें मौनरूप ॥ ३ ॥ नामा म्हणे मज येथेंच हो ठेवीं । सदा वास देई चरणांजवळी ॥ ४ ॥

१९६३ माझें कुळींचें दैवत । बाप माझा पंढरिनाथ ॥ १ ॥ पंढरीसि जाऊं चला । भेटूं रखुमाई विठ्ठला ॥ २ ॥ पुंडलीकें बरवें केलें । कैसें भक्तीनें गोविलें ॥ ३ ॥ नामा म्हणे नीट । पायीं जडलीसे ईट ॥ ४ ॥

१९६४ नित्य प्रेमाचे पेटे बांधीं माझे पोटीं । उतरीं जगजेटी पैलपार ॥ १ ॥ निरेभिवरे ऐक्य तीरीं । कां पहुडला पंढरपुरीं ॥ २ ॥

केलिया रविवारीं आंघोळी। महा दोषां होय होळी ॥ ३ ॥ पाप जायाचें। पद पावाल अच्युताचें ॥ ४ ॥ म्हणाल बोलणें कोणाचें। नामयास्वामी केशवाचें ॥ ५ ॥

१९६५ देव गुज सांगे पंढरीसि यारे। प्रेमें चित्तीं घ्यारे नाम माझें ॥ १ ॥ काया वाचा मन दृढ धरा जीवीं। सर्व मी चालवी भार त्यांचा ॥ २ ॥ भवसिंधु तारीन घ्यारे माझी भाक । साक्ष पुंडलीक करूनि बोले ॥ ३ ॥ लटकें जरी असे नामयासी पुसा। आहे त्या भरंवसा नामीं माझ्या ॥ ४ ॥

## श्रीभानुदासमहाराज

१९६६ हेंचि साधकांचें स्थळ। भोळे वंदिती निर्मळ। अभावीक जे खळ। तयां नावडे सर्वथा ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपूर। मोक्ष मुक्तीचें माहेर। करती जयजयकार। वैष्णव ते आनंदें ॥ २ ॥ टाळ घोळ चिपळ्या नाद। दिंड्या पताका मकरंद। गाती विठ्ठल नाम आल्हाद। अट्टाहास्य करूनी ॥ ३ ॥ भानुदास अहोरातीं। देवा करितसे विनंती। या वैष्णुवांचे सांगाती। मज जन्म देईं देवा ॥ ४ ॥

१९६७ न येसी योगियांच्या ध्याना। न बैससी मुनिजनांच्या मना। तो तूं पंढरीचा राणा। भीमातीरनिवासी ॥ १ ॥ साक्षी अससी सर्वांभूतीं। असुनी न दिसे जगतीं। पांडुरंग बाळमूर्ती प्रगट उभी विटेवरी ॥ २ ॥ न कळे शास्त्रिकां संवाद। शब्दीं न सांपडे बोध। तो तूं उभा परमानंद। पुंडलीकद्वारीं ॥ ३ ॥ वेदां अचोज आंवुला। श्रुती करती गलबला। तो तूं घननीळ सांवळा। भानुदासा अंतरीं ॥ ४ ॥

१९६८ आगम निगमांचें स्थान। सर्वां हेंचि प्रमाण। मुनिजनांचें ध्यान। तीं ही मूर्ति विटेवरी ॥ १ ॥ धन्य धन्य पंढरपूर। सर्व तीर्थांचे माहेर। जडजीवां उद्धार। पांडुरंग पाहतांची ॥ २ ॥

उत्तम तीर्थ चंद्रभागा । स्नान करितां दोष भंगा । मध्यें पुंडलीक उभा । दरुशनें तारी जगत्र ॥ ३ ॥ भानुदास विनंती करी । प्रेमें नाचा महाद्वारीं । विठ्ठल डोळेभरी । पाहतां मुक्ति प्राणियां ॥ ४ ॥

१०६९ देखोनियां पंढरपूर । जीवा आनंद अपार ॥ १ ॥ टाळ मृदंग वाजती । रामकृष्ण उच्चारिती ॥ २ ॥ दिंड्या पताकांचा मेळ । नाचती हरुषें गोपाळ ॥ ३ ॥ चंद्रभागा उत्तम स्थान । स्नानें पतीत पावन ॥ ४ ॥ पुंडलीका लागतां पायां । चुके येरझार वांयां ॥ ५ ॥ पाहतां विठ्ठलमूर्ती । भानुदासासी विश्रांती ॥ ६ ॥

१०७० न मागतां कांहीं न करितां सेवा । आलासी गा देवा पंढरीये ॥ १ ॥ तूं गा मायबाप विश्वासी तारक । तुवां पुंडलीक सुखी केला ॥ २ ॥ चारितां गोधनें आलासी बा पायीं । पुंडलीक कांहीं न बोलेचि ॥ ३ ॥ चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला । भानुदास त्याला नाम झालें ॥ ४ ॥

१०७१ पंढरीचें सुख पुंडलीकासी झालें । तेणेंही वांटिलें भक्तांलागीं ॥ १ ॥ भुक्तिमुक्ती वरदान दीधलें । तें नाहीं ठेविलें आपणापाशीं ॥ २ ॥ चंद्रभागेतीरीं आश्रम पुंडलीकाचा । तो विसावा तीर्थांचा तीर्थराव ॥ ३ ॥ एकें गुप्तरूप म्हणोनी मौनची धरिलें । एकीं चोहटा उभें केलें परब्रह्म ॥ ४ ॥ कटीं कर विराजीत उभा असे निवांत । समचरण शोभत ध्यान मुद्रे ॥ ५ ॥ समदृष्टी साजिरी कमळनयन वरी । पितांबरधारी शामप्रभा ॥ ६ ॥ ऐसा वरवया वरवंट उभा असे नीट । मस्तकीं मुगुट तेजःपुंज ॥ ७ ॥ भक्तिज्ञान वैराग्य दिधलें भजना । वैकुंठीचा राणा भाग्यवंतु ॥ ८ ॥ ऐसा सुखाचा सागरु विठ्ठल कल्पतरु । पुंडलीक थोरु भक्तराज ॥ ९ ॥ भानुदासस्वामी तपें पूर्ण झाला । तो भक्तजना झाला मायबाप ॥ १० ॥

१०७२ परलोकींची वस्तु पंढरीसी आली । ती देवें फावली

पुंडलीका ॥ १ ॥ घेतां देतां लाभ बहुतांसी झाला । विसावा जोडला पांडुरंग ॥ २ ॥ न करितां सायास वस्तुची आयती । वैष्णवीं बहुतीं वेटाळिली ॥ ३ ॥ भानुदासस्वामी कृपेचा सागरु । विठ्ठल कल्पतरु बोळला आम्हां ॥ ४ ॥

१९७३ माणिकाचे तारू चंद्रभागे आलें । भूषण तें जालें सनकादिकां ॥ १ ॥ पंढरपूर हें नीळियाची खाणी । नवलाव साजणी देखियेला ॥ २ ॥ अवघिया देशांसी न्यावया पुरलें । आगरीं उरलें जैसें तैसें ॥ ३ ॥ भानुदास म्हणे नीळ हा चोखडा । सुजड हा जडा जीवन मुद्रा ॥ ४ ॥

१९७४ धन्य धन्य हें नगर । भूवैकुंठ पंढरपूर ॥ १ ॥ धन्य धन्य चंद्रभागा । मध्यें पुंडलीक उभा ॥ २ ॥ धन्य धन्य वेणूनाद । क्रीडा करितो गोविंद ॥ ३ ॥ धन्य पद्माळ्याची पाळी । गाई चारी वनमाळी ॥ ४ ॥ धन्य पंढरीचा वास । देवा गाये भानुदास ॥ ५ ॥

१९७५ भाविकासाठीं उभा । विठु कैवल्याचा गाभा ॥ १ ॥ युगें झालीं अठ्ठाविस । उभा पुंडलिका पाठीस ॥ २ ॥ न मानी कांहीं शीण । उभा तिष्ठत अज्ञान ॥ ३ ॥ ऐसा कृपाळु दीनाचा । भानुदास म्हणे साचा ॥ ४ ॥

१९७६ पंढरीचें सुख पाहतां अलौलिक । वैकुंठनायक उभा जेथें ॥ १ ॥ देवां जें दुर्लभ भक्तांसी सुलभ । रुक्मिणीवल्लभ उभा विटे ॥ २ ॥ वैष्णवांचा मेळ करिती गदारोळ । त्यामाजी गोपाळ सप्रेमें नाचे ॥ ३ ॥ जिकडे पाहे तिकडे होय ब्रह्मानंद । भानुदास आनंदें गात असे ॥ ४ ॥

१९७७ आवडोनि कर कटीं । पाउलें नेहटीं विटेवरी ॥ १ ॥ त्याचा छंद माझे जिवा । नाहीं हेवा आणिक ॥ २ ॥ काया वाचा आणि मन । लोभलें सगुणरूप देखतां ॥ ३ ॥ भानुदास म्हणे दृष्टी । पहातां गोमटी मूर्ति ते ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१९७८ इच्छिताती देव पंढरीचा वास। न मिळे सौरस तया कांहीं ॥ १ ॥ ऐसें श्रेष्ठ क्षेत्र उत्तमा उत्तम। याहुनि सुगम आहे कोठें ॥ २ ॥ जनार्दनाचा एका म्हणतसे भावें। तीर्थ तें वंदावें पंढरी सदा ॥ ३ ॥

१९७९ प्रयागादि क्षेत्रें आहेत कल्पकोडी। तया आहे खोडी एक एक ॥ १ ॥ मुंडन ती काया निराहार राहणें। येथें न मुंडणें काया कांहीं ॥ २ ॥ म्हणोनी सर्व तीर्थांमाजीं उत्तम ठाव। एका जनार्दनीं जीव ठसावला ॥ ३ ॥

१९८० उदंड तीर्थें क्षेत्रें पाहतां दिठी। नाहीं सृष्टीं तारक ॥ १ ॥ स्नानें पावती मुक्ति जगा। ऐसी चंद्रभागा समर्थ ॥ २ ॥ पुंडलिका नमस्कार। सकळ पूर्वजां उद्धार ॥ ३ ॥ पाहतां राउळाची ध्वजा। मुक्ती सहजा राबती ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं विठ्ठल भेटी। मग लाभा नये तुटी ॥ ५ ॥

१९८१ बहुत तीर्थें क्षेत्रें बहुतापरी। न पावती सरी पंढरीची ॥ १ ॥ वाहे दक्षणभाग भीमा। पैल परमात्मा विटेवरी ॥ २ ॥ मध्य स्थळीं पुंडलीक। दरुशनें देख उद्धार ॥ ३ ॥ वाहे तीर्थ चंद्रभागा। देखतां भंग पातकां ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सार। क्षराक्षर पंढरी हे ॥ ५ ॥

१९८२ उदंड क्षेत्रांची पाहिली रचना। पंढरी ते जाणा भूवैकुंठ ॥ १ ॥ तीर्थ आणि देव संतसमागम। ऐसें सर्वोत्तम कोठें नाहीं ॥ २ ॥ सागरादि तीर्थ पाहतां पाहिलें। परी मन हें वेधलें पंढरीये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुखाची विश्रांती। पाहतां विठ्ठलमूर्ति लाभ बहु ॥ ४ ॥

१९८३ उदंड तीर्थें उदंड क्षेत्रें। परि पवित्र पंढरी ॥ १ ॥ उदंड देव उदंड दैवतें। परी कृपावंत विठ्ठल ॥ २ ॥ उदंड भक्त उदंड संत। परी कृपावंत पुंडलीक ॥ ३ ॥ उदंड गातो एक एका। परी एकाजनार्दनीं सखा ॥ ४ ॥

१९८४ उत्तम तें क्षेत्र उत्तम तें स्थळ । धन्य तें राऊळ पाहतां डोळां ॥ १ ॥ एक एक तीर्थ घडती कोटी वेळां । चंद्रभागा डोळां देखिलिया ॥ २ ॥ गंगा प्रदक्षिणा समुद्राचें स्नान । परी हें महिमान नाहीं कोठें ॥ ३ ॥ वैष्णवांचा मेळ करिती गदारोळ । दिंडी पताकाघोळ नोहे कोठें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं साराचें हें सार । पंढरी माहेर भाविकांसी ॥ ५ ॥

१९८५ अनुपम्य सप्तपुऱ्या त्या असती । अनुपम्य त्या वरती पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य तीर्थ सागरादि असती । अनुपम्य सरती पंढरीये ॥ २ ॥ अनुपम्य देव उदंडे असती । अनुपम्य विठ्ठलमूर्ति पंढरीये ॥ ३ ॥ अनुपम्य संत वैष्णवांचा मेळ । अनुपम्य गदारोळ पंढरीये ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एकाजनार्दनीं । अनुपम्य चिंतनीं डुल्लतसे ॥ ५ ॥

१९८६ अनुपम्य क्षेत्र अनुपम्य देव । नसे तोचि ठाव पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य वाहे पुढें चंद्रभागा । अनुपम्य भंगा दोष जाती ॥२॥ अनुपम्य होय पुंडलीक भेटी । अनुपम्य कोटी सुखलाभ ॥ ३ ॥ अनुपम्य संत नामाचा गजर । अनुपम्य उद्धार जडजीवां ॥ ४ ॥ अनुपम्य शोभा विठ्ठलचरणीं । एकाजनार्दनीं गात गीती ॥ ५ ॥

१९८७ अनुपम्य वाचे वदतां पंढरी । होतसे बोहरी महत्पापा ॥ १ ॥ अनुपम्य ज्याचा विठ्ठलीं जो भाव । अनुपम्य देव तिष्ठे घरीं ॥ २ ॥ अनुपम्य सदा कीर्तनाची जोडी । अनुपम्य गोडी मनीं ज्याच्या ॥ ३ ॥ अनुपम्य संग संतांचा विसांवा । अनुपम्य भावा पालट नाहीं ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एकाजनार्दनीं । काया वाचा मनीं छंद यासी ॥ ५ ॥

१९८८ अनुपम्य वास पंढरीस ज्याचा । धन्य तो दैवाचा अनुपम्य ॥ १ ॥ अनुपम्य घडे चंद्रभागे स्नान । अनुपम्य दान नाम वाचे ॥ २ ॥ अनुपम्य घडे क्षेत्र प्रदक्षणा । अनुपम्य जाणा नारीनर

॥ ३ ॥ अनुपम्य सोहळा नित्य दिवाळी । अनुपम्य वोवाळी विठो-
वासी ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एकाजनार्दनीं । अनुपम्य ध्यानीं एक
नाम ॥ ५ ॥

१९८९ अनुपम्य नारीनर ते दैवाचे । अनुपम्य त्यांचें पुण्य देखा
॥ १ ॥ अनुपम्य वास जयांसी पंढरी । प्रत्यक्ष वैकुंठपुरी अनुपम्य ॥२॥
अनुपम्य पहाती विठ्ठलरायातें । दरुशनें पावती मुक्तीतें अनुपम्य
॥ ३ ॥ अनुपम्य भक्त नांदती दैवाचे । अनुपम्य त्यांचें सुख देवा
॥ ४ ॥ अनुपम्य एका जनार्दन चरणीं । अनुपम्य विनवणी करि-
तसे ॥ ५ ॥

१९९० अनुपम्य उपासना । अनुपम्य चरणा संतांचिये ॥ १ ॥
अनुपम्य भक्ति गोड । अनुपम्य लिगाड तुटत ॥ २ ॥ अनुपम्य पंढ-
रीचा वास । अनुपम्य दैवास देव त्याचे ॥ ३ ॥ अनुपम्य नाचती
वैष्णव । अनुपम्य गौरव तयाचें ॥ ४ ॥ अनुपम्य एकाजनार्दनीं ।
अनुपम्य चरणीं संतांचिये ॥ ५ ॥

१९९१ अनुपम्य उदार नाम । अनुपम्य सकाम संत ते ॥ १ ॥
अनुपम्य पंढरीसी जाती । अनुपम्य नाचती वाळुवंटीं ॥ २ ॥ अनु-
पम्य टाळ घोळ । अनुपम्य रसाळ वाद्यें वाजती ॥ ३ ॥ अनुपम्य
संतमेळ । अनुपम्य प्रेमळ नाम घेती ॥ ४ ॥ अनुपम्य एका-
जनार्दनीं । अनुपम्य आयणी चुकले ॥ ५ ॥

१९९२ अनुपम्य पुराणें सांगती सर्वथा । अनुपम्य तत्त्वतां पंढ-
रीये ॥ १ ॥ अनुपम्य योग अनुपम्य याग । अनुपम्य अनुराग पंढरीये
॥ २ ॥ अनुपम्य ध्यान अनुपम्य धारणा । अनुपम्य पंढरीराणा विटे-
वरी ॥ ३ ॥ अनुपम्य क्षेत्र तीर्थ तें पवित्र । अनुपम्य गोत्र उद्धरती
॥ ४ ॥ अनुपम्य शरण एकाजनार्दनीं । अनुपम्य भुवनीं नांद-
तसे ॥ ५ ॥

१९९३ उपदेश अनुपम्य खूण । विटे समचरण शोभले ॥ १ ॥

अनुपम्य सदैव भाग्य ज्यांचें । अपनुम्य वाचे गाती ॥ २ ॥ अनुपम्य जाती पंढरीये । अनुपम्य वस्ती होय पंढरीये ॥ ३ ॥ अनुपम्य ते भाग्याचे । विठ्ठल वाचे आळविती ॥ ४ ॥ अनुपम्य एकाजनार्दनीं । अनुपम्य वदनीं गाती नाम ॥ ५ ॥

१९९४ अनुपम्य ज्ञान अनुपम्य मतें । अनुपम्य सरतें पंढरीये ॥ १ ॥ अनुपम्य वेद अनुपम्य शास्त्र । अनुपम्य पवित्र पंढरीये ॥ २ ॥ अनुपम्य भुक्ति अनुपम्य मुक्ति । अनुपम्य वेदोक्ती पंढरीये ॥ ३ ॥ अनुपम्य कळा अनुपम्य सोहळा । अनुपम्य जिव्हाळा पंढरीये ॥ ४ ॥ अनुपम्य दया अनुपम्य शांती । अनुपम्य विरक्ती एकाजनार्दनीं ॥ ५ ॥

१९९५ अनुपम्य भाग्य नांदतें पंढरी । विठ्ठल निर्धारीं उभा जेथें ॥ १ ॥ अनुपम्य वाहे पुढें चंद्रभागा । दोष जाती भंगा नाम घेतां ॥ २ ॥ अनुपम्य मध्यें पुंडलिक मुनी । अनुपम्य चरणी मिठी त्यांच्या ॥ ३ ॥ अनुपम्य संत शोभती दोहीं बाही । अनुपम्य देहीं सुख वाटे ॥ ४ ॥ अनुपम्य एकाजनार्दनीं ठाव । अनुपम्य पंढरीराव विटे-वरी ॥ ५ ॥

१९९६ अनुपम्य घनदाट । करती बाभाटे अनुपम्य ॥ १ ॥ पंढरीसी जाती अनुपम्य । धन्य जन्म अनुपम्य त्यांचा ॥ २ ॥ अनुपम्य त्यांच्या पुण्या नाहीं पार । अनुपम्य निर्धार सुख त्यांसी ॥ ३ ॥ अनुपम्य दशा आली त्यांच्या दैवा । अनुपम्य हेवा चुकले ते ॥ ४ ॥ अनुपम्य शरण एकाजनार्दनीं । पंढरी सांडोनि नेम नाहीं ॥ ५ ॥

१९९७ सारांचें सार गुह्यांचें निजगुह्य । तें हें उभें आहे पंढरीये ॥ १ ॥ चहूं वाचांपरत वेदां जें आरुतें । तें उभें आहे सरतें पंढरीये ॥ २ ॥ शास्त्रांचें निजसार निगमां न कळे पार । तोचि हा परात्पर पंढरीये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भरूनी उरला । तोचि हा देखिला पंढरीये ॥ ४ ॥

१९९८ बहुता काळाचें हें क्षेत्र । सकळ देवांचें माहेर । सकळ संतांचें निजमंदीर । तें हें पंढरपूर जाणावें ॥ १ ॥ धन्य पंढरीचा महिमा । नाहीं आणीक उपमा । जेथें वास पुरुषोत्तमा । रुक्मिणीसहित सर्वदा ॥ २ ॥ धन्य भक्त पुंडलीक । सकळ संतांचा नायक । एकाजनार्दनीं देख । श्रीविठ्ठल आवडी ॥ ३ ॥

१९९९ भाळे भोळे नरनारी । येती प्रती संवत्सरीं पंढरीये ॥ १ ॥ करती स्नान वंदिती चरणां । क्षेत्रप्रदक्षणा करिताती ॥ २ ॥ टाळविणे मृदंग मोहरी । गरुड टके शोभती करीं ॥ ३ ॥ करती आनंदें नामघोष । नाहीं आस पायांवीण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कौतुकें । नाचतु सुखें भक्तराणा ॥ ५ ॥

२००० पंढरीस ज्याचा नेम । तो न करी अन्य कर्म ॥ १ ॥ सांडूनियां विठ्ठलराजा । आणिक देव नाहीं दुजा ॥ २ ॥ सांडुनियां चंद्रभागा । कोण जाय आणिके गंगा ॥ ३ ॥ सांडोनियां पुंडलीका । कोण आहे आणीक सखा ॥ ४ ॥ सांडोनियां वेणुनाद । कोण आहे थोर पद ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भाव । अवघा विठ्ठलाचि देव ॥ ६ ॥

२००१ गोपाळपुरीं काला गोपाळ करिती । तेथील लाभा देव लाळ घोटिती ॥ १ ॥ ऐसा आनंदगे माय तया पंढरपुरीं । धन्य भक्त देवाचे वारकरी ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी नित्य नेमें जाण । जाउनी भीवरे करताती स्नान ॥ ३ ॥ घेतां दरुशन पुंडलीकाचे भेटी । एकाजनार्दनीं पुण्य नसमाय सृष्टी ॥ ४ ॥

२००२ माझे माहेर पंढरी । आहे भीवरेचे तीरीं ॥ १ ॥ बाप आणि आई । माझी विठ्ठल रखुमाई ॥ २ ॥ पुंडलिक बंधु आहे । त्याची ख्याती सांगूं काय ॥ ३ ॥ माझी बहिण चंद्रभागा । करीतसे पापभंगा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण । करी माहेरीची आठवण ॥ ५ ॥

२००३ श्रीमुखाचें सुख पाहतां पाहतां । नयन तत्त्वतां वेधलें

माझें ॥ १ ॥ सांवळा सुंदर कटीं ठेवुनी कर । रूप तें नागर भीमातीरीं ॥ २ ॥ नित्य परमानंद आनंद सोहळा । सनकादीक या स्थळां येती जाती ॥ ३ ॥ वैष्णवांचा थाट टाळ घोळ नाद । दिंड्या मकरंद हर्ष बहु ॥ ४ ॥ सन्मुख ती भीमा वाहे अमृतमय नीर । जडजीवां उद्धार स्नान मात्रें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं मुक्तीचें माहेर । क्षेत्र तें साचार पंढरपुर ॥ ६ ॥

२००४ तेथें मुख्य हरिहर । शोभे चंद्रभागातीर ॥ १ ॥ जाऊं चला पंढरपूरा । भेटूं आपल्या माहेरा ॥ २ ॥ आर्त सांगूं जीवीचा । पूनीत ठाव हाचि साचा ॥ ३ ॥ हरिहरां होय भेटी । वास तयासी वैकुंठीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण । पंढरी पुण्य ठाव भीवरा जाण ॥ ५ ॥

२००५ साधन तें सार पंढरीची वारी । आन तूं न करी साया-साचें ॥ १ ॥ वेद तो घोकितां चढे अभिमान । नाडेल तेणें जाण साधन तें ॥ २ ॥ शास्त्रमतवाद कासया पसार । करी सारासार वारी एक ॥ ३ ॥ पुराण सांगतां मन वेडावलें । निंदू जे लागलें आणिकांसी ॥ ४ ॥ ग्रंथ पहावे तरी आयुष्य क्षणीक । व्यर्थ खटपट करुनी काई ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं साराचें पैं सार । विठ्ठल त्रिअक्षर जप करी ॥ ६ ॥

२००६ तरीच यावें जन्मा । ठेवा पांडुरंगीं प्रेमा ॥ १ ॥ नाहीं तरी श्वान सुकर । जन्मा आले ते अपार ॥ २ ॥ नेणें पंढरीची वारी । जन्मा आला तो भिकारी ॥ ३ ॥ संत सेवा दया नेणें । जन्मा आला तो पाषाण ॥ ४ ॥ कधीं करूं नेणें भजन । जैसें गृहीं मण्डूक जाण ॥ ५ ॥ नाहीं विश्वास मानसीं । एकाजनार्दनीं म्हणे त्यासी ॥ ६ ॥

२००७ प्रेमळांसी विश्रांतिस्थान । महामुक्ती कर जोडोन । ऋद्धि सिद्धी वोळंगण । तिष्ठती जाण पंढरीये ॥ १ ॥ धन्य धन्य विठ्ठल-

राय । उभा देवाचा तो देव । दरुशनें निरसे भेद । यम काळ दूतांचें ॥ २ ॥ नाम न विटेचि रसना । सुलभ हा पंढरीचा राणा । एका शरण जनार्दना । सदा वाचे उच्चारी ॥ ३ ॥

२००८ देव संत दोन्हीं एकचि मेळ । गदारोळ कीर्तनीं ॥ १ ॥ ती हे त्रिवेणी पंढरी । आहे भीवरेचे तीरीं ॥ २ ॥ येती वारकरी । आनंदें नाचती गजरीं ॥ ३ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । पुंडलीकें दाखविला निका ॥ ४ ॥

२००९ देव भक्त एके ठायीं । संतमेळ तया गांवीं ॥ १ ॥ तें हें जाणा पंढरपूर । देव उभा विटेवर ॥ २ ॥ भक्त येती लोटांगणीं । देव पुरवी मनोरथ मनीं ॥ ३ ॥ धांवे सामोरा तयासी । आलिंगुन क्षेम पुसी ॥ ४ ॥ ऐशी आवडी मानी मोठी । एकाजनार्दनीं घाली मिठी ॥ ५ ॥

## श्रीनिवृत्तिमहाराज

२०१० अवीट अमोला घेतां पैं निमोला । प्रत्यक्ष देखिला भीमातटीं ॥ १ ॥ अव्यक्त साकार आकारिलें अंकुर । क्षरला चराचर भक्तिकाजें ॥ २ ॥ अनुमान विटे सर्वघटीं माजिठे । तें परब्रह्म विटे भक्ति साह्य ॥ ३ ॥ निवृत्ति घनवट पिकलिसे पेठ । पुंडलिकें प्रगट केलें कैसें ॥ ४ ॥

२०११ पंढरीये चोख रूपडें अशेख । भीमातीरीं देख पुण्य भूमी ॥ १ ॥ आदिपीठ देव ब्रह्म हें स्वयमेव । पुंडलिक भाव प्रगटला ॥ २ ॥ जन हें विव्हळ तारक गोपाळ । कीर्तनीं कळिकाळ दुरी ठाये ॥ ३ ॥ नाम हें विठ्ठल नलगे पैं मोल । नित्यता सफळ पांडुरंग ॥ ४ ॥ त्रिविधताप पाप त्यजतील अमूप । पुरतील संकल्प एका नामें ॥ ५ ॥ निवृत्ति म्हणे धन्य जो कीर्तन करी । सर्वत्र चराचरीं वोलियेलें ॥ ६ ॥

२०१२ पुंडलिकाचें भाग्य वर्णावया अमरीं । नाहीं चराचरीं ऐसा

कोणी ॥ १ ॥ विष्णुसहित शिव आणिला पंढरी । केलें भीमातीरीं पेणें जेणें ॥ २ ॥ ब्रह्मादिकां अंत न कळे ज्या रूपाचा । एवढी कीर्ति वाचा बोलों काय ॥ ३ ॥ निवृत्ति सांगे मातु विठ्ठल उच्चार । वैकुंठ उतरे एक्या नामें ॥ ४ ॥

२०१३ रूपाचें रूपस विठ्ठलनाम वेष । पंढरीनिवास आत्माराम ॥ १ ॥ पुंडलिक भाग्य फळलें संपूर्ण । दिनानिशीं कीर्तन विठ्ठल हरी ॥ २ ॥ त्रैलोक्य उद्धरे ऐसी पव्हे त्वरें । कीर्तन निर्धारें तरणोपाय ॥ ३ ॥ पुण्य केलें चोख तारिले अशेख । जनीं वनीं एक रूप वसे ॥ ४ ॥ वेदादिक मति ज्या रूपा गुंतती । तो आणूनि श्रीपति उभा केला ॥ ५ ॥ निवृत्तिचा सखा विठ्ठलरूप देखा । निरालंब शिखा गगनोदरीं ॥ ६ ॥

२०१४ भाग्याचेनि भाग्य उदो पैं दैवयोगें । पुंडलिकासंगे भीमातटीं ॥ १ ॥ ध्यान मनन एक करितां सम्यक । होय एकाएक एकतत्त्व ॥ २ ॥ उदो अस्तु मैळे ब्रह्म न मैळे । भोगिती सोहळे प्रेमभक्त ॥ ३ ॥ निवृत्ति निवांत विठ्ठल सतत । न घे दुजी मात हरिवीण ॥ ४ ॥

२०१५ निराकार वस्तु आकारासि आली । विश्रांति पैं जाली भक्तजनां ॥ १ ॥ भिवरासंगमीं निरंतर समी । तल्लीनता ब्रह्मीं उभी असे ॥ २ ॥ पुंडलिक ध्याये पुढत पुढतीं सोये । विठ्ठल हेंचि गाये संकीर्तनीं ॥ ३ ॥ निवृत्ति संकीर्तन ब्रह्म हें सोज्वळ । नाम हें रसाळ अनिर्वाच्य ॥ ४ ॥

२०१६ विठ्ठल श्रीहरी उभा भीमातीरीं । तिष्ठती कामारी मुक्ति चारी ॥ १ ॥ मुनिजनां सुख निरंतर लक्ष । भक्तां निजसुख देत असे ॥ २ ॥ पुंडलिक पुण्य मी दीन कारुण्य । उद्धरिले जन अनंत कोटी ॥ ३ ॥ निरा निरंतर भीमरथी तीर । ब्रह्म हें साकार विटे नीट ॥ ४ ॥ नित्यता भजन जनीं जनार्दन । ब्रह्मादिक खूण पावताती ॥ ५ ॥ निवृत्ति तत्पर हरीरूप सर्वत्र । नाम घेतां तृप्त आत्माराम ॥ ६ ॥

२०१७ प्राणिया उद्धार सर्व हा श्रीधर । ब्रह्म हें साचार कृष्ण-मूर्ती ॥ १ ॥ तें रूप भीवरे पांडुरंग खरें । पुंडलिक निर्धारें उभें असे ॥ २ ॥ युगें अठ्ठावीस उभा हृषीकेशु । पुंडलिका सौरसु पुरवितु ॥ ३ ॥ निवृत्तीचें गुज पुंडरीक बीज । विश्वजन काज पुरे कोडें ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

२०१८ हें नव्हे आजिकालिचें । युगें अठ्ठाविसांचें । मज निर्धारितां साचें । हा मृत्युलोकुचि नव्हे ॥ हाचि मानिरे निर्धारु । येर सांडिरे विचारु । जरी तूं पाहासि परात्परु । तरी तूं जायें पंढरिये ॥१॥ बाप तीर्थ पंढरी । भूवैकुंठ महीवरी । भक्त पुंडलिकाचे द्वारीं । कर कटावरी राहिला॥२॥ काशी अयोध्या अवंति कांति । मथुरा माया गोमती। ऐशीं तीर्थें इत्यादिकें आहेती। परि सरी न पवती पांडुरंगीं॥३॥ हाचि मानिरे विश्वासु। येर सांडिरे हव्यासु । जरि तूं पाहासि वैकुंठवासु । तरि तूं जायें पंढरिये ॥ ४ ॥ आड वाहे भीमा । तारावया देह आत्मा । पैलथडीये परमात्मा । मध्य राहिला पुंडलिकु ॥ ५ ॥ या तिहींचें दरुशन । प्राण्या नाहीं जन्ममरण । पुनरपि आगमन । येथें बोलिलेंचि नाहीं ॥ ६ ॥ पंढरी म्हणजे भूवैकुंठ । ब्रह्म तंव उभेंचि दिसताहे नीट । या हरिदासासि वाळुवंट । जागरणासी दीधलें ॥ ७ ॥ म्हणोनि करा करारे क्षीरापति । नटा नटा कीर्तनवृत्ति । ते नर मोक्षातें पावती । ऐसें बोलती सुरनर ॥ ८ ॥ हें चोविसा मूर्तीचें उद्धरण । शिवसहस्रनामासी गहन । हेंचि हरिहराचें चिंतन । विश्ववंद्य हे मूर्तीतें ॥ ९ ॥ तो हा देवादिदेव बरवा । पांडुरंग सदाशिवाचा निजठेवा । बापरखुमादेविवरु पंचविसावा । चोविसा मूर्तिवेगळा ॥ १० ॥

२०१९ पंढरीचे वाटे अनंत घडती याग । वैकुंठींचा मार्ग तेणें संगें ॥ १ ॥ जप तप अनुष्ठान क्रिया कर्म धर्म । हें जाणताती वर्म

संतजन ॥ २ ॥ भक्तिमार्ग फुकटा आनंदाची पव्हे । लागलीसे सवे पुंडलिका ॥ ३ ॥ दिंडी टाळ घोळ गरुडटाकियाचे भार । वैष्णवांचे गजर जिये नगरीं ॥ ४ ॥ तिहीं लोकीं दुर्लभ अमर नेणती । वृक्ष होऊनी पुढती सेविताती ॥ ५ ॥ सनकादिक मुनी ध्यानस्त पैं सदा । ब्रह्मादिकां कदा न कळे महिमा ॥ ६ ॥ ज्ञानदेव निवृत्ति पुसतसे कोडें । पुंडलिकें केवढें भाग्य केलें ॥ ७ ॥

२०२० कल्पना वृक्षासि देखिलें । चिंतामणीसि चिंतलें । कामधेनुसी अपेक्षिलें । जीण्या जीवाविलें तेंचि हरिरूप पंढरिये ॥ १ ॥ धन्य कुळ धन्य जन्म । जयासी पंढरीचा नेम । चित्तीं अखंड विठ्ठलप्रेम । ते धन्य भक्त भूमंडळीं ॥ २ ॥ तोचि तीर्थरूप सदा । तया दोष न बाधिती कदा । जो रातला परमानंदा । तेथें सर्व सिद्धि वोळंगती ॥ ३ ॥ ऐशीं वेदशास्त्रीं पुराणीं । जो रतला नामस्मरणीं । धन्य तया तीर्थ पर्वणी । धन्य वाणी तयाची ॥ ४ ॥ पंढरीसी कीर्तन करी । पुंडलीकासी नमस्कारी । विठ्ठलचरण अंतरीं धरीं धन्य जन्म तयाचा ॥ ५ ॥ सकळ कुळांचा तारकु । तोचि जाणावा पुण्यश्लोकु । पांडुरंगीं रंगला निशंकु । धन्य जन्म तयाचा ॥ ६ ॥ त्यासी अंतीं वैकुंठप्राप्ती । ऐसें शुकें सांगितलें परीक्षिती । जे जे हरिचरणीं भजती । ते ते पावती वैकुंठ ॥ ७ ॥ नामें स्फुंदत नाचत रंगणीं । प्रेम विठ्ठल चरणीं । सर्व सुखखाणी । बापरखुमादेविवरु विठ्ठल ॥ ८ ॥

## श्रीसेनामहाराज

२०२१ जातां पंढरीसी सुख वाटे जीवा । आनंदें केशवा भेटतांचि ॥ १ ॥ या सुखाची उपमा नाहीं त्रिभुवनीं । पाहिलीं शोधोनी अवघीं तीर्थें ॥ २ ॥ ऐसा नामघोष ऐसे पताकांचे भार । ऐसे वैष्णव दिगंबर दावा कोठें ॥ ३ ॥ ऐसी चंद्रभागा ऐसा पुंडलीक । ऐसा वेणुनादीं काला दावा ॥ ४ ॥ ऐसा विटेवरी उभा कटेवरी कर ।

ऐसें पाहतां निर्धार नाहीं कोठें ॥ ५ ॥ सेना म्हणे खूण सांगितली संतीं । यापरती विश्रांति न मिळे जीवा ॥ ६ ॥

२०२२ जेथें वेदां न कळे पार । पुराणासी अगोचर ॥ १ ॥ तो हा पंढरीराणा । बहु आवडतो मना ॥ २ ॥ सहा शास्त्र शिणलीं । मग मौनाचि राहिलीं ॥ ३ ॥ सेना म्हणे मायबाप । उभा कटीं ठेउनी हात ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

२०२३ पंढरीचें सुख नाहीं त्रिभुवनीं । प्रत्यक्ष चक्रपाणी उभा असे ॥ १ ॥ त्रिभुवनीं समर्थ ऐसें पैं तीर्थ । दक्षिणमुख वाहात चंद्रभागा ॥ २ ॥ सकळ संतांचा मुगुटमणी देखा । पुंडलिक सखा आहे जेथें ॥ ३ ॥ चोखा म्हणे तेथें सुखाची मिराशी । भोळ्या भाविकांसी अखंडित ॥ ४ ॥

२०२४ अवघी पंढरी भूवैकुंठ नगरी । नांदतसे हरि सर्वकाळ ॥ १ ॥ चतुर्भुज मूर्ति शंखचक्र करीं । पीतांबरधारी श्यामवर्ण ॥ २ ॥ श्रीमुख शोभलें किरीट कुंडलें । तेचि मिरवले चंद्र सूर्य ॥ ३ ॥ पीतांबर कासे सोनसळा विराजे । सर्वांगीं साजे चंदनउटी ॥ ४ ॥ मिरवले कर दोनी कटावरी । ध्यान तें त्रिपुरारी ध्यात असे ॥ ५ ॥ सनकादिक भक्त पुंडलिक मुनि । सुख समाधानी सर्वकाळ ॥ ६ ॥ आनंदाचा कंद उभा विटेवरी । चोखा परोपरी नाचतसे ॥ ७ ॥

२०२५ इनामाची भरली पेठ । भू वैकुंठ पंढरी ॥ १ ॥ चंद्रभागा वाळुवंट । संत घनदाट नाचती ॥ २ ॥ टाळ मृदंग मोहरी । वैष्णवगजरीं आनंदें ॥ ३ ॥ चोखा जातो लोटांगणीं । घेत पायवणी संतांचीं ॥ ४ ॥

२०२६ टाळी वाजवावी गुढी उभारावी । वाट हे चालावी पंढरीची ॥ १ ॥ पंढरीचा हाट कऊलांची पेठ । मिळाले चतुष्ट वारकरी ॥ २ ॥ पताकांचें भार मिळाले अपार । होतो जयजयकार

भीमातिरीं ॥ ३ ॥ हरिनाम गर्जतां भय नाहीं चित्ता । ऐसें बोले गीता भागवत ॥ ४ ॥ खटनट यावें शुद्ध होउनि जावें । दवंडी पिटी भावें चोखामेळा ॥ ५ ॥

२०२७ बहुत हिंडलों देश देशांतर । परी मन नाहीं स्थिर झालें कोठें ॥ १ ॥ बहुत तीर्थें फिरोनियां आलों । मनासवें झालों वेडगळची ॥ २ ॥ बहुत प्रतिमा ऐकिल्या पाहिल्या । मनाच्या राहिल्या वेरझारा ॥ ३ ॥ चोखा म्हणे पाहतां पंढरी भूवैकुंठ । मनाचे हे कष्ट दूर गेले ॥ ४ ॥

२०२८ विठ्ठल विठ्ठल गजरीं । अवघी दुमदुमली पंढरी ॥ १ ॥ होतो नामाचा गजर । दिंड्या पताकांचा भार ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान । अपार वैष्णव ते जाण ॥ ३ ॥ हरीकीर्तनाची दाटी । तेथें चोखा घाली मिठी ॥ ४ ॥

२०२९ अगाध भूवैकुंठ नगरी । पंढरी हे चराचरीं ॥ १ ॥ पुंडलीकें आणियेला । मौन्य उभा तोचि ठेला ॥ २ ॥ कटावरी ठेवोनि हात । उभा राहिला निवांत ॥ ३ ॥ चोखा म्हणे रूप आगळें । कानीं कुंडलें शोभलें ॥ ४ ॥

२०३० वारी पंढरीची तोचि वारकरी । दया क्षमा बरी वसे तेथें ॥ १ ॥ तोचि माझा जीव प्राणाचाही प्राण । जीव वोवाळीन तयावरी ॥ २ ॥ आसनीं शयनीं पंढरीचें ध्यान । वाचे नारायण जप सदा ॥ ३ ॥ चोखा म्हणे तोचि माझा हे सांगाती । तयाचे संगतीं देव जोडे ॥ ४ ॥

२०३१ एक वेळां पंढरी वाचे जो उच्चारी । मोक्ष त्याचे घरीं नांदतसे ॥ १ ॥ सदा सर्वकाळ विठ्ठलचिंतन । करितो कीर्तन दिवसराती ॥ २ ॥ ते माझे सोयरे सज्जन सांगाती । जे आठविती विठोबासी ॥ ३ ॥ चोखा म्हणे ते परलोकीचे सखे । गाती नाम मुखें विठोबाचें ॥ ४ ॥

२०३२ धन्य ते सभाग्य नर आणी नारी । करिताती वारी पंढरीची ॥ १ ॥ तयांचे चरणी माझे दंडवत । जे नेमें माझ्या गात विठोबासी ॥ २ ॥ दिवाळी दसरा अवघे पर्वकाळ । नांदती सकळ तया घरीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे धन्य धन्य ते संसारीं । नेमें करिती वारी पंढरीची ॥ ४ ॥

## श्रीनरहरीसोनारमहाराज

२०३३ नाम हे नगरी वैकुंठ पंढरी । नांदतो श्रीहरी पांडुरंग ॥ १ ॥ नरदेहीं जन्मले पंढरीस गेले । दृष्टिभरि पाहिले पांडुरंग ॥ २ ॥ भींवरेचें स्नान देवाचें दर्शन । पाप हें जळोन जाय तेथें ॥ ३ ॥ चरणावरी माथा नरहरी ठेविला । हृदयीं बिंबला पांडुरंग ॥ ४ ॥

२०३४ पंढरी नगरीं दैवत श्रीहरी । जाती वारकरी व्रतनेमें ॥ १ ॥ आषाढी कार्तीकी महापर्वे थोर । भजनाचा गजर करिती तेथें ॥ २ ॥ साधुसंत थोर पताकांचा भार । मुखीं तो उच्चार नामामृत ॥ ३ ॥ आनंदाचा काला गोपाळकाला केला । हृदयीं बिंबला नरहरी ॥ ४ ॥

२०३५ पंढरपुरचा जाणा विठ्ठलधणी । राणी रुक्मिणी सत्यभामा ॥ १ ॥ भूमीमध्यें गुप्त कानोपात्रा झाली । उजवे बाजू ठेलि लक्ष्मी ते ॥ २ ॥ पुढें हो प्रतीमा नामदेव पायरी । उभा महाद्वारीं चोखामेळा ॥ ३ ॥ पुढें मल्लिकार्जुन महिमा असे फार । लिंग असे थोर महादेवाचें ॥ ४ ॥ पुढें भागीरथी मध्यें पुंडलिक । आणिकही तेथें वेणुनाद ॥ ५ ॥ आषाढी कार्तिकी साधुसंत येती । गोपाळ काला करिती आनंदाने ॥ ६ ॥ देवाचे समोर नरहरी सोनार । हृदयीं निरंतर नांव घेतो ॥ ७ ॥

---

# वैकुंठपर

## श्रीतुकाराममहाराज

२०३६ पुंडलिकाचे निकटसेवे । कैसा धांवे वराडी ॥ १ ॥ आपुलें तें थोरपण । नारायण विसरला ॥ २ ॥ उभा कटीं ठेवुनि कर । न म्हणे पर बैससें ॥ ३ ॥ तुका म्हणे जगदीशा । करणें आशा भक्तांची ॥ ४ ॥

२०३७ वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥ १ ॥ धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्तांचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥ २ ॥ पितृसेवा पुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥ ३ ॥ अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥ ४ ॥ धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याति । तुका म्हणे मुक्ति पायीं लोळे ॥ ५ ॥

२०३८ मैंद आला पंढरीस । हातीं घेउनि प्रेमपाश ॥ १ ॥ पुढें नाडियेलें जग । नेतो लागों नेदी माग ॥ २ ॥ उभारोनि बाहे । दृष्टादृष्टी वेधीताहे ॥ ३ ॥ वैकुंठीहुनी पेणें । केलें पंढरीकारणें ॥ ४ ॥ पुंडलिकें थारा । देउनि आणिलें या चोरा ॥ ५ ॥ तुका म्हणे चला । तुम्ही आम्ही धरूं त्याला ॥ ६ ॥

२०३९ पुंडलीक भक्तराज । तेणें साधियेलें काज । वैकुंठींचें निज । परब्रह्म आणिलें ॥ १ ॥ पांडुरंग बाळमूर्ती । गाई गोपाळांसंगतीं । येऊनियां प्रीती । उभें समचि राहिलें ॥ २ ॥ एका आगळें अक्षरें । भूवैकुंठाचि दुसरें । म्हणविती येरें । परि तीं ऐसीं नव्हेती ॥ ३ ॥ पाप पंचक्रोशीमधीं । येऊं न सकेचि कधीं । कैंची तेथें विधि-- । निषेधाची वसति ॥ ४ ॥ पुराणें वदती ऐसें । चतुर्भुज तीं माणसें । सुदर्शनावरी वसे । परि तें न बुडे कल्पांतीं ॥ ५ ॥ महाक्षेत्र

हें पंढरी । अनुपम्य इची थोरी । धन्य धन्य वारकरी । तुका म्हणे तेथींचे ॥ ६ ॥

२०४० कां रे पुंड्या मातलासी। उभें केलें विठ्ठलासी ॥ १ ॥ ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ॥ २ ॥ युगें जालीं अठ्ठावीस । अजुनी न म्हणसी बैस ॥ ३ ॥ भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ ४ ॥ तुका म्हणे पुंडलिका । तूंचि बळिया एक निका ॥ ५ ॥

## श्रीनिळोबामहाराज

२०४१ अर्चुनियां पुंडलिका । विश्वव्यापका राहविलें ॥ १ ॥ थोर उपकार केला लोकां । भक्तां भाविकां तारियलें ॥ २ ॥ आणुनियां वैकुंठवासी । सगुण रूपेंसी भेटविला ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मादिक । देवही सकळिक मानवलें ॥ ४ ॥

२०४२ धन्य धन्य पुंडलिका । केला तरणोपाय लोकां ॥ १ ॥ एका दर्शनेंचि उद्धार । केलें पावन चराचर ॥ २ ॥ चंद्रभागा पंढरपूर । भक्त आणि हरीहर ॥ ३ ॥ निळा म्हणे सुलभ केलें । भूमि वैकुंठ आणिलें ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

२०४३ वैकुंठ तें घर । सांडूनियां निरंतर ॥ १ ॥ तो हा पुंडलीका द्वारीं । उभा कर कटावरी ॥ २ ॥ क्षीरसागरींची मूर्ती । तो हा रुक्मिणीचा पती ॥ ३ ॥ नये योगियांचे ध्यानीं। छंदें नाचतो कीर्तनीं ॥ ४ ॥ नामा म्हणे आला । सर्व परिवार आणिला ॥ ५ ॥

२०४४ वैकुंठाहुनि केलें पेणें । भक्त प्रल्हादाकारणें ॥ १ ॥ नरहरि पावला पावला । महापापा पळ सुटला ॥ २ ॥ शंख चक्र पद्म गदा । महापापा पळ सुटला ॥ ३ ॥ पावला गरुडध्वज । नामया स्वामी केशवराज ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

२०४५ पुंडलीक भक्त बळी। विठो आणिला भूतळीं ॥ १॥ अनंत अवतार केवळ। उभा विटेवरी सकळ ॥ २॥ वसुदेवा न कळे पार। नाम्यासवें जेवी फार ॥ ३॥ भक्त भावार्थी विकला। दासी जनीला आनंद झाला ॥ ४॥

## श्रीएकनाथमहाराज

२०४६ सखी पुसे सखयेसी। युगें जालीं अठ्ठाविसी। उभा ऐकिला संतांमुखीं। अद्यापीवर। कटावरी कर। भीवरा तीर। वाळुवंटीं संत सभा सभा ॥ १॥ देव कांहो विटेवरी उभा उभा ॥ ध्रु०॥ नका पुसूं बाई। वेदासी कांहीं। कळलेंचि नाहीं। शेष शिणला जाहल्या द्विसहस्र जिभा जिभा ॥ २॥ येथें करिताती गोपाळ काला। हरीनामीं तयांचा गलबला। देव भावाचा भुकेला। मिळाले संत मदनारी तो हरी। आला तयांचीया लोभा लोभा ॥३॥ हरी वैकुंठाहुनी। आला पुंडलिकालागुनी। उभा राहिला अझुनी। युगानुयुगें। भक्तासंगें। एकाजनार्दनीं संत शोभा शोभा ॥ ४॥

२०४७ देखोनि कीर्तनाची गोडी। देव धांवे लवडसवडी ॥ १॥ वैकुंठींहूनी आला। कीर्तनीं तो सुखें धाला ॥ २॥ ऐसा कीर्तनाचा गजर। देव नाचतसे निर्भर ॥ ३॥ भुलला कीर्तनीं। एका शरण जनार्दनीं ॥ ४॥

२०४८ उभा भीमातीरीं कट धरूनी करीं। वैकुंठींचा हरी मौनरूप ॥१॥ ठेउनियां विटे समपद दोन्ही। उभा चक्रपाणी मौनरूपें ॥२॥ वैजयंतीमाळ किरीट कुंडलें। निढळ शोभलें केशरानें ॥ ३॥ कांसे पितांबर दिसे सोनसळा। पदक आणि माळा कौस्तुभ ते ॥ ४॥ चरणींचा तोडर एकाजनार्दन। करीत स्तवन भक्तिभावें ॥ ५॥

## श्रीसेनामहाराज

२०४९ धन्य महाराज पुंडलीक मुनी। वैकुंठींचा सखा आणिला

भूतळा लागोनी ॥ १ ॥ केला उपकार जग तारिलें सकळ । निरसली भ्रांति माउली स्नेहाळ ॥ २ ॥ आली चंद्रभागा गर्जना करीत । तुझिया भेटीलागी उतावीळ धांवत ॥ ३ ॥ जोडोनियां पाणी सेना करी विनवणी । म्हणें धन्य पुंडलीका माथा ठेविला चरणीं ॥ ४ ॥

### श्रीचोखामहाराज

२०५० आपणचि नटलें रूप । भक्तासमीप राहिले ॥ १ ॥ ऐसें ध्यान गोजिरें विटे । उभेंचि नेहटें देखिलें ॥ २ ॥ कर मिरवले कटावरी । तो हा वैकुंठीचा हरी ॥ ३ ॥ चोखा म्हणे श्रीमुख । पाहतां हरपे ताहान भूक ॥ ४ ॥

---

## अद्वैतपर

### श्रीतुकाराममहाराज

२०५१ हरिः ॐतत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥ १ ॥ हरिः ॐसहित उदित अनुदित । प्रचुरीश्वरासहित पांडुरंग ॥ २ ॥ गोब्राह्मणाहिता होऊनि निराळे । वेदाचें तें मूळ तुका म्हणे ॥ ३ ॥

२०५२ जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांडभूषणु नारायण ॥ १ ॥ सुखाचा सांगात अंतकासी अंत । निजांचा निवांत नारायण ॥ २ ॥ गोडांचेही गोड हर्षाचेंही कोड । प्रीतीचाही लाड नारायण ॥ ३ ॥ भावाचा निजभाव नांवाचाहि नांव । अवघा पंढरीराव अवतरलासे ॥ ४ ॥ तुका म्हणे जें हें सारांचें हें सार । माझा अंगिकार तेणें केला ॥ ५ ॥

२०५३ जयापासोनि सकळ । महीमंडळ जालें ॥ १ ॥ तो एक

पंढरीचा राणा। नये अनुमाना श्रुतिसी ॥ २ ॥ विवादती जयासाठीं। जगजेठी तो विठ्ठल ॥ ३ ॥ तुका म्हणे तो आकळ। आहे सकळ व्यापक ॥ ४ ॥

२०५४ अंत हरि बाहेर हरी। हरिनें घरीं कोंडिलें ॥ १ ॥ हरिनें कामा घातला चिरा। चित्तवरा मुकाविलें ॥ २ ॥ हरिनें जीवें केली साटी। पाडिली तुटी सकळांसी ॥ ३ ॥ तुका म्हणे वेगळा नव्हे। हरि भोंवे भोंवताला ॥ ४ ॥

२०५५ ब्रह्म न लिंपे त्या मेळें। कर्मा अकर्मा वेगळें ॥ १ ॥ तो मी एक तया जाणें। पावे अनुभविलें खुणें ॥ २ ॥ शौच अशौचाचे संधी। तन आळा तनामधीं ॥ ३ ॥ पापपुण्या नाहीं ठाव। तुका म्हणे सहज भाव ॥ ४ ॥

२०५६ लक्षूनियां योगी पाहाती आभास। तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥ १ ॥ कर दोनी कटीं राहिलासे उभा। सांवळी हे प्रभा अंगकांति ॥ २ ॥ व्यापुनी वेगळें राहिलेंसें दूरी। सकळां अंतरीं निर्विकार ॥ ३ ॥ रूप नाहीं रेखा नामही जयासी। आपुल्या मानसीं शिव ध्याये ॥ ४ ॥ अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार। कुळ याती शिर हस्त पाद ॥ ५ ॥ अचेत चेतलें भक्तिचियां सुखें। आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥ ६ ॥

२०५७ तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मति। राहिल्या त्या श्रुति मौनपणें ॥ १ ॥ मौनपणें वाचा थोटावल्या चारी। ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ २ ॥ रूप तुझें ऐसें डोळां न देखवे। जेथें हें झकवे ब्रह्मादिक ॥ ३ ॥ ब्रह्मादिकां देवां कर्माची कचाटी। म्हणोनी आटाटी फार त्यांसी ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझे गुण नाम रूप। आहेसी अमूप वाणूं काइ ॥ ५ ॥

२०५८ तुज वर्णी ऐसा तुजवीण नाहीं। दुजा कोणीं तीहीं त्रिभुवनीं ॥ १ ॥ सहस्रमुखें शेष शिणला बापुडा। चिरलीया धडा जिव्हा

त्याच्या ॥ २ ॥ अव्यक्ता अलक्षा अपारा अनंता । निर्गुणा सच्चिदानंदा नारायणा ॥ ३ ॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा । होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥ तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

२०५९ स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥ परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छितसे ॥ २ ॥ रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडेंही ॥ ३ ॥ तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ॥ ४ ॥

२०६० ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन पडे ॥ १ ॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुती ॥ २ ॥ सिणलीं सहस्त्र तोंडें । शेषफणी ऐसीं धेंडें ॥ ३ ॥ तुका म्हणे महिपत्र । सिंधु न पुरे शाई ॥ ४ ॥

२०६१ आवडीसारीखें संपादिलें सोंग । अनंत हें मग जालें नाम ॥ १ ॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाही साक्षी ॥ २ ॥ हातें जेवी एक मुखीं मागे घांस । माउली तयास तैसी बाळा ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी । तैसीच गोजिरी दिसे मूर्ती ॥ ४ ॥

२०६२ जाणोनी नेणतें करी माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥ मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेंवीं जळा आंत पद्मपत्र ॥ २ ॥ ऐकोनी नाइकें निंदास्तुती कानी । जैसा कां उन्मनी योगीराज ॥ ३ ॥ देखोनी न देखे प्रपंच हा दृष्टि । स्वप्निंचिया सृष्टि चेविल्या जेवीं ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तें तें सीण वाटतसे ॥ ५ ॥

२०६३ उपाधिवेगळे तुम्ही निर्विकार । कांहींच संसार तुम्हां नाहीं ॥ १ ॥ ऐसें मज करूनी ठेवा नारायणा । समूळ वासना नुर-

वावी ॥ २ ॥ निसंग तुम्हांसी राहाणें एकट । नाहीं कटकट साहों येत ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्फटिकाची ॥ ४ ॥

२०६४ गायनाचे रंगीं । शक्ति अद्भुत हे अंगीं ॥ १ ॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडीत सेवा ॥ २ ॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । प्रेम अमृताची खाणी ॥ ४ ॥

२०६५ आम्ही जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥ १ ॥ संपादिलें बहुरूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आम्ही आप । आपणासी देखिलें ॥ २ ॥ एके ठाईं घरिंच्याघरीं । न कळतां झाली चोरी । तेथें तेंचि दूरी । जाणें येणें खुंटलें ॥ ३ ॥ तुका म्हणे धरूनि हातीं । उरी ठेविली मागुती । एकांतिं लोकांतीं । देवभक्त सोहळा ॥ ४ ॥

२०६६ भोगावरी आम्ही घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । कशासाठीं बळा येऊं आतां ॥ २ ॥ काय सारूनीयां काढावें बाहेरी । आणूनि भीतरीं काय ठेवूं ॥ ३ ॥ केला तरी उरे वादचि कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वपनींची ॥ ४ ॥ अवघेचि वाण आले तुम्हां घरा । मजुरी मजुरा रोज कीर्दी ॥ ५ ॥ तुका म्हणे कांहीं नेणे लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥ ६ ॥

२०६७ तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥ १ ॥ तैसें तुम्हां आम्हां झालें । एकीं एक सामावलें ॥ २ ॥ उदकावरी तरंग । तरंग उदकाचें अंग ॥ ३ ॥ तुका म्हणे बिंबछाया । ठायीं पावली विलया ॥ ४ ॥

२०६८ क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणचि खेळे आपणाशीं ॥ १ ॥ मधील ते वाव अवघी उपाधि । तुम्हांआम्हांमधीं तेचि परी ॥ २ ॥ घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेचि तुटी तेथेंचि तें

॥ ३ ॥ तुका ह्मणे बीजें बीज दाखविलें। फळ पुष्प आलें गेलें वायां ॥ ४ ॥

२०६९ दूरी तोंचि होतों आपुले आशंके। नव्हतें ठाउकें मूळ भेद ॥ १ ॥ आतां जेथें तेथें येईन सांगातें। लपायापुरतें उरों नेदी ॥ २ ॥ मिथ्या मोहें मज लाविला उशीर। तरी हें अंतर झालें होतें ॥ ३ ॥ तुका म्हणे कां रे दाखविसी भिन्न। लटिकाचि सीण लपंडाई ॥ ४ ॥

२०७० तुज मज नाहीं भेद। केला सहज विनोद ॥ १ ॥ तूं माझा आकार। मी तों तूंच निर्धार ॥ २ ॥ मी तुजमाजीं देवा। घेसी माझ्या अंगें सेवा ॥ ३ ॥ मी तुजमाजी अचळ। मजमाजी तूं सबळ ॥ ४ ॥ तूं बोलसी माझ्या मुखें। मी तों तुजमाजीं सुखें ॥ ५ ॥ तुका म्हणे देवा। विपरीत ठायीं नांवा ॥ ६ ॥

२०७१ तुज मज ऐशी परी। जैसे तरंग सागरीं ॥ १ ॥ दोहींमाजीं एक जाणा। विठ्ठल पंढरीचा राणा ॥ २ ॥ देव भक्त ऐसी बोली। जंव भ्रांति नाहीं गेली ॥ ३ ॥ तंतु पट जेवीं एक। तुका विश्वेंसी व्यापक ॥ ४ ॥

२०७२ जें जें कांहीं करितों देवा। तें तें सेवा समर्पे ॥ १ ॥ भेद नाहीं सर्वात्मना। नारायणा तुज मज ॥२॥ आम्ही दुजें नेणों कोणा। हेंचि मना मन साक्ष ॥ ३ ॥ तुका म्हणे जगन्नाथा। हें अन्यथा नव्हे कीं ॥ ४ ॥

२०७३ रज्जु धरोनियां हातीं। भेडसाविलीं नेणतीं। कळों येतां चित्तीं। दोरी दोघां सारिखी॥१॥ तुम्हां आम्हां मध्यें हरी। झाली होती तैसी परी। मृगजळाच्या पुरीं। ठाव पाहों तरावया ॥ २ ॥ सरी चिताक भोंवरी। अळंकाराचिया परी। नामें जालीं दुरी। एक सोनें आटितां ॥ ३ ॥ पिसांचीं पारवीं। करोनि बाजागिरी दावी। तुका म्हणे तेवीं। मज नको चाळवूं ॥ ४ ॥

२०७४ खडा खाळी साखर । झाला नामाचाची फेर । न दिसे अंतर । गोडी ठायीं निवडीतां ॥ १ ॥ तुम्हीं आम्ही पांडुरंगा । भिन्न ऐसें काय सांगा । चाळविलें जगा । मी हें माझें यासाठीं ॥ २ ॥ पायीं हातीं नाकीं शिरीं । हेम राहे अळंकारीं । मुसे आल्यावरी । काय निवडे वेगळें ॥ ३ ॥ निजलिया लाभ हानी । तोंच खरी ते स्वप्नीं । तुका म्हणे दोन्ही । निवारलीं जागतां ॥ ४ ॥

२०७५ धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलीसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥ धन्य झालों आतां यासी संदेह नाहीं । न पडों या बाहीं काळा हातीं ॥ २ ॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगति । संतांचे संगतीं सर्वकाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे पोट धालेंचि न धाये । खादलेंचि खाये आवडीनें ॥ ४ ॥

२०७६ कासियानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडी आतां ॥ १ ॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूपचि तुझें । तेथें देवा माझें काय वेंचे ॥ २ ॥ गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय वाहूं ॥ ३ ॥ वाहूं दक्षिणा परी धातु नारायण । अन्न परब्रह्म दुजें नाहीं ॥ ४ ॥ गातां तो ओंकार टाळी नादेश्वर । नाचावया थार नाहीं कोठें ॥ ५ ॥ फळदाता तूंच तांबूल अक्षता । तेथें मी अनंता काय वाहूं ॥ ६ ॥ तुका म्हणे हरी अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरी ॥ ७ ॥

२०७७ कवणा पाषाणासी धरूनी भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ॥ १ ॥ म्हणऊनि निश्चित राहिलों मनीं । तूंचि सर्वां खाणीं देखोनियां ॥ २ ॥ कवणाचें कारण नलगेचि कांहीं । सर्वां सर्वां ठायीं तूं मज एक ॥ ३ ॥ काया वाचा मन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें कांहीं न दिसे देवा ॥ ४ ॥ जळें जळ काय धोवियेलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ॥ ५ ॥ पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिलो ॥ ६ ॥ पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अप-

सव्य ॥ ७ ॥ तुका म्हणे जीत पिंड तुम्हां हातीं । देऊनि निश्चिती मानियेली ॥ ८ ॥

२०७८ जन्ममरणाची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप ॥ १ ॥ होतील ते डोळां पाहीन प्रकार । भय आणि भार निरसलीं ॥ २ ॥ लिगाडाचें मूळ होतीं पंचभूतें । त्यांचें त्यापुरतें विभागिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे झाला प्रपंच पारिखा । जीवासी तूं सखा पांडुरंग ॥ ४ ॥

२०७९ वंदिन मी भूतें । आतां अवघींची समस्तें ॥ १ ॥ तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥ २ ॥ गाळूनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ ३ ॥ तुका म्हणे मग । नव्हे दुजयाचा संग ॥ ४ ॥

२०८० जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहसी ॥ १ ॥ ऐसा पसरीन भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥ २ ॥ चित्त जडलें पायीं । पाळती हे ठायीं ठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे पोटीं । देव घालूनी सांगे गोष्टी ॥ ४ ॥

२०८१ आम्ही न देखों अवगुणां । पापी पवित्र शाहाणा ॥ १ ॥ अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ २ ॥ मज भक्तिसवें चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥ ३ ॥ तुका म्हणे पोटीं । विष अमृत तुजसाठीं ॥ ४ ॥

२०८२ तुज करितां होती ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥ परी हें वर्म नेणती कोणी । पीडाखाणी भोगितील ॥ २ ॥ उल्लंघितें पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥ ३ ॥ पापी होय पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥ ४ ॥ अवघें हेळामात्रें हरी । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ५ ॥ तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापूनी ॥ ६ ॥

२०८३ अंतराय पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तोचि बाधी ॥ १ ॥ बैसलीये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥ २ ॥ अखंड तें खंडे संकल्पी विकल्प । मनोजन्य पाप

रज्जुसर्प ॥ ३ ॥ तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे । राहो ऐसे दशे सुखरूप ॥ ४ ॥

२०८४ बोळविला देह आपुलेनी हातें । हुताशिलीं भूतें ब्रह्माग्निसी ॥ १ ॥ एक वेळ झालें सकळ कारण । आतां नारायण नारायण ॥ २ ॥ अमृतसंजिवनी निववीली खाई । अंगें तये ठायीं हारपलीं ॥ ३ ॥ एकादशीवीण जागरण उपवास । बारावा दिवस भोजनाचा ॥ ४ ॥ अवघीं कर्में झालीं घटस्पोटापाशीं । संबंध एकेसीं उरला नामीं ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां आनंदी आनंदु । गोविंदीं गोविंदु विस्तारला ॥ ६ ॥

२०८५ जेथें देखे तेथें उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ डोळां बैसलें बैसलें । ध्यान राहोनी संचलें ॥ २ ॥ सरसावलें मन । केले सोज्वळ लोचन ॥ ३ ॥ तुका म्हणे सवें । आतां असिजेत देवें ॥ ४ ॥

२०८६ हेची तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥ १ ॥ अवघीं तुझींच पदें । नमस्कारीन अभेदें ॥ २ ॥ न वर्जित दिशा । जाय तेथेंचि सरीसा ॥ ३ ॥ नव्हे एकदेशी । तुका म्हणे संकल्पेंसीं ॥ ४ ॥

२०८७ एक वेळे केलें रितें कलिवर । आंत दिली थार पांडुरंगा ॥ १ ॥ पाळण पोषण लागलें तें सोई । देहाचें तें कांई सर्वभाव ॥ २ ॥ माझिया मरणें झाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाश ॥ ३ ॥ झाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका म्हणे कांहीं बोलों नये ॥ ४ ॥

२०८८ तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥ आम्हां अंधां तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥ २ ॥ मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ ३ ॥ पापपुण्य भेद नासिलें तिमिर । त्रिगुण शरीर सांडियेलें ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणें दातारा शरणागत ॥ ५ ॥

२०८९ जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं

धरोनियां ॥ १ ॥ चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥ बोलों जातां बरळ करीसी तें नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥ अवघे जन मज झाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । जालें तुझें सुख अंतर्बाहीं ॥ ५ ॥

२०९० तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हां भिन्न पासूनी ॥ १ ॥ आतां बोलों नये ऐसें । अनारिसें वेगळें ॥ २ ॥ सन्मुख झालों स्वामीकडे । भव ओंठडे निराळे ॥ ३ ॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥ ४ ॥ सहजस्थिती आहे अंगीं । प्रसंगीं तें वंचेना ॥ ५ ॥ तुमची देवा धरिली कास । केला नाश प्रपंचा ॥ ६ ॥ तुका म्हणे जाणोनि वर्म । कर्माकर्म ठेविलीं ॥ ७ ॥

२०९१ देव सखा आतां केलें नव्हे काई । येणें सकळही सोइरींच ॥ १ ॥ भाग्यवंत झालों गोतें सपुरतीं । आतां पुण्या मिती पार नाहीं ॥ २ ॥ पाहतां दिसलीं भरलीया दिशा । ठसावला ठसा लोकत्रयीं ॥ ३ ॥ अविनाश जोडी आम्हा भाग्यवंतां । जाली होती सत्ता संचिताची ॥ ४ ॥ पायांवरी डोई ठेवाया आरोथा । जाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ॥ ५ ॥ तुका म्हणे जीव पावला विसांवा । म्हणवितां देवा तुमचींसीं ॥ ६ ॥

२०९२ तेणें सुखें माझें निवालें हें अंग । विठ्ठल हें जग देखियेलें ॥ १ ॥ कवतुकें करुणा भाकीतसें लाडें । आवडी बोबडें बोलोनियां ॥ २ ॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची । भावना भेदाची समूळ गेली ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख झालें माझ्या जीवा । रंगलें केशवा तुझ्या रंगें ॥ ४ ॥

२०९४ मज नाहीं कोणी उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडांत ॥ १ ॥ कासया जिकीर करणें येविसीं । भयची मानसीं चिंता खंती ॥ २ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । संत नेती चाली आपुलीया

॥ ३ ॥ तुका म्हणे माझें पाळण पोषण । करितां आपण पांडुरंगा ॥ ४ ॥

२०९४ पंचभूतांचिये सांपडलों संदीं । घातलोंसे बंदीं अहंकारें ॥ १ ॥ आपला आपण बांधविला गळा । नेणेंचि निराळा असतांही ॥ २ ॥ कासया हा सत्य मानिला संसार । कां हे केले चार माझें माझें ॥ ३ ॥ कां नाहीं शरण गेलों नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥ ४ ॥ किंचित सुखाचा धरीला अभिलाष । तेणें केला नास बहु पुढें ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करूनि सांडूं होळी संचिताची ॥ ६ ॥

२०९५ स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावोनियां ॥ १ ॥ पुंजाळले नेत्र झाले अर्धोन्मीळित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥ २ ॥ चित्त चाकाटलें स्वरूपामाझारीं । न निघे बाहेरी सुखावलों ॥ ३ ॥ सुनीळ प्रकाश उदेजला दीन । अमृताचें पान जीवनकळा ॥ ४ ॥ शशिसूर्या झाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥ ५ ॥ तुका ह्मणे सुखें प्रेमेसी डुलत । विरालों निश्चित निश्चितीनें ॥ ६ ॥

२०९६ देवासी लागे सकळांसी पोसावें । आम्हां न लगे खावें काय चिंता ॥ १ ॥ देवा विचारावें लागे पापपुण्य । आह्मांसी हें जन अवघें भलें ॥ २ ॥ देवासी उत्पत्ति लागला संहार । आह्मां नाहीं फार थोडें कांहीं ॥ ३ ॥ देवासी काम लागला धंदा । आम्हांसी ते सदा रिकामीक ॥ ४ ॥ तुका ह्मणे आम्ही भले देवाहून । विचारीतां गुण सर्वभावें ॥ ५ ॥

२०९७ आतां मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ । यातिहीन कुळ दैन्यवाणा ॥ १ ॥ माय रखुमाबाई पांडुरंग पिता । शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ॥ २ ॥ बापुडा मी नव्हे दुर्बळ ठेंगणा । पांगिला हा कोणा आणिकांसी ॥ ३ ॥ दुष्ट नव्हों आम्ही अभागी अनाथ । आमुचा समर्थ कैवारी हा ॥ ४ ॥ संवसार आम्हां सरला सकळ । लपोनियां

काळ ठेला धाकें ॥ ५ ॥ तुका म्हणे झालों निर्भर मानसीं । जोड-लीया राशी सुखाचिया ॥ ६ ॥

२०९८ माझे मनोरथ पावविले जें सिद्धी । तईं पायीं बुद्धि स्थिरावली ॥ १ ॥ समाधान जीव राहिला निश्चळ । गेली हळहळ स्मरणें हे ॥ २ ॥ त्रिविध तापाचें जालेंसे दहन । सुखावलें मन प्रेमसुखें ॥ ३ ॥ महालाभ वाचे वसे पांडुरंग । अंगाअंगीं संग अखंडित ॥ ४ ॥ जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावलें ॥ ५ ॥ तुका म्हणे माप भरीं आलें सिगे । धारबोळ गंगे पूर वाहे ॥ ६ ॥

२०९९ स्वप्नींचिया गोष्टी । मज धरीलें होतें वेठी । जालीया सेवटीं । जागे लटिकें सकळ ॥ १ ॥ वायां भाकिली करुणा । मूळ पावावया सिणा । राव रंक राणा । कैंचें स्थानावरी आहे ॥ २ ॥ सोशिलें तें अंगें । खरें होतें नव्हतां जागें । अनुभवही सांगें । दुःखें डोळे उघडीले ॥ ३ ॥ तुका म्हणे संतीं । सावचित केलें अंतीं । नाहीं तरी होती । टाळी बैसोनि राहिली ॥ ४ ॥

२१०० पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धि भेद ॥ १ ॥ जीव शिवा शेज रचिली आनंदें । आउठावे पदीं आरोहण ॥ २ ॥ निजीं निजरुपीं निजविला तुका । अनुहतें बाळका हल्लरु गाती ॥ ३ ॥

२१०१ रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ १ ॥ तेणें अंजनगुणें दिव्य दृष्टि जाली । कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥ २ ॥ देश काल वस्तु भेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ॥ ३ ॥ न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहं सोहंब्रह्म आकळीलें ॥ ४ ॥ तत्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेंचि झाला अंगें तुका आतां ॥ ५ ॥

२१०२ बीज भाजुनी केली लाही । आम्हां जन्ममरण नाहीं

॥ १ ॥ आकारासी केंचा ठाव । देह प्रत्यक्ष झाला देव ॥ २ ॥ साकरेचा नव्हे ऊंस । आम्हां केंचा गर्भवास ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघा जाग । सर्वांघटीं पांडुरंग ॥ ४ ॥

२१०३ भोगीं झाला त्याग । गीतीं गातां पांडुरंग । इंद्रियांचा लाग । आम्हांवरूनी चुकला ॥ १ ॥ करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ । घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥२॥ तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंची चारा धरी । आणुनीयां घरीं । मुखीं घाली बाळका ॥ ३ ॥ तुका म्हणे ये आवडी । आम्हीं पायीं दिली बुडी । आहे तेथें जोडी । जन्मांतरींचें ठेवणें ॥ ४ ॥

२१०४ आम्ही मेलों तेव्हां देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥१॥ सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा तो पुतळा नाचे छंदें ॥ २ ॥ बोलतसें जैसें बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥ ३ ॥ पाप पुण्य ज्याचें तोची जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आम्हांसवें ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्ही आइका हो मात । आम्ही या अतीत देहाहूनी ॥ ५ ॥

२१०५ आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥ आनंदें दाटलीं तिन्ही त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥ २ ॥ एकदेशी होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥ ३ ॥ फिटलें सुतक जन्ममरणाचें । मी माझ्या संकोचें दुरी जालों ॥ ४ ॥ नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥ तुका म्हणे दिलें उमटूनी जगीं । घेतलें तें अंगीं लावूनीयां ॥ ६ ॥

२१०६ मरण माझें मरोनि गेलें । मज केलें अमर ॥ १ ॥ ठाव पुसिलें बुड पुसिलें । वोस वोसलें देहभावा ॥ २ ॥ आला होता गेला पूर । धरिला धीर जीवनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बुनादीचें । जालें साचें उजवणें ॥ ४ ॥

२१०७ मरणा हातीं सुटली काया । विचारें या निश्चयें ॥ १ ॥ नासोनियां गेली खंती । सहजस्थिती भोगाचे ॥ २ ॥ न देखेसें जालें श्रम । आलें वर्म हाता हें ॥ ३ ॥ तुका म्हणे कैंची कींव । कोठें जीव निराळा ॥ ४ ॥

२१०८ झाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानीचा ॥ १ ॥ रडती रात्र दिवस काम क्रोध माया । म्हणती हायहाया यमधर्म ॥ २ ॥ वैराग्याच्या शेणी लागल्या शरीरा । ज्ञानाग्नि लागला ब्रह्मत्वेंसी ॥ ३ ॥ फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्य ध्वनीं बोंब जाली ॥ ४ ॥ दिली तिळांजुळी कुळनामरूपासी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ॥ ५ ॥ तुका म्हणे रक्षा झाली आपीं आप । उजळला दीप गुरुकृपा ॥ ६ ॥

२१०९ संचित प्रारब्ध क्रियामाण । अवघा झाला नारायण ॥ १ ॥ नाहीं आम्हांसी संबंधु । जरा मरण कांहीं बाधु ॥ २ ॥ द्वैताद्वैत भावें । अवघें व्यापियेलें देवें ॥ ३ ॥ तुका म्हणे हरी । आम्हांमाजीं क्रिडा करी ॥ ४ ॥

२११० पिंडदान पिंडें ठेविलें करून । तिळीं तिळवण मूळत्रयीं ॥ १ ॥ सारिले संकल्प एकाचि वचनें । ब्रह्मीं ब्रह्मार्पण शेवटींच्या ॥ २ ॥ सव्य अपसव्य बुडालें हें कर्म । एका एक वर्म एकोविष्णु ॥ ३ ॥ पित्या पुत्रत्वाचें जालें अवसान । जनीं जनार्दन अभेदेंसी ॥ ४ ॥ आहे तैसी पूजा पावली सकळ । सहज तो काळ साधियेला ॥ ५ ॥ तुका म्हणे केला अवघ्यांचा उद्धार । आतां नमस्कार शेवटींचा ॥ ६ ॥

२१११ नभोमय जालें जळ । एकीं सकळ हरपलें ॥ १ ॥ आतां काय सारासारी । त्याच्या लहरी तयांत ॥ २ ॥ कैंचा तेथें यावा सांडी । आप कोंडी आपणा ॥ ३ ॥ तुका म्हणे कल्प झाला । अस्त गेला उदय ॥ ४ ॥

२११२ विषयीं विसर पडिला निःशेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥ १ ॥ माझी मज झाली अनावर वाचा। छंद या नामाचा घेतलासे ॥ २ ॥ लाभाचिया सोसें पुढें चाली मना। धनाचा कृपणा लोभ जैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे गंगासागरसंगमीं। अवघ्या झाल्या उर्मी एकमय ॥ ४ ॥

२११३ घटीं अलिप्त असे रवि। अग्नि काष्ठामाजीं जेवीं। तैसा नारायण जीवीं। जीव साक्षी वर्तनें ॥ १ ॥ भोग ज्याचे तया अंगीं। भिन्न प्रारब्ध जगीं। विचित्र ये रंगीं। रंगीं रंगला गोसावी ॥ २ ॥ देह संकल्पासारिखें। एक एकांसी पारिखें। सुख आणि दुःखें। अंगीं कर्मं विविध ॥ ३ ॥ तुका म्हणे कोडें। न कळे तयासी सांकडें। त्याचिया निवाडें। उगवे केलें विंदान ॥ ४ ॥

२११४ आम्ही क्षेत्रींचे संन्यासी। देहभरीत हृषिकेशी। नाहीं केली ऐसी। आशा काम बोहरी ॥ १ ॥ आलें अयाचित अंगा। सहज तें आम्हा भागा। दाता पांडुरंगा। ऐसी करितां निश्चिंती ॥२॥ दंड धरिला दंडायमान। मुळीं मुंडिलें मुंडण। वंदीं वंद कौपीन। बहिरवास ओढडें ॥ ३ ॥ काळें साधियेला काळ। मन करूनि निश्चळ। लोकिकीं विटाळ। धरूनि असों एकांता ॥ ४ ॥ कार्यकारणाची चाली। वाचा वाचत्वें नेमिली। एका नेमें चाली। स्वरूपींच राहाणें ॥ ५ ॥ नव्हे वेषधारी। तुका आहाच वरवरी। आहे तैसीं बरीं। खंडे ओळखी वेदांचीं ॥ ६ ॥

२११५ यज्ञ भूतांच्या पाळणा। भेद कार्या कारणा। पावावया उपसना। ब्रह्मस्थानीं प्रस्थान ॥ १ ॥ एकपरी पडिलें भागीं। फळ बीजाचिये अंगीं। धन्य तोचि जगीं। आदि अंत सांभाळी ॥ २ ॥ आवश्यक तो शेवट। मागें अवघी खटपट। चालों जाणे वाट। ऐसा विरळा एखादा ॥ ३ ॥ तुका होऊनि निराळा। क्षरा अक्षरा वेगळा। पाहे निगमकळा। बोले विठ्ठलप्रसादें ॥ ४ ॥

२११६ हरिनें माझें हरिलें चित्त । भार वित्त विसरलें ॥ १ ॥ आतां कैसी जाऊं घरा । नव्हे बरा लौकिक ॥ २ ॥ पारखियांसी सांगतां गोष्टी । घरची कुटी खातील ॥ ३ ॥ तुका म्हणे निवांत राहीं । पाहिलें पाहीं परतोनी ॥ ४ ॥

२११७ उपाधीच्या नांवें घेतला सिंतोडा । नेदूं आतां पीडा आतळों ते ॥ १ ॥ काशासाठीं हात भरूनि धुवावे । चालतिया गोवें मारगासी ॥ २ ॥ काय नाहीं देवें करूनि ठेविलें । असे तें आपुलें ते ते ठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविलें ॥ ४ ॥

२११८ मायबापाचिये भेटी । अवघ्या तुटी संकोचा ॥ १ ॥ भोगिलें तें आहे सुख । खातां मुख मोकळें ॥ २ ॥ उत्तम बाळासाठीं । लावी ओठीं माउली ॥ ३ ॥ तुका म्हणे झाली धणी । आनंद मनीं न समाये ॥ ४ ॥

२११९ ध्यानीं ध्यातां पंढरीराया । मनासहित पालटे काया ॥ १ ॥ तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण झाला हरी ॥ २ ॥ चित्त चैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरीरूप अवघी सृष्टि ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगों काय । एकाएकीं हरिवृत्तिमय ॥ ४ ॥

२१२० विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा सार ॥ १ ॥ जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥ २ ॥ व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ ३ ॥ जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥ ४ ॥ सूर्याचियापरी । तुका लोकीं क्रिडा करी ॥ ५ ॥

२१२१ प्रवृत्तिनिवृत्तीचे आटुनियां भाग । उतरिलें चांग रसायण ॥ १ ॥ ज्ञानाग्नि हुताशीं कडाशिले वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनीयां ॥ २ ॥ ब्रह्मीं ब्रह्मरस शीघ्र झाला पाक । घेतला रुचीक प्रतीतीसुखें ॥ ३ ॥ स्वानुभवें अंगीं झाला समरस । साधनीं निजध्यास

आसोआसीं ॥ ४ ॥ आरोग्यता तुका पावला अंगांगीं । मिरविला रंगीं निजात्मरंगें ॥ ५ ॥

२१२२ आनंदाचे डोहीं आनंद तरंग । आनंदचि अंग आनंदाचें ॥ १ ॥ काय सांगों झालें कांहींचिया बाहीं । पुढें चाली नाहीं आवडीनें ॥ २ ॥ गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव सरिसा मुखा आला ॥ ४ ॥

२१२३ हेचि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥ १ ॥ सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या तहान भूक जाय ॥ २ ॥ दुरील जवळी आपणाचि होतें । कवळीलें चित्तें जिवनासी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम घेतां वेळोवेळां । होतील सकळा शीतळा नाडी ॥ ४ ॥

२१२४ वेद जया गाती । आम्हां तयाची संगति ॥ १ ॥ नाम धरियेलें कंठीं । अवघा सांठविला पोटीं ॥ २ ॥ ओंकाराचें बीज । हातीं आमुचे तें निज ॥ ३ ॥ तुका म्हणे बहु मोठें । अणुरेणुयां धाकुटें ॥ ४ ॥

२१२५ प्रेम अमृतें रसना ओलावली । मनाची राहिली वृत्ती पायीं ॥ १ ॥ सकळही तेथें वोळलीं मंगळें । वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ २ ॥ सकळ इंद्रियें झालीं ब्रम्हरूप । ओतलें स्वरूप माजी तया ॥ ३ ॥ तुका म्हणे जेथें वसे भक्तराव । तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ४ ॥

२१२६ आमुचे जीवन हें कथाअमृत । आणीकही संतसमागम ॥ १ ॥ सारूं एके ठायीं भोजन परवडी । स्वादरसें गोडी पदोपदीं ॥ २ ॥ धालिया ढेकर येती आनंदाचे । वोसंडलें वाचें प्रेमसुख ॥ ३ ॥ पिकलें स्वरूप आलिया घुमरी । रासी ते अंबरी न समाये ॥ ४ ॥ मोजितां तयाचा अंत नाहीं पार । खुंटला व्यापार तुका म्हणे ॥ ५ ॥

२१२७ समर्पिली वाणी । पांडुरंगीं घेते घणी ॥ १ ॥ पूजा होते मुक्ताफळीं । रस ओविया मंगळी ॥ २ ॥ धार अखंडीत । ओघ चालीयेला नित्य ॥ ३ ॥ पूर्णाहुति जीवें । तुका घेउनी ठेला भावें ॥ ४ ॥

२१२८ भक्तिचिया पोटीं रत्नाचिया खाणीं । ब्रह्मींची ठेवणी सकळ वस्तु ॥ १ ॥ माउलीचे मागें बाळकाची हारी । एक सूत्रें दोरी ओढीतसे ॥ २ ॥ जेथील जें मागें तें रायासमोर । नाहींसें उत्तर येत नाहीं ॥ ३ ॥ सेवेचिये सत्ते धनीच सेवक । आपुलें ते एक न वंची कांहीं ॥ ४ ॥ आदि अंता ठाव असे मध्यभाग । भोंवते भासे मग उंचासन ॥ ५ ॥ भावारूढ तुका झाला एकाएकीं । देवच लौकीकीं अवघा केला ॥ ६ ॥

२१२९ देव आड झाला । तो भोगिता मी उगला । अवघा निवारीला । शीण शुभ अशुभाचा ॥ १ ॥ जीव शिवाचें भातुकें । केलें क्रिडाया कौतुकें । कैंचीं येथें लोकें । हा आभास अनित्य ॥ २ ॥ विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिलें विभाग । वर्ण धर्म हा खेळ ॥ ३ ॥ अवघी एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न । वेद पुरुष नारायण । तेणें केला निवाडा ॥ ४ ॥ प्रसादाचा रस । तुका लाधला सौरस । पायांपाशीं वास । निकट नव्हे निराळा ॥ ५ ॥

२१३० ब्रह्मरसगोडी तयांसी फावली । वासना निमाली सकळ ज्यांची ॥ १ ॥ नाहीं त्यां विटाळ अखंड सोंवळीं । उपाधिवेगळीं जाणिवेच्या ॥ २ ॥ मन हें निश्चळ झालें एके ठायीं । तया उणें काई निजसुखा ॥ ३ ॥ तींचि पुण्यवंतें परउपकारी । प्रबोधी त्या नारी नर लोकां ॥ ४ ॥ तुका म्हणे त्यांचे पायीं पायपोस । होऊनीया वास करीन तेथें ॥ ५ ॥

२१३१ तोच हीं क्षुलकें सखीं सहोदरें । नाहीं विश्वंभरें वोळखी

तो ॥ १ ॥ नारायण विश्वंभर विश्वपिता । प्रमाण तो होतां सकळ मिथ्या ॥ २ ॥ रवि नुगवे तों दीपकांचे काज । प्रकाशें ते तेज सहज लोपे ॥ ३ ॥ तुका म्हणे देहासंबंध संचितें । कारण निरुतें नारायणीं ॥ ४ ॥

२१३२ उंबरांतील किटका । हेंचि ब्रह्मांड ऐसें लेखा ॥ १ ॥ ऐसीं उंबरें किती झाडीं । ऐशीं झाडें किती नवखंडीं ॥ २ ॥ हेंचि ब्रह्मांड आम्हांसी । ऐसीं अगणित अंडें कैसीं ॥ ३ ॥ विराटाचें अंगीं तैसे । मोजूं जातां अगणित केश ॥ ४ ॥ ऐसा विराटाच्या कोटी । सांठवल्या ज्याच्या पोटीं ॥ ५ ॥ तो हा नंदाचा बाळमुकुंद । तान्हा म्हणवी परमानंद ॥ ६ ॥ ऐसा अगम्य ईश्वरी लीळा । ब्रह्मानंदीं गम्य तुक्याला ॥ ७ ॥

२१३३ पंचभूतांचा गोंधळ । केला एके ठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार त्या पाठीं ॥ १ ॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी हें ओझें । देहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥ २ ॥ जीव न देखे मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोगा शुभा अशुभा ॥ ३ ॥ इच्छा वाढवी ते वेल । खुंटावा तो खरा बोल । तुका म्हणे मोल । झांकले तें पावेल ॥ ४ ॥

२१३४ कासयाजी ऐसा माझे माथा ठेवा । भार तुम्ही देवा संतजन ॥ १ ॥ विचित्र विंदानीं नानाकळा खेळे । नाचवी पुतळे नारायण ॥ २ ॥ काय वानरांची अंगींची ते शक्ति । उदका तरती वरी शिळा ॥ ३ ॥ तुका म्हणे करी निमित्याचि आड । चेष्टवूनी जड दावी पुढें ॥ ४ ॥

२१३५ हेचि थोर भक्ति आवडते देवा । संकल्पावी माया संसाराची ॥ १ ॥ ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥२॥ वाहिल्या उद्वेग दुःखाचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥३॥ तुका म्हणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥

२१३६ आपुला तो एक देव करूनी घ्यावा। तेणेंवीण जीवा सुख नव्हे ॥ १ ॥ येर तीं माइकें दुःखाचीं जनितीं। नाहीं आदि अंतीं अवसान ॥ २ ॥ अविनाश करी आपुलीया ऐसें। लावीं मना पिसें गोविंदाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे एका मरणेंची सरे। उत्तमाचि उरे कीर्ति मागें ॥ ४ ॥

२१३७ चाले हें शरीर कोणाचिये सत्ते। कोण बोलवितें हरीवीण ॥ १ ॥ देखवी ऐकवी एक नारायण। तयाचें भजन चुको नका ॥ २ ॥ मानसाची देव चालवी अहंता। मीचि एक कर्ता म्हणोनियां ॥ ३ ॥ वृक्षाचेंही पान हाले त्याची सत्ता। राहीली अहंता मग कोठें ॥ ४ ॥ तुका म्हणे विठो भरला सबाहीं। तया उणें कांहीं चराचरीं ॥ ५ ॥

२१३८ न करीं रे संग राहे रे निश्चळ। लागों नेदी मळ ममतेचा ॥ १ ॥ या नांवें अद्वैत खरें ब्रम्हज्ञान। अनुभवावांचून वडबड ते ॥ २ ॥ इंद्रियांचा जय वासनेचा क्षय। संकल्पाही न ये वरी मन ॥३॥ तुका म्हणे नये जाणीव अंतरा। अंतरीं या थारा आनंदाचा ॥ ४ ॥

२१३९ भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग। ज्ञान ब्रम्हीं भोग ब्रम्हतनु ॥ १ ॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया। माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥ उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक। एकाविण एक कामा नये ॥ ३ ॥ तुका म्हणे मज कळते चांचणी। वडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ४ ॥

२१४० सहज पावतां भगवंतीं। परि हीं विकल्पें परतीं। फुकाची हे चित्तीं। आठवण कां न धरिती ॥ १ ॥ हरि व्यापक सर्वगत। हें तंव मुख्यत्वें वेदांत। चिंतनासी चित्त। असों द्यावें सावध ॥ २ ॥ विरजा होम याचि नांवें। देह नव्हे मी जाणावें। मग कां जी यावें। वरी लागे संकल्पा ॥ ३ ॥ कामक्रोधें देह माळिण। स्वाहाकारीं कैंचें पुण्य। मंत्रीं पूजियेला यज्ञ। मन मुंडण नव्होचि ॥ ४ ॥

अनन्य भक्तिचे उपाय । ते या विठोबाचे पाय । ध्याइल तो काय । जाणे चुकों मारग ॥ ५ ॥ आतां सांगे तुका । एक तुम्ही चुकों नका । सांडी मांडी धोका । शरण रिघतां गोमटें ॥ ६ ॥

२१४१ विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥ १ ॥ आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥ कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

२१४२ दुजें खंडे तरी । उरला तो अवघा हरी । आपणाबाहेरी । नलगे ठाव धुंडावा ॥ १ ॥ इतुलें जाणावया जाणा । कोणें तरी मनें मना । पारधीच्या खुणा । जाणतेंनि साधाव्या ॥ २ ॥ देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा । बुजगावणें चोरा । रक्षणसें भासतें ॥ ३ ॥ तुका करी जागा । नको चाचपूं वाउगा । आहेसि तूं अंगा । अंगीं डोळे उघडी ॥ ४ ॥

२१४३ योग तप याचि नांवें । गळित व्हावें अभिमानें ॥ १ ॥ करणें तें हेंचि करा । सत्यें बरा व्यापार ॥ २ ॥ तरी खंडे येरझार । निघे भार देहाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे मानामान । हें बंधन नसावें ॥४॥

२१४४ देह हा सादर पाहावा निश्चित । सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥ ब्रम्ह जें देखणें द्वैत जेव्हां गेलें । शरीर तें जालें ब्रह्मरूप ॥ २ ॥ यजन याजन तप व्रतें करितां । विकल्पें नागवती शुद्ध पुण्या ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व सुख एथें आहे । भ्रांति दूर पाहें टाकू-नियां ॥ ४ ॥

२१४५ जरी हा हो कृपा करील नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रम्ह होय ॥ १ ॥ कोठोनियां कांहीं नलगे आणावें । नलगे कोठें जावें तरा-वया ॥ २ ॥ जरी देव कांहीं धरील पैं चित्तीं । तरी हेचि होती दिव्य चक्षु ॥ ३ ॥ तुका म्हणे देव दावील आपणा । तरी जीवपणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

२१४६ ब्रम्ह स्वरूपाचीं कर्मे ब्रम्हरूप। विरहित संकल्प होती जाती ॥ १ ॥ ठेविलीया दिसे रंगा ऐसी शिळा। उपाधि निराळा स्फटिकमणी ॥ २ ॥ नाना भाषा मतें आळविती बाळा। प्रबोध तो मूळा जननी ठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें नमन जाणातियां। लागतसें पायां वेळोवेळां ॥ ४ ॥

२१४७ कुशल वक्ता नव्हे जाणीव श्रोता। राहे भाव चित्ता धरूनियां ॥ १ ॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं।। ब्रम्ह तया अंगी वसतसे ॥ २ ॥ न धोवी तोंड न करी आंघोळी। जपे सदा काळीं रामनाम ॥ ३ ॥ जप तप ध्यान नेणे योग युक्ति। कृपाळू जो भूतीं दयावंत ॥ ४ ॥ तुका म्हणे होय जाणोनि नेणता। आवडे अनंता जीवाहूनी ॥ ५ ॥

२१४८ मुक्त होता परी वळें झाला शद्ध। घेऊनियां छंद माझें माझें ॥ १ ॥ पापपुण्य अंगीं घेतलें जडून। वर्म नेणे कोण करीता तो ॥ २ ॥ तुका ह्मणे वायां गेलें वायांविण। मृग पावे शीण मृगजळीं ॥ ३ ॥

२१४९ येणें मार्गें आले। त्यांचें निसंतान केलें ॥ १ ॥ ऐसी अवघड वाट। ऐकोन आलों मी बोभाट ॥ २ ॥ नागविल्या धाटी। उरों नेदीच लंगोटी ॥ ३ ॥ तुका म्हणे चोर। तो हा उभा कटीं कर ॥ ४ ॥

२१५० अंतरींची ज्योती प्रकाशली दीप्ती। मुळींची जे होती आच्छादिली ॥ १ ॥ तेथींचा आनंद ब्रह्मांडीं न माये। उपमेसी काय देऊं सुखा ॥ २ ॥ भावाचें माथिलें निर्गुण संचलें। तें हें उभें केलें विटेवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां ब्रह्मांड पंढरी। प्रेमाची जे थोरी आठवण ॥ ४ ॥

२१५१ पूर्ण आत्मज्ञान अनुभव खूण। जेणें त्रिभुवन व्यापियेलें ॥ १ ॥ अणुरेणु पातीं ब्रह्मांडाच्या कोटी। ज्ञानाचिया पोटीं दिसे

जया ॥ २ ॥ ऐसी पवित्रता बोलतसे गीता । ज्ञाना त्या अनंता भेद नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्ञान तोचि नारायण । जाणती सज्ञान गुरुपुत्र ॥ ४ ॥

२१५२ प्रत्यक्ष हें ज्ञान उघडेंचि आहे । देव ज्ञाता नोहे अनुभव ॥ १ ॥ ज्ञानाचे प्रकाशें वर्तती सकळ । न घेती बरळ देहबुद्धी ॥ २ ॥ पुण्यवंत प्राणी गुरु अंजनीचें । हृदयीं तयाचें ज्ञान राहे ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्ञान विठ्ठलची पूर्ण । सर्व अणुरेणु वागवीत ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज.

२१५३ काय वर्णूं याचे गुण । ज्याचें त्रिभुवन रूपस ॥ १ ॥ चंद्र सूर्य तारांगण । दीप्ति हुताशना ज्याचेनी ॥ २ ॥ जेणें वाड केलें गगन । दिधलें आसन वसुंधरे ॥ ३ ॥ निळा म्हणे धरीला मेरु । भरिला सागरु दिव्य क्षीरें ॥ ४ ॥

२१५४ अंगकांती प्रकाशली । सूर्या दिधली किंचितसी ॥ १ ॥ तेणेंचि प्रकाशला भानू । झाला तो नयनु त्रैलोक्या ॥ २ ॥ तैसेंचि चंद्रा जीवनामृत । दिधलें किंचित् श्रीहरी ॥ ३ ॥ निळा म्हणे तेणेंचि जगें । निववीत अंगें मयंकु ॥ ४ ॥

२१५५ रसना एकी रस तो नाना । कैसी विवंचना रचिली हे ॥ १ ॥ न कळे लाघव तुमचें हरी । करितां भरोवरी जाणिवेच्या ॥ २ ॥ काय पिंजूनी मेघ पडळ । घडिलें ज्वाळ विजुवाचें ॥ ३ ॥ निळा म्हणे तडक भारी । फुटे अंबरीं कासियाचा ॥ ४ ॥

२१५६ जेणें मंथुनी क्षीरार्णव । काढिलीं अपूर्व दिव्य रत्नें ॥ १ ॥ त्याचा महिमा वर्णूं कैसा । भरोनि आकाशा कोंदला तो ॥ २ ॥ जेणें धरूनियां दांतीं । आणिली वसुमती समुद्रांतुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे जेणें भानु । ठेविला उट्टनु न मैळेसा ॥ ४ ॥

२१५७ काय विघरूनी केलें पाणी । घडिली अवनी कास्याची ॥ १ ॥ महिमा जाणे त्याचा तोचि । नेणे निरंची जरी ज्ञाता ॥ २ ॥

काय पिंजूनी केलें गगन। निर्मिला हुताशन कासयाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे भरोनि अंबरा। निर्मिला वारा कासयाचा ॥ ४ ॥

२१५८ त्याचिमाजीं होती जाती। जिव त्या नेणती आत्मया ॥ १ ॥ नवल याची लाघवी माया। यातें नेदेऊनियां विस्तारे ॥ २ ॥ जेथें तेथें उभीच आड। होऊनियां कवाड भ्रांतीचें ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मादिकां। याचिपरी लोकां झकविलें ॥ ४ ॥

२१५९ माया ब्रह्मींचा आभास। नाहीं ते ब्रह्मीं निःशेष ॥ १ ॥ यालागीं दिसे ते टवाळ। रत्नाचि तें रत्नकीळ ॥ २ ॥ सूर्याचि सूर्यातें प्रकाशी। न देखोनियां तम तेजासी ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वसंवेद्या। नातळे विद्या ना अविद्या ॥ ४ ॥

२१६० माया म्हणिजे नसतेंचि दिसे। गगनीं जैसें दोनी चांद ॥ १ ॥ असे एक भासे आणिक। तया नांव मायीक पसारा ॥ २ ॥ सत्यावरी न पडे दृष्टि। विकल्प परिपाठी घालितु ॥ ३ ॥ निळा म्हणे प्रत्यक्ष लपवी। लटिकेंचि रूढवी भ्रांतिजाळ ॥ ४ ॥

२१६१ मी माझें पाहतां न देखेचि दिठी। आदि मध्य शेवटीं विचारितां ॥ १ ॥ टवाळ हे मिथ्या अविद्येचें भान। चेइलिया स्वप्न जैसें होय ॥ २ ॥ मृगजळ नदी आभासला पूर। न भिजे उखर कोरडेंचि ॥ ३ ॥ निळा म्हणे कांति दिसे ते वाउगी। वेगळा उरगीं पासूनी त्या ॥ ४ ॥

२१६२ हातीं घेतला चितांक। दिठी न दिसेचि कनक ॥ १ ॥ तैसा देव पाहों जातां। विश्वाभासूचि भोंवतां ॥ २ ॥ न दिसेचि दोरा। माजीं लपाला अंबरा ॥ ३ ॥ निळा म्हणे गारा। ठेल्या लपवूनियां नीरा ॥ ४ ॥

२१६३ नेणोनि पारिखे। आत्मा आपणा न देखे ॥ १ ॥ न देखोनी दुजें कांहीं। आपीं आप असे पाहीं ॥ २ ॥ नामा रूपा येणें। नाहीं होणें ना निमणें ॥ ३ ॥ निळा म्हणे नव्हे जागें। निज स्वप्न ना वाउगे ॥ ४ ॥

२१६४ धन वित्त दारा सुत । गण गोत मृगांबु हें ॥१॥ आपणचि स्वयें दृशत्वा येतां । भासवी तत्वतां दृश्यजाता ॥ २ ॥ निजांगें जेवी विलसे छाया । तेवीं हे माया मिथ्यत्वें ॥ ३ ॥ निळा म्हणे मुख्य विंबेवीण । भासविती कोण प्रतिबिंबा ॥ ४ ॥

२१६५ लवेमाजी उत्पन्न एक । रक्त शोक पशुदेहीं ॥ १ ॥ मांसाहारी जळाहारी । तृणाहारी फळभक्षी ॥ २ ॥ कोठें धान्य भक्षूनी अन्नें । कोठें प्राशनें पवनाच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्म जेथें । रुचे तेथेंचि तया ॥ ४ ॥

२१६६ अवघियांचे असोनि देहीं । अंतर्बाहीं न दिसेचि ॥ १ ॥ जेवीं साखरेमाजीं गोडी । न दिसे उघडी असतांही ॥ २ ॥ वाद्य दिसती न दिसे नाद । जेविं कां स्वाद भोजनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसा आत्मा । दिसेचि भूतग्रामा कवळूनी ॥ ४ ॥

२१६७ अवघें होऊनी कांहींची नव्हे । आपुल्या स्वभावें आपण ॥ १ ॥ तया नांव आत्मतत्व । शुद्ध सत्व मायादि ॥ २ ॥ ध्वनि बीज ओंकाररूप । तेंही स्वरूप ऐलाडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणों जातां । जाणोनि नेणता वेद जेथें ॥ ४ ॥

२१६८ असोनि अलिप्त सर्वसंगीं । आत्मा भोगोनी विरागी ॥१॥ ऐसें जाणती ते ज्ञानी । नित्य मुक्त त्रिभुवनीं ॥ २ ॥ मी हें स्फुरे जेथुनीयां । आत्मा परची त्याहूनीयां ॥३॥ निळा म्हणे मी हें वदती। मूर्ख देहातेंची कल्पिती ॥ ४ ॥

२१६९ आत्मा नाहिंची देखिजे ऐसा । उजळितां प्रकाशा रविकीर्ण ॥ १ ॥ असोनियां पाठीं पोटीं । न देखेचि दृष्टि देखण्या ॥ २ ॥ लेऊनियां सर्वांग भरी । असोनि बाहेरी नाढळे ॥ ३ ॥ निळा म्हणे उगम जैसा । न देखेचि सहसा सागर ॥ ४ ॥

२१७० आत्मा करी ना करवी । अलिप्तपणें वर्ते जीवीं ॥ १ ॥ साक्ष नव्हे ना असाक्ष । उपेक्षा करीना कैं पक्ष ॥ २ ॥ जैसें गगनीं

अभ्र गळे । गगन अलिप्त त्या वेगळें ॥ ३ ॥ निळा म्हणे सन्निधानें । लोह चाले चुंबक नेणें ॥ ४ ॥

२१७१ आत्मा निघोट निर्मळ । नातळे तो मायामळ ॥ १ ॥ जेवीं मृगजळातें भानु । प्रगटुनियां वेगळा भिन्नु ॥ २ ॥ आत्मबिंब नव्हे छाया । तैसी स्वरूपीं मिथ्या माया ॥ ३ ॥ निळा म्हणे हें स्वानुभवें। विचारितां होईल ठावें ॥ ४ ॥

२१७२ आंतु बाहेरी देखणाची दिसे । परि तो आभासे दृश्य ऐसा ॥ १ ॥ ज्ञानेंचिवीण वायां गेला । बोध मावळला सत्याचा ॥ २ ॥ त्याविण दिसतें देखतें कोण । परि ये नागवण भ्रांतीची ॥ ३ ॥ निळा म्हणे आठव न धरे । तेणेंचि अंतरे हातोहातीं ॥ ४ ॥

२१७३ इंद्रियांची पुरली धांव । मनासी ठाव विश्रांति ॥ १ ॥ तया नांव ब्रह्मप्राप्ती । जेथ उपरति चित्ताची ॥ २ ॥ बुद्धिचीही जाणीव विरे । तर्क मतांतरें मुरडलीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कुंठित गति । पांगुळले ठाती पंचप्राण ॥ ४ ॥

२१७४ उपरम झाला सर्वकाळ इंद्रियां । स्वरूपीं विलया मन गेलें ॥ १ ॥ ऐशिया स्वानंदें बुझाविलें चित्त । राहिली आचिंत वदनीं वाचा ॥ २ ॥ अष्ट अविर्भाव इवरले अंगीं । प्राणी प्राणरंगीं निजवासें ॥ ३ ॥ भवबंध ठसा पडिला शरीरा । वृत्ति गेली घरा निजाचिया ॥ ४ ॥ निमोनियां गेलें शब्दांचें बोलणें । पवनुचि प्राणें शोषियेला ॥ ५ ॥ निळा सुखासुखीं पावला विश्रांति । पद पिंडा समाप्ती करोनिया ॥ ६ ॥

२१७५ एक्या जीवे एक्या भावें । एकाचि एकलें एक्या दैवें ॥ १ ॥ एकाएकीं एकचि झालें । एका अंगीं विरोनी गेलें ॥ २ ॥ एकाचि केलें निजानुभेंव । एकचि झालें एक्या नांवें ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाएकीं । एकचि झालें तिहीं लोकीं ॥ ४ ॥

२१७६ एकींच नसतां एकपण दुजेपण कैचें । म्हणऊनियां न

चले कांहीं तेथें शब्दाचे ॥ १ ॥ पाहातें पहाणें जेथें विरमोनी जाय । घेणें देणें कैंचें तेथें सांगावें काय ॥ २ ॥ दृश्याचें नाहीं द्रष्टत्वाचा फिटला पांग । कायावाचा मनचि नाहीं धारणायोग ॥ ३ ॥ निळा म्हणे जेथें सुख सुखपणा नये । निजानंदीं निजानंद हारपले ठाय ॥ ४ ॥

२१७७ एका पासोनि झालें विश्व । विश्वामाजी एकाचि अंश ॥ १ ॥ जैसे शून्यापासुनि अंक । झाले मागितां नुरेचि लेख ॥ २ ॥ शून्या नुठितां शून्यपणें । कैंचें एका एक होणें ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्तचि नाहीं । कैंचा देवही तये ठायीं ॥ ४ ॥

२१७८ विश्व अवघें मायाभास । माया ब्रह्मीं नाहींची मोस ॥ १ ॥ जेविं वन्ही सूर्य कांति । प्रगटतां कीर्ण त्या नेणती ॥ २ ॥ शुक्तीका प्रसवे मुक्ताफळ । जळींचें परि त्या नेणोचि जळ ॥ ३ ॥ निळा म्हणे धूम्रा वन्ही । नाहींचि तयातें प्रसवोनी ॥ ४ ॥

२१७९ एकीं एकपणा ठाव । नसोनि झाला सर्वा सर्व ॥ १ ॥ जैसें गगन घटीं मठीं । दिसोन आपण आपल्या पोटीं ॥ २ ॥ येणें होणें नाणीं मनें । आपीं आप संचलेपणें ॥ ३ ॥ निळा म्हणे याची कळा । नेणें हाही न देखे डोळां ॥ ४ ॥

२१८० कल्पनातीत झालें मन । जसें गगन निरभ्र ॥ १ ॥ म्हणोनियां ऐक्य आलें । स्वरूपीं ठेलें निश्चळ ॥ २ ॥ नित्यानंदें झाली तृप्ती । देखतां मूर्ती भगवंत ॥ ३ ॥ निळा म्हणे जडलें पदीं । निरावधीं विठ्ठलीं ॥ ४ ॥

२१८१ कांहींच न होऊनी विस्तारला । बहुरुपी हा एकला ॥ १ ॥ नवल विचित्र हेंचि वाटे । कैसा नेटोनि ठेला नटे ॥ २ ॥ एका ऐसा न होऊनी एक । नानाकारें हा अनेक ॥ ३ ॥ निळा म्हणे नट लाघवी । शखीं वेगळा गोसावी ॥ ४ ॥

२१८२ कैसा याचा वेध जाणती अनुभवी । जयां आहे ठावी

कृपा याची ॥ १ ॥ नये तें दावितां सांगतांही परी । वर्ते जें माझारीं भुलवूनियां ॥ २ ॥ नेदीचि बाहेरी उमसों बुद्धि मना । भरूनियां भावना झांकोळिली ॥ ३ ॥ निळा म्हणे तोचि साक्ष माझ्या जीवीं । चाळक गोसावी ब्रह्मांडाचा ॥ ४ ॥

२१८३ कैंचि याला बाईल आई । नामरूपें तेंही लटिकेंचि ॥ १ ॥ मूळचि नाहीं डाळ तें कैंचें । लटिकें साचें काय म्हणों ॥ २ ॥ हात पाय नाक ना डोळे । देखणें आंधळें नातळेचि ॥ ३ ॥ निळा म्हणे कांहिंची नव्हे । तोचि हा अवघे श्रुति बोले ॥ ४ ॥

२१८४ कैंचि आतां जीवा उरी । आंत बाहेरी कोंदला ॥ १ ॥ नेदी पडों कोठें उणें । वाचा करणें चाळितु ॥ २ ॥ भोग भोक्ता आपण झाला । वांटुनी प्याला अभिमाना ॥ ३ ॥ निळा नामें रूपें नाहीं । भासे देहीं विठ्ठल ॥ ४ ॥

२१८५ कोठें झाडाचिवरी । कोठें पोखरीं विवरांत ॥ १ ॥ कोठें जळीं वसे स्थळीं । कोठें अंतराळीं अंतरिक्ष ॥ २ ॥ कोठें पर्वतीं दर-कुटी आंत । कोठें वनांत झाडखंडीं ॥ ३ ॥ निळा म्हणे चिखलीं शेणीं । वसे पाषाणीं काष्ठांत ॥ ४ ॥

२१८६ कोठें ग्रामीं कोठें पुरीं । कोठें सागरीं दरियांत ॥ १ ॥ कोठें सांदीं कोंदीं बिळीं । कोठें वाळवीं धुळीमाजीं ॥ २ ॥ कोठें बोलें बोल-वटीं । वसे तळवटीं शिखरावरी ॥ ३ ॥ निळा म्हणे वसे शिरीं । केशाभीतरीं कोठें वस्त्रीं ॥ ४ ॥

२१८७ कोठेंचि हा नसे कोठेंही न दिसे । कोठेंचि अमुकासे न म्हणे कोणी ॥ १ ॥ कोठें याचें होणें कोठें याचें निमणें । कोठूनी येणें जाणें न तर्केचि ॥ २ ॥ कोठें याची स्थिती कोठें याची प्रीती । कोठें याचि वसती न कळे कोणा ॥ ३ ॥ कोठूनी याचें मूळ कोठूनी याचें कुळ । वर्णावयास अढळ न कळे गोत्र ॥ ४ ॥ निळा म्हणे याती न दिसे रूपाकृती । नयेची कोषे व्यक्ति विचार करितां ॥ ५ ॥

२१८८ खांब सूत्रीं खेळवी दोरी । नाचती पुतळ्या दिसती वरी ॥ १ ॥ तैसा बोलवी बोलतां । न दिसे परि तो मज आंतौता ॥ २ ॥ किनरी वाजे नानापरी । वाजवी त्याची ते कुसरी ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसा माझा । वाच्य वाचकु सद्गुरुराजा ॥ ४ ॥

२१८९ गगनीं वसोनियां रवी । प्रकाश भूमंडळा पुरवी ॥ १ ॥ तैसे तुम्ही जेथिल तेथें । असोनियां चाळा भूतें ॥ २ ॥ नभ न सांडूनी आपुला ठावो । पुरवी वावो जगातें ॥३॥ निळा म्हणे सान्नि-धानें । चुंबक चालवी अचेतनें ॥ ४ ॥

२१९० गंगा पवित्र सर्वांगुणीं । स्पर्शें विटाळे रांजणीं ॥ १ ॥ तेंवि चैतन्य अवघें एक । भूतभेदें त्या कळंक ॥ २ ॥ भूमिका नाहीं खंडण केली । उत्तम अधम संगें झाली ॥ ३ ॥ निळा म्हणे धर्माधर्म । वर्णानुरूप क्रियाकर्म ॥ ४ ॥

२१९१ घडूं जातां अळंकार । होती अवघेचि शृंगार ॥ १ ॥ नलगे उजळाही देणें । शोभती अंगींच्या बरवेपणें ॥ २ ॥ आंतु बाहेरी सारिखें । नये हीनपणा विकें ॥ ३ ॥ निळा म्हणे सुधा माल । हातीं लागला सुढाळ ॥ ४ ॥

२१९२ छाया मंडपींचीं चित्रें दिसती । तैसी सृष्टि भासतसे ॥ १ ॥ परि त्या आधार दिपज्योती । कातडी नुसती एऱ्हवीं ते ॥ २ ॥ तेवीं आत्मप्रभा भासे । जग हें विलसे नानाकृति ॥ ३ ॥ निळा म्हणे गगनीं रवी । दावूनि जेवीं अलिप्त ॥ ४ ॥

२१९३ जें जें कांहीं होय जाय । त्या त्या लय अद्वैतीं ॥ १ ॥ तें अद्वैतही लोपल्यापाठीं । आपणाचि पोटीं आपण ॥ २ ॥ तया नांव स्वरूप म्हणती । जें नित्य एकांति एकलें ॥ ३ ॥ निळा म्हणे दावूनीयां नामरूपा । नयेचि पडपा विश्वाकृति ॥ ४ ॥

२१९४ जैसिया तैसा मिळोनियां । नेणवे म्हणोनियां कोणासी ॥ १ ॥ गोडी साखर करितां भिन्न । वेगळी कैसेनि रूप धरी ॥ २ ॥

डोळां देखतां एकाचि दिसे । करितां जैसें भिन्न नये ॥ ३ ॥ निळा म्हणे वाचा वदतां । दिसती ऐक्यता परी भिन्न ॥ ४ ॥

२१९५ त्रिवेणी संगमीं बुडती बहुत । नेघे प्रायश्चित्त त्यांचें गंगा ॥ १ ॥ ज्यांचें कर्म जैसें भोगिती ते फळ । गंगा ती निर्मळ जैसी तैसी ॥ २ ॥ बुडती जहाजें वायुचिया संगें । परि दोष न लगे वायूसी तो ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसा परमात्मा श्रीहरी । वर्ते सर्वांतरी आलिप्त-पणें ॥ ४ ॥

२१९६ दोष वसे पात्रांतरीं । आत्मा निर्मळ चराचरीं ॥ १ ॥ सर्पा-मुखीं वसे विष । मधुमाक्षिके सारांश रस ॥ २ ॥ स्वातिजळें मुक्ता-फळ । शुक्तीं सर्पीं हाळाहळ ॥ ३ ॥ निळा म्हणे उपाधिभेदें । दाविती निवाड शुद्धाशुद्धें ॥ ४ ॥

२१९७ देव प्रगटाचि लपाला । आड आपण बैसला ॥ १ ॥ काय नवल सांगों कैसें । सूर्य झांकिला प्रकाशें ॥ २ ॥ निजज्वाळें वैश्वानर । लहऱ्या लोपिला सागर ॥ ३ ॥ निळा म्हणे धुळी । आड ठेली महितळीं ॥ ४ ॥

२१९८ नवल हा प्रकाश प्रकाशावेगळा । झांकिलीयाही डोळां पुढें दिसे ॥ १ ॥ नव्हे हा उजाळिला सवेंचि मावळला । आत्मतेजें केला उदो नित्य ॥ २ ॥ ढवळा ना काळा पिंवळा ना जांभळा । जीवींच्या जीवनकळा प्रकाशितु ॥ ३ ॥ निळा म्हणे आजि आरतीचेनी व्याजें । कृपें पंढरीराजें कळलें मज ॥ ४ ॥

२१९९ नाहींचि मा डाळमूळ । पाहातां यासि जाती कुळ ॥ १ ॥ रूप नाम न दिसे वर्ण । पाय डोळे हात कान ॥ २ ॥ बाळ तरुण वयसा वृद्ध । जिण्या मरणा परता शुद्ध ॥ ३ ॥ निळा म्हणे धरीला चित्तीं । कैसा नेणों पूर्वीं संतीं ॥ ४ ॥

२२०० नाहींचि उरला रिता । ठावो याविण तत्वतां ॥ १ ॥ अणु रेणु महदाकाश । त्याहीमाजीं याचा वास ॥ २ ॥ होतां जातां सहस्र-

वरी । ब्रह्मांडांच्या भरोवरी ॥ ३ ॥ निळा म्हणे अखंडता । नव्या जुन्याही हा परता ॥ ४ ॥

२२०१ नाहीं म्हणतां अवघें तेंचि । आहे म्हणतांचि दावितां नये ॥ १ ॥ म्हणोनियां नचले शब्द । राहे वेवाद ऐलाडी तो ॥ २ ॥ डोळा देखणा देखे सर्व । न देखे बरव आपुली तो ॥ ३ ॥ निळा म्हणे तेवीं जाणों जातां । जाणणेंचि तत्वतां वस्तु होये ॥ ४ ॥

२२०२ निर्विकार असोनि आत्मा । अवघ्या भूतग्रामा प्रकाशी ॥ १ ॥ एरवीं करी ना करवी । जेवीं रवि निजव्योमीं ॥ २ ॥ लोह चळे चुंबकयोगें । परि तो अंगें न शिवे त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे आत्मसत्ता । वर्तणें भूतां कर्मतंत्रीं ॥ ४ ॥

२२०३ पदार्थमात्रीं आठवे जरी । न लगेची तरी साधन ॥ १ ॥ एरवीं दिसे देखणा तोची । पाहिजे त्याची परी कृपा ॥ २ ॥ अवघाचि वसोनि अवघे ठायीं । दिसे दाखवीहीं अवघ्यांतें ॥ ३ ॥ निळा म्हणे भोगी त्यागी । तोचि जगीं जगदात्मा ॥ ४ ॥

२२०४ पाहाणें पाहातें । गेलें हारपोनियां निरुतें ॥ १ ॥ मीही नाहीं तूंही नाहीं । आपीं आप अंतरबाहीं ॥ २ ॥ उदो अस्तु सविता नेणें । जेथें तेथें आपुलेपणें ॥ ३ ॥ निळा म्हणे नभीं नभ । जेवीं दावूनीयां प्रतिबिंब ॥ ४ ॥

२२०५ पाहों जातां देखणें तेंची । जाणतां जाणणेंची होईजे अंगें ॥ १ ॥ आतां कैसें सांगावें यावरी । बोलतांचि वैखरी गिळूनी जाये ॥ २ ॥ बुद्धिच्या प्रवेशें बुद्धिचि हरपे । मन जेथें संकल्पसहित विरे ॥ ३ ॥ निळा म्हणे चित्ता नुरे चित्तपण । आनंदा मुरवण आनंद त्या ॥ ४ ॥

२२०६ प्राणी प्राण अर्पे । तेणें अर्पी तें समर्पे ॥ १ ॥ ऐशा आहे प्रेमकळा । परी तो बोधक विरळा ॥ २ ॥ दृश्याचिया पाठीं । दृश्य लोपे दृष्टाचि उठी ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्ञानें । ज्ञेय राहिजे होऊन ॥ ४ ॥

२२०७ भेदचि याचा नये हातां । जाणिवा जाणतां नानापरी

॥ १ ॥ मतमतांतरें वृथाचि होती । याच्या न पवती दारवंटा ॥ २ ॥ पाहों जातां बुद्धिचे डोळे । होताती आंधळे समोर या ॥ ३ ॥ निळा म्हणे नेदीची कोणा । देखों आपणा लपावितसे ॥ ४ ॥

२२०८ येती जाती वर्षती मेघ । गगन तें अभंग जैसें तैसें ॥ १ ॥ तैसींच ब्रह्मांडें अनेक होती जाती । स्वरूप तें अद्वैतीं अद्वैत ॥ २ ॥ नाना नाटिया नटवेश । परि तो आपणास भिन्न नव्हे ॥ ३ ॥ निळा म्हणे नाना वस्त्राकार तंत । दाउनी आपणांत आपण ॥ ४ ॥

२२०९ समोर सदा सर्वांकडे । मागें पुढें वेष्टित ॥ १ ॥ कांहो नेणो हरी ऐसा । जैसा तैसा परिपूर्ण ॥ २ ॥ उदका अंगीं जैसा रसु । गगनीं अवकाशु घनदाट ॥ ३ ॥ निळा म्हणे अंतर्बाह्य । त्याविण आहे कोण दुजें ॥ ४ ॥

२२१० सर्वांमाजीं गगन आहे । परि धरितांचि नये काय ॥ १ ॥ तैसें नाकळेचि तें शब्दातें । जेवीं खद्योतें रवि भेटी ॥ २ ॥ सागरीं पडतांचि लवणकण । निवाडितां भिन्न न निवडे ॥ ३ ॥ निळा म्हणे तैशा परी । बोलतांचि वैखरी लीन तेथें ॥ ४ ॥

२२११ सोनें असे सोनेंपणें । अलंकार लेणें होय जाय ॥ १ ॥ तैसें चराचर होतां जातां । वस्तु अखंडता अखंड ॥ २ ॥ नाना मृगजळ दिसे भासे । भूमिका ते असे कोरडीच ॥ ३ ॥ निळा म्हणे घट मठ मोडी । अवकाश परवडी नाहीं तया ॥ ४ ॥

२२१२ सोयरा श्रीहरी । आत्मा एक चराचरीं ॥ १ ॥ नाहीं तया आपपर । वसवी सकळांचें अंतर ॥ २ ॥ देवां दानवां मानवां । स्थूळ सूक्ष्मादिकां सर्वां ॥ ३ ॥ निळा म्हणे जीवमात्रीं । व्यापकपणें तोचि धात्री ॥ ४ ॥

२२१३ पूर्णापासोनी आले आंख । शेखी पूर्णची नुरे लेख ॥ १ ॥ पूर्णीं असतां पूर्णपण । नेणें आपणा आपण ॥ २ ॥ दशक वाढवूनी शेवटीं । पूर्णपणें घाली पोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कांहींची नाहीं । तोचि या बीज विश्वा पाहीं ॥ ४ ॥

२२१४ म्हणोनियां शब्द न पवेची तत्वतां । बुद्धिचिया माथां वळघे कोण ॥ १ ॥ मना पवना केंवि घडेल संचार । श्रुती परात्पर म्हणती ज्यातें ॥ २ ॥ नाद बिंदुकळा ज्योती हीं बोलणीं । आरौतीं निर्वाणीं विरती तेथें ॥ ३ ॥ निळा म्हणे वर्म नेणती ते सकळें । वाचकें वाचाळें संतांवीण ॥ ४ ॥

२२१५ पाहों जातां हा न दिसे । झांकोळिला विश्वाभासें ॥ १ ॥ आतां पाहों कोणीकडे । आड आपणा हा दडे ॥ २ ॥ डाहाळी आड आंवा । असोनि न दिसेचि उभा ॥ ३ ॥ साखर दिसे खडा । गोडी पाहों कोणीकडा ॥ ४ ॥ निळा म्हणे सोनें । न दिसे झांकिलें भूषणें ॥ ५ ॥

२२१६ सर्वी असतां सर्वपणें । मी हें म्हणे अविद्यागुणें ॥ १ ॥ पाहातां आधीं अविद्याचि वावो । तेथें मीपणाचा कैंचा ठावो ॥ २ ॥ मीही नाहीं तूंही नाहीं । एकीं एकत्व नुमसे पाहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे न होनी कांहीं । नसोनी असे आपुल्या ठायीं ॥ ४ ॥

२२१७ सर्वकाळीं एकात्मता । जोडली त्या भाग्यवंता ॥ १ ॥ ज्याचा गेला अहंकार । गळोनियां मदमत्सर ॥ २ ॥ जें जें दृष्टिपुढें देखे । तें तें हरीरूपें ओळखे ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्य केला । पूर्ण बोधें उदो त्याला ॥ ४ ॥

२२१८ माझेंचि मज नवल वाटे । मीचि भेटें मजलागीं ॥ १ ॥ निजात्मबोधें उदो केला । प्रकाश दाटला कोंदोनी ॥ २ ॥ कोठें कांहींची न दिसे दुजें । निजात्मतेजें जग भासे ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघे ठायीं । मीचि नाहीं दुजी परी ॥ ४ ॥

२२१९ माझिये मनीं बसला हरी । नयना माझारीं कोंदला ॥ १ ॥ भरोनियां मनाबुद्धि । राहिला संधीं इंद्रियांच्या ॥ २ ॥ पाहे तेथें आपणाचि दिसे । स्वरूप विलसे पदार्थी ॥ ३ ॥ निळा म्हणे जें जें कांहीं । भासे तींही त्याचीं रूपें ॥ ४ ॥

२२२० याचिया ध्यानें हें चराचर । अवघे तदाकार मज भासे ॥ १ ॥ मही अंबु मारुत गगन । भासे हुताशन हाचि झाला ॥ २ ॥ चंद्र सूर्य तारांगणें । सुरासुरगण मनुष्यादि ॥ ३ ॥ निळा म्हणे जनीं वनीं । हाचि भरोनि राहिला ॥ ४ ॥

२२२१ बहुरूपी हा एकला । नानाकारें नटें नटला ॥ १॥ पुरुषाकृति स्त्रिया बाळें । होऊनी कोणाही नातळे ॥ २ ॥ नामें रूपें वस्त्राभरणें । रसस्वाद नाना खाणें ॥ ३ ॥ निळा म्हणे फळें पुष्पें । पर्णे मूळें भिन्नचि रूपें ॥ ४ ॥

२२२२ म्हणसी कडवसा गे मायेचिया वेसा । मायाचि नाहीं मिथ्यापणे निजबोध प्रकाशा ॥ १ ॥ लपों कोणींकडे गे सांग वाई निवाडे । अविद्याही म्हणसी तरी ते न दिसे निवाडे ॥ २ ॥ कैचें मी माझें हें गे झांकोळिलें तेजें । अवघीं आत्मराजें माझ्या उजळीं निजें ॥ ३ ॥ निळा म्हणे नुरेगे लपणेंचि वोसरे । याचिया प्रकाशें उजळले दरेखोरे ॥ ४ ॥

२२२३ नवल हे कृपा घनवट । उडवूनी मायेचें फळकट । आपआपणां केलें प्रगट । मोडिली वाट दुसऱ्याची ॥ १ ॥ आपणांसवें आपण खेळे । आपआपणांसी चावळे । शेखीं आपण आपणा मिळे । खेळतां वेगळें दाउनी ॥ २ ॥ ऐसा आपुलीया संतोषा । एकी भिन्नत्वाची आशा । अनेकत्वाचा मिरवूनी ठसा । एकीं एकला शेवटीं ॥ ३ ॥ दाऊनीयां नानाकार । नानाकृति नारीनर । तोचि करूनिया निराकार । आपणा अंगीं आपण ॥ ४ ॥ निळा म्हणे कृपातरणी । प्रगटोनियां माझिये वाणी । प्रकाशी आपुल्या किरणीं । लाविली गुणीं वर्णावया ॥ ५ ॥

## श्रीनामदेवमहाराज

२२२४ आत्मत्वाच्या योगें पाहूं जातां । नाहीं निरंतर भिन्न दैवता ॥ १ ॥ वर्णाश्रम यातिकुळ गोत्र । भक्ति सदोदीत नाम्यापासीं

॥ २ ॥ नामा म्हणे भय मुळीं कांहीं नाहीं । अखंडीत पाहीं भक्ति सार ॥ ३ ॥

२२२५ वंदावें तें काय निंदावें तें काय । सर्वांठायीं पाहे कोंदाटलें ॥ १ ॥ आहे कवणाठायीं नाहीं कवणाठायीं । ठायींच्या पैं ठायीं कोंदाटलें ॥ २ ॥ रविरश्मीचें तेज सर्वांठायीं असे । त्यापरी अनायासे बुजतु जाय ॥ ३ ॥ भाव तोंचि ब्रम्ह ब्रम्ह तोंचि कर्म । जाणोनियां वर्म म्हणे नामा ॥ ४ ॥

## श्रीभानुदासमहाराज

२२२६ उद्भवला ॐकार त्रिमातृकेसहित । अर्धमातृकेपरतें प्रणवबीज ॥ १ ॥ माया महत्तत्व जाले तिन्ही गुण । चौदेहांची खूण वोळखावी ॥ २ ॥ अंतःकरणीं जाला तत्वांचा प्रसव । पंचतत्वें सर्व रूपा आलीं ॥ ३ ॥ पांचहीं गुण जाले पंचवीस । परी भानुदास वेगळाची ॥ ४ ॥

२२२७ षड्विकार आणि सप्तचक्रावळी । अष्टभिन्न जाली प्रकृति ते ॥ १ ॥ नवनाडी रचना दश इंद्रियांची । अकराव्या मनाची गति तूंची ॥ २ ॥ विषय इंद्रिय वासना उत्पात्ति । तुजमाजी येती जाती सर्व ॥ ३ ॥ चिन्मयाचा दीप साक्षित्वासी आला । भानुदास त्याला नाम जालें ॥ ४ ॥

२२२८ वाचा आणि अवस्था भोग अभिमानी । पुरूषार्थ खाणीं चारी मुख्य ॥ १ ॥ कीटक भ्रमर जंगम स्थावरत्व । भरलें महत्तत्व कोंदाटोनी ॥ २ ॥ चेतविता याला कोण आहे येथें । ओहं सोहं भातें लाऊनियां ॥ ३ ॥ फुंकितो तो कोण आणिक दुसरा । वर्म गुरूपुत्रा न कळेची ॥ ४ ॥ सृष्टिचा उभारा केला तो संकल्प । भानुदास दीप प्रज्वलीला ॥ ५ ॥

२२२९ तुज पासाव सर्व परी तूं नोहेसी । ऐसें आपणासी बुझे बापा ॥ १ ॥ कर्तृत्व करूनी आहे तो निराळा । परब्रम्ह निर्मळा मळ-

नाहीं ॥ २ ॥ देहाचिये ऐसी करूनी निराशा । स्वरूपीं ठसा ठसलासी ॥ ३ ॥ चिन्मयरूप मूळ ॐकारबीज । भानुदासीं निज लाधलें तें ॥ ४ ॥

२२३० जाडीचें घोंगडें येव्हढीये राती । कानींची कुंडलें करी जगा ज्योती ॥ १ ॥ वोळखिला वोळखिला खुणा । वोळखिला माय पंढरीचा राणा ॥ २ ॥ होये न होये ऐसा संशय गमला । निर्धारितां विश्वव्यापक देखिला ॥ ३ ॥ हृदयमंदिरीं दाटोनी धरावा । ही खूण सांगे भानुदास देवा ॥ ४ ॥

२२३१ अवतारादिक झाले कर्मभूमी आले । विश्व जनीं देखिलें आपुले डोळां ॥ १ ॥ देखिल्या स्वरूप नुद्धरे काय जन । तें काय म्हणोन सांगों स्वामी ॥ २ ॥ उद्धरत काय नाहीं आत्मज्ञान । देखिलें तें जाण सर्व वाव ॥ ३ ॥ वाव म्हणों तरी कोंदलें स्वरूप । लावलीया माप मोजवेना ॥ ४ ॥ देखत देखत वेडावलें जन । रूप डोळेवीण पाहूं जाती ॥ ५ ॥ भानुदास म्हणे सद्गुरूच्या लोभें । आहेचि तें उभें विटेवरी ॥ ६ ॥

## श्रीएकनाथमहाराज

२२३२ अभेदाचे उत्तम गुण । तेंचि भक्ती तेंचि ज्ञान ॥ १ ॥ अभेद भक्ति वाडें कोडें । देवा आवडे तें गोड ॥ २ ॥ अभेद भजनीं सुख देवा । एका जनार्दनीं विसरे जीवा ॥ ३ ॥

२२३३ अभेद भक्तांचें निजमंदीर । तें मज निर्गुणाचें घर ॥ १ ॥ निर्गुणासी घर ठावो । बोलवें हेंचि दिसे वावो ॥ २ ॥ सांडूनी आकाराचें ज्ञान । निराकारीं सुख संपन्न ॥ ३ ॥ सुखें सुखासी मिळणी । शरण एका जनार्दनीं ॥ ४ ॥

२२३४ मी तूं ऐसी परी । जैसे तरंग सागरीं ॥ १ ॥ दोहीं माजी एक जाणा । कृष्ण द्वारावती राणा ॥ २ ॥ तंतु वस्त्र दोनी एक । तैसें जगासी व्यापक ॥ ३ ॥ देव भक्त ऐसी बोली । भ्रांति निरसे-

नाशी झाली ॥ ४ ॥ सरिता सागरीं मिनल्या । तैसें होय भ्रांति गेल्या ॥ ५ ॥ एका जनार्दनीं कृपा । भ्रांति कैसी जगीं पहातां ॥ ६ ॥

२२३५ साकर दिसे परी गोडी न दिसे । ते काय त्यावेगळी असे ॥ १ ॥ तैसा जनीं आहे जनार्दन । तयातें पहावया सांडी अभिमान ॥ २ ॥ कापुरा अंगी परिमळु गाढा । पाहतां उघडा केंवि दिसे ॥ ३ ॥ पाठपोट जैसें नाहींच सुवर्णा । एका जनार्दनीं यापरी जाणा ॥ ४ ॥

२२३६ ऐसा ज्याचा एक भाव । तेथें नाहीं द्वैता ठाव ॥ १ ॥ द्वैत अद्वैत हारपलें । अवघें एकरूप जाहलें ॥ २ ॥ संकल्प विकल्प विराला । अवघा देहीं देव जाहला ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ठाव । स्वयमेव भरला देव ॥ ४ ॥

२२३७ परमात्मा एकला एक । एकपणें तोचि अनेक ॥ १ ॥ तेथें जाती विजाती नाहीं देखा । महासुखा सुखपात्र ॥ २ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । आत्मा सारीखा सर्व देहीं ॥ ३ ॥

२२३८ ब्रम्हीं स्फुरे जें स्फुरण । शुद्ध सत्वाचें लक्षण । तो तूं लक्षी लक्ष्यातीत । परिपूर्णरे ॥ १ ॥ कान्हू सच्चिदानंदु शब्द आरुतारे । त्याही परता तूं निजानंदुरे ॥ २ ॥ जेथें नाहीं गुणागुण । नाहीं कार्यासी कारण । तो तूं गुणीं गुणातीत । परिपूर्णरे ॥ ३ ॥ एकाएकी जनार्दन । भेद भाष्य वचन । तो तूं शब्दार्शी गिळून । राहिलासी रे ॥ ४ ॥

*२२३९ झाली संध्या संदेह माझा गेला । आत्मराम हृदयीं शेजे आला ॥ ध्रु० ॥ गुरुकृपा निर्मळ भागिरथी । शांतिक्षमा यमुना सरस्वती । आसिपदें एकत्र जेथें होती । स्वानुभव स्नान हें मुक्त स्थिती ॥ १ ॥ सदबुद्धिचें घालूनी शुद्धासन । वरी सदगुरुचि दया परिपूर्ण । शमदम विभूति चर्चुनी जाण । वाचे उच्चारी केशव नारायण ॥ २ ॥

* हा अभंग म्हणतें वेळीं " गुरुकृपा " येथून सुरुवात करावी.

बोध पुत्र निर्माण झाला जेव्हां । ममता म्हातारी मरोनि गेली तेव्हां । भक्ति बहिण धांऊनि आली गांवा । आतां संध्या कैशी मी करूं केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्मे झालीं तीं ब्रह्मार्पण । जन नोहे अवघा हा जनार्दन । ऐसें ऐकतां निवती साधूजन । एका जनार्दनीं वाणली निजखूण ॥ ४ ॥

२२४० भावीं देव कीं देवीं भाव । दोहींचा उगव करूनी दावा ॥ १ ॥ भाव थोर कीं देव थोर । दोहींचा निर्धार करूनी दावा ॥ २ ॥ जंव जंव भाव तंव तंव देव । भाव नाहीं तेथें देवची वाव ॥ ३ ॥ एका जनार्दनीं भावेंचि देव । लटिकें म्हणाल तरी हृदयीं साक्ष पहाहो ॥ ४ ॥

२२४१ घर सोडोनी जावें परदेशा । मजसवें देव सारिसा ॥ १ ॥ कडे कपाटे शिखरीं । जिकडे पाहे तिकडे हरी ॥ २ ॥ आतां कोणीकडे जावें । जिकडे पाहे तिकडे देव ॥ ३ ॥ एका बैसला निरंजनीं । न जाइजे जनीं वनीं ॥ ४ ॥

२२४२ आजीचा सुदीन आम्हां झाला आनंदु । सकळास्वरूपीं स्वयें देखे गोविंदु ॥ १ ॥ पाहिला गे माय आतां सांगूं मी कैसें । जेथें जेथें पाहे तेथें तेथें गोविंदु दिसे ॥ २ ॥ पाहता पाहणें तटस्थ ठेलें । सबाह्य अभ्यंतरीं पुरुषोत्तम कोंदलें ॥ ३ ॥ यापरी पाहातां हरुष होतसे मना । एका जनार्दनीं धणी न पुरे मना ॥ ४ ॥

२२४३ पाहतां पाहतां वेधलें मन । झालें उन्मन समाधिस्थ ॥ १ ॥ ऐसा परब्रह्म पुतळा देखिलासे डोळा । पाहिला सांवळा डोळेभरी ॥ २ ॥ तनु मन वेधलें तयाचे चरणीं । शरण एका एकपणें जनार्दनीं ॥ ३ ॥

२२४४ खांबसूत्राची बाहुली । सूत्रा आधीन उगली ॥ १ ॥ माझें मीपण नाहीं स्वतंत्र । क्रियाकर्म तें परतंत्र ॥ २ ॥ बाहुलिये नाहीं

स्वतंत्रता । तैसा नव्हे कर्मकर्ता ॥ ३ ॥ एका एकपणाचें सूत्र । जनार्दन पायीं स्वतंत्र ॥ ४ ॥

२२४५ अगाध तुझी लीला आकळ कैसेनी कळे । ब्रह्मा मुंगी धरूनी तुझें स्वरूप सांवळें ॥ १ ॥ तुज कैसें भजावें आपणा काय देखावें । तुजमाजी राहूनी तुजला कैसें सेवावें ॥ २ ॥ अगा देवा तूं आम्हा म्हणसी मानवी । हेम अलंकार वेगळे निवडावे केवीं ॥३॥ एका जनार्दनीं सबाह्याभ्यंतरीं नांदे । मिथ्या स्वप्नजात जेविं जाय तें बोधे ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

२२४६ सगुणीं निर्गुण निर्गुणीं सगुण । दोन्हीं भिन्नपण नसे मुळीं ॥ १ ॥ हेम अलंकार अलंकारीं हेम । मृन्मयेची धाम धाम तेचि ॥ २ ॥ किंचित् महत उपाधि कल्पित । मुळीं तें अंशाक एकमेव ॥ ३॥ इह तेंचि पर पिंड तें ब्रह्मांड । ब्रह्माचि अखंड ज्ञानदेव ॥ ४ ॥

२२४७ पिंडाचि ब्रह्मांड ब्रह्मांडचि पिंड । ब्रह्माचि अखंड ब्रह्मरूप ॥ १ ॥ कांहीं भेद नाहीं किंचित् महत् । उपाधि कल्पित स्वाभाविक ॥ २ ॥ अनुभवयोगें दोन्हीं जाण सम । नाहींचि विषम अणुभरी ॥ ३ ॥ सहजाचि सृष्टि जाणा हे घडली । सहजची गेली शेखीं आथी ॥ ४ ॥ एकमेव सर्व म्हणे ज्ञानेश्वर । नाहीं भिन्न कीर ओळखतां ॥ ५ ॥

२२४८ मंत्र तंत्र यंत्र सर्वही अबद्ध । जंव नाहीं शुद्ध अंतःकरण ॥ १ ॥ गुरु शिष्यपण हें हीं मायिकत्व । जंव निजतत्त्व न ओळखी ॥ २ ॥ प्राप्त जरी झाली अष्टसिद्धी जाण । मागुती बंधन दृढ होय ॥ ३ ॥ आत्मरूपावीण साधन अन्यत्र । भ्रमासीच पात्र होईजे कीं ॥ ४॥ सर्व वृत्ति शून्य म्हणे तोचि धन्य । ज्ञानदेव मान्य सर्वस्वेसी ॥ ५ ॥

२२४९ त्यागुनी कैळास सर्वही संपत्ति । स्मशानांत वस्ती रुद्र करी ॥ १ ॥ कासया कारणें ब्रह्म शोधावया । आलों कोठूनीयां माझा मीचि ॥ २ ॥ तयासीही पूर्ण न कळेचि कांहीं । अद्यापि संदेहीं पडियले ॥ ३ ॥ हरी ब्रह्मा सूर्य येरा कोण लेखी । नाहींच ओळखी मूळरूपीं ॥ ४ ॥ म्हणे ज्ञानदेव वस्तु परात्पर । गुरुकृपें कीर भेदिजेतु ॥ ५ ॥

२२५० पुण्यासी जोडितां पापचि जोडिजे । तेणेंचि पाविजे अधोगती ॥ १ ॥ सोमयाग श्रेष्ठ करितां पावन । करावें हनन पशु तेथें ॥ २ ॥ तोचि ते या दोष तयालागीं जन्म । भोगिजेती कर्म पशुयोनी ॥ ३ ॥ पुण्य तेथें पाप समचि वर्तती । रात्रंदिन आथी जियेपरी ॥ ४ ॥ पापपुण्य दोन्ही त्यागुनि निराळा । जाहला स्वलीला ज्ञानदेव ॥ ५ ॥

२२५१ देव देव म्हणूनी व्यर्थ कां फिरसी । निजदेव नेणसी मुळीं कोण ॥ १ ॥ देवा नाहीं रूप देवा नाहीं नांव । देवा नाहीं गांव कोठें कांहीं ॥ २ ॥ ज्ञानदेव म्हणे भजा आत्मदेवा । अखंडीत सेवा करा त्याची ॥ ३ ॥

## श्रीचोखोबामहाराज

२२५२ देवा नाहीं रूप देवा नाहीं नाम । देव हा निष्काम सर्वांठाईं ॥ १ ॥ डोळीयाचा डोळा हाचि भासला । देव प्रकाशला आदिअंतीं ॥ २ ॥ नवल वाटलें नवल वाटलें । देव कोंदाटले मागें पुढें ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझा संदेह फिटला । देव प्रगटला देहामाजी ॥ ४ ॥

२२५३ आमुचा आम्ही केला भाववळी । भावें वनमाळी आकळीला ॥ १ ॥ भावाचि कारण भावाचि कारण । भावें देव शरण भाविकांसी ॥ २ ॥ निज भाववळें घातिलासे वेढा । देव चहूंकडा कोंडियेला ॥ ३ ॥ चोखा म्हणे देव भावाचा बांधला । भक्तांचा अंकित म्हणूनी झाला ॥ ४ ॥

२२५४ देहीं देखिली पंढरी । आत्मा अविनाश विटेवरी ॥ १ ॥ तो हा पांडुरंग जाणा । शांति रुक्मिणी निजांगना ॥ २ ॥ आकारलें तितुकें नासे । आत्मा अविनाश विठ्ठल दिसे ॥ ३ ॥ ऐसा विठ्ठल हृदयीं ध्यायीं । चोखा मेळा जडला पायीं ॥ ४ ॥

२२५५ श्रवणाचें श्रवण घ्राणाचें जें घ्राण । रसने गोडपण विठ्ठल माझा ॥ १ ॥ वाचा जेणें उठी डोळा जेणें भेटी । इंद्रियांची राहाटी विठ्ठल माझा ॥ २ ॥ प्राण जेणें चळे मन जेणें वोळे । शून्यातें वेगळें विठ्ठल माझा ॥ ३ ॥ आनंदी आनंद बोधा जेणें बोध । सकळां आत्मा शुद्ध विठ्ठल माझा ॥ ४ ॥ मुळाचें निजमूळ अकुळाचें कुळ । चोखा म्हणे निजफळ विठ्ठल माझा ॥ ५ ॥

२२५६ निर्गुणा अंगीं सगुण वाणलें । निर्गुण सगुण एकत्वा आलें ॥ १ ॥ शद्वाची खूण जाणती ज्ञानी । येरा गावाळ अवघी काहाणी ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानदेव सोपान भले । निर्गुण सगुण त्याही गिळि-यलें ॥ ३ ॥ चोखा म्हणे त्यांच्या पायींची पादुका । वागवितो देखा ऐक्यपणें ॥ ४ ॥

२२५७ कोण तो सोंवळा कोण तो ओंवळा । दोहींच्या वेगळा विठ्ठल माझा ॥ १ ॥ कोणासी विटाळ कशाचा जाहला । मुळींचा संचला सोंवळाची ॥ २ ॥ पांचांचा विटाळ एकाचिया अंगा । सोंवळा तो जगामाजीं कोण ॥ ३ ॥ चोखा म्हणे माझा विठ्ठल सोंवळा । अरूपें आगळा विटेवरी ॥ ४ ॥

२२५८ पांडुरंगीं लागो मन । कोण चिंतन करी ऐसें ॥ १ ॥ देह-भाव विसरला । द्वैत गेला बुडोनी ॥ २ ॥ जीव उपाधि भक्ति बंध । तेथें भेद जन्मला ॥ ३ ॥ मुळींच चोखामेळा नाहीं । कैंचा राही विटाळ ॥ ४ ॥

---

# अद्वैत सगुण भक्तीपर

## श्रीनिवृत्तिमहाराज

२२५९ ज्या नाम अनंत न कळे संकेत । वेदाचाही हेत हारपला ॥ १ ॥ तें रूप सानुलें यशोदे तान्हुलें । भोगिती निमोलें भक्तजन ॥ २ ॥ अनंत अनिवार न कळे ज्याचा पार । जेथें चराचर होत जात ॥ ३ ॥ निवृत्तिसंकेत अनंताअनंत । कृष्णनामें पंथ मार्ग सोपा ॥ ४ ॥

२२६० अरूप बागडें निर्गुण संवगडे । खेळे लाडेंकोडें नंदाघरीं ॥ १ ॥ तें रूप संपूर्ण यशोदा खेळवी । कृष्णातें आळवी वेळोवेळां ॥ २ ॥ सागरजीवन सत्रावीची खूण । मेघ तो वर्षण वोळलासे ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन गोकुळीं श्रीकृष्णु । गयनी सहिष्णु प्रेमें डोले ॥ ४ ॥

२२६१ न साधे तें योगीं न संपडे जगीं । तो नंदाच्या वोसंगीं उत्संगीं खेळे ॥ १ ॥ कृष्ण माझा हरी खेळतो गोकुळीं । गोपिकीं सकळीं वेढियेला ॥ २ ॥ गाईचे कळप गोपाळ अमूप । खेळतसे दीप वैकुंठीचा ॥ ३ ॥ निवृत्ति दीपडें वैकुंठ साबडें । यशोदा तें कोडें चुंबन देतु ॥ ४ ॥

२२६२ हें व्यापुनि निराळा भोगी वैकुंठ सोवळा । नंदाघरीं गोवळा हरि माझा ॥ १ ॥ न साहे सगुण अवघाचि निर्गुण । तो कृष्ण आपण गोपाळसंगें ॥ २ ॥ गाई चारी हरि मोहरी खांद्यावरी । वेणु नानापरी वातु असे ॥ ३ ॥ निवृत्ति गयनी कृष्ण जप तो अमूप जाण । सांगितल्या खूण गोरक्षानें ॥ ४ ॥

२२६३ वेदबीज साचें समंत श्रुतीचें । गुह्य त्या शास्त्रांचें हरि माझा ॥ १ ॥ तो हरि खेळतु प्रत्यक्ष मूर्तिमंतु । दुष्टां मुक्ति देतु

जीवघातें ॥ २ ॥ अर्जुना साहाकारी द्रौपदी कैवारी। तो विदुराचे घरीं अन्न मागे ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन गोकूळीं श्रीकृष्णु। यादव सहिष्णु हरि माझा ॥ ४ ॥

२२६४ मध्यविंदनाद उन्मनीं स्वानंद। रूपस गोविंद गुणनिधी ॥ १ ॥ तें रूप सुरवर सेवितां अरुवार। नित्यता सविचार भोगितातो ॥ २ ॥ गौळिया गोजिरे दैवत सारें। नंदासी एकसरें प्रेम देतु ॥ ३ ॥ निवृत्ति निवाला प्रेमरसें धाला। सर्वसुख झेला हरि कृष्ण ॥ ४ ॥

२२६५ योगियांचें धन तें ब्रम्ह संपन्न। तो हा जनार्दन नंदाघरीं ॥ १ ॥ हरिरूप माये सर्वांघटीं आहे। दूध लोणी खाये गौळियांचें ॥ २ ॥ चिंतिता अजामेळा नाम आलें मुखा। तो वैकुंठींच्या सुखा देतु हरी ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन जगाचें जीवन। नाम नारायण तरणोपाय ॥ ४ ॥

२२६६ जेथुनि उद्गारु प्रसवे ॐकारु। तोचि हा श्रीधरु गोकुळीं वसे ॥ १ ॥ जनकु हा जगाचा जीवलगु साचा। तो हरी आमुचा नंदाघरीं ॥ २ ॥ न माये वैकुंठीं योगियांचे भेटी। पाहतां ज्ञानदृष्टी नये हाता ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे देवो म्हणवितां हे रावो। तो सुखानुभवो यादवांसी ॥ ४ ॥

२२६७ परेसि परता पश्यंतिवरुता। मध्यमे तत्वता न कळे हरी ॥ १ ॥ तें हें कृष्णरूप गौळियांचे तप। यशोदे समीप नंदाघरीं ॥ २ ॥ चोखट चोखाळ मनाचे मवाळ। कांसवींचा ढाळ जया नेत्रीं ॥ ३ ॥ निवृत्ति सर्वज्ञ गुरूची धारणा। ब्रह्म सनातनामाजिं मन ॥ ४ ॥

२२६८ खुंटले वेदांत हारपले सिध्दांत। बोलणें धादांत तेंही नाहीं ॥ १ ॥ तें रूप पाहतां नंदाघरीं पूर्ण। यशोदा जीवन कृष्णबाळ ॥ २ ॥ साधितां साधन न पविजे खूण। तो बाळरूपें कृष्ण नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति संपन्न सेवी गुरुकृपा। गयनीच्या द्वीपा तारूं गेलें ॥ ४ ॥

२२६९ वैकुंठ कैलास त्यामाजीं आकाश । आकाशीं अवकाश धरी आत्मा ॥ १ ॥ तें रूप सुघड प्रत्यक्ष उघड । गौळियासी कोड कृष्णरूप ॥ २ ॥ न दिसे निवासा आपरूपें दिशा । सर्वत्र महेशा आपरूपें ॥ ३ ॥ तारक प्रसिद्ध तीर्थ पैं स्वानंद । नामाचा उद्बोध नंदाघरीं ॥ ४ ॥ प्रकाशपूर्णता आदिमध्य सत्ता । नातळे तो द्वैता अद्वैतपणें ॥ ५ ॥ निवृत्ति स्वानंद कृष्णरूपें खूण । विश्वीं विश्वपूर्ण हरि माझा ॥ ६ ॥

२२७० गगनीं उन्मनीं वेद होती मौनी । श्रुतींची कहाणी अरुती ठाके ॥ १ ॥ तें ब्रम्ह सावडें नंदाचिये घरीं । वनीं गाई चारी गोपवेशें ॥ २ ॥ न पाहतां होय ब्रह्मांड पीठिका । तें युग क्षणिका हारपे रया ॥ ३ ॥ निवृत्ति दैवत कृष्ण परिपूर्ण । सर्वत्र जीवन सर्वीं वसे ॥ ४ ॥

२२७१ वैकुंठ दैवत देवा मुकुटमणी । ऐकिजे पुराणीं कीर्ति ज्याची ॥ १ ॥ तो हरि बाळक गोपिकां कौतुक । गोपाळ सकळिक संवगडे ॥ २ ॥ आदि शिवा जप जपतु असूप । तें प्रत्यक्ष स्वरूप नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति समाधि उगवली कळिका । तारी तिहीं लोकां एका नामें ॥ ४ ॥

२२७२ नामीं रूपी गोडी ब्रम्हांडाएवढी । द्वैताची परवडी हारपली ॥ १ ॥ तें रूप सुंदर कृष्ण सुकुमार । सेविती सुरवर भक्तराज ॥ २ ॥ विराट अनंतें ज्यामाजीं विरतें । नव्हेचि पुरतें शेषादिकां ॥ ३ ॥ निवृत्ति लक्ष्मी गरुड चिंतिती । तयाचिये मति आकळ हरी ॥ ४ ॥

२२७३ परेसि परता न कळे पैं शेषा । तो गौळिया अशेषामाजी हरी ॥ १ ॥ भाग्य पैं कळलें नंदाघरीं सये । यशोदा पैं माय परब्रह्माची ॥ २ ॥ गौळिये नांदती गोधनाचे कळप । त्यामाजिं स्वरूप

कृष्णमूर्ति ॥ ३ ॥ निवृत्तीचें ध्यान गोपाळ आमुचा। आतां जन्म कैंचा भक्तजनां ॥ ४ ॥

२२७४ ज्या रूपाकारणें वोळंगती सिद्धी। हारपती बुद्धी शास्त्राचिया ॥ १ ॥ तें रूप साजिरें गोकुळीं गोजिरें। यशोदे सोपारें कडिये शोभे ॥ २ ॥ न संपडे त्रिभुवनीं नाकळे साधनीं। नंदाच्या अंगणीं खेळे हरी ॥ ३ ॥ निवृत्ति निधडा रूप चहूंकडा। गोपाळ बागडा गोकुळीं वसे ॥ ४ ॥

२२७५ हा पुरुष कीं नारी नव्हे तो रूपस। शेखी जगदीश जगद्रूपें ॥ १ ॥ तें हें कृष्णरूप यशोदे कडीये। नंदाघरीं होये बाळरूप ॥ २ ॥ ज्यातें नेणें वेद नेणती त्या श्रुती। त्या गोपीका भोगिती कामरूपें ॥ ३ ॥ निवृत्तीचें ब्रह्म कृष्णनामें खेळे। असंख्य गोवळे ब्रह्मरूपीं ॥ ४ ॥

२२७६ चतुरानन घन अनंत उपजती। देवो देवो किती तयामाजीं ॥ १ ॥ तोंचि हें सांवळें अंकुरलें ब्रह्म। गोपसंगें सम वर्तेस्या ॥ २ ॥ निगमा नाठवे वेदांचा द्योतकु। तो चतुर्भुज वंशु नंदाघरीं ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे शंखचक्रांकित मूर्ती। आपण श्रीपती क्रीडतुसे ॥ ४ ॥

२२७७ ज्या रूपाकारणें देव ओळगणें। योगी गुरुखुणे सेविताती ॥ १ ॥ तें रूप गोकुळीं गोपाळांचे मेळीं। अखंड समेळीं खेळतुसे ॥ २ ॥ ब्रह्मांड कडोविकडी ब्रह्मांड घडी। या योगपरवडी हारपती ॥ ३ ॥ निवृत्तीचा तारू गोपाळ नंदाचा। यशोदे देवकीचा लाभ थोरू ॥ ४ ॥

२२७८ अनंतरूप देव अनंत आपण। अंतर्बाह्य खूण योगियांसी ॥ १ ॥ तो हा हरी माये गोकुळीं अवतार। गोपिसंगें श्रीधर खेळतुसे ॥ २ ॥ शास्त्रांसि नाकळे श्रुतींही वरळे। तो गोपवेषें खेळे

गोपाळामाजीं ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार गयनी विचार । ब्रह्म चराचर माजी वसे ॥ ४ ॥

२२७९ चिंतितां साधक मनासि नाकळे । तो गोपिका आकळे करितां ध्यान ॥ १ ॥ देखिला गे माये सगुणनिर्गुणनिधी । यशोदा गोविंदीं प्रेमपान्हा ॥ २ ॥ न माये सर्वांघटीं आपणची सृष्टी । तो यमुनेच्या तटीं गायी चारी ॥ ३ ॥ निवृत्ति साधन कृष्णाचें रूपडें । ब्रह्मांडाएवढें तदाकार ॥ ४ ॥

---

# स्थितीपर

## श्रीतुकाराममहाराज

२२८० असा जी सोवळे । आम्हां तैसेचि निराळे ॥ १ ॥ आम्ही नयों तुमच्या वाटा । काय लटिकाचि ताठा ॥ २ ॥ चिंतनचि पुरे । काय सलगी सवें धुरे ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । नका नावडे ते सेवा ॥ ४ ॥

२२८१ अपराधी म्हणोनि येतों काकुळती । नाहीं तरी होती काय चाड ॥ १ ॥ येईल तारूं तरी तारा जी देवा । नाहीं तरी सेवा घ्या वो भार ॥ २ ॥ कासया मी आतां वंचु हें शरीर । आहे वारगीर जायजणें ॥ ३ ॥ तुका म्हणे मन करूनि मोकळें । आहे साळढाळें उदार मी ॥ ४ ॥

२२८२ अनाथां जीवन । आम्हां तुमचे चरण । करूनि सांठवण । धरियेले हृदयीं ॥ १ ॥ पुष्ट झाली अंगकांति । आनंद न समाये चित्तीं । कवतुकें प्रीती । गाऊं नाचों उल्हासें ॥ २ ॥ करुणा उत्तरीं । करूं आळवण हरी । जाऊं नेदूं दुरी । प्रेमप्रीति पडिभरें ॥ ३ ॥ मोहो माते करी गोवा । ऐसें आहे जी केशवा । तुका म्हणे सेवा । आणिक नाहीं जाणत ॥ ४ ॥

२२८३ असोत हे तुझे प्रकार सकळ । काय खळखळ करावी हे ॥ १ ॥ आमुचें स्वहित जाणतसों आम्ही । तुझें वर्म नामीं आहे तुझ्या ॥ २ ॥ विचारितां आयुष्य जातें वायांविण । रोज नागवण पडतसे ॥ ३ ॥ राहेन मी तुझे पाय आठवूनी । आणीक तें मनी येऊं नेदीं ॥ ४ ॥ तुका म्हणे तेथें येसी अनायासें । थोर तुज पिसें कीर्तनाचें ॥ ५ ॥

२२८४ अवचित या तुमच्या पायां । देवरायां पावलों ॥ १ ॥ बरवें झालें देशाउर । आल्या दूर सारिखें ॥ २ ॥ राहोनिया जातों ठाया । आलियाची निशाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे चरणसेवा । जोडी हेवा लाधली ॥ ४ ॥

२२८५ आतां येणे पडिपाडें । रस सेवूं हा निवाडें । मुंगीं नेली गोडें । ठेविलिये अडचणी ॥ १ ॥ तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडीं केशवा । विषयबुद्धी हेवा । वोस पडो सकळ ॥ २ ॥ भुके-लिया श्वाना । गांठ पडे सवें अन्ना । मुकों पाहे प्राणा । परि तोंडिचें न सोडी ॥ ३ ॥ काय जिंकियलें मन । जीवित्व कामातुरा तृण । मागें व्यभिचारीण । भक्ती तुका ये जाती ॥ ४ ॥

२२८६ आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलीया ॥ १ ॥ भाग गेला शीण गेला । अवघा झाला आनंद ॥ २ ॥ प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हांजोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥ ४ ॥

२२८७ आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम ॥ १ ॥ आयुष्य मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ २ ॥ अमृताची खाणी । यांचे ठायीं वेचूं वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवाच्या जिवलगा ॥ ४ ॥

२२८८ आहे तैसा आतां आहे ठायीं बरा । ठेविलों दातारा उचि-तें त्या ॥ १ ॥ वचनाचा भार पडिलिया शिरीं । जालें मग भारी

उतरेना ॥ २ ॥ अबोल्याची सवे लाउनिया मना । फांको नेदूं गुणां ऐसें करूं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां गोवळ्यांचा संग । राखतें तें अंग जाणतसों ॥ ४ ॥

२२८९ आतां तुझें नाम गात असे गीतीं । म्हणोनि मानिती लोक मज॥१॥ अन्न वस्त्रचिंता नाहीं या पोटाची। वारिली देहाची थोर पीडा ॥२॥ सज्जन संबंधी तुटली उपाधि । रोकडी या वंदी सुटलोंसें ॥३॥ घ्यावा द्यावा कोणें करावा सायास। गेले आशापाश वारोनियां ॥४॥ तुका म्हणे तुज कळेल तें आतां। करा जी अनंता मायबापा ॥ ५ ॥

२२९० आतां भय नाहीं ऐसें वाटे जीवा। घडलिया सेवा समर्थाची ॥ १ ॥ आतां माझ्या मनें धरावा निर्धार। चिंतनीं अंतर न पडावें ॥ २ ॥ येथें नाहीं झाली कोणाची निरास । आल्या याचकास कृपेविशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें नाहीं दुजी परी। राया रंका सरी देवापायीं ॥ ४ ॥

२२९१ आतां सर्वभावें हा माझा निर्धार । न करीं विचार आणिकांसीं ॥ १ ॥ सर्वभावें नाम गाईन आवडी । सर्व माझी जोडी पाय तुझे ॥ २ ॥ लोटांगण तुझ्या घालीन अंगणीं । पाहीन भरोनी डोळे मुख ॥ ३ ॥ निर्लज्ज होऊनी नाचेन रंगणीं। येऊं नेदीं मनीं शंका कांहीं ॥ ४ ॥ अंकित अंकिला दास तुझा देवा । संकल्प हा जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

२२९२ आतां येथें झाली जीवासवें साटी। होतें तैसें पोटीं फळ आलें ॥ १ ॥ आतां धरिलें तें न सोडीं चरण। सांपडलें धन निज-ठेवा ॥ २ ॥ आतां हा आळस असो परता दुरी। नेदावी ते उरी उरों कांहीं ॥ ३ ॥ आतां याचा मज न व्हावा विसर। भरोनि अंतर राहो रूप ॥ ४ ॥ आतां लोकलाज नयो येथें आड । बहु झालें गोड ब्रम्ह-रस ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥ ६ ॥

२२९३ आतां आम्हां हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम । वाहुनियां टाळी प्रेम- । सुखें आनंदें नाचावें ॥ १ ॥ अवघी झाली आराणूक । मागें पुढें सळाळिक । त्रिपुटीचें दुःख । प्रारब्ध सारिलें ॥ २ ॥ गोदातटें निर्मळें । देव देवाचीं देउळें । संत महंत मेळे । दिवस जाय सुखाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे पंढरीनाथा । आणिक नाहीं मज चिंता । योगक्षेम माथां । भार तुझ्या घातला ॥ ४ ॥

२२९४ आतां गाऊं तुज ओविया मंगळीं । करूं गदारोळी हरिकथा ॥ १ ॥ होसी निवारिता आमुचें सकळ । भय तळमळ पापपुण्य ॥ २ ॥ भोगिले ते भोग लावूं तुझे अंगीं । अलिप्त या जगीं होउनी राहों ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही लाडकीं लेंकुरें । न राहों अंतरें पायाविण ॥ ४ ॥

२२९५ आम्ही सर्वकाळ कैंचीं सावधान । व्यवसायें मन अभ्यासलें ॥ १ ॥ तरी म्हणा मोट ठेविली चरणीं । केलीं गुणागुणीं कासावीस ॥ २ ॥ याचे कानसुलीं मारितसें हाका । मज घालूं नका आतां मधीं ॥ ३ ॥ तुका म्हणे निद्रा जागृति सुषुप्ति । तुम्ही हो श्रीपती साक्षी येथें ॥ ४ ॥

२२९६ आम्ही असों निश्चिंतीनें । एकया गुणें तुमाचिया ॥ १ ॥ दुराचारी तरले नामें । घेतां प्रेमें म्हणोनी ॥ २ ॥ नाहीं तुम्हां धांव घेतां । कृपावंता आळस ॥ ३ ॥ तुका म्हणे विसरूं काई । तुज वो आई विठ्ठले ॥ ४ ॥

२२९७ आम्हांसी सांगाती । अराले तेचि होती ॥ १ ॥ येती आइकतां हाक । दोन मिळोन म्हणती एक ॥ २ ॥ आणिकां उत्तरीं । नसे गोविली वैखरी ॥ ३ ॥ तुका म्हणे बोल । खूण पहाती विठ्ठल ॥ ४ ॥

२२९८ आम्हां घरीं धन शब्दाचींच रत्नें । शब्दांचींच शस्त्रें यत्न करूं ॥ १ ॥ शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन

जनलोकां ॥ २ ॥ तुका म्हणे पहा शब्दचि हा देव । शब्दींचि गौरव पूजा करूं ॥ ३ ॥

२२९९ आम्हांसी सकळ । तुझ्या नामाचेंचि बळ ॥ १ ॥ करूं अमृताचें पान । दुजें नेणों कांहीं आन ॥ २ ॥ जयाचा जो भोग । सुख दुःख पीडा रोग ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । तुझे पायीं माझा हेवा ॥ ४ ॥

२३०० आम्ही मागों ऐसें नाहीं तुजपाशीं । जरी तूं भितोसी पांडुरंगा ॥ १ ॥ पाहें विचारूनि आहे तुज ठावें । आम्ही धालों नांवें तुझ्या एका ॥ २ ॥ ऋद्धिसिद्धि तुझें मुख्य भांडवल । हें तों आम्हां फोल भक्तीपुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे जाऊं वैकुंठा चालत । वैसोनि निवांत सुख भोगूं ॥ ४ ॥

२३०१ उतरलों पार । सत्य झाला हा निर्धार ॥ १ ॥ तुझें नाम धरिलें कंठीं । केली संसाराची तुटी ॥ २ ॥ आतां नव्हे बाधा । कोणेविशी कांहीं कदा ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं । आतां उरलें ऐसें नाहीं ॥ ४ ॥

२३०२ एकीं केली हातोफळी । ठाया बळी पावले ते ॥ १ ॥ आम्हीं देवा शक्तिहीनें । भाकूं तेणें करुणा ॥ २ ॥ पावटणीं केला काळ । जया बळ होतें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे वीरा वीर । संतधीर समुद्र ॥ ४ ॥

२३०३ कपट कांहीं एक । नेणें भुलवायाचें लोक ॥ १ ॥ तुमचें करितों कीर्तन । गातों उत्तम ते गुण ॥ २ ॥ दाऊं नेणें जडीबुटी । चमत्कार उठाउठी ॥ ३ ॥ नाहीं शिष्यशाखा । सांगों अयाचित लोकां ॥ ४ ॥ नव्हे मठपति । नाहीं चाहुरांची वृत्ति ॥ ५ ॥ नाहीं देवार्चन । असे मांडिलें दुकान ॥ ६ ॥ नाहीं वेताळ प्रसन्न । कांहीं सांगों खाणखूण ॥ ७ ॥ नव्हें पुराणिक । करणें सांगणें आणिक । ॥ ८ ॥ नेणें वाद घटा पटा । करितां पंडित करंटा ॥ ९ ॥ नाहीं

जाळीत भणदी । उदो म्हणोनि आनंदीं ॥१०॥ नाहीं हालवीत माळ । भोंवतें मेळवुनी गाबाळ ॥ ११ ॥ आगमींचें कुडें नेणें । स्तंभन मोहन उच्चाटणें ॥ १२ ॥ नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥

२३०४ कुमुदिनी काय जाणे तो परिमळ । भ्रमर सकळ भोगीतसे ॥ १ ॥ तैसें तुज ठावें नाहीं तुझें नाम । आम्हीच तें प्रेमसुख जाणों ॥ २ ॥ माते तृण बाळा दुग्धाची ते गोडी । ज्याची नये जोडी त्यासी कामा ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्ताफळ शिंपीपोटीं । नाहीं त्याची भेटी भोग तिये ॥ ४ ॥

२३०५ कराल तें करा । हातें आपुल्या दातारा ॥ १ ॥ बळियाचीं आम्ही बाळें । असों निर्भर या सळें ॥ २ ॥ आतां कोठें काळ । मधीं रिघेल ओंगळ ॥ ३ ॥ तुका म्हणे पंढरीराया । थापटितों ठोक बाह्या ॥ ४ ॥

२३०६ करीं धंदा परी आवडती पाय । प्रीती सांगों काय नेणां देवा ॥ १ ॥ रूप डोळां देखें सदासर्वकाळ । संपादितों आळ प्रपंचाचा ॥ २ ॥ नेमून ठेविली काया हे कारणीं । आमुचिये वाणी गुण वदे ॥ ३ ॥ मनासी उत्कंठा दर्शनाचा हेवा । नाहीं लोभ जीवा धनधान्य ॥ ४ ॥ उसंतितों पंथ वेठीचियापरी । जीवनसूत्र दोरीपाशीं ओढ ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसें करितों निर्वाण । जीव तुम्हां भिन्न नाहीं माझा ॥ ६ ॥

२३०७ करुनी राहों जरि आत्माचि प्रमाण । निश्चळ नव्हे मन काय करूं ॥ १ ॥ जेविलियाविण काशाचे ढेंकर । शब्दाचे प्रकार शब्दाचि ते ॥ २ ॥ पुरे पुरे आतां तुमचें ब्रह्मज्ञान । आम्हांसी चरण न सोडणें ॥ ३ ॥ विरोधें विरोध वाढे पुढतांपुढतीं । वासनेचे हातीं गर्भवास ॥ ४ ॥ सांडीमांडी अंगीं वसे पुण्यपाप । बंधन संकल्प

याचि नांवें ॥ ५ ॥ तुका म्हणे नाहीं मुक्तता मोकळी । ऐसा कोण बळी निरसी देह ॥ ६ ॥

२३०८ कळेल हें तैसें गाईन मी तुज । जनासवें काज काय माझें ॥ १ ॥ करीन मी स्तुति आपुले आवडी । जैसी माझ्या गोडी वाटे जीवा ॥ २ ॥ होऊनि निर्भर नाचेन मी छंदें । आपुल्या आनंदें करूनियां ॥ ३ ॥ काय करूं कळा युक्ति या कुसरी । जाणिवेच्या परी सकळिका ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें जयासवें काज । भोळा तो सहज पांडुरंग ॥ ५ ॥

२३०९ काय मागावें कवणासी । ज्यासी मागों तो मजपासीं ॥ १ ॥ जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥ २ ॥ जरी मागों ध्रुवपद । तरी त्यासी येथील छंद ॥ ३ ॥ स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें ॥ ४ ॥ आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥ ५ ॥ तुका म्हणे एक मागें । एकपणा नाहीं भंग ॥ ६ ॥

२३१० काय सांगों तुझ्या चरणांच्या सुखा । अनुभव ठाउका नाहीं तुज ॥ १ ॥ बोलतां हें कैसें वाटे खरेपण । अमृताचे गुण अमृतासी ॥ २ ॥ आम्ही एक एका ग्वाही मायपुरतें । जाणों तें निरुतें सुख दोघें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां मोक्षाचा कांटाळा । कां तुम्ही गोपाळा नेणां ऐसें ॥ ४ ॥

२३११ काय ऐसा जन्म जावा वायांविण । कांहीं तरी ऋण असो माथां ॥ १ ॥ कोणे तरी काळें होईल आठव । नाहीं जरी भाव भार खरा ॥ २ ॥ शता एका तरी जन्माच्या शेवटीं । कृपाळुवा पोटीं येईल दया ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं फांकों तरी देत । सर्वांचें उचित सांपडलें ॥ ४ ॥

२३१२ कांहीं जडभारी । पडतां ते अवसरीं ॥ १ ॥ तुझे आठवावे पाय । आम्हीं मोकलूनि धाय ॥ २ ॥ तान पीडी भूक । शीत उष्ण

वाटे दुःख ॥ ३ ॥ तुका म्हणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

२३१३ कोठें भोग उरला आतां। आठवितां तुज मज ॥ १ ॥ आड कांहीं नये दुजें । फळ बीजें आणिलें ॥ २ ॥ उद्वेग ते वायांविण । कैंचा सीण चिंतनें ॥ ३ ॥ तुका म्हणे गेला भ्रम । तुमच्या धर्मे पायांच्या ॥ ४ ॥

२३१४ कोठें देवा आले अंगा थोरपण । बरें होतें दीन होतों तरी ॥ १ ॥ साधन ते सेवा संतांची उत्तम । आवडीनें नाम गाइजे तें ॥ २ ॥ न पुसतें कोणी कोठेंही असतां । समाधान चित्ताचिया सुखें ॥ ३ ॥ तुका म्हणे जन अव्हेरितें मज । तरी केशीराज सांभाळिता ॥ ४ ॥

२३१५ खावें ल्यावें द्यावें । जमाखर्च तुझ्या नांवें ॥ १ ॥ आतां चुकली खटपट । झाड्यापाड्याचा बोभाट ॥ २ ॥ आहे नाहीं त्याचें । आम्हां काम सांगायाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे चिंता । भार वाहे त्याचे माथां ॥ ४ ॥

२३१६ गाऊं नेणें कळाकुसरी । कान धरोनि म्हणे हरी ॥ १ ॥ माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें वा विठ्ठला ॥ २ ॥ मज हांसतील लोक । परी मी गाईन निःशंक ॥ ३ ॥ तुझें नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥ ४ ॥ तुका म्हणे माझी विनंति । तुम्ही परिसा कमळापति ॥ ५ ॥

२३१७ घेईन मी जन्म याजसाठीं देवा । तुझी चरणसेवा साधावया ॥ १ ॥ हरिनामकीर्तन संतांचें पूजन । घालीन लोटांगण महाद्वारीं ॥ २ ॥ आनंदें निर्भर असों भलते ठायीं । सुखदुःखा नाहीं चाड आम्हां ॥ ३ ॥ आणीक सायास न करीं न धरीं आस । होईन उदास सर्वभावें ॥ ४ ॥ मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी । होय सांगों तैसी तुका म्हणे ॥ ५ ॥

२३१८ जाणावें तें काय नेणावें ते काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ १ ॥ करावें तें काय न करावें तें काय । ध्यावे तुझे पाय

हेंचि सार ॥ २ ॥ बोलावें तें काय न बोलावें तें काय । ध्यावे तुझे पाय हेंचि सार ॥ ३ ॥ जावें तें कोठें न जावें तें आतां । बरवें आठवितां नाम तुझें ॥ ४ ॥ तुका म्हणे तूं करिसी तें सोपें । पुण्यें होती पापें आमुच्या मतें ॥ ५ ॥

२३१९ झालें समाधान । तुमचे देखिले चरण ॥ १ ॥ आतां उठावेसें मना । येत नाहीं नारायणा ॥ २ ॥ सुरवाडिकपणें । येथें सांपडलें केणें ॥ ३ ॥ तुका म्हणे भोग । गेला निवारला लाग ॥ ४ ॥

२३२० तरीच हा जीव संसारीं उदास । धरिला विश्वास तुम्हां सोई ॥ १ ॥ एके जातीविण नाहीं कळवळा । ओढली गोपाळा सूत्रदोरी ॥ २ ॥ फुटतसे प्राण क्षणाच्या विसरें। हें तों परस्परें सारिखेंचि ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं राखिला अनुभव । तेणें हा संदेह निवारला ॥ ४ ॥

२३२१ तुजविण कोणा । शरण जाऊं नारायणा ॥ १ ॥ ऐसा न देखें मी कोणी । दुजा तिहीं त्रिभुवनीं ॥ २ ॥ पाहिलीं पुराणें । धांडोळिलीं दरुषणें ॥ ३ ॥ तुका म्हणे ठायीं । जडून ठेलों तुझ्या पायीं ॥ ४ ॥

२३२२ तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं ॥ १ ॥ कळों आलें बहुतां रीति । पांडुरंगा माझ्या चित्तीं ॥ २ ॥ मोकलिली आस । सर्वभावें झालों दास ॥ ३ ॥ तुका म्हणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥ ४ ॥

२३२३ तुज दिला देह । अजूनि वागवितों भय ॥ १ ॥ ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥ २ ॥ बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभविलें लंडें ॥ ३ ॥ दंड लाहे केला । तुका म्हणे जी विठ्ठला ॥ ४ ॥

२३२४ तुज पहावें हे धरितों वासना । परि आचरणा नाहीं ठाव ॥ १ ॥ करिसी कैवार आपुलिया रुत्ता । तरीच देखता होईन

पाय ॥ २ ॥ बाहिरल्या वेषें उत्तम दंडिलें । भीतरीं मुंडिलें नाहीं तैसें ॥ ३ ॥ तुका म्हणे वायां गेलोंच मी आहें । जरी तुम्ही साह्य नव्हा देवा ॥ ४ ॥

२३२५ तुमच्या पाळणा ओढतसे मन । गेलें विसरोन आपणासी ॥ १ ॥ लागेल पालटें फेडावें उसनें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥ २ ॥ तुमचे आवडी संबंधाचा त्याग । घेतला ये लाग जगनिंदेचा ॥ ३ ॥ तुका म्हणे जैसा माझा जीव ओढे । तैसेंच तिकडे पाहिजेल ॥ ४ ॥

२३२६ तुझें वर्म ठावें । माझ्या पाडियेलें भावें ॥ १ ॥ रूप कासवाचे परी । धरूनि राहेन अंतरीं ॥ २ ॥ नेदी होऊं तुटी । मेळवीन दृष्टादृष्टी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । चिंतन तें तुझी सेवा ॥ ४ ॥

२३२७ तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं ॥ १ ॥ मुखीं नाम धरिन कंठीं । अवघा सांठवीन पोटीं ॥ २ ॥ नवविधा वेढिन आधीं । सांपडलासी भावासंधी ॥ ३ ॥ तुका म्हणे वळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ ४ ॥

२३२८ तुझें नाम गाऊं आतां । तुझ्या रंगीं नाचों था था ॥ १ ॥ तुझ्या नामाचा विश्वास । आम्हां कैंचा गर्भवास ॥ २ ॥ तुझें नामीं विसर पडे । तरी कोटी हत्त्या घडे ॥ ३ ॥ नाम घ्यारे कोणी फुका । भावें सांगतसे तुका ॥ ४ ॥

२३२९ तूं माझी माउली तूं माझी साउली । पाहतों वाटुली पांडुरंगे ॥ १ ॥ तूं मज येकला वडील धाकुला । तूं मज आपुला सोइरा जीव ॥ २ ॥ तुका म्हणे जीव तुजपाशीं असे । तुजविण ओस सर्व दिशा ॥ ३ ॥

२३३० तैसे नव्हों आम्ही विठ्ठलाचे दास । यावें आणिकांस काकुळती ॥ १ ॥ स्वामीचिया सत्ता ठेंगणें सकळ । आला कळि-

काळ हाताखालीं ॥ २ ॥ अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां इच्छेचें खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ४ ॥

२३३१ त्यागें भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥ १ ॥ आतां असो तुझ्या पायीं हें मोटळें । इंद्रियें सकळें काया मन ॥ २ ॥ सांडी मांडी विधिनिषेधाचा ठाव । न कळतां भाव जाईल वायां ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥ ४ ॥

२३३२ देखोनियां तुझा सगुण आकार । उभा कटीं कर ठेवुनियां ॥ १ ॥ तेणें माझ्या चित्ता होय समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ २ ॥ मुखें गातों गीत वाजवितों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ ३ ॥ तुका म्हणे केलें तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥ ४ ॥

२३३३ न कळे तत्त्वज्ञान मूढ माझी मति । परी ध्यातों चित्तीं चरणकमळ ॥ १ ॥ आगमाचे भेद मी तों काय जाणें । काळ तो चिंतनें सारीतसें ॥ २ ॥ कांहीं नेणें परी म्हणवितों दास । होइल त्याचा त्यास अभिमान ॥ ३ ॥ संसाराची सोय सांडिला मारग । दुराविलें जग एका घायें ॥ ४ ॥ मागिल्या लागाचें केलेसें खंडण । एकाएकीं मन राखियेलें ॥ ५ ॥ तुका म्हणे अगा रखुमादेवीच्या वरा । भक्तकरुणाकरा सांभाळावें ॥ ६ ॥

२३३४ नलगे पहावें अबद्ध वांकडें । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ १ ॥ नाहीं वेळ काळ पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ २ ॥ पुराणींही कोठें न मिळे पाहतां । तैशीं या अनंता ठेवूं नामें ॥ ३ ॥ आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथेकाळीं ॥ ४ ॥ तुका म्हणे आम्ही आनंदेंचि धालों । आनंदाचि ल्यालों अळंकार ॥ ५ ॥

२३३५ नाम घेतां मन निवे । जिव्हे अमृताचि स्रवे । होताती बरवे । ऐसे शकुन लाभाचे ॥ १ ॥ मन रंगलें रंगलें । तुझ्या चरणीं स्थिरावलें । केलिया विठ्ठलें । ऐसी कृपा जाणावी ॥ २ ॥ जालें भोजनसें दिसे । चिरा पडोनी ठेला इच्छे । धालियाच्या ऐसे । अंगा येती उद्गार ॥ ३ ॥ सुख भेटों आलें सुखा । निध्र सांपडला मुखा । तुका म्हणे लेखा । आतां नाहीं आनंदा ॥ ४ ॥

२३३६ निरोधती परी न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥ १ ॥ राहतेति तुम्ही भरोनि अंतरीं । होतों तदाकारी निर्विषयचि ॥ २ ॥ कृपेचिया साक्षी असती जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे ताळा मेळवणीपाशीं । विनंति पायांपाशीं हेचि करीं ॥ ४ ॥

२३३७ नाहीं कंटाळलों परी वाटे भय । करावें तें काय न कळतां ॥ १ ॥ जन वन आम्हां समानाचि झालें । कामक्रोध केले पावटणीं ॥ २ ॥ षडऊर्मी शत्रु जिंकिले अनंता । नामाचिया सत्तावळें तुझ्या ॥ ३ ॥ मुख्य धर्म आम्हां सेवकांचा ऐसा । स्वामी करी शिरसा पाळावें तें ॥ ४ ॥ म्हणवूनि तुका अवलोकूनि पाय । वचनाची पाहे वास एका ॥ ५ ॥

२३३८ नेणें गाणें कंठ नाहीं हा सुस्वर । घालूं तुज भार पांडुरंगा ॥ १ ॥ नेणें राग वेळ काळ घात मात । तुझे पायीं चित्त ठेवीं देवा ॥ २ ॥ तुका म्हणे मज चाड नाहीं जना । तुज नारायणा वांचूनियां ॥ ३ ॥

२३३९ नेणती वेदश्रुती कोणी । आम्हां भाविकांवांचुनी ॥ १ ॥ रूप आवडे आम्हांसी । तैसी जोडी हृषीकेशी ॥ २ ॥ आम्ही भावें बळिवंत । तुज घालूं हृदयांत ॥ ३ ॥ तुका म्हणे तुज धाक । देतां पावसील हाक ॥ ४ ॥

२३४० पवित्र होईन चरित्र उच्चारें । रूपाच्या आधारें गोजि-

रिया ॥ १ ॥ अपुरती बुद्धी पुण्य नाहीं गांठीं। पायीं घाली मिठी पाहे डोळां ॥ २ ॥ गाइन ओविया शिष्टांच्या आधारें। सारीन विचारें आयुष्या या ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझें नाम नारायणा। ठेवीन मी मना आपुलिया ॥ ४ ॥

२३४१ बरा देवा कुणबी केलों। नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥१॥ भलें केलें देवराया। नाचे तुका लागे पायां ॥२॥ विद्या असती कांहीं। तरी पडतों अपायीं ॥ ३ ॥ सेवा चुकतों संतांची। नागवण हे फुकाची ॥ ४ ॥ गर्व होता ताठा। जातों यमपंथें वाटा ॥ ५ ॥ तुका म्हणे थोरपणें। नरक होती अभिमानें ॥ ६ ॥

२३४२ बहु उतावीळ भक्तीचिया काजा। होसी केशीराजा मायबापा ॥ १ ॥ तुझ्या पायीं मज झालासे विश्वास। म्हणोनियां आस मोकलिली ॥ २ ॥ ऋषिमुनि सिद्ध साधक अपार। कळला विचार त्यांसी तुझा ॥ ३ ॥ नाहीं नास तें सुख दिलें त्यांस। झाले जे उदास सर्वभावें ॥ ४ ॥ तुका म्हणे सुख न माये मानसीं। धरिले जीवेंसीं पाय तुझे ॥ ५ ॥

२३४३ बैसों खेळूं जेऊं। तेथें नाम तुझें गाऊं ॥ १ ॥ रामकृष्ण नाममाळा। घालूं ओवूनियां गळां ॥ २ ॥ विश्वास हा धरूं। नाम बळकट करूं ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां। आम्हां जीवन शरणांगतां ॥ ४ ॥

२३४४ बोलोनियां काय दावूं। तुम्ही जीऊ जगाचे ॥ १ ॥ हेंचि आतां माझी सेवा। चिंतन देवा करितों ॥ २ ॥ विरक्तासी देह तुच्छ। नाहीं आस काशाची ॥ ३ ॥ तुका म्हणे पायांपाशीं। येईन ऐसी वासना ॥ ४ ॥

२३४५ मज कोणी कांहीं करी। उमटे तुमच्या अंतरीं ॥ १ ॥ त्याला वाढविलें म्हूण। मज सुख तुज शीण ॥ २ ॥ माझें पोट धालें। तुझे अंगीं उमटलें ॥ ३ ॥ तुका म्हणे खेळे। तेथें तुमाचिया बळें ॥ ४ ॥

२३४६ मज माझा उपदेश । आणिकां नये याचा रीस ॥ १ ॥ तुम्ही अवघे पांडुरंग । मीच दुष्ट सकळ चांग ॥ २ ॥ तुमचा मी शरणागत । कांहीं करा माझें हित ॥ ३ ॥ तुका पाय धरी । मी हें माझें दूर करीं ॥ ४ ॥

२३४७ माझें मन पाहे कसून । चित्त न ढळे तुजपासून ॥ १ ॥ कापुनियां देईन शिर । पाहें कृपण कीं उदार ॥ २ ॥ मजवरी घाली घण । परी मी न सोडी चरण ॥ ३ ॥ तुका म्हणे अंतीं । तुजवांचुनी नाहीं गती ॥ ४ ॥

२३४८ माझें मागणे ते किती । दाता लक्ष्मीचा पती ॥ १ ॥ जाणे तान्हेल्याची तान । पीतां गंगा नव्हे न्यून ॥ २ ॥ कल्पतरू झाला देता । तेथें पोटाचा मागता ॥ ३ ॥ तुका म्हणे सतत ध्यातां । परब्रह्मचि आलें हाता ॥ ४ ॥

२३४९ म्हणवितों दास ते नाहीं करणीं । आंत वरी दोन्ही भिन्न भाव ॥ १ ॥ गातों नाचतों तें दाखवितों जनां । प्रेम नारायणा नाहीं अंगीं ॥ २ ॥ पाविजे तें वर्म न कळेची कांहीं । बुडालों या डोहीं दंभाचिया ॥ ३ ॥ भांडवल काळें हातोहातीं नेलें । माप या लागलें आयुष्यासी ॥ ४ ॥ तुका म्हणे वायां गेलों ऐसा दिसे । होईल या हांसे लौकिकाचे ॥ ५ ॥

२३५० याजसाटीं वनांतरा । जातों सांडुनियां घरा ॥ १ ॥ माझें दिठावेल प्रेम । बुद्धी होईल निष्काम ॥ २ ॥ अद्वैताची वाणी । नाहीं ऐकत मी कानीं ॥ ३ ॥ तुका म्हणे अहंब्रम्ह । आड येवो नेदी भ्रम ॥ ४ ॥

२३५१ यातीहीन मज काय तो अभिमान । मानी तुज जन नारायणा ॥ १ ॥ काय सुख मज तयाची हे खंती । आपुलाला घेती गुणभाव ॥ २ ॥ द्रव्यामुळें माथां वाहियेली चिंधी । होन जयामधीं होता गांठी ॥ ३ ॥ तुका म्हणे जन वंदितो वेगळा । मजसी दुर्बळा काय चाड ॥ ४ ॥

२३५२ रामकृष्ण ऐसीं उच्चारीन नामें। नाचेन मी प्रेमे संतांपुढें॥१॥ काय घडेल ते घडो ये सेवटीं। लाभ आणि तुटी देव जाणे ॥ २ ॥ चिंता मोह आशा ठेवुनि निराळीं। देईन हा बळी जीव पायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं उरो नेदी उरी। सांडीन हे थोरी ओंवाळूनि ॥ ४ ॥

२३५३ रोजकीर्दी जमा धरूनी सकळ। खताविला काळ बराबरी ॥ १ ॥ नाहीं होत झाड्यापाड्याचें लिगाड। हुजरातीं तें गोड सेवा रुजू ॥ २ ॥ चोरासाठीं रद्‌बदल अट्टाहास। जळो जिणें दास्य बहुतांचें ॥ ३ ॥ सावधान तुका निर्भर मानसीं। सालझाड्यापाशीं गुंफों नेणें ॥ ४ ॥

२३५४ लाज वाटे मज मानिती हे लोक। हें तों नाहीं एक माझे अंगीं ॥ १ ॥ मोजुनी झिजलों मापाचियापरी। जाळावी हे थोरी लाभाविण ॥ २ ॥ कोमळ कंटक तीक्ष्ण अगरीं। पोंचट ते वरी अंगकांति ॥ ३ ॥ चित्रींचें लेप श्रृंगारिलें निकें। जीवेंवीण फिकें रूप त्याचें ॥ ४ ॥ तुका म्हणे दिसे वायां गेलों देवा। अनुभव ठावा नाहीं तेणें ॥ ५ ॥

२३५५ लोक म्हणती मज देव। हा तों अधर्म उपाव ॥ १ ॥ आतां कळेल तें करी। शीस तुझे हातीं सुरी ॥ २ ॥ अधिकार नाहीं। पूजा करिती तैसा कांहीं ॥ ३ ॥ मन जाणे पापा। तुका म्हणे मायबापा ॥ ४ ॥

२३५६ वाचेच्या चापल्यें बहु झालों कुशळ। नाहीं बीजमूळ हाता आलें ॥ १ ॥ म्हणोनि पंढरीराया दुःखी होतें मन। अंतरींचें कोण जाणे माझें ॥ २ ॥ पूज्य झालों अंगा आला अभिमान। पुढील कारण खोळंबलें ॥ ३ ॥ तुका म्हणे खूण न कळेचि निरुती। सांपडलों हातीं अहंकाराचे ॥ ४ ॥

२३५७ वायांविण वाढविला हा लौकिक। आणिला लटिका वाद दोघां ॥ १ ॥ नाहीं ऐसा झाला देव माझ्या मतें। भुकेलें जेवितें काय जाणे ॥ २ ॥ शब्दज्ञानें गौरविली हे वैखरी। साच तें अंतरीं विवे-

चिना ॥ ३ ॥ झालों परदेशी गेले दोन्ही ठाय । संसार ना पाय तुझे देवा ॥ ४ ॥ तुका म्हणे मागें कळों येतें ऐसें । न घेतां हें पिसें लावोनियां ॥ ५ ॥

२३५८ व्यापक हा विश्वंभर । चराचर याचेनी ॥ १ ॥ पंढरीराव विटेवरी । त्याचीं घरीं पाउलें ॥ २ ॥ अवघियांचा हाचि ठाव । देवोदेवीं सकळ ॥ ३ ॥ तुका म्हणे न करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥ ४ ॥

२३५९ शूद्रवंशीं जन्मलों । म्हणोनि दंभें मोकलिलों ॥ १ ॥ अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरीनाथा ॥ २ ॥ घोकाया अक्षर । मज नाहीं अधिकार ॥ ३ ॥ सर्वभावें दीन । तुका म्हणे यातिहीन ॥ ४ ॥

२३६० संगतीनें होतो पंगतीचा लाभ । अशोभीं अनुभव असिजे तें ॥ १ ॥ जैसीं तैसीं असों पुढिलांचे सोई । धरिती हातीं पायीं आचारिये ॥ २ ॥ उपकारी नाहीं देखत आपदा । पुढिलांची सदा दया चित्तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तरी सज्जनाची कीर्ति । पुरवावी आर्ती निर्बळाची ॥ ४ ॥

२३६१ संगें वाढे सीण न घडे भजन । त्रिविध हें जन बहु देवा ॥ १ ॥ याचिमुळें आला संगाचा कंटाळा । दिसताती डोळां नानाछंद ॥ २ ॥ एकाविध भाव रहावया ठाव । नेदी हा संदेह राहो चित्तीं ॥ ३ ॥ शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणीक देखिलें नावडे त्यां ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां एकलेंचि भलें । बैसोनि उगलें रहावें तें ॥ ५ ॥

२३६२ सर्वात्मकपण । माझें हिरोनि नेतो कोण ॥ १ ॥ मनीं भक्तीची आवडी । हेवा व्हावी ऐसी जोडी ॥ २ ॥ घेईन जन्मांतरें । हेंचि करावया खरें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । ऋणी करूनि ठेवूं सेवा ॥ ४ ॥

२३६३ सांखळिलों प्रीति गळां। भुंकें वेळा जाणोनियां ॥ १ ॥ तुमचें मी केशीराजा। सुनें या काजा पाळिलों ॥ २ ॥ आलें गेलें कळे वाटा। कोण नीटा वांकाडिया ॥ ३ ॥ तुका म्हणे आलें वारी। दुरितें दुरी नातळतां ॥ ४ ॥

२३६४ सुख सुखा भेटे। मग तोडिल्या न तुटे ॥ १ ॥ रविरश्मिकळा। नये घालितां पैं डोळां ॥ २ ॥ दुरी तें जवळी। स्नेहें आकाश कवळी ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त। माझें पायीं अखंडित ॥ ४ ॥

२३६५ सुनियांची आवडी देवा। घेत सेवा नाहीं कांहीं ॥ १ ॥ शिकविलें जवळी बैसों। जेथें असों तेथेंचि ॥ २ ॥ नेदी दुजें बोलों करूं। गुरु गुरु न साहे ॥ ३ ॥ तुका म्हणे कुर्वाळितां। अंगें सत्ता संतांची ॥ ४ ॥

२३६६ सुनियांचा हाचि भाव। आपला ठाव राखावा ॥ १ ॥ दुजियाचा येऊं वारा। नेदूं घरावरी येऊं ॥ २ ॥ केली याची फाडाफाडी। तडामोडी क्षेत्रांची ॥ ३ ॥ पातेजत नाहीं लोकां। तुका देवावांचोनी ॥ ४ ॥

२३६७ शेवट तो भला। माझा बहु गोड झाला ॥ १ ॥ आलों निजाच्या माहेरा। भेटों रखुमाईच्या वरा ॥ २ ॥ परिहार झाला। अवघ्या दुःखांचा मागिल्या ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी। गेली आतां घेऊं धणी ॥ ४ ॥

२३६८ स्वामीचें हें देणें। येथें पावलों दर्पणें ॥ १ ॥ करूं आवडीनें वाद। तुमच्या सुखाचा संवाद ॥ २ ॥ कळावया वर्म। हा तो पायांचाचि धर्म ॥ ३ ॥ तुका म्हणे सिद्धी। हेचि पावविली बुद्धी ॥ ४ ॥

२३६९ हीन माझी याती। वरि स्तुती केली संतीं ॥ १ ॥ अंगीं वसूं पाहे गर्व। माझें हरावया सर्व ॥ २ ॥ मी एक जाणता। ऐसें वाटतसे चित्ता ॥ ३ ॥ राख राख गेलों वायां। तुका म्हणे पंढरीराया ॥ ४ ॥

२३७० पिंड पदावरी । दिला आपुलिये करीं ॥ १ ॥ माझें झालें गयावर्जन । फिटलें पितरांचें ऋण ॥ २ ॥ केलें कर्मांतर । बोंब मारिली हरिहर ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें । भार उतरलें ओझें ॥ ४ ॥

२३७१ धरूनियां चाली हांवा । येईन गांवा धांवत ॥ १ ॥ पाठविसी मूळ तरी । लवकरी विठ्ठले ॥ २ ॥ नाचेन त्या प्रेमसुखें । कीर्ति मुखें गाईन ॥ ३ ॥ तुका म्हणे संतमेळीं । पायधुळी वंदीन ॥ ४ ॥

२३७२ अचळ न चळे ऐसें झालें मन । धरूनि निजखूण राहिलोंसें ॥ १ ॥ आवडी बैसली गुणांची अंतरीं । करूं धणीवरी सेवन तें ॥ २ ॥ एकविध भाव नव्हे अभावना । आणिक या गुणा न मिळवे ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें पडिलें आहारीं । ध्यान विटेवरी ठाकलें तें ॥ ४ ॥

२३७३ अनुभवाचे रस देऊं आर्तभूतां । सोडूं चोजवितां पुढें पोतीं ॥ १ ॥ देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलियां ॥ २ ॥ आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥ ४ ॥

२३७४ अनुभवा आलें । माझें चित्तींचें क्षरलें ॥ १ ॥ असे जवळीं अंतरें । फिरे आवडीच्या फेरें ॥ २ ॥ खादलेंचि वाटे । खावें भेटलेंचि भेटे ॥ ३ ॥ तुका म्हणे उभें । आम्हीं राखियेलें लोभें ॥ ४ ॥

२३७५ अभयाचें स्थळ । तें हें एक अचळ ॥ १ ॥ तरी धरिला विश्वास । ठेलों होऊनियां दास ॥ २ ॥ पुरली आवडी । पायीं लागलीसे गोडी ॥ ३ ॥ तुका म्हणे कंठीं नाम । अंगीं भरलेंसें प्रेम ॥ ४ ॥

२३७६ असो खळ ऐसे फार । आम्हां त्यांचे उपकार ॥ १ ॥ करिती पातकांची धुणी । मोल न घेतां सावणी ॥ २ ॥ फुकाचे

मजूर । ओझें वागविती भार ॥ ३ ॥ पार उतरून म्हणे तुका । आम्हा आपण जाती नरका ॥ ४ ॥

२३७७ असोत लोकांचे बोल शिरावरी । माझी मज वरी विठा-बाई ॥ १ ॥ आपंगिलें मज आहे ते कृपाळु । बहुत कनवाळु अंतरींची ॥ २ ॥ वेदशास्त्रें जिसीं वर्णिती पुराणें । तिचें मी पोसणें लडिवाळ ॥ ३ ॥ जिचें नाम कामधेनु कल्पतरू । तिचें मी लेंकरूं तुका म्हणे ॥ ४ ॥

२३७८ आधीं नाहीं कळों आला हा उपाय । नाहीं तरी काय चुकी होती ॥ १ ॥ घालितों पायांसी मिठी एकसरें । नेदी तों दुसरें आड येऊं ॥ २ ॥ कासया पडतों लटिक्याचे भरीं । नव्हता कां शिरीं भार घेतों ॥ ३ ॥ संसाराचा हाट फिरतों दुकान । भरोवरी धन मेळवितों ॥ ४ ॥ तुका म्हणे कां हे घेतां गर्भवास । कां या होतों दास कुटुंबाचा ॥ ५ ॥

२३७९ आनंदें एकांतीं प्रेमें वोसंडत । घेऊं अगणित प्रेमसुख ॥ १ ॥ गोप्य धन नये वारा लागों यास । पाहों नेदूं वास दुर्जनाची ॥ २ ॥ झणी दृष्टि लागे आवडीच्या रसा । सेवूं जिरे तैसा आपणासी ॥ ३ ॥ तुका म्हणे हें बहु सुकुमार । न साहावे भार वचनाचा ॥ ४ ॥

२३८० आजि शिवला मांग । माझें विटाळलें अंग ॥ १ ॥ यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठल विठ्ठल हृदयांत ॥ २ ॥ झाली क्रोधासी भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ॥ ३ ॥ अनुतापीं न्हाऊं । तुका म्हणे रवी पाहूं ॥ ४ ॥

२३८१ आपुलाला लाहो करूं । केणें भरूं हा विठ्ठल ॥ १ ॥ भाग्यें पावलों या ठाया । आतां काया कुरवंडी ॥ २ ॥ पुढती कोठें घडे ऐसें । बहुतां दिसें फावलें ॥ ३ ॥ तुका म्हणे झाली जोडी । चरण घडी न विसंबे ॥ ४ ॥

२३८२ आपुला तो देह आम्हां उपेक्षीत । कोठें जाऊं हित सांगों

कोण ॥ १ ॥ कोण नाहीं दक्ष करितां संसार । आम्हीं हा विचार वमन केला ॥ २ ॥ नाहीं या धरीत जीवित्वाची चाड । कोठें करूं कोड आणिकांचे ॥ ३ ॥ तुका म्हणे असों चिंतोनियां देवा । मी माझें हा हेवा सारूनियां ॥ ४ ॥

२३८३ आपुला विचार करीन जीवाशीं । काय या जनाशीं चाड मज ॥ १ ॥ आपुलें स्वहित जाणती सकळ । निरोधितां बळ दुःख वाटे ॥ २ ॥ आइको नाइको कथा कोणीतरी । जाऊनियां घरीं निजों सुखें ॥ ३ ॥ माझी कोण वोज झाला हा शेवट । देखोनियां वाट आणिकां लावूं ॥ ४ ॥ तुका म्हणे भाकूं आपुली करुणा । जयाची वासना तया फळे ॥ ५ ॥

२३८४ आमुची जोडी ते देवाचे चरण । करावें चिंतन विठोबाचें ॥ १ ॥ लागेल तरी कोणी घ्यावें धणीवरी । असूपाचि परी आवडीच्या ॥ २ ॥ उभारिला कर प्रसिद्ध या जग । करूं केला त्याग मागें पुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे होय दरिद्र विच्छिन्न । ऐसें देऊं दान एकवेळां ॥ ४ ॥

२३८५ आवडी भोजन प्रकार परवडी । भिन्नभिन्न गोडी एक रसा ॥ १ ॥ भोगित्या पंगती लाधलों प्रसाद । तिहीं नाहीं भेद राखियेला ॥ २ ॥ पाकसिद्धि स्वहस्तकें विनियोग । आवडीचे भाग सिद्ध केले ॥ ३ ॥ तुका म्हणे आला उच्छिष्ट प्रसाद । तेणें हा आनंद माझ्या जीवा ॥ ४ ॥

२३८६ आम्हां अळंकार मुद्रांचे श्रृंगार । तुळसीचे हार वाहों कंठीं ॥ १ ॥ लाडिके डिंगर पंढरीरायाचे । निरंतर वाचे नामघोष ॥ २ ॥ आम्हा आणिकांची चाड चित्तीं नाहीं । सर्वसुखें पायीं विठोबाच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही नेघोंचि या मुक्ती । एकाविण चित्तीं दुजें नाहीं ॥ ४ ॥

२३८७ आम्हां आवडे नांव घेतां । तोही पिता संतोषे ॥ १ ॥

उभयतां एकाचित्त । तरी प्रीत वाढली ॥ २ ॥ आम्ही शोभों निकट-वासें । अनारिसें न दिसों ॥ ३ ॥ तुका म्हणे पांडुरंगे । अवघीं अंगें निवालीं ॥ ४ ॥

२३८८ आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥ १ ॥ जैसी तैसी माय वरी । मानिल्या त्या माना येरी ॥ २ ॥ व्यालचा कळ-वळा । जीव बहुत कोंवळा ॥ ३ ॥ कवतुकें वावरें । तुका म्हणे या आधारें ॥ ४ ॥

२३८९ आम्हा भय धाक कोणाचा रे पाहे । काळ मशाक काय मानव हे ॥ १ ॥ आम्हांसी ते काय चिंता या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ २ ॥ काय करावी हे कोणाची मान्यता । करितां अनंता कोण वारी ॥ ३ ॥ नाहीं शीण आम्हां झालें कवतुक । पुनीत हे लोक करावया ॥ ४ ॥ तुका म्हणे खातों आनंदाचे लाडू । नका चरफडूं घ्यारे तुम्ही ॥ ५ ॥

२३९० आम्हां वैष्णवांचा । नेम काया मन वाचा ॥ १ ॥ धीर धरूं जीवासाठीं । येऊं नेदूं लाभा तुटी ॥ २ ॥ उचित समय । लाज निवारावें भय ॥ ३ ॥ तुका म्हणे कळा । जाणों नेम नाहीं बळा ॥ ४ ॥

२३९१ आम्हां हरीच्या दासां कांहीं । भय नाहीं त्रैलोकीं ॥ १ ॥ देव उभा मागें पुढें । उगवी कोडें संकट ॥ २ ॥ जैसा केला तैसा होय । धांवे सोय धरोनी ॥ ३ ॥ तुका म्हणे असों सुखें । गाऊं मुखें विठोबा ॥ ४ ॥

२३९२ आम्ही आइते जेवणार । नलगे सोसावे डोंगर । सुखाचा वेव्हार । तेणेंचि वाढले ॥ १ ॥ ठेवा जोडला मिरासी । ठाव झाला पायापाशीं । नव्हे आणिकांसी । रीघ तेथें यावया ॥ २ ॥ बळी दिला जीवभाव । नेणें आणिकांचें नांव । धरिला एक भाव । तो विश्वास फळला ॥ ३ ॥ तुका म्हणे जालों बळी । आम्ही निकट जवळी । बोलिलों ते पाळी । वचन स्वामी आमुचें ॥ ४ ॥

२३९३ आम्ही हरीचे सवंगडे । जुने ठायींचे वेडे बागडे । हातीं धरूनि कडे । पाटिसवें वागविलों ॥ १ ॥ म्हणोनि भिन्न भेद नाहीं । देवा आम्हां एकदेहीं । नाहीं झालें (कहीं) । एका एक वेगळे ॥ २ ॥ निद्रा करितां होतों पायीं । सवेंचि लंका घेतली तई । वानरें गोवळ गाई । सवें चारित फिरतसों ॥ ३ ॥ आम्हां नामाचें चिंतन । राम कृष्ण नारायण । तुका म्हणे क्षण । खातां जेवितां न विसंबे ॥ ४ ॥

२३९४ इहलोकींचा हा देहे । देव इच्छिताती पाहे ॥ १ ॥ धन्य आम्हीं जन्मा आलों । दास विठोबाचे झालों ॥ २ ॥ आयुष्याच्या या साधनें । सच्चिदानंद पदवी घेणें ॥ ३ ॥ तुका म्हणे पावटणी । करूं स्वर्गाची निशाणी ॥ ४ ॥

२३९५ एक भाव चित्तीं । तरी न लगे कांहीं युक्ती ॥ १ ॥ कळों आलें जीवें । मज माझियाचि भावें ॥ २ ॥ आठवाचि पुरे । सुख अवघें मोहरे ॥ ३ ॥ तुका म्हणे मन । पूजा इच्छी नारायण ॥ ४ ॥

२३९६ एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तोही मळ नाहीं येथें ॥ १ ॥ घ्यावें द्यावें आम्ही आपुलिया सत्ता । न देखों पुसता दुजा कोणी ॥ २ ॥ भांडाराचि किल्ली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहे वान येथें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां विश्वासाच्या बळें । ठेविलें मोकळें देवें येथें ॥ ४ ॥

२१९७ ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ॥ १ ॥ कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर ॥ २ ॥ मायाममतेचे भोवरे । घेती भयानक फेरे ॥ ३ ॥ वासनेच्या लहरी येती । उद्योग हेलकावें बसती ॥ ४ ॥ तरावया एक युक्ती असे । तुका नामनावे-मधीं बैसे ॥ ५ ॥

२३९८ कइं मात माझे ऐकती कान । बोलतां वचन संतांमुखीं ॥ १ ॥ केला पांडुरंगें तुझा अंगीकार । मग होईल धीर माझ्या जीवा ॥ २ ॥ म्हणवूनि मुख अवलोकितों पाय । हेंचि मज आहे

थोरी आशा ॥ ३ ॥ माझिया मनाचा हाचि. पैं विश्वास । न करी सायास साधनांचे ॥ ४ ॥ तुका म्हणे मज होईल भरंवसा । तरलों मी ऐसा साच भावें ॥ ५ ॥

२३९९ करूं तैसें पाठांतर । करुणापर भाषण ॥ १ ॥ जिहीं केला मूर्तिमंत । ऐसा संतप्रसाद ॥ २ ॥ सोज्वळ केल्या वाटा । आइत्या नीटा मागिल्या ॥ ३ ॥ तुका म्हणे घेऊं धांवा । करूं हांवा ते जोडी ॥ ४ ॥

२४०० काय उणे मज पांडुरंगा पायीं । रिद्धिसिद्धि ठायीं वोळंगती ॥ १ ॥ कोण पाहे सुखा नासिवंताकडे । तृष्णेचे बापुडे नव्हों आम्ही ॥ २ ॥ स्वर्गसुखें आम्ही केली पावटणी । पापपुण्यें दोन्ही उलंडिलीं ॥ ३ ॥ तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ । वसाविली पेठ वैष्णवांची ॥ ४ ॥

२४०१ काय कृपेवीण घालावे सांकडें । निश्चिंती निवाडे कोण्या एका ॥ १ ॥ आहों तैसी पुढें असों दीनपणें । वेंचुनी वचनें करुणेचीं ॥ २ ॥ धरूनि भय आतां काय वाहों चित्तीं । काय करूं आतां आप्तपणा ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही भावहीन जीव । म्हणवूनि देव दुरे दुरी ॥ ४ ॥

२४०२ कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणे असे ॥ १ ॥ काय पापपुण्य पाहों आणिकांचें । मज काय त्यांचें उणें असे ॥ २ ॥ नष्टदुष्टपण कवणाचें वानूं । तयाहून अणू अधिक माझें ॥ ३ ॥ कुचर खोटा मज कोण असे आगळा । तो मी पाहों डोळां आपुलिया ॥ ४ ॥ तुका म्हणे मी भांडवलें पुरता । तुजसी पंढरीनाथा लावियेलें ॥ ५ ॥

२४०३ कुरवंडी करीन काया । वरोनि पायां गोजिरिया ॥ १ ॥ बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ २ ॥ परतें न सरवे दुरी । आवडी पुरी बैसली ॥ ३ ॥ तुका म्हणे विसांवलों । येथें धालों धणीवरी ॥ ४ ॥

२४०४ कोणापाशीं आतां सांगों मी बोभाट । कधीं खटपट सरेल हे ॥ १ ॥ कोणा आराणूक होईल कोणे काळीं । आपुलालीं जाळीं उगवूनी ॥ २ ॥ माझ्या येणें दुःखें फुटतसे प्राण । न कळतां जन सुखी आहे ॥ ३ ॥ भोगा आधीं मनीं मानिलासे त्रास । पाहें लपायास ठाव कोठें ॥ ४ ॥ तुका म्हणे देतों देवाचें गाऱ्हाणें । माझें ऋण येणें सोसियेलें ॥ ५ ॥

२४०५ कोणे गांवीं आहे सांगा हा विठ्ठल । जरी ठावा असेल तुम्हा कोणा ॥ १ ॥ लागतसे पायां येतों लोटांगणीं । मात तरी कोणी सांगा याची ॥ २ ॥ गुण रूप याचे वाणिती या संतां । मज क्षेम देतां सुख वाटे ॥ ३ ॥ सर्वस्वें हा जीव ठेवीन चरणीं । पांडुरंग कोणी दावी तया ॥ ४ ॥ तुका म्हणे गाइवत्सां तडातोडी । तैसी जाते घडी एकी मज ॥ ५ ॥

२४०६ कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता । बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥ कृष्ण माझा गुरू कृष्ण माझें तारूं । उतरी पैलपारु भवनदीचा ॥ २ ॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन । सोइरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा श्रीकृष्ण विसांवा । वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥

२४०७ खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें । नव्हतीं हीं छंदें नासिवंतें ॥ १ ॥ माझा मायबाप उभा विटेवरी । कवतुकें करी कृपादान ॥ २ ॥ प्रसादाची वाणी वदे तीं उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥ ३ ॥ तुका म्हणे रस वाढातिया अंगें । छाया पांडुरंगें केली वरी ॥ ४ ॥

२४०८ गाढवाचें घोडें । आम्हीं करूं दृष्टीपुढें ॥ १ ॥ चघळीं वाहणा । माघारिया बांडा सुना ॥ २ ॥ सोंगसंपादणी । तरी करूं शुद्ध वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे खळ । करूं समयीं निर्मळ ॥ ४ ॥

२४०९ चित्तीं धरीन मी पाउलें सुकुमार । सकळ विढार संपत्तीचें

॥ १ ॥ कंठीं धरीन मी नाम अमृताची वल्ली । होईल राहिली शीतळ तनु ॥ २ ॥ पाहीन श्रीमुख साजिरें सुंदर । सकळां आगर लावण्याचें ॥ ३ ॥ करीन अंगसंग बाळकाचे परी । बैसेन तोंवरी नुतरी कडिये ॥ ४ ॥ तुका म्हणे हा केला तैसा होय । धरिली मनें सोय विठोबाची ॥ ५ ॥

२४१० चवदा भुवनें जयाचिया पोटीं । तोचि आम्ही कंठीं सांठविला ॥ १ ॥ काय एक उणें आमुचिये घरीं । बोळंगती द्वारीं रिद्धि-सिद्धी ॥ २ ॥ असुर जयानें घातले तोडरीं । तो आम्हासी जोडी कर दोन्ही ॥ ३ ॥ रूप नाहीं रेखा जयासी आकार । आम्ही तो साकार भक्तीं केला ॥ ४ ॥ अनंत ब्रम्हांडें जयाचिये अंगीं । समान तो मुंगी आम्हांसाठीं ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्ही देवाहूनि बळी । जालों हे निराळी ठेउनी आशा ॥ ६ ॥

२४११ जे गाती अखंड विठ्ठलाचें गीत । त्यांचें पायीं चित्त ठेवीन मी ॥ १ ॥ जयांसी आवडे विठ्ठलाचें नाम । ते माझे परम प्राणसखे ॥ २ ॥ जयांसी विठ्ठल आवडे लोचनीं । त्यांचें पायवणी स्वीकारीन ॥ ३ ॥ विठ्ठलासी जिहीं दिला सर्वभाव । त्यांच्या पायीं ठाव मागईन ॥ ४ ॥ तुका म्हणे रज होईन चरणींचा । म्हणवितां त्यांच्या हरिचे दास ॥ ५ ॥

२४१२ डोळां भरियेलें रूप । तिक्तीं पायांचा संकल्प ॥१॥ अवघी घातली वांटणी । प्रेम राहिलें कीर्तनीं ॥ २ ॥ वाचा केली माप । रासीं हरिनाम अमुप ॥ ३ ॥ भरूनियां भाग । तुका बैसला पांडुरंग ॥ ४ ॥

२४१३ तोंवरी तोंवरी शोभतील गारा । जंव नाहीं हिरा प्रकाशला ॥ १ ॥ तोंवरी तोंवरी शोभताती दीपिका । नुगवतां एका भास्करासी ॥ २ ॥ तोंवरी तोंवरी सांगती संतांचिया गोष्टी । जंव नाहीं भेटी तुक्यासवें ॥ ३ ॥

२४१४ तोंवरी तोंवरी जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं ॥ १ ॥ तोंवरी तोंवरी सिंधु करी गर्जना । जंव त्या अगस्ति ब्राम्हणा देखिलें नाहीं ॥ २ ॥ तोंवरी तोंवरी वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी देखिली नाहीं ॥ ३ ॥ तोंवरी तोंवरी शूरत्वाच्या गोष्टी । जंव परमाईचा पुत्र दृष्टी देखिला नाहीं ॥ ४ ॥ तोंवरी तोंवरी माळामुद्रांचीं भूषणें । जंव तुक्याचें दर्शन झालें नाहीं ॥ ५ ॥

२४१५ दिनरजनीं हाचि धंदा । गोविंदाचे पवाडे ॥ १ ॥ संकल्पिला देह देवा । सकळ हेवा तये ठायीं ॥ २ ॥ नाहीं अवसान घडी । सकळ जोडी इंद्रियां ॥ ३ ॥ कीर्ति मुखें गर्जे तुका । करी लोकां सावध ॥ ४ ॥

२४१६ देहभाव आम्ही राहिलों ठेवूनी । निवांत चरणीं विठोबाच्या ॥ १ ॥ आमुच्या हिताचा जाणोनि उपाव । तोचि पुढें देव करीतसे ॥ २ ॥ म्हणवूनी नाहीं सुख दुःख मनीं । ऐकिलिया कानीं वचनाचें ॥ ३ ॥ झालों मी निःसंग निवांत एकला । भार त्या विठ्ठला घालूनियां ॥ ४ ॥ तुका म्हणे झालों जयाचे अंकित । तोचि माझें हित सर्व जाणे ॥ ५ ॥

२४१७ धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी ॥ १ ॥ वाचा बोलों वेदनीती । करूं संती केलें तें ॥ २ ॥ न वाणतां स्थिति अंगीं । कर्म त्यागी लंड तो ॥ ३ ॥ तुका म्हणे अधमः त्यासी । भक्ति दूषी हरीची ॥ ४ ॥

२४१८ धर्माचें पाळण । करणें पाखांड खंडण ॥ १ ॥ हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥ २ ॥ तीक्ष्ण उत्तरें । हातीं घेवुनि बाण फिरे ॥ ३ ॥ नाहीं भीडभाड । तुका म्हणे साना थोर ॥ ४ ॥

२४१९ धन्य देहूगांव पुण्यभूमी ठाव । तेथें नांदे देव पांडुरंग ॥ १ ॥ धन्य क्षेत्रवासी लोक ते दैवाचे । उच्चारिती वाचे नामघोष ॥ २ ॥

कर कटीं उभा विश्वाचा जनिता । वामांगीं ते माता रखुमादेवी ॥३॥ गरुडपारीं उभा जोडूनियां कर । अश्वत्थ समोर उत्तरामुख ॥ ४ ॥ दक्षिणे शंकर लिंग हरेश्वर । शोभे गंगानीर इंद्रायणी ॥ ५ ॥ लक्ष्मी-नारायण बल्लाळाचें वन । तेथें अधिष्ठान सिद्धेश्वर ॥ ६ ॥ विघ्नराज दारीं बहिरव बाहेरी । हनुमंत शेजारीं सहित दोघे ॥ ७ ॥ तेथें दास तुका करितो कीर्तन । हृदयीं चरण विटोबाचे ॥ ८ ॥

२४२० पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । झालें या चित्तासी समाधान ॥ १ ॥ मायबाप माझा उभा कृपादानी । विटे सम जोडूनी पदांबुजें ॥ २ ॥ सांभाळासी येऊं नेदीच उणीव । अधिकार गौरव राखे तैसें ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळूनि ॥ ४ ॥

२४२१ पाहतां श्रीमुख सुखावलें सुख । डोळियांची भूक नवजे माझ्या ॥ १ ॥ जिव्हे गोड तीन अक्षरांचा रस । अमृत जयास फिकें पुढें ॥ २ ॥ श्रवणींची वाट चोखाळली शुद्ध । गेले भेदाभेद निवारूनी ॥ ३ ॥ महामळें मन होतें जें गादलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ॥ ४ ॥ तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

२४२२ प्रेमसूत्र दोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥ १ ॥ मनेंसहित वाचा काया । अवघें दिलें पंढरीराया ॥ २ ॥ सत्ता सकळ तया हातीं । माझी कींव काकुलती ॥ ३ ॥ तुका म्हणे ठेवी तैसें । आम्ही राहों त्याचे इच्छे ॥ ४ ॥

२४२३ बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥ १ ॥ आणिकां उपायां कोण वांटी मन । सुखाचें निधान पांडुरंग ॥ २ ॥ गीतीं गांवों नाचों छंदें वाहों टाळी । वैष्णवांचे मेळीं सुखरूप ॥ ३ ॥ अनंत ब्रह्मांडें एके रोमावळीं । आम्ही केला भोळीं भावें उभा ॥ ४ ॥ लटिका हा केला संवसारसिंधु । मोक्ष खरा बंधु नाहीं

पुढें ॥ ५ ॥ तुका म्हणे ज्याच्या नामाचे अंकित । राहिलों निश्चित त्याच्या बळें ॥ ६ ॥

२४२४ बोलावें म्हूण हे बोलतों उपाय । प्रवाह हें जाय गंगाजळ ॥ १ ॥ भाग्ययोगें कोणा घडेल सेवन । कैंचें येथें जन अधिकारी ॥ २ ॥ मुखीं देतां घांस लपविती तोंडें । अंगींचिया भांड असु-खानें ॥ ३ ॥ तुका म्हणे पूजा करितों देवाची । आपुलिया रुची मना-चिये ॥ ४ ॥

२४२५ ब्रह्मादिक जया लाभासि ठेंगणे । वळिये आम्ही भले शरणा-गत ॥ १ ॥ कामनेच्या त्यागें भजनाचा लाभ । केला पद्मनाभ सेवा ऋणी ॥ २ ॥ कामधेनूचिया क्षीरा पार नाहीं । इच्छेचिया वाहीं वरुषावें ॥ ३ ॥ बैसलिया ठायीं लागलें भरतें । त्रिपुटीवरतें भेदी ऐसें ॥ ४ ॥ हारि नाहीं आम्हां विष्णुदासा जगीं । नारायण अंगीं विसावला ॥ ५ ॥ तुका म्हणे बहु लाटे हें भोजन । नाहीं रिता कोण रहात राहों ॥ ६ ॥

२४२६ भाग्यवंत आम्ही विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्य-वंत ॥ १ ॥ नाहीं तें पुरवीत आणुनी जवळी । गाउनी माउली गीत सुखें ॥ २ ॥ प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । वोळलीं सकळ सुखें ठायीं ॥ ३ ॥ आपुल्या स्वभावें जैसे जेथें असों । तैसे तेथें दिसों साजिरेचि ॥ ४ ॥ वासनेचा कंद उपडिलें मूळ । दुरितें सकळ निवारिलीं ॥ ५ ॥ तुका म्हणे भक्तजनांची माउली । करील साउली विठ्ठल आम्हां ॥ ६ ॥

२४२७ भूत भविष्य कळों यावें वर्तमान । हे तों भाग्यहीन त्यांची जोडी ॥ १ ॥ आम्ही विष्णुदासीं देव ध्यावा चित्तें । होणार तें होतें प्रारब्धानें ॥ २ ॥ जगरूढीसाठीं घातलें दुकान । जातो नारायण अंतरोनी ॥ ३ ॥ तुका म्हणे हा हो प्रपंच गाढा । थोरली ते पीडा रिद्धिसिद्धी ॥ ४ ॥

२४२८ मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास। कठीण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥ मेले जित असों निजोनियां जागे। जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥ भले तरी देऊं गांडीची लंगोटी। नाठ्याळाचे काठी मारूं माथां ॥ ३ ॥ मायबापाहुनी बहु मायावंत। करूं घात पात शत्रूहूनि ॥ ४ ॥ अमृत तें काय गोड आम्हांपुढें। विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥ तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड। जया पुरे कोड त्याचे परी ॥ ६ ॥

२४२९ मागें बहुतां जन्मीं। हेंचि करीत आलों आम्ही। भवताप श्रमीं। श्रमले त्यां निववूं ॥ १ ॥ गर्जों हरीचे पवाडे। मेळवूं वैष्णव बागडे। पाझर रोकडे। काढूं पाषाणामध्यें ॥ २ ॥ भावशुद्ध नामावळी। हर्षें नाचों पिटूं टाळी। घालूं पायांतळीं। कळिकाळ त्या बळें ॥ ३ ॥ कामक्रोध बंदीखानीं। तुका म्हणे दिले दोन्ही। इंद्रियांचे धणी। आम्ही झालों गोसावी ॥ ४ ॥

२४३० मृत्युलोकीं आम्हां आवडती परी। नाहीं एका हरीनामाबीण ॥ १ ॥ विटलें हें चित्त प्रपंचापासोनी। वमन हें मनीं बैसलेंसें ॥ २ ॥ सोनें रुपें आम्हां मृत्तिकेसमान। माणिकें पाषाण खडे तैसे ॥ ३ ॥ तुका म्हणे तैशा दिसतील नारी। रिसाचियापरी आम्हांपुढें ॥ ४ ॥

२४३१ वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनीं वहावा भार माथां ॥ १ ॥ खाइल्याची गोडी देखिल्यासी नाहीं। भार धन वाही मजुरीचें ॥ २ ॥ उत्पत्तिपाळणसंहाराचें निज। जेणें नेलें बीज त्याचे हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां सांपडलें मूळ। आपणचि फळ आलें हाता ॥ ४ ॥

२४३२ वृक्षवल्ली आम्हां सोयरीं वनचरें। पक्षीही सुस्वरें आळविती ॥ १ ॥ येणें सुखें रुचे एकांताचा वास। नाहीं गुणदोष अंगा येत ॥ २ ॥ आकाश मंडप पृथिवी आसन। रमे तेथें मन क्रीडा करी ॥ ३ ॥ कंथाकमंडलु देहउपचारा। जाणवितो वारा अवसरु ॥ ४ ॥

हरीकथा भोजन परवडी विस्तार । करोनी प्रकार सेवूं रुची ॥ ५ ॥ तुका म्हणे होय मनासी संवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ ६ ॥

२४३३ शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ति । तो माझा सांगाति प्राणसखा ॥ १ ॥ म्हणवूनि नाहीं आणिकांचा पांग । सर्व झालें सांग नामें एका ॥ २ ॥ सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते । स्वयंभू आइते केले नव्हों ॥ ४ ॥

२४३४ शीतल साउली आमुची माउली । विठाई वोळली प्रेम-पान्हा ॥ १ ॥ जाऊनि वोसंगा रिघेन वोरसे । लागेल तें इच्छे पिईन वरी ॥ २ ॥ कृपा तनु माझी सांभाळी दुभोनी । अमृतसंजीवनी लोटलीसे ॥ ३ ॥ आनंदाचा ठाव झाला माझे चित्तीं । सागर तो किती उपमेसी ॥ ४ ॥ सैर जाय पडे तयासी सांकडें । सांभाळीत पुढें मागें असे ॥ ५ ॥ तुका म्हणे चिंता केली ते मी नेणें । लडिवाळ तान्हें विठाईचें ॥ ६ ॥

२४३५ संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥ १ ॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥ २ ॥ करितों कवतुक बोबड्या उत्तरीं । क्षमीं मजवरी कोप धरा ॥ ३ ॥ काय माझी याती नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणे ॥ ४ ॥ तुका म्हणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्य भाव तोचि जाणे ॥ ५ ॥

२४३६ संसार तो कोण लेखे । आम्हा सखे हरिजन ॥ १ ॥ काळ ब्रम्हानंदें सरे । आवडी उरे संचली ॥ २ ॥ स्वप्नीं तेही नाहीं चिंता । रात्री जातां दिवस ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रम्हरसें । होय सरिसें भोजन ॥ ४ ॥

२४३७ कांहींच मी नव्हे कोणिये गांवींचा । एकटा ठायींचा ठायीं एक ॥ १ ॥ नाहीं जात कोठें येत फिरोनियां । अवघेंचि वायांवीण

बोले ॥ २ ॥ नाहीं मज कोणी आपलें दुसरें । कोणाचा मी खरें कांहीं नव्हे ॥ ३ ॥ नाहीं आम्हां ज्यावें मरावें लागत । आहों अखंडित जैसे तैसे ॥ ४ ॥ तुका म्हणे नांवरूप नाहीं आम्हां । वेगळा त्या कर्मा अकर्मासी ॥ ५ ॥

२४३८ ठेविलें जतन । करूनियां निजधन ॥ १ ॥ जयापासाव उत्पत्ति । तें हें बीज धरिलें हातीं ॥ २ ॥ निवडिलें वरळा भूस । सार आइन जिन्नस ॥ ३ ॥ तुका म्हणे नारायण । भाग संचिताचा गुण ॥ ४ ॥

२४३९ भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें केलें भक्तिभावें ॥ १ ॥ म्हणवूनि चिंता नाहीं आम्हां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥ २ ॥ आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हां देवाचा सांगात । नाहीं विसंवत येरयेरां ॥ ४ ॥

२४४० पिकलीये सेंदें कडुपण गेलें । तैसें आम्हा केलें पांडुरंगें ॥ १ ॥ काम क्रोध लोभ निमाले ठायींची । सर्व आनंदाची सृष्टि झाली ॥ २ ॥ आठव नाठव गेले भावाभाव । झाला स्वयमेव पांडुरंग ॥ ३ ॥ तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचिलागीं ॥ ४ ॥

२४४१ सदा नामघोष करूं हरीकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥ सर्व सुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुल्लतसों ॥ १ ॥ असों ऐसा कोठें आठवही नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही झालों अग्निरूप । लागो नेदूं पापपुण्य अंगा ॥ ४ ॥

२४४२ आम्ही वैकुंठवासी । आलों याचि कारणासी । बोलिले जे ऋषि । साच भावें वर्ताया ॥ १ ॥ झाडूं संतांचे मारग । आडरानीं भरलें जग । उच्छिष्टाचा भाग । शेष उरलें तें सेवूं ॥ २ ॥ अर्थें

लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें । विषय लोभीं मनें। साधनें बुडविलीं ॥ ३ ॥ पिटूं भक्तिचा डांगोरा। कळिकाळासी दरारा। तुका म्हणे करा। जयजयकार आनंदे ॥ ४ ॥

२४४२ कांस घालोनी वळकट। झालों कळीकाळासी नीट। केली पायवाट। भवसिंधूवरुनी ॥ १ ॥ यारे यारे लहानथोर। याति भलते नारीनर। करावा विचार। न लगे चिंता कोणाशीं ॥ २ ॥ कामीं गुंतले रिकामे। जपी तपी येथें जमे। लाविलें दमामे। मुक्ता आणि मुमुक्षा ॥३॥ एकंदर शिका। पाठविला इहलोका आलों म्हणे तुका। मी नामाचा धारक ॥ ४ ॥

## श्रीकान्होबामहाराज

२४४३ अ तूंच मायबाप बंधु सखा आमुचा। वित्त गोत जिवलग जीवाचा ॥ १॥ आणीक प्रमाण नाहीं दुसरें आतां। योगक्षेमभार तुझे घातला माथां ॥ २ ॥ तूंच क्रियाकर्म धर्म देव तूं कुळ। तूंच तप तीर्थ व्रत गुरु सकळ ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु करिता कारयिता देवा। तूंच भाव भक्ति पूजा पुरस्कार आघवा ॥ ४ ॥

२४४३ ब गाऊं वाहूं टाळी रंगी नाचों उदास। सांडोनी भय लज्जा शंका आस निरास ॥ १ ॥ बळियाचा बळी तो कैवारी आमुचा। भुक्तिमुक्तिदाता सकळांही सिद्धींचा ॥ २ ॥ मारूं शब्दशास्त्रबाण निःशंक अनिवार। कंटकांचा चूर फोडूं काळाचे शिर ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु नाहीं जीवाची चाड। आपुलिया तेथें काय आणिकांची भीड ॥ ४ ॥

२४४३ क केला अंगीकार पंढरीच्या देवें। आतां काय करितील काळ मशक मानवें ॥ १ ॥ घातलीं बाहेर तीं भयें होतें ज्याच्यानें। बैसला आपण तेथें घालुनियां ठाणें ॥ २ ॥ लागों नेदी वारा दुजियाचा अंगासी। हा पुरता निर्धार कळों आला आम्हांसी ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु नलगे करावी चिंता। कोणेविशीं आतां बैसलों हस्तीवरि माथां ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज.

२४४४ निराश्रित वाटे मनीं । पडिलों जनीं एकला ॥ १ ॥ कृपेवीण तुमच्या देवा । हळहळ जीवा बहु वाटे ॥ २ ॥ आजिचा दिवस उद्यां नये । आयुष्य जाये क्षणक्षणा ॥ ३ ॥ निळा म्हणे करूं काय । न दिसे उपाय प्राप्तीचा ॥ ४ ॥

२४४५ ऐसिये सांपडलों संधीं । सर्वदां द्वंदीं काळाचे ॥ १ ॥ कैसी सुटका होईल आतां । न लक्षेचि सत्ता कर्मगती ॥ २ ॥ नैष्कर्म्य ऐसें भासे । परि तें नेतुसे सकामीं ॥ ३ ॥ निळा म्हणे देखुनि भ्यालों । म्हणोनि आलों शरण तुम्हां ॥ ४ ॥

२४४६ मागें उदंड साधनें केलीं । उत्तीर्ण तीं झालीं कर्मफळें ॥ १ ॥ परि तीं तुमचें नेदितीच प्रेम । वाढविती श्रम संसारींचा ॥ २ ॥ जया नाहीं मार्गचि ठावा । काय ते गांवा पावविती ॥ ३ ॥ निळा म्हणे काटवणीं । घालिती घालणीं जाणिवेच्या ॥ ४ ॥

२४४७ निवेदिलें पायापाशीं । जें जें मानसीं होतें तें ॥ १ ॥ आतां उचित तैसें करा । आम्हीं तों संसारा आंचवलों ॥ २ ॥ काय नाहीं तुमच्या हातीं । वचनीं तिष्ठती महासिद्धी ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमच्या संगें । पांडुरंगें वर्तिजे ॥ ४ ॥

२४४८ अवगुणीं देखिलें । म्हणोनियां उपेक्षिलें ॥ १ ॥ माझें वोढवलें कर्म । करीं आली नेणें धर्म ॥ २ ॥ तेणेंचि नेणों संतापली । क्षोभें करुणा हारविली ॥ ३ ॥ निळा म्हणे नये । मोहें पाळावया माय ॥ ४ ॥

२४४९ न विसंबेचि माउली बाळा । अद्भुत स्नेहाचा कळवळा ॥ १ ॥ तुम्ही जाणतसां नित्य । तरि कां ऐसें विपरीत ॥ २ ॥ आजि निष्ठुर मानसें । आम्हां पीडियलें उपवासें ॥ ३ ॥ निळा म्हणे शोकें शीण । झाला जाऊं पाहे प्राण ॥ ४ ॥

२४५० आंधळिया उगवोनी रवी । न दिसेचि तेंवि मज झालें

॥ १ ॥ तेविं तुम्ही स्वतःसिद्ध हरी । परी मी माझारीं भ्रांति-तमा ॥ २ ॥ रोग्या रसने कैंची गोडी । जे ते निवडी रसस्वाद ॥ ३॥ निळा म्हणे वेडिया गोत । नाढळे धन वित्त दरिद्रिया ॥ ४ ॥

२४९१ तुझिये संगती । आम्ही लागलों नेणतीं ॥ १ ॥ परी तूं कृपावंत हरी । सांभाळिसी सर्वांपरी ॥ २ ॥ शहाणे तूंतें चोजविती । उदासी तूं तयांप्रती ॥ ३ ॥ निळा म्हणे भाविकाला । म्हणवी अंकित मी त्याला ॥ ४ ॥

२४९२ बहुतां दिवसां भेटी आलों । सांभाळिलें पाहिजे ॥ १ ॥ आलिंगनें निवती प्राण । सुफळ जिणें मग माझें ॥ २ ॥ हेत मनींचा होईल पूर्ण । दृष्टी चरण देखतां ॥ ३ ॥ निळा म्हणे हरेल शीण । वोळवण जन्माची ॥ ४ ॥

२४९३ जेववाल तेंचि जेवीन सुखें । पांघरवाल सुखें पांघरेन ॥१॥ बैसवाल तेथें बैसेन उगा । निजवाल जागा न सोडी ते ॥ २ ॥ जैसें कराल मी होईन तैसा । न करूनियां आशा आणिकांची ॥ ३ ॥ निळा म्हणे जें कराल तें तें । होईन आज्ञेतें नुल्लंघी ॥ ४ ॥

२४९४ ठेवाल तेथें राहेन सुखें । यावरी हरिखें आपुलिया ॥ १ ॥ न वंची मी हे सेवेसी काया । धाडाल ठाया जाईन त्या ॥ २ ॥ घाल ग्रास ते घालीन मुखीं । न करीं आणखी सोस कांहीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कराल आज्ञा । न मोडीं प्राज्ञा तुमची ते ॥ ४ ॥

२४९५ तुमच्याचि चरणांचा महिमा । नेणा तुम्ही पुरुषोत्तमा ॥ १ ॥ आम्हां दासांचें जीवन । घडे अमृताचेंचि पान ॥ २ ॥ वृक्ष नेणती फळाची गोडी । भोक्तेचि जाणती ते आवडी ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणती संत । भक्त तुमचे ते भाग्यवंत ॥ ४ ॥

२४९६ संत कैसेनि भेटती । कैसेनि होती कृपावंत ॥ १ ॥ सांगा निगुती हें आम्हांसी । तुमच्या पायांसी लागतो ॥ २ ॥ काय तें करावें पूजन । काय तें धन समर्पावें ॥ ३ ॥ निळा म्हणे शरण जावें । कैसें विनवावें कोण युक्ती ॥ ४ ॥

२४५७ आवडोनी रूप मनीं । धरिलें वदनीं हरिनाम ॥ १ ॥ न लगे आणिक कांहीं चिंता । गोडीच आतां यावरी ॥ २ ॥ काय करूं ते आसनमुद्रा । कृपासमुद्रा तुजवीण ॥ ३ ॥ निळा म्हणे दिधलें संतीं । नाम एकांतीं तोंचि गोड ॥ ४ ॥

२४५८ कांहीं चमत्कार देखती । विश्वासें तरी वाटे प्रीति ॥ १ ॥ ऐसा विपरीत आहे मोळा । जाणा येथींचा जी गोपाळा ॥ २ ॥ एऱ्हवीं कोणी फुकासाठीं । नाम नुच्चारिती ओंठीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नारायणा । म्हणोनि दाविली सूचना ॥ ४ ॥

२४५९ नका पाहूं माझे क्रिया आचरित । भक्त भागवत नव्हे ज्ञानी ॥ १ ॥ आठवितों नाम नेणें दुजी परी । मी माझें श्रीहरी. नाहीं गेलें ॥ २ ॥ गुंतलेसे पायीं मोह ममता आशा । अहो जगदीशा पांडुरंगा ॥ ३ ॥ निळा म्हणे करा यावरी कैवार । अहा करुणाकर म्हणोनिया ॥ ४ ॥

२४६० नाम वाचे आठवीलें । रूप मनीं सांठवीलें ॥ १ ॥ आतां फिरूनियां घरा । येशी आपणचि माघारा ॥ २ ॥ लाविला मोकळ । भाव मागें सर्वकाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे आंतुडलें । बरें वर्म हाता आलें ॥ ४ ॥

२४६१ नामें तुमचीं गाऊं मुखें । राहों सुखें चिंतनीं ॥ १ ॥ आणखी नेघों द्याल तरी । पढों वैखरी गुण तुमचे ॥ २ ॥ ठाकों उभा संतमेळीं । करूं धुमाळी हरिकथा ॥ ३ ॥ निळा म्हणे नित्य नवी । सेवा घ्यावी कृपाळुवा ॥ ४ ॥

२४६२ पायापाशीं जीव । ठेवियला तुमच्या भाव ॥ १ ॥ न्याल म्हणोनियां सदना । विठ्ठल देवा कृपाघना ॥ २ ॥ आळवितों नामें । लाहो करोनियां प्रेमें ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसराती । दुजें नेणोनियां चित्तीं ॥ ४ ॥

२४६३ तप साधन हेंचि माझें । गाईन तुझें नाम हरी ॥ १ ॥

आणिका साधनीं उबग आला । विश्वास उपजला हेचिविशीं ॥ २ ॥ कळा कुसरी न येती मना । वांचूनि चिंतना तुमचिया ॥ ३ ॥ निळा म्हणे वाचे बोली । पडिली चाली याचिपरी ॥ ४ ॥

२४६४ विठ्ठल विठ्ठल म्हणोनि छंदें । ब्रह्मानंदें नाचेन ॥ १ ॥ धरूनियां दृष्टीपुढें । रूप चोखडें सुरेख ॥ २ ॥ वारंवार क्षणक्षणा । ठेवीन चरणांवरी माथा ॥ ३ ॥ निळा म्हणे पुरवा कोड । जाणोनी चाड हे माझी ॥ ४ ॥

२४६५ न धरे धीर धरितां मनीं । न संडे वदनीं गुणनाम ॥ १ ॥ अट्टाहासें गर्जना करी । खवळली वैखरी नाटोपे ॥ २ ॥ चरित्राचे उठती भार । जिव्हे अक्षर न संडे ॥ ३ ॥ निळा म्हणे लाविला चाळा । न कळे कळा हे तुमचीं ॥ ४ ॥

२४६६ अमृताहुनी गोड हरी । नाम उच्चारितां वैखरी ॥ १ ॥ घेतां न विटेचि हे रसना । अधिक अधिक आवडी मना ॥ २ ॥ चित्तासि विश्रांति । इंद्रियें सुखावलीं ठाती ॥ ३ ॥ निळा म्हणे गोडा गोड । सेवितां सरे अवघी चाड ॥ ४ ॥

२४६७ इतर साधनीं उपाव । करिती ते ते आम्हां देव ॥ १ ॥ काय जाणिलें तिहीं । पाडिले साधनांचे वाहीं ॥ २ ॥ कोण लाभ कैसी गति । काय पावती ते अंतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे नेणों आम्ही । तुमच्या नामेंवीण स्वामी ॥ ४ ॥

२४६८ करीन कैवाड हाचि अनुदिनीं । तुमच्या चिंतनीं पांडुरंगा ॥ १ ॥ नेदीं जाऊं वायां घटिका एकी पळ । करूं सर्वकाळ हेचि चर्चा ॥ २ ॥ संतसमागमें गाऊं नित्य नामें । आपुलिया प्रेमें आवडीच्या ॥ ३ ॥ आठवूं सुंदर रूप मनोहर । कटावरी कर ठेविले ते ॥ ४ ॥ निळा म्हणे माझे मनींची आवडी । दाविली उघडी करोनियां ॥ ५ ॥

२४६९ चित्त ठेउनी पायांवरी । रूप धरूनियां अंतरीं ॥ १ ॥ सुखें

याच्या नामावळी । आठवीन नित्य काळीं ॥ २ ॥ करीन ऐसाचि कैवाड । शंका येऊं नेदी आड ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवसराती । तुम्हां आठवीन श्रीपती ॥ ४ ॥

२४७० निरंतर नाम वदनीं । निजरूप ध्यानीं आठवितों ॥ १ ॥ आणिक देवा कांहीं नेणें । मिरवूं भूषणें भक्तीचीं ॥ २ ॥ योगसाधन न कळे मंत्र । निगम शास्त्र व्युत्पत्ति ॥ ३ ॥ निळा म्हणे अज्ञान हरी । आहे परी सर्व मी ॥ ४ ॥

२४७१ बरवी आजि हे जोडी झाली । तुमचीं पाउलें देखिलीं । अवघींच इंद्रियें निवालीं । आलिंगनीं तुमचिया ॥ १ ॥ वदनीं आठवलें नाम । तुमचें सांपडलें प्रेम । बरवा साधला हा नेम । मनही विश्राम पावलें ॥ २ ॥ बरवा पंढरपुरा गेलों । सत्संगें महाद्वारा पावलों । भीतरीं राउळीं प्रवेशलों । बरवा भेटलों विठोबासी ॥ ३ ॥ तेणें पुरलें सर्वही काम । रूप डोळां वदनीं नाम । संतांचाही समागम । धणी धाय तों पावलों ॥ ४ ॥ निळा म्हणे सर्वांपरी । कृतकृत्य झालों हरी । तुमचा दास मी कामारी । ठेवा द्वारवंटा राखेन ॥ ५ ॥

२४७२ बरा केला अंगिकार । माझा तुम्हीं घेतला भार ॥ १ ॥ नाहीं तरी जातों वायां । नाना योनि भोगावया ॥ २ ॥ गाईन यावरी चोखडे । तुमचे कीर्तीचे पवाडे ॥ ३ ॥ निळा म्हणे ध्यानीं चित्तीं । धरूनी राहें तुमची मूर्ती ॥ ४ ॥

२४७३ जीवाचाही जीव तूंचि प्राणांचा प्राण । नयनाचें नयन तूंचि घ्राणाचें घ्राण ॥ १ ॥ सर्वही इंद्रियभाव तूंचि माझे श्रीहरी । तुजविण न दिसे पाहतां मज मी माझारीं ॥ २ ॥ चित्ताचेंही चित्त तूंचि मनाचें मन । श्रवणाचेंही श्रवण तूंचि रसनेची रसना ॥ ३ ॥ निळा म्हणे तूंचि माझा सर्वही व्यापक । देहा देहीं शोधुनी पाहतां न दिसे आणिक ॥ ४ ॥

२४७४ न पुरे धणी गुण गातां । रूप दृष्टी अवलोकितां ॥ १ ॥

बरवा बरवा विठ्ठल हरी । माझे बैसला अंतरीं ॥ २ ॥ सुख लावण्याची खाणी । राही वामांगीं रुक्मिणी ॥ ३ ॥ निळा म्हणे दृष्टीपुढें । दिसे कोंदलें रूपडें ॥ ४ ॥

२४७५ प्रसाद तुमचा लाधला आतां । झालों कृतकृत्यता सनाथ ॥ १ ॥ पुरविला जीवींचा हेत । होतां चिंतीत मानसीं तो ॥ २ ॥ कृपा करूनियां दाविलें देवा । आपुला ठेवा उघडूनी ॥ ३ ॥ निळा म्हणे सद्गुरुनाथा । गाऊं आतां ओविया गीतीं ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

२४७६ चोरां ओढोनियां नेईजे जें शूळीं । चालतां पाउलीं मृत्यु जैसा ॥ १ ॥ तैसी परी मज झाली नारायणा । दिवसेंदिवस उणा होत असे ॥ २ ॥ वृक्षाचिये मुळीं घालितां कुऱ्हाडी । वेंचे तैसी घडी आयुष्याची ॥ ३ ॥ नामा म्हणे हेंही लहरींचें जळ । आटत सकळ भानुतेजें ॥ ४ ॥

२४७७ श्रीहरी श्रीहरी ऐसें वाचे म्हणेन । वाचा धरिसी तरी मी श्रवणीं ऐकेन ॥ १ ॥ श्रवणीं दाटसी तरी मी नयनीं पाहीन । ध्यानीं मी ध्याईन जेथें तेथें ॥ २ ॥ जेथें जाय तेथें लागला हा आम्हां । न संडी तुझें वर्म म्हणे नामा ॥ ३ ॥

२४७८ भावेंविण भक्ति करानें करावी । माया मोह वैरी देहामाजीं ॥ १ ॥ तुझें नाम दिव्य रस जिव्हे स्वाद । काम क्रोध नाश करिती माझा ॥ २ ॥ जे जे वस्तूली मी नित्य नयनीं पाहें । त्या त्या विषया मन धांवताहे ॥ ३ ॥ नामा म्हणे थोर उबगलों संसारा । काळ वैरी पुढारां आसे पाहे ॥ ४ ॥

२४७९ आधीं मी लटिका वरी लटिकी तुझी माया । भजन ऐसिया पाहसी काय ॥ १ ॥ जाणतां नेणतां नाम तुझें देवा । गाईन केशवा तारी मज ॥ २ ॥ विषयीं आसक्त भ्रांत माझें मन । कैसें तुझें

ध्यान घडेल यासी ॥ ३ ॥ नामा म्हणे आतां जाणसी तें करी। पतीत पावन हरी नाम तुझें ॥ ४ ॥

२४८० लटिकें तरी गायें तुझेंचि नाम । लटिकें तरी प्रेम तुझेंचि आणी ॥ १ ॥ सहजेंचि लटिकें असे माझ्या ठायीं । तुझिया पालट नाहीं साचपणा ॥ २ ॥ लटिकें तरी हरी करी तुझें ध्यान । लटिकें माझें मन तुजाचि चिंती ॥ ३ ॥ लटिका तरी म्हणवी तुझाचि मी दास । परी नामीं विश्वास सत्य आहे ॥ ४ ॥ लटिका तरी बैसे संतांचे संगती । परी आहे माझे चित्तीं ध्यान तुझें ॥ ५ ॥ ऐसें लटिकें माझें मन सफळ करीं देवा । नामा म्हणे केशवा विनवीत आहे ॥ ६ ॥

२४८१ तान्हेलों भुकेलों । तुझेनि नामें निवालों ॥ १ ॥ तहान नेणें भूक नेणें । अखंड पारणें नामीं तुझ्या ॥ २ ॥ अमृतलिंग केशव हा चित्तीं । तेणें नामया तृप्ति अखंडित ॥ ३ ॥

२४८२ नामें तरूं अवघे जन । यमपुरीं घालूं वाण ॥ १ ॥ करूं हरीनामकीर्तन । तोडूं देहाचें बंधन ॥ २ ॥ करूं हरीनामाचा घोष । कुंभपाक पाडूं ओस ॥ ३ ॥ ऐसा नामा यशवंत । विठोबाचा शरणांगत ॥ ४ ॥

२४८३ कोण होईल आत्मज्ञानी । जो वा राहे त्याच्या ध्यानीं ॥१॥ मज तो चरणांची आवडी । जन्मोजन्मीं मी न सोडीं ॥ २ ॥ होईल सिद्धीचा साधक । त्यासी देई स्वर्गसुख ॥ ३ ॥ कोण होईल देहातीत । त्यासी करी संगरहित ॥ ४ ॥ नामा म्हणे जीवें साटी । तुज मज जन्मे पडिली गांठी ॥ ५ ॥

२४८४ प्रेमफांसा घालुनियां गळां । जित धरिलें गोपाळा ॥ १ ॥ एक्या मनाची करूनी जोडी । विठ्ठलपायीं घातली वेडी ॥ २ ॥ हृदय करूनी बंदिखाना । विठ्ठल कोंडूनि ठेविला जाणा ॥ ३ ॥ सोहं शब्दें मार केला । विठ्ठल काकुळती आला ॥ ४ ॥ नामा म्हणे विठ्ठलासी । जीवें न सोडीं सायासीं ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

२४८५ धरिला पंढरीचा चोर । गळां बांधोनियां दोर ॥ १ ॥ हृदय बंदिखाना केला । आंत विठ्ठल कोंडिला ॥ २ ॥ शब्दें केलीं जडाजुडी । विठ्ठलपायीं घातली बेडी ॥ ३ ॥ सोहं शब्दाचा मारा केला । विठ्ठल काकुळती आला ॥ ४ ॥ जनी म्हणे बा विठ्ठला । जीवें न सोडीं मी तुला ॥ ५ ॥

२४८६ दळूं कांडूं खेळूं । सर्व पाप ताप जाळूं ॥ १ ॥ सर्व जिवामध्यें पाहूं । एक आम्ही होउनी राहूं ॥ २ ॥ जनी म्हणे ब्रह्म होऊं । ऐसें सर्वांघटीं पाहूं ॥ ३ ॥

२४८७ चरण विठोबाचे देखिले । साही रिपू हारपले ॥ १ ॥ नाहीं नाहीं म्हणती आम्ही । सांगसी त्या लागूं कामीं ॥ २ ॥ नाहीं तरी जाऊं देशीं । जनी नामयाची दासी ॥ ३ ॥

२४८८ वैराग्य अभिमानें फिरविलें जातें । म्हणवोनी यातें भाव खुंटा ॥ १ ॥ संचित मातृका वैरणी घातली । अव्यक्ति दळिलीं व्यक्ताव्यक्त ॥ २ ॥ नामरूपा आदि दळियेलें सर्व । पीठ भरी देव पंढरीचा ॥ ३ ॥ नवल हा देव बैसला दळणीं । नाहीं केली जनी नामयाची ॥ ४ ॥

२४८९ त्या वैष्णवांच्या माता । तो नेणे देव ताता ॥ १ ॥ तिहीं कर्में हें पुसिलें । अकर्म समूळ नाहींसें केलें ॥ २ ॥ कानाचा हो कान । झालें धरूनियां ध्यान ॥ ३ ॥ डोळियाचा हा डोळा । करूनि झालें प्रेमसोहळा ॥ ४ ॥ तोहि वसे नरदेहीं । जनी दासी वंदी पायीं ॥ ५ ॥

२४९० जोड झाली रे शिवासी । भ्रांत फिटली जिवाची ॥ १ ॥ आनंदाचि आनंदला । आनंद बोधाचि बोधला ॥ २ ॥ आनंदाची लहरी उठी । ब्रह्मानंद गिळिला पोटीं ॥ ३ ॥ एकपण जेथें पाहीं । तेथें विज्ञप्ति उरली नाहीं ॥ ४ ॥ ऐसी सद्गुरुची करणी । दासी जनी विठ्ठल चरणीं ॥ ५ ॥

२४९१ नम्रतेवीण योग्यता मिरविती । ते केवीं पावती ब्रह्मसुख ॥ १ ॥ लटिकें नेत्र लावूनि ध्यान पैं करिती । ते केवीं पावती केशवातें ॥ २ ॥ एक संत म्हणविती नग्न पैं हिंडती । अंतरीची स्थिती खडबड ॥ ३ ॥ झालेपणाचें गुण दिसताती सगुण । वस्तु ते आपण होऊनि ठेली ॥ ४ ॥ सागरीं गंगा मिळोनि गेली जैसी । परतोनियां तियेसी नाम नाहीं ॥ ५ ॥ नामयाची जनी निर्गुणीं बोधली । ठेवा जो लाधली पांडुरंग ॥ ६ ॥

२४९२ शब्दाचें ब्रह्म लौकिकीं हो दिसे । जैसे ते फांसे मयंदाचे ॥ १ ॥ ज्ञानी तो कोण विज्ञानी तो कोण । दोहींचा आपण साक्षभूत ॥ २ ॥ स्वयें सुख धाला आपणातें विसरला । तो योगि राहिला नाहीं येथें ॥ ३ ॥ नामयाची जनी सागरीं मिळाली । परतोनि मुळीं केवीं जाय ॥ ४ ॥

२४९३ अखंडित ध्यानीं । पांडुरंग जपे वाणी ॥ १ ॥ पांडुरंग नाम-जप । हेंचि माझें महातप ॥ २ ॥ ऐसें आलें प्रत्ययासी । सहज तेणें तत्वमसी ॥ ३ ॥ पावलिया हो स्वपद । सहज विराला तो शब्द ॥ ४ ॥ संदेह अवघाचि फिटला । जनी म्हणे उदयो झाला ॥ ५ ॥

२४९४ देव खातें देव पितें । देवावरी मी निजतें ॥ १ ॥ देव देतें देव घेतें । देवासवें व्यवहारितें ॥ २ ॥ देव येथें देव तेथें । देवाविणें नाहीं रीतें ॥३॥ जनी म्हणे विठाबाई । भरूनि उरलें अंतर्बाहीं ॥४॥

२४९५ जनी दृष्टी पाहे । जिकडे तिकडे हरी आहे ॥ १ ॥ मग म्हणे वो देवासी । तुमच्या नामयाची दासी ॥ २ ॥ नामयाचा प्रसाद । झाला जनीला आनंद ॥ ३

२४९६ झाली पूर्ण कृपा आहे । ऐसा पूर जो कां पाहे ॥ १ ॥ ऐसा पूर जो कां पाहे । गुरुपुत्र तोचि होय ॥२॥ पूर्णपदीं जो स्थापिला । जनी म्हणे धन्य झाला ॥ ३ ॥

२४९७ नित्य हातानें वारावें । हृदय अंतरीं प्रेरित जावें ॥ १ ॥

ऐसा स्वरूपाचा पूर आला । आला असे नेत्रावर ॥ २ ॥ स्वरूपाचा पूर आला । पाहतां डोळा झाकुळला ॥ ३ ॥ जनी म्हणे ऐसा पूर । पाहे तोचि रघुवीर ॥ ४ ॥

### श्रीएकनाथमहाराज

२४९८ आनंदाचा भोग घालीन आसनीं । वैकुंठनिवासिनी तुझे नांवें ॥१॥ येई वो विठ्ठले अनाथाचे नाथे। पंढरी दैवते कुळदेवी ॥२॥ आपुलें म्हणावें सनाथ करावें । एकाजनार्दनीं वंदावें संतजना ॥ ३ ॥

२४९९ कैं तयामार्गें चरण चालती । ऐशी वाटे खंती दिनरातीं ॥ १ ॥ कैं या मनाची पुरेल वासना । कैं मिठी चरणा देईन जीवें ॥ २ ॥ कैं हें भाळ ठेवीन चरणीं । कैं पायवणी घेईन सुखें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कैं होईल कृपादान । कैं नारायण प्रेमें भेटे ॥ ४ ॥

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

२५०० देहाचेनि दीपकें पाहें जो सभोंवतें । तंव अवचितें तेंचि ध्यान केलें ॥ १ ॥ निराकारींची वस्तु आकारा आणिली । कृष्णीं कृष्ण केली सकळ सृष्टी ॥ २ ॥ लय गेलें ध्यानीं ध्यान गेलें उन्मनीं । नित्य हरिपर्वणी सर्वां रूपें ॥ ३ ॥ आनंद सोहळा हरिरूपीं आवडी । कृष्ण अर्धघडी न सोडी आम्हां ॥ ४ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठल अभय । भयांचें पैं सय हारपे कृष्णीं ॥ ५ ॥

२५०१ स्वप्नींचे सुख मी पहावया गेलें । तंव स्वप्नीं स्वप्न ठेलें येरां विस्मो गे माये ॥ १ ॥ काय सांगों निद्सुरीं कवळिलें संसारीं । करितां येरझारी येणोंचि छंदे ॥ २ ॥ सुषुप्तीचें सुख जागृती जाणती । तरी परतोनी मागुती कासयातें ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठलु राणे रावो । ऐसा जाणोनि तयाचा भावो ठाकियला ॥ ४ ॥

२५०२ वोल्हावलें मन परतोनी पाही। तंव प्रपंच दिसे लया गेले । पिटुनी बाह्य वैराग्याची गुढी उभऊनि म्हणे म्यां जिंकिलें ॥ आपपर न दिसे शेखीं चरणीं स्थिरावलें । जळतरंग लहरी सरिता संगम

जीवनीं जीवन ऐक्य ठेलें रया ॥१॥ तेंचि ब्रम्हज्ञान बोधितां पाहतां । सगुण निर्गुण आतां भेदु नाहीं । वाउगाचि शिणसी विचारीं मानसीं । वायां कल्पना करुनी दाही दिशीं रया ॥ २ ॥ म्हणुनि पहा तंतु वोतप्रोत होतु । तैसें विश्वजात ब्रम्हीं असे। संतीं कल्पिसी भेद सगुण निर्गुण द्वंद्व । तेणें कल्पने न प्रत्यया ये । सर्वस्वें उदासीन होईं तूं निश्चय । जाण एक सगुणींच काय न लभे रया ॥ ३ ॥ आम्हां सगुण निर्गुण समान नेणों जन्म जातक भान । दृश्य द्रष्टा दर्शन त्रिपुटी नलगे । महावाक्यादि शब्द तत्त्वमस्यादि बोध हेही आम्हां सकळ वाउगे रया । बापरखुमादेवीवरु विठ्ठलु चिंतितां । सुख सगुणाचि जोडे येणें अंगें रया ॥ ४ ॥

२५०३ आजि संसार सुफळ झाला गे माये । देखियले पाय विठोबाचे ॥ १ ॥ तो मज व्हावा तो मज व्हावा । वेळोवेळां व्हावा पांडुरंग ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु न विसंबे सर्वथा । निवृत्तीनें तत्त्वतां सांगितलें ॥ ३ ॥

२५०४ अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तीन्ही लोक ॥ १ ॥ जाईन गे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ॥ २ ॥ सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगीं ॥३॥ बाप रुखमादेवीवरा विठ्ठलाची भेटी । आपुलिये संवसाटी घेउनीं राहे ॥ ४ ॥

२५०५ विठ्ठलयात्रे जाती वो माये । त्यांचे धरीन मी पाये ॥ १ ॥ विठोबा माझें माहेर । भेटेन बुद्धि परिकर ॥ २ ॥ रखुमादेवीवर विठ्ठले । मन ठेऊनि राहिलें निर्धारें ॥ ३ ॥

२५०६ या अमरांमाजी एखादा वोळगों म्हणों तरी तो ठावो ठाकितां अति दुस्तरू । भूमंडळींचें राज्य वोळगों म्हणों तंव तेथें न लभे अवसरू । निःसंग होउनी यतिधर्म चालूं म्हणों तरी भिक्षेसी पडे विचारू । निःप्रपंच हातीं टाळ दिंडी घेऊनियां वोळगे तो हरि-

हरु रे रे ॥ १ ॥ हरीचे विद्यावंत जालों रे । आम्ही जाऊनि पंढरपुरीं राहिलों रे । कळिकाळाच्या माथां पाय देऊनियां । वैकुंठभुवनासी गेलों रे रे ॥ धृ ॥ अष्टांगयोगें शरीर दंडूं पाहें तंव येवढें कैंचें कष्ट-साधन । लयलक्ष लाऊनि गुरुमंत्र जपों म्हणों तरी स्थिर नव्हे अंतःकरण । तल्लीन होऊन हरीकथा आइकों म्हणों तरी ठायींचेचि बधिर श्रवण । उदंड वाचे हरीहरी म्हणतां फुकासाठीं चुके पतन रे रे ॥ २ ॥ चहूं वेदांचें गव्हार धांडोळितां वेडावलीं साही दर्शनें शून्य स्थावर जंगम सर्वत्र व्यापून असणें । जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं सरिसें या दृष्टी पाहणें । ऐसियातें सेवितां अविद्या लोपे मा विश्वास मानिला मनें ॥ ३ ॥ जयाचिये वोळगे जातां आडकाठीच नाहीं भीतरी गेलिया मान पाविजे । अरोधें विरोधें समतुल्य देणें न मगतां अमरा होईजे । तो क्षणामाजीं दे तें न सरे कल्पकोटी ऐसिया धुरे कां दुव्हाविजे । ऐसीयाचे गांवींची सुखवस्तीच पुरे मा बहुत काय अनुवादिजे रे रे ॥ ४ ॥ ऐसा वैकुंठपुरपति पुंडलीकाचिये भक्ती अमूर्त मूर्तीस आला । भक्तां अमरपद देतुसे अवलीळा नामें यमलोक विभांडिला । जिहीं जैसा भाविला त्यां तैसा पालटु दाविला परि अणू एक नाहीं वेंचला । बापरखुमादेवीवरु विठ्ठलु आम्हां गीतीं गातां जोडला रे रे ॥ ५ ॥

२०५७ मन हें राम झालें मन हें राम झालें । प्रवृत्ती ग्रासूनि कैसें निवृत्तीसी आलें ॥ १ ॥ श्रवण कीर्तन पादसेवन कैसें विष्णुस्मरण केलें । अर्चन वंदन दास्य सख्य आत्मनिवेदन केलें ॥ २ ॥ यमानियम प्राणायाम प्रत्याहार संपादिले । ध्यानधारणा आसनमुद्रा कैसें समाधीसी आलें ॥ ३ ॥ बोधीं बोधिलें बोधितां नये ऐसें झालें । बापरखुमादेवीवर विठ्ठलें माझें मीपण हारपलें ॥ ४ ॥

२०५८ आपुलेनि भारें श्रीरंगीं डोलत गेलें । तंव अवचित पाचारिलें पाठीमोरें ॥ १ ॥ चैतन्य चोरिलें माझें चैतन्य चोरिलें । अवघें पारुषलें दीनदेहें ॥ २ ॥ बाप रखुमादेवीवरु दीनानाथ भेटला । विठ्ठल विठ्ठल झाला देह माझा ॥ ३ ॥

२५०९ निरखित निरखित गेलिये । पाहे तंव तन्मयचि जालिये ॥ १ ॥ उन्मनी मन निवालें । सांवळें परब्रह्म भासलें ॥ २ ॥ रूप येवोनियां डोळां बैसलें । पाहें तंव परब्रह्म अवतरलें ॥ ३ ॥ बाप रखुमादेवीवरे विठ्ठले । मूस ओतूनियां मेण सांडिलें ॥ ४ ॥

२५१० पांचांसहित लयातीत जालियें वो । प्रेमभक्ति अनुसरलें काळ्या रूपासी ॥ १ ॥ ठायींचाचि काळा अनादि वहु काळा । म्हणवूनि वेदां चाळा लाविला गे माये ॥ २ ॥ वाप रखुमादेवीवरें जन्मावेगळें केलें । म्हणऊनि भाज जालें वाईयेवो ॥ ३ ॥

२५११ संसारा तुकालिये वेव्हारा मुकालिये । घराचारा पारुपालिये काय सांगों ॥ १ ॥ माझें जिणेंचि वुडालें माझें जिणेंचि वुडालें । विठ्ठलें कुडें केलें काय सांगों ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरे विठ्ठलें । सहज मोलेंविण विकत घेतलें ॥ ३ ॥

२५१२ सखी म्हणे बाई समपण तें कैसें । येरी म्हणे देश हिंडूं नको ॥ १ ॥ आधीं शोधीं आप मग पाहीं दीप । कोहं सोहं रूप दवडी दुरी ॥ २ ॥ त्रिपुटी झोंबों नको मायावी सकळ । अवघा सरळ हरी आहे ॥ ३ ॥ ज्ञानदेव वुझवी वुझे ज्ञानधारण । तुज मज सौजन्य येणें न्यायें ॥ ४ ॥

२५१३ सांग सखिये बाई मज हें न कळे । कैसा हा आकळे समतेजें ॥ १ ॥ भाव दृढ धरी चित्ताची लहरी । प्रकृति कामारी सत्रावीची ॥ २ ॥ येरी म्हणे वांजट झालीं हो पुराणें । समरस जाणे कोणे घरीं ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे आदिमध्य समता । सुखे पाहतां चढे हातां ॥ ४ ॥

२५१४ सखीप्रति सखी आदरें करी प्रश्न । जीव शिव पूर्ण कैसा दिसे ॥ १ ॥ सखी सांगे मात उभयतां ब्रह्म । नाहीं हो विषम हरीविण ॥ २ ॥ सूर्यप्रकाश मही घटमठीं समता । तैसा हा उभयतां विंव एका ॥ ३ ॥ वाप रखुमादेविवरू विठ्ठल जिवाचा । व्यापक शिवाचा शिवपणें ॥ ४ ॥

२५१५ सखी सांगे सार शांति क्षमा दया । प्रपंच विलया

चरळ पोशी ॥१॥ सखी म्हणे एका दुजी म्हणे अनेका । अनेकीं सम्यका गुह्यगम्य ॥ २ ॥ सावध निबंध आद्याचा उकल । रसनेचा पालव रसना तोयें ॥ ३ ॥ ज्ञानदेव सांगे रखुमादेवीं जप । अगम्य संकल्प एक दिसे ॥ ४ ॥

२५१६ सम्यक करी शांति बैसे एके पांती । क्षेमेंसी निवृत्ति चाड करी ॥ १ ॥ ऐसा हा उपदेश सखी सांगे जीवास । ज्ञणीं कासावीस होसी बाई ॥ २ ॥ सज्ञानीं विज्ञान ज्ञानीं ज्ञानपण । अन्वयीं शोधून पहा लक्षीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं शिवा उन्मनीं रिघावा । हरीचा विसांवा सर्वांघटीं ॥ ४ ॥

## श्रीसोपानमहाराज

२५१७ कृष्णाचिया पंथें चालिलों दातारा । तंव मार्ग एकसरा तुजमाजीं ॥ १ ॥ आदि ब्रह्ममूर्ती तूंचि विष्णु स्थिति । तुज कैवल्यपती मोल नाहीं ॥ २ ॥ अमोल्य जे वस्तु पुंडलीक देवा । जगाचा विसावा जनकु माझा ॥ ३ ॥ सोपान म्हणे सांकडें तुजचि सर्व कोडें । विनवितु मी वाडें चरणापाशीं ॥ ४ ॥

२५१८ मी नेणे भक्ति नेणें त्या मुक्ति । तुझ्या नामपंथीं मार्गु मना ॥ १ ॥ हेंचि मज चाड न करीं मीं आशा । तुज हृषीकेशा चिंतितुसें ॥ २ ॥ तूंचि माझें धन जोडी हे निजाची । जननीं तूं आमुची जीवलगी ॥ ३ ॥ सोपान म्हणे तुजविण न कळे । तुजमाजीं सोहळे मनें केलें ॥ ४ ॥

२५१९ सर्वघटीं रूप समसारिखें आहे । म्हणोनियां तें सोय आम्हां भक्तां ॥ १ ॥ निर्गुणीं सगुण गुणांमाजी गुण । जन तूं संपूर्ण दिससी आम्हां ॥ २ ॥ तेंचि रूप रूपस दाविसी प्रकाश । पंढरीनिवास होउनी ठासी ॥ ३ ॥ सोपान सलगी न बोलतां उगा । तुजवीण वाउगा ठावो नाहीं ॥ ४ ॥

२५२० हरिसुखें छंदें नाचतों सर्वदा । गोविंद परमानंदा हरीबोध ॥ १ ॥ रामकृष्ण हरी या नामीं आनंदु । नित्यता गोविंदु आम्हा घरीं ॥ २ ॥ निर्गुण हे नेणों सगुणीं निर्धार । सगुणीं आचार सर्व-

काळ ॥ ३ ॥ सोपान पादप अवघेचि हरिरूप । हरिविण स्वरूप नेघे चित्तीं ॥ ४ ॥

२५२१ गोपाळ अच्युत हा नाममहिमा । नित्यता पूर्णिमा आत्मा देहीं ॥ १ ॥ रामकृष्णनाम हा जप परम । ऐसा नित्यनेम सारूं रया ॥ २ ॥ वासना वोढाळ नहों पैं वरळ । नित्यता अढळ गोपाळ सेवूं ॥ ३ ॥ सोपान सार जपतुसे राम । दिननिशीं राम हृदयांतु ॥ ४ ॥

२५२२ गोविंद माधव हा जपु आमुचा । नाहीं प्रपंचाचा आम्हां लेशु ॥ १ ॥ गोविंदस्मरणे नित्यता पारणें । हरिनामपठणें मोक्षमुक्ति ॥ २ ॥ न लगती तीर्थें एक गोविंदाचि पुरे । वेगीं कृष्ण धुरे वोळगों सदा ॥ ३ ॥ सोपान सांगत गोविंदस्मरण । नित्यता पैं ध्यान गोविंदाचे ॥ ४ ॥

२५२३ विठ्ठल पैं सार हा जपु आमुचा । आणि त्या शिवाचा नित्यनेम ॥ १ ॥ गोविंद श्रीहरी हेंचि तूं उच्चारी । शिव चराचरीं आत्मारामु ॥ २ ॥ नामेंविण नेणें दुजयाची मातु । गोविंद समरतु शिवराणा ॥ ३ ॥ सोपान धारणा गोविंद पाठाची । कोटि पैं कुळाची कुळवटी ॥ ४ ॥

२५२४ हरिविण दुजें न देखे चित्त माझें । म्हणोनि सहजें विचारतु ॥ १ ॥ सर्व हरि हरि तो माझा कैवारी । दुजी भरोवरी नेघों आम्ही ॥ २ ॥ राम हा सकळ आम्हां सर्व आहे । दुजें तें न साहे परब्रह्मीं ॥ ३ ॥ सोपान सलगी विनविती तुम्हां । सर्व हा परमात्मा आम्हां दिसे ॥ ४ ॥

२५२५ हरिवीण दुजें नावडे पैं दैवत । जन्हीं तो समर्थ बोले सृष्टी ॥ १ ॥ हरिनाम गोविंद नित्य हाचि छंद । हृदयीं आनंद प्रेमबोधु ॥ २ ॥ हरि हेंचि दैवत समर्थ पैं आमुचें । बोलणें वेदाचें बोलती मुनी ॥ ३ ॥ सोपान अलगटु नामपाठ वाचे । नित्य विठ्ठलाचें चरण हृदयीं ॥ ४ ॥

२६२६ तुझा तूंचि थोर तुज नाहीं पार । आमुचा आचार विठ्ठल-

देव ॥ १ ॥ आपीं हा सधर सर्व हा श्रीधर । सर्व कुळाचार पांडुरंग ॥ २ ॥ न दिसे दुसरें निर्धारितां खरें । श्रीगुरुविचारें कळलें आम्हां. ॥ ३ ॥ सोपान म्हणे रखुमादेवीवर । तूंचि आमुचें पर कुळवटी ॥ ४ ॥

२५२७ मी माझी कल्पना पळाली वासना । जनीं जनार्दना सेवीतुसे ॥ १ ॥ तूं तंव संपन्न आमुचें हो धन । सांगितलीं खूण निवृत्तिदेवीं ॥ २ ॥ तुजमाजीं प्रेम गेलें सप्रेमें । जप व्रत नेम हारपले ॥ ३ ॥ सोपान सगळा न दिसे इहीं डोळां । तूंचि वा गोपाळा आत्माराम ॥ ४ ॥

## श्रीमुक्ताबाई

२५२८ अवीट न विटे हरिचे हे गुण । सर्व सनातन ध्याता रूप ॥ १ ॥ साध्य हें साधन हरिरूप ध्यानें । रामकृष्ण कीर्तनें मुक्त आम्ही ॥ २ ॥ असंगेंचि नट्ट नटलों पैं साचें । नाहीं त्या यमाचें भय आम्हां ॥ ३ ॥ मुक्तता पूर्णता मुक्ताई साधली । साधनें दिधलीं चांगयासी ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

२५२९ उतरलों पार । संसारसिंधु हा दुस्तर ॥ १ ॥ कृपा केली पांडुरंगें । सर्व निवालीं अंगें ॥ २ ॥ सुख संतोषा पडे मिठी । आवडी पोटीं होती ते ॥ ३ ॥ उपाधी वेगळा । सेना राहिला निराळा ॥ ४ ॥

२५३० आजि फळा आलें पुण्य । गेलें भेदोनि गगन ॥ १ ॥ संत झालेती कृपाळ । माझा केलाजी सांभाळ ॥ २ ॥ संचित वोळलें । तुमचीं देखिलीं पाउलें ॥ ३ ॥ सेना म्हणे नेणें । कृपा केली नारायणें ॥ ४ ॥

२५३१ उच्चारीत कोडें । नाम अबद्ध वांकुडें ॥ १ ॥ मना आवडे त्या वेळीं । भलत्या काळीं उच्चारी ॥ २ ॥ कैसें नाम ठेवूं आतां । कोठें न मिळे पाहतां ॥ ३ ॥ सेना म्हणे आनंदें धालों । सुख लाधलों परिपूर्ण ॥ ४ ॥

२५३२ असाल तेथें नामाचें चिंतन । याहुनि साधन आणिक नाहीं ॥ १ ॥ सोडवील माझा भक्तांचा कैवारी । प्रतिज्ञा निर्धारीं केली आम्ही ॥ २ ॥ गुण दोष याती न विचारी कांहीं । धांवे लवलाही भक्तकाजा ॥ ३ ॥ अवघे काळीं वाचे म्हणा नारायण । सेना म्हणे क्षण जाऊं न द्या ॥ ४ ॥

२५३३ माझें अंतरींचें । जाणे पांडुरंग साचें ॥ १ ॥ जीवभाव त्याचे पायीं । ठेवुनि कांहीं न मागों ॥ २ ॥ सुख संतसमागम । घेऊं नाम आवडी ॥ ३ ॥ सेना म्हणे चुकलों साचें । आणिक वाचे न सेवीं ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

२५३४ जन्माचें सांकडें नाहीं माझें कोडें । जेणें तुम्हां पडे ओझें देवा ॥ १ ॥ कोणत्याही कुळीं उंचनीच वर्ण । हें मज कारण नाहीं त्याचें ॥ २ ॥ वैष्णवांचे द्वारीं लोळेन परिवरीं । करीं अधिकारी उच्छिष्टाचा ॥ ३ ॥ चोखा म्हणे जया घडे पंढरीची वारी । तयाचिये घरीं पशुयाती ॥ ४ ॥

२५३५ श्वान अथवा शूकर हो कां मार्जार । परी वैष्णवांचें घर देईं देवा ॥ १ ॥ तेणें समाधान होय माझ्या जीवा । न भाकीं कींव आणिकांसी ॥ २ ॥ उच्छिष्ट प्रसाद सेवीन धणीवरी । लोळेन परवरीं कवतुकें ॥ ३ ॥ चोखा म्हणे कोणी जातां पंढरीसी । दंडवत त्यासी घालीन सुखें ॥ ४ ॥

२५३६ बैसोनि निवांत करीन चिंतन । काया वाचा मन सहित देवा ॥ १ ॥ नामाचा आठव हेंचि सोपें वर्म । अवघें कर्माकर्म पारुषती ॥ २ ॥ यापरतें साधन आन कांहीं नेणें । अखंड वाचे म्हणे रामकृष्ण ॥ ३ ॥ सुलभ हा मंत्र तारक जीवासी । येणें भवासी उतार होय ॥ ४ ॥ चोखा म्हणे मज सांगितलें कानीं । रामकृष्ण वाणी जप सदा ॥ ५ ॥

# भाग दुसरा

## नाटपर

### श्रीतुकाराममहाराज

२५३७ श्रीअनंता मधुसूदना। पद्मनाभा नारायणा। जगव्यापका जनार्दना। आनंदघना अविनाशा ॥ १ ॥ सकळदेवाधिदेवा। कृपाळुवा जी केशवा। महानंदा महानुभावा। सदाशिवा सहजरूपा ॥ २ ॥ चक्रधरा विश्वंभरा। गरुडध्वजा करुणाकरा। सहस्रपादा सहस्रकरा। क्षीरसागरा शेषनयना ॥ ३ ॥ कमलनयना कमलापती। कामिनीमोहना मदनमूर्ति। भवतारका धरित्या क्षिति। वामनमूर्ति त्रिविक्रमा ॥ ४ ॥ अगा ये सगुणा निर्गुणा। जगज्जनित्या जगज्जीवना। वसुदेवदेवकीनंदना। बाळरांगणा बाळकृष्णा ॥ ५ ॥ तुका आला लोटांगणीं। मज ठाव द्यावा जी चरणीं। हेंचि करीतसें विनवणी। भवबंधनीं सोडवावें ॥ ६ ॥

२५३८ अगा ये सांवळया सगुणा। गुणनिधिनाम नारायणा। आमची परिसा विज्ञापना। सांभाळीं दीना आपुलिया ॥ १ ॥ बहु या उदराचे कष्ट। आम्हांसी केलें कर्मभ्रष्ट। तुमची चुकाविली वाट। करीं वटवट या निमित्यें ॥ २ ॥ झालों पांगिला जनासी। संसाराची आंदणी दासी। न कळे कधीं सोडविसी। दृढपाशीं बहु बांधलों ॥ ३ ॥ येथें तों नये आठव कांहीं। विसांवा तो क्षण एक नाहीं। पडिलों आणिकें प्रवाहीं। हित तों कांहीं दिसेचि ना ॥ ४ ॥ जीवित्व वेंचिलें वियोगें। हिंडतां प्रवास वाउगें। कांहीं व्याधी पीडा रोगें। केलिया भोगें तडातोडी ॥ ५ ॥ माझा मीच झालों शत्रु। कैंचा पुत्र दारा कैंचा मित्रु। कासया घातला पसरु। अहो जगद्‌गुरु तुका म्हणे ॥ ६ ॥

२५३९ ऐसी हे गर्जवूं वैखरी। केशव मुकुंद मुरारी। रामकृष्ण नामें

वरीं । हरी हरी दोष सकळ ॥ १ ॥ जनार्दना जगज्जीवना । विराट-स्वरूपा वामना । महदादि मधुसूदना । भवबंधना तोडितिया ॥ २ ॥ चक्रपाणी गदाधरा । असुरमर्दना वीर्यवीरा । सकळमुगुटमणि शूरा । अहो दातारा जगदानिया ॥ ३ ॥ मदनमूर्ति मनमोहना । गोपाळ-गोपिकारमणा । नटनाट्यकौशल्य कान्हा । अहो संपन्ना सर्वगुणें ॥ ४ ॥ गुणवंता आणि निर्गुणा । सर्वसाक्षी आणि सर्वजाणा । करोनि अकर्ता आपणा । नेदी अभिमाना आतळों ॥ ५ ॥ कासयानें घडे याची सेवा । काय एक समर्पावें या देवा । वस्तु तो नव्हे वांचूनि भावा । पाय जीवावेगळे न करी तुका ॥ ६ ॥

२५४० विठ्ठल भीमातीरवासी । विठ्ठल पंढरीनिवासी । विठ्ठल पुंडलिकापाशीं । कृपादानाविसीं उदार ॥१॥ विठ्ठल समरणा कोंवळा । विठ्ठल गौरवीं आगळा । आधार ब्रह्मांडा सकळा । विठ्ठल लीळा-विग्रही ॥ २ ॥ उभाचि परी न मानी सीण । नाहीं उद्धरिता भिन्न । समर्थाचे घरीं एकचि अन्न । आर्तभूतां क्षणोक्षणा सांभाळी ॥ ३ ॥ रुचिचे प्रकार । आणिताती आदरें । कोठेंही न पडे अंतर । थोरां थोर धाकुट्यां धाकुटा ॥ ४ ॥ करितां बळ धरितां नये । झोंबतां डोळे मनेंच होय । आपुल्या उद्देशाची सोय । जाणे हृदयनिवासी ॥ ५ ॥ पान्हा तरी आल्या अंतर तेथें । तों नाहीं भरिलें रितें । करितां सेवन आइतें । तुका चित्तें चित्त मेळवूनी ॥ ६ ॥

२५४१ विठ्ठल आमुचें जीवन । आगमनिगमाचें स्थान । विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसांवा ॥ १ ॥ विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त । विठ्ठल पुण्य पुरुषार्थ । आवडे मात विठ्ठ-लाची ॥ २ ॥ विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तही पाताळें भरूनी । विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥ विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावि-येला चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥ विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल

भगिनी आणि भ्राता। विठ्ठलेंवीण चाड नाहीं गोता। तुका म्हणे आतां नाहीं दुसरें ॥ ५ ॥

२५४२ तुळसीमाळ घालुनी कंठीं। उभा विटेवरी जगजेठी। अवलोकुनी पुंडलीका दृष्टी। असे भीमातटीं पंढरीये ॥ १ ॥ भुक्ति-मुक्ति जयाच्या कामारी। रिद्धिसिद्धि वोळगती द्वारीं। सुदर्शन घरटी करी। काळ कांपे दुरी धाकें तया ॥ २ ॥ जगज्जननी असे वामभागीं। भीमकी शोभली अर्धांगी। जैसी विद्युल्लता झळके मेघीं। दृष्टपणें भंगी महादोष ॥ ३ ॥ सुखसागर परमानंदु। गोपीगोपाळां गोधनां छंदु। पक्षी श्वापदां जयाचा वेधु। वाहे गोविंदु पांवा छंदें ॥ ४ ॥ मुखमंडित चतुर्भुजा। मनमोहन गरुडध्वजा। तुका म्हणे स्वामी माझा। पावे भक्तकाजा लवलाहीं ॥ ५ ॥

२५४३ सेंदरीं हेंदरीं दैवतें। कोण तीं पूजी भूतेंखेतें। आपुल्या पोटा जीं रडतें। मागती शितें अवदान ॥ १ ॥ आपुलें इच्छे आणिकां पीडी। काय तें देईल बराडी। कळों हो आली तयाची जोडी। अल्प रोकडी बुद्धि अधिरा ॥ २ ॥ दासीचा पाहुणेर उखितें। धणी देईल आपुल्या हातें। करुणाभाषणउचितें। हें तों रितें सतत शक्तिहीन ॥ ३ ॥ काय तें थिल्लरींचें पाणी। ओठ न भिजे न फिटे धणी। सीण तरी आदीं अवसानीं। क्षोभे पुरश्चरणीं दिलें फळ ॥ ४ ॥ विलेपनें बुजाविती तोंड। भार खोल वाहाती उदंड। करविती आपणयां दंड। ऐसियास भांड म्हणे देव तो ॥ ५ ॥ तैसा नव्हे नारायण। जगव्यापक जनार्दन। तुका म्हणे त्याचें करा चिंतन। वंद्य चरण येती सकळें ॥ ६ ॥

२५४४ बरवें झालें आलों जन्मासी। जोड जोडिली मनुष्यदेहा ऐसी। महालाभाची उत्तम रासी। जेणें सर्वसुखासी पात्र होईजे ॥ १ ॥ दिलीं इंद्रियें हात पाय कान। डोळे मुख बोलावया वचन। जेणें तूं जोडसी नारायण। नासे जीवपण भवरोग ॥ २ ॥ तिळे-

तिळ पुण्य सांचा पडे । तरि हें बहुतां जन्मीं जोडे । नाम तुझें वाचेसि आतुडे । समागम घडे संतांचा ॥ ३ ॥ ऐसिये पावलिलों ठायीं । आतां मी काइ होऊं उतराई । येवढा जीव ठेवीन पायीं । तूं माझे आई पांडुरंगे ॥ ४ ॥ फेडियेला डोळियांचा कवळ । धुतला गुणदोषांचा मळ । लावूनि स्तनीं केलों सीतळ । निजविलों बाळ निजस्थानीं ॥ ५ ॥ नाहीं या आनंदासी जोडा । सांगतां गोष्टी लागती गोडा । आला आकारा आमुच्या चाडा । तुका म्हणे भिडा भक्तीचिया ॥ ६ ॥

२५४५ बरें झालें आजीवरी । नाहीं पडिलों मृत्यूचे आहारीं । वांचोन आलों एथवरी । उरलें तें हरी तुम्हां समर्पण ॥ १ ॥ दिला या काळें अवकाश । नाहीं पावलें आयुष्य नाश । कार्या कारण उरलें शेष । गेलें तें भूस जावो परतें ॥ २ ॥ बुडणें खोटें पावतां थडी । स्वप्नीं झाली ओढाओढी । नासली जागृतीची घडी । साच जोडी शेवटीं गोड घांस ॥ ३ ॥ तुम्हांसी पावविली हाक । तेणें निरसला धाक । तुमचें हें भातें कवतुक । जे शरणागत लोक रक्षावे ॥४॥ रवीच्या नांवें निशीचा नाश । उदय होतांचि प्रकाश । आतां कैंचा आम्हां दोष । तूं जगदीश कैवारी ॥ ५ ॥ आतां जळो देह सुख दंभ मान । न करी याचें साधन । तूं जगदीश नारायण । आलों शरण तुका म्हणे ॥ ६ ॥

२५४६ मागुता हाचि जन्म पावसी । भोगिलें सुखदुःख जाणसी । हें तों न घडे रे सायासीं । कां रे अंध होसी जाणोनियां ॥ १ ॥ लक्षचौऱ्याशीं न चुके फेरा । गर्भवासीं यातना थोरा । येऊनी पडसी संदेहपुरा । वोळसा थोर मायाजाळीं ॥ २ ॥ पशू काय पापपुण्य जाणती । उत्तम मध्यम भोग भोगिती । कांहीं एक उपजतां मरती । बाहिरीं अंध होती पांगुळ मुकीं ॥ ३ ॥ नरदेह निधान लागलें हातीं । उत्तम सार उत्तम गती । होईन देवाचि म्हणती ते होती ।

तरि कां चित्तीं न धरावें ॥ ४ ॥ क्षण एक मन स्थिर करूनी । सावध होईं डोळे उघडोनी । पाहें वेद बोलिले पुराणीं । तुका विनवणी करीतसे ॥ ५ ॥

२५४७ जंव हें सकळ सिद्ध आहे । हात चालावया पाय । तंव तूं आपुले स्वहित पाहें । तीर्थयात्रे जायें चुकों नको ॥ १ ॥ जंव काळ असे दुरी ठेला । तंव तूं हरिगुण गायें आइक वहिला । मनीं भाव धरूनी भला । न वंचें त्याला चुकों नको ॥ २ ॥ जोडोनि धन न घालीं माती । ब्रह्मवृंदें पूजन यती । सत्य आचरण दया भूतीं । करीं सांगाती चुकों नको ॥ ३ ॥ दशा यौवन बाणली अंगीं । पांगिला नव्हे विषयसंगीं । काम क्रोध लोभ मोह त्यागीं । राहें संतसंगीं चुकों नको ॥ ४ ॥ मग तेथें न चले कांहीं । सत्ता संपदा राहेल ठायींच्या ठायीं । पुढें संचित जाईल ग्वाही । तुका म्हणे तेही यमआज्ञा ॥ ५ ॥

२५४८ शरीर दुःखाचें कोठार । शरीर रोगाचें भांडार । शरीर दुर्गंधीची थार । नाहीं अपवित्र शरीरा ऐसें ॥ १ ॥ शरीर उत्तम चांगलें । शरीर सुखाचें घोंसुलें । शरीरें साध्य होय केलें । शरीरें साधलें परब्रह्म ॥ २ ॥ शरीर विटाळाचें आळें । मायामोहपाश जाळें । पतन शरीराच्या मुळें । शरीर काळें व्यापिलें ॥ ३ ॥ शरीर सकळही शुद्ध । शरीर निधींचाही निध । शरीरें तुटे भवबंध । वसे मध्यें भोगी देव शरीरा ॥ ४ ॥ शरीर अविद्येचा बांधा । शरीर अवगुणांचा रांधा । शरीरीं वसे बहुत बाधा । नाहीं गुण सुधा एक शरीरीं ॥ ५ ॥ शरीरा सुख नेदावा भोग । न द्यावें दुःख न करीं त्याग । नव्हे वोखटें ना चांग । तुका म्हणे वेग करीं हरीभजनीं ॥ ६ ॥

२५४९ बहुत जाचलों संसारीं । वसें गर्भीं मातेच्या उदरीं । लक्ष चौऱ्यांशीं योनीद्वारीं । झालों भिकारी याचक ॥ १ ॥ जिणें

पराधीन आणिकां हातीं । दृढ पाशीं बांधिलों संचितीं । प्रारब्ध क्रियमाण सांगाती । भोवंडिती सत्ता आपुलिया ॥ २ ॥ न भरे पोट नाहीं विसांवा । नाहीं नेम एक ठाव गांवा । नाहीं सत्ता न फिरे ऐसी देवा । लाही जीवा खापरीं तडफडी ॥ ३ ॥ काळ बहुत गेले ऐसिया रीती । आणीक पुढेंही नेणों किती । खंडणा नाहीं पुनरावृत्ती । मज कल्पांतीं तरी वेगळें ॥ ४ ॥ ऐसें दुःख कोण हरील माझें । कोणा भार घालूं आपुलें ओझें । भवसिंधुतारक नाम तुझें । धांवसी काजें आडलिया ॥ ५ ॥ आतां धांव घाली नारायणा । मजकारणें रंका दीना । गुण न विचारीं अवगुणा । तुका करुणा भाकीतसे ॥ ६ ॥

२५५० संसारसिंधु हा दुस्तर । नुलंघवे उल्लंघितां पार । बहुत वाहाविलें दूर । न लगेचि तीर पैलथडी ॥ १ ॥ किती जन्म झाला फेरा । गणित नाहीं जी दातारा । पडिलों आवर्तीं भोंवरा । बहु थोरा वोळासिया ॥ २ ॥ वाढलों परी नेणती बुद्धि । नाहीं परतली धरिली शुद्धि । मग त्यां विचारावें कधीं । ऐसी संधि सांडूनियां ॥ ३ ॥ अनेक खाणी आहार निद्रा । भयमैथुनाचाचि थारा । बालत्व तारुण्य जरा । प्रधान पुरा भोग तेथें ॥ ४ ॥ ऐसीं उलंघुनी आलों स्थळें । बहु या भोवंडिलों काळें । आतां हें उगवावें जाळें । उजेडावें बळें दिवसाच्या ॥ ५ ॥ सांडो या संसाराची वाट । बहु येणें भोगविले कष्ट । दावी सत्या ऐसें नष्ट । तुका म्हणे भ्रष्ट झालों देवद्रोही ॥ ६ ॥

२५५१ विषयओढी भुलले जीव । आतां यांची कोण करील कींव । नुपजे नारायणीं भाव । पावोनी ठाव नरदेह ॥ १ ॥ कोण सुख धरोनि संसारीं । पडोनी काळाचे आहारीं । माप या लागलें शरीरीं । झालियावरी सळे ओढिती ॥ २ ॥ बापुडीं होतील शेवटीं । आयुष्यासवें झालिया तुटी । भोगिले मागें पुढेंही कोटी । होईल

भेटी जन्मासी ॥ ३ ॥ झुंतिलें घाणां बांधोनी डोळे । मागें जोडी आर तेणें हो पोळे । चालिलों किती तें न कळे । दुःखें अरंवळें भूक तान ॥ ४ ॥ एवढें जयाचें निमित्त । प्रारब्ध क्रियामाण संचित । तें हे देह-मानूनी अनित्य । न करिती नित्य नामस्मरण ॥ ५ ॥ तुका म्हणे न वेंचतां मोल । तो हा यांसी महाग विठ्ठल । वेंचितां फुकाचेंचि बोल । केवढें खोल अभागिया ॥ ६ ॥

२५५२ काय आम्हीं भक्ति करणें कैसी । काय एक वाहावें तुम्हांसी । अवघा भरोनी उरलासी । वाणीं खाणीं रसीं रूपीं गंधीं ॥ १ ॥ कैसें करूं इंद्रियां बंधन । पुण्यपापाचें खंडण । काय व्रत करूं आचरण । काय तुजवीण उरलें तें ॥ २ ॥ काय डोळे झांकोनिया पाहूं । मंत्र जप काय ध्याऊं । कवणें ठायीं धरूनि भावु । काय तें वाव तुजवीण ॥ ३ ॥ काय हिंडों कवण दिशा । कवणे ठायीं पाय ठेऊं कैसा । काय तूं नव्हेसी न कळे ऐसा । काय मी कैसा पाहों आतां ॥ ४ ॥ तुझिया नामाची सकळ । पूजा अर्चन मंत्र माळ । धूप दीप नैवेद्य फळ तांबूल । वाहूं पुष्पांजुळ तुका म्हणे ॥ ५ ॥

२५५३ हेंचि भवरोगाचें औषध । जन्म जरा तुटे व्याध । आणिक कांहीं नव्हे बाध । करील वध षड्वर्गा ॥ १ ॥ सांवळें रूप ल्यावें डोळां । सा चौ अठरांचा गोळा । पथ्य लागों नेदी खळा । नाममंत्र माळा विष्णुसहस्रा ॥ २ ॥ भोजना न द्यावें अन्न । जेणें चुके अनु-पान । तरीच घेतल्याचा गुण । होईल जाण सत्यभाव ॥ ३ ॥ नये निघों आपुलिया घरा । बाहेर लागों नये वारा । बहु बोलणें तें सारा । संग दुसरा वर्जावा ॥ ४ ॥ पास तें एक द्यावें वरी । नवनीताची होईल परी । होईल धुसळिलें तें निवारी । सार भीतरी नाहीं तया ॥ ५ ॥ व्हायें अनुतापीं पांघरें दिशा । स्वेद निघों दे अवघी आशा । होसील मागें होतासी तैसा । तुका म्हणे दशा भोगीं वैराग्य ॥ ६ ॥

२५५४ अवघ्या दशा येणेंचि साधती । मुख्य उपासना सगुण-

भक्ति । प्रगटे हृदयींची मूर्ति । भावशुद्धि जाणोनियां ॥ १ ॥ बीज आणि फळ हरीचें नाम । सकळ पुण्य सकळ धर्म । सकळां कळांचें हें वर्म । निवारी श्रम सकळही ॥ २ ॥ जेथें कीर्तन हें नामघोष । करिती निर्लज्ज हरीचे दास । सकळ वोथंबले रस । तुटती पाश भवबंधाचे ॥ ३ ॥ येती अंगा वसती लक्षणें । अंतरीं देवें धरिलें ठाणें । आपणचि येती तयाचे गुण । जाणें येणें खुंटे वस्तीचें ॥ ४ ॥ न लगे सांडावा आश्रम । उपजले कुळींचे धर्म । आणीक न करावे श्रम । एक पुरे नाम विठोबाचें ॥ ५ ॥ वेदपुरुष नारायण । योगियांचें ब्रह्म शून्य । मुक्त आत्मा परिपूर्ण । तुका म्हणे सगुण भोळ्यां आम्हां ॥ ६ ॥

२५५५ होतों तें चिंतीत मानसीं । नवस फळले नवसीं । जोडी ते नारायणा ऐसी । अवीट ज्यासी नाश नाहीं ॥ १ ॥ धरिलें जीवीं न सोडीं पाय । आलें या जीवित्वाचें काय । कैं हे पाविजेती ठाय । लाविली सोय संचितानें ॥ २ ॥ मज तों पडियेली होती भुली । चित्ताची अपसव्य चाली । होती मृगजळें गोवी केली । दृष्टि उघडली बरें झालें ॥ ३ ॥ आतां हा सिद्धि पावो भाव । मध्यें चांचल्यें न व्हावा जीव । ऐसी तुम्हां भाकीतसें कींव । कृपाळुवा जगदानिया ॥ ४ ॥ कळों येतें आपुले बुद्धी । ऐसें तों न घडतें कधीं । केवढे आघात ते मधीं । लज्जा रिद्धि उभी आड ठाके ॥ ५ ॥ कृपा या केली संतजनीं । माझी अळंकारिली वाणी । प्रीति हे लाविली कीर्तनीं । तुका चरणीं लोळतसे ॥ ६ ॥

२५५६ बरवा झाला व्यवसाय । पावलों चिंतिलाचि ठाव । दृढ पायीं राहिला भाव । पावला जीव विश्रांति ॥ १ ॥ बरवा फळला शकुन । अवघा निवारिला सीण । तुमचें झालिया दर्शन । जन्ममरण नाहीं आतां ॥ २ ॥ बरवें झालें आलों या ठाया । होतें संचित ठायींचा पाया । देहभाव पालटली काया । पडली छाया

म्हणींची ॥ ३ ॥ जोडिलें हें न सरे धन । अविनाश आनंदघन । अमूर्तमूर्ति मधुसूदन । समचरण देखियेले ॥ ४ ॥ जुनाट युगादिचें नाणें । बहुता काळाचें ठेवणें । लोपलें होतें पारिखेपणें । ठावचळण चुकविला ॥ ५ ॥ आतां या जीवाचियासाटीं । न सुटे पडलिया मिठी । तुका म्हणे सोणलों जगजेठी । न लवीं दिठी दुसऱ्याची ॥ ६ ॥

२५५७ चांगलें नाम गोमटें रूप । निवती डोळे हरती ताप । विठ्ठल विठ्ठल हा जप । प्रगट स्वल्प अति सार ॥१॥ शस्त्र हें निर्वाणींचा बाण । निकट समय अवसान । कोठें योजेल दश दान । खंडीं नारायण दुःख चिंतनें ॥ २ ॥ सकळ श्रेष्ठांचें मत । पावे सिद्धि पाववी अनंत । म्हणोनी व्हावें शरणागत । आहे उचित एवढेंचि ॥ ३ ॥ म्हणोनी रुसलों संसारा । सर्प विखार हा पांढरा । तुजशीं अंतर रे दातारा । याचि दावेदारानिमित्त ॥ ४ ॥ येणें मज भोगविल्या खाणी । नसता छंद लाविला मनीं । माजलों मी माझें भ्रमणीं । झाली वोडणी विटंबना ॥ ५ ॥ पावलों केलियाचा दंड । खाणी भोगिल्या उदंड । आतां केला पाहिजे खंड । तुका दंडवत घाली देवा ॥ ६ ॥

२५५८ ताप हें हरण श्रीमुख । हरी भवरोगा ऐसें दुःख । अवलोकितां उपजे सुख । उभें सन्मुख दृष्टीपुढें ॥ १ ॥ न पुरे डोळियांची धणी । सखोल कृपेचीच खाणी । स्तवितां न पुरे वेदवाणी । तो हा समचरणीं कृपानिधि ॥ २ ॥ रामकृष्णध्यान वामननारसिंहीं । उग्र आणि सौम्य कांहींच नाहीं । सांपडे भरलीये वाहीं । भाव शुद्ध पाहीं याचें भातुकें ॥ ३ ॥ गुणगंभीर चतुर सुजाण । शूर धीर उदार नारायण । व्यापक तरी त्रिभुवन । मनमोहन लावण्य हें ॥ ४ ॥ ठाण हें साजिरें सुंदर । अविनाश अविकार । अनंत आणि अपार । तो हा कटीं कर धरिताहे ॥ ५ ॥ ज्याची वाणी सुमनमाळा । परमा-

मृत जिव्हाळा । अनंता अंगीं अनंत कळा । तुका जवळा चरण-सेवक ॥ ६ ॥

२५५९ हरि तैसे हरिचे दास । नाहीं तया भय मोह चिंता आस । होऊनि राहती उदास । बळकट कांस भक्तीची ॥ १ ॥ धरूनि पाय त्यजिलें जन । न लगे मान मृत्तिका धन । कंठीं नामामृताचें पान । न लगे आन ऐसें जालें ॥ २ ॥ भाव तरी उदंडच पोटीं । धीर सिंधु ऐसे जगजेठी । कामक्रोधा न सुटे मिठी । गिन्हे तरि वेठीं राबविती ॥ ३ ॥ बळें तरी नागवती काळा । लीन तरी सकळांच्या तळा । उदार देहासी सकळा । जाणोनी कळा सर्व नेणते ॥ ४ ॥ संसार तो तयांचा दास । मोक्ष तो पहातसे वास । रिद्धिसिद्धि देशवटा त्रास । न शिवती यास वैष्णवजन ॥ ५ ॥ जन्ममृत्यु स्वप्नासारिखे । आप त्यां न दिसे पारखें । तुका म्हणे अखंडित सुखें । वाणीं वदे मुखें प्रेमामृताची ॥ ६ ॥

२५६० मज ते हासतील संत । जिहीं देखिलेती मूर्तिमंत । म्हणोनि उद्वेगलें चित्त । आहाच भक्त ऐसा दिसे ॥ १ ॥ ध्यानीं म्यां वर्णावेती कैसें । पुढें एकीं स्तुती केली असे । तेथूनि जीव निघत नसे । ऐसिये आसे लागलोंसे ॥ २ ॥ कासया पाडिला जी धडा । उगाचि वेडा आणि वांकडा । आम्हां लेंकरांसी पीडा । एका मागें जोडा दुसऱ्याचा ॥ ३ ॥ सांगा कोणाचा अन्याय । ऐसें मी धरीतसें पाय । तूं तंव समचि सकळां माय । काय अन्याय एक माझा ॥ ४ ॥ नये हा जरी कारणा । तरी कां व्यालेती नारायणा । वचन द्यावें जी वचना । मज अज्ञाना समजावीं ॥ ५ ॥ बहुत दिवस केला बोभाट । पाहतां श्रमलों ते वाट । तुका म्हणे विस्तारलें ताट । काय वीट आला नेणों स्वामी ॥ ६ ॥

२५६१ कांहो माझा मानियेला भार । ऐसा दिसतसे फार । अनंत पावविलीं उद्धार । नव्हेचि थार मज शेवटीं ॥ १ ॥ पाप

बाळवंत गाढें । तुजही राहो सकतें पुढें । मागील कांहीं राहिलें ओढे । नवल केवढें देखियलें ॥ २ ॥ काय मानिती संतजन । तुमचें हिनत्व वचन । कीं वृद्ध झाला नारायण । न चले पण आथील तो ॥ ३ ॥ आतां न करावी चोरी । बहुत न धरावें दुरी । पडदा काय घरच्या घरीं । धरिलें दुरी तेव्हां धरिलें ॥ ४ ॥ नको चाळवूं अनंता । कासया होतोसी नेणता । काय तूं नाहीं धरीत सत्ता । तुका म्हणे आतां होईं प्रगट ॥ ५ ॥

२५६२ दास्य करी दासांचें । उणें न साहे तयांचें । वाढिलें ठायींचें । भाणें टाकोनियां धांवे ॥ १ ॥ ऐसा कृपेचा सागर । विटे उभा कटीं कर । सर्वस्वें उदार । भक्तांलागीं प्रगटे ॥ २ ॥ हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्तांचें भूषण । नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लाथेचें ॥ ३ ॥ सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगिकारी । सेवकाच्या शिरीं । धरोनि चाले पादुका ॥ ४ ॥ राखे दारवंटा बळीचा । सारथी झाला अर्जुनाचा । दास सेवकांचा । होय साचा अंकित ॥ ५ ॥ भिडा न बोलवे पुंडलिकाशीं । उभा मर्यादा पाठीशीं । तुका म्हणे ऐसी । कां रे न भजा माउली ॥ ६ ॥

२५६३ चांगला तरी पूर्णकाम । गोड तरी याचेंचि नाम । दयाळू तरी अवघा धर्म । भला तरी दासां श्रम होऊं नेदी ॥ १ ॥ उदार तरी लक्ष्मीयेसी । झुंझार तरी कळिकाळांसी । चतुर तरी गुणांचीच रासी । जाणता तयासी तो एक ॥ २ ॥ जुनाट तरी बहु काळा । न कळे जयाची लीळा । नेणता गोवळीं गोवळा । लाघवी अवलाभुलवणा ॥ ३ ॥ गांढ्या तरी भावाचा अंकित । बराडी तरी उच्छिष्टाची प्रीत । ओंगळ तरी कुब्जेशीं रत । भ्याड अनंत बहु पापा ॥ ४ ॥ खेळ तो येणेंचि खेळावा । नट तो येणेंचि आवगावा । लपोनी जीवीं न कळे जीवा । धरितां देवा नातुडसी ॥ ५ ॥ उंच तरी बहुताचि उंच । नीच तरी बहुतचि नीच । तुका म्हणे बोलिलों साच । नाहीं आहाच पूजा केली ॥ ६ ॥

२५६४ तूंचि अनाथांचा दाता। दुःख मोह नासावया चिंता। शरण आलों तुज आतां। तारीं कृपावंता मायबापा ॥ १ ॥ संत-संगति देईं चरणसेवा। जेणें तुझा विसर न पडावा। हाच भाव माझिया जीवा। पुरवीं देवा मनोरथ ॥ २ ॥ मज भाव प्रेम देईं प्रीती। गुण नाम वर्णावया स्तुती। विघ्नां सोडवूनि हातीं। विनंति माझी परिसावी हे ॥ ३ ॥ आणिक कांहीं नाहीं मागणें। सुखसंपत्ति राज्यचाड धनें। सांकडें न पडे तुज जेणें। दुजें भक्तीविणें मायबापा ॥ ४ ॥ जोडोनि कर पायीं ठेवीतों माथा। तुका विनवी पंढरीनाथा। रंगीं वोढवावी रंगकथा। पुरवीं देवा मनोरथा ॥ ५ ॥

२५६५ देवा तूं आमुचा कृपाळ। भक्तप्रतिपाळ दीनवत्सल। माय तूं माउली स्नेहाळ। भार सकळ चालविसी ॥ १ ॥ तुज लागली सकळ चिंता। राखणें लागे वांकडें जातां। पुढती निरविसी संतां। नव्हे विसंबतां धीर तुज ॥ २ ॥ आम्हां भय चिंता नाहीं धाक। जन्म मरण कांहीं एक। जाला इहलोकीं परलोक। आलें सकळैक वैकुंठ ॥ ३ ॥ न कळे दिवस राती। अखंड लागलीसे ज्योती। आनंदलहरीची गती। वर्णूं किती तया सुखा ॥ ४ ॥ तुझिया नामाचीं भूषणें। तीं ये मज लेवविलीं लेणें। तुका म्हणे तुझिये गुणें। काय तें उणें एक आम्हां ॥ ५ ॥

२५६६ देवा तूं कृपाकरुणासिंधु। होसी मायबाप आमुचा बंधु। जीवनसिद्धि साधनसिंधु। तोडिसि भवबंधु काळपाश ॥ १ ॥ शरणागतां वज्रपंजर। अभयदाना तूं उदार। सकळां देवा तूं अगोचर। होसी अविकार अविनाश ॥ २ ॥ भागलीं स्तुति करितां फार। तेथें मी काय तें गव्हार। जाणावया तुझा हा विचार। नको अंतर देऊं आतां ॥ ३ ॥ नेणें भाव परि म्हणवीं तुझा। नेणें भक्ति परि करितों पूजा। आपुल्या नामाचिया काजा। तुज केशीराजा लागे धांवणें ॥ ४ ॥ तुझिया बळें पंढरीनाथा। झालों निर्भर तुटली व्यथा। घातला भार तुझिया माथां। न भीं सर्वथा तुका म्हणे ॥ ५ ॥

२५६७ इतुलें करीं भलत्यापरी । परद्रव्य परनारी। सांडुनी अभिलाष अंतरीं । वर्ते वेव्हारीं सुखरूप ॥ १ ॥ न करीं दंभाचा सायास । शांति राहे बहुवस । जिव्हे सेवीं सुगंधरस । न करीं आळस रामनामीं ॥ २ ॥ जनामित्र होईं सकळांचा । अशुभ न बोलावी वाचा । संग न धरावा दुर्जनांचा । करीं संतांचा सायास ॥ ३ ॥ करिसी देवाविण आस । अवघी होईल निरास । तृष्णा वाढविसी बहुवस । कधीं सुखास न पवसी ॥ ४ ॥ धरुनी विश्वास करीं धीर । करितां देव हाचि निर्धार । तयाचा वाहे योगक्षेमभार । नाहीं अंतर तुका म्हणे ॥ ५ ॥

२५६८ तुझिया पार नाहीं गुणां । माझी अल्प मति नारायणा । भवतारका जी सुजाणा । एक विज्ञापना पायांपाशीं ॥१॥ काय जाणावें म्यां दीनें । तुझिये भक्तीचीं लक्षणें । धड ते तोंड धुऊं नेणें । परि चिंतनें काळ सारीं ॥ २ ॥ न लवीं आणिक कांहीं पिसें । माझिया मना वायां जाय ऐसें । चालवीं आपुल्या प्रकारें । हातीं सरिसें धरोनियां ॥ ३ ॥ तुज हे समर्पिली काया । जीवेंभावें पंढरीराया । सांभाळीं समविषम डाया । करीं छाया कृपेची ॥ ४ ॥ चतुर तरी चतुरां राव । जाणता तरी जीवांचा जीव । न्यून तो कोण एक ठाव । आरुष भाव परि माझा ॥ ५ ॥ होतें तें माझें भांडवल । पायांपें निवेदिले बोल । आदरापेसें पाविजे मोल । तुका म्हणे साच फोल तूं जाणसी ॥ ६ ॥

२५६९ बरवें झालें लागलों कारणीं । तुमचे राहिलों चरणीं । फेडीन संतसंगती धणी । गर्जेईल गुणीं वैखरी ॥ १ ॥ न वंचें शरीर सेवेसी । काया वाचा आणि मनेंसीं । जालों संतांची आंदणी दासी । केला याविशीं निर्धार ॥ २ ॥ जीवनीं राखिला जिव्हाळा । झालों मी मजलीं निराळा । पंचभूतांचा पुतळा । सहज लीळा वर्ततसे ॥ ३ ॥ जयाचें जया होईल ठावें । लाहो या साधियेला भावें । ऐसें होतें

राखियलें जीवें । येथूनी देवें ओवंडूनी॥ ४ ॥ आस निरसली ये खेपे । अवघे पंथ झाले सोपे । तुमचे दीनवंधु कृपें । दुसरें कांपे सत्ताधाकें ॥ ५ ॥ अंकिलेपणें आनंदरूप । आतळों नये पुण्यपाप । सारुनी ठेविले संकल्प । तुका म्हणे आपेंआप एकाएकीं ॥ ६ ॥

२५७० हातींचें न संडावें देवें । शरण आलों जीवेंभावें । आपलें ऐसें म्हणावें । करितों जीवें निंबलोण ॥ १ ॥ वैसतां संतांचे संगती। कळों आलें कमळापती । आपुलीं कोणीच नव्हती । निश्चय चित्तीं दृढ झाला ॥ २॥ येती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड । कनिष्ठीं रुचि ठेवूनि गोड । देखत नाड कळतसे ॥ ३ ॥ मरती मेलीं नेणों किती । तोचि लाभ तयांचे संगती । म्हणोनि येतों काकुळती । धीर तो चित्तीं दृढ द्यावा ॥४ ॥ सुखें निंदोत हे जन। न करीं तयाशीं वचन । आदिपिता तूं नारायण । जोडी चरण तुमचे ते ॥५॥ आपलें आपण न करूं हित । करूं हें प्रमाण संचित । तरी मी नग्नचि पतित । तुका म्हणे मज संत हांसती ॥ ६ ॥

२५७१ न पवे सन्निध वाटते चिंता । वरि या वहुतांची सत्ता । नुगवे पडत जातो गुंता । कर्मा वाळिवंता सांपडलों ॥ १ ॥ वहु भार पडियेला शिरीं । मी हें माझें मजवरी । उघड्या नागविलों चोरीं । घरिंच्या घरीं जाणजाणतां ॥ २ ॥ तुज मागणें इतुलें आतां । मज या निरवावें संतां । जाला कंठस्फोट आळवितां । उदास आतां न करावें ॥ ३ ॥ अति हा निकट समय । मग म्या करावें तें काय । दिवस गेलिया ठाकेइल छाय । उरेइल हाय रातिकाळीं ॥ ४ ॥ होईल संचिताची सत्ता । अंगा येईल पराधीनता । ठाव तो न दिसे लपतां । वहुत चिंता प्रवर्तली ॥ ५ ॥ ऐसीं या संकटाचे संधी । धांव घालावी कृपानिधि । तुका म्हणे माझी वळवुद्धी । सकळ सिद्धी पाय तुझे ॥ ६ ॥

२५७२ सवसुखांचिया आशा जन्म गेला । क्षण एक मुक्ती यत्न

नाहीं केला। हिंडतां दिशा सीण पावला। माया वेष्टिला जीव माझा ॥ १ ॥ माझें स्वहित नेणती कोणी। कांहींच न करिती मजवांचूनी। सज्जन तंव सुखाची मांडणी। नेणती कोणी आदि अंत ॥ २ ॥ काय सांगों गर्भीची यातना। मज भोगितां नारायणा। मांस मळ मूत्र जाणा। तुज क्षणक्षणा ध्यात असें ॥ ३ ॥ मज चालतां प्रयाणकाळीं। असतां न दिसती जवळी। मृत्तिके मृत्तिका कवळी। एकले मेळीं संचिताचे ॥ ४ ॥ आतां मज ऐसें करीं गा देवा। कांहीं घडे तुझी चरणसेवा। तुका विनवितसे केशवा। चालवीं दावा संसारें ॥ ५ ॥

२५७३ तरी स्यां आळवावें कोणा। कोण हे पुरवील वासना। तुजवांचूनी नारायणा। लावीं स्तना कृपावंते ॥ १ ॥ आपुला न विचारीं सीण। न धरीं अंगसंगें भिन्न। अंगिकारिलें राखें दीन। देईं जीवदान आवडीचें ॥ २ ॥ माझिया मनासी हे आस। नित्य सेवावा ब्रह्मरस। अखंड चरणींचा वास। पुरवीं आस याचकाची ॥ ३ ॥ माझिया संचिताचा ठेवा। तेणें हे वाट दाविली देवा। एवढया आदराचा हेवा। मागे सेवादान आवडीचें ॥ ४ ॥ आळवीन करुणा वचनीं। आणीक गोड न लगे मनीं। निद्रा जागृति आणि स्वप्नीं। धरिलें ध्यानीं मनीं रूप ॥ ५ ॥ आतां भेट न भेटतां आहे। किंवा नाहीं ऐसें विचारूनी पाहे। लागला झरा अखंड आहे। तुका म्हणे साह्य केलें अंतरीं ॥ ६ ॥

२५७४ कोण सुख धरोनी संसारीं। राहों सांग मज बा हरी। अवघ्या नाशिवंता परी। थिता दुरी तूंही अंतरसी ॥१॥ प्रथम केला गर्भीं वास। काय ते सांगावे सायास। दुःख भोगिलें नवही मास। आलों जन्मास, येथवरी ॥ २ ॥ बाळपण गेलें नेणतां। तारुण्यदशे विषयव्यथा। वृद्धपणीं प्रवर्तली चिंता। मरें मागुता जन्म धरीं ॥ ३ ॥ क्षण एक तोही नाहीं विसांवा। लक्ष चौऱ्यांशीं घेतल्या धांवा। भोवं-

डिली पाठीं लागल्या हांवा। लागो आगी नांवा माझ्या मीपणा ॥ ४ ॥ आतां पुरे ऐसी भरोवरी। रंक होऊनी राहेन द्वारीं। तुझा दास मी दीन कामारी तुका म्हणे करीं कृपा आतां ॥ ५ ॥

२५७५ काय मी उद्धार पावेन। काय कृपा करील नारायण। ऐसें तुम्ही सांगा संतजन। करा समाधान चित्त माझें ॥ १ ॥ काय हें खंडईल कर्म। पारुषतील धर्माधर्म। कासयानें तें कळेल वर्म। म्हणउनी श्रम वाटतसे ॥ २ ॥ काय हे स्थिर राहील बुद्धी। कांहीं आरिष्ट न येल मधीं। धरिलें जाईल ते सिद्धी। शेवट कधीं तो मज न कळे ॥ ३ ॥ काय ऐसें पुण्य होईल गांठीं। घालीन पायीं देवाचे मिठी। मज तो कुरवाळील जगजेठी। दाटईन कंठीं सद्गदित ॥ ४ ॥ काय हे निवतील डोळे। सुख ते देखोनी सोहळे। संचित कैसें तें न कळे। होतील डोहळे वासनेसी ॥ ५ ॥ ऐसी चिंता करीं सदा सर्वकाळ। रात्रंदिवस हेचि तळमळ। तुका म्हणे नाहीं आपुलें बळ। जेणें फळ पावे निश्चयेसीं ॥ ६ ॥

२५७६ माझा तंव खुंटला उपाव। जेणें तुझे आतुडती पाव। करूं भक्ति तरी नाहीं भाव। नाहीं हातीं जीव कवणेविशीं ॥ १ ॥ धर्म करूं तरी नाहीं चित्त। दान देऊं तरि नाहीं वित्त। नेणें पूजों ब्राह्मण अतीथ। नाहीं भूतदया पोटाहातीं ॥ २ ॥ नेणें गुरुदास्य संतसेवन। जपतप अनुष्ठान। नव्हे वैराग्यवनसेवन। नव्हे दमन इंद्रियांसी ॥ ३ ॥ तीर्थ करूं तरी मन नये सवें। व्रत करूं तरि विधि नेणें स्वभावें। देव जरि आहे म्हणों मजसवें। तरि आपपरावें न वंचे ॥ ४ ॥ म्हणोनी आलों शरणांगत। तुझा दास मी अंकित। यास कांहीं न लगे संचित। जालों निश्चिंत तुका म्हणे ॥ ५ ॥

२५७७ न बोलसी तेंही कळलें देवा। लाजसी आपुलिया नांवा। तुज मी नाहीं घालीत गोवा। भीड केशवा कासयाची ॥ १ ॥ उतरीं आपुला हा भार। मजशीं बोलोनी उत्तर। माझा तुज नव्हे अंगी-

कार । मग विचार करीन मी ॥ २ ॥ दात्या आणि मागत्यासी । धर्म-नीति तरी बोलिली ऐसी । यथानशक्ति टाकेल तैसी । बाधी दोघांसी विन्मुखता ॥ ३ ॥ म्हणोनि करितों मी आस । तुझिया वचनाची वास । धीर हा करूनि सायास । न टळें नेमास आपुलिया ॥ ४ ॥ तुझें म्यां घेतल्यावांचून । न वजें येथूनि वचन । हाचि माझा नेम सत्य जाण । आहे नाहीं म्हण तुका म्हणे ॥ ५ ॥

२५७८ एक पांडुरंगा एक मात । कांहीं बोलणें आहे एकांत । आम्हां जरी तारील संचित । तरी उचित काय तुझें ॥ १ ॥ उसनें फेडितां धर्म तो कोण । काय तया मानवेल जन । काय गा मिरवूनी भूपण । वायां थोरपण जनामध्यें ॥ २ ॥ अन्न जरी न मिळे तयासी देणें । आगांतुक पात्र उचित दान । उपकार तरी धन्वंतरीपणें । जरी देणें घेणें नाहीं आशा ॥ ३ ॥ शूर तो तयासी बोलिजे जाणा । पाठीरीं घालूनीं राखे दीना । पार पुण्या नाहीं त्या भूपणा । एक नारायणा वचन हें ॥ ४ ॥ आतां पुढें बोलणें तें काई । मज तारिसी तरीच रुही । वचन आपुलें सिद्धी नेई । तुका म्हणे तई मज कळसी ॥ ५ ॥

२५७९ सुख या संतसमागमें । नित्य दुणावे तुझिया नामें । दहन होती सकळ कर्मे । सर्वकाळ प्रेमें डुल्लतसों ॥ १ ॥ म्हणोनी नाहीं कांहीं चिंता । तूंचि आमुचा मातापिता । बाहिणी बंधु आणि चुलता । आणिकां गोतां सर्वांठायीं ॥ २ ॥ ऐसा हा कळला निर्धार । माझा तुज न पडे विसर । अससी देऊनियां धीर । बाह्य अभ्यंतर मजजवळी ॥ ३ ॥ दुःख तें कैसें नये स्वप्नासी । भुक्तिमुक्ति जाल्या कामारी दासी । त्यांचें वर्म तूं आम्हांपाशीं । सुखें राहिलासी प्रेमाचिया ॥ ४ ॥ जेथें तुझ्या कीर्तनाचा घोष । जळती पापें पळती दोष । काय तें उणें आम्हां आनंदास । सेवूं ब्रह्मरस तुका म्हणे ॥ ५ ॥

२५८० अल्प भाव अल्प मती । अल्प आयुष्य नाहीं हातीं । अपरा-

धाची बोळिलों मूर्ति । अहो वेदमूर्ति पारियेसा ॥ १ ॥ किति दोषा देऊं परिहार । गुणदोषें माळिलें अंतर । आदि वर्तमान भविष्याकार । गेला अंतपार ऐसें नाहीं ॥ २ ॥ विविध कर्म चौऱ्यांशीं फेरा । त्रिविध भोग या शरीरा । कर्मकोठार पांजरा । जन्मजरामरण सांठवण ॥ ३ ॥ जीवा नाहीं कुडीचें लाहातें । ये भिन्न पंचभूतें । रचतें खचतें संचितें । असार रितें फलकट ॥ ४ ॥ पुत्र पत्नी सहोदर । माय बाप गोताचा पसर । मिळतां काष्ठें लोटतां पूर । आदळी दूर होती खल्लाळीं ॥ ५ ॥ म्हणोनि नसावें अज्ञान । इतुलें करी कृपादान । कृपाळू तूं जनार्दन । धरूनी चरण तुका विनवी ॥ ६ ॥

२५८१ मी तंव अनाथ अपराधी । कर्महीन मतिमंतबुद्धि । तुज म्यां आठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधि मायबापा ॥ १ ॥ नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित । नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ २ ॥ केला करविला नाहीं परोपकार । नाहीं दया आली पीडितां पर । करूं नये तो केला व्यापार । वाहिला भार कुटुंबाचा ॥ ३ ॥ नाहीं केलें तीर्थांचें भ्रमण । पाळिला पिंड करचरण । नाहीं संतसेवा घडलें दान । पूजावलोकन मूर्तिचें ॥ ४ ॥ असंगसंगें घडले अन्याय । बहुत अधर्म उपाय । न कळे हित करावें तें काय । नये बोलूं आठवूं तें ॥ ५ ॥ आप आपणया घातकर । शत्रु जालों मी दावेदार । तूं तंव कृपेचा सागर । उतरीं पार तुका म्हणे ॥ ६ ॥

२५८२ जेणें हा जीव दिला दान । तयाचें करीन चिंतन । जगजीवन नारायण । गाईन गुण तयाचे ॥ १ ॥ जो या उभा भिंवरेच्या तीरीं । कट धरूनियां करीं । पाउलें समचि साजिरीं । अंतरीं धरोनी राहेन ॥ २ ॥ जो या असुरांचा काळ । भक्तजन प्रतिपाळ । खेळे हा लाघवें सकळ । तयाच्या भाळ पायांवरी ॥ ३ ॥ जो या गोपाळांच्या मेळीं । खेळ खेळे वनमाळी । रसातळा नेला बळी । राहे पाताळीं स्वामी माझा

॥ ४ ॥ जो हा लावण्यपुतळा । जयाचे अंगीं सकळ कळा । जयाचे गळां वैजयंती माळा । तया वेळोवेळां दंडवत ॥ ५ ॥ जयाचें नाम पाप नासी । लक्ष्मीऐसी जयाची दासी । तो हा तेजःपुंज रासी । सर्वभावें त्यासी तुका शरण ॥ ६ ॥

२५८३ आतां येणें बळें पंढरीनाथ । जवळीं राहिला तिष्ठत । पाहतां न कळे जयाचा अंत । तोचि हृदयांत घालूं आतां ॥ १ ॥ विसरोनि आपुला देहपणभाव । नामेंचि भुलविला पंढरीराव । न विचारी याती कुळ नांव । लागावया पाव संतांचे ॥ २ ॥ बरें वर्म आलें आमुचिया हाता । हिंडावें धुंडावें न लगतां । होय अविनाश सहाकारी दाता । चतुर्भुज संतां पारि धाकें ॥ ३ ॥ होय आवडी सानें थोर । रूप सुंदर मनोहर । भक्तिप्रिय लोभापर । करीं आदर याचकपणें ॥ ४ ॥ तें वर्म आलें आमुचिया हाता । म्हणोनी शरण रिघालों संतां । तुका म्हणे पंढरीनाथा । न सोडीं आतां जीवें-भावें ॥ ५ ॥

२५८४ आतां माझा नेणों परतों भाव । विसांवोनि पायीं ठेविला जीव । सकळां लाभांचा हा ठाव । ऐसा वाव झाला चित्ता-ठायीं ॥ १ ॥ भांडवल गांठी तरि विश्वास । झालों तो झालों निश्चयें दास । न पाहें मागील ते वास । पुढती सोस सेवेचाचि ॥ २ ॥ आहे तें निवेदिलें सर्व । मी हें माझें मोडियेला गर्व । अकाळीं काळ अवघे पर्व । जाला भरंवसा कृपें लाभाचा ॥ ३ ॥ वेव्हारी वेव्हारा अनंत । नाहीं यावांचुनी जाणत । तरी हें समाधान चित्त । लाभ हानि नाहीं येत अंतरा ॥ ४ ॥ करूनी नातळों संसारा । अंग भिन्न राखिला पसारा । कळवळा तो जीवनीं खरा । । बीजाचा थारा दुरी आघात ॥ ५ ॥ बहु मतापासूनि निराळा । होऊनि राहिलों सोंवळा । बैसला रूपाचा कळवळा । तुका म्हणे डोळां लेइलों तें ॥ ६ ॥

२५८५ आतां धर्माधर्मीं काहीं उचित । माझें विचारावें हित । तुज

मी ठाउका पतित । शरणांगत परी झालों ॥ १ ॥ येथें राया रंका एकी सरी । नाहीं भिन्नाभिन्न तुमच्या घरीं । पावलों पायां भलत्यापरी । मग बाहेरी न घालावें ॥ २ ॥ ऐसें हें चालत आलें मागें । नाहीं मी बोलत वाउगें । आपुलिया पडिल्या प्रसंगें । कीर्ति हे जगें वानिजे ते ॥ ३ ॥ घालोनियां माथां बैसलों भार । सांडिला लौकिक वेव्हार । आधीं हे विचारिली थार । अविनाशपर पद ऐसें ॥ ४ ॥ येथें एक वर्म पाहिजे धीर । परि म्यां लेखिलें असार । देह हें नाशिवंत जाणार । धरिलें सार नाम तुझें ॥ ५ ॥ केली आरापूक सकळां हातीं । धरावें धरिलें तें चित्तीं । तुका म्हणे सांगितलें संतीं । देईं अंतीं ठाव मज देवा ॥ ६ ॥

२५८६ आतां तुज कळेल तें करीं । तारिसी तरि तारीं मारीं । जवळीं अथवा दुरी धरीं । घालीं संसारीं अथवा नको ॥ १ ॥ शरण आलों नेणतपणें । भाव आणि भक्ति कांहींच नेणे । मतिमंद सर्वज्ञानें । बहु रंक उणें रंकाहूनी ॥ २ ॥ मन स्थिर नाहीं माझ्या हातीं । इंद्रियें धांवतां नावरतीं । सकळ खुंटलिया युक्ती । शांति निवृत्ति जवळी नाहीं ॥ ३ ॥ सकळ निवेदिला भाव । तुझिया पायीं ठेविला जीव । आतां करीं कळे तो उपाव । तूंचि सर्व ठाव माझा देवा ॥ ४ ॥ राहिलों धरूनि विश्वास । आधार नेटीं तुझी कास । आणीक नेणें मी सायास । तुका म्हणे यास तुझें उचित ॥ ५ ॥

२५८७ आतां मी न पडें सायासीं । संसार दुःखाचिये पाशीं । शरण रिघेन संतांसी । ठाव पायांपाशीं मागेन त्यां ॥ १ ॥ न कळे संचित होतें काय । कोण्या पुण्यें तुझे लाधले पाय । आतां मज न विसंबे वो माये । मोकलोनी धाय विनवितसें ॥ २ ॥ बहुत जाचलों संसारें । मोहमायाजाळाच्या विखारें । त्रिगुण येताती लहरें । तेणें दुःखें थोरें आक्रंदलों ॥ ३ ॥ आणीक दुःखें सांगों मी किती । सकळ संसारस्थिती । न साहे पाषाण फुटती । भय

कांप चित्तीं भरलासे ॥ ४ ॥ आतां मज न साहवे सर्वथा । संसार-गंधीची हे वार्ता । जालों वेडा असोनि जाणता । पावे अनंता तुका म्हणे ॥ ५ ॥

२५८८ आतां मज धरवावी शुद्धि । येथोनि परतवावी बुद्धि । घ्यावें सोडवूनि कृपानिधि । सांपडलों संधीं काळचक्रीं ॥ १ ॥ करिसिल तरी नव्हे काई । राईचा डोंगर पर्वत राई । आपुले करुणेची साई । करीं वो आई मजवरी ॥ २ ॥ मागील काळ अज्ञानपणें । सरला स्वभावें त्या गुणें । नेणें आयुष्य होतसे उणें । पुढील पेणें अंतरलें ॥ ३ ॥ आतां मज वाटतसे भय । दिवसेंदिवस चालत जाय । येथें स्यां येऊनी केलें काय । नाहीं तुझे पाय आठवीले ॥ ४ ॥ करूनी अपराध क्षमा । होतील केले पुरुषोत्तमा । आपुले नामीं द्यावा प्रेमा । सोडवी भ्रमापासोनियां ॥ ५ ॥ हृदय वसो तुमच्या गुणीं । ठाव हा पायांपें चरणीं । करूं हा रस सेवन वाणी । फिटे तों धणी तुका म्हणे ॥ ६ ॥

२५८९ आतां पावेन सकळ सुखें । खादलें कदा तें न देखें । अवघें सरलें पारिखें । सकळ देखें माहियेरें ॥ १ ॥ जवळीं विठ्ठल रखुमाई । बहिणी बंधु बाप आई । सकळ गोताचीच साई । पारिखें काइ ऐसें नेणिजे ॥ २ ॥ जगदाकारी जाली सत्ता । वारोनि गेली पराधीनता । अवघें आपुलेंचि आतां । लाज आणि चिंता दुरावली ॥ ३ ॥ वावरे इच्छा वसे घरीं । आपले सत्तेचे माहेरीं । करवीं तैसें आपण करी । भीड न धरी चुकल्याची ॥४॥ सोसिला होता सासुरवास । बहुतांचा बहुत दिवस । बहु कामें पुरविला सोस । आतां उदास आपुल्यातें ॥ ५ ॥ करिती कवतुक लाडें । मज बोलविती कोडें । मायबाप उत्तरें गोडें । बोले बोबडें पुढें तुका ॥ ६ ॥

## श्रीकान्होबामहाराज

२५९० अगा ये वैकुंठनायका । अगा ये त्रैलोक्यतारका । अगा

जनार्दना जगव्यापका । अगा पालका भक्तांचिया ॥ १ ॥ अगा ये वसुदेवदेवकीनंदना । अगा ये गोपिकारमणा । अगा बळिबंधावामना । अगा निधाना गुणनिधि ॥ २ ॥ अगा ये द्रौपदीबांधवा । अगा ये सखया पांडवा । अगा जिवाचिये जीवा । अगा माधवा मधुसूदना ॥ ३ ॥ अगा महेश्वरा महाराजा । अगा श्रीहरी गरुडध्वजा । अगा सुंदरा सहस्रभुजा । पार मी तुझा काय वर्णूं ॥ ४ ॥ अगा अंवऋषिपरंपरा । निरालंबा निर्विकारा । अगा गोवर्धनधरणीधरा । अगा माहेरा दीनांचिया ॥ ५ ॥ अगा धर्मराया धर्मशीळा । अगा कृपासिंधु कृपाळा । अगा प्रेमाचिया कल्लोळा । सकळकळाप्रवीणा ॥ ६ ॥ अगा चतुरा सुजाणा । मधुरगिरा सुलक्षणा । अगा उदारा असुरमर्दना । राखें शरणा तुकयाबंधु ॥ ७ ॥

२५९१ एक मागणें हृषीकेशी । चित्त द्यावें सांगतों वचनासी । मम अंतर तुझ्या चरणासी । न पडे ऐसी कृपा करीं ॥ १ ॥ नको दुजी बुद्धि आणीक । रिद्धिसिद्धि परलोक । तूं स्वामी मी सेवक । खंडणा नको करूं ऐसी ॥ २ ॥ मना येईल तो जन्म देईं । भलते कुळीं भलते ठायीं । तें मी सांकडें घालीत नाहीं । हृदयींहुनी तुवां न वजावें ॥ ३ ॥ इतुकें करीं भलत्यापरी । भलत्या भावें तुझे द्वारीं । राहेन दास होऊनी कामारी । वदो वैखरी नित्य नाम ॥ ४ ॥ नको विचारूं दुसरें आतां । शरण आलों जी पंढरीनाथा । तुकयाबंधु म्हणे रे अच्युता । आहेसि तूं दाता दानशूर ॥ ५ ॥

२५९२ उभा देखिला भीमातीरीं । कर मिरविले कटावरी । पाउलें समचि साजिरीं । नाम तरी अनंत अतिगोड ॥ १ ॥ शंखचक्रांकितभूषणें । जडित मेखळा चिद्रत्नें । पीतांबर उटी शोभे गोरेपणें । लोपलीं तेणें रवितेजें ॥ २ ॥ श्रवणीं कुंडलें देती ढाळ । दशांगुळीं मुद्रिका माळ । दंत ओळी हिरे झळाळ । मुख निर्मळ सुखरासी ॥ ३ ॥ कटीं कडदोरा वांकी वेळा । बाहीं बाहुवटे पदक गळा । मृग-

नाभीं रेखिला टिळा। लवती डोळां विद्युल्लता ॥ ४ ॥ सुंदरपणाची साम्यता। काय वर्णावी ते पावे आतां। तुकयाबंधु म्हणे रे आच्युता। धन्य ते मातापिता प्रसवली ॥ ५ ॥

२५९३ कई देखतां होईन डोळीं। सकळा भूतीं मूर्ति सांवळी। जीवा नावा भूमंडळीं। जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं ॥ १ ॥ ऐसी कृपा करील नारायण। जीव जगाचा होईन। प्रेमसागरीं बुडईन। होईल स्नान अनुतापीं ॥ २ ॥ ऐसा कई येईन दैवास। दृश्य नासोनी जाईल आस। सदा संतचरणीं देहाचा वास। सेवीन शेष धणीवरी ॥ ३ ॥ कई नवसा येतील अंकुर। सुखा नाहींसा होईल पार। अमृत ते पृथ्वी जळ सागर। वाहाती पूर आनंदाचे ॥ ४॥ प्रसन्न दया क्षमा शांति। कई नवविधा होईल भक्ति। भोगीन वैराग्यसंपत्ति। मनोरथ कळती तई पुरले ॥ ५॥ तुकयाबंधु म्हणे सांग। नव्हे तुजविण निरसेना पांग। म्हणोनि घातलें साष्टांग। पांडुरंगा चरणावरी ॥ ६ ॥

---

# भूपाळ्या

## श्रीतुकाराममहाराज

२५९४ जोडूनियां कर चरणीं ठेविला माथा।। परिसावी विनंति माझी पंढरीनाथा ॥ १ ॥ असो नसो भाव आलों तुझिया ठाया। कृपा दृष्टी पाहें मजकडे पंढरीराया ॥ २ ॥ अखंडित असावें ऐसें वाटतें पायीं। साहोनि संकोच ठाव थोडासा देईं ॥ ३ ॥ तुका ह्मणे आम्ही तुझीं वेडीं वांकुडीं। नामें भवपाश हस्तें आपुल्या तोडीं ॥ ४ ॥

२५९५ ऐसी वाट पाहे कांहीं निरोप कां मूळ। कां हो कळवळा तुह्मां उमटेचिना ॥ १ ॥ आहो पांडुरंगे पंढरिचे निवासे। लावूनिया आसे चाळवूनी ठेविलें ॥ २ ॥ काय जन्मा येऊनियां केली म्यां जोडी। ऐसा घडी घडी चित्ता येतो आठवू ॥ ३ ॥ तुका म्हणे खरा

न पवेचि विभाग । धिक्कारितें जग हेंचि लाहे हिशोवें ॥ ४ ॥

२५९६ माझें चित्त तुझे पायीं राहे ऐसें करी कांहीं । धरूनियां बाहीं भव हा तारीं दातारा ॥ १ ॥ चतुरा तूं शिरोमणी गुण लावण्याची खाणी । मुकुट सकळांमणी धन्य तूंचि विठोबा ॥ २ ॥ करीं या तिमिराचा नाश उदय होऊनि प्रकाश । तोडीं आशापाश करीं वास हृदयीं ॥ ३ ॥ पायीं जडलों नेणतां माझी असो तुह्मा चिंता । तुका ठेवी माथा पायीं आतां राखावें ॥ ४ ॥

२५९७ वोलोनीयां दाऊं कां तुह्मी नेणा जी देवा । ठेवाल तें ठेवा ठायीं तैसा राहेन ॥ १ ॥ पांगुळलें मन कांहीं नाठवे उपाय । म्हणऊनी पाय जीवीं धरूनी राहिलों ॥२॥ त्याग भोग दुःख काय सांडावें मांडावें । ऐसी धरियेली जीवें माझ्या थोरी आशंका ॥ ३ ॥ तुका ह्मणे बाळ माता चुकलिया वनीं । न पवतां जननी दुःख पावे विठ्ठले ॥ ४ ॥

२५९८ कामें नेलें चित्त नेदीं अवलोकूं मुख । वहु वाटे दुःख फुटूं पाहे हृदय ॥ १ ॥ कां जी सासुरवासी मजला केलें भगवंता । आपुलिया सत्ता स्वाधीनता ते नाहीं ॥ २ ॥ प्रभातेंसी वाटे तुमच्या यावें दर्शना । येथें न चले चोरी उरली राहे वासना ॥ ३ ॥ येथें अवघे वायां गेले दिसती सायास । तुका म्हणे नाश दिसे जाल्या वेचाचा ॥ ४ ॥

२५९९ तुझें दास्य करूं मागूं आणिका खावया । धीग जिणें झालें माझें पंढरीराया ॥ १ ॥ कायगा विठोबा तुज आतां म्हणावें । शुभाशुभ गोड तुम्हां थोरांच्या देवें ॥ २ ॥ संसाराचा धाक निरंतर आम्हांसी । मरण भलें परी काय अवकळा ऐसी ॥ ३ ॥ तुझा शरणांगत शरण जाऊं आणिकांसी । तुका म्हणे लाज हें कां कोणा नेणसी ॥ ४ ॥

२६०० कां गा केविलवाणा केला दीनाचा दीन । काय तुझी

हीन शक्ती जालीसी दिसे ॥ १ ॥ लाज येते मना तुझा म्हणवितां दास । गोडी नाहीं रस बोलिलीयासारिखी ॥ २ ॥ लाजविलीं मागें संतांचीं हीं उत्तरें । कळों येतें खरें दुजें एकावरूनी ॥ ३ ॥ तुका म्हणे माझी कोणी वदविली वाणी । प्रसादावांचूनी तुमचिया विठ्ठला ॥ ४ ॥

२६०१ जळो माझें कर्म वायां केली कटकट । जालें तैसें तंट नाहीं आलें अनुभवा ॥ १ ॥ आतां पुढें धीर काय देऊं या मना । ऐसें नारायणा प्रेरिलें तें पाहिजे ॥ २ ॥ गुणवंत केलों दोष जाणा-यासाठीं । माझें माझें पोटीं वळकट दूषण ॥ ३ ॥ तुका म्हणे अहो केशीराजा दयाळा । बरवा हा लळा पाळियेला शेवटीं ॥ ४ ॥

२६०२ जळोत तीं येथें उपजविती अंतराय । सायासाची जोडी माझी तुमचे पाय ॥ १ ॥ आतां मज साह्य येथें करावें देवा । तुझी घेई सेवा सकळ गोवा उगवूनी ॥ २ ॥ भोगें रोगा जोडोनियां दिलें आणिका । अरूचि ते हो कां आतां सकळांपासूनी ॥ ३ ॥ तुका म्हणे असो तुझें तुझे मस्तकीं । नाहीं ये लौकिकीं आतां मज वर्तणें ॥ ४ ॥

२६०३ केली कटकट गाऊं नाचों नेणतां । लाज नाहीं भय आम्हां पोटाची चिंता ॥ १ ॥ वैसा सिणलेती पाय रगडूं दातारा । जाणवूं द्या वारा उब झाली शरीरा ॥ २ ॥ उशिरा उशीर किती काय म्हणावा । जननिये बाळका कोप कांहीं न धरावा ॥ ३ ॥ तुझिये संगती आम्ही करूं कोल्हाळ । तुका म्हणे बाळें अवघीं मिळोन गोपाळ ॥ ४ ॥

२६०४ आरूप शब्द बोलों मनीं न धरावें कांहीं । लडिवाळ बाळकें तूंचि आमुची आई ॥ १ ॥ देईंगे विठाबाई प्रेमभातुकें । अवघियां कवतुकें लहाना थोरां सकळां ॥ २ ॥ सांडूनियां भीड धीटपणातें वाणी । घेतलें पाहिजे केलें लेकुरें तें कानीं ॥ ३ ॥ तुका म्हणे थोड्यासाठीं काशाची अटी । झाली असे भेटी धुरेसवेंसाटीं ॥ ४ ॥

२६०५ न सांगता तुम्हा कळों येतें अंतर। विश्वीं विश्वंभर परिहाराचे नलगे ॥ १ ॥ परि हें अनावर आवरितां आवडी। अवसान ते घडी पुरों देत नाहीं ॥ २ ॥ काय उणें मज येथें ठेविलिये ठायीं। पोटा आलों तंइपासोनियां समर्थ ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघी आवरिली वासना। आतां नारायणा दुसरियापासूनी ॥ ४ ॥

२६०६ तुजसवें आम्ही अनुसरलों अवळा। नको अंगीं कळा राहों हरी हीन देऊं ॥ १ ॥ सासुरवासा भीतों जीव ओढे तुजपाशीं। आतां दोहींविशीं लज्जा राखें आमुची ॥ २ ॥ न कळतां संग जाला सहज खेळतां। प्रवर्तली चिंता मागिलाचि यावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे असतां जैसें तैसें वरवें। वचन या भावें वेचूनियां विनटलों ॥ ४ ॥

२६०७ गाउं वाणूं तुज विठो तुझा करूं अनुवाद। जिकडे पाहे तिकडे सर्वमय गोविंद ॥ १ ॥ आनंद रे विठोबा झाला माझे मनीं। देखिलीं लोचनीं विटेसहित पाउलें ॥ २ ॥ न करी तपसाधनें रे मुक्तीचे सायास। हाचि जन्मोजन्मीं गोड भक्तीचा रस ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्हा प्रेमा उणें तें काई। पंढरीचा राणा सांठविला हृदयीं ॥ ४ ॥

२६०८ भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योती। पंचप्राण जीवें भावें ओंवाळूं आरती ॥ १ ॥ ओंवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा। दोन्ही कर जोडोनी चरणीं ठेविला माथा ॥ २ ॥ काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती। कोटी ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥ ३ ॥ राही रखुमाई उभ्या दोहीं दों बाहीं। मयूरपिच्छ चामरें ढाळिती ठायीं ठायीं ॥ ४ ॥ तुका म्हणे दीप घेउनी उन्मनीत शोभा। विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ५ ॥

२६०९ चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान। अखंड मुखीं नाम तुमचे वर्णावे गुण ॥ १ ॥ हेंचि एक तुम्हा मागतों मी दातारा। उचित तें करा भाव जाणूनी खरा ॥२॥ खुंटली जाणीव कांहीं बोलणें

आतां । कळों येइल तैसी करा बाळकाची चिंता ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां नका देऊं अंतर । न कळे पुढें काय कैसा होईल विचार॥ ४ ॥

२६१० वाट पाहें बाहे निढळीं ठेवुनियां हात । पंढरीचे वाटे दृष्टी लागलेंसे चित्त ॥ १ ॥ कंई येतां देखेन माझा मायबाप । घटिका वोटें दिवस लेखीं धरूनियां माप ॥ २ ॥ डावा डोळा लवे उजवी स्फुरतसे बाहे । मन उतावीळ भाव सांडुनियां देहे ॥ ३ ॥ सुखसेज गोड चित्तीं नलगे आणिक । नाठवे घरदार तहान पळाली भूक ॥ ४ ॥ तुका म्हणे धन्य ऐसा दिवस तो कोण । पंढरीचे वाटे येतां सूळ देखेन ॥ ५ ॥

## श्रीकान्होबामहाराज.

२६१० अ. नेणे गाऊं कांहीं धड बोलतां वचन । कायावाचामनेंसहित आलों शरण ॥ १ ॥ करीं अंगीकार नको मोकलूं हरी । पतितपावन ब्रीदें करावीं खरीं ॥ २ ॥ नेणे भक्तिभाव तुझा म्हणवितों दास । जरी देसी अंतर तरी लज्जा कोणास ॥ ३ ॥ म्हणे तुकयाबंधु तुझे धरियेले पाय । आतां कोण दुजा ऐसा आम्हासी आहे ॥ ४ ॥

---

# उपदेशपर

## तुकाराममहाराज.

२६११ जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदास विचारें वेंच करी ॥ १ ॥ उत्तमचि गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ॥ २ ॥ परउपकारी नेणे परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥ भूतदया गाई पशूंचें पालन । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥ शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्त्व वडिलांचें ॥ ५ ॥ तुका म्हणे हेंचि आश्रमाचें फळ । परमपद बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

२६१२ पराविया नारी माउलीसमान। मानिलिया धन काय वेचे ॥ १ ॥ न करितां परनिंदा परद्रव्यअभिलाष। काय तुमचें यास वेचे सांगा ॥ २ ॥ वैसलिये ठायीं म्हणतां रामराम। काय होय श्रम ऐसें सांगा ॥ ३ ॥ संतांच्या वचनीं मानितां विश्वास। काय तुमचें यास वेचे सांगा ॥ ४ ॥ खरें बोलतां कोण लागती सायास। काय वेचे यास तुमचें सांगा ॥ ५ ॥ तुका म्हणे देव जोडे याजसाठीं। आणीक ते आटी नलगे कांहीं ॥ ६ ॥

२६१३ आलिया संसारा उठा वेग करा। शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥ देह हें देवाचें धन कुबेराचें। तेथें मनुष्याचें काय आहे ॥ २ ॥ देता देवविता नेता नेवविता। तेथें याची सत्ता काय आहे ॥ ३ ॥ निमित्याचा धणी केला असे प्राणी। माझें माझें म्हणोनी व्यर्थ गेला ॥ ४ ॥ तुका म्हणे कां रे नाशवंतासाठीं। देवासवें आटी पाडितोसी ॥ ५ ॥

२६१४ सांगतों तरि तुम्हीं भजा रे विठ्ठला। नाहीं तरि गेला जन्म वांयां ॥ १ ॥ करितां भरोवरी दुरावसी दुरी। भवाचिये पुरीं वाहावसी ॥ २ ॥ कांहीं नलगे एक भावचि कारण। तुका म्हणे आण विठ्ठलाची ॥ ३ ॥

२६१५ अरे गिळिलें हो संसारें। कांहीं तरी राखा खरें। दिला करुणाकरें। मनुष्यदेह सत्संग ॥ १ ॥ येथें न घली न घली आड। संचितसा शब्द नाड। उटाउटी गोड। बीजें बीजें वाढवा ॥ २ ॥ केलें तें क्रियमाण। जालें तें संचित म्हण। प्रारब्ध जाण। उरवरित उरलें तें ॥ ३ ॥ चित्त खोटें चालीवरी। रोग भोगाचे अंतरीं। रसने अनावरी। तुका म्हणे ढुंग वाहे ॥ ४ ॥

२६१६ मोलाचें आयुष्य वेचुनियां जाय। पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥ १ ॥ अनंत जन्मींचे शेवट पाहतां। नरदेह हाता आला तुझ्या ॥ २ ॥ कराल तें जोडी येईल कार्यासी। घ्यावें विठ्ठलासी

सुखालागीं ॥ ३ ॥ सांचलिया धन होईल ठेवण। तैसी नारायण जोडी करा ॥ ४ ॥ करा हरिभक्ती परलोकीं ये कामा। सोडविल यमापासोनियां ॥ ५ ॥ तुका म्हणे करा आयुष्याचें मोल। नका वेंचूं बोल नामेंविण ॥ ६ ॥

२६१७ लाभ झाला बहुतां दिसीं। लाहो करा पुढें नासी। मनुष्यदेहाऐसी। उत्तम जोडी जोडिली ॥ १ ॥ घेईं हरिनाम सादरें। भरा सुखाचीं भांडारें। जालिया व्यापारें। लाहो हेवा जोडीचा ॥ २ ॥ घेउनि माप हातीं। काळ मोजी दिवसरातीं। चोर लाग घेती। पुढें तैसें पळावें ॥ ३ ॥ हित सावकाशें। म्हणे करीन तें पिसें। हातीं काय ऐसें। तुका म्हणे नेणसी ॥ ४ ॥

२६१८ कैसें असोनि ठाउकें नेणां। दुःख पावाल पुढिले पेणा ॥ १ ॥ आतां जागा रे जागा रे। चोर निजल्या नाडूनि भागा रे ॥ २ ॥ आतां नका रे भाई नका रे। आहे गांठीं तें लुटवूं लोकां रे ॥ ३ ॥ तुका म्हणे एकाच्या घायें। कां रे जाणोनि न धरा भय ॥ ४ ॥

२६१९ बहुत सोसिलें मागें न कळतां। पुढती काय आतां अंध व्हावें ॥ १ ॥ एकाचिये अंगीं हें ठेवावें लावून। नये भिन्न भिन्न चांचपडों ॥ २ ॥ कोण होईल तो ब्रह्मांडचालक। आपणाचि हाक देईल हाके ॥ ३ ॥ तुका म्हणे दिलीं चेतवूनि सुनीं। कौतुकावांचूनि नाहीं स्थळ ॥ ४ ॥

२६२० आतां उघडीं डोळे। जरी अद्यापि न कळे। तरी मातेचिये खोळे। दगड आला पोटासी ॥ १ ॥ मनुष्य देहा ऐसा निध। साधली ते साधे सिद्ध। करूनि प्रबोध। संत पार उतरले ॥ २ ॥ नाव चंद्रभागेतिरीं। उभी पुंडलीकाचे द्वारीं। कट धरूनियां करीं। उभाउभीं पालवी ॥ ३ ॥ तुका म्हणे फुकासाटीं। पायीं घातलीया मिठी। होतो उठाउठी। लवकरीच उतार ॥ ४ ॥

२६२१ येऊनि नरदेहा झांकितील डोळे। बळेंचि अंधळे होती

लोक ॥ १ ॥ उजेडासरसी न चलती वाट । पुढील बोभाट जाणो-नियां ॥ २ ॥ बहु फेरे आले सोसोनियां वोळसा । पुढें नाहीं ऐसा लाभ मग ॥ ३ ॥ तुका म्हणे जाऊं सादावीत वाट । भेटे तरी भेटो कोणी तरी ॥ ४ ॥

२६२२ विषयाचें सुख येथें वाटे गोड । पुढें अवघड यमदंड ॥ १ ॥ मारिती तोडिती झोडिती निष्ठुर । यमाचे किंकर बहुसाल ॥ २ ॥ असिपत्रीं तरुवर खैराचे इंगळ । निघतील ज्वाळ तेलपाकीं ॥ ३ ॥ तप्त भूमीवरी चालविती पायीं । अग्निस्तंभ बाहीं कवळविती ॥ ४ ॥ म्हणऊनियां तुका येतो काकुळती । पुरे यातायाती गर्भवास ॥ ५ ॥

२६२३ देह मृत्यूचें भातुकें । कळो आलें कवतुकें ॥ १ ॥ काय मानियेलें सार । हेंचि वाटतें आश्चर्य ॥ २ ॥ नाना भोगांचीं संचितें । करूनि ठेविलें आइतें ॥ ३ ॥ तुका म्हणे कोडीं । उगवूं न सकती बापुडीं ॥ ४ ॥

२६२४ कां रे तुम्ही निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरूप वैकुंठासी जाना ॥ १ ॥ काय गणिकेचा याती अधिकार मोठा । दोषी अजामेळ ऐसीं नेलीं वैकुंठा ॥ २ ॥ ऐसे नेणों मागें किती तारिले अनंत अपार । पंचमहापातकी दोषां नाहीं पार ॥ ३ ॥ पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचें पुण्य ॥ ४ ॥

२६२५ कां रे न भजसी हरी । तुज कोण अंगीकारी ॥ १ ॥ होईल यमपुरी । यमदंडयातना ॥ २ ॥ कोण जाली लगबग । काय करिसी तेथें मग ॥ ३ ॥ कां रे भरला ताठा । करिती वोज नेतां वाटा ॥ ४ ॥ तोंडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ॥ ५ ॥ कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥ ६ ॥ लाज धरीं म्हणे तुका । नको वांयां जाऊं फुका ॥ ७ ॥

२६२६ कां रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जगासी एकला तो

॥ १ ॥ बाळा दूध कोण करितें उत्पत्ति । वाढवी श्रीपति सवें दोन्हीं ॥ २ ॥ फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥ तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहें त्या अनंता आठवूनि ॥ ४ ॥ तुका म्हणे ज्याचें नाम विश्वंभर । त्याचें निरंतर ध्यान करीं ॥ ५ ॥

२६२७ देवाचें भजन कां रे न करिसी । अखंड द्रव्यासीं पीडतोसी ॥ १ ॥ देवासी शरण कां रे नवजसी तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥ २ ॥ देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥ ३ ॥ कां रे नाहीं तैसी देवाची हे गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥ ४ ॥ कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजन ॥ ५ ॥ कां रे भय वाहासी लोकांचा तूं धाक । विसरोनि एक नारायण ॥ ६ ॥ तुका म्हणे कां रे घातलेंसे वांयां । अवघे आयुष्य जाया भक्तीविण ॥ ७ ॥

२६२८ बहुतां जन्मां अंतीं । जोडी लागली हे हातीं ॥ १ ॥ मनुष्यदेहाऐसा ठाव । धरीं पांडुरंगीं भाव ॥ २ ॥ बहु केला फेरा । येथें सांपडला थारा ॥ ३ ॥ तुका म्हणे जाणें । ऐसे भले ते शहाणे ॥ ४ ॥

२६२९ भवसागर तरतां । कां रे करितसां चिंता । पैल उभा दाता । कटीं कर ठेवुनियां ॥ १ ॥ त्याचे पायीं घाला मिठी । मोल नेघे जगजेठी । भावा एकासाठीं । खांदां वाहे आपुल्या ॥ २ ॥ सुखें करावा संसार । परि न संडावे दोन्हीं वार । दया क्षमा घर । चोजवीत येतील ॥ ३ ॥ भुक्तिमुक्तिची चिंता । नाहीं दैन्य दरिद्रता । तुका म्हणे दाता । पांडुरंग वोळगिल्या ॥ ४ ॥

२६३० कोणें तुझा सांग केला अंगीकार । निश्चिती त्वां थोर मानियेली ॥ १ ॥ कोणें ऐसा तुज उपदेश केला । नको या विठ्ठला शरण जाऊं ॥ २ ॥ तेव्हां तुज कोण घालील पाठीसी । घांसील भूमीसी वदन यम ॥ ३ ॥ कां रे नागवसी आयुष्य खातो काळ ।

दिसंदिस बळ क्षीण होतें ॥४॥ तुका म्हणे यासी सांगा कोणी तरी। विसरला हरी मायबाप ॥ ५ ॥

२६३१ हरीच्या जागरणा। जातां कां रे नये मना ॥ १ ॥ कोठें पाहासील तुटी। आयुष्य वेंचे फुकासाठीं ॥ २ ॥ ज्यांची तुज गुंती। ते तो मोकलिती अंतीं ॥ ३ ॥ तुका म्हणे बरा। लाभ काय तो विचारा ॥ ४ ॥

२६३२ दुःखाचे डोंगर लागती सोसावे। ऐसें तंव ठावें सकळांसी ॥ १ ॥ कांहीं न करिती विचार हिताचा। न करिती वाचा नामघोष ॥ २ ॥ भोगें कळों येती मागिल ते जन्म। उत्तम मध्यम कनिष्ठ ते ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें झांकिताल डोळे। भोग देते वेळे येईल कळों ॥ ४ ॥

२६३३ बुद्धीचा पालट धरा रे कांहीं। मागुता नाहीं मनुष्यदेह ॥ १ ॥ आपुल्या हिताचे नव्हती सायास। गृह दारा आस धन वित्त ॥ २ ॥ अवचितें निधान लागलें हें हातीं। भोगावी विपत्ति गर्भवास ॥ ३ ॥ यावें जावें पुढें ऐसेंच कारण। भोगावें पतन नरकवास ॥ ४ ॥ तुका म्हणे धरीं आठव या देहीं। नाहीं तरी कांहीं बरें नव्हे ॥ ५ ॥

२६३४ म्हणवितां हरिदास कां रे नाहीं लाज। दिनास महाराज म्हणसी हीना ॥ १ ॥ काय ऐसें पोट न भरेसें झालें। हालविसी कुले सभेमाजीं ॥ २ ॥ तुका म्हणे पोटें केलीं विटंबना। दीन झाला जना कींव भाकी ॥ ३ ॥

२६३५ म्हणसी नाहीं रे संचित। न करीं न करीं ऐसी मात ॥१॥ लाहो घेईं हरिनामाचा। जन्म जाऊं नेदीं साचा ॥ २ ॥ गळां पडेल यमफांसी। मग कैंचा हरि म्हणसी ॥ ३ ॥ पुरलासाठीं देहाडा। ऐसें न म्हणें न म्हणें मूढा ॥ ४ ॥ नरदेह दुबळा। ऐसें न म्हणे रे

चांडाळा ॥ ५ ॥ तुका म्हणे सांगों किती । शेखीं तोंडीं पडेल माती ॥ ६ ॥

२६३६ ऐसे सांडुनियां धुरे । केविलवाणी दिसा कां रे । कामें उर भरे । हातीं नुरे मृत्तिका ॥ १ ॥ उदार हा जगदानी । पांडुरंग अभिमानी । तुळसीदळ पाणी । चिंतनाचा भुकेला ॥ २ ॥ नलगे पुसावी चाकरी । कोणी वकील ये घरीं । त्याचा तोचि करी । पारपत्य सकळां ॥ ३ ॥ नाहीं आडकाठी । तुका म्हणे जातां भेटी । न बोलतां मिठी । उगीच पायीं घालावी ॥ ४ ॥

२६३७ कां रे दास होसी संसाराचा खर । दुःखाचे डोंगर भोगा वया ॥ १ ॥ मिष्टान्नाची गोडी जिव्हेच्या अगरीं । मसक भरल्यावरी स्वाद नेणें ॥ २ ॥ आणीकही भोग आणिकां इंद्रियांचे । नाहीं ऐसे साचे जवळी कांहीं ॥ ३ ॥ रूप दृष्टि धाय पाहतां पाहतां । न घडे सर्वथा आणि तृष्णा ॥ ४ ॥ तुका म्हणे कां रे नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी करितोसी ॥ ५ ॥

२६३८ गेले पळाले दिवस रोज । काय म्हणसी माझें माझें ॥ १ ॥ सळे धरोनि बैसला काळ । फांकों नेदी घटिका पळ ॥ २ ॥ कां रे अद्यापि न कळे । केश फिरले कान डोळे ॥३ ॥ हित कळोनि असतां हातीं । तोंडीं पाडोनि घेसी माती ॥ ४ ॥ तुज ठाउकें मी जाणार । पाया शोधोनि बांधिसी घर ॥ ५ ॥ तुका म्हणे वेगें । पंढरीराया शरण रिघें ॥ ६ ॥

२६३९ करूनि जतन । कोणा कामा आलें धन ॥ १ ॥ ऐसें जाणतां जाणतां । का रे होतोसी नेणता ॥ २ ॥ प्रिया पुत्र बंधु । नाहीं तुज यांशीं संबंधु ॥ ३ ॥ तुका म्हणे एका । हरीविण नाहीं सखा ॥ ४ ॥

२६४० कां रे माझीं पोरें म्हणसील ढोरें । मायबाप खरें काय एक ॥ १ ॥ कां रे गेलें म्हणोनि करिसी तळमळ । मिथ्याच कोल्हाळ

मेलियाचा ॥ २ ॥ कां रे माझें माझें म्हणसील गोत । न सोडविती दूत यमाहातीं ॥ ३ ॥ कां रे मी बळिया म्हणविसी ऐसा । सरणापाशीं कैसा उचलविसी ॥ ४ ॥ तुका म्हणे न धरी भरंवसा कांहीं । वेगीं शरण जाई पांडुरंगा ॥ ५ ॥

२६४१ धन मेळवूनि कोटी । सवें नये रे लंगोटी ॥ १ ॥ पानें खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंड ॥ २ ॥ पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगाती ॥ ३ ॥ तुका म्हणे राम । एक विसरतां श्रम ॥ ४ ॥

२६४२ नित्य उठोनियां खायाचिच चिंता । आपुल्या तूं हिता नाठवीसी ॥ १ ॥ जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥ २ ॥ चातकांलागुनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ ३ ॥ पक्षी वनचरें आहेत भूमीवरी । तयांलागीं हरि उपेक्षीना ॥ ४ ॥ तुका म्हणे भाव धरून राहें चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥ ५ ॥

२६४३ एक मन तुझ्या अवघ्या भांडवला । वांटितां तें तुला येई कैसें ॥ १ ॥ म्हणउनि दृढ धरीं पांडुरंग । देहा लावीं संग प्रारब्धाचा ॥ २ ॥ आणिकां संकल्पा नको गोऊं मन । तरीच कारण साध्य होय ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें जाणावें उचित । तरी सहजस्थित येईल कळों ॥ ४ ॥

२६४४ मैत्र केलें महाबळी । कामा न येती अंतकाळीं ॥ १ ॥ आधीं घेरे रामनाम । सामा भरीं हा उत्तम । नाहीं तरी यम । दांत खातो करकरा ॥ २ ॥ धन मेळविल्या कोडी । तुज घेतल्या न सोडी ॥ ३ ॥ कामा नये हा परिवार । सैन्य लोक बहु फार ॥ ४ ॥ तंववरी तुमचें बळ । जंव आला नाहीं काळ ॥ ५ ॥ तुका म्हणे बापा । चुकवीं चौऱ्यायशींच्या खेपा ॥ ६ ॥

२६४५ आलें भरा येच पेंठे । पुढें मागुतें न भेटे ॥ १ ॥ होसी

फजीती वरपडा । लक्ष चौऱ्यासीचे वेढां ॥ २ ॥ नाहीं कोणाचा सांगात । दुःख भोगितां आघात ॥ ३ ॥ एका पाउलाची वाट । कोणा सांगावा बोभाट ॥ ४ ॥ जुंतिजसी घाणां । नाहीं मारित्या करुणा ॥५॥ तुका म्हणे हित पाहे । जांवरि हें हातीं आहे ॥ ६ ॥

२६४६ देवाचियें चाडे प्रमाण उचित । नये वांटूं चित्त निषेधासी ॥ १ ॥ नये राहों उभें कसमळापाशीं । भुंकतील तैसीं सांडावीं तीं ॥ २ ॥ तुका म्हणे क्षमा सुखाची हे रासी । सांडूनि कां ऐसी दुःखी व्हावें ॥ ३ ॥

२६४७ भक्तिभावें करीं बैसोनि निश्चित । नको गोवूं चित्त प्रपंचासी ॥ १ ॥ एक दृढ करीं पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढिल सुचे ॥ २ ॥ नको करूं कांहीं देवतापूजन । जप तप ध्यान तेंहो नको ॥ ३ ॥ मानिसिल झणी आपालिक कांहीं । येरझार पाहीं न चुके कदा ॥ ४ ॥ ऐसें जन्म किती पावलासी देहीं । अझूनि कां नाहीं कळली सोय ॥ ५ ॥ सोय धरीं आतां होय पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ॥ ६ ॥ सहज कैसें आहे तेथीचें तें गुज । अनुभवें निज पाहें तुकीं ॥ ७ ॥ तुका म्हणे आतां होईं तूं सावध । तोडी भवबंध एका जन्में ॥ ८ ॥

२६४८ सोसें बहु गर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाहीं सखीं ऐसीं । तेथें कोणी भेटलीं ॥ १ ॥ करीं करीं रे स्वहित । देह तंव हे अनित्य । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनी ॥ २ ॥ पाळी तोंडींचिया घांसे । तेंचि होय अनारिसें । ज्या नव्हे ऐसें । खेदी परि सोडवीना ॥ ३ ॥ तुका म्हणे धनमानें । माझ्या वाटलों मीपणें । नाहीं दिला मनें । देखों लाभें हा लाभ ॥ ४ ॥

२६४९ काळ जवळिच उभा नेणां । घाली झांपडी खुंटी काना ॥ १ ॥ कैसा हुशार सावध राहीं । आपुला तूं आपुले ठायीं ॥ २ ॥ काळ जवळिच उभा पाहीं । नेदी कोणासि देऊं कांहीं ॥ ३ ॥ काळें

पुरविली पाठी । वरुषें जालीं तरी साठी ॥ ४॥ काळ भोंवताला भोंवे। राम येऊं नेदी जिव्हे ॥ ५ ॥ तुका म्हणे काळा। कर्म मिळतें तें जाळा ॥ ६ ॥

२६५० मृगजळ दिसे साचपणा ऐसें । खोटियाचें पिसें ऊर फोडी ॥ १ ॥ जाणोनि कां करा आपुलाले घात । विचारा रे हित लवलाहीं ॥ २ ॥ संचित सांगातीं बोळवण सवें । आचरलें द्यावें फळ तेणें ॥ ३ ॥ तुका म्हणे शेखीं स्मशान तोंवरी। संबंध गोवरी अंगासवें ॥ ४ ॥

२६५१ आठवे देव तो करावा उपाव। येर त्यजीं वाव खटपट ॥ १ ॥ होईं बा जागा होईं बा जागा । वाउगा कां गा सिणसील ॥ २ ॥ जाणिवेच्या भारें भवाचिये डोहीं। बुडसी तो कहीं निघेसिना ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा पावसील भावें। जाणतां तें ठावें कांहीं नव्हे ॥ ४ ॥

२६५२ अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥ १ ॥ आपुलालें तुम्ही करा रे स्वहित । वाचे स्मरा नित्य रामराम ॥ २ ॥ देखोनि जीवन जरि जाय तहान । तरि कां सांठवण घरोघरीं ॥ ३ ॥ देखोनियां छाया सुख न पवीजे । जंव न बैसीजे तयातळीं ॥ ४ ॥ सुख तरी होय गातां अईकतां । जरि राहे चित्ता दृढ भाव ॥ ५ ॥ तुका म्हणे होसी भावेंचि तूं मुक्त । काय करिसी युक्त जाणिवेची ॥ ६ ॥

२६५३ सदैव तुम्हां अवघें आहे । हात पाय चालाया ॥ १ ॥ मुखीं वाणी कानीं कीर्ती । डोळे मूर्ति देखाया ॥ २ ॥ अंध बहिर ठकलीं कितीं । मुकीं होतीं पांगुळ ॥ ३ ॥ घरा आगि लावुनि जागा । न पळे तो गा वांचेना ॥ ४ ॥ तुका म्हणे जागा हिता । कांहीं आतां आपुल्या ॥ ५ ॥

२६५४ आपुलिया आंगें तोडी मायाजाळ । ऐसें नाहीं बळ

कोणापाशीं ॥ १ ॥ रांडा पोरें त्याग करी कुटुंबाचा । नावरे हे वाचा आणि मन ॥ २ ॥ हर्षामर्ष जों हे नाहीं हो जिराले । तोंवरी हे केले चार त्यांनीं ॥ ३ ॥ मुक्त झालों ऐसें बोलों जाये मुखें । तुका म्हणे दुःखें बांधला तो ॥ ४ ॥

२६९५ नलगे द्यावा जीव सहजाचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥ १ ॥ मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥ तुका म्हणे कांहीं होईल स्वहित । निधान जी थीत टाकूं पाहे ॥ ३ ॥

२६९६ वांटा घेईं लवकरी । मागें अंतरसी दुरी । केली भरोवरी । सार नेती आणीक ॥ १ ॥ ऐसी भांबावलों किती । काय जाणों नेणों निती । समय नेणती । माथां भार वाहोनी ॥ २ ॥ नाहीं सारिलें तोंवरी । धांव घेईं वेग करी । घेतलें पदरीं । फावलें तें आपुलें ॥ ३ ॥ फट लंडी म्हणे तुका । एक न साहावे धका । तरिच या सुखा । मग कैसा पावसील ॥ ४ ॥

२६९७ देवाचे म्हणोनी देवीं अनादर । हें मोठें आश्चर्य वाटतसे ॥ १ ॥ आतां येरा जना म्हणावें तें काई । जया भार डोईं संसाराचा ॥ २ ॥ त्यजुनी संसार अभिमान सांटा । जुलूम हा मोटा दिसतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे आळस करूनियां साहे । वळें कैसें पाहें वांयां जाती ॥ ४ ॥

२६९८ काय एकां जालें तें कां नाहीं ठावें । काय हें सांगावें काय म्हूण ॥ १ ॥ देखीतील डोळां ऐकतील कानीं । बोलिलें पुराणीं तेंही ठावें ॥ २ ॥ काय हें शरीर साच कीं जाणार । सकळ विचार जाणती हा ॥ ३ ॥ कां हें कळों नये आपुलें आपण । बाळत्व तारुण्य वृद्ध-दशा ॥ ४ ॥ कां हें आवडलें प्रिया पुत्र धन । काय कामा कोण कोणा आलें ॥ ५ ॥ कां हे जन्म वांयां घातले उत्तम । कां हे राम राम न म्हणती ॥ ६ ॥ काय भुली यांसी पडली जाणतां । देखती

मरतां आणिकांसी ॥ ७ ॥ काय करिती हे बांधलिया काळें । तुका म्हणे बळें वज्रपाशीं ॥ ८ ॥

२६५९ वाटे या जनाचें थोर वा आश्चर्य । न करिती विचार कां हिताचा ॥ १॥ कोण दम ऐसा आहे यांचे पोटीं । येईल शेवटीं कोण कामा ॥ २ ॥ काय मानुनियां राहिले निश्चिंत । काय जाब देती यमदूतां ॥ ३ ॥ कां हीं विसरलीं मरण बापुडीं । काय यांसी गोडी लागलीसे ॥ ४ ॥ काय हातीं नाहीं करील तयासी । काय जालें यांसी काय जाणे ॥ ५ ॥ कां हीं नाठवीती देवकीनंदना । सुटाया बंधनापासूनियां ॥ ६ ॥ काय मोल यासी लागे धन वित्त । कां हें यांचें चित्त घेत नाहीं ॥ ७ ॥ तुका म्हणे कांहीं भोगितील खाणी । कां त्या चक्रपाणी विसरलीं ॥ ८ ॥

२६६० पडिली हे रूढी जगा परिचार । चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥ १ ॥ मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचा धन लोभ हेवा ॥ २ ॥ देहाचें भय तें काळाचें भातुकें । ग्रासूनि तें एकें ठेविलेंसे ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ॥ ४ ॥

२६६१ एक पाहातसां एकांचीं दहनें । सावध त्या गुणें कां रे नव्हा ॥ १ ॥ मारा हाक देवा भय अट्टाहासें । जंव काळा ऐसें जालें नाहीं ॥ २ ॥ मरणाची तंव गांठोडी पदरीं । जिणें तोंचिवरी माप भरीं ॥ ३ ॥ तुका म्हणे धिग वाहती मारग । अंगा आलें मग हालों नेदी ॥ ४ ॥

२६६२ हरि हरि तुम्ही म्हणारे सकळ । तेणें मायाजाळ तुटतील ॥ १ ॥ आणिक नका पडूं गबाळाचे भरीं । आहे तेथें थोरी नागवण ॥ २ ॥ भावें तुळसीदळ पाणी जोडा हात । म्हणावें पतित वेळोवेळां ॥ ३ ॥ तुका म्हणे हा तंव कृपेचा सागर । नामासाटीं पार पाववील ॥ ४ ॥

२६६३ कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन ॥ १ ॥ जैसी जैसी वेळ पडे । तैसें तैसें होणें घडे ॥ २ ॥ कैं भोज्य नानापरी । कैं कोरडया भाकरी ॥ ३ ॥ कैं वसावें वाहनीं । कैं पायीं अनवाणी ॥ ४ ॥ कैं उत्तम प्रावणें । कैं वसनें तीं जीर्णें ॥ ५ ॥ कैं सकळ संपत्ती । कैं भोगणें विपत्ती ॥ ६ ॥ कैं सज्जनासीं संग । कैं दुर्जनासीं योग ॥ ७ ॥ तुका म्हणे जाण । सुख दुःख तें समान ॥ ८ ॥

२६६४ सकळिकांच्या पायां माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥ अहो श्रोते वक्ते सकळही जन । बरें पारखून बांधा गांठीं ॥ २ ॥ फोडिलें भांडार धन्याचा हा माल । मी तंव हमाल भारवाही ॥ ३ ॥ तुका म्हणे चाली झाली चहूं देशीं । उतरला कसीं खरा माल ॥ ४ ॥

२६६५ अरे हें देह व्यर्थ जावें । ऐसें जरी तुज व्हावें । द्यूत कर्म मनोभावें । सारीपाट खेळावा ॥ १ ॥ मग कैचें हरिचें नाम । निजेलिया जागा राम । जन्मोजन्मींचा अधम । दुःख थोर साधिलें ॥ २ ॥ विषयसुखाचा लंपट । दासीगमनीं अति धीट । तया तेचि वाट । अधोगती जावया ॥ ३ ॥ आणीक एक कोड । नरका जावया चाड । तरी संतनिंदा गोड । करी कवतुकें सदा ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसें । मना लावी रामपिसें । नाहीं तरी आलिया सायासें । फुकट जासी ठाकोनी ॥ ५ ॥

२६६६ नका घालूं दूध जयामध्यें सार । ताकाचे उपकार तरी करा ॥ १ ॥ नेदा तरी हें हो नका देऊं अन्न । फुकाचें जीवन तरी पाजा ॥ २ ॥ तुका म्हणे मज सगुणाची चाड । पुरवा कोणी कोड दुर्बळाचें ॥ ३ ॥

२६६७ आतां तरी पुढें हाचि उपदेश । नका करूं नाश आयुष्याचा ॥ १ ॥ सकळांच्या पायां माझें दंडवत । आपुलालें चित्त शुद्ध करा ॥ २ ॥ हित तें करावें देवाचें चिंतन । करूनियां मन शुद्ध भावें

॥ ३ ॥ तुका म्हणे हित होय तो व्यापार । करा काय फार शिकवावें ॥ ४ ॥

२६६८ ऐकें रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा । पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ॥ १ ॥ मग कैचें रे बंधन । वाचे गातां नारायण । भवसिंधु तो जाण । येचि तीरीं सरेल ॥ २ ॥ दास्य करील कळिकाळ । बंद तुटेल मायाजाळ । होतील सकळ । रिद्धिसिद्धि म्हणियारीं ॥ ३ ॥ सकळ शास्त्रांचे सार । हें वेदांचें गव्हर । पाहतां विचार । हाचि करिती पुराणें ॥ ४ ॥ ब्राह्मण क्षत्री वैश्य शूद्र । चांडळांही अधिकार । बाळें नारी नर । आदिकरोनि वेश्या ही ॥ ५ ॥ तुका म्हणे अनुभवें । आम्हीं पाडियलें ठावें । आणीकही दैवें । सुख घेती भाविकें ॥ ६ ॥

२६६९ न करीं तळमळ राहें रे निश्चळ । आहे हा कृपाळ स्वामी माझा ॥ १ ॥ अविनाश सुख देईल निर्वाणीं । चुकतील खाणी चौऱ्यांशींच्या ॥ २ ॥ आणिकियां जीवां होईल उद्धार । तेहि उपकार घडती कोटी ॥ ३ ॥ आहिक्य परत्रीं होसील सुखाचा । उच्चारि रे वाचा रामराम ॥ ४ ॥ तुका म्हणे सांडीं संसाराचा छंद । मग परमानंद पावसील ॥ ५ ॥

२६७० साधकाची दशा उदास असावी । उपाधी नसावी अंतर्बाहीं ॥ १ ॥ लोलुपता काय निद्रेसी जिंकावें । भोजन करावें परिमित ॥ २ ॥ एकांतीं लोकांतीं स्त्रियांशीं भाषण । प्राण गेल्या जाण करूं नये ॥ ३ ॥ संग सज्जनांचा उच्चार नामाचा । घोष कीर्तनाचा अहर्निशीं ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐशा साधनीं जो राहे । तोचि ज्ञान लाहे गुरुकृपा ॥ ५ ॥

२६७१ निर्वाहापुरतें अन्न आच्छादन । आश्रमासी स्थान कोंपी गुहा ॥ १ ॥ कोठें ही चित्तासी नसावें बंधन । हृदयीं नारायण सांटवावा ॥ २ ॥ नये बोलों फार बैसों जनामध्धीं । सावधान बुद्धी

इंद्रियें दमी ॥ ३॥ तुका म्हणे घडी घडीनें साधावी । त्रिगुणांची गोवी उगवूनि ॥ ४ ॥

२६७२ सर्वस्वा मुकावें तेणें हरि जिकावें । अर्थ प्राण जीवें देहत्याग ॥ १ ॥ मोह ममता माया चाड नाहीं चिंता । विषयकंदु वेथा जाळूनियां ॥ २ ॥ लोकलज्जा दंभ आणि अहंकार । करूनि मत्सर देशधडी ॥ ३ ॥ शांति क्षमा दया सखिया विनउनी । मूळ चक्रपाणी धाडी त्यांसी ॥ ४ ॥ तुका म्हणे याती अक्षर अभिमान । सांडोनियां शरण रिघें संता ॥ ५ ॥

२६७३ आशा हे समूळ खाणोनि काढावी । तेव्हांचि गोसावी व्हावें तेणें ॥ १ ॥ नाहीं तरि सुखें असावें संसारीं । फजिती दुसरी करूं नये ॥ २ ॥ आशा मारुनियां जयवंत व्हावें । तेव्हांचि निघावें सर्वांतूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे जरी योगाची तांतडी । आशेची बीबुडी करीं आधीं ॥ ४ ॥

२६७४ हित व्हावें तरी दंभ दुरी ठेवा । चित्तशुद्धि सेवा देवाची हे ॥ १ ॥ आवडीं विठ्ठल गाईजे एकांती । अलभ्य ते येती लाभ घरा ॥ २ ॥ आणिकां अंतरीं न द्यावी वसती । करावी हे शांती वासनेची ॥ ३ ॥ तुका म्हणे बाण हाचि निर्वाणींचा । वाउगी हे वाचा वेचूं नये ॥ ४ ॥

२६७५ करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ १ ॥ तरीच हा तरिजे सिंधु । भवबंधू तोडोनियां ॥ २ ॥ तेथें सरे शुद्ध साचें । अंतरीचें बीज तें ॥ ३ ॥ तुका म्हणे लवणकळी । पडतां जळीं तें होय ॥ ४ ॥

२६७६ बैसोनि निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥ १ ॥ येऊनि अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलिया ॥ २ ॥ रामकृष्ण हरि मुकुंद मुरारी । मंत्र हा उच्चारीं

वेळोवेळां ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होइल भाव एकविध ॥ ४ ॥

२६७७ नलगे देशकाळ । मंत्रविधानें सकळ । मनेंचि निश्चळ । करूनि करुणा भाकावी ॥ १ ॥ येतो बैसलिया ठाया । आसनें व्यापी देवराया । निर्मळ ते काया । अधिष्ठान तयाचें ॥ २ ॥ कल्पनेचा साक्षी । तरि आदरेंचि लक्षी । आवडीनें भक्षी । कोरडें धान्य मटमटां ॥३॥ घेणें तरि भाव । लक्षी दासांचा उपाव । तुका म्हणे जीव । जीवीं मेळविल अनंत ॥ ४ ॥

२६७८ काया वाचा मनें झाला विष्णुदास । काम क्रोध त्यास बाधीतना ॥ १ ॥ विश्वास तो करी स्वामीवरी सत्ता । सकळ सांगिता होय त्याचें ॥ २ ॥ तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ॥ ३ ॥

२६७९ तेंचि करीं मात । जेणें होईल तुझें हित ॥ १ ॥ काय वडवड अमित । सुख जिव्हारीं सिणविसी ॥ २ ॥ जो मूळव्याधी पीडिला । त्यासी देखोन हांसे खरजुला ॥ ३ ॥ आराध करी सोसी । त्यासि हांसे तो आळसी ॥ ४ ॥ क्षयरोगी म्हणे परता । सर रोगिया कुष्टता ॥ ५ ॥ वडस दोहीं डोळां वाढले । आणिकां कानें कोंचे बोले ॥ ६ ॥ तुका म्हणे लागों पायां । शुद्ध करा आपणियां ॥ ७ ॥

२६८० थोडें परी निरें । अविट तें घ्यावें खरें ॥ १ ॥ घ्यावें जेणें नये तुटी । वीज वाढे बीजा पोटीं ॥ २ ॥ चित्त ठेवीं ग्वाहीं । आणिकांशीं चाड नाहीं ॥ ३ ॥ आपलें तें हित फार । तुका म्हणे खरें सार ॥ ४ ॥

२६८१ नम्र जाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥ १ ॥ हेंचि शूरत्वाचें अंग । हरी आणिला श्रीरंग ॥ २ ॥ अवघा झाला पण । लवण सकळां कारण ॥ ३ ॥ तुका म्हणे पाणी । पातळपणें तळा खणी ॥४॥

२६८२ ऐका गा ए अवघेजन । शुद्ध मन तें हित ॥ १ ॥ अवघा

काळ नव्हे जरी । समयावरी जाणावें ॥ २ ॥ नाहीं कोणी सवें येता । संचिता या वेगळा ॥ ३ ॥ बरवा अवकाश आहे । करा साहे इंद्रियें ॥ ४ ॥ कर्मभूमी ऐसा ठाव । वेवसाव जाणावा ॥ ५ ॥ तुका म्हणे उत्तम जोडी । जाती घडी नरदेह ॥ ६ ॥

२६८३ कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरीं तें चांग ॥ १ ॥ तैसा करी कां विचार । शुद्ध कारण अंतर ॥ २ ॥ वरि कांटे फणस-फळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥ ३ ॥ ऊंस बाहेरी कठिण काळा । माजी रसाचा जिव्हाळा ॥ ४ ॥ मिठें रुचविलें अन्न । नये सतत कारण ॥ ५ ॥ तुका म्हणे मोल गोडी । काय चाड वरल्या खोडी ॥ ६ ॥

२६८४ उचित जाणावें मुख्य धर्म आधीं । चित्त शुद्ध बुद्धी ठायीं स्थीर ॥१॥ न घालावी धांव मनाचिये ओढी । वचन आवडी संतां-चिये ॥ २ ॥ अंतरी या राहे वचनाचा विश्वास । न लगे उपदेश तुका म्हणे ॥ ३ ॥

२६८५ संसाराचा माथां भार । कांहीं पर न ठेवीं ॥ १ ॥ भक्तिची ते जाती ऐसी । सर्वस्वासी मुकावें ॥ २ ॥ भिक्षा आणि वेव-साव । काला करितो गाढव ॥ ३ ॥ करूनि वस्ती बाजारीं । म्हणसी कासया निस्पृही ॥ ४ ॥ प्रसादा आडुनि कवी । केलें तुप पाणी तेवीं ॥ ५ ॥ तुका म्हणे होईं शूर । किंवा निसुर मजुर ॥ ६ ॥

२६८६ कंथा प्रावर्ण । नव्हे भिक्षेचें तें अन्न ॥ १ ॥ करीं यापरी स्वहित । विचारूनि धर्मनीत ॥ २ ॥ देउळ नव्हे घर । प्रपंच पर-उपकार ॥ ३ ॥ विधिसेवन काम । नव्हे शब्द राम राम ॥ ४ ॥ हत्या क्षत्रधर्म । नव्हे निष्काम तें कर्म ॥ ५ ॥ तुका म्हणे संतीं । करूनि ठेविली आइती ॥ ६ ॥

२६८७ डोळ्यामध्यें जैसें कणु । अणु तोंहि न समाये ॥ १ ॥ तैसें शुद्ध करीं हित । नका चित्त बाटवूं ॥ २ ॥ आपुल्याचा कळ-

वळा । आणिका बाळावरी नये ॥ ३ ॥ तुका म्हणे बीज मुडा ॥ जैसा चाडा पिकाच्या ॥ ४ ॥

२६८८ करणें तें हेंचि करा । नरका अघोरा कां जातां ॥ १ ॥ जयामध्यें नारायण । शुद्ध पुण्य तें एक ॥ २ ॥ शरणागतां देव राखे । येरां वाखे विघ्नांचे ॥ ३ ॥ तुका म्हणे लीन व्हावें । कळे भावें वर्म हें ॥ ४ ॥

२६८९ किती रांडवंडे । घालूनि व्हाल रे बापुडे । संसाराचे भिडे । कासावीस झालेती ॥ १ ॥ माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठेवी अंगसंगा । विश्वासियां जवळी ॥ २ ॥ कांहीं न मागतां भलें । होईल तोंचि काम केलें । नसावें आथिलें । कांहीं एका संकल्पें ॥ ३ ॥ तुका म्हणे भाव । पाववील ठायाठाव । एकविध जीव । ठेविलिया सेवेसी ॥ ४ ॥

२६९० काय धोविलें बाहेरी । मन मळलें अंतरीं । गाढलें जन्मवरी । असत्यकाटें काटलें ॥ १ ॥ सांडी व्यापार दंभाचा । शुद्ध करीं रे मन वाचा । तुझिया चित्ताचा ।, तूंच ग्वाही आपुला ॥ २ ॥ पापपुण्य विटाळ देहीं । भरितां न विचारिसी कांहीं । काय चांचपसी मही । जी अखंड सोंवळी ॥ ३ ॥ कामक्रोधावेगळा । ऐसा होईं कां सोंवळा । तुका म्हणे कळा । गुंडुन ठेवीं कुसरी ॥ ४ ॥

२६९१ भय नाहीं भेव । अनुतापीं नव्हतां जीव ॥ १ ॥ जेथें देवाची तळमळ । तेथें काशाचा विटाळ ॥ २ ॥ उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त । होय आवडी मिश्रित ॥ ४ ॥

२६९२ काय तो विवाद असो भेदाभेद । साधा परमानंद एका भावें ॥ १ ॥ निघोनि आयुष्य जातें हातोहात । विचारीं पां हित लवलाहीं ॥ २ ॥ तुका म्हणे भावभक्ति हे कारण । नागवी भूषण दंभ तोचि ॥ ३ ॥

२६९३ जेणें घडे नारायणीं अंतराय। होत बाप माय वर्जावीं तीं ॥ १ ॥ येर प्रिया पुत्र धना कोण लेखा। करिती तीं दुःखा पात्र शत्रू ॥ २ ॥ प्रल्हादें जनक बिभीषणें बंधु। राज्य माता निंदु भरतें केली ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व धर्म हरिचे पाय। आणीक उपाय दुःखमूळ ॥ ४ ॥

२६९४ हो कां पुत्र पत्नी बंधु। त्यांचा तोडावा संबंधु ॥ १ ॥ कळों आलें खट्याळसें। शिवों नये लिंपो दोषें ॥ २ ॥ फोडावें मडकें। मेलें लेखीं घायें एकें ॥ ३ ॥ तुका म्हणे त्यागें–। विण चुकीजेना भोगें ॥ ४ ॥

२६९५ न मनावें तैसें गुरूचें वचन। जेणें नारायण अंतरे तें ॥ १ ॥ आड आला म्हूण फोडियेला डोळा। बळिनें आंधळा शुक्र केला ॥ २ ॥ करी देव तरी काय नव्हे एक। कां तुम्ही पृथक सिणां वायां ॥ ३ ॥ उलंघुनियां भ्रताराची आज्ञा। अन्न ऋषिपत्न्या घेउनि गेल्या ॥ ४ ॥ अवघेंचि त्यांचें देवें केलें काज। धर्म आणि लाज राखीयेली ॥ ५ ॥ पितियासीं पुत्रें केला वैराकार। प्रल्हादें असुर मारविला ॥ ६ ॥ बहुत विघ्नें केलीं तया आडआड। परि नाहीं कैवाड सांडियेला ॥ ७ ॥ गौळणी करिती देवासीं व्यभिचार। सांडुनि आचार भ्रष्ट तोही ॥ ८ ॥ तयांसी दिले तें कवणासी नाहीं। अवघा अंतर्बाही तोचि झाला ॥ ९ ॥ देव जोडे तरी करावा अधर्म। अंतरे तें कर्म नाचरावें ॥ १० ॥ तुका म्हणे हा तो जाणतो कळवळा। म्हणोनि अजामेळा उद्धरिलें ॥ ११ ॥

२६९६ आली सिंहस्थ पर्वणी। न्हाव्या भटा झाली धणी ॥ १ ॥ अंतरीं पापाच्या कोडी। वरीवरी बोडी डोई दाढी ॥ २ ॥ बोडिलें तें निघालें। काय पालटलें सांग वाहिलें ॥ ३ ॥ पाप गेल्याची काय खुण। नाहीं पालटले अवगुण ॥ ४ ॥ भक्तिभावेंविण। तुका म्हणे अवघा सीण ॥ ५ ॥

२६९७ निर्वैर होणें साधनाचें मूळ । येर ते विल्हाळ सांडीमांडी ॥ १ ॥ नाहीं चालों येत सोंगसंपादणी । निवडे अवसानीं शुद्धाशुद्ध ॥ २॥ त्याग नांव तरी निर्विषयवासना । कार्यकारणापुरते विधि ॥ ३ ॥ तुका म्हणे राहे चिंतनीं आवडी । येणें नांवें जोडी सत्यत्वेंशीं ॥ ४ ॥

२६९८ नव्हे खळवादी मताचि पुरता । सत्याची हे सत्ता उपदेश ॥ १ ॥ साक्षत्वेंसिं मना आणावीं उत्तरें । परिपाकीं खरें खोटें कळे ॥ २ ॥ नव्हे एकदेशी शब्द हा उखता । ब्रह्मांडापुरता घेईल त्यासी ॥ ३ ॥ तुका विनवणी करी जाणतियां । बहुमतें वायां श्रमूं नये ॥ ४ ॥

२६९९ पात्र शुद्ध चित्त ग्वाही । नलगे कांहीं सांगणें ॥ १ ॥ शूर तरी सत्यचि व्हावें । साटी जीवें करूनि ॥ २ ॥ अमुपच सुखमान । स्वामी जन मानावें ॥ ३ ॥ तुका म्हणे जैसी वाणी । तैसा मनीं परिपाक ॥ ४ ॥

२७०० साजे अळंकार । तरि भोगितां भ्रतार ॥ १ ॥ व्यभिचारिण टाकमटिका । उपहास होती लोकां ॥ २ ॥ शूरत्वाची वाणी । रूप मिरवे मंडणी ॥ ३ ॥ तुका म्हणे जिणें । शतींविण लाजिरवाणें ॥ ४ ॥

२७०१ शिष्याची जो नेघे सेवा । मानी देवासारिखे ॥ १ ॥ त्याचा फळे उपदेश । आणिकां दोष उफराटे ॥ २ ॥ त्याचें खरें ब्रम्हज्ञान । उदासीन देहभाव ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्य सांगें । योत रागें येती ते ॥ ४ ॥

२७०२ न मनीं ते ज्ञानी न मनीं ते पंडित । ऐसे परीचे एक एका भावें ॥ १ ॥ धातू पोसोनियां आणिकां उपदेश । अंतरी तो लेश प्रेम नाहीं ॥ २ ॥ न मनीं ते योगी न मनी ते हरिदास । दर्शनें बहुवस बहुतां परिचीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तयां नमन बाह्यात्कारीं । आवडती परी चित्त शुद्धीचे ॥ ४ ॥

२७०३ करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥ १ ॥ कळावें तयासी कळे अंतरींचें । कारण तें साचें साचा अंगीं ॥ २ ॥ अतिशया अंती लाभ किंवा घात । फळ देतें चित्त वीजा ऐसें ॥ ३ ॥ तुका म्हणे जेणें राहे समाधान । ऐसें तें भजन पार पावी ॥ ४ ॥

२७०४ मनोमय पूजा । हेचि पढिये केशीराजा ॥ १ ॥ घेतो कल्पनेचा भोग । न मानेची बाह्य रंग ॥ २ ॥ अंतरींचें जाणे । आदि-वर्तमान खुणे ॥ ३ ॥ तुका म्हणे कुडें । कोठें सरे त्याच्या पुढें ॥ ४ ॥

२७०५ साहोनियां टाकी घाये । पाषाण देवचि जाला पाहें ॥ १ ॥ तया रीति दृढ मन । करीं साधाया कारण ॥ २ ॥ वाण शस्त्र साहे गोळी । शूरा ठाव उंच स्थळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे सती । अग्न न देखे ज्या रीती ॥ ४ ॥

२७०६ फळाची तों पोटीं । घडे वियोगेंही भेटी ॥ १ ॥ करावें चिंतन । सार तेंचि आठवण ॥ २ ॥ चित्त चित्ता ग्वाही । उपचारें चाड नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । पावे अंतरींची सेवा ॥ ४ ॥

२७०७ खरें बोले तरी । फुकासाठीं जोडे हरी ॥ १ ॥ ऐसे फुकाचे उपाय । सांडुनियां वांयां जाय ॥ २ ॥ परउपकार । एका वचनाचा फार ॥ ३ ॥ तुका म्हणे मळ । मनें सांडितां शीतळ ॥ ४ ॥

२७०८ वेदविहित तुम्ही आइका हो कर्में । बोलतों तीं वर्में संतां-पुढें ॥ १ ॥ चारी वर्ण झाले एकाचिये अंगीं । पापपुण्य भागीं विभा-गिलें ॥ २ ॥ प्रथम पाउलीं पावविला पंथ । आदि मध्य अंत भेद नाहीं ॥ ३ ॥ आंबे बोरी वड बाभुळा चंदन । गुणागुणीं भिन्न अग्नि एक ॥ ४ ॥ तुका म्हणे मन उन्मन जों होय । तोंवरी हे सोय विधि पाळी ॥ ५ ॥

२७०९ झुंझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां हे दुःख थोर आहे ॥ १ ॥ तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी

विरळा शूर ॥ २ ॥ पिंड पोसिलिया विषयांचा पाईक । वैकुंठनायक कैंचा तेथें ॥ ३ ॥ तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रखुमादेवीवर जोडावया ॥ ४ ॥

२७१० चित्तीं नाहीं तें जवळी असोनि काय । वत्स सांडी माय तेणे न्यायें ॥ १ ॥ प्रीतीचा तो वायु गोड लागे मात । जरी जाय चित्त मिळोनियां ॥ २ ॥ तुका म्हणे अवघें फिकें भावाविण । मीठ नाहीं अन्न तेणें न्यायें ॥ ३ ॥

२७११ यज्ञनिमित्यें शरीरासी बंधन । तृष्णा वांयांविण वाढविली ॥ १ ॥ नव्हे ते भक्ति परलोक साधन । विषयांनीं बंधन केलें तुज ॥ २ ॥ आशा धरूनि फळाची । तीर्थीं व्रतीं मुक्ति कैंची ॥ ३ ॥ तुका म्हणे सिणसीं वांयां । शरण न वजतां पंढरिराया ॥ ४ ॥

२७१२ परद्रव्य परनारीचा अभिलाष । तेथूनि हरास सर्व भाग्या ॥ १ ॥ घटिका दिवस मास वर्षें लागती तीन । बांधलें पतन गांठोडीस ॥ २ ॥ पुढें घात त्याचा रोकडा शकुन । पुढें करी गुण निश्चयेंसीं ॥ ३ ॥ तुका म्हणे एका तडताथवड । काळ लागे नाड परी खरा ॥ ४ ॥

२७१३ पुण्य परउपकार पाप ते परपीडा । आणिक नाहीं जोडा दुजा यासी ॥ १ ॥ सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणिक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥ गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥ संतांचा संग तोचि स्वर्गवास । नर्क तो उदास अनर्गळ ॥ ४ ॥ तुका म्हणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसें ॥ ५ ॥

२७१४ कुळधर्में ज्ञान कुळधर्में साधन । कुळधर्म निधान हातीं चढे ॥ १ ॥ कुळधर्में भक्ति कुळधर्में गति । कुळधर्म विश्रांति पाववील ॥ २ ॥ कुळधर्में दया कुळधर्में उपकार । कुळधर्म सार साधनांचें ॥ ३ ॥ कुळधर्में महत्व कुळधर्में मान । कुळधर्म पावन पर-

लोकींचें ॥ ४ ॥ तुका म्हणे कुळधर्म दावी देवीं देव । यथाविध भाव जरी होय ॥ ५ ॥

२७१५ जेणें वाढे अपकीर्ति । सर्वार्थीं तें त्यजावें ॥ १ ॥ सत्य रुचे भलेपण । वचन तें जगासी ॥ २ ॥ होइजेतें शुद्ध त्यागें । वाउगें तें सारावें ॥ ३ ॥ तुका म्हणे खोटें वर्म । निंद्य कर्म काळिमा ॥ ४ ॥

२७१६ भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥ १ ॥ धांवे जातींपाशीं जाती । खुण येरयेरां चित्तीं ॥ २ ॥ हिरा हिरकणी । काढी आंतुनि आइरणी ॥ ३ ॥ तुका म्हणे केलें । मन शुद्ध हें चांगलें ॥ ४ ॥

२७१७ शहाणिया पुरे एकचि वचन । विशारती खुण तेचि त्यासी ॥ १ ॥ उपदेश असे बहुतांकारणें । घेतला तो मनें पाहिजे हा ॥ २ ॥ फांसावेना तरि दुःख घेतें वाव । मग होतो जीव कासावीस ॥ ३ ॥ तुका म्हणे नको राग धरूं झोंडा । नुघडितां पीडा होईल डोळे ॥ ४ ॥

२७१८ नाहीं सुगंधाची लागत लावणी । लावावी ते मनीं शुद्ध होतां ॥ १ ॥ वाऱ्याहातीं माप चाले सज्जनाचें । कीर्ती मुख त्याचें नारायण ॥ २ ॥ प्रभा आणि रवि काय असे आन । उदयीं तें जन सकळ साक्षी ॥ ३ ॥ तुका म्हणे बरा सत्याचा सायास । नवनीता नाश नाहीं पुन्हा ॥ ४ ॥

२७१९ अनुतापें दोष । जाय न लगतां निमिष ॥ १ ॥ परि तो राहे विसावला । आदीं अवसानीं भला ॥ २ ॥ हेंचि प्रायश्चित्त । अनुतापीं न्हाय चित्त ॥ ३ ॥ तुका म्हणे पापा । शिवों नये अनुतापा ॥ ४ ॥

२७२० ढेकरें जेवण दिसे साचें । नाहीं तरि काचें कुंथाकुंथी ॥ १ ॥ हेही बोल तेही बोल । कोरडे फोल रुचीविण ॥ २ ॥ गव्हांचिया होती परी । फकेवरी खाऊं नये ॥ ३ ॥ तुका म्हणे असे हातींचें कांकण । तयासी दर्पण विल्हाळक ॥ ४ ॥

२७२१ केलें नाहीं मनीं तया घडे त्याग । उबग उद्वेग नाहीं चित्तीं ॥ १ ॥ देवाचि हा जाणे अंतरींचा भाव । मिथ्या तो उपाव बाह्य रंग ॥ २ ॥ त्यागिल्याचें ध्यान राहिलें अंतरीं । अवघी ते परी विटंबना ॥ ३ ॥ तुका म्हणे आपआपणां विचारा । कोण हा दुसरा सांगे तुम्हां ॥ ४ ॥

२७२२ अन्यायासी राजा जरि न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना ॥ १ ॥ न करी निगा कुणबी न काढितां तण । कैचे येती कण हातासी ते ॥ २ ॥ तुका म्हणे संतां करूं नये अनुचित । पाप नाहीं नीत विचारितां ॥ ३ ॥

२७२३ ऐसी एकां अटी । रितीं सिणती करंटीं ॥ १ ॥ साच आपुल्या पुरतें । करून नेघेती कां हितें ॥ २ ॥ कांहीं वेचितील वाणी । निरर्थकाचि कारणीं ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । कांहीं समर्पूनि सेवा ॥ ४ ॥

२७२४ जळालें तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडिलिया ॥ १ ॥ कारण तें अंतरलें । वाइट भलें म्हणवितां ॥ २ ॥ तांतडीनें नासी । तांतडीनेंच संतोषी ॥ ३ ॥ तुका म्हणे धीर । नाहीं बुद्धि एक स्थिर ॥ ४ ॥

२७२५ निष्ठुर तो दिसे निराकारपणें । कोंवळा सगुणें प्रतिपाळी ॥ १ ॥ केलाच करावा केला कइवाड । होईल ते गोड न परते ॥२॥ माथिलिया लागे नवनीत हातां । नासे वितळितां आहाच तें ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां मनाशीं विचार । करावा तो सार एकचित्त ॥ ४ ॥

२७२६ जीवित्व तें किती । हेंचि धरितां बरें चित्तीं ॥ १ ॥ संत सुमनें उत्तरें । मृदु रसाळ मधुरें ॥ २ ॥ विसांवतां कानीं । परिपाक घडे मनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे जोडी । होय जतन रोकडी ॥ ४ ॥

२७२७ मायबापें जरी सर्पीण कीं बोका । त्यांचे संगे सुखा न पवे बाळ ॥ १ ॥ चंदनाचा शूळ सोनियाची बेडी । सुख नेदी फोडी

प्राण नाशी ॥ २ ॥ तुका म्हणे नरकीं घाली अभिमान । जरी होय ज्ञान गर्व ताठा ॥ ३ ॥

२७२८ सत्या मान वाढे । गबाळाची चाली खोडे ॥ १ ॥ उतरे तें कळे कसीं । विखरोन सर्व देशीं ॥ २ ॥ घरामध्यें राजा । नोहे व्हावी पट्टपूजा ॥ ३ ॥ तुका म्हणे साचें । रूप तें दर्पणाचें ॥ ४ ॥

२७२९ मंगळाचा मंगळ सांटा । विट तोटा नेणे तें ॥ १ ॥ हें भरा सातें आलें । भलें भलें म्हणवावें ॥ २ ॥ जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥ ३ ॥ तुका म्हणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावें ॥ ४ ॥

२७३० वंदिलें वंदावें जीवाचियेसाटीं । किंवा बरी तुटी आरंभींच ॥ १ ॥ स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ॥ २ ॥ सिंपिलें तें रोंप वरीवरी बरें । वाळलियावरी कोंभ नये ॥ ३ ॥ तुका म्हणे टाकीघायें देवपण । फुटलिया जन कुला पुसी ॥ ४ ॥

२७३१ पाठेळ करितां न साहावे वारा । साहिलिया ढोरा गोणी चाले ॥ १ ॥ आपणां आपण होचि कसवटी । हर्षामर्ष पोटीं विरों द्यावे ॥ २ ॥ नवनीत तोंवरी कडकडी लोणी । निश्चळ होऊनी राहे मग ॥ ३ ॥ तुका म्हणे जरी जग टाकी घाया । त्याच्या पडे पायां जन मग ॥ ४ ॥

२७३२ एका बीजा केला नास । मग भोगलें कणीस ॥ १ ॥ कळे सकळां हा भाव । लहानथोरांवरी जीव ॥ २ ॥ लाभ नाहीं फुकासाठीं । केल्याविण जीवासाटी ॥ ३ ॥ तुका म्हणे रणीं । जीव देतां लाभ दुणी ॥ ४ ॥

२७३३ सकळ देवांचें दैवत । उभें असे रंगा आंत ॥ १ ॥ रंग लुटा माझे बाप । शुद्ध भाव खरें माप ॥ २ ॥ रंग लुटिला बहुतीं । शुक नारदादि संतीं ॥ ३ ॥ तुका लुटितां हे रंग । साह्य झाला पांडुरंग ॥ ४ ॥

२७३४ समर्थासी नाहीं वर्णावर्णभेद । सामग्री ते सर्व सिद्ध घरीं ॥ १ ॥ आदराचे ठायीं बहुत आदर । मागितलें फार तेथें वाढी ॥ २ ॥ न म्हणे सुहृद सोइरा आवश्यक । राजा आणि रंक सारिखेची ॥ ३ ॥ भाव देखे तेथें करी लडबड । जडा राखे जड निराळेंचि ॥ ४ ॥ कोणी न विसंबे याचकाचा ठाव । विनवूनी देव शंका फेडी ॥ ५ ॥ तुका म्हणे पोट भरूनी उरवी । आलें ऐसें दावी अनुभवा ॥ ६ ॥

२७३५ विषयांचे लोलिंगत । ते फजीत होतील ॥ १ ॥ न सरे तेथें यातिकुळ । शुद्ध मूळ बीज व्हावें ॥ २ ॥ शिखा सूत्र सोंग वरी । दुराचारी दंड पावे ॥ ३ ॥ तुका म्हणे अभिमान । नारायण न सोसे ॥ ४ ॥

२७३६ शंख करिसी ज्याच्या नांवें । त्याचें तुज नाहीं ठावें । ऐक सांगतों एका भावें । सांपडे घरीं तें जीवऊनि खावें । रे विठ्ठल ॥ १ ॥ टिळे माळा करंडी सोंग । धरूनि चाळाविलें जग । पसरीं हात नाहीं त्याग । दावी दगड पुजी भग । रे विठ्ठल ॥ २ ॥ राख लावुनि अंगमळी । वाये ठोके मी एक बळी । वासनेहातीं बांधवी नळी । त्यासी येऊनी काळ गिळी । रे विठ्ठल ॥ ३ ॥ कोण तें राहडीचें सुख । वरते पाय हारतें मुख । करवी पीडा भोगवी दुःख । पडे नरकीं परि न कळेचि मूर्ख । रे विठ्ठल ॥ ४ ॥ सिकला फाग मारी हाका । रांडा पोरें मेळवी लोकां । विटंबी शरीर मागे रुका । केलें तें गेलें अवघेंचि फुका । रे विठ्ठल ॥ ५ ॥ कळावें जनां मी एक बळी । उभा राहोनी मांडी फळी । फोडोनी गुडघे कोंपर चोळी । आपला घात करोनी आपणाचि तळमळी । रे विठ्ठल ॥ ६ ॥ फुकट खेळें ठकलीं वांयां । धरूनि सोंग बोडक्या डोया । शिवों नये ती अंतरीं माया । संपादणी-विण विटंबिली काया । रे विठ्ठल ॥ ७ ॥ धुळी माती कांहीं खेळोंच नका । जवादी चंदन घ्यावा बुका । आपणा परिमळ आणिकां

लोकां । मोलाची माहिमा फजिती फुका । रे विठ्ठल ॥ ८ ॥ बहुत दुःखी जालिया खेळें । अंगीं बुद्धि नाहींत बळें । पाठीवरी तोबा तोंड काळें । रसना द्रवे उपस्थाच्या मुळें । रे विठ्ठल ॥ ९ ॥ काय सांगतो तें ऐका तुका । मोडा खेळ कांहीं अवघोंच नका । चला जेवूं आधीं पोटीं लागल्या भुका । धाल्यावरी वरा टाकमटिका रे विठ्ठल ॥ १० ॥

२७३७ जैसें दावी तैसा राहे । तरि कां देव दुरी आहे ॥ १ ॥ दुःख पावायाचें मूळ । रहणी ठाव नाहीं ताळ ॥ २ ॥ माळामुद्रांवरी । केंचा सोंगें जोडे हरी ॥ ३ ॥ तुका म्हणे देखें । ऐसे परीचीं बहुतेकें ॥ ४ ॥

२७३८ धांई अंतरींच्या सुखें । काय वडवड वाचा मुखें ॥ १ ॥ विधिनिषेध उर फोडी । जंव नाहीं अनुभव गोडी ॥ २ ॥ वाढे तळमळ उभयतां । नाहीं देखिलें अनुभवितां ॥ ३ ॥ आपुल्या मतें पिसें । परि तें आहे जैसें तैसें ॥ ४ ॥ साधनाची सिद्धि । मौन करा स्थिर बुद्धि ॥ ५ ॥ तुका म्हणे वादें । वांयां गेलीं ब्रह्मवृंदें ॥ ६ ॥

२७३९ संसारसंगें परमार्थ जोडे । ऐसें काय घडे जाणतेनों ॥ १ ॥ हेंडग्याच्या आळां अवघीं चिपाडें । काय तेथें गोडें निवडावीं ॥ २ ॥ ढेकणाचे वाजे सुखाची कल्पना । मूर्खत्व वचना येऊं पाहे ॥ ३ ॥ तुका म्हणे मद्य सांडवी लंगोटी । सांगितला सेवटीं विचार त्या ॥ ४ ॥

२७४० नव्हे ब्रह्मचर्य बाइलेच्या त्यागें । वैराग्य वाउगें देशत्यागें ॥ १ ॥ काम वाढे भय वासनेच्या द्वारें । सांडावें तें धीरें आचावाचा ॥ २ ॥ कांपवूनि टिरी शूरत्वाची मात । केलें वाताहात उचित काळें ॥ ३ ॥ तुका म्हणे करी जिव्हेसी विटाळ । लटिक्याची मळ स्तुति होतां ॥ ४ ॥

२७४१ उदंड शाहाणे होत तर्कवंत । परि या नेणवे अंत विठोबाचा ॥ १ ॥ उदंड अक्षरां करोत भरोवरी । परि ते नेणवे थोरी

विठोबाची ॥ २ ॥ तुका म्हणे नाहीं भोळेपणाविण । जाणीव ते सीण रितें माप ॥ ३ ॥

२७४२ नाना मतांतरें शब्दाची वित्पत्ति । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥ माझ्या विठोबाचें वर्म आहे दूरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ २ ॥ यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ ३ ॥ तुका म्हणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागे ॥ ४ ॥

२७४३ नाहीं सरों येत जोडिल्या वचनीं । कवित्वाची वाणी कुशळता ॥ १ ॥ सत्याचा अनुभव वेधी सत्यपणें । अनुभवाच्या गुणें रुचों येतो ॥ २ ॥ काय आगीपाशीं शृंगारिलें चाले । पोटींचे उकले कसापाशीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें करावा उकल । लागेचि ना बोल वाढवूनि ॥ ४ ॥

२७४४ येथें नाहीं उरों आले अवतार । येर ते पामर जीव किती ॥ १ ॥ विषयांचे झणी व्हाल लोलिंगत । चेवालिया अंत न लगे मज ॥ २ ॥ वाहोनियां भार कुंथसील ओझें । नव्हे तेंचि माझें थीता त्याग ॥ ३ ॥ तुका म्हणे कैसी नाहीं त्याची लाज । संतीं केशीराज साधियेला ॥ ४ ॥

२७४५ लय लक्षूनियां जालों म्हणती देव । तोही नव्हे भाव सत्य जाणा ॥ १ ॥ झालों बहुश्रुत नलगे आतां कांहीं । नको राहूं तेंही निश्चितीनें ॥ २ ॥ तपें दानें काय मानिसी विश्वास । बीज फळ त्यास आहे पुढें ॥ ३ ॥ कर्म आचरण यातीचा स्वगुण । विशेष तो गुण काय तेथें ॥ ४ ॥ तुका म्हणे जरी होईल निष्काम । तरिच होय राम देखे डोळां ॥ ५ ॥

२७४६ घरोघरीं अवघें जालें ब्रह्मज्ञान । परि मेळवण बहु माजी ॥ १ ॥ निरें कोणापाशीं होय एक रज । तरि धारे मज दुर्बळासी ॥ २ ॥ आशा तृष्णा माया कालवूनी दोन्ही । दंभ तो दूरोनी दिस-

तसे ॥ ३ ॥ काम क्रोध लोभ सिणवी बहुत । मेळवूनि आंत काळ-कूट ॥ ४ ॥ निंदा अहंकार द्वेष बहु फार । माजी वरी धूर सारियेला ॥ ५ ॥ तुका म्हणे तेथें कांहीं हातां नये । आयुष्य मोले जाये वांयां-वीण ॥ ६ ॥

२७४७ देखीचें तें ज्ञान करावें तें काई । अनुभव नाहीं आपणासीं ॥ १ ॥ इंद्रियांचे गोडीं ठकलीं बहुतें । सोडितां मागुतें आवरेना ॥२॥ युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥ ३ ॥ नाव नावलितां घाला घाली वारा । तैसा तो पसारा अहंतेचा ॥ ४ ॥ तुका म्हणे बुद्धि आपुले अधीन । करी नारायण आतुडे तों ॥ ५ ॥

२७४८ नव्हे ब्रह्मज्ञान बोलतां हें सिद्ध । जंव हा आत्मबोध नाहीं चित्तीं ॥ १ ॥ काय करिली वांयां लटिकाचि पाल्हाळ । श्रम तो केवळ जाणिवेचा ॥ २ ॥ मीच देव ऐसें सांगती या लोकां । विष-यांच्या सुखा टाकोनियां ॥ ३ ॥ अमृताची गोडी पुढिलां सांगसी । आपण उपवासीं मरोनियां ॥ ४ ॥ तुका म्हणे जरी राहील तळमळ । ब्रह्म तें केवळ सदोदित ॥ ५ ॥

२७४९ ब्रह्मज्ञान जरी एके दिवशीं कळे । तत्काळ हा गळे अभि-मान ॥ १ ॥ अभिमान लागे शुकाचिये पाठी । व्यासें उफराटी दृष्टी केली ॥ २ ॥ जनकभेटीसीं पाठविला तेणें । अभिमान नाणें खोटें केलें ॥ ३ ॥ खोटें करूनियां लाविला अभ्यासीं । मेरुशिखरासी शुक गेला ॥ ४ ॥ जाऊनियां तेणें साधिली समाधि । तुका म्हणे तधीं होतों आम्ही ॥ ५ ॥

२७५० त्रिपुटीच्या योगें । कांहीं नव्हे कोणाजोगें । एक जातां लागें । एक पाठीं लागतें ॥ १ ॥ मागें पुढें अवघा काळ । पळों नये न चले बळ । करितां कोल्हाळ । कूपे खांदा हरि त्राहे ॥ २ ॥ पापपुण्यात्म्याच्या शक्ती । असती योजिल्या श्री-

पती । यावें काकुलती । येथें सत्तानायेका ॥ ३ ॥ तुका उभा पैलथडी । तरि हे प्रकार निवडी । घातल्या सांगडी । तापे पेटीं हाकारी ॥ ४ ॥

२७५१ लापनिक शब्दें नातुडे हा देव । मनिंचे गुह्यभाव शुद्ध बोला ॥ १ ॥ अंतरिंचा भेद जाणे परमानंद । जयासी संवाद करणें लागे ॥ २ ॥ तुका म्हणे जरी आपुलें स्वहित । तरी करीं चित्त शुद्ध भावें ॥ ३ ॥

२७५२ आम्हां हें कौतुक जगा द्यावी नीत । करावें फजित चुकती ते ॥ १ ॥ कासयाचा बाध एकाच्या निरोपें । काय व्हावें कोपें जगाचिया ॥ २ ॥ अविद्येचा येथें कोठें परिश्रम । रामकृष्ण नाम ऐसे वाण ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें खऱ्याचा विकरा । न सरती येरा खोट्यापरी ॥ ४ ॥

२७५३ सेवितों हा रस वांटितों आणिकां । घ्यारे होऊं नका रानभरी ॥ १ ॥ विटेवरी ज्याचीं पाउलें समान । तोचि एक दानशूर दाता ॥ २ ॥ मनाचे संकल्प पाववील सिद्धी । जरी राहे बुद्धि याचे पायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे मज धाडिलें निरोपा । मारग हा सोपा सुखरूप ॥ ४ ॥

२७५४ ऐका कलीचें हें फळ । पुढें होईल ब्रह्मगोळ ॥ १ ॥ चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्ती ॥ २ ॥ पूजिती असुरा रांडा । मद्य प्राशितील पेंढा ॥ ३ ॥ वामकवळ मार्जन । जग जाईल अधःपतन ॥ ४ ॥ तुका हरिभक्ति करी । शक्ति पाणी वाहे घरीं ॥ ५ ॥

२७५५ कलियुगीं कवित्व करिती पाषांड । कुशल हे भांड बहु झाले ॥ १ ॥ द्रव्य दारा चित्तीं प्रजांची आवडी । मुखें बडबडी कोरडाची ॥ २ ॥ दंभ करी सोंग मानावया जग । मुखें बोले त्याग मनीं नाहीं ॥ ३ ॥ वेदाज्ञे करोनि न करिती स्वहित । नव्हती

अलिप्त देहाहूनी ॥ ४ ॥ तुका म्हणे दंड साहील यमाचे । न करी जो वाचे बोले तैसें ॥ ५ ॥

२७५६ साधक झाले कळीं । गुडगुडीची लांब नळी ॥ १ ॥ पचनीं पडे मद्यपान । भांगभुर्का हें साधन ॥ २ ॥ अभेदाचें पाठांतर । अति विषयीं पडिभर ॥ ३ ॥ चेल्यांचा सुकाळ । पिंडदंड भंगपाळ ॥ ४ ॥ सेवा मान धन । बरे इच्छेनें संपन्न ॥ ५ ॥ सोंगाच्या नरकाडी । तुका वोडोनियां सोडी ॥ ६ ॥

२७५७ ऐसे संत झाले कळीं । तोंडीं तमाखूची नळी ॥ १ ॥ स्नानसंध्या बुडविली । पुढें भांग वोडवली ॥ २ ॥ भांग भुर्का हें साधन । पचनीं पडे मद्यपान ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघें सोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ ४ ॥

२७५८ गाजराची पुंगी । तैसे नवे झाले जोगी ॥ १ ॥ काय करोनि पठण । केली अहंता जतन ॥ २ ॥ अल्प असे ज्ञान । अंगीं ताठा अभिमान ॥ ३ ॥ तुका म्हणे लंड । त्याचें हाणोनि फोडा तोंड ॥ ४ ॥

२७५९ घालूनियां मध्यवर्ती । दाटुनि उपदेश देती ॥ १ ॥ ऐसे पोटभरे संत । तयां कैंचा भगवंत ॥ २ ॥ रांडापोरांतें गोविती । वर्पासन ते लाविती ॥ ३ ॥ जैसे बोलती निरोपणी । तैसी न करिती करणी ॥ ४ ॥ तुका म्हणे तयां । तमोगुणियांची क्रिया ॥ ५ ॥

२७६० परद्रव्य परनारी । अभिलासूनि नाक धरी ॥ १ ॥ जळो तयाचा आचार । व्यर्थ भार वाहे खर ॥ २ ॥ सोंवळ्याची स्फीती । क्रोधें विटाळला चित्तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे सोंग । दावी बाहेरील रंग ॥ ४ ॥

२७६१ भोंदावया मीस घेऊनि संतांचें । करी कुटुंबाचें दास्य सदा ॥ १ ॥ मनुष्याचे परी बोल रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥ २ ॥ तिमयाचा बैल करी शिकवीलें । चित्रींचें बाहुलें गोष्टी सांगे

॥ ३ ॥ तुका म्हणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ॥ ४ ॥

२७६२ पुराणीक म्हणविती । जाणोनी कांदे भक्षिती ॥ १ ॥ अगस्तीचें सूत्र मळ । लावुनि म्हणती कृष्णावळ ॥ २ ॥ श्रेष्ठ वर्ण ब्राह्मणाचा । संग न सुटे शूद्रीचा ॥ ३ ॥ बद्राहीच्या पाडी दाढा । लागे तुकयाचा हुंदाडा ॥ ४ ॥

२७६३ डोई वाढवूनि केश । भूतें आणिती अंगास ॥ १ ॥ तरी ते नव्हती संतजन । तेथें नाहीं आत्मखुण ॥ २ ॥ मेळवूनि नरनारी । शकुन सांगती नानापरी ॥ ३ ॥ तुका म्हणे मैंद । नाहीं त्यापासीं गोविंद ॥ ४ ॥

२७६४ टिळा टोपी माळा देवाचें गवाळें । वागवी वोंगळ पोटासाटीं ॥ १ ॥ तुळसी खोवी कानीं दर्भ खोवी शेंडी । लटिकी घरी बोंडी नासिकाची ॥ २ ॥ कीर्तनाचे वेळे रडे पडे लोळे । प्रेमेंविण डोळे गळताती ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मईद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ४ ॥

२७६५ होउनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ॥ १ ॥ निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहाताती मान आदराचा ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केवीं ॥ ३ ॥

२७६६ लांबवूनि जटा नेसोनि कासोटा । अभिमान मोटा करिताती ॥ १ ॥ सर्वांगा करिती विभूतिलेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥ २ ॥ तुका म्हणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥ ३ ॥

२७६७ कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ म्हणविती जगांमाजीं ॥ १ ॥ घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परी शंकरासी नोळखती ॥ २ ॥ पोट भरावया शिकती उपाय । तुका म्हणे जाय नरकलोका ॥ ३ ॥

२७६८ कौडीकौडीसाठीं फोडिताती शिर । काढूनि रुधिर मलंग ते ॥ १ ॥ पांघरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥ २ ॥ तुका म्हणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । नकळेचि वर्म गोविंदाचें ॥ ३ ॥

२७६९ लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठी । हिंडे पोटासाठीं देशोदेशीं ॥ १ ॥ नेसोनि कौपीन शुभ्रवर्ण जाण । पाहाती पक्वान्न क्षेत्रीचें तें ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मईंद । त्यांपासीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

२७७० होउनियां जंगम विभूति लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥ १ ॥ शिवाचें निर्माल्य तीर्थ न सेविती । घंटा वाजविती पोटासाठीं ॥ २ ॥ तुका म्हणे त्यासी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ॥ ३ ॥

२७७१ टिळा टोपी उंच दावी । जगीं मी एक गोसावी ॥ १ ॥ अवघा वरपंग सारा । पोटीं विषयांचा थारा ॥ २ ॥ मुद्रा लाविती कोरोनी । मान व्हावयासी जनीं ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे किती । नरका गेले पुढें जाती ॥ ४ ॥

२७७२ लांब लांब जटा काय वाढवूनि । पावडें घेऊनि क्रोधें चाले ॥ १ ॥ खायाचा वोळसा शिव्या दे जनाला । ऐशा तापसाला बोध कैंचा ॥ २ ॥ सेवी भांग अफू तमाखू उदंड । परि तो अखंड भ्रांतीमाजीं ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा सर्वस्वें बुडाला । त्यासी अंतरला पांडुरंग ॥ ४ ॥

२७७३ संत चिन्हें लेउनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥ १ ॥ पडिले दुःखाचे सागरीं । वाहावले ते भवपुरीं ॥ २ ॥ काम क्रोध लोभ चित्तीं । वरिवरि दाविती विरक्ती ॥ ३ ॥ आशापाशीं बांधोनि चित्त । म्हणती झालों आम्ही मुक्त ॥ ४ ॥ त्यांचे लागले

२७८४ मुखें बोले ब्रह्मज्ञान । मनीं धन अभिमान ॥ १ ॥ ऐशियाची करितां सेवा । काय सुख होय जीवा ॥ २ ॥ पोटासाठीं संत । झाले कलींत बहुत ॥ ३ ॥ विरळा ऐसा कोणी । तुका त्यासी लोटांगणीं ॥ ४ ॥

२७८५ माया ब्रह्म ऐसें म्हणती धर्मठक । आपणासरिसे लोक नागविले ॥ १ ॥ विषयीं लंपट शिकवी कुविद्या । मनामागें नाचा होउनि फिरे ॥ २ ॥ करूनि खातां पाक जिरे सुरण राई । करितां अतित्याई दुःख पावे ॥ ३ ॥ औषध द्यावया चाळविलें बाळा । दावूनियां गुळा दृष्टीपुढें ॥ ४ ॥ तरावया आधीं शोधा वेदवाणी । वांजट बोलणीं वारा त्यांचीं ॥ ५ ॥ तुका म्हणे जयां पिंडाचें पाळण । न घडे नारायण भेट तयां ॥ ६ ॥

२७८६ अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव । प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥ १ ॥ नाहीं भाव तया सांगावें तें किती । आपुलाल्या मतीं पाखांडिया ॥ २ ॥ जया भावें संत बोलिले वचन । नाहीं अनुमोदन शाब्दिकांसी ॥ ३ ॥ तुका म्हणे संतीं भाव केला बळी । न कळतां खळीं दूषिला देव ॥ ४ ॥

२७८७ जीव तोचि देव भोजन ते भक्ती । मरण ते मुक्ति पापियाची ॥ १ ॥ पिंडाच्या पोषकीं नागविलें जन । लटिकें पुराण केलें वेद ॥ २ ॥ मना आला तैसा करिती विचार । म्हणती संसार नाहीं पुन्हा ॥ ३ ॥ तुका म्हणे पाठीं उडती यमदंड । पापपुण्य लंड न विचारिती ॥ ४ ॥

२७८८ शब्दज्ञानी येऊं नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥ १ ॥ जळो ते जाणीव जळो त्यांचे दंभ । जळो त्यांचें तोंड दुर्जनांचें ॥ २ ॥ तुका म्हणे येती दाटूनि छळाया । त्यांच्या बोडूं डोया न धरूं भीड ॥ ३ ॥

२७८९ अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये चित्तीं बोध

कैंचा ॥ १ ॥ अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैंचा ॥ २ ॥ अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैंचें ॥ ३ ॥ अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैंचें ॥ ४ ॥ तुका म्हणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५ ॥

२७९० शिकल्या बोलाचे सांगतील वाद । अनुभव भेद नाहीं कोणा ॥ १ ॥ पंडित हे ज्ञानी करितील कथा । न मिळती अर्था निज-सुखा ॥ २ ॥ तुका म्हणे जैसी लांचासाठीं ग्वाही । देतील हे नाहीं ठावी वस्तु ॥ ३ ॥

२७९१ उचित न कळे इंद्रियांचे ओढी । मुखें बडबडी शिकले तें ॥ १ ॥ आपण जाऊन न्यावीं नरकास । बळें वेताळीस कुळें जग ॥ २ ॥ अबोलणें बोले डोळे झांकुनियां । बडबडी वांयां दंभासाठीं ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही तेथील पारखी । नाचे देखोवेखीं जाणों खरें ॥ ४ ॥

२७९२ पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टि भेटी नहो त्याची ॥ १ ॥ नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशालागीं पात्र झाला ॥ २ ॥ पोंहों नेणे कासे लाविलो आणिका । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ॥ ३ ॥ सिणलें तें गेलें सिणलियापासीं । जाली त्या दोघांसी एक गति ॥ ४ ॥ तुका म्हणे अहो देवा दीनानाथा । दरुषण आतां नको त्याचें ॥ ५ ॥

२७९३ कोडियाचें गोरेपण । तैसें अहंकारी ज्ञान ॥ १ ॥ त्यांसी अंतरीं रिझे कोण । जवळी जातां चिळसवाण ॥ २ ॥ प्रेतदेहा गौर-विलें । तैसें विटंबवाणें झालें ॥ ३ ॥ तुका म्हणे खाणें विष्टा । तैसा देहबुद्धि चेष्टा ॥ ४ ॥

२७९४ घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिलाषी ॥ १ ॥ तोही येथें कासा नये । नरका जाय म्हणोनि ॥ २ ॥ विकी स्नान संध्या

जप । करी तप पुढिलांचे ॥ ३ ॥ तुका म्हणे दांभिक तो । नरका जातो स्वइच्छा ॥ ४ ॥

२७९५ लटिक्याचे आंवतणें जेविलिया साच । काय त्या विश्वास तोचि खरा ॥ १ ॥ कोल्हाटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥ २ ॥ जळमंडपयाचे घोडे राउत नाचती । ते काय तगती युद्धालागीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसें मतवादीयांचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांची ॥ ४ ॥

२७९६ भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥ वाढवुनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंवु वेषा सहजस्थिति ॥ २ ॥ कोरोनियां भूमी करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

२७९७ वाघाचा कालभूत दिसे वाघाऐसा । परि नाहीं दशा साच अंगीं ॥ १ ॥ वाहेरील रंग निधडी कसोटी । संघष्टणें भेटी आपेआप ॥ २ ॥ सिकविलें तैसें नाचावें माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे करी लटिक्याचा सांटा । फजित तो खोटा शीघ्र होय ॥ ४ ॥

२७९८ जातिचें तें चढे प्रेम । पक्षी स्मरे रामराम ॥ १ ॥ ते काय गुण लागती येरां । कागा पिंजरा शोभेना ॥ २ ॥ शिकाविलें तें सुजात सोसी । मग त्यासी मोल चढे ॥ ३ ॥ तुका म्हणे वेषधारी । हिजड्या नारी न होती त्या ॥ ४ ॥

२७९९ तांबियाचें नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं ॥ १ ॥ करणीचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ॥ २ ॥ हिरियासारिखा दिसे शिरगोळा । पारखी ते डोळां न पाहाती ॥ ३ ॥ देऊनियां भिंग कामाविलें मोतीं । पारखिया हातीं घेतां नये ॥ ४ ॥ तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥ ५ ॥

२८०० मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा । पाषाण पिळितां रस कैंचा ॥ १ ॥ वांझे बाळा जैसें दूध नाहीं स्तनीं । गारा त्या आधणीं न सीजती ॥ २ ॥ नवखंड पृथ्वी पिके मृगजळें । डोंगर भेटे बळें असमानासी ॥ ३ ॥ नश्वर देह तैसें तेव्हां होय ब्रह्म । तुका म्हणे श्रम करूनी काय ॥ ४ ॥

२८०१ दुधाचे घागरीं मद्याचा हा बुंद । पडिलिया शुद्ध नव्हे मग ॥ १ ॥ तैसें खळां मुखें न करावें श्रवण । अहंकारें मन विटाळलें ॥ २ ॥ काय करावीं तीं बत्तीस लक्षणें । नाक नाहीं तेणें वांयां गेलीं ॥ ३ ॥ तुका म्हणे अन्न जिरों नेदी मासी । आपुलिया जैशी संवसर्गें ॥ ४ ॥

२८०२ वरीवरी बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं झाली ॥ १ ॥ पराव्याचे भार पाहुनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरां ॥ २॥ मनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥ ३ ॥ धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥ ४ ॥ तुका म्हणे साधु बोले स्वर्गधर । खोंचतें अंतर दुर्जनाचें ॥ ५ ॥

२८०३ लटिकी ग्वाही सभे आंत । देतां पतित आगळा ॥ १ ॥ कुंभपाकीं वस्ती करूं । होय धुरू कुळेंसीं ॥ २ ॥ रजस्वला रुधिर स्रवे । तेंची ध्यावें तृषेसी ॥ ३ ॥ तुका म्हणे जन्मा आला । काळ झाला कुळासी ॥ ४ ॥

२८०४ चोरें चोरातें करावा उपदेश । आपुला अभ्यास असेल तो ॥ १ ॥ शिंदळीच्या अंगणीं वेचितां पाउलें । होईल आपुलें तिच्या ऐसें ॥ २ ॥ तुका म्हणे भितों पुढलिया दत्ता । म्हणउनि चिंता उपजली ॥ ३ ॥

२८०५ एकाचिये सोई कवित्वाचे बांधे । बांधिलिया साधे काय तेथें ॥ १ ॥ काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्याची दाटणी करूनी ठेवी ॥ २ ॥ कवित्वाचे रूढी पायां पाडी जग । सुखावोनि

मग नरका जाय ॥ ३ ॥ तुका म्हणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥ ४ ॥

२८०६ कानीं धरी बोल बहुतांचीं मतें । चाट त्यापरतें आणीक नाहीं ॥ १ ॥ पावेल गौरव बोहाळाचेपरी । दंड पाठीवरी यमदूतांचे ॥ २ ॥ शब्दज्ञानी एक आपुलाल्या मतें । सांगती वेदांत भिन्न भावें ॥ ३ ॥ तुका म्हणे एक भाव न धरिती । पडिली हे माती त्यांचे तोंडीं ॥ ४ ॥

२८०७ भजन या नासिलें हेंडीं । हेंभा लंडा आवडी ॥ १ ॥ जेवीत ना आइता पाक । नासीं ताक घुसळूनि ॥ २ ॥ एकाएकीं इच्छी पाट । नेणें चाट कां जेवूं ॥ ३॥ तुका म्हणे भुलाऱ्याचें । वचन साचें सेवटीं ॥ ४ ॥

२८०८ तरी कां वोळगणें । राजद्वारीं होती सुने ॥ १ ॥ अंगीं दावूनि निष्कामता । पोकळपोकळी ते वृथा ॥ २ ॥ कासया मोकळ । भोंवते शिष्यांचें गावाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे ढाळे । बाह्यरंग ते निराळे ॥ ४ ॥

२८०९ इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम म्हणोनि काई ॥ १ ॥ जेवी माशीसवें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ २ ॥ कीर्तन करावें । तैसें करूनी दावावें ॥ ३ ॥ हीं तों अंगीं नाहीं चिन्हें । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥ ४ ॥ तुका म्हणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ॥ ५ ॥

२८१० गुळें माखोनियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारीं ॥ १ ॥ अंतरीं विषयाचें लागलें पें पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥ २ ॥ घोरिया दांभिका कैंची हरिसेवा । नेणोचि सद्भावा कोणे काळीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥ ४ ॥

२८११ चिरगुटें घालुनी वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्यें ॥ १ ॥ लाटकोचि डोहळे दाखवी प्रकार । दूध स्तनीं पोर पोटीं

नाहीं ॥ २ ॥ तुका म्हणे अंतीं वांजाचे ते खरी । फजिती दुसरी जना-मध्यें ॥ ३ ॥

२८१२ वांझेनें दाविलें गऱ्हवारलक्षण । चिरगुटें घालून वाथ-याला ॥ १ ॥ तेवीं शब्दज्ञानी करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥ २ ॥ बोलाचिच कढी बोलाचाचि भात । जेवूनियां तृप्त कोण झाला ॥ ३ ॥ कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ४ ॥ तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ५ ॥

२८१३ व्याल्याविण करी शोभनतांतडी । चार ते गधडी करी-तसे ॥ १ ॥ कासया पाल्हाळ आणीकांचे देखी । सांगतां नव्हे सुखी साखरेसी ॥२॥ कुंथाच्या ढेकरें न देवेल पुष्टी । रूप दावी कष्टी मळिण वरी ॥ ३ ॥ तुका म्हणे अरे वाचाळ हो ऐका । अनुभवेंविण नका वाव घेऊं ॥ ४ ॥

२८१४ तरलों म्हणुनि धरिला ताठा । त्यासी चळ झाला फांटा ॥ १ ॥ वांयांविण तुटे दोंड । मान सुख इच्छा भांड ॥ २ ॥ ग्वाहीविण मात । स्थापी आपुली सतत ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसीं किती । नरका गेलीं अधोगती ॥ ४ ॥

२८१५ जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेण-वती ॥ १ ॥ मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवाविण कळूं नये ॥ २ ॥ तुका म्हणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥ ३ ॥

२८१६ जपाचें निमित्त झोपेचा पसरू । देहाचा विसरू पाडूनियां ॥ १ ॥ ऐसीं तीं भजनें अमंगळवाणी । सोंगसंपादणी बहुरूप्याची ॥ २ ॥ सेवेसी विकिलें लोभाचिये आसे । तया कोठें असे उरला देव ॥ ३ ॥ तुका म्हणे मानदंभ जया चित्तीं । तयाची फजीती करूं आम्ही ॥ ४ ॥

२८१७ भाव नाहीं काय मुद्रा वाणी । बैसे वगळा निश्चळ ध्यानीं ॥ १ ॥ न मनी नाम न मनी त्यासी । वाचाळ शब्द पिटी भासी ॥२॥ नाहीं चाड देवाची कांहीं । छळणें टोंके तस्कर घाई ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचा संग । नको शब्द स्पर्श अंग ॥ ४ ॥

२८१८ मोलें घातलें रडाया । नाहीं असूं आणि माया ॥ १ ॥ तैसा भक्तिवाद काय । रंग बेगडीचा न्याय ॥ २ ॥ वेठी धरिल्या दावी भाव । मागें पळायाचा पाव ॥ ३ ॥ काजव्याच्या ज्योती । तुका म्हणे न लगे वाती ॥ ४ ॥

२८१९ उभ्या बाजारांत कथा । हें तों नावडे पंढरिनाथा ॥ १ ॥ अवघें पोटासाठीं ढोंग । तेथें कैंचा पांडुरंग ॥ २ ॥ लावी अनुसंधान । कांहीं देईल म्हणऊन ॥ ३ ॥ काय केलें रांडलेंका । तुला राजी नाहीं तुका ॥ ४ ॥

२८२० वरी वरी बोला रस । कथी ज्ञान माजी फोस ॥ १ ॥ ऐसे लटिके जे ठक । तयां इह ना परलोक ॥ २ ॥ परिस एक सांगें । अंग धुळी हे न लगे ॥ ३ ॥ तुका म्हणे हाडें । कुतऱ्या लाविलें झगडें ॥ ४ ॥

२८२१ गांठोळीस धन भाकावी करुणा । दावूनि सज्जना कींव पीडी ॥ १ ॥ नाठेळाची भक्ति कुचराचें बळ । कोरडें वोंगळ मार खाय ॥ २ ॥ सांडोव्यासी घाली देवाची करंडी । विल्हाळ त्या धोंडी पूजा दावी ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे माकडाचे छंद । अवघे धंदधंद सिंदळीचे ॥ ४ ॥

२८२२ मोल देऊनियां सांटवावे दोष । नटाचे ते वेष पाहोनियां ॥ १ ॥ हरिदासां मुखें हरिकथा कीर्तन । तेथें पुण्यापुण्य विशेषता ॥ २॥ हरितील वस्त्रें गोपिकांच्या वेशें । पाप त्या सरिसें मात्रागमन ॥ ३ ॥ तुका म्हणे पाहा ऐसें जालें जन । सेवाभक्तिहीन रसीं गोडी ॥ ४ ॥

२८२३ उष्टया पत्रावळी करूनियां गोळा । दाखविती कळा कवि-

त्वाची ॥ १ ॥ ऐसे जे पातकी ते नरकीं पचती । जोंवरी भ्रमती चंद्र सूर्य ॥ २ ॥ तुका म्हणे एका नारायणा ध्याई । वरकडा वाहीं शोक वसे ॥ ३ ॥

२८२४ पुण्यविकरा तें मातेचें गमन । भाडी ऐसें धन विटाळ तो ॥ १ ॥ आत्महत्यारा हा विषयांचा लोभी । म्हणावें तें नाभी करवी दंड ॥ २ ॥ नागवला अल्प लोभाचेये साठीं । घेऊनि कांचवटी परिस दिला ॥ ३ ॥ तुका म्हणे हात झाडिले परत्रीं । श्रम तोचि श्रोत्रीं ठेवा केली ॥ ४ ॥

२८२५ पशु ऐसे होती ज्ञानी । चर्वणीं या विषयांचे ॥ १ ॥ ठेवूनियां लोभीं लोभ । झाला क्षोभ आत्मत्वीं ॥ २ ॥ केला आणिकां वाढी पाक । खाणें ताक मूर्खासी ॥ ३ ॥ तुका म्हणे मोठा घात । वाताहात हा देह ॥ ४ ॥

२८२६ आशाबद्ध वक्ता । भय श्रोतयाच्या चित्ता ॥ १ ॥ गातो लेंही नाहीं ठावें । तोंड वासीं कांहीं द्यावें ॥ २ ॥ झालें लोभाचें मांजर । भीक मागे दारोदार ॥ ३ ॥ उभयतां लोभी मन । वांयां गेलें तें भजन ॥ ४ ॥ बहिरे मुके एके ठायीं । तैसें झालें तया दोहीं ॥ ५ ॥ माप आणि गोणी । तुका म्हणे रितीं दोन्ही ॥ ६ ॥

२८२७ नायकावे कानीं तयाचे ते बोल । भक्तीविण फोल ज्ञान सांगे ॥ १ ॥ वाखाणी अद्वैत भक्तिभावेंविण । दुःख पावे सीण श्रोता वक्ता ॥ २ ॥ अहंब्रह्म म्हणोनि पाळीतसे पिंडा । नये बोलों भांडा तयासवें ॥ ३ ॥ वेदबाह्य लंड बोले जो पाषांड । त्याचें काळें तोंड संतांमध्यें ॥ ४ ॥ तुका म्हणे खंडी देवभक्तपणा । वरिष्ठ त्याहूनि श्वपच तो ॥ ५ ॥

२८२८ पंडित म्हणतां थोर सुख । परि तो पाहतां अवघा मूर्ख ॥ १ ॥ काय करावें घोकिलें । वेद पठण वांयां गेलें ॥ २ ॥ वेदीं

सांगितलें तें न करी । सम ब्रह्म नेणे दुराचारी ॥ ३ ॥ तुका देखे जीवीं शिव । हाचि तेथींचा अनुभव ॥ ४ ॥

२८२९ वसोनि थिल्लरीं । बेडूक सागरा धिक्कारी ॥ १ ॥ नाहीं देखिला ना ठावा । तोंडपिटी करी हांवा ॥ २ ॥ फुगतें काउळें । म्हणे मी राजहंसा आगळें ॥ ३ ॥ गजाहूनि खर । म्हणे चांगला मी फार ॥ ४ ॥ मुलाम्याचें नाणें । तुका म्हणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

२८३० कोरड्या गोष्टी चरचरा बोल । शिकल्या सांगे नाहीं ओल ॥ १ ॥ कोण यांचें मना आणी । ऐकों कानीं नाइकोनि ॥ २ ॥ घरोघरीं सांगती ज्ञान । भूस सिणें कांडितां ॥ ३ ॥ तुका म्हणे आपुल्या मति । काय रितीं पोकळ ॥ ४ ॥

२८३१ निंदा स्तुति करवी पोट । सोंग दाखवी बोभाट ॥ १ ॥ जटा राख विटंबना । धीर नाहीं क्षमा मना ॥ २ ॥ शृंगारिलें मढें । जीवविण जैसें कुडें ॥ ३ ॥ तुका म्हणे रागें । भलतें चावळे वाउगें ॥ ४ ॥

२८३२ भक्त म्हणऊनि वंचावें तें जीवें । तेणें शेण खावें कासा-साठीं ॥ १ ॥ नासिले अडबंद कौपीन ते माळा । अडचण राउळा-माजीं केली ॥ २ ॥ अंगीकारिले सेवे घडे अंतराय । तया झाला न्याय खापराचा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोठें तगों येती घाणी । अहाच ही मनीं अधीरता ॥ ४ ॥

२८३३ कथे उभा अंग राखेल जो कोणी । ऐसा कोण गणी तया पापा ॥ १ ॥ येथें तो पातकी न येतांच भला । रणीं कुंजराला काय चाले ॥ २ ॥ कथे बैसोनी आणीक चर्चा । धिग त्याची वाचा कुंभ-पाक ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐलपैल ते थडीचे । बुडतील साचे मध्य-भागीं ॥ ४ ॥

२८३४ नावडे ज्यां कथा उठोनियां जाती । ते यमा फावती बरे बोजा ॥ १ ॥ तो असे जवळी गोचिडाच्या न्यायें । देशत्यागें ठाय

तया दूरी ॥ २ ॥ नव्हे मला कोणी नावडे दुसरा । पाहुणा किंकरा यमा होय ॥ ३ ॥ तुका म्हणे तया करावें तें काई । पाषाण कां नाहीं जळामध्यें ॥ ४ ॥

२८३५ जवळी नाहीं चित्त । काय मांडियेलें प्रेत ॥ १ ॥ कैसा पाहे कर्मदृष्टी । दीप स्नेहाच्या शेवटीं ॥ २ ॥ कांतेलेसें ध्यान । तैसें दिशा हिंडे मन ॥ ३ ॥ त्याचे कानीं हाणे । कोण वोंव तुका म्हणे ॥ ४ ॥

२८३६ काय देवापाशीं उणें । हिंडे दारोदारीं सुनें ॥ १ ॥ करी अक्षरांची आटी । एके कवडीच साठीं ॥ २ ॥ निंदी कोणा स्तवी । चिंतातुर सदा जीवीं ॥ ३ ॥ तुका म्हणे भांड । जळो जळो त्याचें तोंड ॥ ४ ॥

२८३७ ब्राह्मण तो नव्हे ऐसी ज्याची बुद्धि । पाहा श्रुतीमधीं विचारूनि ॥ १ ॥ जयासी नावडे हरिनामकीर्तन । आणीक नर्तन वैष्णवांचें ॥ २ ॥ सत्य त्याचे वेळे घडला व्यभिचार । मातेसी वेव्हार अंत्यजाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें मानी आनासारिखें । तात्काळ तो मुखें कुष्ठ होय ॥ ४ ॥

२८३८ आमचे गोसावी अयाचितवृत्ति । करवी शिष्याहातीं उपदेश ॥ १ ॥ दगडाची नाव आधींच ते जड । ते काय दगड तारूं जाणे ॥ २ ॥ तुका म्हणे वेष विटंबिला त्यांनीं । सोंगसंपादणी करिती वरी ॥ ३ ॥

२८३९ भजन घाली भोगावरी । अकर्तव्य मनीं धरीं ॥ १ ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळून वर्ते मन ॥ २ ॥ नाहीं वैराग्याचा लेश । अर्थ चाड जीवें आस ॥ ३ ॥ हें ना तैसें जालें । तुका म्हणे वायां गेलें ॥ ४ ॥

२८४० घरोघरीं जाले कवी । नेणे प्रसादाची चवी ॥ १ ॥ लंडा भूषणांची चाड । पुढें न विचारी नाड ॥ २ ॥ काढावें आइतें ।

तोंचि जोडावें स्वहितें ॥ ३ ॥ तुका म्हणे कळे । आहाच झांकतील डोळे ॥ ४ ॥

२८४१ कवीश्वरांचा तो आम्हासी विटाळ । प्रसाद वोंगळ चिवडिती ॥ १ ॥ दंभाचे आवडी बहिराट अंधळे । शेवटासि काळें होईल तोंड ॥ २ ॥ सोन्या शेजारीं तों लाखेची जतन । संतत ते गुण जैसे तैसे ॥ ३ ॥ सेव्यसेवकता न पडतां ठावी । तुका म्हणे गोवी पावती हीं ॥ ४ ॥

२८४२ जळो प्रेमा तैसा रंग । जाय मुलोनि पतंग ॥ १ ॥ सासु-साठीं रडे सून । भाव अंतरींचा भिन्न ॥ २ ॥ मैंद मुखींचा कोंवळा । भाव अंतरीं निराळा ॥ ३ ॥ जैसी वृंदावन कांती । उत्तम धरूं नये हातीं ॥ ४ ॥ बक ध्यान धरी । दावी सोंग मत्स्य मारी ॥ ५ ॥ तुका म्हणे सर्प डोले । तैसा कथेमाजीं खुले ॥ ६ ॥

२८४३ संध्या करितोसि केशवाच्या नांवें । आरंभीं तें ठावें नाहीं कैसें ॥ १ ॥ किती या सांगावें करूनि फजित । खळ नेणे हित जवळी तें ॥ २ ॥ माजल्या नकळे उचित तें काय । न घ्यावें तें खाय घ्यावें सांडी ॥ ३ ॥ तुका म्हणे घेती भिंतीसवें डोकें । वावसी तीं एकें अंधारलीं ॥ ४ ॥

२८४४ अडचणींचें दार । बाहेर माजी पैस फार ॥ १ ॥ काय करावें तें मौन्य । दाही दिशा हिंडे मन ॥ २ ॥ बाहेर दावी वेश । माजी वासनेचे लेश ॥ ३ ॥ नाहीं इंद्रियां दमन । काय मांडिला दुकान ॥ ४ ॥ सारविलें निकें । वरी माजीं अवघें फिकें ॥ ५ ॥ तुका म्हणे अंतीं । कांहीं न लगेचि हातीं ॥ ६ ॥

२८४५ काय सर्प खातो अन्न । काय ध्यान बगाचें ॥ १ ॥ अंत-रींची बुद्धि खोटी । भरलें पोटीं वाईट ॥ २ ॥ काय उंदीर नाहीं धांवी । राख लावी गाढव ॥ ३ ॥ तुका म्हणे सुसर जळीं । काउळीं कां न न्हाती ॥ ४ ॥

२८४६ काय धोविलें कातडें । काळकूट भीतरिं कुडें ॥ १ ॥ उगा राहें लोकभांडा । चाळविल्या पोरें रांडा ॥ २ ॥ घेसी कुंथी पानवथां । उगाच हालविसी माथा ॥ ३ ॥ लावूनि वैसे टाळी । मन इंद्रियें मोकळीं ॥ ४ ॥ हालवीत वैसे माळा । विषयजप वेळोवेळां ॥ ५ ॥ तुका म्हणे हा व्यापार । नाम विठोबाचें सार ॥ ६ ॥

२८४७ काय काशी करिती गंगा । भीतरि चांगा नाहीं तो ॥ १ ॥ अघ्रणीं कुचर बाहेर तैसा । नये रसा पाकासी ॥ २ ॥ काय टिळे करिती माळा । भाव खळा नाहीं त्या ॥ ३ ॥ तुका म्हणे प्रेमेंविण । बोले भुंके अवघा शीण ॥ ४ ॥

२८४८ काय नाहीं लवत झाडें । विसरे वेडें देहभाव ॥ १ ॥ जया न फळे उपदेश । घस ऐसे त्या नांवें ॥ २ ॥ काय नाहीं असत जड । दगड तो अबोलणा ॥ ३ ॥ तुका म्हणे कुचर दाणा । तैसा म्हणा डेंगे हा ॥ ४ ॥

२८४९ नाहीं निर्मळ जीवन । काय करील साबण ॥ १ ॥ तैसी चित्तशुद्धि नाहीं । तेथें बोध करील काई ॥ २ ॥ वृक्ष न धरी पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥ ३ ॥ वांजे न होती लेंकुरें । काय कीजे त्या भ्रतारें ॥ ४ ॥ नपुंसका पुरुषासी । काय करील बाइल त्यासी ॥ ५ ॥ प्राण गेलिया शरीर । काय करील वेव्हार ॥ ६ ॥ तुका म्हणे जीवनेंविण । पीक नव्हे नव्हे जाण ॥ ७ ॥

२८५० काय दरा करील वन । समाधान नाहीं जंव ॥ १ ॥ तरी काय तेथें असतीं थोडीं । काय जोडी तयांसी ॥ २ ॥ रिघतां धांवा पेंवामध्यें । जोडे सिद्धि ते ठायीं ॥ ३ ॥ काय भस्म करील राख । अंतर पाक नाहीं तों ॥ ४ ॥ वर्णाआश्रमाचे धर्म । जाती श्रम जालिया ॥ ५ ॥ तुका म्हणे सांग पारा । निरसे आस तें हित ॥ ६ ॥

२८५१ मोरख्यानें सोंग पालटिलें वरी । बक ध्यान करी मत्स्या जैसें ॥ १ ॥ टिळे माळा मेंद मुद्रा लावी अंगीं । देखों नेदी जगीं

फांसे जैसे ॥ २ ॥ ढीवर या मत्स्या चारा घाली जैसा । भीतरील फांसा कळों नेदी ॥ ३ ॥ खाटिक हा स्नेहवादें पशु पाळी । कापावया नळी तयासाठीं ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसा मला मी लोकांत । परी तूं कृपावंत पांडुरंगा ॥ ५ ॥

२८५२ माझे पुन्या मुखें सांगों जाणे मात । तोंडीं लाळ हात चोळी रितें ॥ १ ॥ ऐसियाच्या गोष्टी फिक्या मिठेंविण । रुचि नेदी अन्न चवी नाहीं ॥ २ ॥ बोलों जाणे अंगीं नाहीं शूरपण । काय तें वचन जाळावें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे बहु तोंडें जे वाचाळ । तगे तेंचि मूळ लटिक्याचें ॥ ४ ॥

२८५३ आवडीच्या मतें करितो भजन । भोग नारायणें म्हणती केला ॥ १ ॥ अवघा देव म्हणे वेगळें तें काय । अर्थासाठीं डोय फोडूं पाहे ॥ २ ॥ लाजे कमंडलू धरितां भोपळा । आणीक थीगळा प्रावरण ॥ ३ ॥ शाला गडवे धातु द्रव्य इच्छा चित्तीं । नैश्वर बोलती अवघें मुखें ॥ ४ ॥ तुका म्हणे तयां देवा नाहीं भेटी । ऐसे कल्पकोटि जन्म घेतां ॥ ५ ॥

२८५४ भिक्षा पात्र अवलंबणें । जळो जिणें लाजिरवाणें । ऐसियासी नारायणें । उपेक्षीजे सर्वथा ॥ १ ॥ देवापायीं नाहीं भाव । भक्ति वरीवरी वाव । समर्पिला नाहीं जीव । जाणावा हा व्यभिचार ॥ २ ॥ जगा घालावें सांकडें । दीन होऊनि बापुडें । हेंचि अभाग्य रोकडें । मूळ आणि अविश्वास ॥ ३ ॥ काय न करी विश्वंभर । सत्य करितां निर्धार । तुका म्हणे सार । दृढ पाय धरावे ॥ ४ ॥

२८५५ वृत्ति भूमि राज्य द्रव्य उपार्जिती । जाणा त्या निश्चितीं देव नाहीं ॥ १ ॥ भाडेकरी वाहे पाठीवरी भार । अंतरींचे सार लाभ नाहीं ॥ २ ॥ देवपूजेवरी ठेवूनियां मन । पाषाणा पाषाण पूजी लोभें ॥ ३ ॥ तुका म्हणे फळ चिंतिती आदरें । लाघव हें चार शिंदळीचे ॥ ३ ॥

२८५६ तीळ जाळिले तांदुळ । काम क्रोध तैसेचि खळ ॥ १ ॥ कां रे सिणलासी वाउगा । न भजतां पांडुरंगा ॥ २ ॥ मानदंभासाठीं । केली अक्षरांची आटी ॥ ३ ॥ तप करूनि तीर्थाटन । वाढविला अभिमान ॥ ४ ॥ वांटिलें तें धन । केली अहंता जतन ॥ ५ ॥ तुका म्हणे चुकलें वर्म । केला अवघाचि अधर्म ॥ ६ ॥

२८५७ नेत्र झांकोनिया काय जपतोसी । जंव नाहीं मानसीं भाव प्रेम ॥ १ ॥ उघडा मंत्र जाणा रामकृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥ २ ॥ मंत्र तंत्र कांहीं करिसी जडी बुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ॥ ३ ॥ सार तुका जपे बीज मंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण ॥ ४ ॥

२८५८ वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥ १ ॥ राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥ २ ॥ आशा धरोनि मनीं । कांहीं देईल म्हणऊनि ॥ ३ ॥ पोटा एकासाठीं । तुका म्हणे झाले कष्टी ॥ ४ ॥

२८५९ कुशळ गुंतले निषेधा । वादी प्रवर्तले वादा ॥ १ ॥ कैसीं ठकलीं बापुडीं । दंभविषयांचे सांकडी ॥ २ ॥ भुस उपणुनि केलें काय । हारपले दोन्ही ठाय ॥ ३ ॥ तुका म्हणे लागे हाता । काय माथिलें घुसळितां ॥ ४ ॥

२८६० काळतोंडा सुना । भलतें चोरूनि करी जना ॥ १ ॥ धिग त्याचें साधुपण । विटाळुनि वर्ते मन ॥ २ ॥ मंत्र ऐसे घोकी । वश व्हावें जेणें लोकीं ॥ ३ ॥ तुका म्हणे थीत । नागवला नव्हे हित ॥ ४ ॥

२८६१ विचार नाहीं नर खर तो तैसा । वाहे ज्ञान पाठीं भार लगड तैसा ॥ १ ॥ वादावाद करणें त्यासी तोंच वरी । गुखाडीची चाड सरे तोंच बाहेरी ॥ २ ॥ सौभाग्यसंपन्न हो कां वृद्ध प्रतिष्ठा । चिकरूनि सांडी पायां लागली ते विष्ठा ॥ ३ ॥ नाहीं याति कुळ

फांसे ओढी तयासी । तुका म्हणे काय मुद्रा सोंग जाळिसी ॥ ४ ॥

२८६२ एक म्हणती आम्ही देवचि पैं झालों । ऐसें नका बोलों पडाल पतनीं ॥ १ ॥ एक म्हणती आम्हीं देवाचीं पैं रूपें । तरी तुमचिया बापें न चुके जन्म ॥ २ ॥ देवें उचलिली स्वकरें मेदिनी । तुमचेनि गोणी नुचलवे ॥ ३ ॥ देवें मारियेले दैत्यदानव मोठे । तुमचेनी न तुटे तृणमात्र ॥ ४ ॥ राया विठोबाचें पद जो अभिलाषी । पातकांची राशी तुका म्हणे ॥ ५ ॥

२८६३ संत मागे पाणी नेदी एक चूळी । दासीस आंघोळी ठेवी पाणी ॥ १ ॥ संतांसी देखोनी होय पाठमोरा । दासीचिया पोरा चुंबन देतो ॥ २ ॥ संतांसी देखोनी करितो ढवाळ्या । भावें धुतो चोळ्या दासीचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

२८६४ गासी तरि एक विठ्ठलचि गाईं । नाहीं तरि ठायीं राहें उगा ॥ १ ॥ अद्वैतीं तों नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा सीण करिसी वांयां ॥ २ ॥ तुका म्हणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजिरा ॥ ३ ॥

२८६५ मुकें होतां काय पदरींचें जातें । मूर्ख तें भोगितें मीमीपण ॥ १ ॥ आपुलिये घरीं मैंद होउनि वसे । कवणासी ऐसें बोलों नको ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्हां सांगतो मी खूण । देवासी तें ध्यान लावुनी वसा ॥ ३ ॥

२८६६ देव तीर्थं येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥ तया वरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥ २ ॥ शुद्धाशुद्ध ठाव पापपुण्यबीज । पाववील दुजे फळभोग ॥ ३ ॥ तुका म्हणे विश्वंभरा ऐसें वर्म । चुकलिया धर्म अवघे मिथ्या ॥ ४ ॥

२८६७ आधारावांचुनी । काय सांगसी कहाणी ॥ १ ॥ ठावा

नाहीं पंढरीराव । तोंवरी अवघेंचि वाव ॥ २ ॥ मानिताहे कोण । तुझें कोरडें ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ तुका म्हणे ठेवा । जाणपण एकसवा ॥ ४ ॥

२८६८ काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचताती पुढें संसाराच्या ॥ १ ॥ झाडा देतेवेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंड वरी ॥ २ ॥ हात दांत कान हालविती मान । दाखविती जन हे मानावया ॥ ३ ॥ तुका म्हणे किती झालीं हीं फजित । मागें नाहीं मीत भारवाही ॥ ४ ॥

२८६९ सोंगें छंदें कांहीं । देव जोडे ऐसें नाहीं ॥ १ ॥ सारा अवघें गाबाळ । डोळ्या आडील पडळ ॥ २ ॥ शुद्ध भावाविण । जो जो केला तो तो सीण ॥ ३ ॥ तुका म्हणे कळे । परी होताती अंधळे ॥ ४ ॥

२८७० असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ अंतरींचा रंग उमटे बाहेरी । वोळखी यापरी आपेंआप ॥ २ ॥ संत ते समय वोळखती वेळ । संतुष्ट निर्मळ चित्त सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे हित उचित अनुचित । मज लागे नित आचरावें ॥ ४ ॥

२८७१ अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हे हें करणें स्वहिताचें ॥ १ ॥ तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । हित तेंचि वेगें करूनि घेई ॥ २ ॥ बहुरूपी रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥ ३ ॥ पाषाणाचें नांव ठेवियेलें देव । आणिका तारी भाव परि तो तैसा ॥ ४ ॥ कनक झाड म्हूण वंदियेलें माथां । परि तेंही अर्थां न मिळे माजी ॥ ५ ॥ तुका म्हणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावीं नास तोचि पावे ॥ ६ ॥

२८७२ नये नेत्रीं जळ । नाहीं अंतरीं कळवळ ॥ १ ॥ तों हे चावटीचे बोल । जग रंजवणें फोल ॥ २ ॥ न फळे उत्तर । नाहीं स्वामी जो सादर ॥ ३ ॥ तुका म्हणे भेटी । जंव नाहीं दृष्टादृष्टी ॥ ४ ॥

२८७३ आवडे सकळां मिष्टान्न । रोग्या विष तें समान ॥ १ ॥ दर्पण नावडे तया एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ २ ॥ तुका म्हणे तैशा खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ ३ ॥

२८७४ तोचि लटिकयांमाजी भला । म्हणे देव म्यां देखिला ॥ १ ॥ ऐशियाच्या उपदेशें । भवबंधन कैसें नासे ॥ २ ॥ बुडवी आपणासरिसे । अभिमानें आणिकांस ॥ ३ ॥ आणिक नाहीं जोडा । देव म्हणवितां या मूढा ॥ ४ ॥ आणिकांचें न मनी साचें । तुका म्हणे या श्रेष्ठांचें ॥ ५ ॥

२८७५ कलिधर्म मागें सांगितले संतीं । आचार सांडिती द्विज लोक ॥ १ ॥ तेचि कळों आतां येतसे प्रचीती । अधर्मी टेंकती धर्म नव्हे ॥ २ ॥ तप व्रत करितां लागती सायास । पाळितां पिंडास गोड वाटे ॥ ३ ॥ देव म्हणऊनि न येती देउळा । संसार वेगळा तरी कां नव्हे ॥ ४ ॥ तुका म्हणे मज धरितां गुमान । ऐसे कोणी जन नरका जाती ॥ ५ ॥

२८७६ मागें संतीं होतें जें जें सांगितलें । तें येऊं लागलें अनुभवा ॥ १ ॥ आचारभ्रष्ट होती लोक कळीं । पुण्य क्षीण बळी झालें पाप ॥ २ ॥ वर्ण धर्म कोणी न धरी विटाळ । घालिती गोंधळ एके ठायीं ॥ ३ ॥ वेदाचे पाठक सेवितील मद्य । न देखती भेद विषयीं भांड ॥ ४ ॥ तुका म्हणे किती करावे फजीत । तेचि छंद नित्य बहु होती ॥ ५ ॥

२८७७ उपदेश भलत्या हातीं । जाला चित्तीं धरावा ॥ १ ॥ नये जाऊं पात्रावरी । कवटीं सार नारळें ॥ २ ॥ स्त्री पुत्र वंदीजन । नारायण स्मरवितो ॥ ३ ॥ तुका म्हणे आधार । परि उपकार चिंधीचे ॥ ४ ॥

२८७८ उपकारासाठीं बोलों हे उपाय । येणेंविण काय चाड आम्हां ॥ १ ॥ बुडतां हे जन न देखवे डोळां । हिताचा कळवळा येतो म्हणउनि ॥ २ ॥ तुका म्हणे माझे देखतील डोळे । भोग देतेवेळे येईल कळों ॥ ३ ॥

२८७९ बोलिलों तें कांहीं तुमचिया हिता । वचन नेणतां क्षमा कीजे ॥ १ ॥ वाट दावी तया नलगे रुसावें । अतित्याई जीवें नाश पावे ॥ २ ॥ निंब दिला रोग तुटाया अंतरीं । पोभाळितां वरी आंत चरे ॥ ३ ॥ तुका म्हणे हित देखण्यासी कळे । पडती आंधळे कूपामाजीं ॥ ४ ॥

२८८० आतां माझे नका वाणूं गुणदोष । करितो उपदेश याचा कांहीं ॥ १ ॥ मानदंभासाठीं छळितसें कोणा । आण या चरणा विठोबाची ॥ २ ॥ तुका म्हणे हें तो ठावें पांडुरंगा । काय कळे जगा अंतरींचें ॥ ३ ॥

२८८१ सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा । कांडिती ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥ गाईसी देखोनि वदवदा मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ २॥ पान फुल नेतो वेश्येसी उदंड । ब्राह्मणासी खांड देऊं नेदी ॥ ३ ॥ पर्वकाळीं धर्म न करी नासरी । वेंचीं राजद्वारीं उदंडचि ॥ ४ ॥ कीर्तना जावया होतसे हिंपुष्टी । खेळतो सोकटी रात्रंदिवस ॥ ५ ॥ बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितयांसी दवडी तो ॥ ६ ॥ तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ७ ॥

२८८२ देवाचिया वस्त्रा स्वप्नींही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥ १ ॥ गाईचें पाळण नयेचि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ॥ २ ॥ लेकराची गांड स्वयें धावे क्षाळूं । न म्हणे प्रक्षाळूं द्विज पायां ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याच्या तोंडावरी थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

२८८३ पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयालागीं आवडे गाणें त्याला ॥ १ ॥ ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटीतसे ॥ २ ॥ वीतभरि लंगोटी नेदी अतिताला । भोरप्यासी शाला वांटीतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

२८८४ देवाचें चरित्र नाठवे सर्वथा । विनोदार्थ कथा गोड वाटे ॥ १ ॥ हातावरि हात हांसोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥ २ ॥ तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ३ ॥

२८८५ साधुच्या दर्शना लाजसी गव्हारा । वेश्योचिया घरा पुष्पें नेसी ॥ १ ॥ वेश्या दासी मुरळी जगाची त्रोंवळी । ते तुज सोवळी वाटे कैसी ॥ २ ॥ तुका म्हणे आतां लाज धरीं बुच्या । टाचरांच्या कुच्या मारा वेगीं ॥ ३ ॥

२८८६ उरा लावी उर आळंगितां कांता । संतांसी भेटतां अंग चोरी ॥ १ ॥ अतीत देखोनी होय पाठमोरा । व्याह्यासी सामोरा जाय वेगीं ॥ २ ॥ द्विजा नमस्कारा मनीं भाव कैंचा । तुर्कांचे दासीचा लेंक होय ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणी ॥ ४ ॥

२८८७ दगडाच्या देवा बगाड नवस । बाइल कथेस जाऊं नेदी ॥ १ ॥ वेंची धनरासी बांधिलें स्मशान । द्वारीं वृंदावन द्वाड मानी ॥ २ ॥ चोरें नागविला न करी त्याची खंती । परी द्विजाहातीं नेदी रुका ॥ ३ ॥ करी पाहुणेर व्याह्याजांवयांसी । आल्या अतीतासी पाठमोरा ॥ ४ ॥ तुका म्हणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाही सीण वर्म नेणे ॥ ५ ॥

२८८८ राउळासी जातां त्रास मानी मोठा । बैसतो चोहोंटां आदरेंशीं ॥ १ ॥ न करी स्नान संध्या न म्हणे रामराम । गुरगुडीचें प्रेम अहर्निशीं ॥ २ ॥ देवब्राह्मणांशीं जाईना शरण । दासीचे चरण वंदी भावें ॥ ३ ॥ सुगंध चंदन सांडोनियां माशी । बसे दुर्गंधीशीं अति आदरें ॥ ४ ॥ तुका म्हणे अरे ऐक भाग्यहीना । कां रे रामराणा विसरसी ॥ ५ ॥

२८८९ द्रव्य असतां धर्म करी । नागविला राजद्वारीं ॥ १ ॥ माय

त्यासी व्याली जेव्हां । रांड सटवी नव्हती तेव्हां ॥ २ ॥ कथाकाळीं निद्रा लागे । कामीं श्वानापरी जागे ॥ ३ ॥ भोग स्त्रियेसी देतां लाजे । वस्त्र दासीचें घेऊनि निजे ॥ ४ ॥ तुका म्हणे जाण । नर गाढवाहूनी हीन ॥ ५ ॥

२८९० संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥ १ ॥ वीट ये कर्णासी संतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥ २ ॥ कथेमाजीं नीज वाढे नित्यक्षणीं । स्त्रियेचे कीर्तनीं प्रेमें जागे ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्हीं क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणी ॥ ४ ॥

२८९१ बाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गोवी अनिवार ॥ १ ॥ घडो नेदी तीर्थयात्रा । केला कुतरा हातसोंका ॥ २ ॥ आपुलीच करवी सेवा । पुजवी देवासारिखें ॥ ३ ॥ तुका म्हणे गाढव पशु । केला नाशु आयुष्या ॥ ४ ॥

२८९२ बाइले अधीन होय ज्याचें जिणें । त्याच्या अवलोकनें पाडिजे द्वाड ॥ १ ॥ कासया ते जंत जिताती संसारीं । माकडाच्या परी गारोड्यांच्या ॥ २ ॥ बाइलेच्या मना येईल तें खरें । अभागी तें पुरें बाइलेचें ॥ ३ ॥ तुका म्हणे मेग्या गाढवाचें जिणें । कुतऱ्याचें खाणें लगबगा ॥ ४ ॥

२८९३ धिग जिणें तो बाइलेआधीन । परलोक मान नाहीं दोन्ही ॥ १ ॥ धिग जिणें ज्याचें लोभावरी मन । अतीत पूजन घडेचिना ॥ २ ॥ धिग जिणें आळस निद्रा जया फार । आमित आहार अघोरिया ॥ ३ ॥ धिग जिणें नाहीं विवेकवैराग्य । झुरे मानालागीं साधुपणा ॥ ४ ॥ तुका म्हणे धिग ऐसे झाले लोक । निंदक वादक नरका जाती ॥ ५ ॥

२८९४ सुखें बोळंब दावी गोहा । माझें दुःख नेणा पाहा ॥ १ ॥

आवडीचा मारिला वेडा । होय होय कैसा म्हणे भिडा ॥ २ ॥ निपट मज न चले अन्न । पायली गहूं सांजा तीन ॥ ३ ॥ गेले वारीं आणिली साकर । सात दिवसां दाहा शेर ॥ ४ ॥ अखंड मज पोटाची व्यथा । दूध भाकर साकर पथ्या ॥ ५ ॥ दो पाहरा मज लहरी येती । शुद्ध नाहीं पडे सुपती ॥ ६ ॥ नीज नये घालीं फुलें । जवळी न साहती मुलें ॥ ७ ॥ अंगीं चंदन लावितें भाळीं । सदा शूळ माझे कपाळीं ॥ ८ ॥ हाड गळोनि आलें मांस । माझें दुःख तुम्हां नेणवे कैसें ॥ ९ ॥ तुका म्हणे जिता गाढव केला । मेलियावरी नरका गेला ॥ १० ॥

२८९५ भ्रताराशी भार्या बोले गुज गोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥ १ ॥ अखंड तुमचें धंद्यावरी मन । माझें तों हेळण करिती सर्व ॥ २ ॥ जोडितसां तुम्ही खाती येर चोरें । माझीं तंव पोरें हळहळती ॥ ३ ॥ तुमची व्याली माझे डाईं हो पेटली । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ४ ॥ दुष्टबुद्धि नंदुली सदा द्वेष करी । नांदों मी संसारीं कोण्यासुखें ॥ ५ ॥ जावा दीर कांहीं धड्हो न बोले । नांदों कोणा खालें कैसी आतां ॥ ६ ॥ माझ्या अंगसंगें तुम्हांसी विश्रांती । मग धड गति नाहीं तुमची ॥ ७ ॥ ठाकतें ठमकतें जीव मुठी धरूनी । परि तुम्ही अजुनि न धरा लाज ॥ ८ ॥ वेगळे निघतां संसार करीन । नाहीं तरी प्राण देतें आतां ॥ ९ ॥ तुका म्हणे जाला कामाचा अंकित । सांगे मनोगत तैसा वर्ते ॥ १० ॥

२८९६ कामाचा अंकीत कांतेतें प्रार्थित । तूं कां हो दुश्चित निरंतर ॥ १ ॥ माझीं मायबापें बंधु हो बहिण । तुज करीं सीण त्यागीन मी ॥ २ ॥ त्यांचें जरी तोंड पाहेन मागुता । तरी मज हत्त्या घडो तुझी ॥ ३ ॥ सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहतों तुझीं आण निश्चयेंसी ॥ ४ ॥ वेगळें निघतां घडीन दोरे चुडा । तूं तंव माझा जोडा जन्माचा कीं ॥ ५ ॥ ताईत सांकळी गळांची दुळडी । बाजुबंद जोडी

हातसर ॥ ६ ॥ वेणीचे जे नग सर्वही करीन । नको धरूं सोण मनीं कांहीं ॥ ७ ॥ नेसावया साडी सेलारी चुनडी । अंगींची कांचोळी जाळीया फुलें ॥ ८ ॥ तुका म्हणे केला रांडेनें गाढव । मनासवें धांव घेतलीसे ॥ ९ ॥

२८९७ एका पुरुषा दोघी नारी । पाप वसे त्याचे घरीं ॥ १ ॥ पाप न लगे धुंडावें । लागल तेणें तेथें जावें ॥ २ ॥ कांहीं दुसरा विचार । न लगे करावाचा फार ॥ ३ ॥ असत्य जे वाणी । तेथें पापाचीच खाणी ॥ ४ ॥ सत्य बोलें मुखें । तेथें उच्चंबळती सुखें ॥ ५ ॥ तुका म्हणे दोन्हीं । जवळीच लाभ हानी ॥ ६ ॥

२८९८ बाइल सवासिण आई । आपण पितरांचे ठायीं ॥ १ ॥ थोर वेच झाला नष्टा । अवघ्या अपसव्य चेष्टा ॥ २ ॥ विषयांचे चरवणीं । केली आयुष्याची गाळणी ॥ ३ ॥ तुका म्हणे लंडा । नाहीं दया देव धोंडा ॥ ४ ॥

२८९९ दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्कद्वारीं ॥ १ ॥ ऐसें सांगो जातां जना । नये कोणाचिया मना ॥ २ ॥ वरें विचारूनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥ ३ ॥ तुका म्हणे रांडलेका । अंतीं जाशील यमलोका ॥ ४ ॥

२९०० परिसें गे सुनेबाई । नको वेंचूं दूध दहीं ॥ १ ॥ आवा चालली पंढरपुरा । वेसीपासुनि आली घरा ॥ २ ॥ ऐकें गोष्टी सादर बाळे । करीं जतन फुटकें पाळें ॥ ३ ॥ माझे हातींचा कलवडू । मजवांचूनि नको फोडूं ॥ ४ ॥ वळवट क्षीराचें लिंपन । नको फोडूं मजवांचून ॥ ५ ॥ उखळ मुसळ जांतें । माझें मन गुंतलें तेथें ॥ ६ ॥ भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ७ ॥ भक्षीं परिमित आहारू । नको फारसी वरो सारूं ॥ ८ ॥ सून म्हणे बहुत निकें । तुम्हीं यात्रेसी जावें सुखें ॥ ९ ॥ सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ १० ॥ सूनमुखींचें वचन कानीं । ऐकोनि सासू

विंवची मनीं ॥ ११ ॥ सवतीचे चाळे खोटे। म्यां जावेसें इला वाटे ॥ १२ ॥ आतां कासया यात्रे जाऊं । काय जाऊनि तेथें पाहूं ॥ १३ ॥ मुलें लेंकरें घरदार । माझें येथेंचि पंढरपुर ॥ १४ ॥ तुका म्हणे ऐसें जन । गोवियेलें मायें करून ॥ १५ ॥

२९०१ जातों वाराणसी । निरवीं गाई घोडे म्हैसी ॥ १ ॥ गेलों येतों नाहीं ऐसा । सत्य मानावा भरंवसा ॥ २ ॥ नका काढूं माझी पेवें । तुम्ही वरळा भूस खावें ॥ ३ ॥ भिकारियाचे पाठीं । तुम्ही घेउनि लागा काठी ॥ ४ ॥ सांगाल जेवाया ब्राह्मण । तरी कापाल माझी मान ॥ ५ ॥ वोकालिया वोका । म्यां खर्चिला नाहीं रुका ॥ ६ ॥ तुम्ही खावें ताकपाणी । जतन करा तूप लोणी ॥ ७ ॥ नाहीं माझें मनीं । पोरें रांडा नागवणी ॥ ८ ॥ तुका म्हणे नष्ट । होते तैसें बोले स्पष्ट ॥ ९ ॥

२९०२ पतिव्रतेची कीर्ति वाखाणितां । सिंदळीचिया माथां तिडिक उठे ॥ १ ॥ आमुचें तें आहे सहज बोलणें । नाहीं विचारून केलें कोणीं ॥ २ ॥ अंगें उणें त्याच्या बैसे टाळक्यांत । तेणें ठिणग्या बहुत गाळीतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही काय करणें त्यासी । धका खवंदासी लागतसे ॥ ४ ॥

२९०३ जातीची शिंदळी । तिला कोण कैसा वळी ॥ १ ॥ आपघर ना बापघर । चित्तीं मनीं व्यभिचार ॥ २ ॥ सेजे असोनियां धणी । परद्वार मना आणी ॥ ३ ॥ तुका म्हणे असल जाती । जातीसाठीं खाती माती ॥ ४ ॥

२९०४ पतिव्रता ऐसी जगामध्यें मात । भोगी पांच सात अंधारीं ते ॥ १ ॥ भ्रतारासी लेखी श्वानाचे समान । परपुरुषीं जाण संभ्रम तो ॥ २ ॥ तुका म्हणे तिच्या दोषा नाहीं पार । भोगील अघोर कुंभपाक ॥ ३ ॥

२९०५ सिंदळीसी नाहीं पोराची पैं आस । राहे बीज त्यास

काय करीं ॥ १ ॥ अथवा सेतीं बीज पेरिलें भाजोन । सारा देईल कोण काका त्याचा ॥ २ ॥ तुका म्हणे नाहीं राखायाची चाड । तरी कां लिगाड करूनि घेतो ॥ ३ ॥

२९०६ सिंदळीचें चित्त परपुरुषावरी । पति चुरमुरी रात्रंदिवस ॥ १ ॥ ऐसी ते वोंगळी जाय वो नरका । तिच्या दोषा देखा पति जाय ॥ २ ॥ आपण बुडती पति बुडविती । दोन्ही कुळें नेती अधः-पाता ॥ ३ ॥ तुका म्हणे तिची न करावी संगती । होईल फजिती मागेंपुढें ॥ ४ ॥

२९०७ गर्भाचें धारण । तिनें वागविला सीण ॥ १ ॥ व्याली कुऱ्हाडीचा दांडा । वर न घालीच तोंडा ॥ २॥ उपजला काळ । कुळा लाविला विटाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे जाय । नरका अभक्ताची माय ॥ ४ ॥

२९०८ देखोनि हरखली अंड । पुत्र झाला म्हणे रांड । तंव तो जाला भांड । चहाड चोर शिंदळ ॥ १ ॥ जाय तिकडे पीडी लोकां । जोडी भांडवल थुंका । थोर झाला चुका । वर कां नाहीं घातली ॥ २ ॥ भूमि कांपे त्याच्या भारें । कुंभपाकाचीं शरीरें । बोले निष्ठुर उत्तरें । पापदृष्टी मळिण चित्त ॥ ३ ॥ दुराचारी तो चांडाळ । पाप सांगातें विटाळ । तुका म्हणे खळ । म्हणोनियां निषिद्ध तो ॥ ४ ॥

२९०९ पुत्र झाला चोर । मायबापा हर्ष थोर ॥ १ ॥ आतां काशा-साठीं जोडी । हाट दाटे गुडघे घडी ॥ २ ॥ ऐसे अपहार । आणू-नियां भरी घर ॥ ३ ॥ मानिली निश्चिती । नरका जावया उभयतीं ॥ ४ ॥ झोडाझोडगीचे पोटीं । फळें बीजें तीं करंटीं ॥ ५ ॥ तुका म्हणे वेट्या । भांडवल नलगे खट्या ॥ ६ ॥

२९१० ऐसे कुळीं पुत्र होती । बुडविती पूर्वजां ॥ १ ॥ चाहाडी चोरी भांडवला । वांटा आला भागासी ॥ २ ॥ त्याचियानें दुःखी

मही । भार तोही न साहे ॥ ३ ॥ तुका म्हणे ग्रामपशु । केला नाशु आयुष्या ॥ ४ ॥

२९११ अहा कटा त्याचे करिती पितर । वंशीं दुराचार पुत्र झाला ॥ १ ॥ गळेचिना गर्भ नव्हेचि कां वांज । माता त्याची लाज लावी पापी ॥ २ ॥ परपीडे परद्वारीं सावधान । सादराचि मन अभाग्याचें ॥ ३ ॥ न मिळतां निंदा चहाडी उपवास । संग्रहावे दोष सकळही ॥ ४ ॥ पर उपकार पुण्य त्या वावडें । विषाचें तें किडें दुग्धीं मरे ॥ ५ ॥ तुका म्हणे विटाळाचि तो मूर्ति । दया क्षमा शांति नातळे त्या ॥ ६ ॥

२९१२ जळो तिचे तोंड । ऐसी कां ते व्याली रांड ॥ १ ॥ सदा भोंवयासी गांठी । क्रोध घडधडित पोटीं ॥ २ ॥ फोडिली गोंवरी । ऐसी दिसे तोंडावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ४ ॥

२९१३ देवें दिला देह भजना गोमटा । तो या झाला भाटा बाधिकेच्या ॥ १ ॥ ताठोनियां मान राहिली वरती । अहंकाराहातीं लवों नेदी ॥ २ ॥ दास म्हणावया न वळे रसना । सइरवचना वासे गळा ॥ ३ ॥ तुका म्हणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानें निरमळ व्हावयासी ॥ ४ ॥

२९१४ मायबाप करिती चिंता । पोर नाइके सांगतां ॥ १ ॥ नको जाऊं देउळासी । नेतो बागुल लोकांसी ॥ २ ॥ कर्णद्वारें पुराणिक । भुलवी शब्दें लावी भीक ॥ ३ ॥ वैष्णवांसंगतीं । हातीं पडलीं नेणों किती ॥ ४ ॥ आम्हां कैंचा मग । करिसी उघडियांचा संग ॥ ५ ॥ तुका म्हणे जाणें नरका । त्यांचा उपदेश आइका ॥ ६ ॥

२९१५ काय पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ॥ १ ॥ सांगितलें नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥ २ ॥ काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥ ३ ॥ आमचें कुळीं नव्हतें ऐसें । हेंच

पिसें निवडलें ॥ ४ ॥ लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ५ ॥ तुका म्हणे नरका जाणें । त्या वचनें दुष्टांचीं ॥ ६ ॥

२९१६ कन्या गो करी कथेचा विकरा । चांडाळ तो खरा तया नांवें ॥ १ ॥ गुण अवगुण हे दोन्ही प्रमाण । यातीशी कारण नाहीं देवा ॥ २ ॥ जे जैसें करिती ते तैसें पावती । भोग ते भोगिती केले कर्मीं ॥ ३ ॥ आशाबद्ध करूं नये तें करिती । तुका म्हणे जाती नरकामध्यीं ॥ ४ ॥

२९१७ साळंकृत कन्यादान । पृथ्वीदानाच्या समान ॥ १ ॥ परि तें न कळे या मूढा । येईल कळों भोग पुढां ॥ २ ॥ आचरितां कर्म । भरे पोट राहे धर्म ॥ ३ ॥ सत्या देव साहे । ऐसें करूनियां पाहें ॥४॥ अन्न मान धन । हें तों प्रारब्धाआधीन ॥ ५ ॥ तुका म्हणे सोसें । दुःख आतां पुढें नासे ॥ ६ ॥

२९१८ ब्रम्हहत्या मारिल्या गाई । आणीक कांहीं पाप केलें ॥ १॥ ऐका जेणें विकिली कन्या । पवाडे त्या सुन्याचे ॥ २ ॥ नरमांस खादली भाडी । हाका मारी म्हणोनि ॥ ३ ॥ अवघे पाप केले तेणें । जेणे सोने अभिलाषिले ॥ ४ ॥ उच्चारितां मज तें पाप । जिव्हे कांपसुटतसे ॥ ५ ॥ तुका म्हणे कोरान्न रांड । बेटा भांड मागेना कां ॥ ६ ॥

२९१९ एक ब्रम्हचारी गाढवा झोंबतां । हाणोनियां लाता पळालें तें ॥ १ ॥ गाढवही गोलें ब्रम्हचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजीं ॥ २ ॥ होणार तैसें झालें हें ना तैसें केलें । तुका म्हणे गेलें वांयांचि तें ॥ ३ ॥

२९२० कुंकवाची ठेवाठेवी । बोडकादेवी काशाला ॥१॥ दिवसगमा भरा पोट । कांगे नट नटावा ॥ २ ॥ दिमाख हा कोणा दावा । लटकी जीवा चडफड ॥ ३ ॥ तुका म्हणे झोंडगी हो । फुंदा कांहो कोरडी ॥ ४ ॥

२९२१ पोटासाठीं खटपट करिसी अवघा वीळ । राम राम म्हणतां तुझी बसली दांतखीळ ॥ १ ॥ हरिचें नाम कदाकाळीं कां रे नये वाचे । म्हणतां रामराम तुझ्या बाचे काय वेचे ॥ २ ॥ द्रव्या-चिया आशा तुजला दाही दिशा न पुरती । कीर्तनासी जातां तुझी जड झाली माती ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐशा जीवा काय करूं आतां । राम राम न म्हणे त्याचा गाढव मातापिता ॥ ४ ॥

२९२२ देह जाईल जाईल । यासी काळ वा खाईल ॥ १ ॥ कां रे नुमजसी दगडा । कैंचे हत्ती घोडे वाडा ॥ २ ॥ लोडें वालिस्तें सुपती । जरा आलिया फजिती ॥ ३ ॥ शरीरसंबंधाचें नातें । मोरड्या बुडाविती सेतातें ॥ ४ ॥ अझुनि तरी होई जागा । तुका म्हणे पुढें दगा ॥ ५ ॥

२९२३ आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे बेव्हारीं संसाराच्या ॥ १ ॥ नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चित । हरीवीण ॥ २ ॥ कठिण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तये ठायीं ॥ ३ ॥ राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवी श्रीहरी लव-लाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे किती करिसील लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ॥ ५ ॥

२९२४ जन्मा येऊनि काय केलें । तुवां मुद्दल गमाविलें ॥ १ ॥ कां रे न फिरसी माघारा । अझुनि तरि फजितखोरा ॥ २ ॥ केली गांठोळीची नासी । पुढें भीकाचि मागसी ॥ ३ ॥ तुका म्हणे ठाया । जाई आपल्या आलिया ॥ ४ ॥

२९२५ रंगीं रंगें रे श्रीरंगें । काय भुललासी पतंगें ॥ १ ॥ शरीर जायाचें ठेवणें । धरिसी अभिलास झणें ॥ २ ॥ नव्हे तुझा हा परि-वार । द्रव्य दारा क्षणभंगुर ॥ ३ ॥ अंतकाळींचा सोइरा । तुका म्हणे विठो धरा ॥ ४ ॥

२९२६ नयो वोलों भांडा । खीळ घालून बैस तोंडा ॥ १ ॥ एक

विठोबाचे गुण । करी सादर श्रवण ॥ २ ॥ प्रेमसुखा आड । काय वाजतें चाभाड ॥ ३ ॥ तुका म्हणे हिता । कांरे नागवसी थिता ॥४॥

२९२७ पंधरा दिवसां एक एकदशी । कांरे न करिसी व्रतसार ॥ १ ॥ काय तुझा जीव जातो एका दिसें । फराळाच्या मिसें धणी घेसी ॥ २ ॥ स्वहित कारण मानवेल जन । हरिकथापूजन वैष्णवांचें ॥ ३ ॥ थोडे तुज घरीं होती उजगरे । देउळासी कांरे मरसी जातां ॥ ४ ॥ तुका म्हणे कारे सकुमार जालासी । काय जाव देसी यमदूतां ॥ ५ ॥

२९२८ एकादशी सोमवार न करिती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ १ ॥ काय करूं बहु वाटे तळमळ । आंधळीं सकळ बहिमुख ॥ २ ॥ हरिहरा नाहीं बोटभरी वाती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं नारायणीं प्रीती । कोण त्यांची गति होइल नेणों ॥ ४ ॥

२९२९ धर्म तो न कळे । काय झांकिती डोळे ॥ १ ॥ जीव भ्रमले या कामें । कैसीं कळो येती वर्में ॥ २ ॥ विषयांचा माज । कांहीं धरूं नेदी लाज ॥ ३ ॥ तुका म्हणे लांसी । माया नाचविते कैसी ॥ ४ ॥

२९३० किती वेळा खादला दगा । अझुन कां गा जागतीना ॥ १ ॥ लाज नाहीं हिंडतां गांवें । दुःख नवें नित्यनित्य ॥ २ ॥ सर्व चोरा हातीं फांसे । देखतां कैसें न देखती ॥ ३॥ तुका म्हणे सांडिती वाट । तळपट करावया ॥ ४ ॥

२९३१ शूरां साजती हतियारे । गांढयां हांसतील पोरें ॥ १ ॥ काय केली विटंबन । मोती नासिकावांचून ॥ २ ॥ पतिव्रते रूप साजे । सिंदळ काजळ लेतां लाजे ॥ ३ ॥ दासी पत्नी सुता । नव्हे सरी एक पिता ॥ ४ ॥ मान बुद्धिमंता । थोर न मानिती पिता ॥ ५ ॥ तुका म्हणे तरी । आंत शुद्ध दंडे वरी ॥ ६ ॥

२९३२ अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धी ॥ १ ॥ का म्हणावें तयासी । तो केवळ पापरासी ॥ २ ॥ जो स्मरे रामनामा । त्यासी म्हणतो रिकामा ॥ ३ ॥ जो तीर्थव्रत करी । त्यासी म्हणतो भिकारी ॥ ४ ॥ तुका म्हणे विंचवाची नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ॥ ५ ॥

२९३३ जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीं ॥१ ॥ अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ॥ २ ॥ मंजुळवदनीं वचनागाची कांडी । शेवटीं बिघडी जीवप्राणा ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ४ ॥

२९३४ भाव धरी तया तारिल पाषाण । दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥ करितां नव्हे नीट श्वानाचे हें पुच्छ । खापरा परीस काय करी ॥ २ ॥ काय करील तया साकरेचें आळें । बीज तैसीं फळें येती तया ॥ ३ ॥ तुका म्हणे वज्र भंगे एक वेळ । कठीण हा खळ तयाहूनी ॥ ४ ॥

२९३५ शूकरासी विष्ठा माने सावकास । मिष्टान्नाची त्यास काय गोडी ॥ १ ॥ तेवीं अभक्तांसी आवडे पाखांड । न लगे त्यां गोड परमार्थ ॥ २ ॥ श्वानासी भोजन दिलें पंचामृत । तरी त्याचें चित्त हाडावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्पा पाजिलीया क्षीर । वमितां विखार विष झालें ॥ ४ ॥

२९३६ आपुलें वेंचूनि खोडा घाली पाव । ऐसा तो हा जीव हीनबुद्धि ॥ १ ॥ विषयाच्या संगें आयुष्याचा नास । पडियेलें ओस स्वहिताचें ॥ २ ॥ भुलल्याचे अंग आपणा पारिखे । छंदाचसारिखें वर्ततसे ॥ ३ ॥ तुका म्हणे दुःख उमटे परिणामीं । लंपटासी कामीं रतलिया ॥ ४ ॥

२९३७ आंधळ्यासी जन अवघेचि आंधळे । आपणासी डोळे

दृष्टी नाहीं ॥ १ ॥ रोग्या विषतुल्य लागे हें मिष्टान्न । तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥ तुका म्हणे शुद्ध नाहीं जों आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

२९३८ अतिवादी नव्हे शुद्ध या बीजाचा । ओळखा जातीचा अधम तो ॥ १ ॥ वेद श्रुति नाहीं ग्रंथ ज्या प्रमाण । श्रेष्ठाचें वचन न मानी जो ॥ २ ॥ तुका म्हणे मद्यपानाचें मिष्टान्न । तैसा तो दुर्जन शिवों नये ॥ ३ ॥

२९३९ किती सांगों तरी नाइकती बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ १ ॥ नका नका करूं रांडेची संगती । नेवोनि अधोगती घालील यम ॥ २ ॥ तुका म्हणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनि थोबाड फोडी काळ ॥ ३ ॥

२९४० गातां आइकतां कांटाळा जो करी । वास त्या अघोरीं कुंभपाकीं ॥ १ ॥ रागें यमधर्म जाचविती तया । तुज दिलें कासया मुख कान ॥ २ ॥ विषयांच्या सुखें अखंड जागसी । नवजे एकादशी जागरणा ॥ ३ ॥ वेंचूनियां द्रव्य सेवी मद्यपान । नाहीं दिलें अन्न अतीतासी ॥ ४ ॥ तीर्थाटण नाहीं केले उपकार । पाळिलें शरीर पुष्ट लोभें ॥ ५ ॥ तुका म्हणे मग केला सोहे दंड । नाइकती लंड सांगितलें ॥ ६ ॥

२९४१ जातो न येतिया वाटा । काय निराविती करंटा ॥ १ ॥ कैसा जालासे बेशरम । लाज नाहीं न म्हणे राम ॥ २ ॥ पाहे वैरियाकडे । डोळे वासुनियां रडे ॥ ३ ॥ बांधुनियां यमा हातीं । दिला नाहीं त्याची खंती ॥ ४ ॥ नाहीं यांपें काम । ऐसें जाणे तो अधम ॥ ५ ॥ अझुन तरी मुका । कां रे झालासि म्हणे तुका ॥ ६ ॥

२९४२ बुद्धिमंदाशिरीं । मार फजिती पदरीं ॥ १ ॥ जाय तेथें अपमान । पावे हानि थुंकी जन ॥ २ ॥ खरियाचा पाड । मागें लावावें लिगाड ॥ ३ ॥ तुका म्हणे करी । वर्म नेणे भरोवरी ॥ ४ ॥

२९४३ साखरेच्या गोण्या बैलाचिये पाठीं । तयासी सेवटीं करबाडें ॥ १ ॥ मालाचे पैं पेठे वाहाताती उंटें । तयांलागीं कांटे भक्षावया ॥ २ ॥ वाउगा हा धंदा आशा वाढविती । बांधोनियां देती यमाहातीं ॥ ३ ॥ ज्यासी असे लाभ तोचि जाणे गोडी । येर तीं वापुडीं शिणलीं वायां ॥ ४ ॥ तुका म्हणे शाहाणा होंई रे गव्हारा । चौऱ्यांशीचा फेरा फिरों नको ॥ ५ ॥

२९४४ स्तवूनिया नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥ १ ॥ नारायणाचिया लोपें । घडलीं अवघींचि पापें ॥ २ ॥ जीव ज्याचें दान । त्याचा खंडूनिया मान ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । आइके त्या दोष कानीं ॥ ४ ॥

२९४५ ढाल तरवारें गुंतले हे कर । म्हणे मी जुंझार कैसा झुंजों ॥ १ ॥ पेटी पडदळे सिले टोप ओझें । हें तों झालें दुजें मरणमूळ ॥ २ ॥ बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ॥ ३ ॥ असोनि उपाय म्हणे हे अपाय । म्हणे हाय हाय काय करूं ॥ ४ ॥ तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ५ ॥

२९४६ संसार करितो मोठ्या महत्वानें । दिसे लोकां उणे न कळे त्या ॥ १ ॥ पवित्रपण आपुलें वरच्यासींच दिसे । बाहेर उदास निंदिताती ॥ २ ॥ आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलाचे दोषगुण वाखाणिती ॥ ३ ॥ विषयांचे ध्यासें जग वांधियेलें । म्हणोनि लागले जन्ममृत्यु ॥ ४ ॥ तुका म्हणे माझें संचितचि असें । देवाजीचे पिसें सहजगुण ॥ ५ ॥

२९४७ लोभावरी ठेवुनि हेत । करी असत्य न्याय नीत ॥ १ ॥ त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥ २ ॥ कोटी गोहत्यापातक । त्यासी घडेल निःशंक ॥ ३ ॥ मासां स्रवे जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसियासी । यम गांजील सायासीं ॥ ५ ॥

२९४८ संतांच्या हेळणें बाटलें जें तोंड । प्रत्यक्ष तें कुंड चर्मकाचें ॥ १ ॥ भेसळीचें वीर्य ऐसा अनुभवें । आपुलें परावें नाहीं खळा ॥ २ ॥ संतांचा जो शोध करितो चांडाळ । धरावा विटाळ बहु त्याचा ॥ ३ ॥ तुका म्हणे केली प्रज्ञा याचसाठीं । कांहीं माझे पोटीं शंका नाहीं ॥ ४ ॥

२९४९ हरिची हरिकथा नावडे जया । अधम म्हणतां तया वेळ लागे ॥ १ ॥ मनुष्यदेहीं तया नाट लागलें । अघोर साधिलें कुंभपाक ॥ २ ॥ कासया जन्मा आला तो पाषाण । जंत कां होऊन पडिला नाहीं ॥ ३ ॥ उपजे मरोनि वेळोवेळां भांड । परि लाज लंड न धरी कांहीं ॥ ४ ॥ ऐसियाची माता कासया प्रसवली । वार नाहीं घातली मुखावरी ॥ ५ ॥ देवधर्माविण चांडाळ हा नर । न साहे भूमिभार क्षणभरी ॥ ६ ॥ राम म्हणतां तुझें काय रे वेंचलें । कां हित आपुलें न विचारिसी ॥ ७ ॥ जन्मोजन्मींचा होईल नरकीं । तुका म्हणे चुकी जरी यासी ॥ ८ ॥

२९५० कांहीं नित्यनेमाविण । अन्न खाय तोचि श्वान । वांयां मनुष्यपण । भार वाहे तो वृषभ ॥ १ ॥ त्याचा होय भूमी भार । नेणे यातीचा आचार । जाला दावेदार । भोगवी अघोर पितरांसी ॥ २ ॥ अखंड अशुभ वाणी । खरें न बोलेचि स्वप्नीं । पापी तयाहुनी । आणिक नाहीं दुसरा ॥ ३ ॥ पोट पोसी एकला । भूतीं दया नाहीं ज्याला । पाठीं लागे आल्या । अतिताचे दाराशीं ॥ ४ ॥ कांहीं संतांचें पूजन । न घडे तीर्थांचें भ्रमण । यमाचा आंदण । सीण थोर पावेल ॥ ५ ॥ तुका म्हणे त्यांनीं । मनुष्यपणा केली हानी । देवा विसरूनी । गेलीं म्हणतां मी माझें ॥ ६ ॥

२९५१ देव अवघे प्रतिपादी । वंदी सकळां एका निंदी ॥ १ ॥ तेथें अवघें गेलें वायां । विष घास एके ठायां ॥ २ ॥ सर्वांग कुरवाळी ।

उपटी एक रोमावळी ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त। नाहीं जयाचें अंकित ॥ ४ ॥

२९५२ आसुरी स्वभाव निर्दय अंतर। मानसीं निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥ याति कुळ येथें असे अप्रमाण। गुणांचें कारण असे अंगीं ॥ २ ॥ काळकूट पितळ सोनें शुद्ध रंग। अंगाचेंच अंग साक्षी देतें ॥ ३ ॥ तुका म्हणे वरी जातीसवें भेटी। नवनीत पोटीं सांठविलें ॥ ४ ॥

२९५३ तोंडे खाये फार। पादे बोचा करी मार ॥ १ ॥ एक ऐसे ते शहाणे। आपुले अधीन तें नेणें ॥ २ ॥ कुले घालूनि उघडे। रागें पाहे लोकांकडे ॥ ३ ॥ खेळे द्यूतकर्म। मग बोंवली जुलूम ॥ ४ ॥ निजतां आला मोहो। वीतां म्हणे मेला गोहो ॥ ५ ॥ तुका म्हणे त्यांनीं। मनुष्यपणा केली हानी ॥ ६ ॥

२९५४ गोविंदावांचोनि वदे ज्याची वाणी। हगवण घाणी पिटपिट ते ॥ १ ॥ मस्तक सांडुनी सिसफुल गुडघां। चार तो अवघा कावळ्याचा ॥ २ ॥ अंगभूत म्हूण पूजितो वाहाणा। म्हणतां शहाणा येईल कैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे वेश्या सांगे सवासिणी। इतर पूजनीं भाव तैसा ॥ ४ ॥

२९५५ नेदावी सलगी न करावा संग। करी चित्ता भंग वेळोवेळां ॥ १ ॥ सर्प शांतिरूप न म्हणावा भला। झोंबे खवळीला तात्काळ तो ॥ २ ॥ तुका म्हणे दूरी राखावा दुर्जन। करावें वचन न घडे तें ॥ ३ ॥

२९५६ चाहाडाची माता। व्यभिचारीण तत्वता ॥ १ ॥ पाहे संतांचें उणें। छिद्र छळावया सुनें ॥ २ ॥ जाणों त्याच्या बाचें। कांहीं सोडिलें गांठीचें ॥ ३ ॥ तुका म्हणे घात। व्हावा ऐसी जोडी मात ॥ ४ ॥

२९५७ तीर्थ जळ देखे पाषाण प्रतिमा। संत ते अधमा माणसां

ऐसे ॥ १ ॥ वांजेच्या मैथुनापरी गेलें वांयां । बांडेल्याचें जायां जालें पीक ॥ २ ॥ अभाविक सदा सुतकी चांडाळ । सदा तळमळ चुके-चिना ॥ ३ ॥ तुका म्हणे वरदळी ज्याची दृष्टी । देहबुद्धि कष्टी सदा दुःखी ॥ ४ ॥

२९५८ संतनिंदा ज्याचे घरीं । नव्हे घर ते यमपुरी ॥ १ ॥ त्याच्या पापा नाहीं जोडा । संगें जना होय पीडा ॥ २ ॥ संतनिंदा आवडे ज्यासी । तो जिताचि नर्कवासी ॥ ३ ॥ तुका म्हणे तो नष्ट । जाण गाढव तो स्पष्ट ॥ ४ ॥

२९५९ संतां नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥ १ ॥ ऐसे पोटाचे मारिले । देवा आशा विटंबले ॥ २ ॥ घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥ ३ ॥ तुका म्हणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥ ४ ॥

२९६० विद्या अल्प परी गर्वशिरोमणी । मजहुनि ज्ञानी कोण आहे ॥ १ ॥ अंगीं भरला ताठा कोणाचें मानीना । साधूची छळणा स्वयें करी ॥ २ ॥ साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥ ३ ॥ संतांची जो निंदा करितो या मुखें । खतेला सकळ पापें तोचि एक ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ५ ॥

२९६१ कावळियासी नाहीं दया उपकार । काळिमा अंतर विटाळसें ॥ १ ॥ तैसे कुजनाचें जिणें अमंगळ । घाणेरी बोंगळ वदे वाणी ॥ २ ॥ कडु भोंपळ्याच्या उपचारें पाक । सेविल्या तिडीक कपाळासी ॥ ३ ॥ तुका म्हणे विष सांडूं नेणे साप । आदरें तें पाप त्याचे ठायीं ॥ ४ ॥

२९६२ सोनियाचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षावया दिलें श्वाना-लागीं ॥ १ ॥ मुक्ताफळहार खरासी घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥ २ ॥ वेदपारायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खूण

काय जाणे ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तिचें महिमान साधु जाणे ॥ ४ ॥

२९६३ विष्ठा भक्षी तया अमृत पारिखें । वोंगळाचि सखें वोंगळाचें ॥ १ ॥ नये पाहों कांहीं गोऱ्हवाडीचा अंत । झणीं ठाका संत दुर्जना पैं ॥ २ ॥ मैसळीच्या वीजा अमंगळ गुण । उपजवी सीण दरुषणें ॥ ३ ॥ तुका म्हणे छी थू जया घरीं धन । तेथें तें कारण कासयाचें ॥ ४ ॥

२९६४ दुर्जनाची जाती । त्याचे तोंडीं पडे माती ॥ १ ॥ त्याची बुद्धि त्यासी नाडी । वाचे अनुचित बडबडी ॥ २ ॥ पाहे संतांकडे । दोषदृष्टि सांडी भिडे ॥ ३ ॥ उंच निच नाहीं । तुका म्हणे खळा कांहीं ॥ ४ ॥

२९६५ गाढव शृंगारिलें कोडें । कांहीं केल्या नव्हे घोडें ॥ १ ॥ त्याचें भुंकणें न राहे । स्वभावासी करील काये ॥ २ ॥ श्वान शिबिके बैसाविलें । भुंकतां न राहे उगलें ॥ ३ ॥ तुका म्हणे स्वभाव कर्म । कांहीं केल्या न सुटे धर्म ॥ ४ ॥

२९६६ खिस्तीचा उदीम उदीमांत हीन । करिती ब्राह्मण कलियुगीं ॥ १ ॥ वेवसाव करी पर्वत मांगापासीं । ते पैं विटाळासी न मानिती ॥ २ ॥ मांगिणीशीं नित्य करीतसे लेखा । तोंडावरी थुंका पडतसे ॥ ३ ॥ आशा माया रांडा नांव हें कागदीं । आठवीना कधीं नारायण ॥४॥ तुका म्हणे देह झाला पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥५॥

२९६७ वीजीं फळाचा भरवंसा । जतन सिंचनासारिसा । चाळविलिया आसा । काकुलती ते नाड ॥ १ ॥ हा तों गडसंदीचा ठाव । पिके पिकविला भाव । संकोचोनि जीव । दशा केली जतन ॥ २ ॥ माती घाली धनावरी । रांडा रोटा वरीवरी । सुखाचे सेजारी । दुःख भ्रमें भोगीतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे दिशाभुली । झाल्या उफराटी चाली । निवाडाची बोली । अनुभवें साक्षीसी ॥ ४ ॥

२९६८ खद्योतें फुलविलें रविपुढें ढुग । साक्षी तंव जग उभयतां ॥ १ ॥ आपल्या आपण नाहीं शोभा येत । चार करी स्फीत दाखवूनि ॥ २ ॥ खाणार ताकाचें असे तें माजीरें । आपणेंचि अधीर कळो येतें ॥ ३ ॥ तुका म्हणे जळो भेंदाची मवाळी । दावूनिया नळी कापी सुखें ॥ ४ ॥

२९६९ अभक्ताचे गांवीं साधु म्हणजे काय । व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥ १ ॥ कसाबाचे आळी मांडिले प्रमाण । बसवणाची आण तया काई ॥ २ ॥ केळी आणे बोरी वसती सेजारीं । संवाद कोणेपरी घडे तेथें ॥ ३ ॥ मोतियाची गोणी माळे ओळी नेली । पुसती केवढ्या केली पासरी हे ॥ ४ ॥ तुका म्हणे खीर केली कान्हे-ळ्याची । शुद्ध गोडी कैंची वसे तेथें ॥ ५ ॥

२९७० जाणिवेच्या भारें चेपलासे उर । सदा बुरबुर सरेचिना ॥ १ ॥ किती याचें ऐकों कानीं । मारिलें घाणीं नाळकरी ॥ २ ॥ मिठेंविण आळणी बोल । कोरडी फोल घसघस ॥ ३ ॥ तुका म्हणे डेंगा न कळे हित । किती फजित करूं तरी ॥ ४ ॥

२९७१ माकडा दिसती कंवटी नारळा । भोक्ता तो निराळा वरील सारी ॥ १ ॥ एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥ सुनियांसी क्षीर चारिल्या ओकवी । भोक्ता तो सेवी धणी वरी ॥ ३ ॥ तुका म्हणे मूर्ख वागविती भार । नेतील तें सार परीक्षक ॥ ४ ॥

२९७२ दुबळें सदैवा । म्हणे नागवेल केव्हां ॥ १ ॥ आपणा ऐसें करूं त्या पाहे । स्वभावासी करिल काये ॥ २ ॥ मूढ सभे आंत । इच्छी पंडीताचा घात ॥ ३ ॥ गांढें देखुनियां शूरा । उगे करिती बुरबुरा ॥ ४ ॥ आणिकांचा हेवा । न करी शरण जाई देवा ॥ ५ ॥ तुका म्हणे किती । करूं दुष्टाची फजिती ॥ ६ ॥

२९७३ निंबाचीया झाडा साकरेचें आळें । आपली तीं फळें न

संडेच ॥ १ ॥ तैसें अधमाचें अमंगळ चित्त । वमन तें हित करूनि सांडी ॥ २ ॥ परिसाचे अंगीं लाविलें खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥ ३ ॥ तुका म्हणे वेळू चंदनासंगतीं । काय ते असती जव-ळिक ॥ ४ ॥

२९७४ मांस खातां हाउस करी । जोडुनि वैरी ठेवियेला ॥ १ ॥ कोण त्याची करील कींव । जीवें जीव नेणती ॥ २ ॥ पुढिलासाठीं पाजवी सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ ३ ॥ तुका म्हणे कुटिती हाडें । आपुल्या नाडें रडतील ॥ ४ ॥

२९७५ सिंदळीचे सोईरे चोराची दया । तोही जाणा तया संव-सर्गी ॥ १ ॥ फुकासाटीं भोगी दुःखाचा तो वांटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥ २ ॥ सर्प पोसूनीयां दुधाचाही नाश । केलें थीता विष अमृताचें ॥ ३ ॥ तुका म्हणे यासी न करितां दंडण । पुढिल्या खंडण नव्हे दोषा ॥ ४ ॥

२९७६ सुगरणीबाई थिता नास केला । गुळ तो घातला भाजी-मध्यें ॥ १ ॥ क्षीरीमध्यें हिंग दुधामध्यें बोळ । थितेंचि वोंगळ कैसें केलें ॥ २ ॥ हिरयाच्या पेठे आणियेल्या गारा । खांदीं शिरीं भारा व्यर्थ वाहे ॥ ३ ॥ दळण दळोनी भरूं गेली पाळी । भरडोनि वोंगळी नास केला ॥ ४ ॥ कापुराचे सांते आणिला लसण । वाग-वितां सीण दुःख होय ॥ ५ ॥ रत्नाचा जोहारी रत्नाचि पारखी । येर देखोदेखीं हातीं घेती ॥ ६ ॥ तुका म्हणे जरी योग घडे निका । न घडतां थुंका तोंडावरी ॥ ७ ॥

२९७७ कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥ १ ॥ गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचें तो स्वरूप काय जाणे ॥ २ ॥ बकापुढें सांगे भावार्थवचन । वाउगाचि सीण होय त्यासी ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसे अभाविक जन । त्यांसी वांयां सीण करूं नये ॥ ४ ॥

२९७८ दर्पणासी नखटें लाजे । शुद्ध खिजे देखोनि ॥ १ ॥ ऐसें अवगुणांच्या बाधें । दिसे सुधें विपरीत ॥ २ ॥ आंधळ्यासी काय हिरा । गारांचि तो सारिखा ॥ ३ ॥ तुका म्हणे मुंके सुनें । ठाया नेणे ठाव तो ॥ ४ ॥

२९७९ कैसा सिंदळीचा । नव्हे ऐसी ज्याची वाचा ॥ १ ॥ वाचे नुच्चारी गोविंदा । सदा करी परनिंदा ॥ २ ॥ कैसा निरयगांवा । जाऊन पवे विसावा ॥ ३ ॥ तुका म्हणे दंड । कैसा न पवे तो लंड ॥ ४ ॥

२९८० वेदशास्त्र नाहीं पुराण प्रमाण । तयाचें वदन नावलोका ॥ १ ॥ तार्कियाचें अंग आपणा पारिखें । माजिन्यासारखें वाईचाळे ॥ २ ॥ माता निंदी तया कोण तो आधार । भंगलें खापर याचे नांवें ॥ ३ ॥ तुका म्हणे आडराणें ज्यासी चाली । तयाची ते बोली मिठेंविण ॥ ४ ॥

२९८१ दुर्जनाचा मान । सुखें करावा खंडण ॥ १ ॥ लात हाणो-नियां वारी । गुंडा वाट शुद्ध करी ॥ २ ॥ बहुतां पीडी खळ । त्याचा धरावा विटाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे नखें । काढुनि टाकिजेती सुखें ॥ ४ ॥

२९८२ सापें ज्यासी खावें । तेणें प्राणासी मुकावें ॥ १ ॥ काय लाधला दुर्जन । तोंडावरी थुंकी जन ॥ २ ॥ विंचु हाणी नांगी । अग्न लावी आणिकां अंगीं ॥ ३ ॥ तुका म्हणे जाती । नरक पाउलीं चालती ॥ ४ ॥

२९८३ काय ढोरापुढें घालुन मिष्टान्न । खरा विलेपन चंदनाचें ॥ १ ॥ नको नको देवा खळाची संगती । रस ज्या पंगती नाहीं कथे ॥ २ ॥ काय सेज बाज माकडा विलास । अळंकार नास करूनि टाकी ॥ ३ ॥ तुका म्हणे काय पाजूनि नवनीत । सर्पा विष थीत अमृताचें ॥ ४ ॥

२९८४ दुर्जनाची गंधी विष्ठेचिया परी । देखोनियां दूरी व्हावें तया ॥ १ ॥ आइका हो तुम्ही हे मात सज्जन । करूं संघष्ट न ये बोलों ॥ २ ॥ दुर्जनाचे अंगी अखंड विटाळ । वाणी रजस्वला स्रवे तैशी ॥ ३ ॥ दुर्जनाचें भय धरावें त्यापरी । पिसाळलेवरी धांवे श्वान ॥ ४ ॥ दुर्जनाचा भला नव्हे अंगसंग । बोलिलासे त्याग देशाचा त्या ॥ ५ ॥ तुका म्हणे किती सांगावें पृथक । अंग कुंभपाक दुर्जनाचें ॥ ६ ॥

२९८५ नये पाहों मुख मात्रागमन्याचें । तैसें अभक्ताचें गुरुपुत्रा ॥ १ ॥ म्हणऊनि बरें धरितां एकांत । तेणें नव्हे घात भजनासी ॥ २॥ नये होऊं कदा निंदकाची भेटी। जया द्वैत पोटीं चांडाळाच्या ॥ ३ ॥तुका म्हणे नका बोलों त्यासी गोष्टी । ज्याचिया दृष्टी पाप वाढे ॥ ४ ॥

२९८६ देखोनि पुराणिकाची दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥ १ ॥ प्रेम खरें दिसे जना । भिन्न अंतरीं भावना ॥ २ ॥ आवरितां नावरे । खुर आठवी लेवरें ॥ ३ ॥ बोलों नये मुखावाटा । म्हणे होता यांचा तोटा ॥ ४ ॥ दोन्ही सिंगें चारी पाय । खुणा दावी म्हणे होय ॥ ५ ॥ मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥ ६ ॥ होता भाव पोटीं । मुखा आलासे शेवटीं ॥ ७ ॥ तुका म्हणे कुड । कळों येतें तें रोकडें ॥ ८ ॥

२९८७ धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माय प्रसवली ॥ १ ॥ कठीण हृदय तया चांडाळाचें । जो नेणे पराचें दुःख कांहीं ॥ २ ॥ आपुला हा प्राण तैसे सकळ लोक । न करी विवेक पशु जैसा ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥

२९८८ दोराच्या आधारें पर्वत चढला । पाउलासाठीं केला अपघात ॥ १ ॥ अष्टोत्तरशें व्याधि ज्या वैद्यं दवडुनी । तो वैद्य मारूनि

उत्तीर्ण झाला ॥ २ ॥ नवमास माया वाहिलें उदरीं । ते माता चौबारीं नग्न केली ॥ ३ ॥ गायत्रीचें क्षीर पिवुनी घेउनी । उपवासी बांधोनी ताडन करी ॥ ४ ॥ तुका म्हणे दासां निंदी त्यांचे तोंड । पाहातां नरककुंड पूर्वजांसी ॥ ५ ॥

२९८९ महारासी शिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥ १ ॥ तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥ २ ॥ नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥ ३ ॥ ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो त्या यातीं ॥ ४ ॥

२९९० अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड । काय त्यासी रांड प्रसवली ॥ १ ॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता । शुद्ध उभयतां कुळ याति ॥ २ ॥ ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ ३ ॥ तुका म्हणे आगी लागो थोरपणा । दृष्टी त्या दुर्जना न पडो माझी ॥ ४ ॥

२९९१ गाढवाचें तानें । पालटलें क्षणक्षणें ॥ १ ॥ तैसे अधमाचे गुण । एकविध नाहीं मन ॥ २ ॥ उपजतां बरें दिसे । रूप वाढतां तें नासे ॥ ३ ॥ तुका म्हणे भुंकते वेळे । वेळ अवेळ न कळे ॥ ४ ॥

२९९२ रासभ धुतला महातीर्थामाजीं । नव्हे जैसा तेजी शामकर्ण ॥ १ ॥ तेवीं खळा काय केल्या उपदेश । नव्होचे मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥ सर्पासी पाजिलें शर्करापीयूष । अंतरींचें विष जाऊं नेणें ॥ ३ ॥ तुका म्हणे श्वाना क्षीरीचें भोजन । सवेंचि वमन जेवीं तया ॥ ४ ॥

२९९३ स्मशान ते भूमि प्रेतरूप जन । सेवाभक्तिहीन ग्रामवासी ॥ १ ॥ भरतील पोट श्वानाचिया परी । वस्ति दिली घरीं यमदूतां ॥ २ ॥ अपूज्य लिंग तेथें अतित न घे थारा । ऐसी वस्ती चोरां कंटकांचि ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं ठावी स्थिति मती । यमाची निश्चिती कुळवाडी ॥ ४ ॥

२९९४ श्वान शीघ्रकोपी । आपणा घातकर पापी ॥ १ ॥ नाहीं भीड आणी धीर । उपदेश न जिरे क्षीर ॥ २ ॥ माणसांसी भुंके । विजातीनें घावें थुंके ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त । मळिण करा तें फाजित ॥ ४ ॥

२९९५ अधमाचें चित्त अहंकारीं मन । उपदेश शीण तया केला ॥ १ ॥ पापियाचें मन न करी आचार । विधवे शृंगार व्यर्थ केला ॥ २ ॥ अधमाचें चित्त दुश्चित ऐकेना । वायां सीण मना करूं काय ॥ ३ ॥ गर्दभासी दिली चंदनाची उटी । केशर ललाटीं शूकराच्या ॥ ४ ॥ पतिवंचकेसी सांगतां उदंड । परि तें पाषांड तिचें मनीं ॥ ५ ॥ तुका म्हणे तैसें अभाविका सांगतां । वाउगाचि चित्ता सीण होय ॥ ६ ॥

२९९६ सिंदळा साल्याचा नाहीं हा विश्वास । बाईल तो त्यास न विसंबे ॥ १ ॥ दुष्ट बुद्धि चोरी करी निरंतर । तो म्हणे इतर लोक तैसे ॥ २ ॥ तुका म्हणे जया चित्तीं जे वासना । तयाची भावना तयापरी ॥ ३ ॥

२९९७ चुंबळीचा करी चुंबळीशीं संग । अंगीं वसे रंग क्रियाहीन ॥ १ ॥ बीजाऐसें फळ दावी परिपाकीं । परिमळ लौकिकीं जातीऐसा ॥ २ ॥ माकडाच्या गळां रत्न कुळांगना । सांडूनियां सुना बिदी धुंडी ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा व्याली ते गाढवी । फजिती ते व्हावी आहे पुढें ॥ ४ ॥

२९९८ आधींच आळसी । वरी गुरूचा उपदेशी ॥ १ ॥ मग त्या कैंची आडकाठी । विधिनिषेधाची भेटी ॥ २ ॥ नाचरवे धर्म । न करवे विधी कर्म ॥ ३ ॥ तुका म्हणे ते गाढव । घेती मनासवें धांव ॥ ४ ॥

२९९९ गाढवाचे अंगीं चंदनाची उटी । राखेसवें भेटी केली तेणें ॥ १ ॥ सहज गुण जयाचिये देहीं । पालट तें कांहीं नव्हे तया ॥ २ ॥

माकडाचे गळां मोलाचा तो मणी। घातला चावुनि टाकी थुंकोनि ॥ ३ ॥ तुका म्हणे खळा नावडे हित। अविद्या वाढवी आपुल्या मतें ॥ ४ ॥

३००० कुचराचें श्रवण। गुणदोषांवरी मन ॥ १ ॥ असोनियां नसे कथे। मूर्ख अभाग्य तें तेथें ॥ २ ॥ निरर्थक कारणीं। कान डोळे वेंची वाणी ॥ ३ ॥ पापाचे सांगाती। तोंडी वोढाळाचे माती ॥ ४ ॥ हिताचिया नांवें। वोस पडिलें देहभावें ॥ ५ ॥ फजित करूनि सोडी। तुका करी वोडावोडी ॥ ६ ॥

३००१ क्षीर मागें तया रायतें वाढी। पाधानी गथडी ऐसा नांवें ॥ १ ॥ समयो जाणां समयो जाणां। भलतें नाणां भलतेथें ॥ २ ॥ अमंगळ वाणी वदवी मंगळीं। अशुभ वोंगळी शोभन तें ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणें समयो ठाया ठाव। राहाडी ते वाव नरकाडी ॥ ४ ॥

३००२ मातेचीं जो थानें फाडी। तया जोडी कोण ते ॥ १ ॥ वेदां निंदी तो चांडाळ। भ्रष्ट सुतकीया खळ ॥ २ ॥ अगी लावी घरा। मग वसती कोठें थारा ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म। येरा नाचवितो भ्रम ॥ ४ ॥

३००३ अति झालें उत्तम वेश्येचें लावण्य। परि ते सवासीण न म्हणावी ॥ १ ॥ उचित अनुचित केलें ठाया ठाव। गुणां मोल वाव थोरपणा ॥ २ ॥ शूरत्वावांचूनि शूरांमाजी ठाव। नाहीं आविर्भाव आणिलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे सोंग पोटाचे उपाय। कारण कमाईविण नाहीं ॥ ४ ॥

३००४ वडिलें दिलें भूमिदान। तें जो मागे अभिलासून ॥ १ ॥ अग्रपूजेचा अधिकारी। श्रेष्ठ दंड यमाघरीं ॥ २ ॥ उभयकुल समवेत। नरकीं प्रवेश अद्भुत ॥ ३ ॥ तप्तलोहें भेटी। तुका म्हणे कल्पकोटी ॥ ४ ॥

३००५ काय केलें जळचरीं । ढीवर त्यांच्या घातावरी ॥ १ ॥ हा तों ठायींचा विचार । आहे यातिवैराकार ॥ २ ॥ श्वापदांतें वधी । निरपराधें पारधी ॥ ३ ॥ तुका म्हणे खळ । संतां पीडिती चांडाळ ॥ ४ ॥

३००६ दर्पणासी बुजे । नकटें तोंड पळवी लाजे ॥ १ ॥ गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यास पीडा करी ॥ २ ॥ चोरा रुचे निशी । देखोनियां विटे शशी ॥ ३ ॥ तुका म्हणे जन । देवा असे भाग्यहिन ॥ ४ ॥

३००७ आणिकांच्या घातें । ज्यांचीं निवतील चित्तें ॥ १ ॥ तेचि ओळखावे पापी । निरयवासी शीघ्रकोपी ॥ २ ॥ कान पसरोनी । ऐके वदे दुष्ट वाणी ॥ ३ ॥ तुका म्हणे भांडा । धीर नाहीं ज्याच्या तोंडा ॥ ४ ॥

३००८ जाळें घातलें सागरीं । बिंदु न राहे भीतरीं ॥ १ ॥ तैसें पापियाचें मन । तया नावडे कीर्तन ॥ २ ॥ गाढव गंगेसी न्हाणिलें । जाउनि उकरड्यावरी लोळे ॥ ३ ॥ क्षीरीं पोसिलें काउळें । जाऊनि विष्ठेवरी लोळे ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसी हरी । किरड्या नावडे कस्तूरी ॥ ५ ॥

३००९ जीवें जीव नेणे पापी सारिखाची । नळी कुजयाची कापूं बैसे ॥ १ ॥ आत्मा नारायण सर्वांघटीं आहे । पशूमध्यें काय कळों नये ॥ २ ॥ देखत हा जीव हुंबरे बरडत । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥ ३ ॥ तुका म्हणे तया चांडाळांसी नर्क । भोगिती अनेक महा-दुःखें ॥ ४ ॥

३०१० गोमट्या बीजाचीं फळेंही गोमटीं । वाहे तेंचि पोटीं सम-तुक ॥ १ ॥ जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणें ॥ २ ॥ खऱ्याचे पारखी येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळें दुरी ॥ ३ ॥ तुका म्हणे मज सत्याची आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥ ४ ॥

३०११ लटिकें तें रुचे । साच कोणाही न पचे ॥ १ ॥ ऐसा माजल्याचा गुण । भोगें कळों येईल सीण ॥ २ ॥ वाढवी ममता । नाहीं वरपडला तों दूतां ॥ ३ ॥ कांहीं न मनी हेकड । तुका उपदेश माकड ॥ ४ ॥

३०१२ चंदनाचें गांवीं सर्पांची वसती । भोगिती ते होती द्वीपांतरीं ॥ १ ॥ एका ओझें एका लाभ घडे देवा । संचिताचा ठेवा वेगळाला ॥ २ ॥ क्षीराची वसती अशुद्ध सेवावें । जवळी तें जावें भोगें दुरी ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसी बुद्धि ज्याची जड । त्याहुनी दगड बरें देवा ॥ ४ ॥

३०१३ बांधे सोडी हें तों धन्याचिये हातीं । हेंकडें गोंविती आपणां बळें ॥ १ ॥ भुललियासी नाहीं देहाचा आठव । धोतऱ्यानें भाव पालटिला ॥ २ ॥ वरांत रिघावें दाराचिये सोई । भिंतीसवें डोई घेऊनि फोडी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा गेलीं विसरोन । आतां वर्म कोण दावी यांसी ॥ ४ ॥

३०१४ मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥ तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळू स्वभाव ॥ २ ॥ मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगू किती । बाप लेंकासी मारिती ॥ ४ ॥

३०१५ सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥ येथें अळंकार शोभती सकळ । भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥ अंतरींचें बीज जाणें कळवळा । व्यापक सकळां ब्रह्मांडांचा ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं चालत तांतडी । प्राप्तकाळ घडी आल्याविण ॥ ४ ॥

३०१६ जाणे अंतरींचा भाव । तोचि करितो उपाव ॥ १ ॥ नलगे सांगावें मागावें । जीवें भावें अनुसरावें । अविनाश घ्यावें । फळ धीर धरोनी ॥ २ ॥ बाळा न मागतां भोजन । माता घाली पाचारून ॥ ३ ॥ तुका म्हणे तरी । एकीं लंघियेले गिरी ॥ ४ ॥

३०१७ करीं ऐसी धांवाधावीं । चित्त लावीं चरणापें ॥ १ ॥ मग तो माझा मायबाप । घेईल ताप हरूनी ॥ २ ॥ बहुतांच्या मतें गोवा। होऊं जीवा नेदावा ॥ ३ ॥ तुका म्हणे करुणाबोलें। धीर विठ्ठलें निघेना ॥ ४ ॥

३०१८ देव भक्तालागीं करूं नेदी संसार । अंगें वाराबार करी-तसे ॥ १ ॥ भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा । म्हणोनि करंटा करो-नि ठेवी ॥ २ ॥ स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठीं लावी ॥ ३ ॥ तुका म्हणे मज प्रचित आली देखा । आणिक या लोकां काय सांगों ॥ ४ ॥

३०१९ मधुरा उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड भाव असो ॥ १ ॥ प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥ २ ॥ जनानिंदा होय तो बरा विचार । थोरवीचा भार कामा नये ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्तीं भाव निष्ठावंत । दया क्षमा शांत सर्वां-भूतीं ॥ ४ ॥

३०२० भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ १ ॥ नारायण ऐसा सखा । काय जगांचा हा लेखा ॥ २ ॥ चित्त वित्त हेवा । सम-र्पून रहा देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे मन । असों द्यावें समाधान ॥ ४ ॥

३०२१ अभिमानी पांडुरंग । गोवा काशाचा हो मग ॥ १ ॥ अनु-सरा लवलाहीं । नका विचार करूं कांहीं ॥ २ ॥ कोठें राहतील पापें । जालिया हो अनुताप ॥ ३ ॥ तुका म्हणे येचि घडी । उभ्या पाववील थडी ॥ ४ ॥

३०२२ वैद्य एक पंढरिराव । अंतर्भाव तो जाणे ॥ १ ॥ रोगा ऐशा द्याव्या वल्ली । जाणे जाली बाधा ते ॥ २ ॥ नेदी रूका वेचों मोल । पाहे बोल प्रीतीचे ॥ ३ ॥ तुका म्हणे दयावंता । सदा चिंता दीनांची ॥ ४ ॥

३०२३ चित्तीं नाहीं आस । त्यांचा पांडुरंग दास ॥ १ ॥ असे भक्तां-

च्चिये घरीं । काम न सांगतां करी ॥ २ ॥ अनाथांचा बंधु । असे अंगीं हा संबंधु ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें । देवा सत्ता राबवावें ॥ ४ ॥

३०२४ भाविकां हें वर्म सांपडलें निकें । सेविती कवतुकें धणी-वरी ॥ १ ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें । वंदिती तीं पदें सुकुमार ॥ २ ॥ विसरले मुक्ती भक्तिच्या अभिलासें । ओढत सरिसें सुख आलें ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं मागायाची आस । पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ४ ॥

३०२५ अनंत ब्रह्मांडें । एके रोमीं ऐसें धेंडें ॥ १ ॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥ २ ॥ मारी दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥ तुका म्हणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

३०२६ एवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावें ॥ १ ॥ होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥ २ ॥ एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥ ३ ॥ आला नांवारूपा । तुका म्हणे झाला सोपा ॥ ४ ॥

३०२७ कृपावंत किती । दीनें बहु आवडती ॥ १ ॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ २ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवें । अनुसरतां एका भावें ॥ ४ ॥

३०२८ भक्ताविण देवा । कैंचें रूप घडे सेवा ॥ १ ॥ शोभविलें येरयेरां । सोनें एके ठायीं हीरा ॥ २ ॥ देवाविण भक्ता । कोण देता निष्कामता ॥ ३ ॥ तुका म्हणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥ ४ ॥

३०२९ प्रथम भेटी आलिंगन । मग चरण वंदावे ॥ १ ॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कळवळोनी ॥ २ ॥ न सांगतां सीण

भाग । पांडुरंग जाणतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपावंतें । द्यावें भातें न मागतां ॥ ४ ॥

३०३० देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा मनुष्यपणा ॥ १ ॥ देवाची खूण करावें वाटोळें । आपणावेगळें कोणीं नाहीं ॥ २ ॥ देवाची ते खूण गुंतो नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवों नेदी ॥ ३ ॥ देवाची ते खूण गुंतो नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥ ४ ॥ देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग हरी ॥ ५ ॥ संसारासी तेंचि वळकाविलें स्थळ । तुक्या पें सकळ चिन्हें त्याची ॥ ६ ॥

३०३१ देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ १ ॥ ब्रह्मादिकांसी हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ २ ॥ अवघियांपुरतें ओसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ ३ ॥ इच्छादानी येथें वळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवितो ॥ ४ ॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥ ५ ॥ तुका म्हणे पाक लक्ष्मीच्या हातें । कामारी सांगातें निरुपम ॥ ६ ॥

३०३२ देव घ्या कोणी देव घ्या कोणी । आइता आला घर पुसोनी ॥ १ ॥ देव न लगे देव न लगे । सांठवणेंचे रुधले जागे ॥ २ ॥ देव मंदला देव मंदला । भाव बुडाला काय करूं ॥ ३ ॥ देव घ्या फुका देव घ्या फुका । न लगे रुका मोल कांहीं ॥ ४ ॥ दुबळा तुका भावहीण । उधारा देव घेतला ऋणा ॥ ५ ॥

३०३३ हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद ॥ १ ॥ एकएकाचे हृदयीं । गोडी साखरेच्या ठायीं ॥ २ ॥ भेदकासी नाड । एक वेलांटीच आड ॥ ३ ॥ उजवें वामभाग । तुका म्हणे एक अंग ॥ ४ ॥

३०३४ सांठविला हरी । जीहीं हृदयमंदिरीं ॥ १ ॥ त्यांची सरली वेरझार । जाला सफळ व्यापार ॥ २ ॥ हरी आला हातां । मग कैंची

भय चिंता ॥ ३ ॥ तुका म्हणे हरी । कांहीं उरों नेदी उरी ॥ ४ ॥

३०३५ भक्त ऋणी देव बोलतीं पुराणें । निर्धार वचन साच करीं ॥ १ ॥ मागें काय जाणों आइकिली वार्ता । कबिर सातें जातां घडिया वांटी ॥ २ ॥ माघारिया धन आणिलें घरासी । नेघे केला त्यासी त्याग तेणें ॥ ३ ॥ नामदेवाचिया घरासी आणिलें । तेणें लुटाविलें द्विजां हातीं ॥ ४ ॥ प्रत्यक्षासी काय द्यावें हें प्रमाण । त्र्यंकोबाचें ऋण फेडियलें ॥ ५ ॥ बीज दळोनियां केली आराधना । लागे नारायणा पेरणें तें ॥ ६ ॥ तुका म्हणे नाहीं जयासी निर्धार । नाडला साचार तोचि एक ॥ ७ ॥

३०३६ उंच निंच कांहीं नेणे हा भगवंत । तिष्ठे भाव भक्ति देखोनिया ॥ १ ॥ दासीपुत्र कण्या विदुराच्या भक्षी । दैत्याघरीं रक्षी प्रल्हादासी ॥ २ ॥ चर्म रंगूं लागे रोहिदासासंगीं । कबिराचे मागीं विणी शेले ॥ ३ ॥ सजन कसाया विकूं लागे मांस । माळ्या सांवत्यांस खुरपूं लागे ॥ ४ ॥ नरहरि सोनारा घडों फुंकूं लागे । चोख्यामेळ्यासंगें ढोरें ओढी ॥ ५ ॥ नामयाची जनीसवें वेंची शेणी । धर्माघरीं पाणी वाहे झाडी ॥ ६ ॥ नाम्यासवें जेवी नव्हे संकोचित । ज्ञानियाची भिंत अंगीं ओढी ॥ ७ ॥ अर्जुनाचे रथीं होय हा सारथी । भक्षी पोहे प्रीति सुदाम्याचे ॥ ८ ॥ गौळियांचे घरीं गाई अंगें वळी । द्वारपाळ बळीद्वारीं झाला ॥ ९ ॥ त्र्यंकोबाचें ऋण फेडी हृषीकेशी । अंबऋषीचे सोशी गर्भवास ॥ १० ॥ मिराबाईसाठीं घेतो विषप्याला । दामाजीचा झाला पाडेवार ॥ ११ ॥ घडी माती वाहे गोऱ्या कुंभाराची । हुंडी मेहत्याची अंगें भरी ॥ १२ ॥ पुंडलिकासाठीं अझूनि तिष्ठत । तुका म्हणे मात धन्य त्याची ॥ १३ ॥

३०३७ अंगीकार ज्याचा केला नारायणें । निंद्य तेंहि तेणें वंद्य केलें ॥ १ ॥ अजामेळ भिल्ली तारिली कुंटणी । प्रत्यक्ष पुराणीं वंद्य केली ॥ २ ॥ ब्रह्महत्याराशी पातकें अपार । वाल्मीक किंकर वंद्य

केला ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें भजन प्रमाण । काय थोरपण जाळावें तें ॥ ४ ॥

३०३८ ऐका महिमा आवडीची । बोरें खाय भिल्लटीचीं ॥ १ ॥ थोर प्रेमाचा भुकेला । हाचि दुष्काळ तयाला ॥ २ ॥ अष्टमा सिद्धींला । न मनी क्षीरसागराला ॥ ३ ॥ पोहे सुदामदेवाचे । फके मारी कोरडेच ॥ ४ ॥ न म्हणे उच्छिष्ट अथवा थोडें । तुका म्हणे भक्तीपुढें ॥ ५ ॥

३०३९ सोडिला संसार । माया तयावरी फार ॥ १ ॥ धांवे चाले मागें मागें । सुखदुःख साहे अंगें ॥ २ ॥ यानें घ्यावें नाम । तीसीं करणें त्याचें काम ॥ ३ ॥ तुका म्हणे भोळी । विठाई कृपेची कोंवळी ॥ ४ ॥

३०४० बोलों उत्कर्षें । प्रेमरस दासत्वें ॥ १ ॥ साच्च करिता नारायण । जया शरण गेलों तो ॥ २ ॥ समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवी ॥ ३ ॥ तुका म्हणे लडिवाळांचें । द्यावें साचें करूनियां ॥ ४ ॥

३०४१ पाहातां रूप डोळां भरे । अंतरीं नुरे वेगळें । इच्छावशें खेळ मांडी । अवघें सांडी बाहेरी ॥ १ ॥ तो हा नंदानंदन बाइये । यासी काय परिचार वो ॥ २ ॥ दिसतो हा नव्हे तैसा । असे दिशाव्यापक । लाघव हा खोळेसाटीं । होतां भेटी परतेना ॥ ३ ॥ म्हणोनि उभी ठाकलीये । परतलिये या वाटा । आड करोनियां तुका । जो या लोकां दाखवितो ॥ ४ ॥

३०४२ भाविकांचें काज देव अंगें करी । काढी धर्माघरीं उच्छिष्ट तें ॥ १ ॥ उच्छिष्ट तीं फळें खाय भिल्लटीचीं । आवडी तयांचीं मोठी देवा ॥ २ ॥ काय देवा घरीं न मिळेचि अन्न । मागे भाजीपान द्रौपदीसी ॥ ३ ॥ अर्जुनाचीं घोडीं धुतलीं अनंतें । संकटें बहुतें निवा-

रिलीं ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसीं आवडती लडिवाळें । जाणीवेचें काळें तोंड देवा ॥ ५ ॥

३०४३ आपुलिया बळें नाहीं बोलवत । सखा कृपावंत वाचा त्याची ॥ १ ॥ साळुंकी ते कैसी बोले मंजुळ वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥ २ ॥ काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायांविण ॥ ४ ॥

३०४४ आवडीचें दान देतो नारायण । बाहे उभारोन राहिलासे ॥ १ ॥ जें जयासी रुचे तें करी समोर । सर्वज्ञ उदार मायबाप ॥ २ ॥ ठायीं पाडिलिया तेंचि लागे खावें । ठायींचि घ्यावें विचारूनि ॥ ३ ॥ बीज पेरूनियां तेंचि घ्यावें फळ । डोरलीस केळ कैंचें लागे ॥ ४ ॥ तुका म्हणे देवा बोल कांहीं नाहीं । तुझा तूंचि पाहीं शत्रु सखा ॥ ५ ॥

३०४५ बैसोनि निश्चळ करी त्याचें ध्यान । देईल तो अन्न वस्त्र दाता ॥ १ ॥ काय आम्हां करणें अधिक सांचुनी । देव जाला ऋणी पुरविता ॥ २ ॥ दयाळ मायाळ जाणे कळवळा । शरणांगता ळळा राखों जाणे ॥ ३ ॥ नलगे मागणें सांगणें तयासी । जाणे इच्छा तैसी पुरवी त्याची ॥ ४ ॥ तुका म्हणे लेई अळंकार अंगीं । विठ्ठल हा जगीं तूंचि होसी ॥ ५ ॥

३०४६ वर्णावी ते थोरी एका विठ्ठलाची । कीर्ति मानवाची सांगों नये ॥ १ ॥ उदंडचि जाले जन्मोनियां मेले । होऊनियां गेले राव रंक ॥ २ ॥ त्यांचें नाम कोणी नेघे चराचरीं । साही वेद चारी वर्णि-ताती ॥ ३ ॥ अक्षय अढळ चळेना ढळेना । तया नारायणा ध्यात जावें ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्हा विठ्ठल चित्तीं ध्यातां । जन्ममरण व्यथा दूर होती ॥ ५ ॥

३०४७ जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार । येर मांस पर हाता न कळे ॥ १ ॥ देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदुःखें कळों

येती ॥ २ ॥ परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचें कारण एका नये ॥ ३ ॥ एक देहीं भिन्न दावियेल्या कळा । नाचवी पुतळा सूत्र-धारी ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐशी जयाची सत्ता । कां तया अनंता विसर-लेती ॥ ५ ॥

३०४८ न करी त्याचें गांढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ १ ॥ भवसिंधूचा थडवा केला । बोलविला पाहिजे ॥ २ ॥ त्याचे सोई पाउल वेंचं । मग कैंचें आडथळे ॥ ३ ॥ तुका म्हणे खरें खोटें । न म्हणे मोठें लहान ॥ ४ ॥

३०४९ स्वामिकाज गुरुभक्ती । पितृवचन सेवा पती ॥ १ ॥ हेचि विष्णूची महापूजा । अनुभव नाहीं दुजा ॥ २ ॥ सत्य बोले मुखें । दुखवे आणिकांच्या दुःखें ॥ ३ ॥ निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ ४ ॥

३०५० नाहीं काष्ठाचा गुमान । गोंवी भ्रमरा सुमन ॥ १ ॥ प्रेम प्रीतीचें बांधलें । तें न सुटे कांहीं केलें ॥ २ ॥ पदरीं घालीं पिळा । बाप निर्बळ साटी बाळा ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें । भेणें देवें आकारावें ॥ ४ ॥

३०५१ आम्हां घरीं एक गाय दुभताहे । पान्हा न समाये त्रिभुवनीं ॥ १ ॥ वान ते सांवळी नांव तें श्रीधरा । चरे वसुंधरा चौदा भुवनें ॥ २ ॥ वत्स नाहीं माय भलत्यासवें जाय । कुर्वाळी तो लाहे भावभरण ॥ ३ ॥ चहूं धारीं क्षीर वोळली अमुप । धाले सनकादिक सिद्ध मुनी ॥ ४ ॥ तुका म्हणे माझी भूक तेथें काय । जोगाविते माय तीन्ही लोकां ॥ ५ ॥

३०५२ धन्य भावशीळ । ज्याचें हृदय निर्मळ ॥ १ ॥ पूजी प्रतिमेचे देव । संत म्हणती तेथें भाव ॥ २ ॥ विधिनिषेध नेणती । एक निष्ठा धरूनी चित्तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसें देवा । होणें लागे त्यांच्या भावा ॥ ४ ॥

३०५३ त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं । आमचें त्या काई असे ओझें ॥ १ ॥ पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर । तया मुखीं चार कोण घाली ॥ २ ॥ पक्षी अजगर न करी संचित । तयासी अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥ तुका म्हणे तया भार घातलिया । उपेक्षीना दयासिंधु माझा ॥ ४ ॥

३०५४ संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाय विठोबाचे ॥ १ ॥ येणें होय सर्व संसार सुखाचा । नलगे दुःखाचा लेश कांहीं ॥ २ ॥ घेतील तयांसी सोपें आहे सुख । बोलियेलें मुखें नारायणें ॥ ३ ॥ सांगितली सोय करुणासागरें । तुम्हां कां हो बरें न वाटतें ॥ ४ ॥ तुका म्हणे तेणें उपकार केला । भोळ्या भाविकाला तारावया ॥ ५ ॥

३०५५ येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पैं धीर भजन मार्गीं ॥ १ ॥ चंचळ चित्तासी ठेवूनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥ २ ॥ भावाचा पैं भाव धरावा निश्चयें । तेणें भवभय देशधडी ॥ ३ ॥ नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं । आवडीनें गाई सर्वकाळ ॥ ४ ॥ तुका म्हणे धन्य वंश त्या नराचा । ऐसा निश्चयाचा मेरु झाला ॥ ५ ॥

३०५६ पोटापुरतें काम । परि अगत्य तो राम ॥ १ ॥ कारण तें हेंचि करीं । चित्तीं पांडुरंग धरीं ॥ २ ॥ प्रारब्धीं हेवा । जोडी देवाची ते सेवा ॥ ३ ॥ तुका म्हणे बळ । बुद्धि वेचूनि सकळ ॥ ४ ॥

३०५७ कृष्ण गातां गीती कृष्ण ध्यातां चित्तीं । तेही कृष्ण होती कृष्णध्यानें ॥ १ ॥ आसनीं शयनीं भोजनीं जेवितां । म्हणारे हा भोक्ता नारायण ॥ २ ॥ ओंवियें दळणीं गावा नारायण । कांडितां कांडण करितां काम ॥ ३ ॥ नर नारी याति हो कोणी भलती । भावें एका प्रीती नारायणा ॥ ४ ॥ तुका म्हणे एका भावें भजा हरी । कांति ते दुसरी रूप एक ॥ ५ ॥

३०५८ क्षणक्षणा हाचि करावा विचार। तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥ नाशिवंत देह जाणार सकळ। आयुष्य खातो काळ साव-धान ॥ २ ॥ संतसमागमीं धरूनि आवडी। करावी तांतडी पर-मार्थी ॥ ३ ॥ तुका म्हणे इहलोकींच्या वेव्हारें। नये डोळे घुरें भरूनि राहों ॥ ४ ॥

३०५९ नये जरी तुज मधुर उत्तर। दिधला सुस्वर नाहीं देवें ॥ १ ॥ नाहीं तयाविण भुकेला विठ्ठल। येईल तैसा बोल रामकृष्ण ॥ २ ॥ देवापाशीं मागें आवडीची भक्ति। विश्वासेंसीं प्रीति भाव-बळें ॥ ३ ॥ तुका म्हणे मना सांगतों विचार। धरावा निर्धार दिसें दिस ॥ ४ ॥

३०६० साधनें तरी हींच दोन्हीं। जरी कोणी साधील ॥ १ ॥ पर-द्रव्य परनारी। यांचा धरी विटाळ ॥ २ ॥ देव भाग्यें घरा येती। संपत्ती त्या सकळा ॥ ३ ॥ तुका म्हणे तें शरीर। गृह भांडार देवाचें ॥ ४ ॥

३०६१ सांडूनियां सर्व लौकिकाची लाज। आळवा यदुराज भक्तिभावें ॥ १ ॥ पाहुनियां झाडें वरबडूनि पाला। खाऊनि विठ्ठला आळवावें ॥ २ ॥ वेंचूनियां चिंध्या भरूनियां धागा। गुंडाळूनि ढुंगा आळवावें ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें मांडिल्या निर्वाण। तया नारायण उपेक्षीना ॥ ४ ॥

३०६२ भावें गावें गीत। शुद्ध करूनियां चित्त ॥ १ ॥ जरि व्हावा तुज देव। तरि हा सुलभ उपाव ॥ २ ॥ आणिकांचे कानीं। गुण दोष मना नाणीं ॥ ३ ॥ करीं मस्तक ठेंगणा। लागे संतांच्या चरणा ॥ ४ ॥ वेंची तें वचन। जेणें राहे समाधान ॥ ५ ॥ तुका म्हणे फार। थोडा तरी परउपकार ॥ ६ ॥

३०६३ आलिया भोगासी असावें सादर। देवावरी भार घालू-नियां ॥ १ ॥ मग तो कृपासिंधु निवारी सांकडें। येर तें बापुडें काय

रंक ॥ २ ॥ भयाचिये पोटीं दुःखाचिया रासी । शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥ तुका म्हणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

३०६४ तरीच जन्मा यावें । दास विठ्ठलाचे व्हावें ॥ १ ॥ नाहीं तरि काय थोडीं । श्वानशूकरें वापुडीं ॥ २ ॥ ज्याल्याचें तें फळ । अंगीं लागों नेदी मळ ॥ ३ ॥ तुका म्हणे भले । ज्याच्या नांवें मानवलें ॥ ४ ॥

३०६५ निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें । साधन बरवें हेंचि एक ॥ १ ॥ तरीच करील अंगीकार नारायण । बडबड तो सीण येणेंविण ॥ २ ॥ सोइरें पिशुन समानचि घडे । चित्त पर ओढे उपकारीं ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त जालिया निर्मळ । तरिच सकळ केलें होय ॥ ४ ॥

३०६६ जिंकावा संसार । येणें नांवें तरी शूर ॥ १ ॥ येरें काय तीं वापुडीं । कीर अहंकाराचीं घोडीं ॥ २ ॥ पण ऐशा नांवें । देव धरिजे तो भावें ॥ ३ ॥ तुका म्हणे जावें । सत्कीर्तीनें बरवें ॥ ४ ॥

३०६७ मन करा रे प्रसन्न । सर्व सिद्धीचें कारण । मोक्ष अथवा बंधन । सुख समाधान इच्छा ते ॥ १ ॥ मनें प्रतिमा स्थापिली । मनें मना पूजा केली । मनें इच्छा पुरविली । मन माउली सकळांची ॥ २ ॥ मन गुरु आणि शिष्य । करी आपुलेंचि दास्य । प्रसन्न आपआपणास । गति अथवा अधोगति ॥ ३ ॥ साधक वाचक पंडित । श्रोते वक्ते ऐका मात । नाहीं नाहीं आन दैवत । तुका म्हणे दुसरें ॥ ४ ॥

३०६८ मेघवृष्टीनें करावा उपदेश । परि गुरुनें न करावा शिष्य । वांटा लाभे त्यास । केल्या अर्धकर्माचा ॥ १ ॥ द्रव्य वेंचावें अन्नछत्रीं । भूतीं द्यावें सर्वत्र । न घ्यावा हा पुत्र । उत्तम याती पोसणा

॥ २ ॥ बीज न पेरावें खडकीं । ओल नाहीं ज्याचे बुडखीं । थीतां ठके सेखीं । पाठी लागे दिवाण ॥ ३ ॥ गुज बोलावें संतांसी । पत्नी राखावी जैसी दासी । लाड देतां तियेसी । वांटा पावे कर्माचा ॥ ४ ॥ शुद्ध कसूनि पाहावें । वरि रंगा न भुलावें । तुका म्हणे घ्यावें । जया नये तुटी तें ॥ ५ ॥

३०६९ मारगीं चालतां पाउला पाऊलीं । चिंतावी माउली पांडुरंग ॥ १ ॥ सुख लागे घेऊनियां पाठीं । आवडीचा कंठीं रस ओती ॥ २ ॥ पीतांबरें छाया करि लोभापर । पाहे तें उत्तर आवडीचें ॥ ३ ॥ तुका म्हणे हेंचि करावें जीवन । वाचे नारायण तान भूक ॥ ४ ॥

३०७० नका वांटूं मन विधिनिषेधांसी । स्मरावा मानसीं पांडुरंग ॥ १ ॥ खादलिया अन्ना मासी बोळों नये । अवघेंचि जाय एका घांसें ॥ २ ॥ जोडी होते परी ते बहु कठिण । करितां जतन सांभाळावें ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें न मना विषाद । निंबेविण व्याधि तुटों नेणें ॥ ४ ॥

३०७१ पंडित वाचक जरी जाला पुरता । तरी कृष्णकथा ऐकें भावें ॥ १ ॥ क्षीर तुपा साकरे जालिया भेटी । तैसी पडे मिठी गोडपणें ॥ २ ॥ जाणोनियां लाभ घेईं हा पदरीं । गोड गोडावरी सेवीं बापा ॥ ३ ॥ जाणिवेचें मूळ उपडोनी खोड । जरी तुज चाड आहे तुझी ॥ ४ ॥ नाना परिमळ द्रव्य उपचार । अंगीं उटी सार चंदनाची ॥ ५ ॥ जेविलियाविण शून्य ते शृंगार । तैसी गोडी हरिकथेविण ॥ ६ ॥ ज्याकारणें वेदश्रुति हीं पुराणें । तेंचि विठ्ठल नाणें तिष्ठे कथे ॥ ७ ॥ तुका म्हणे येर दगडांचीं पेवें । खळखळ आघवें मूळ तेथें ॥ ८ ॥

३०७२ भाग्यवंत म्हणों तया । शरण गेले पंढरिराया ॥ १ ॥ तरले तरती हा भरवंसा । नामधारकांचा ठसा ॥ २ ॥ भुक्तिमुक्तीचें

तें स्थळ। भोळे भाविकां निर्मळ ॥ ३ ॥ गाइलें पुराणीं। तुका म्हणे वेदवाणी ॥ ४ ॥

३०७३ नको सांडूं अन्न नको सेवूं वन। चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥ मातेचिये खांदीं बाळ नेणे सीण। भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ २ ॥ नको गुंफों भोगीं नको पडों त्यागीं। लावुनि सरें अंगीं देवाचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे नको पुसों वेळोवेळां। उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ४ ॥

३०७४ निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म। निर्धार हें वर्म चुकों नये ॥ १ ॥ निष्काम निश्चळ विठ्ठलीं विश्वास। पाहों नये वास आणिकांची ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसा कोण उपेक्षिला। नाहीं ऐकिला ऐसा कोणीं ॥ ३ ॥

३०७५ कृपेचीं उत्तरें देवाचा प्रसाद। आनंदें आनंद वाढवावा ॥ १ ॥ बहुतांच्या भाग्यें लागलें जाहाज। येथें आतां काज लवलाहो ॥ २ ॥ अलभ्य तें आलें दारावरी फुका। येथें आतां चुका न पाहिजे ॥ ३ ॥ तुका म्हणे जिव्हा श्रवणाच्या द्वारें। माप भरा बरें सिगेवरी ॥ ४ ॥

३०७६ परस्त्रीतें म्हणतां माता। चित्त लाजवितें चित्ता ॥ १ ॥ काय बोलोनियां तोंडें। मनामाजीं कानकोंडें ॥ २ ॥ धर्मधारिष्टगोष्टी सांगे। उष्ट्या हातें नुडवी काग ॥ ३ ॥ जें जें कर्म वसे अंगीं। तें तें आठवे प्रसंगीं ॥ ४ ॥ बोले तैसा चाले। तुका म्हणे तो अमोल ॥ ५ ॥

३०७७ ब्रह्मचारीधर्म घोकावें अक्षर। आश्रमीं विचार षट्कर्में ॥ १ ॥ वानप्रस्थ तरी संयोगीं वियोग। संन्यास तो त्याग संकल्पाचा ॥ २ ॥ परमहंस तरी जाणे सहज वर्म। तेथें याति धर्म कुळ नाहीं ॥ ३ ॥ बोले वर्म जो चाले याविरहित। तो जाणा पतित श्रुति बोले ॥ ४ ॥ तुका म्हणे कांहीं नाहीं नेमाविण। मोकळा तो सीण दुःख पावे ॥ ५ ॥

३०७८ कामिनीसी जैसा आवडे भ्रतार। इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ १ ॥ तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं। लागलिया नाहीं गर्भवास ॥ २ ॥ दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन। आणिक जीवन तृषाक्रांता ॥ ३ ॥ कामातुर जैसा भय लज्जा सांडोनी। आवडे कामिनी सर्व भावें ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसी राहिली आवडी। पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

३०७९ लटिका तो प्रपंच एक हरि साच। हरिविण आहाच सर्व इंद्रियें ॥ १ ॥ लटिकें तें मौन भ्रमाचें तें स्वप्न। हरिविण ध्यान नश्वर अवघें ॥ २ ॥ लटिकिया वित्पत्ति हरिविण करिती। हरि नाहीं चित्तीं तो शव जाणा ॥ ३ ॥ तुका म्हणे हरि हे धरिसी निर्धारीं। तरी तूं झडकरी जासी वैकुंठा ॥ ४ ॥

३०८० काळ सारावा चिंतनें। एकांतवासीं गंगास्नानें। देवाचें पूजन। प्रदक्षणा तुळसीच्या ॥ १ ॥ युक्त आहार विहार। नेम इंद्रियांचा सार। नसावी वासर। निद्रा बहु भाषण ॥ २ ॥ परमार्थ महाधन। जोडी देवाचे चरण। व्हावया जतन। हे उपाय लाभाचे ॥ ३ ॥ देह समर्पिजे देवा। भार कांहींच न घ्यावा। होइल आघवा। तुका म्हणे आनंद ॥ ४ ॥

३०८१ घ्यारे लुटी प्रेमसुख। फेडा आजि धणी। चुकला तो मुकला। जाली वेरझार हाणी ॥ १ ॥ घाला घातला वैकुंठीं। करूनियां जीवें साटी। पुरविली पाठी। वैष्णवीं काळाची ॥ २ ॥ अवघें आणिलें अंबर। विठोसहित तेथें धुर। भेटूनि जिव्हार। नाम वाणी धरियेला ॥ ३ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण। अवघीं जालीं गहन। केलीं पापपुण्यें। देशधडी वापुडीं ॥ ४ ॥ आनंदें गर्जती निर्भर। घोष करिती निरंतर। कांपती असुर। वीर कवणा नागवती ॥ ५ ॥ जें दुर्लभ ब्रम्हादिकां। आजि सांपडलें फुका। घ्यारे म्हणे तुका। सावचित्त होऊन ॥ ६ ॥

३०८२ देव सखा जरी । जग अवघें कृपा करी ॥ १ ॥ ऐसा असोनि अनुभव । कासाविस होती जीव ॥ २ ॥ देवाची जतन । त्यासी वाधूं न शके अग्न ॥ ३ ॥ तुका म्हणे हरि । प्रल्हादासी यत्न करी ॥ ४ ॥

३०८३ जीव जीती जीवनासंगें । मत्स्या मरण त्या वियोगें ॥ १ ॥ जया जिच्तीं जैसा भाव । तयां जवळीं तैसा देव ॥ २ ॥ सकळां पढिये भानु । परि त्या कमळाचें जीवनु ॥ ३ ॥ तुका म्हणे माता । वाहे तान्हयाची चिंता ॥ ४ ॥

३०८४ कस्तूरीचे अंगीं मिनली मृत्तिका । मग वेगळी कां येईल लेखूं ॥ १ ॥ तयापरी भेद नाहीं देवभक्तीं । संदेहाच्या युक्ती सरों द्याव्या ॥ २ ॥ इंधनें ते आगी संयोग्याच्या गुणें । सागरा दरुपणें वाहाळ तोंचि ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें साक्षीचें वचन । येथें तों कारण शुद्ध भाव ॥ ४ ॥

३०८५ दुर्बळा वाणीच्या एक दोन सिद्धी । सदैवा समाधी हरिरंगीं ॥ १ ॥ काय त्याचें वांयां गेलें तें एक । सदा प्रेमसुख सर्व-काळ ॥ २ ॥ तीर्थ देव दुरी तया भाग्यहीना । विश्व त्या सज्जना दुमदुमिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे एक वाहाती मोळीया । भाग्यें आग-ळिया घरा येती ॥ ४ ॥

३०८६ वैद्य वांचविती जीवा । तरी कोण ध्यातें देवा ॥ १ ॥ काय जाणे कैसी परी । प्रारब्ध तें ठेवी उरी ॥ २ ॥ अंगीं दैवत संचरे । मग तेथें काय उरे ॥ ३ ॥ नवसें कन्या पुत्र होती । तरी कां करणें लागे पती ॥ ४ ॥ जाणे हा विचार । स्वामी तुकयाचा दातार ॥ ५ ॥

३०८७ एकादशीस अन्नपान । जे नर करिती भोजन । श्वान विष्ठेसमान । अधम जन तो एक ॥ १ ॥ ऐका व्रताचें महिमान । नेमें आचरिती जन । गाती ऐकती हरिकीर्तन । ते समान विष्णूशीं ॥ २ ॥ अशुद्ध विटाळशीचें खळ । विडा भक्षितां तांबूल । सांपडे

सबळ । काळाहातीं न सुटे ॥ ३ ॥ सेजबाज विलास भोग । करी कामिनीसी संग । तया जोडे क्षयरोग । जन्मव्याधी बळिवंत ॥ ४ ॥ आपण न वजे हरीकीर्तना । आणिकां वारीं जातां जना । त्याच्या पापा जाणां । महा मेरु ठेंगणा ॥ ५ ॥ तया दंडी यमदूत । जाले तयांचे अंकित । तुका म्हणे व्रत । एकादशी चुकलीया ॥ ६ ॥

३०८८ धाकुट्याचे मुखीं घांस घाली माता । वरी करी सत्ता शाहणियां ॥ १ ॥ ऐसें जाणपणें पडिलें अंतर । वाटे तों तों थोर अंतराय ॥ २ ॥ दोन्ही उभयतां आपणचि व्याली । आवडीची चाली भिन्न भिन्न ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगापासूनि निराळें । निवडिलें बळें रडतें स्तनीं ॥ ४ ॥

३०८९ पाषाण परिस भूमि जांबूनद । वंशांचा संबंध घातयाचा ॥ १ ॥ सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा राक्षसांचा ॥ २ ॥ ऐशीं सहस्र त्या सुंदरा कामिनी । माजी मुखरणी मंदोदरी ॥ ३ ॥ पुत्रपौत्रांचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हारी इंद्रा आणी ॥ ४ ॥ चौदाचौकडिया आयुष्य गणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥ ५ ॥ तुका म्हणे ज्याचे देव बांदवडी । सांगातें कवडी गेली नाहीं ॥ ६ ॥

३०९० अभिमानाचें तोंड काळें । दावी बळें अंधार ॥ १ ॥ लाभ न्यावा हातोहातीं । तोंडी माती पडोनी ॥ २ ॥ लागलीसे पाठी लाज । झालें काज नासाया ॥ ३ ॥ तुका म्हणे कुश्चळ मनीं । विटंबनीं पडलीं तीं ॥ ४ ॥

३०९१ न पालटे जाती जीवाचिये साटीं । वाहे तेंचि पोटीं दावी वरी ॥ १ ॥ अंतरीं सबाहीं सारिखाच रंग । वीट आणि भंग नाहीं रसा ॥ २ ॥ घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणे धीरा आपुलीया ॥ ३ ॥ तुका म्हणे कढे करावी शीतळ । ऐसें जातिबळ चंदनाचें ॥ ४ ॥

३०९२ प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । अनुभव चित्ता चित्त जाणें ॥१॥ कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी । दुधा नाहीं भेटी अंग-संगें ॥ २ ॥ पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा । उपजत लपा म्हण-ऊनि ॥ ३ ॥ बोलों नेणें परी जाणे गोड क्षार । अंतरीं विचार त्यासी ठावा ॥ ४ ॥ तुका म्हणे वरें विचारावें मनीं । आणीक भल्यांनीं धुसों नये ॥ ५ ॥

३०९३ जन देव तरी पायांची पडावें । त्याचिये स्वभावें चाड नाहीं ॥ १ ॥ अग्नीचि सौजन्य शीत निवारण । पालवीं बांधोनि नेतां नये ॥ २ ॥ तुका म्हणे विंचू सर्प नारायण । वंदावे दुरोनि शिवों नये ॥ ३ ॥

३०९४ गंगेचिया अंताविण काय चाड । आपुलें तें कोड तृषे-पाशीं ॥ १ ॥ विठ्ठल हे मूर्ति साजिरी सुंदर । घालीं निरंतर हृदय-पुटीं ॥ २ ॥ कारण तें असे नवनीतापाशीं । गबाळ तें सोसी इतर कोण ॥ ३ ॥ बाळाचे सोई तें घांस घाली माता । अट्टाहास चिंता नाहीं तया ॥ ४ ॥ गाऊं नाचों करूं आनंद सोहळा । भावाचि वेगळा नाहीं आतां ॥ ५ ॥ तुका म्हणे अवघें जालें एकमय । परलोकाची काय चाड आतां ॥ ६ ॥

३०९५ लागलिया मुख स्तना । घाली पान्हा माउली ॥ १ ॥ उभयतां आवडी लाड । कोडें कोड पुरतसे ॥ २ ॥ मेळवितां अंगें अंग । प्रेमें रंग वाढतो ॥ ३ ॥ तुका म्हणे जड भारी । अवघें शिरीं जननीचे ॥ ४ ॥

३०९६ पाठीं पोटीं देव । कैंचा हरिदासां भेव ॥ १ ॥ करा आनंदें कीर्तन । नको आशंकित मन ॥ २ ॥ एथें कोठें काळ । करील देवा-पाशीं बळ ॥ ३ ॥ तुका म्हणे धनी । सपुरता काय वाणी ॥ ४ ॥

३०९७ भाव देवाचें उचित । भाव तोचि भगवंत ॥ १ ॥ धन्य धन्य शुद्ध जाती । संदेह कैंचा तेथें चित्तीं ॥ २ ॥ बहुत वराडी ।

देवावरी ते आवडी ॥ ३ ॥ तुका म्हणे हें रोकडें । लाभा अधिकारी चोखडें ॥ ४ ॥

३०९८ गंधर्वनगरीं क्षण एक राहावें । तेंचि पैं करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥ खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मी नारायणा तोषवावें ॥ २ ॥ वंध्यापुत्राचा लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ ३ ॥ मृगजळां पोहीं घालूनि सज्ञाना । तापलिया जना निववावें ॥ ४ ॥ तुका म्हणे मिथ्या देहेंद्रिय कर्म । ब्रम्हार्पणें ब्रम्ह होय बापा ॥ ५ ॥

३०९९ ज्यानें ज्यानें जैसें ध्यावें । तैसें व्हावें कृपाळें ॥ १ ॥ सगुणनिर्गुणांचा ठाव । विटे पाव धरियेले ॥ २ ॥ अवघें सावरेंचें अंग । नये व्यंग निवडितां ॥ ३ ॥ तुका म्हणे जें जें करी । तें तें हरि भोगिता ॥ ४ ॥

३१०० चहूं आश्रमांचे धर्म । न राखतां जोडे कर्म ॥ १ ॥ तैसी नव्हे भोळी सेवा । एक भावाचि कारण देवा ॥ २ ॥ तपें इंद्रियां आघात । क्षणें एका वाताहात ॥ ३ ॥ मंत्र चळे थोडा । तरी धडाचि होय वेडा ॥ ४ ॥ व्रतें करितां सांग । तरि एक चुकतां भंग ॥ ५ ॥ धर्म सत्वचि कारण । नाहीं तरी केला सीण ॥ ६ ॥ भूतदयेसी आघात । उंचनीच वाताहात ॥ ७ ॥ तुका म्हणे दुजें । विधिनिषेधाचें ओझें ॥ ८ ॥

३१०१ नव्हों वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले । भलते द्यावे पाले भलत्यासी ॥ १ ॥ कुपथ्य करूनि विटंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्याची ॥ २ ॥ तुका म्हणे लासूं फासूं देऊं डाव । सुखाचा उपाव पुढें आहे ॥ ३ ॥

३१०२ अवघ्या वाटा जाल्या क्षीण । कळीं न घडे साधन । उचित विधी विधान । न कळे न घडे सर्वथा ॥ १ ॥ भक्तिपंथ बहु सोपा । पुण्य नागवे या पापा । येणें जाणें खेपा । येणेंचि एक खंडती ॥ २ ॥ उभारोनि बाहे । विठो पालवीत आहे । दासां भीच साहे ।

मुखें बोले आपुल्या ॥ ३ ॥ भाविक विश्वासी । पार उतरिलें त्यांसी । तुका म्हणे नासी । कुतर्क्यांचे कपाळीं ॥ ४ ॥

३१०३ पवित्र सोंवळीं । एक तींच भूमंडळीं ॥ १ ॥ ज्यांचा आवडता देव । अखंडित प्रेमभाव ॥ २ ॥ तींच भाग्यवंतें । सरतीं पुरतीं धनवित्तें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ४ ॥

३१०४ तीर्थी धोंडा पाणी । देव रोकडा सज्जनीं ॥ १ ॥ मिळालिया संतसंग । समर्पितां भले अंग ॥ २ ॥ तीर्थी भाव फळे । येथें उनाड तें वळे ॥ ३ ॥ तुका म्हणे पाप । गेलें गेल्या कळे ताप ॥ ४ ॥

३१०५ एक परी बहिर बरें । परि तीं ढोरें ग्यानगंडें ॥ १ ॥ कपाळास लागली अगी । अभागी कां जीतसे ॥ २ ॥ एके परी बरें वेडें । तार्किक कुडें जळो तें ॥ ३ ॥ तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ४ ॥

३१०६ केला मातीचा पशुपति । परि मातीसि काय महंती । शिवपूजा शिवासी पावे । माती मातीमाजीं सामावे ॥ १ ॥ तैसे पूजिती आम्हां संत । पूजा घेतो भगवंत । आम्ही किंकर संतांचे दास । संतपदवी नको आम्हांस ॥ २ ॥ केला पाषाणाचा विष्णु । परी पाषाण नव्हे विष्णु । विष्णुपूजा विष्णूसि अर्पे । पाषाण राहे पाषाणरूपें ॥ ३ ॥ केली कांशाची जगदंबा । परि कांसे नव्हे अंबा । पूजा अंबेची अंबेला घेणें । कांसें राहे कांसेपणें ॥ ४ ॥ ब्रह्मानंद पूर्णामाजीं । तुका म्हणे केली कांजी । ज्याची पूजा तेणेंचि घेणें । आम्हीं पाषाणरूप राहाणें ॥ ५ ॥

३१०७ मृगाचिये अंगीं कस्तूरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १ ॥ भाग्यवंत घेती वेंचूनियां मोलें । भारवाही मेले वाहतां ओझें ॥ २ ॥ चंद्रामृतें तृप्ती पारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥ अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षावंता दृष्टी

रत्न जैसें ॥ ४ ॥ तुका म्हणे काय अंधळीया हातीं । दिलें जैसें मोतीं वायां जाय ॥ ५ ॥

३१०८ निगमाचें वन । नका शोधूं करूं शीण ॥ १ ॥ याचें गौळियांचे घरीं । बांधलेसे दावेंवरी ॥ २ ॥ पीडलेती भ्रमें । वाट न कळतां वर्मे ॥ ३ ॥ तुका म्हणे भार । माथा टाका अहंकार ॥ ४ ॥

३१०९ ऐका ऐका भाविक जन । कोण कोण व्हाल ते ॥ १ ॥ तार्किकांचा टाका संग । पांडुरंग स्मरा हो ॥ २ ॥ नका शोधूं मतांतरें । तुमचें खरें बुडाल ॥ ३ ॥ कलीमध्यें दास तुका । जातो लोकां सांगत ॥ ४ ॥

३११० अधीरा माझ्या मना ऐकें एक मात । तूं कां रे दुश्चित निरंतर ॥ १ ॥ हेचि चिंता काय खावें म्हणऊनि । भले तुजह्वनि पक्षिराज ॥ २ ॥ पाहा तें चातक नेघे भूमिजळा । वरुषे उन्हाळा मेघ तया ॥ ३ ॥ अवघ्यायाती ठक आगळा सोनार । त्यावरी व्यापार झारियाचा ॥ ४ ॥ तुका म्हणे जळीं वनीं जीव एक । तयापाठीं लेख काय असे ॥ ५ ॥

३१११ न करीं रे मना कांहींच कल्पना । चिंतीं या चरणां विठो-बाच्या ॥ १ ॥ येथें सुखाचिया अमुपचि राशी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥ २ ॥ सुखाचें ओतिलें साजिरें श्रीमुख । शोक मोह दुःख पाहतां नाहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें होईल विसांवा । तुटतील हांवा पुढिलिया ॥ ४ ॥

३११२ हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हा-वली ॥ १ ॥ तेथें माझ्या मना होईं पक्षिराज । साधावया काज तृप्तीचें या ॥ २ ॥ मुळींचिया बीजें दाखविली गोडी । लाहो करीं जोडी जालियाची ॥ ३ ॥ तुका म्हणे क्षणक्षणां जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥

३११३ जळो ते जाणीव जळो ते शाहाणीव । राहो माझा भाव

विठ्ठलपायीं ॥ १ ॥ जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ॥ २ ॥ जळो हा लौकिक जळो दंभ मान । लागो जीवा ध्यान विठ्ठलाचें ॥ ३ ॥ जळो हें शरीर जळो हा संबंध । राहो परमानंद माझ्या कंठीं ॥ ४ ॥ तुका म्हणे येथें अवघेंचि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥ ५ ॥

३११४ घेईं घेईं माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥ तुम्हीं घ्या रे डोळे सुख । पाहा विठोबाचें मुख ॥ २ ॥ तुम्ही ऐका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ३ ॥ मना तेथें धांव घेईं । राहें विठोबाचे पायीं ॥ ४ ॥ तुका म्हणे जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

३११५ आम्ही तेणें सुखी । म्हणा विठ्ठल विठ्ठल मुखीं ॥ १ ॥ तुमचें येर वित्त धन । तें मज मृत्तिकेसमान ॥ २ ॥ कंठीं मिरवा तुळसी । व्रत करा एकादशी ॥ ३ ॥ म्हणवा हरीचे दास । तुका म्हणे मज हे आस ॥ ४ ॥

३११६ बोलावा विठ्ठल पाहावा विठ्ठल । करावा विठ्ठल जीवभाव ॥ १ ॥ येणें सोसें मन झालें हांवभरी । परती माघारी घेत नाहीं ॥ २ ॥ बंधनापासूनी उकलली गांठी । देतां आली मिठी सावकाशें ॥ ३ ॥ तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें । कामक्रोधें केलें घर रितें ॥ ४ ॥

३११७ दाता तो एक जाणा । नारयणा स्मरवी ॥ १ ॥ आणीक नासिवंतें काय । न सरे हाय ज्यांच्यानें ॥ २ ॥ यावें तयां काकुलती । जे दाविती सुपंथ ॥ ३ ॥ तुका म्हणे उरी नुरे । त्याचे खरे उपकार ॥ ४ ॥

३११८ कोण त्याचा पार पावला धुंडितां । पुढें विचारितां विश्वंभरा ॥ १ ॥ अणुरेणु सूक्ष्मस्थूळा पार नाहीं । श्रुती नेती त्याही खुंटलिया ॥ २ ॥ फळांत कीटक एवढें आकाश । ऐसीं तरुवरास

अनेक किती ॥ ३ ॥ दाविलें अनंतें अर्जुनासी पोटीं । आणीक त्या सृष्टी कृष्ण लोक ॥ ४ ॥ तुका म्हणे लागा संतांचिया कासे । ठाव घेतां कैसे वांचा जीवें ॥ ५ ॥

३११९ ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठी । तरि कां हिंपुटीं वेद-शास्त्रें ॥ १ ॥ शास्त्रांचें भांडण जप तीर्थाटण । उर्वीचें भ्रमण याच-साठीं ॥ २ ॥ याचसाठीं जप याचसाठीं तप । व्यासेंही अमुप ग्रंथ केले ॥ ३ ॥ याचसाठीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका म्हणे ॥ ४ ॥

३१२० चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती । व्याघ्रही न खाती सर्प तया ॥ १ ॥ विष तें अमृत आघात तें हित । अकर्तव्य नीत होत त्यासी ॥ २ ॥ दुःख तें देईल सर्व सुख फळ । होतील शीतळ अग्नि-ज्वाळा ॥ ३ ॥ आवडेल जीवां जीवाचिये परी । सकळां अंतरीं एक भाव ॥ ४ ॥ तुका म्हणे कृपा केली नारायणें । जाणिजेतें येणें अनुभवें ॥ ५ ॥

३१२१ भक्तीविण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःख-मूळ ॥ १ ॥ वीस लक्ष योनि वृक्षामाजीं घ्याव्या । जळचरीं भोगाव्या नव लक्ष ॥ २ ॥ अकरा लक्ष योनि किड्यामाजीं घ्याव्या । दश लक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें ॥ ३ ॥ तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवा भीतरीं चार लक्ष ॥ ४ ॥ एक एक योनि कोटि कोटि फेरा । मनुष्यदेहाचा वारा मग लागे ॥ ५ ॥ तुका म्हणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

३१२२ जळो जळो तें गुरुपण । जळो जळो तें चेलेपण ॥ १ ॥ गुरु आला वेशीद्वारीं । शिष्य पळतो खिडोरीं ॥ २ ॥ काशासाठीं झालें येणें । त्याचें आलें वर्षासन ॥ ३ ॥ तुका म्हणे चेला । गुरु दोघेही नरकाला ॥ ४ ॥

३१२३ गुरुपादाग्रींचें जळ । त्यासी मानीं जो विटाळ ॥ १ ॥

संतीं चाळिला जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥ २ ॥ गुरुतीर्थीं अभिमान । यथासांग मद्यपान ॥ ३ ॥ गुरुअंगुष्ठा न चोखी । मुख घाली वेश्येमुखीं ॥ ४ ॥ तुका म्हणे सांगों किती । मुखीं पडो त्याचे मातीं ॥ ५ ॥

३१२४ पायां जाला नारू । तेथें बांधला कापुरू । तेथें बिबव्याचें काम । अधमासी तों अधम ॥ १ ॥ रुसला गुलाम । धणी करितो सलाम । तेथें चाकराचें काम । अधमासी तों अधम ॥ २ ॥ रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी । तेथें वटकीचें काम । अधमासी तों अधम ॥ ३ ॥ देव्हाऱ्यावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला । तेथें पैजारेचें काम । अधमासी तों अधम ॥ ४ ॥ तुका म्हणे जाती । जातीसाठीं खाती माती ॥ ५ ॥

३१२५ पाहोनियां ग्रंथ करावें कीर्तन । तेव्हां आलें जाण फळ त्याचें ॥ १ ॥ नाहीं तरी वांयां केली तोंडपिटी । उरी ते शेवटीं उरलीसे ॥ २ ॥ पढोनियां वेद हरिगुण गावे । ठावें तें जाणावें तेव्हां झालें ॥ ३ ॥ तपतीर्थाटणें तेव्हां कार्यसिद्धि । स्थिर राहे बुद्धि हरिच्या नामीं ॥ ४ ॥ यागयज्ञादिक काय दानधर्म । तरी फळ नाम कंठीं राहे ॥ ५ ॥ तुका म्हणे नको कावाडाचे भरी । पडों सार धरीं हेंचि एक ॥ ६ ॥

३१२६ गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ॥ १ ॥ मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ २ ॥ आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ ३ ॥ तुका म्हणे आळी । जेवीं नुरेचि वेगळी ॥ ४ ॥

३१२७ ब्रह्मनिष्ठ काडी । जरी जीवानावें मोडी ॥ १ ॥ तया घडली गुरुहत्या । गेला उपदेश तो मिथ्या ॥ २ ॥ सांगितलें कानीं । रूप आपुलें वाखाणीं ॥ ३ ॥ भूतांच्या मत्सरें । ब्रह्मज्ञान नेलें चोरें ॥ ४ ॥ शिकल्या सांगे गोष्टी । भेद क्रोध वाहे पोटीं ॥ ५ ॥ निंदा स्तुति स्तवनीं । तुका म्हणे वेंची वाणी ॥ ६ ॥

३१२८ धांवे माते सोई। बाळ न विचारितां कांहीं ॥ १ ॥ मग त्याचें जाणे निकें। अंग वोडवी कौतुकें ॥ २ ॥ नेणे सर्प दोरी। अंगीं भलतें हातीं धरी ॥ ३ ॥ तीविणें तें नेणे। आणीक कांहीं तुका म्हणे ॥ ४ ॥

३१२९ पाहा रे हें दैवत कैसें। भक्तिपिसें भाविक ॥ १ ॥ पाचारिल्या सारिसें पावे। ऐसें सेवे वराडी ॥ २ ॥ शुष्क काष्टीं गुरगुरी। लाज हरी न धरितां ॥ ३ ॥ तुका म्हणे अर्धनारी। ऐसीं धरीं रुपडीं ॥ ४ ॥

३१३० हरिच्या दासां भये। ऐसें बोलों तेंही नये ॥ १ ॥ राहोनियां आड। उभा देव पुरवी कोड ॥ २ ॥ हरिच्या दासां चिंता। अघटित हे वार्ता ॥ ३ ॥ खावें ल्यावें द्यावें। तुका म्हणे पुरवावें ॥ ४ ॥

३१३१ वेश वंदायापुरते। कोण ब्राह्मण निरुते ॥ १ ॥ ऐसें सांगा मजपाशीं। संता निरावितों येविशीं ॥ २ ॥ असा जी प्रवीण। ग्रंथीं कळे शुद्ध हीण ॥ ३ ॥ तुका म्हणे लोपें। सत्याचिया घडती पापें ॥ ४ ॥

३१३२ बहुतां जन्मींचें संचित। सबळ होय जरि बहुत ॥ तरिचि होय हरिभक्त। कृपावंत मानसीं ॥ १ ॥ म्हणवी म्हाणियारा तयांचा। दास आपुल्या दासांचा ॥ अनुसरले वाचा। काया मनें विठ्ठलीं ॥ २ ॥ असे भूतदया मानसीं। अवघा देखे हृषीकेशी ॥ जीवें न विसंबे त्यासी। मागें सांगें हिंडतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे निर्विकार। शरणागतां वज्रपंजर। जे जे अनुसरले नर। तयां जन्म चुकलें ॥ ४ ॥

३१३३ झविली महारें। त्याची व्याली असें पोरें ॥ १ ॥ करी संतांचा मत्सर। कोपें उभारोनि कर ॥ २ ॥ बीज तैसें फळ। वरी आलें अमंगळ ॥ ३ ॥ तुका म्हणे ठावें। ऐसें झालें अनुभवें ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

३१३४ येथें येऊनि केलें कायी। विठ्ठल नाहीं आठविला ॥ १ ॥

हारे मूढा भाग्यहीना । गेलासी पतना मोहभ्रमें ॥ २ ॥ नाहीं
ही सुटिका कांहीं । येचि प्रवाहीं पाडिलासी ॥ ३ ॥ निळा म्हणे
लाहोनि हातीं । केली माती आयुष्या ॥ ४ ॥

३१३५ नाहीं विठोबाचें प्रेम । गार्णाव श्रम वृथाचि तो ॥ १ ॥
काय करिती आपुल्या दैवा । भुली वैभवा जाणिवेच्या ॥ २ ॥ भरावें
पोट हेंचि जाणती । नरदेहा धाडिती व्यर्थ वायां ॥ ३ ॥ निळा म्हणे
गिळिलें कर्में । पुढें मरणजन्में अनिवारें ॥ ४ ॥

३१३६ आतां तरी विचार करीं । ध्यायीं अंतरीं विठ्ठला ॥ १ ॥
नाहीं तरी व्यर्थचि जासी । पुढें चौऱ्यांशीं भोगावया ॥ २ ॥ जिणें
मरण याहुनी दुःख । कोणतें अधिक सांग पां ॥ ३ ॥ निळा म्हणे
जरा व्याधी । नाना उपाधी दरिद्रें ॥ ४ ॥

३१३७ पुढें जाणवेल हें पहातां । अंगा येतां क्षीणत्व ॥ १ ॥ मग
तो न लगे कांहीं हातीं । होईल माती आयुष्या ॥ २ ॥ म्हणोनियां करा
वेग । धरा अनुराग हरिभजनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पुढिल वेळ ।
आहे अति काळ कठिण तो ॥ ४ ॥

३१३८ येऊनियां नरदेहा । कांहीं स्वहित तें पहा ॥ १ ॥ नाहीं
तरी व्यर्थ जन्म । चिंतितसे विषयकाम ॥ २ ॥ पशु विषय सेविती ।
तयापरी तुझी स्थिति ॥ ३ ॥ निळा म्हणे व्यर्थ गेला । प्राणि भूमिभार
झाला ॥ ४ ॥

३१३९ विश्वास याचा न वाटे जया । विन्मुख तया नरदेहो ॥ १ ॥
जाईल भोगावया योनी । दुःखदायिनी चौऱ्यांशीं ॥ २ ॥ पुढती जन्म
पुढती मरण । पुढती पतन अधःपात ॥ ३ ॥ निळा म्हणे पडती फेरा ।
यातना थोर भोगावया ॥ ४ ॥

३१४० आहारे काय जोडी केली । नर्कासी धाडिलीं उभय कुळें
॥ १ ॥ उपजतां तुज संतोषले सर्व । बुडविलें नांव त्यांचेंही त्वां
॥ २ ॥ असत्याची वाचे सदा रावणुक । चोरी सिनाळिक न संडसी

॥ ३ ॥ निळा म्हणे वृथा हाहाभूत जन्म । केला ऐसें अकर्म आ[illegible]रोनी ॥ ४ ॥

३१४१ गुंतली ते आशा । पडिली मोहजाळ फांसा ॥ १ ॥ न[illegible] देखोनियां श्रीहरी । कर्ता भोक्ता संसारीं ॥ २ ॥ अवघींचि त्याचि सत्ता । करवी करितो तत्वता ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसीं । नेणोनि होतीं कासाविसी ॥ ४ ॥

३१४२ उत्तम अधम जया जे संगती । तैसी त्याचि मति फांकों लागे ॥ १ ॥ सज्जना संगतीं धर्म क्रिया वाढे । पापिया आवडे पापबुद्धि ॥ २ ॥ म्हणोनि जैसिया तैसा झाला हरी । भक्ता मित्र वैरि निंदकाला ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणे अंतरींचा भाव । तया तैसा देव फळदाता ॥ ४ ॥

३१४३ नयेचि साच हा प्रतीति । असोनियां मूर्ती भगवंत ॥ १ ॥ कर्माकर्मीं लागलीं पाठी । बैसले दृष्टीं मळ त्यांचे ॥ २ ॥ सत्याचि परि तें असत्य वाटे । भोगिती अदृष्टें आपुलालीं ॥ ३ ॥ निळा म्हणे कर्मतंत्रीं । गुंतलीं यंत्रीं मायेच्या ॥ ४ ॥

३१४४ अवघियाचे ज्ञानें अवघेंचि जाणे । परि एक नेणे आत्मज्ञान ॥ १ ॥ बोल तितुके बोलचि वरी । परि न चढे पायरी प्राप्तीची ॥ २ ॥ आपुलेंचि हित आपण नेणे । वरी आणिकां शाहाणें करूं धांवे ॥ ३ ॥ निळा म्हणे ठाकुनी लोकां । आपणहि नको जात सर्वे ॥ ४ ॥

३१४५ पाप तया नांव परदारागमन । पाप तें परधन अपहार ॥ १ ॥ पाप तेंचि निंदा परपीडा द्वेष । पाप तेंचि उपहास पुढिलाचें ॥ २ ॥ पाप तेंचि जीवीं विषयाची आसक्ति । पाप अभक्ति कुळाचारीं ॥ ३ ॥ निळा म्हणे पाप मुख्य तेंचि साचें । नावडे देवाचें नाम मुखीं ॥ ४ ॥

३१४६ जें जें करिती तें तें वृथा । पंढरिनाथा न भजतां ॥ १ ॥

ऐसे पुढें परी तें माया । जाइल विलया क्षणमात्रें ॥ २ ॥ पुत्र पत्नी बंधु पशु । भासे अभासु परि मिथ्या ॥ ३ ॥ निळा म्हणे वित्त गोत । नेणसी नाशवंत हें सकळ ॥ ४ ॥

३१४७ सांगितलें वर्म एवढेंचि करीं । नित्यता उच्चारीं हरिचें नाम ॥ १ ॥ न लगे कोठें जाणें येणें । कर्मबंधनें तुटतील ॥ २ ॥ योगसाधन पवनाभ्यास । न करीं सायास अडचणी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीच्या नामें । चुकती जन्में या प्रहरा ॥ ४ ॥

३१४८ सकळ साधनां वरिष्ठ सार । विठ्ठल नामाचा उच्चार । आणखी नका वोरबार । शीणचि उरेल पुढती ॥ १ ॥ धांवा म्हणोनि अवघे वेगीं । चित्तचि ठेवा पांडुरंगीं । संसाराचि तुटेल मागी । फिटेल धगी त्रिविध तापा ॥ २ ॥ आवडी नाचतां पैं गातां । पांडुरंग प्रेमदाता । अवघी तोडूनियां चिंता । करील माथा बैसणें ॥ ३ ॥ ऐसें जाणोनियां निरुती । करा हरिनामें आवृत्ति । मग हा कळिकाळाचे हातीं । नेदिल तुम्हां सर्वथा ॥ ४ ॥ निळा म्हणे सुगम ऐसें । संतीं दाविलें सौरसें । जतन करिती जे मानसें । ते तों पावती सर्वथा ॥ ५ ॥

३१४९ सांगितलें संतजनीं । उगवुनी कानीं बिजाक्षरें ॥ १ ॥ विठ्ठल जपतां विठ्ठल होसी । न धरीं मानसीं संशय ॥ २ ॥ करीं कीर्तन वाजवी टाळी । राहेल वनमाळी हृदयांत ॥ ३ ॥ निळा म्हणे पडे आटी । साधन संकष्टीं आणिकां ॥ ४ ॥

३१५० आणिकांतें उपदेशी । आपण मळिन मानसीं ॥ १ ॥ बोले ते ते धूर्त वादें । लटिक्याचि प्रेमें रडे स्फुंदे ॥ २ ॥ सोंग परमार्थ हा सार । आशा अंतरीं विखार ॥ ३ ॥ निळा म्हणे देहाभिमानें । गेलीं भोगिती ते पतनें ॥ ४ ॥

३१५१ अंधकारीं प्रकाश दावी । दीप रवीपुढें मिथ्या ॥ १ ॥ तैशीं प्राप्तापुढें ज्ञानें । युक्तीचीं दिनें लेवासे ॥ २ ॥ जिवे मेवे गोडिये

निके । परि ते फिके परमामृतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दाविती भाव । परि ते स्वयमेव संत भिन्न ॥ ४ ॥

३१५२ ऐसींचि देखिलीं उदंडें । जळो त्यांचीं काळीं तोंडें ॥ १ ॥ मुखें सांगती परमार्थ । स्वार्थ अंतरीं अनर्थ ॥ २ ॥ अनुताप दाविती वैराग्यें । वरी अंतरबाह्य रंगें ॥ ३ ॥ निळा म्हणे ठगीचि रीति । पडलीं संसारीं कुंथितां ॥ ४ ॥

३१५३ कोण तया लेखी । नाहीं विठ्ठलीं ओळखी ॥ १ ॥ करिती तितकें पोटासाठीं । गाणें नाचणें आटाआटी ॥ २ ॥ कळा दाविती व्युत्पत्ति । चातुर्य जाणिवेची संपत्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे संतापुढें । येतां लाजती माकडें ॥ ४ ॥

३१५४ प्रत्यक्ष जनीं जनार्दन । नेणोनियां कथी ज्ञान ॥ १ ॥ काय तैसीं तें वाचाळें । करिती चावटी तोंडबळें ॥ २ ॥ नाहीं अंगीं हरिची भक्ति । दाविती कोरडीच विरक्ति ॥ ३ ॥ निळा म्हणे नेणतां वर्म । केलें पाठी लागे कर्म ॥ ४ ॥

३१५५ जाणिवेचें ज्ञान । तर्कवादाचें जल्पन ॥ १ ॥ काय करूं ता गोमटा । भरला अहंकाराचा फाटा ॥ २ ॥ बोले तें तें तायें तायें । नेणें परमार्थाचि सोये ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसीची गती । पावे आपुलिया मती ॥ ४ ॥

३१५६ जारण मारण स्तंभन मोहन । वशीकरण उच्चाटण विध्वंसन आवडती ॥ १ ॥ येणेंचि मिरविती जगीं । अशुचि अनुरागी निरंतर ॥ २ ॥ जव्हाकुव्हा हातीं दिरीं । ताइताभीतरीं वागविती ॥ ३ ॥ निळा म्हणे चिरकाळ नरकीं । वसावया कुंभपाकीं पूर्व-जैसी ॥ ४ ॥

३१५७ जें जें बोले तें विकळ । नाहीं विठ्ठलीं कळवळ ॥ १ ॥ कोरडेंचि शब्दज्ञान । नाहीं प्रेमाचें जीवन ॥ २ ॥ जाणे तर्क वितर्क माति । समर्पक समयीं स्फूर्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे पडिली हातीं । जाणिवेच्या नुगवे गुंती ॥ ४ ॥

३१५८ नेणोनियां आत्महित । करिती घात अभिमानी ॥ १ ॥ ज्ञतीच वाढवूनियां उपाधी । पडती मधीं संदेहा ॥ २ ॥ नाठवूनियां विठ्ठल देवा । करिती सेवा भूतांची ॥ ३ ॥ निळा म्हणे जन्मोनि गेला । वृथाचि पडिला निरयांत ॥ ४ ॥

३१५९ तोचि ब्रह्मविद् जाण । परब्रह्मीं वृत्ति लीन ॥ १ ॥ द्वैताद्वैत मावळलें । पूर्णब्रह्म अनुभाविलें ॥ २ ॥ जन वन तें समान । मन झालें पें उन्मन ॥ ३ ॥ निळा म्हणे त्याच्या नांवें । दोष नासती स्वभावें ॥ ४ ॥

३१६० लुगड्या नांव चंद्रकळा । परी तो काळा रंग वरी ॥ १ ॥ नांवा ऐसें कर्तृत्व नाहीं । तरी ते कायी नपूंसक ॥ २ ॥ घोळण्या नांव लक्ष्मण । करितें भर्जन लाह्यांचें ॥ ३ ॥ निळा म्हणे म्हसाळिती रवी । परी ते न दावी प्रकाश ॥ ४ ॥

३१६१ पांडुरंगा न पाहती । ज्ञान गाडेवर बोलती ॥ १ ॥ त्यांचें न व्हावें दर्शन । देवा दूषिती म्हणऊन ॥ २ ॥ नायकावे त्यांचे बोल । विठ्ठल कृपेविण फोल ॥ ३ ॥ निळा म्हणे करिती कथा । अवघी पोकळ त्यांची वृथा ॥ ४ ॥

३१६२ होईल अंगीं बळ । तरी फजित करावे ते खळ ॥ १ ॥ जे कां करूनियां पाखांड । लटिकेंचि वाढविती बंड ॥ २ ॥ भोंदिती भाविकां । कथुनी परमार्थ तो लटिका ॥ ३ ॥ निळा म्हणे तोंडें सांगे । तैसें नाचरोनियां अंगें ॥ ४ ॥

३१६३ तोचि भक्त भागवत । संत सेवे जे निरत ॥ १ ॥ शुद्ध त्यांचा भक्तिभावो । संत वरदें लाभे देवो ॥ २ ॥ संतवचनीं विश्वासती । सत्य परमार्थ त्यांचे हातीं ॥ ३ ॥ निळा म्हणे संतसेवा । घडे त्या उदयो झाला दैवा ॥ ४ ॥

३१६४ चौऱ्यांशीं लक्ष योनीप्रती । फेरे खाती यातना ॥ १ ॥ संकटापासूनि सोडविता । कोण हो होता देवाविण ॥ २ ॥ निष्काम

करूनि ठेवितां दासां । कोण होता ऐसा देवाविण ॥ ३ ॥ निळा म्हणे निर्लोभ शांती । कोण देता हातीं भक्तांचिये ॥ ४ ॥

३१६५ आजिवरी काळ वृथाचि गेला। जेथूनियां झाला सृष्टीक्रम ॥ १ ॥ ऐसेचि नाना धरितां वेष । न तुटती पाश कर्मांचे ॥ २ ॥ केव्हां स्वर्ग केव्हां नरक । केव्हां दुःखदायक संसार ॥ ३ ॥ निळा म्हणे न पुरे घडी । ओढाओढी कल्प जातां ॥ ४ ॥

३१६६ सुखानंदाची राणीव । भागा आली फावली सर्व ॥ १ ॥ घ्याल तें घ्यावें धणीवरी। असाल जे जे या अधिकारी ॥ २ ॥ फुकासाठीं वोळोनी आलें । घरासी दैव हें चांगलें ॥ ३ ॥ निळा म्हणे उबग नका । माझें अवघेहि ऐका ॥ ४ ॥

३१६७ याचे पायीं मनोरथ । पूर्ण काम सकळहि आर्त ॥ १ ॥ म्हणोनियां धरिला जीवें । हाचि संतीं मनोभावें ॥ २ ॥ इच्छिलिया पदा । नेतो देउनि सुख संपदा ॥ ३ ॥ निळा म्हणे खंडी मूळ । वासनात्मकाचें तात्काळ ॥ ४ ॥

३१६८ ज्याचा विश्वास जडला पायीं । हरिवीण कांहीं नेणती ॥ १ ॥ त्याचा करी अंगिकार । निरसी अंधार ममतेचा ॥ २ ॥ सत्यासत्य दाखवी तया । लावी आपुलिया निज सोई ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसें वर्म । सांपडे सुगम एकनिष्ठा ॥ ४ ॥

३१६९ आतां निजप्रेमाची हे जाती । देहभावीं नुरे स्फुर्ति । अवघिया संसारें निवृत्ति । देवो चित्तीं सर्वदा ॥ १ ॥ ओकिलें अन्न राहे । कोणी फिरोनियां न पाहे । विषय देखोनि तैसें होये । महा वैराग्य त्या नांवें ॥ २ ॥ एक आत्मा न दिसे दुजें । ज्ञान त्या नांव बोलिजे । विरक्ति निर्लोभता ते सहजे । देहममता न बाधी ॥ ३ ॥ साहे सर्वांचे अपराध । क्षमा त्या नांव तें अति शुद्ध । सोसी अंगीं दुःखादि बाध । निर्द्वंद्व निर्मत्सर द्वेष न करी तो ॥ ४ ॥ निळा म्हणे तेचि शांति । सर्वदा आनंदमय चित्तवृत्ति । दया ते भजन सर्वांभूतीं । भक्ती ते देवा न विसंबे ॥ ५ ॥

३१७० व्युत्पत्तीचें ज्ञान । सांचवणी तें जीवन ॥ १ ॥ नव्हे पांडुरंगरुपा । नाना मंत्रें करितां जपा ॥ २ ॥ उपवास पारणीं । नाम उच्चारितां वाणी ॥ ३ ॥ निळा म्हणे न पवे सेवा । ऐशी सर्वात्मक देवा ॥ ४ ॥

३१७१ सांगितली धरिती गोठी । आदर पोटीं भक्तांचा ॥ १ ॥ तया सन्मुख झाला हरी । संसार तमारी तिमिराचा ॥ २ ॥ निरसूनियां भ्रांतिमळ । केले निर्मळ सहवासी ॥ ३ ॥ निळा म्हणे झाला ऋणी । चक्रपाणी तयांचा ॥ ४ ॥

३१७२ ब्रह्मीभूत होते काया । श्रीहरि पायां अनुसरतां ॥ १ ॥ परि हा विश्वास नुमटे मनीं । जाती म्हणऊनि निरयगांवा ॥ २ ॥ जिहीं केला हा सायास । पावले पदास ते संत ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुभवसिद्ध । ऐसा प्रसिद्ध कलियुगीं ॥ ४ ॥

३१७३ भवसिंधु तरावया । भजावें राया पंढरीच्या ॥ १ ॥ करील तोचि तरणोपावो । दाविल ठावो निजाचा ॥ २ ॥ जेथें वाजतां न लगे वारा । दिशा अंबरा शिवों नेदी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसिये घरीं । निजविल वोंवरीं पर्यंकीं ॥ ४ ॥

३१७४ सुखें करावें भोजन । गर्जावे गुण श्रीहरीचे ॥ १ ॥ ल्यावें लेणें अळंकार । असावें सादर हरिकथे ॥ २ ॥ यथाविधी भोगितां भोग । हृदयीं पांडुरंग आठवावा ॥ ३ ॥ निळा म्हणे न लिंपे कर्मी । हरिनामा धर्मी अवलंबितां ॥ ४ ॥

३१७५ आशाबद्धाचिया मुखें । निघे अक्षर तें तें फिकें ॥ १ ॥ श्रवणीं बैसोनियां श्रोता । विटे ऐकुनी त्याची कथा ॥ २ ॥ न करूनियां नमस्कार । अव्हेरिती नारीनर ॥ ३ ॥ निळा म्हणे जळो जिणें । सदा त्याचें लाजिरवाणें ॥ ४ ॥

३१७६ समाधान तें दर्शनें । होय सद्गुरुकृपेनें ॥ १ ॥ गुरुकृपा होण्यासाठीं । गुरूभाक्ति हे गोमटी ॥ २ ॥ साधन चतुष्टय । गुरु-

भेटीचा उपाय ॥ ३ ॥ निळा म्हणे कर्म जाण । चित्तशुद्धि ते निर्मा ॥ ४ ॥

३१७७ म्हणोनि याचिया श्रवणें पाठें । वचनें पालटे देहबुद्धी ॥ १ ॥ वैराग्याची राणीव जोडे । ज्ञानाचे उघडे निज मंदीर ॥ २ ॥ नवविधाचे नाना भोग । वसविती अंग येऊनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे भक्ति मुक्ति । शांति विरक्ति वरती त्या ॥ ४ ॥

३१७८ मुखीं पडतांचि तें शेष । करी नाश कल्मशा ॥ १ ॥ पावूनियां ब्रह्मपदा । ओपी संपदा अनैश्वरा ॥ २ ॥ शांति क्षमा द्या सिद्धी । येती समृद्धि ओळंगण्या ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वही सुखें । वरिती हरिखें शेष घेतां ॥ ४ ॥

३१७९ येथील लाभ घडे ज्यासी । तो त्या सुखासी अधिकारी ॥ १ ॥ जेथें वसती नारायण । लक्ष्मी आपण वैकुंठीं ॥ २ ॥ तेथेंचि तोहि पावेल सत्य । भोगी अद्वैत निजसुखा ॥ ३ ॥ निळा म्हणे ब्रह्मादिकां । न लभेचि एका अभिमानें ॥ ४ ॥

३१८० लोहा लागतां सुवर्ण । करावें हा स्वभाव गुण ॥ १ ॥ केंवि सांडवेल परिसा । जगद्गुरु हा विठ्ठल तैसा ॥ २ ॥ रत्ना अंगीं रत्नकीळ । नव्हती भिन्न अग्निज्वाळ ॥ ३ ॥ निळा म्हणे सांडूनि जळा । सागर न निवडे वेगळा ॥ ४ ॥

३१८१ विश्वासी ते ऐकतां कानीं । धरिती मनीं आदरें ॥ १ ॥ पूर्वार्जित उत्तमें होतीं । आली सत्संगती भेटतो ॥ २ ॥ सुखें सुख वाढतें झालें । केलिया विठ्ठलें कृपा मग ॥ ३ ॥ निळा म्हणे निजात्मसुखा । पावलें एका क्षणमात्रें ॥ ४ ॥

३१८२ सांपडली संधी । त्यासी कर्मी दृढ बुद्धी ॥ १ ॥ वेदविहित कर्म । हेंचि परमार्थाचें वर्म ॥ २ ॥ कर्मालागीं जो तत्पर । तोचि पावे पैलपर ॥ ३ ॥ निळा म्हणे परब्रम्ह । प्राप्त होय विहित कर्म ॥ ४ ॥

३१८३ संत आज्ञा सादवित । जातो सकाळांचेहि हित ॥ १ ॥ गाईकोनी सोडाल । फळ कनिष्ठ तरी पावाल ॥ २ ॥ आम्ही उत्तीर्ण आपुलिया । उचिता टेलों सांगोनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे यावरी आतां । बोल न ठेवावा मागुता ॥ ४ ॥

३१८४ सहजचि घरीहूनियां यावें । विठ्ठला पहावें रुक्मिणी ॥ १ ॥ न लभेचि जो कां ब्रह्मादिकां । तो या लोकां दाखविला ॥ २ ॥ भेटीचि घेतां बराबरी । सन्मानें करी गौरव ॥ ३ ॥ निळा म्हणे भाग्यवंत । करी सनाथ अनाथा ॥ ४ ॥

३१८५ याचे पायीं धरिल्या भाव । भेटेल देव निश्चयें ॥ १ ॥ नव्हे अन्यथा भाषण । ठावी खूण संतांसी हे ॥ २ ॥ निज करें कुरवाळून । देईल आलिंगन अत्यादरें ॥ ३ ॥ निळा म्हणे येईल दारा । देव सामोरा भक्तांसी ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

३१८६ उपदेश सुगम आइकरे एक । नाम हें सम्यक विठ्ठलाचें ॥ १ ॥ जनीं जनार्दन भावची संपन्न । विठ्ठल उद्धरण कलीमाजीं ॥ २ ॥ साधेल निधान पुरेल मनोरथ । नामेंचि कृतार्थ होसी जना ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम घेई तूं झडकरी । पावसी निर्धारीं वैकुंठपद ॥ ४ ॥

३१८७ जन्मा येऊनियां काय पुण्य केलें । बाळपण गेलें वायां वीण ॥ १ ॥ संतसंगें सुख हुंडारलें जाण । नामसंकीर्तना ओळखत ॥ २ ॥ तरुणपणें हि नाठवेचि देवा । वृद्धपणीं सेवा अंतरली ॥ ३ ॥ यापरी जन्मुनी गेलासिरे वायां । पंढरिच्या राया नोळखितां ॥ ४ ॥ आलों मी संसारीं गुंतलों व्यापारीं । अझूनि कां श्रीहरि नोळखसी ॥ ५ ॥ सहस्र अपराध जरी त्यां रे केले । तारिलें विठ्ठलें म्हणे नामा ॥ ६ ॥

३१८८ संसार सागर भरला दुस्तर । विवेकी पोहणार विरळा

संत ॥ १ ॥ कामाचिया लाटा अंगीं आदळती । नेणो गेले किती वाहोनिया ॥ ध्रु० ॥ भ्रम हा भोंवरा फिरवी गरगरा । एक पडिले फेरां चौऱ्यांशीच्या ॥ २ ॥ नावाड्या विठ्ठल भवसिंधु तारूं । भक्तां पैल पारू उतरितो ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम स्मरा श्रीरामाचें । भय कळिकाळाचें नाहीं तुम्हा ॥ ४ ॥

३१८९ आलेनो संसारा सोडवणें करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥ प्रपंच न सरे कदा कल्प कोडी । वासनेची वेडी पडे पायीं ॥ २ ॥ व्यर्थ माया देवी गर्भवास गोवी । नश्वर भोगवी नाना योनी ॥ ३ ॥ नामा म्हणे पहा विचारुनी मनीं । स्मरावा निर्वाणीं पांडुरंग ॥ ४ ॥

३१९० आलेनो संसारा उठा वेगें चला । जिवलग विठ्ठला भेटीलागीं ॥ १ ॥ दुर्लभ मनुष्यजन्म न लभे रे मागुता । लाहो घ्या सर्वथा पंढरिचा ॥ २ ॥ भावें लोटांगण घाला महाद्वारीं । होइल बोहरी त्रिविध तापा ॥ ३ ॥ श्रीमुखाची वास पहा धणीवरी । आठवीं अंतरीं घडिये घडिये ॥ ४ ॥ शुद्ध सुमनें कंठीं घाला तुळशीमाळा । तनमन ओवाळा चरणांवरुनी ॥ ५ ॥ नामा म्हणे विठो अनाथा कोंवसा । पुढती गर्भवासा येऊं नेदी ॥ ६ ॥

३१९१ अवघे निरंतर करा हा विचार । भवसिंधु पार तरिजे ऐसा ॥ १ ॥ अवघे जन्म वायां गेले विषयसंगे । भुललेति वाउगे माया मोहा ॥ २ ॥ अवघा वेळ करितां संसाराचा धंदा । वाचे वसो सदा हरिचें नाम ॥ ३ ॥ अवघ्या भावीं एका विठ्ठलातें भजा । आतें करा पूजा हरिदासांची ॥ ४ ॥ अवघे सुख तुम्हा होईल आपैतें । न याल मागुते गर्भवासा ॥ ५ ॥ नामा म्हणे अवघें अनुभवूनि पाहा । सर्वकाळीं रहा संतसंगें ॥ ६ ॥

३१९२ प्रपंच घडामोडी न सरे कल्पकोडी । वासनेची वेडी पडली पायीं ॥ १ ॥ सोडवण करा आलेनो संसारा । शरण जा

उद्धारा विठोबाशीं ॥ २ ॥ लटकी मायादेवी गर्भवासीं गोवी । नरक भोगवी नाना योनी ॥ ३ ॥ नामा म्हणे तुम्ही विचारावें मनीं । सोयरा निर्वाणी पांडुरंग ॥ ४ ॥

३१९३ प्रपंच स्वार्थासि साधावया चांग । वैराग्याचें अंग दाविसि जनां ॥ १ ॥ अनुताप नित्य नाहीं कदाकाळीं । मग संचिताची होळी कैसी होय ॥ २॥ पवित्र ते वाचा कां रे गमाविसी । राम नाम न म्हणसी अरे मूढा ॥ ३ ॥ नामा म्हणे जीव कासया ठेवावा । न भजतां केशवा मायबापा ॥ ४ ॥

३१९४ स्वयें घरदार प्रपंच मांडिला । जोडुनियां दिला बाळाहातीं ॥ १ ॥ तैसें सर्वांभूतीं असावें संसारीं । प्राचीनाची दोरी साक्ष आहे ॥ २ ॥ वाटसरू वस्ती येऊनी राहिला । प्रातःकाळीं गेला उठोनियां ॥ ३ ॥ नामा म्हणे आम्हा नाहीं प्रापंचिक । पंढरिनायक साह्य झाला ॥ ४ ॥

३१९५ यम सांगे दूता कानीं । तुम्ही जातां मेदिनी । विष्णुभक्त चुकवुनि । येर बांधोनि आणा ॥ १ ॥ दूत सांगती यमा । दिंडीपुढें चाले नामा । ते नागविती आम्हां । विष्णुदूत म्हणोनि ॥ २ ॥ जे नेणती धर्मवेळा । वाचे न उच्चारिती गोपाळा । तयांसि जाचवावें वेळोवेळां । एकवीस कुळांसहित ॥ ३ ॥ जे न करिती हरिची भक्ती । तयांसि जाचवावें पुढतां पुढतीं । रघुनाथ नाम ज्याच्या कंठीं । त्याच्या वाटे नवजावें ॥ ४ ॥ दिंडी पताका गजर टाळ घोषांचा । नाद उमटतो अंबरीचा । तेथें पाड नाहीं काळाचा । शिंपी नामा दळपति केशवरायाचा ॥ ५ ॥

३१९६ भक्तीविणें जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखरूप ॥ १ ॥ एक एक योनि कोटि कोटि फेरा । मनुष्यदेह वारा मग लागे ॥ २ ॥ वीस लक्ष योनी वृक्षांमध्यें घ्याव्या । जळचरीं भोगाव्या नवलक्ष ॥ ३ ॥ अकरा लक्ष योनी किरडांमध्यें घ्याव्या । दशलक्ष

भोगाव्या पक्षांमध्यें ॥ ४ ॥ तीसलक्ष योनी पशूंचियें घरीं । मानवा-भीतरीं चारी लक्ष ॥ ५ ॥ नामा म्हणे तेव्हां नरदेह या नरा । तयानें मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

३१९७ भक्तिविण मोक्ष नाहीं हा सिद्धांत । वेद बोले हात उभारोनि ॥ १ ॥ तरी तेंचि ज्ञान जाणाया लागुनि । संतां वोळगोनि वश्य किजे ॥ २ ॥ प्रपंच हा खोटा शास्त्रें निवडिला । पाहिजे साक्षिला सद्गुरु तो ॥ ३ ॥ नामा म्हणे सेवा घडावी संतांची । घ्यावी कृपा त्याची तेंचि ज्ञान ॥ ४ ॥

३१९८ हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं । जग अलंकारीं मिरवीत ॥ १ ॥ देवावीण शब्द लटकें करणें । भांडा रंजविणें सभेमाजीं ॥२॥ आचार करणें देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥ नामा म्हणे काय बहु बोलों फार । भक्तीवीण नर अभागी तो ॥ ४॥

## दुर्जनांस उपदेश

३१९९ कोळशासी दूध मर्दोनिया धूतां । न पावे शुद्धता कांहीं केल्या ॥ १ ॥ दुर्जनासी तैसा बोध परमार्थ । नवजायचि स्वार्थ कांहीं केल्या ॥ २ ॥ सूकराचे परी नेणती मिष्टान्न । विष्टा ते भक्षण करिताती ॥३॥ मोहियले प्राणी पाहतां पाहतां । काय सांगूं आतां नवलावो ॥ ४ ॥ नामा म्हणे तयां न होयाचि मोक्ष । येवोनि पद्माक्ष केविं भेटे ॥ ५ ॥

३२०० जाळें टाकिलें सागरीं । उदक नयेचि चुळभरी ॥ १ ॥ तैसें पापियाचें मन । ज्या नावडे हरिकीर्तन ॥ २ ॥ सावजीं केला कोल्हा राव । तो नसंडी आपुला भाव ॥ ३ ॥ गाढव गंगेसीं न्हाणिलें । पुढती लोळूं तें लागलें ॥ ४ ॥ श्वान बैसाविलें पालखीं । वरती मान करूनी भुंकी ॥ ५ ॥ नगर नावडे विखारा । दर्पण नावडे नकट्या नरा ॥ ६ ॥ पति नावडे शिंदळीं । जाय परपुरुषा जवळी ॥ ७ ॥ नामा म्हणे बा श्रीहरी । कोड्या नावडे कस्तुरी ॥ ८ ॥

३२०१ जयाचे उदरीं जन्मला नर । पिंडी तया थोर सर्वकाळ ॥ १ ॥ मानिली अंतरीं सखी जिवलग । आत्महत्त्या मग घात करी ॥ २ ॥ मानिना तो भक्ति भ्रष्ट आचरण । दोषी नारायण सदोदित ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसे पातकी चांडाळ । बुडविलें कुळ बेचाळिस ॥ ४ ॥

३२०२ अभक्ताचे स्थळीं भ्रांताची संगती । परदारा चित्तीं परनिंदा ॥ १ ॥ नेणे भूतदया शांतिचें लक्षण । कार्या कारण बोलतसे ॥ २ ॥ हरिचिया दासा करिती मत्सर । करी निरंतर द्वेषबुद्धि ॥ ३ ॥ नामा म्हणे व्यर्थ पेटला पर्वत । नेणे अपघात स्वयें पावे ॥ ४ ॥

३२०३ मूर्ख बैसले कीर्तनीं । न कळे अर्थाची करणी ॥ १ ॥ घुबड पाहे भलतीकडे । नाइके नामाचे पवाडे ॥ २ ॥ पाहूं इच्छी परनारी । चित्त पादरक्षावरी ॥ ३ ॥ नामा म्हणे सांगूं किती । मूढ सांगितलें नाइकती ॥ ४ ॥

३२०४ कथे बैसोनि उठोनि जाती । खर होऊनी फिरती ॥ १ ॥ नाम नावडे नावडे । संग वैष्णवांचा न घडे ॥ २ ॥ नामा म्हणे सांगों किती । पूर्वजांसहित नरका जाती ॥ ३ ॥

३२०५ करंटे कपाळ नाम नये वाचे । सदैव दैवाचें प्रेम नामीं ॥ १ ॥ जोडियेली जोडी हुंडारिली दूरी । नावडे पंढरी तया जनां ॥ २ ॥ आपण नवजे दुजियां जावों नेदी । ऐसा तो कुबुद्धी नागवीतो ॥ ३ ॥ नामा म्हणे नाम गर्जे वारकरी । वैकुंठ पंढरी देशोदेशीं ॥ ४ ॥

३२०६ यम सांगे दूतां । तुम्ही जावें मृत्युलोका । आपुलाला लोक जितुका । तितुका आणावा ॥ १ ॥ तुम्हां सांगतों कुळरंग । निंदा आणि द्वेष करिती राग । खरी खोटी चाहडी सांगे । तें कुळ आपुलें ॥ २ ॥ ज्याचें विषयावर ध्यान । परद्रव्य परस्त्रीगमन । धर्मासी विन्मुखपण । तें कुळ आपुलें ॥ ३ ॥ भावेंविण भक्ति करिती । भक्ति-

विणें भाव दाविती । त्यांची तुम्ही फजिती । बहुतां प्रकारें करावी ॥ ४ ॥ मंत्रसंचारी जे लोक । देव सांडून देवताउपासक । झोटिंग वेताळ खेताळ देख । ते सखे बाप तुमचे ॥ ५ ॥ लटिके वासनेच्या नवसा । करिती करविती पशुहिंसा । त्यांनें बहुत दिवस भरवंसा । दिला आहे ॥ ६ ॥ घातकी पातकी गुरुद्रोही । हित सांगतां गुरुसीं हेडसी । विष्णुदासावेगळें करून पांहीं । सांगितलें तितुके आणावे ॥ ७ ॥ नामा म्हणे एक्या पातकीया दंडिती । नाना विपत्ति काय सांगूं किती । विष्णुदासाचे वंदिती । चरणरज ते यम ॥ ८ ॥

## वेषधाऱ्यांस उपदेश

३२०७ एक म्हणति आम्ही देवचि जालों । तरी असें नका बोलों । पडाल पतनीं ॥ १ ॥ एक म्हणती आम्ही देवासमान । तरी घांसिल वदन यमराव ॥ २ ॥ एक म्हणती आम्ही देवाचींच रूपें । तुमच्यानि बापें संसार न तुटे ॥ ३ ॥ देवें वधियेलें दानवां दैत्यां । आम्हा आड जातां तृण न मोडे ॥ ४ ॥ देवें उचलिल्या शिळा मेदिनी । तुमचेनि एक गोणी नुचले देखा ॥ ५ ॥ विठ्ठलाचें पद जो कोणी अभिलाषी । तो महापातकी म्हणे नामा ॥ ६ ॥

३२०८ निर्विकल्पब्रह्म कशानें आतुडे । जंववरी न मोडे मी तूं पण ॥ १ ॥ शब्दचित्र कथा सांगती पाल्हाळ । मन नाहीं निश्चळ हरिच्या पायीं ॥ २ ॥ अणूच्या प्रमाण होतां दुजेपण । मेरूच्या समान भार देवा ॥ ३ ॥ नामा म्हणे ब्रह्म सर्वांभूतीं पाहीं । तरीच ठाइच्या ठायीं निवसी बापा ॥ ४ ॥

३२०९ युगें गेली जरी अपारें । भूमिसी न मिळती खापरें ॥ १ ॥ ऐसीं पापियांचीं मनें । स्थिर न होती कीर्तनें ॥ २ ॥ श्वान घातलें पालखीं । वरती मान करूनी भुंकी ॥ ३ ॥ सूकर चंदनें चर्चिला । पुढतीं गवसी चिखला ॥ ४ ॥ गाढव न्हाणियेला तीर्थी । लोळे उकरडिया प्रती ॥ ५ ॥ नामा म्हणे युगें गेली । खोडी न संडिती आपुली ॥ ६ ॥

३२१० काय देतील ते नर। जंव दिलें नाहीं रघुवीरें ॥ १ ॥ आजि दिलें उद्यां नाहीं। ऐसियासीं मागों कांहीं ॥ २ ॥ हात पसरूं ऐसे धुरे। दिलें कल्पांतीं न सरे ॥ ३ ॥ नामा म्हणे देवाधिदेव। समर्थ दाता पंढरिराव ॥ ४ ॥

३२११ मुखीं नाहीं नाम। काय जपतो श्रीराम ॥ १ ॥ काय आसन घालून। मुखीं नाहीं नारायण ॥ २ ॥ टिळे टोपी माळा दावी। भोळ्या भाविकांसी गोवी ॥ ३ ॥ नामा म्हणे त्याचा संग। नको चित्ता होय भंग ॥ ४ ॥

३२१२ गोमुखीं गोवुनी काय जपतोसी। जप तप त्यासी विघ्न करी ॥ १ ॥ नामसंकीर्तनें जळतील पापें। चुकतील खेपा चौऱ्यांशींच्या ॥ २ ॥ उपवास करी उग्र अनुष्ठानीं। तया चक्रपाणी अंतरतो ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसे बहुतेक प्राणी। पचतील खाणी भ्रष्ट लोक ॥ ४ ॥

३२१३ नाहीं परमार्थ पोटीं धनाची आशा। धरूनि हव्यासा धनमान ॥ १ ॥ दंभमान दावी ज्ञानमार्ग मोठा। पुढिलांसी वाटा यमपंथें ॥ २ ॥ पंथ न चुकती संतांवीण कधीं। संसारसंबंधीं तया नरा ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसे बहु अभाविक। संतसंगसुख काय जाणें ॥ ४ ॥

३२१४ गोसावीपणाचा दाखविती वेष। नाहीं निदिध्यास हरिनामीं ॥ १ ॥ वरी वरी आर्त दाविती झगमग। अंतरीं तो संग विषयांचा ॥ २ ॥ व्यर्थ लोकांपुढें हालविती मान। विटंबन केली संसाराची ॥ ३ ॥ नामा म्हणे मन गुंतेल पांडुरंगा। आतां ऐशा सांगा कोण रीती ॥ ४ ॥

३२१५ विष्णूसी भजला शिव दुराविला। अधःपात झाला तया नरा ॥ १ ॥ शिवपूजा करी विष्णूसी अव्हेरी। तयाचिये घरीं यम नांदे ॥ २ ॥ विष्णुकथा ऐके शिवासी जो निंदी। तयासी गोविंदीं ठाव नाहीं ॥ ३ ॥ नामा म्हणे असती शिव विष्णु एक। वेदाचा विवेक आत्माराम ॥ ४ ॥

३२१६ तोंवरी रे तोंवरी वैराग्याचें ठाण । जंव कामिनी कटाक्ष बाण लागले नाहीं ॥ १ ॥ तोंवरी रे तोंवरी आत्मज्ञान बोध । जोंवरीं अंतरीं कामक्रोध उठले नाहीं ॥ २ ॥ तोंवरी रे तोंवरी निरभिमान । जंव देहीं अपमान झाला नाहीं ॥ ३ ॥ नामा म्हणे अवघी वचवच गाळी । विरळा तो जाळी द्वैतबुद्धी ॥ ४ ॥

३२१७ चंद्रसूर्यादि बिंबें लिहिताती सांग । परी प्रकाशाचें अंग लिहितां नये ॥ १ ॥ संन्यासाचीं सोंगें आणिताती सांग । परि वैराग्याचें अंग आणितां नये ॥ २ ॥ नामा म्हणे कीर्तन करिताती सांग । प्रेमाचें तें अंग आणितां नये ॥ ३ ॥

३२१८ पोटासाठीं जरी करी हरिकथा । जन रंजवितां फिरतसे ॥ १ ॥ तेणें घात केला एकोत्तरशत कुळांचा । पाहुणा यमाचा श्रेष्ठ थोर ॥ २ ॥ द्रव्याचिये आशे हरिकथा करी । तया यमपुरीं नित्य-वास ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसे होत जे रे कोणी । ते नर नयनीं पाहूं नये ॥ ४ ॥

३२१९ दावी जडीबुट्टी जारण मारण । नागवें हिंडणें काय काज ॥ १ ॥ दावी उग्र तप केले उपवास । फिरतांहि देश काय काज ॥२॥ काय काज तरी होसील फजीत । स्मरारे अनंता सर्वकाळ ॥ ३ ॥ नामा म्हणे नव्हे उद्दंड उपाय । धरीं आधीं पाय विठोबाचे ॥ ४ ॥

३२२० वेदाध्ययन करिसी तरी वैदिकचि होसी । परि वैष्णव न होसी अरे जना ॥ १ ॥ पुराण सांगसी तरी पुराणिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ २ ॥ गायन करिसी तरी गुणीजन होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ३ ॥ कर्म आचरसी तरी कर्मठचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ४ ॥ यज्ञ करिसी तरी याज्ञिकचि होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ५ ॥ तीर्थ करिसी तरी कापडीच होसी । परी वैष्णव न होसी अरे जना ॥ ६ ॥

नामा म्हणे नाम केशवाचें घेसी । तरीच वैष्णव होसी अरे जना ॥ ७ ॥

३२२१ मुखीं नाम हातीं टाळी । दया नुपजे कोणे काळीं ॥ १ ॥ काय करावें तें गाणें । धिक् धिक् तें लाजिरवाणें ॥ २ ॥ हरिदास म्हणोनि हालवी मान । कवडीसाठीं घेतो प्राण ॥ ३ ॥ हरिदासाचे पायीं लोळे । केशीं धरोनि कापी गळे ॥ ४ ॥ नामा म्हणे अवघे चोर । एक हरिनाम हें थोर ॥ ५ ॥

३२२२ अहंकारें आथिलें ऐसें जें शरीर । तें जाणा मंदीर चाडाळाचें ॥ १ ॥ आपुलिया मुखें सांगे पंढरिनाथ । नव्हेचि तो भक्त सत्य जाणा ॥ २ ॥ नाम विटंबिती संतांसी हांसती । ते मूर्ख म्हणिजेति सर्पापिलीं ॥ ३ ॥ तयांसी लक्ष्मीवल्लभ सांगे उपदेश । नामा विष्णुदास विनवितसे ॥ ४ ॥

३२२३ शिकला गाणें राग आळवण । लोकां रंजवण करावया ॥ १ ॥ भक्ताचें तें गाणें बोबडिया बोली । तें तें विठ्ठलीं अर्पियली ॥ २ ॥ बोबडिया बोलीं जे कोणी हांसती । ते पचिजेति रौरवीं ॥ ३ ॥ नामा म्हणे बहुत बोलों आतां काय । विठोबाचे पाय अंतरती ॥ ४ ॥

३२२४ मांजरें केली एकादसी । इळवरी होतें उपवासी । यत्न करितां पारण्यासी । धाऊनी गिवसी उंदीर ॥ १ ॥ लांडगा बैसला ध्यानस्थ । तोंवरी असे निवांत । जंव पेट सुटे जीवांत । मग घात करी वत्साचा ॥ २ ॥ श्वान गेलें मलकार्जुना । देह कर्वतीं घातलें जाणा । आलें मनुष्यदेहपणा । परी खोडी न संडी आपुली ॥ ३ ॥ श्वानें देखिला स्वयंपाक । जोंवरी जागे होते लोक । मग निजलिया निःशंक । चारीं मडकीं फोडिलीं ॥ ४ ॥ वेश्या झाली पतिव्रता । तिचा भाव असे दुश्चिता । तिसी नाहीं आणिक चिंता । परद्वारावांचुनी ॥ ५ ॥ दात्यानें केली समाराधना । बहुत लोक जेविले

जाणा । परि न संडी वोखटी वासना । खटनट चाळीतसे ॥ ६ ॥ ऐशा प्रकारच्या भक्ति । असती त्या नेणों किती । एक ओळंगा लक्ष्मीपति । म्हणे विष्णुदास नामा ॥ ७ ॥

३२२५ सांवळीं पिळुनी कां घालिसी । मुद्रेनं आंग कां जाळिसी ॥ १ ॥ कासया केली खोडी । काया विटंबिली बापुडी ॥ २ ॥ कावळा प्रातःस्नान करी । जितें मेलें तें न विचारी ॥ ३ ॥ मेंदे लावुनि द्वादश टिळे । तो फांसा घालुनि निवटी गळे ॥ ४ ॥ सुसरी गंगे राहिवासु । बहुतां जीवातें करी ग्रासु ॥ ५ ॥ गंगे गेल्या ज्ञान सांगे । मांजर मारिलें तें न सांगे ॥ ६ ॥ बक ध्यान लावुनि टाळी । मौन धरूनियां मासा गिळी ॥ ७ ॥ नामा म्हणे केशिराजा । ऐशिया जीवा लावी वोजा ॥ ८ ॥

३२२६ आपलें हित आपण नेणती । पुढिलातें सांगती बहु ज्ञान ॥ १ ॥ नेणोनि परब्रह्म जाणते झाले । अभावीं गुंतले माया-जाळीं ॥ २ ॥ जीव आणि शीव एकरूप म्हणती । सेवेसी अंतरती केशवाचे ॥ ३ ॥ नामा म्हणे तोचि केशवातें जाणता । केशव म्हणतां मुक्त होय ॥ ४ ॥

३२२७ काय चाड आम्हां बाहेरल्या वेषें । सुखाचें कारण असे अंतरीं तें ॥ १ ॥ भीतरीं पालट जंव नाहीं झाला । तोंवरी न बोला जाणपणें ॥ २ ॥ चंदनाचे संगतीं नीच महत्वा पावलीं । नांवें परी उरलीं पालट देहीं ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसें सांगा मज कोणी । जेणें केशव येऊनी हृदयीं राहे ॥ ४ ॥

३२२८ अद्वैत सुख कैसेनि आतुडे । जंव वरी न संडे मी तूं पण ॥ १ ॥ शब्द चित्र कथा सांगती पाल्हाळ । मन नाहीं केवळ विठ्ठलदेवीं ॥ २ ॥ अणुचें प्रमाण असतां दुजेपण । मेरुतें समान देईल दुःख ॥ ३ ॥ नामा म्हणे सर्व आत्मरूप पाहीं । तरीच ठायींच्या ठायीं निवशील ॥ ४ ॥

## अन्यदैवत उपासकांस उपदेश।

३२२९ जाखाई जोखाई उदंड दैवतें। वाउगेंचि व्यर्थ श्रम-तोसी ॥ १ ॥ अंतकाळीं तुज सोडविना कोणी। एक्या चक्रपाणी-वांचोनियां ॥ २ ॥ मागें थोर थोर कोणें केलें तप। उद्धरिले अमूप नारायणें ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसे बहु झाले भांड। न उच्चारी लंड नाम वाचे ॥ ४ ॥

३२३० नाना परीचीं दैवतें। बहुत असतीं असंख्यातें ॥ १ ॥ सेंदुर शेरणीं जीं इच्छिती। तीं काय आर्त पुरविती ॥ २ ॥ अंध नको होऊं आलिया। भज भज पंढरीराया ॥ ३ ॥ सोडूं नको विष्णू त्रिपाराणिया। तोडी कुलुप पाठीं गळ टोंचोनिया ॥ ४ ॥ बाळा अवळा मुकी मोळी। क्षुद्र देवता जीवदान वळी। तेणें न पावती सुखकल्लोळीं। एक विठ्ठल वांचोनियां ॥ ५ ॥ नाना धातूचि प्रतिमा केली। षोडशोपचारें पूजा केली। दुकळीं विकूनि खादली। ते काय आर्त पुरविती ॥ ६ ॥ आतां दृढ धरोनियां भाव। वोळगा वोळगा पंढरीराव। आपुले चरणीं देईल ठाव। विष्णुदास नामा म्हणे ॥ ७ ॥

३२३१ खाटिकाप्रमाणें करिसी व्यापार। मनीं निरंतर धरो-नियां ॥ १ ॥ दुष्ट दुराचारी दुर्बल घातकी। परम नाशकी पापिष्ट तो ॥ २ ॥ अपमानीं आशा धन मेळविसी। अंतीं नरकासी जासी जाण सत्य ॥ ३ ॥ नामा म्हणे जाण करूं मोटयाळें। जाऊनियां लोळे विष्टेमाजीं ॥ ४ ॥

३२३२ या विठोबापरतें आन दैवत म्हणती। ते शब्द नायकवती कानीं माझ्या ॥१॥ पाखांडी म्हणती उगेंची असावें। हा ब्रह्मकटाह करूं शके न अनारिसा ॥ २ ॥ तोहि जरी म्हणेल अहं ब्रह्मास। तरी न पहावी वास येही नयनीं ॥ ३ ॥ कोटि कोटि ब्रह्मांडें एकएक्या रोमीं। व्यापोनिया व्योमीं वर्ततसे ॥ ४ ॥ ऐसा माझा विठो सर्वां घटीं सम। न संडावें वर्म नामा म्हणे ॥ ५ ॥

३२३३ पोटीं अहंतेसी ठाव । जिव्हे सकळ शास्त्रांचा सराव ॥ १॥ भजन चालिलें उफराटें । कोण जाणें खरें खोटें ॥ २ ॥ सजीवासी हाणी लाथा । निर्जीव पायीं ठेवी माथा ॥ ३ ॥ सजीव तुळसी तोडा। निर्जीव पूजा दगडा ॥ ४ ॥ बेला करी तोडातोडी । शिवा लाखोली रोकडी ॥ ५ ॥ तोंड धरून मेंढा मारा । म्हणती सोम याग करा ॥ ६ ॥ सिंदुर माखोनियां धोंडा । त्यासी भजती पोरें रांडा ॥ ७ ॥ अग्निहोत्राचा सुकाळ । कुश पिंपळाचा काळ ॥ ८ ॥ मृत्तिकेच्या पूजा नागा । जित्या नागा घेती डांगा ॥ ९ ॥ नामा म्हणे अवघें खोटें । एक हरिनाम गोमटें ॥ १० ॥

३२३४ केशवापरते देव आणिक आहेती । ऐसें श्रुति स्मृति बोलतील ॥ १ ॥ तरी ते शब्द झणीं कानीं हो पडती । पाखांडी म्हणती सहावें तें ॥ २ ॥ इंद्रियांसि तुम्ही करा रे जतन । भजावा निधान श्रीविठ्ठल ॥ ३ ॥ छेदावया शीर हस्त सहस्रांचे । जरी बहुतांचे उगारिले ॥ ४ ॥ परि तूंतें नाम आन न देवाचें । केशवपरतें कैचें असे ब्रह्म ॥ ५ ॥ अंगें चतुरानना झालिया हो भेटी । तोही जरी गोष्टि ऐसी करी ॥ ६ ॥ तरी तो चळला पोटीं ऐसें जाण । एकीं दूजेपण दावी तरी ॥ ७ ॥ ब्रह्मकटाह एक उलंघों शके ऐसा । वर्तोनि दाही दिशा वर्ते जरी ॥ ८ ॥ केशव नव्हे तो हो कां अनारिसा । म्हणोनियां वासा पाहों नका ॥ ९ ॥ व्यसन भक्ति विरक्ति प्रौढि पुरुषार्थ पांचवा । जीवाचिया जीवा सेवाना कां ॥ १० ॥ सर्वांभूतीं आहे केशव परमात्मा । न विसंबावें वर्मा नामा म्हणे ॥ ११ ॥

## जनांस उपदेश

३२३५ पावावया ब्रह्म पूर्ण । सांडुनी देईं दोष गुण ॥ १ ॥ सर्वांभूतीं समदृष्टी । हेचि भक्ति गोड मोठी ॥ २ ॥ यावेगळें थोर नाहीं । बरवें शोधूनियां पाहीं ॥ ३ ॥ येणें संसार सुखाचा । म्हणे नामा शिंपियाचा ॥ ४ ॥

३२३६ लव निमिष म्हणतां आहे नाहीं पाहतां । क्षण एक संपादितां विषयो हा ॥ १ ॥ स्वहित तें आचरा हित तें विचारा । नामीं भाव धरा जाणतेनो ॥ २ ॥ संपत्तीचे बळें एक जाहले आंधळे । वेढिलें कळिकाळें स्मरण नाहीं ॥ ३ ॥ एक विद्यावंत जातीचा अभिमान । ते नेले तमोगुणें रसातळा ॥ ४ ॥ मिथ्या माया मोह करूनि हव्यास । वेंचिलें आयुष्य वायांविण ॥ ५ ॥ नामा म्हणे कृपा करूनि ऐशा जीवा । सोडवीं केशवा मायबापा ॥ ६ ॥

३२३७ कां रे तूं शिणतोसी घरदार वंधनें । वांयांचि व्यसनें आणितोसी ॥ १ ॥ भजें यादवराया लागे त्याच्या पाया । आणिक उपाया करूं नको ॥ २ ॥ सर्व भावें हरी भजन तूं करी । भक्ति हे पुढारी तारील सत्य ॥ ३ ॥ नामा म्हणे दया मांडी सोडीं माया । भजन लवलाह्या हरीचें करीं ॥ ४ ॥

३२३८ संग खोटा परनारीचा । नाश होईल या देहाचा ॥ १ ॥ रावण प्राणासी मुकला । भस्मासूर भस्म झाला ॥ २ ॥ गुरुपत्नीशीं रतला । क्षयरोग त्या चंद्राला ॥ ३ ॥ इंद्राअंगीं सहस्र भगें । नामा म्हणे विषयसंगें ॥ ४ ॥

३२३९ लावण्य सुंदर रूपानें बरवी । पापीण जाणावी ते कामिनी ॥ १ ॥ देखतां होतसे संगाची वासना । भक्ताच्या भजना नाश होय ॥ २ ॥ ऐसी जे घातकी जन्म कासयासी । चांडाळीण तीसी नरक प्राप्त ॥ ३ ॥ नामा म्हणे तिचें पाहूं नये तोंड । पापीण ते रांड बुडवी नरा ॥ ४ ॥

३२४० परदारा परधन परनिंदा परपीडण । सांडोनियां भजन हरीचें करा ॥ १ ॥ सर्वांभूतीं कृपा संतांची संगती । मग नाहीं पुनरावृत्ति जन्ममरण ॥ २ ॥ शास्त्रांचें हें सार वेदांचें गव्हर । तें नाम परिकर विठोबाचें ॥ ३ ॥ नामा म्हणे नलगे साधन आणिक । दिधली मज भाक पांडुरंगें ॥ ४ ॥

३२४१ अतिथि आलिया द्यावें अन्नदान । अर्पी जीव प्राण परमार्थी ॥ १ ॥ तोचि एक नर श्रीहरिसमान । करी दुजा कोण नाहीं ऐसा ॥ २ ॥ दीनासी समान करितां आदर । त्याच्या उपकारा पार नाहीं ॥ ३ ॥ नामा म्हणे असे खूण ही भाविकां । सर्वांभूतीं देखा पाहे ऐक्य ॥ ४ ॥

३२४२ भूमिदानें होसी भूमिपाळु । कनकदानें कांति निर्मळु । चंदनदानें सदा शितळु । जन्मोजन्मीं प्राणिया ॥ १ ॥ अन्नदानें दृढायुषी । उदकदानें सदा सुखी । मंदिरदानें भुवनपाळखीं । सुपरिमळु उपचारा ॥ २ ॥ वस्त्रदानें सुंदरपण । तांबूलदानें मनुष्यपण । गोपीचंदनें ब्राह्मणपण । अतिलावण्य सुंदरता ॥ ३ ॥ जे वृक्ष लाविती सर्वकाळ । तयावरी छत्रांचे झल्लाळ । जे ईश्वरीं अर्पिती फळ । नानाविध निर्मळ ॥ ४ ॥ ऐशा दानाचिया पंक्ति । वेगळाल्या सांगों किती । एका ध्यारे लक्ष्मीपति । विष्णुदास म्हणे नामा ॥ ५ ॥

३२४३ एकादशी दिनीं खाईल जो अन्न । सूकर होऊनि येईल जन्मा ॥ १ ॥ एकादशी दिनीं करील जो भोग । त्यासी माता संग घडतसे ॥ २ ॥ एकादशी दिनीं खेळेल सोंगटी । काळ हाणील खुंटी गुदस्थानीं ॥ ३ ॥ रजस्त्री शोणित सेविल्यासमान । तांबूल चर्वण करील जो ॥ ४ ॥ नामा म्हणे नाहीं माझ्याकडे दोष । पुराणीं हें व्यासवाक्य आहे ॥ ५ ॥

३२४४ सांडी सांडी पसारा विषयाचा चारा । विठ्ठल मोहरा वोळगे वेगीं ॥ १ ॥ होईल तुझें हित होशील पूर्ण भरित । सर्वांभूतीं हित हेचि दया ॥ २ ॥ वोळंगें विठ्ठलरूपा मार्ग हाचि सोपा । विषयाच्या खेपा तुटतील ॥ ३ ॥ नामा म्हणे केवळ आम्हां नित्य काळ । दिनानिशीं पळ विठ्ठल देव ॥ ४ ॥

३२४५ पवित्र आणि परिकर । उभाविलें मंदिर । दीपेंविण मनोहर । शोभा न पवे ॥ १ ॥ श्याम अंगीं तरुणी । सुंदर होय

रमणी । पुरुषाविण कामिनी । शोभा न पवे ॥ २ ॥ द्रव्याविण नर । जरि जाहला सुंदर । तो त्याविण चतुर । शोभा न पवे ॥ ३ ॥ योगिया आणि कठीण । इंद्रियां नाहीं दमन । षट्कर्मैविण ब्रह्मज्ञान । शोभा न पवे ॥४॥ नामा म्हणे सुंदरा । रखुमादेवीवरा । तुजवीण दातारा । शोभा न पवे ॥ ५ ॥

३२४६ न फिटे हें ओझें मायेचा गुंडाळा । एका तूं गोपाळा शरण जाईं ॥ १ ॥ तुटेल हे विरडें सुटेल हा मोह । केशवींच भाव असो देणें ॥ २ ॥ कईचे हे क्लेश उदासीन वांयां । भजणें यादवराया हेंचि सत्य ॥ ३ ॥ नामा म्हणे सुफळ भजनचि करीं । सर्वां भूतीं हरि भजनभावो ॥ ४ ॥

३२४७ कल्मष हरती जयाचेनि नामें । तें विसरोनि काय करावें ॥ १ ॥ संसारतारक विसांवा हरी । गर्भवास चुकवी तो मुरारी ॥ २ ॥ वाह्या उभारोनी घेतां रामनाम । वैकुंठींचा देव केशव परमात्मा ॥ ३ ॥

३२४८ विठ्ठलाचे पाय धरोनियां राहे । मग संसार तो काय करील तुझें ॥ १ ॥ संसाराचें भय नाहीं हरिच्या दासा । विठो आम्हां सरिसा निरंतर ॥ २ ॥ निरंतर वसे हरिभक्तांपाशीं । विसंबेना त्यासी कदाकाळीं ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसा विठ्ठल सोडोनी । व्यर्थ काय जनीं शिणताती ॥ ४ ॥

३२४९ गौळियांचे घरीं कैवल्याचे दानी । परब्रह्म अंगणी क्रीडतसे ॥ १ ॥ ऐसें कांहीं करा आलेनो संसारा । जेणें जोडे सोयिरा पांडुरंग ॥ २ ॥ कारितां त्याचें काज मनीं न धरी लाज । म्हणे हे शरण मज सर्वभावें ॥ ३ ॥ राखे बळिचें द्वार पाहे त्याची वास । म्हणे हा माझा दास अंतरंगु ॥ ४ ॥ गौळियाचें उच्छिष्ट मनीं न धरी वीट । आवडी निकट गोपाळांची ॥ ५ ॥ तरी क्रियाकर्म केलें होय सफळ । जरी हृदयीं गोपाळ येऊनि राहे ॥ ६ ॥ येरी ते

मायावी जग भुलवणी । नित्य विभांडणी सर्वभावें ॥ ७ ॥ नामा म्हणे ऐसे संताचिये सोयी । विठोबाचे पायीं मन ठेवीं ॥ ८ ॥

३२५० भक्त विठोबाचे भोळे । त्यांचे पायीं ज्ञान लोळे ॥ १ ॥ भक्तिविण शब्द ज्ञान । व्यर्थ अवघें तें जाण ॥ २ ॥ नाहीं ज्याचे चित्तीं भक्ति । जळो तयाची व्युत्पत्ति ॥ ३ ॥ नामा म्हणे ऐसें जाण । नाहीं भक्तासी बंधन ॥ ४ ॥

३२५१ पुंडलिकें रचिली पेठ । संत ग्राहिक चोखट ॥ १ ॥ प्रेम साखरा वांटिती । नेघे त्यांचे तोंडीं माती ॥ २ ॥ समतेचे फणस गरे । आंबे पिकले पडिभरें ॥ ३ ॥ नामद्राक्षाचे घड । अपार रस आले गोड ॥ ४ ॥ नामा म्हणे भावें घ्यावें । अभक्ताचें मढें जावें ॥ ५ ॥

३२५२ कर्मजड मूढ पतित पामर । भवसिंधु पार नटके जया ॥ १ ॥ यालागीं पंढरी केली मुक्तिपेठ । भक्तें भूवैकुंठ वसविलें ॥ २ ॥ हेंचि पुंडलिकें मागितलें निकें । जें सर्वथा परलोकें चाड नाहीं ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति सिद्धि जें जया आवडे । तें तया पवाडे विठ्ठलनामें ॥ ४ ॥ न लगति सायास करणें कायाक्लेश । नामाचा विश्वास दृढ धरा ॥ ५ ॥ नामा म्हणे अवघे चला पंढरिये । भेटों बापमाये पांडुरंगा ॥ ६ ॥

३२५३ शब्दाचें सुख श्रवणाचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ १ ॥ स्पर्शाचें सुख त्वचेचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ २ ॥ रूपाचें सुख नेत्राचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ ३ ॥ रसाचें तें सुख रसनेचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें केलें ॥ ४ ॥ गंधाचें तें सुख नाकाचेनि द्वारें । माझिया दातारें ऐसें ॥ ५ ॥ नामा म्हणे ऐसे जयाचे उपकार । तयासी गव्हार विसरले ॥ ६ ॥

३२५४ हरिसि शरण निघा वहिलें । राहे कळीकाळ उगले ॥ १ ॥

खंडलें एका बोलें । विठ्ठल समर्थें अंगिकारलें ॥ २ ॥ नामयानें संसारा जिंकिलें । केशव चरणीं मन ठेविलें ॥ ३ ॥

३२५५ न लगाति डोंगर चढावे । हळुच पाऊल धरावें ॥ १ ॥ विठ्ठलाचे पाय बरवे । गंगा विनविते स्वभावें ॥ २ ॥ नामा म्हणे तीर्थ बरवें । मुकुटीं धरिलें सदाशिवें ॥ ३ ॥

३२५६ आतां पांडुरंग स्मरा । जन्ममृत्यु चुकवी फेरा ॥ १ ॥ ऐसा कांहीं करा नेम । मुखीं स्मरा कृष्णराम ॥ २ ॥ चिंता ऐसें ध्यान । तेणें असा समाधान ॥ ३ ॥ नामा म्हणे हरिदास । त्यासी असावा अभ्यास ॥ ४ ॥

३२५७ हरिकथा ऐकतां अनन्य पैं गोष्टी । निधान त्या दृष्टी अंतरलें ॥ १ ॥ घडी घडी प्रेम अंतरूं न द्यावें । सावधान व्हावें रामनामीं ॥ २ ॥ यापरि स्वहितीं ठेवियलें लक्ष । ते पावती मोक्ष म्हणे नामा ॥ ३ ॥

३२५८ एकवेळ नयनीं पहावा । मग जाईजे भलत्या गांवा ॥ १ ॥ आठवाल वेळोवेळां । विठोबा आहे रे जवळा ॥ २ ॥ हृदयीं मांडुनियां ठसा । नामा म्हणे केशव असा ॥ ३ ॥

३२५९ केशव म्हणतां जासी केशवपंथें । त्यांहूनि सरतें आणिक नाहीं ॥ १ ॥ वेद कां पढसी शास्त्र कां सांगसी । उदंड वाचेसी हरि म्हणतां ॥ २ ॥ पहा याहूनियां आन नाहीं दुसरें । भीष्में युधिष्ठिर उपदेशिला ॥ ३ ॥ नामा म्हणे धरीं केशवीं विश्वास । तरसी गर्भवास नामें एका ॥ ४ ॥

३२६० भक्त प्रल्हादा कारणें । त्या वैकुंठींहुनि धांवणें ॥१॥ नरहरी पातला पातला । महादोषा पळ सुटला ॥ २ ॥ शंख चक्र पद्म गदा । नाभीं नाभीं रे प्रल्हादा ॥ ३ ॥ दैत्य धरी मांडीवरी । नखें विदारी नरहरी ॥ ४ ॥ पावला गरुडध्वज । नामयास्वामी केशवराज ॥ ५ ॥

३२६१ जागा रे गोपाळांनो रामनामीं जागा । कळीकाळा

आकळा महादोष जाती भंगा ॥ १ ॥ सहस्रदळ समान अनुहातध्वनी उठी । नामाचेनि बळें पातकें रिघालीं कपाटीं ॥ २ ॥ दशमी एक व्रत करा दिंडी दर्शन । एकादशी उपवास तुम्ही जागा जागरण ॥ ३ ॥ द्वादशी साधन कोटि कुळें उद्धरती । नामा म्हणे केशव ठाव देईल वैकुंठीं ॥ ४ ॥

३२६२ निर्वाणीची हे सांगितली खूण । कैवल्य चरण विठोबाचे ॥ १ ॥ वेद शास्त्र स्मृति वदती पुराण । पाहूनि जाणणें हेंचि सत्य ॥ २ ॥ क्रिया कर्म धर्म ज्यालागीं करणें । ते खूण निर्वाण हेंचि असे ॥ ३ ॥ जप तप अनुष्ठान कां करीजे साधन । तेंचि प्रत्यक्ष निधान हेंचि असे ॥ ४ ॥ नामा म्हणे मज कळलें अनुभवें । न सोडीं हे जीवें चरण तुझे ॥ ५ ॥

३२६३ भीष्मासी आपण पाडीयलें रणीं । गोविंदें निर्वाणीं भेटी दिली ॥ १ ॥ हरिश्चंद्र वाहे डोंवाघरीं पाणी । गोविंदें निर्वाणीं भेटी दिली ॥ २ ॥ परीक्षिति बैसे मरण आसनीं । गोविंदें निर्वाणीं भेटी दिली ॥ ३ ॥ नामा म्हणे तुम्ही देव धरा मनीं । गोविंद निर्वाणीं भेटे तुम्हां ॥ ४ ॥

३२६४ अवघे ते संसारीं जाणावे ते धन्य । ज्यांचें प्रेम पूर्ण पांडुरंगीं ॥ १ ॥ अवघे ते दैवाचे विठ्ठल म्हणती वाचे । अवघें कुळ त्यांचें पुण्यरूप ॥ २ ॥ अवघ्यारूपीं एक विठ्ठल भाविती । अवघ्या मनें भजती अवघेपणें ॥ ३ ॥ अवघे मिथ्या जाणोनी अवघिया विठ्ठलें । अवघे विनटले विठ्ठलपायीं ॥ ४ ॥ अवघे पूर्ण बोधें भावें प्रेमें प्रीती । ध्यानीं गीतीं गाती केशीराज ॥ ५ ॥ अवघा हा विठ्ठल भोगू दीनराती । बोळंगे किंकरवृत्ती नामा त्यासी ॥ ६ ॥

३२६५ न पढावे वेद नको शास्त्रबोध । नामाचे प्रबंध पाठ करा ॥ १ ॥ नव्हे ब्रम्हज्ञान न होय वैराग्य । साधा भक्तिभाग्य संतसंगें ॥ २ ॥ येर क्रिया कर्म करितां हो कलीं । माजीं कोण बळी तरले

सांगा ॥ ३ ॥ नामा म्हणे मज सांगितलें संतीं । या परतीं विश्रांति आणिक नाहीं ॥ ४ ॥

३२६६ संताचे घरीं जाहला पाहुणेर । नामाचा वोगर वाढियला ॥ १ ॥ घ्यारे ताटभरी घ्यारे ताटभरी । जेवा पोटभरी रामनाम ॥ २ ॥ पायरव होईल दुर्जना न सांगावें । एकांतीं सेवावें म्हणे नामा ॥ ३ ॥

३२६७ तप न करिसी जप हृषीकेशी । नाम अहर्निशीं राघो-वाचें ॥ १ ॥ तीर्थाचें हें तीर्थ नाम हें समर्थ । होईल कृतार्थ रामनामीं ॥ २ ॥ साधेल साधन तुटेल बंधन । वाचे नारायण सुफळ सदा ॥ ३ ॥ नामा म्हणे हरिनाम तें उच्चारी । तरीच उद्धारी इहलोकीं ॥ ४ ॥

३२६८ बोलवरी बोलती । श्रुती वाखाणिती । हरि पाविजे ती गती । वेगळी असे ॥ १ ॥ तुज न पवे गा तें स्वप्न । हरि शब्द एकाचि ब्रह्म । पाविजे तें वर्म । वेगळें असे ॥ २ ॥ एक जाणिव खटपट । करिती ते सैराट । हरि पाविजे ती वाट । वेगळी असे ॥ ३ ॥ एक आहेत तार्किक । चार्वाकादि वादक । हरि पाविजे तें सुख । वेगळें असे ॥ ४ ॥ एक चातुर्य वक्ते । व्युत्पन्न कवित्वें । संत रंजविते । लोका-चारी ॥ ५ ॥ जिहीं तुज जाणितलें । तिहीं मौन धरिलें । नामा म्हणे ते पावले । भक्तियोगें ॥ ६ ॥

३२६९ गुरुराव गुण गंभीरवो वावो चैतन्य प्रकाशु । योगी सहज सुकामिनी विलासु ॥ १ ॥ चिदानंद धनु तनु सांवळा वो हरि पाहतां निवति लोचन । तनु मन चरणीं वो गुंतलीं नाम गोपाळाचें अमृत समान ॥ २ ॥ पीतांबर शेला माळ कंठी या रावो गोपाळा । मुगुटीं झळाळ सर्वांगीं कस्तुरीचें विलेपन कटीं रुळे वनमाळा ॥ ३ ॥ येणेंचि जन्में पाविजे गोपाळासी आनु सार । श्रीवत्सलांछन हेचि खूण विष्णुदास नामयादातार ॥ ४ ॥

३२७० अरे अलगटा माझिया तूं मना । किती रानोराना हिंडविसी ॥ १ ॥ विठोबाचे पायीं दृढ घालीं मिठी । कां होसी हिंपुटी वायांविण ॥ २ ॥ क्रियाकर्म धर्म तुज काय चाड । जवळी असतां गोड प्रेमसुख ॥ ३ ॥ संकल्प विकल्प सांडी तूं समूळ । राहेरे निश्चळ क्षणभरी ॥ ४ ॥ आपुलें निजहित जाण तूं त्वरित । वासनारहित होईं वेगीं ॥ ५ ॥ नामा म्हणे तुज ठायींचें कळतें । सोसणें कां लागतें गर्भवास ॥ ६ ॥

३२७१ दाही दिशा मना धांवसी तूं सइरा । न चुकती येरझारा कल्पकोटी ॥ १ ॥ विठोबाचें नामीं दृढ धरीं भाव । येर सांडी वाव मृगजळ ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति सिद्धि जोडूनिया कर । कारिती निरंतर वळगणें ॥ ३ ॥ नामा म्हणे मना धरीं तूं विश्वास । मग गर्भवास नव्हे तुज ॥ ४ ॥

३२७२ अरे मना तूं मर्कटा । पापिया चांडाळा लंपटा । परद्वार हिंडसी सुनटा । अरे पापी चांडाळा ॥ १ ॥ अरे तुज पापावरी बहु गोडी । देवा धर्मीं नाहीं आवडी । तेणें न पावसी पैलथडी । कर्म बांदवडीं पडशील ॥ २ ॥ अरे तूं अभिलाषी परनारी । तेणें सिद्ध पंथ राहेल दुरी । जवळी येईल यमपुरी । आपदा पावसील ॥ ३ ॥ आतां तुज वाटतसे गोड । अंतकाळीं जाईल जड । महा दोष येती सुखा आड । करितील कैवाड यमदूत ॥ ४ ॥ माझें शिकविलें नायकसी । आतां सांगेन बळिया केशवासी । धरूनि नेईल वैकुंठासी । चरणीं जडसी म्हणे नामा ॥ ५ ॥

३२७३ उत्कंठित तप एक विठ्ठलनाम । आतां क्रियाकर्म कोणालागीं ॥ १ ॥ राहे रे मना राहे रे निवांत । ध्यायीं अखंडित नारायण ॥ २ ॥ संत समागमें साधीं हें साधन । पावसी निर्वाण नित्यसुख ॥ ३ ॥ नामा म्हणे तूं सहज सुखरूप । होऊनि निर्विकल्प विचारीं पां ॥ ४ ॥

३२७४ वेदीं तोचि शास्त्रीं सर्वांठायीं तोचि । पुराणांत तोचि अंतःकरणीं ॥ १ ॥ नाम सदा ध्यायीं नाम सदा ध्यायीं । रामनाम ध्यायीं अरे मना ॥ २ ॥ नामा म्हणे देह नाहीं पुनरूपें । केशव नाम सोपें उच्चारीं बापा ॥ ३ ॥

३२७५ धरीं रे मना तूं विश्वास या नामीं । अखंड रामनामीं ओळखी धरी ॥ १ ॥ जप करी ऐसा अखंड खंडेना । निशिदिनीं मना होय जागा ॥ २ ॥ नामा म्हणे मना होई रामरूप । अखंडित जप सोहं सोहं ॥ ३ ॥

३२७६ प्रेमामृतसरिता पवित्र हरिकथा । त्रिभुवनींच्या तीर्थां मुकुटमणी ॥ १ ॥ तेथें माझ्या मना होईं क्षेत्रवासी । राहें संतापाशीं सुख घेतां ॥ २ ॥ ऐहिक्य परत्र दोन्ही समतीरीं । परमानंदलहरी झेंपावत ॥ ३ ॥ मुक्तांचें जीवन मुमुक्षा माउली । शिणल्या साउली विषयासक्तां ॥ ४ ॥ परमहंसकुळ सनकादिक सकळ । राहिले निश्चळ करोनि चित्त ॥ ५ ॥ नामा म्हणे मना सोइरे हरिजन । तारक त्यांचे चरण दृढ धरी ॥ ६ ॥

३२७७ पृथ्वी ध्यासी तरी पृथ्वीचि होसी । केशव न होसी अरे मना ॥ १ ॥ आप ध्यासी तरी आपचि होसी । केशव न होसी अरे मना ॥ २ ॥ वायु ध्यासी तरी वायूचि होसी । परि केशव न होसी अरे मना ॥ ३ ॥ आकाश ध्यासी तरी आकाशचि होसी । परी केशव न होसी अरे मना ॥ ४ ॥ नामा म्हणे जरी केशवासी ध्यासी । तरी केशवचि होसी अरे मना ॥ ५ ॥

३२७८ शोधोनिया चारी वेद । सार काढोनियां भेद ॥ १ ॥ मना जाण जाण जाण । विठोबाची प्रेमखूण ॥ २ ॥ साही शास्त्रांचें संमत । मंथूनि काढिलें यथार्थ ॥ ३ ॥ याज्ञिकांचि जिवनकळा । उन्मनीचा जो जिव्हाळा ॥ ४ ॥ नामा म्हणे माझे बापें । साधीयलें संत-कृपें ॥ ५ ॥

३२७९ प्रीति नाहीं रायें वर्जियेली कांता । परी तिची सत्ता जगावरी ॥ १ ॥ तैसे दंभधारी आम्ही तुझे भक्त । घालूं यमदूत पायां-तळीं ॥ २ ॥ रायाचा तो पुत्र अपराधी देखा । तो काय आणिका दंडवेल ॥ ३ ॥ बहात्तर खोडी देवमण कंठीं । आम्हां जगजेठी नामा म्हणे ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

३२८० भक्तिभावें वळे गा देव । महाराज पंढरिराव ॥ १ ॥ पंढ-रीसी जावें । संतजनीं भेटावें ॥ २ ॥ भक्ति आहे ज्याचे चित्तीं । त्याला पावतो निश्चितीं ॥ ३ ॥ भाव धरा मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

३२८१ भृंगीचिया अंगीं कोणतें हो बळ । शरिरें अनाढळ केली आळी ॥ १ ॥ काय तिनें तपमुद्रा धरियेली । म्हणोनिया झाली भृंगी अंगें ॥ २ ॥ अरे बा शहाणिया तैसा करीं जप । संतयोगें पाप नाहीं होय ॥ ३ ॥ नामयाची जनी पिटिती डांगोरा । संदेह न धरा करा पुजा ॥ ४ ॥

३२८२ हेंचि देवांचें भजन । सदा राहे समाधान ॥ १ ॥ येर अवघें संसारिक । इंद्र देव ब्रम्हादिक ॥ २ ॥ वरकडाचा पाड किती । जनी देवास बोलती ॥ ३ ॥

३२८३ चोरा संगतीनें गेला । वाटे जातां नागवला ॥ १ ॥ तैसी सांडोनियां भक्ति । धरी विषयाची संगती ॥ २ ॥ अग्निसवें खेळें । न जळे तो परी पोळे ॥ ३ ॥ विश्वासला चोरा । जनी म्हणे घाला वरा ॥ ४ ॥

३२८४ जगीं विठ्ठल रुक्मिणी । तुम्ही अखंड स्मरा ध्यानीं ॥ १ ॥ मग तुज काय उणें । झाले सोयरे त्रिभुवनें ॥ २ ॥ साराचें जें सार । भवसिंधु उतरी पार ॥ ३ ॥ मन ठेउनी चरणीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

३२८५ सुखें संसार करावा । माजी विठ्ठल आठवावा ॥ १ ॥ असोनियां देहीं । छाया पुरुष जैसा पाहीं ॥ २ ॥ जैसा सूर्य घटाकाशीं । तैसी देहीं जनी दासी ॥ ३ ॥

३२८६ अंगीं हो पें शांती । दया क्षमा सर्वांभूतीं ॥ १ ॥ जेथें जाऊन पाहे देवा । ब्रम्हादिक करिती सेवा ॥ २ ॥ आवडी असे पें किर्तनीं । लवे संतांचे चरणीं ॥ ३ ॥ जैसी दया पुत्रावरी । तेंचि पाहे चराचरीं ॥ ४ ॥ बहु अपराध केला । म्हणे जनी तो रक्षिला ॥ ५ ॥

३२८७ आपणची सारा । पाहावें की नारीनरां ॥ १ ॥ पटाकारणें हे जनी । पांडुरंग तंतु मनीं ॥ २ ॥ भावेविण भजलें । भिऊनियां झांकी डोळे ॥ ३ ॥ म्हणे काय पाहूं येतें । भिन्न नव्हे वस्तु जेथें ॥ ४ ॥ भिन्नाभिन्न नाहीं मनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

३२८८ संत आणि देव मानी जो वेगळे । तेणें येथें आगळे केले दोष ॥ १ ॥ माता ते वेगळी कुच ते उरींचें । म्हणोनियां त्याचें मर्दन करी ॥ २ ॥ पाप तें वेगळें पुण्य तें आगळें । म्हणोनी गरळें पितो मद ॥ ३ ॥ दिवस उगवतां पाहों नये त्यातें । जेणें हो संतांतें द्वेषियेलें ॥ ४ ॥ तयाचा विटाळ वाहे रजस्वला । म्हणे जनी चांडाळा बोलावूं नका ॥ ५ ॥

३२८९ पाणी तेंचि मेघ मेघ तेंचि पाणी । काय या दोन्हीपणीं वेगळीक ॥ १ ॥ माती तेंचि धूळ धूळ तेंचि माती । भेंडा आणि भिंती काय दोन ॥ २ ॥ साखरीं गोडी गोडी साखरेसी । थिजलें तुपासी काय दोन्ही ॥ ३ ॥ डोळा तें बुबुळ बुबुळ तो डोळा । शांति ज्ञानकळा काय भिन्न ॥ ४ ॥ वदन ते ओंठ ओंठ तें वदन । क्षेम आलिंगन काय दोन ॥ ५ ॥ जीभ ते पडजीभ पडजीभ ते जीभ । आशा आणि लोभ काय दोन ॥ ६ ॥ संत तेचि देव देव तोचि संत । म्हणे जनी मात गोष्टी भिन्न ॥ ७ ॥

३२९० काम लागे कृष्णापाठीं । केली स्मशानाची गांठी ॥ १ ॥

परम कामें भुलविला । कृष्ण स्मशानासी नेला ॥ २ ॥ भुलविला मनीं । रुद्र पाहोनी मोहनी ॥ ३ ॥ कन्येचिये पाठीं । ब्रह्म लागे हातवटी ॥ ४ ॥ काम पराशरालागीं । ज्ञानासी लाविली आगी ॥ ५ ॥ काम गेला शुकापाठीं । म्हणे जनी मारी काठी ॥ ६ ॥

३२९१ येऊनियां जन्मा एक । करा देहाचें सार्थक ॥ १ ॥ वाचे नाम विठ्ठलाचें । तेणें सार्थक जन्माचें ॥ २ ॥ ऐसा नामाचा महिमा । शेष वर्णितां झाली सीमा ॥ ३ ॥ नाम शास्त्रीं त्रिभुवनीं । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

३२९२ विवेकाची पेठ । उघडी पंढरीची वाट ॥ १ ॥ तेथें नाहीं कांहीं धोका । उठाउठी भेटे सखा ॥ २ ॥ मरोनिया जावें । शरण विठोबासी व्हावें ॥ ३ ॥ म्हणे नामयाची जनी । देव करा ऐसा ऋणी ॥ ४ ॥

३२९३ नाना व्रत तप दान । मुखीं हरी स्मरण ॥ १ ॥ येथें असो द्यावा भाव । पुरवी अंतरीचें देव ॥ २ ॥ हाचि विश्वास धरूनी । कृपा करील चक्रपाणी ॥ ३ ॥ भक्तिभाव ज्याचा पुरा । त्यांसी धांवतो सामोरा ॥ ४ ॥ लक्ष लावा पायापाशीं । म्हणे नामयाची दासी ॥ ५ ॥

३२९४ शुराचें तें शस्त्र कृपणाचें धन । विध्वंसिला प्राण हातां नये ॥ १ ॥ गजमाथां मोती सर्पाचा तो मान । गेलियाही प्राण हातां नये ॥ २ ॥ सिंहाचे ते नख पतिव्रतेचें स्तन । गेलियाही प्राण हातां नये ॥ ३ ॥ विराल्यावांचून देह अहंभाव । जनी म्हणे देव हातां नये ॥ ४ ॥

३२९५ कीर्तनाचा रस आवडे नरासी । लागती पायांसी मुक्ति चारही ॥ १ ॥ वारी पंढरीची निश्चय ज्यां केला । वारकरी झाला पंढरीचा ॥ २ ॥ मोक्षाचा जो मोक्ष मुक्तिची जी मुक्ति । जनी म्हणे किती सांगूं फार ॥ ३ ॥

## श्रीभानुदासमहाराज

३२९६ मनासी करीं पां रे बोध । आतां लवकरी होई सावध । सांडी द्वैत भेदाभेद । वाचे उच्चारी रामकृष्ण गोविंद ॥ १ ॥ व्रत करी एकादशी । नेमें जाईं पंढरीसी । आषाढी आणि कार्तिकीसी । दोही वारासी चुकों नको ॥ २ ॥ सोपें वर्म म्हणे भानुदास । नाचा गातां मना उल्हास । आणिक नको वा हव्यास । साधीं साधन हेंचि सोपें ॥ ३ ॥

३२९७ योगाचिया आटी नको धरूं पोटीं । वांयां शीण तळवटीं तुज होय ॥ १ ॥ यज्ञाचिया आटी नको धरूं पोटीं । वांयां शीण तळवटीं तुज होय ॥ २ ॥ तपाचिया आटी नको धरूं पोटीं । वांयां शीण तळवटीं तुज होय ॥ ३ ॥ तपाचिया आटी नको धरूं पोटीं । वांयां शीण तळवटीं तुज होय ॥ ४ ॥ अनुष्ठानाचिया आटी नको धरूं पोटीं । वांयां शीण तळवटीं तुज होय ॥ ५ ॥ भानुदास म्हणे रामनामें गोष्टी । धन्य तूं सृष्टीमाजी होई ॥ ६ ॥

३२९८ कामाचिया सोसें पडशी पतनीं । यमाची जाचणी बहु असे ॥ १ ॥ क्रोधाचिया सोसें पडशी पतनीं । यमाची जाचणी बहु असे ॥ २ ॥ मदाचिया सोसें पडसी पतनीं । यमाची जाचणी बहु असे ॥ ३ ॥ लोभाचिया सोसें पडसी पतनीं । यमाची जाचणी बहु असे ॥ ४ ॥ भानुदास म्हणे सांडोनियां सोस । होईरे उदास सर्वभावें ॥ ५ ॥

३२९९ आशेचिया सोसें गुंतसी पामरा । न चुकती येरझारा चौऱ्यांशीच्या ॥ १ ॥ मदाचिया सोसें गुंतसी पामरा । न चुकती येरझारा चौऱ्याशीच्या ॥ २ ॥ तृष्णेचिया सोसें धावसी पामरा । न चुकती येरझारा चौऱ्याशीच्या ॥ ३ ॥ कल्पनेच्या मागे धांवसी कल्पका । न पावसी सुखा बुडसी वांयां ॥ ४ ॥ भानुदास म्हणे सर्व हें सोडूनीं । एक चक्रपाणी सखा करीं ॥ ५ ॥

३३०० साधनाच्या अटी नकोरे कपाटीं । पंढरी वैकुंठ पाहें डोळां ॥ १ ॥ मंत्राच्या आटी पडशील व्यसनीं । पंढरी जाऊनी पाहें डोळां ॥ २ ॥ तपाचिया आटी पडशी डोंगरीं । पाहें पां पंढरी डोळे भरी ॥ ३ ॥ यज्ञाच्या आटी फिरूं नको देशा । पंढरीनिवासा पाहें डोळां ॥ ४ ॥ भानुदास म्हणे नामाचा हव्यास । पंढरीसुखास पात्र होशी ॥ ५ ॥

३३०१ भांबावसी कां रें माझें माझें म्हणसी । कोण हें कोणासी कामा आलें ॥ १ ॥ घेईं तूं अनुभव कोणाचे ते कोण । अंतकाळीं जाण पारखे होती ॥ २ ॥ जवळी असतां धन कांहीं रूका । तेव्हां म्हणती सखा दादा भाई ॥ ३ ॥ हीनपणें म्हणती अभागी करंटा । जन्मला फुकटा मरता बरें ॥ ४ ॥ भानुदास म्हणे ऐसें हें जन । परि माझें माझें जाण करितीं वांयां ॥ ५ ॥

३३०२ नको फिरूं रानीं वनीं तूं दुर्गघाट । सोपी आहे वाट पंढरीची ॥ १ ॥ नको करूं जप तप अनुष्ठान । सोपी आहे जाण पंढरी हे ॥ २ ॥ नको जाऊं तिर्थां मनाच्या हव्यासें । जाईं तूं उल्हासे पंढरीसी ॥ ३ ॥ नको करूं योग अष्टांग निर्वाण । सोपें तें भुवन पंढरी जगीं ॥ ४ ॥ भानुदास म्हणे सोपें वर्म राम । कासयासी श्रम करसी बहु ॥ ५ ॥

## श्रीएकनाथमहाराज

३३०३ नोहे ब्रह्मज्ञान लेंकुरांचा खेळ । अवघाचि कोल्हाळ आशाबद्ध ॥ १ ॥ वाढवुनी जटा म्हणती ब्रह्मज्ञानी । परी पतनालागुनी न चुकेचि ॥ २ ॥ लावुनी विभूती बांधुनियां मठा । ब्रह्मज्ञान चेष्टा दाविताती ॥ ३ ॥ माळा आणि मुद्रा लेवुनियां सांग । ब्रह्मज्ञान सोंग दावितातीं ॥ ४ ॥ एका जनार्दनीं संतसेवेवीण । ब्रह्मज्ञान खूण न कळेचि ॥ ५ ॥

३३०४ अष्टांग साधन धूम्रपान अटी । ब्रह्मज्ञानासाठीं करी-

ताती ॥ १ ॥ परी ते न लभे न लभे सर्वथा । वाउग्याची कथा बोलताती ॥ २ ॥ शब्दिकाचा शब्द कुंटित ते ठायीं । वाउगें कांहीं बाही बोलूं नये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतकृपा होतां । ब्रह्मज्ञान तत्वतां घर रिघे ॥ ४ ॥

३३०५ ब्रह्मज्ञानालागीं ब्रह्मादिक पिसे । तें तुम्हां अम्हां कैसें आकळेल ॥ १ ॥ प्रत्यक्ष परब्रह्म श्रीरामचंद्र । वसिष्ठ मुनींद्र गुरू त्याचा ॥ २ ॥ कृष्ण बळीराम संदीपना शरण । तेणे गुह्यज्ञान कथियेलें ॥ ३ ॥ प्रत्यक्ष वामांकीं असोनी पार्वती । वेळोवेळां विनंति कारितसे ॥ ४ ॥ सुलभ नव्हे देवा सुलभ नव्हे जीवा । सुलभ गौरवा न कळेचि ॥ ५ ॥ एका जनार्दनीं श्रीगुरुवांचून । ब्रह्मज्ञान खूण न कळेचि ॥ ६ ॥

३३०६ ब्रह्मज्ञानासाठीं वेदशास्त्र पुराण । करितां श्रवण नातुडेचि ॥ १ ॥ नातुडेचि कदा गीता भागवती । वाचितां हो पोथी जन्मवरी ॥ २ ॥ द्वारकापट्टण क्षेत्र वाराणसी । करितां तीर्थाटनासी प्राप्त नोहे ॥ ३ ॥ प्राप्त नोहे गुरु मंत्र तंत्र घेतां । शब्दज्ञान कथितां प्राप्त नोहे ॥ ४ ॥ ज्यासी पुनरावृत्ति स्थिर नोहे बोध । अखंडीत भेद मनामाजी ॥ ५ ॥ ज्याचें जन्मांतर सरुनियां जाये । तेथें स्थिर होय गुरुबोध ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं ऐसा जो कां पुरुष । कोटीमाजी एक ब्रह्मज्ञानी ॥ ७ ॥

३३०७ ब्रह्मज्ञान वाचें सांगतां नये । जैं कृपा होये श्रीगुरुची ॥ १ ॥ लाभेल लाभेल ब्रह्मज्ञान क्षणीं । वाउगी काहाणी बोलुनी काय ॥ २ ॥ हृदयींच बोध ठसतां अंतरीं । कामक्रोध वैरी पळताती ॥ ३ ॥ तैसें ब्रह्मज्ञान कळलिया वरी । सर्वभावें वैखरीं गुण वाणी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं वंदूं गुरुपाय । आणीक उपाय नाहीं नाहीं ॥ ५ ॥

३३०८ ब्रह्मज्ञानाची कसवटी । अनुभव नाहीं पोटीं । बोलाची

चावटी । वाउगी बापा ॥ १ ॥ शुद्ध ब्रह्मज्ञान । एक आत्मा भूतमात्रीं प्रमाण । विनोदें छळण । कवणाचें न करी ॥ २ ॥ जीव शिवा नाहीं भेद । अवघा नित्य परमानंद । आनंदाचा कंद । तोचि ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वर्म । भाविकांसी सुधर्म । अभाविकांसी भ्रम । जाणीवेचा ॥ ४ ॥

३३०९ ब्रह्मज्ञानासाठीं । हिंडताती पाठोपाठीं ॥ १ ॥ नोहे नोहे बा फुकाचें । बोल बोलतां नये साचें ॥ २ ॥ ऐसें आहे तैसें आहे । वाउगा तो भ्रम पाहे ॥ ३ ॥ जनार्दन कृपा पूर्ण । तेंचि कळे ब्रह्मज्ञान ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण । चालून येईल ब्रह्मज्ञान ॥ ५ ॥

३३१० वाउगे ते बोल बोलती चावटी । ब्रम्हज्ञान कसवटी अंगीं नाहीं ॥ १ ॥ संसारीं असोनीं अलिप्त नलिनी । तैसा ब्रम्हज्ञानी विरक्त तो ॥ २ ॥ आकाश मंडळीं रवि तो भ्रमला । परि रांजणीं बिंबला नाथिलाचि ॥ ३ ॥ एका जनार्दनीं प्रसादावांचुनी । ब्रम्हज्ञान मनीं न ठसे कधीं ॥ ४ ॥

३३११ अनुतापाविण । नोहे कदा ब्रम्हज्ञान ॥ १ ॥ हे तों मागील रहाटी । अनुताप घ्यावा पोटीं ॥ २ ॥ अनुतापावांचुन । कवण तरलासे जाण ॥ ३ ॥ अनुताप नाहीं पोटीं । वांयां बोलूं नये गोठी ॥ ४ ॥ अनुतापावांचुन जाण । नाहीं नाहीं ब्रम्हज्ञान ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं अनुताप । होतां निवारे त्रिविधताप ॥ ६ ॥

३३१२ वर्म जाणे तो विरळा । तयाचीं लक्षणें पैं सोळा । देहीं देव पाहे डोळां । तोचि ब्रम्हज्ञानी ॥ १ ॥ जन निंदो अथवा वंदो । जया नाहीं भेदाभेद । विधि निषेधाचे शब्द । अंगीं न वाणती ॥ २ ॥ कार्य कारण कर्तव्यता । हे पिसें नाहीं सर्वथा । उन्मनी समाधी अवस्था । न मोडे जयाची ॥ ३ ॥ कर्म अकर्माचा ताठा । न वाणेचि अंगीं बोखटा । वाउग्या त्या चेष्टा । करीना कांहीं ॥ ४ ॥ शरण एका जनार्दनीं । तोचि एक ब्रम्हज्ञानी । तयाचे दरुशनीं । प्राणीयासी उद्धार ॥ ५ ॥

३३१३ निरपेक्ष निर्द्वंद तोचि ब्रम्हज्ञानी । नायकेचि कानीं परापवाद ॥ १ ॥ सर्वदा सबाह्य अंतरीं शुचित्व । न देखे न दावी महत्व जगीं वायां ॥ २ ॥ एका जनार्दनीं पूर्णपणें धाला । शेजेचा मुराला रसीं उतरे ॥ ३ ॥

३३१४ येणेंचि आश्रमें साधती साधनें । तुटती बंधनें यमपाश ॥ १ ॥ काया क्लेश न करणें व्रत तप दान । नलगे हवन तीर्थाटन ॥ २ ॥ संतांच्या सांगांत गावें रामनाम । सुखें सुख विश्राम लाभे तुजसी ॥ ३ ॥ प्रपंच परमार्थ ऐक्य रूपें दोन्हीं । तोचि ब्रम्हज्ञानी मनीं समजा ॥४॥ व्यापक तो जगीं व्यापुनी निराळा । एकाजनार्दनीं वेगळा सुख दुःखां ॥ ५ ॥

३३१५ भाव अभावना निमाली अंतरीं । वांयां हावभरी नाहीं मन ॥ १ ॥ कामक्रोध ज्याचे दमोनियां गेले । इंद्रियें समरसलीं एके ठायीं ॥ २ ॥ एकपणें सर्व होऊनियां मेळा । रतले गोपाळाचरणीं मन ॥ ३ ॥ तोचि ब्रम्हज्ञानी जगामाजी धन्य । एकाजनार्दन चरण वंदी ॥ ४ ॥

३३१६ भक्तिचे उदरीं जन्मलें ज्ञान । भक्तिनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥ १ ॥ भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ । वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ २ ॥ फूल फळ दोनी एर एरा पाठीं । ज्ञान वैराग्य तेवि भक्तिचें पोटीं ॥ ३ ॥ भक्तिविण ज्ञान गिंवसिती वेडे । मूळ नाहीं तेथें फळ केविं जोडे ॥ ४ ॥ भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन । भक्तिमाता तया करितसे जतन ॥ ५ ॥ शुद्ध भक्तिभाव तेथें तिष्ठे देव । ज्ञानासी तो ठाव सुख वस्तीसी ॥ ६ ॥ शुद्ध भाव तेथें भक्तियुक्त ज्ञान । तयाचेनी अंगें समाधी समाधान ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं शुद्ध भक्ति क्रिया । ब्रम्हज्ञान त्याच्या लागतसे पायां ॥ ८ ॥

३३१७ विष्णुदासा घरीं ब्रह्मज्ञान लोळे । म्हणतसे बळें घ्या घ्या कोणी ॥ १ ॥ आरूवें सावडें नाम मुखीं जया । ब्रह्मज्ञान तया विन-

वितसे ॥ २ ॥ माझा अंगिकार करा संतजन। ऐसें ब्रह्मज्ञान कींव भाकीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतांचे चरणीं। होऊनी दीन वदनीं कींव भाकीं ॥ ४ ॥

३३१८ अर्थ तो विवाद ज्ञान ते उपाधी। आम्हां उघड समाधी नाममात्रें ॥ १ ॥ हेंचि निरूपण उद्धवा श्रीकृष्ण। सांगतसे खुण जीवींची ते ॥ २ ॥ स्तुती अथवा निंदा परस्त्री परधन। तेथें कदा मन घालूं नये ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हेंचि ब्रह्मज्ञान। यापरतें साधन आन नाहीं ॥ ४ ॥

३३१९ असोनि कुळींचा हीन। परी ज्यासी ब्रह्मज्ञान। त्यासी तिन्ही देवादि सुरगण। वंदिताती ॥ १ ॥ त्याची मृत्युलोकीं सेवा। जयासी घडे सदैवा। मा ब्राह्मण भूदेवा। असंख्य पुण्य जोडे ॥ २ ॥ तयासी वस्त्र अन्न। जठर करिती तृप्त जाण। त्यासी वैकुंठादि आंदण। देव देतो ॥ ३ ॥ त्यासी जो करी शीतळ। त्यासी पुण्य जोडे सकळ। एकाजनार्दनीं केवळ। तोचि साधु ॥ ४ ॥

३३२० बहु पुण्य होय गाठीं। तैंच एशियाची भेटी। तयाचिये कृपादृष्टी। सहज ब्रह्म लाभे मनुष्या ॥ १ ॥ देहीं असोनि विदेही। करूनी कर्म अकर्ते पाही। वैषम्याची नाहीं। वाटा-घाटी तयासी ॥ २ ॥ देहीं कष्ट किंवा सुख। शीत उष्ण समान देख। वाऊगाची शोक। नाहीं जया मानसीं ॥ ३ ॥ तोचि जाणा ब्रह्मज्ञानी। वांयां न बोले बोलोनि मौनी। लक्ष्मी सदा परध्यानीं। एकाजनार्दनीं तो धन्य ॥ ४ ॥

३३२१ वेद वदे ब्रह्म एक। स्वानुभवें तैसेंच देख ॥ १ ॥ हा वेदाचा गौरव। कोण घेतो अनुभव ॥ २ ॥ वेद ब्रह्मस्थिती। कोण प्रतिपाद्य करिती ॥ ३ ॥ वेदीं ब्रह्माचें ब्रह्मपण। शरण एका-जनार्दन ॥ ४ ॥

३३२२ भगवद्भावो सर्वांभूतीं। हेंचि ज्ञान हेचि भक्ति। विवेक विरक्ती। याचि नांवें ॥ १ ॥ हें सांडूनि विषयध्यान। तेंचि मुख्यत्वें

अज्ञान। जीवीं जीवां बंधन। येणेंचि दृढ ॥ २ ॥ आठव तो परब्रह्म। नाठव तो भवभ्रम। दोहींचें निजवर्म। जाण बापा ॥ ३ ॥ आठव विसर चित्तीं। जेणें जाणिजेती। तेचि एक निश्चितीं। निजरूप ॥ ४ ॥ स्मरण तेचि निजमुक्ती। विस्मरण तेचि अधोगती। ऐसें पुराणें गर्जती। बाह्या उभारूनी ॥ ५ ॥ एका जनार्दनीं। सहज निजबोध मनीं। सबाह्याभ्यंतरीं। पूर्ण परमानंद ॥ ६ ॥

३३२३ ज्ञानाभिमान विश्वामित्रा। रंभेमागें झाला कुत्रा ॥ १ ॥ ज्ञानाभिमान दुर्वासासी। म्हणोनी शापी अंबऋषी ॥ २ ॥ ज्ञानाभिमान ब्रह्मयासी। म्हणोनि चोरिलें गाई वत्सांसी ॥ ३ ॥ ज्ञानाभिमान नको देवा। एका जनार्दनीं देई सेवा ॥ ४ ॥

३३२४ नित्य काळ जेथें नामाचा घोष। तेथें जगन्निवास लक्ष्मीसहित ॥ १ ॥ ब्रह्मज्ञान तेथें लोळतें अंगणीं। सेवुनी पायवणी घरीं राहे ॥ २ ॥ विष्णुदास तयाकडे न पाहती फुका। नाम मुखीं देखा रामकृष्ण ॥ ३ ॥ एका जनार्दनीं ऐसा ज्याचा नेम। तया घरीं पुरुषोत्तम सदा वसे ॥ ४ ॥

३३२५ वेदवचनें सुतक पावे। ब्रह्म म्हणतां ब्रह्म नव्हे ॥ १ ॥ वेद नकळेचि साचार। देहबुद्धि अविचार ॥ २ ॥ सकळ ब्रह्म पैं अद्वैत। वेद परिसोनी ना तुटे द्वैत ॥ ३ ॥ श्रुती सांगती परमार्था। हिंसा न करावी सर्वथा ॥ ४ ॥ संकल्प नाशी तो संन्यासी। तेथें तो कल्पना कायसी ॥ ५ ॥ वेद बोले सर्वांठायीं। एकावांचुनी दुजें नाहीं ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं बोधू। नाही तंव न कळे वेदु ॥ ७ ॥

## जनांस उपदेश

३३२६ नाशिवंत देह जाणार जाणार। हा तो निराधार स्वप्नवत ॥ १ ॥ अभ्रींची छाया क्षणीक साचार। तैसा हा प्रकार नाशिवंत ॥ २ ॥ मृगजळाचें जीवन क्षणीक निर्धार। तैसा हा विचार व्यर्थ सर्व ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाशिवंतासाठीं। केवढी आटाआटी प्राणी करती ॥ ४ ॥

३३२७ नाशिवंत धन नाशिवंत मान। नाशिवंत जाण काया सर्व ॥ १ ॥ नाशिवंत देह नाशिवंत संसार । नाशिवंत विचार न करती ॥ २ ॥ नाशिवंत स्त्रीपुत्रादिक बाळें। नाशिवंत वळे गळां पडती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सर्व नाशिवंत । एकाचि शाश्वत हरिनाम ॥ ४ ॥

३३२८ रडती रांडापोरें नाशिवंतासाठीं। केव्हढी आटाआटी जीवीं होसी ॥ १ ॥ कुडीसी मरण न कळेचि जाण । आत्मा अविनाश परिपूर्ण स्वयंज्योती ॥ २ ॥ एका जनार्दनीं नाथिलाची भास । विठ्ठलनामें सोरस न घे कोणी ॥ ३ ॥

३३२९ भांबावले जन म्हणती माझें माझें । वाडगेंची ओझें वाहाताती ॥ १ ॥ खराचियेपरि उकरडा सेविती । नोहे तया गती अधम जाणा ॥ २ ॥ स्तंभ असोनियां चोर ह्मणती आला । नसोनी प्रपंच खरा भासीला ॥ ३ ॥ मृगजळवत् जाणार सर्व । अभ्रींचें सावेव वांयां जैसें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धरीं का रे सोय । पुनरपि नये गर्भवासा ॥ ५ ॥

३३३० गर्भवासीचें दुःख सांगतां आटक । मळमूत्र दाथरीं जननी जठरीं अधोमुख ॥ १ ॥ शिव शिव सोहं सोहं । कोहं सोहं सांडूनी पाहे निजजीवन ॥ २ ॥ गर्भवासीचें सांकडे सांगावें कवणापुढें। सर्वांगीं विष्ठालेपु नाकीं तोंडीं किडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भेटी तें जन्ममरणा तुटी । जननी पयपान पुढती न करणें गोष्टी ॥ ४ ॥

३३३१ आशेपाशीं काम आशेपाशीं क्रोध । आशेपाशीं भेद लागलासे ॥ १ ॥ आशेपाशीं कर्म आशेपाशीं धर्म । आशेपाशीं नेम नानात्वाचा ॥ २ ॥ आशेपाशीं याती आशेपाशीं जाती । आशेपाशीं वस्ती अहंकाराची ॥ ३ ॥ एकाजनार्दनी निराशी तो धन्य । ज्यासी नारायण सांभाळिता ॥ ४ ॥

३३३२ त्रिगुणात्मक देह पंचभूती खेळ। शेवटीं निर्फळ होईल रया ॥ १ ॥ दिसती भूताकृति वाउगी ते मिथ्या । शेवटीं तत्वतां कांहीं नुरे ॥ २ ॥ पंचभूतें विरती ठायींचे ठायीं । वांयां देहादेहीं बद्ध मुक्त ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाथिलाचि खेळ । अवघा मायाजाळ जाईल लया ॥ ४ ॥

३३३३ एक एक योनी कोटी कोटी फेरा । नरदेह थारा अवचटा ॥ १ ॥ मांडिलासे खेळ मांडिलासे खेळ। मांडियेला खेळ नरदेहीं ॥ २ ॥ स्त्री पुत्र नातु बाहुले असती। नाचवितो पती त्रैलोक्याचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मांडियेला खेळ । त्रैलोक्य सकळ बाहुलें त्याचें ॥ ४ ॥

३३३४ चौऱ्यांशी लक्ष योनी फिरतां । अवचट नरदेह आला हातां ॥ १ ॥ करीं याचें समाधान । वाचे गाई नारायण ॥ २ ॥ सोडविता तुज कोणी । नाहीं नाहीं त्रिभुवनीं ॥ ३ ॥ भुलूं नको जाशी वांयां । एका जनार्दनीं लागे पायां ॥ ४ ॥

३३३५ हिताकारणें तुम्हां सांगतसें गुज । कांहीं तरी लाज धरा आतां ॥ १ ॥ अवचट नरदेह पावलें निधान । कांहीं सोडवण करीं बापा ॥ २ ॥ पूर्व सुकृताचें फळ तें पदरीं । म्हणोनि हा देह निर्धारीं प्राप्त तुज ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वांयां जातो काळ । कांहीं तरी गोपाळ आठव वेगें ॥ ४ ॥

३३३६ गत तें आयुष्य गत तें धन । गत दृश्यमान पदार्थ तो ॥ १ ॥ गत तें अंबर गत तो पवन । गत तें हवन गत होय ॥ २ ॥ एकाजनार्दनीं अगत तें नाम । म्हणोनी विश्राम योगियांसीं ॥ ३ ॥

३३३७ शत वरुषांची घेउनी आला चिठ्ठी । अर्ध रात्रीं खादलें उठाउठी ॥ १ ॥ केव्हां जपसील रामनाम वाचे । आयुष्य सरलीया पडतील यमफांसे ॥ २ ॥ अज्ञानत्व गेलें वरुषें बारा । खेळतसे विटी दांडू भोंवरा ॥ ३ ॥ उपरी तारुण्य मदाचा ताठा । करी वेसोनी

विषयाच्या चेष्टा ॥ ४ ॥ ऐसीं पन्नास वर्षें गेलीं भरोभरी । एका-जनार्दनीं पडला चौऱ्याशिचे फेरीं ॥ ५ ॥

३३३८ निमालिया देहासाठीं । रांडा पोरें हाणती होटीं ॥ १ ॥ तयासाठीं न रडती । आपुलें म्हणती कैसें होती ॥ २ ॥ ऐसे भुलले पामर । नरक भोगिती अघोर ॥ ३ ॥ एका शरण जनार्दनीं । रामनाम न घेती कोणी ॥ ४ ॥

३३३९ मनुष्यदेहीं व्हावें ब्रह्मज्ञान । घेतो पुढिलें आमंत्रण ॥ १ ॥ पुढें जन्माचा विसार । घेतो अतिमानें तो पामर ॥ २ ॥ चौऱ्यांयशीं लक्ष योनीप्रती । कोटी कोटी फेरे होती ॥ ३ ॥ ऐसा मनुष्यदेह पावन । तो वेंचि विषयाकारण ॥ ४ ॥ होतां विषयीं वासना । नाठविची एका-जनार्दना ॥ ५ ॥

३३४० क्षणभंगुर देह । याचा मानिसी संदेह ॥ १ ॥ उदकावरील तरंग । तैसें दिसे सर्व जग ॥ २ ॥ पाहतां मृगजळा । जळ नोहेची निर्मळा ॥ ३ ॥ साउली अभ्राची । वायां जाय जैसी ॥ ४ ॥ करितां लवण पुतळा । विरे जैसा मिळतां जळा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं तैसें । दिसतां देह नासे जैसें ॥ ६ ॥

३३४१ अस्थिमांसाचा हा कोथळा । ऐसा देह अमंगळा ॥ १ ॥ प्राणी म्हणती माझे माझें । खर जैसें वाहे ओझें ॥ २ ॥ न कंटाळे कधीं मन । जेवीं भुले सर्प जाण ॥ ३ ॥ एकजनार्दनी देवा । याचा विसर पाडावा ॥ ४ ॥

३६४२ मिळती सख्या मायाबहिणी । हातीं घेउनी तेलफणी ॥ १ ॥ जंव आहे शरीर चांग । तंव काढिताती चांग भांग ॥ २ ॥ नासलिया शरीरातें । टाकिताती तया परतें ॥ ३ ॥ पहा देहीं देव असतां । नाहीं म्हणती सर्वथा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पंचत्व । मग म्हणती भूत भूत ॥ ५ ॥

३३४३ आत्मा तो देहीं नाशिवंत नाहीं । अशाश्वत पाहीं

कलेवर ॥ १ ॥ समजोनी उमजोनी झांकिती डोळे । बळेंचि आंधळे होती मूर्ख ॥ २ ॥ मरणाचे हावे एकमेकां बोलती । गेला गेला म्हणती असोनि जवळी ॥ ३ ॥ एकाजनार्दनी ऐसे ते अंध । भुलले मतिमंद भ्रांतियोगें ॥ ४ ॥

३३४४ न कळेची मूढा सुखाची ती गोडी । पायीं पडली वेडी प्रपंचाची ॥ १ ॥ पान लागलिया गुळ न म्हणे गोड । तैसे ते मूढ विसरले नाम ॥ २ ॥ शुद्ध वैराग्याचा मानिती कंटाळा । पाळिती अमंगळा प्रपंचासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनी नाहीं भाव खरा । तया त्यां पामरां सांगुनी काय ॥ ४ ॥

३३४५ भासतसे दोर विखाराचे परी । तैसीच हे थोरी प्रपंचाची ॥ १ ॥ भुलले भुलले प्रपंचीं गुंतले । वांयांचि उगले बोल कां हे ॥ २ ॥ श्वानाचियेपरी मागें पुढें पाहे । माझा म्हणोनी बाह्यां कवटाळिती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अवकाळीं मेघ । तैसा प्रपंचीं दंभ लटिकाची ॥ ४ ॥

३३४६ प्रपंच आमिष गुंतशील गळीं । शेवटीं तळमळी होईल रया ॥ १ ॥ स्त्री पुत्र धन हें केवळ जाळें । गुंतशील बळें यांत रया ॥ २ ॥ पुढील विचार धरी कांहीं सोय । संतसंग लाहें अरे मूढा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सत्संगावांचुनी । कोण निर्वाणीं तारील तुज ॥ ४ ॥

३३४७ बाळ तरूण वृद्ध ऐसे तें पाहिलें । पाहुनी निमाले देखसी रया ॥ १ ॥ प्रपंच कावाड कोंबड्याचे परीं । पुढेंचि उकरी लाभ नाहीं ॥ २ ॥ तुज सुख दुःख मागील आठव । आतां भाकी कींव कांहीं रया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अहा रांडलेका । भोगिसी अनेका योनी रया ॥ ४ ॥

३३४८ अवघे सुखाचे सांगाती । दुःख देतां पळती ॥ १ ॥ सुख

देखोनि म्हणती माझें । दुःख देखतां पळती वोजें ॥ २ ॥ यापरि अवघें लटिकें देख । एकाजनार्दनीं पाहे सुख ॥ ३ ॥

३३४९ भक्ती नाहीं नामीं तो चांडाळ पतीत । तोचि जाणावा कुश्चित नष्ट येथें ॥ १ ॥ प्रपंच कर्दमीं बुडोनिया ठेले । संताविण उगले फजीत होती ॥ २ ॥ पुत्र मित्र कांता मानुनी भरवंसा । याचा मोह फांसा जन्मवरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अंतीं आहे कोण । न कळे संतांविण निश्चयेसीं ॥ ४ ॥

३३५० भजन करितां लाजतो पामर । संसारीं चित्त स्थिर सदा वाहे ॥ १ ॥ तीर्थयात्रे जाये संसार चिंता वाहे । पुराण कीर्तनी ये निद्रा बळें ॥ २ ॥ ऐसा तो पापिष्ठ कर्म तें सबळ । एकाजनार्दनीं म्हणे दोषी अमंगळ ॥ ३ ॥

३३५१ पिसाळलें श्वान पाणीयासी बीहे । तैसा नरदेह संसारासी ॥ १ ॥ वाउगाची शीण पावती पतन । नेणे आपुलें विंदान भुलला वांयां ॥ २ ॥ मर्कटासी जेवीं मदिरा पाजिली । भूतबाधा झाली तयावरी ॥ ३ ॥ सैरावैरा नाचे कोण तया हांसे । एकाजनार्दनीं तैसें मनुष्यदेहीं ॥ ४ ॥

३३५२ अवघें आयुष्य काळाधीन जाहलें । परी चित्त गुंतलें संसारांत ॥ १ ॥ सापें दरदूर गिळियेला मुखीं । तेणेंचि तो शेखीं मक्षिका धरी ॥ २ ॥ ऐसे हावभरी प्राणी पैं नाडले । म्हणती माझे वहिले कन्यापुत्र ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मृगजळाची आशा । पडे तेणें फांसा गळा बळें ॥ ४ ॥

३३५३ कासयासी मूढा करिसी संसार । पुढें तो अघोर थोर आहे ॥ १ ॥ बळेंचि कां रे नागवसी पहातां । विषय भोग भोगितां दुःख बहु ॥ २ ॥ पातकाची राशी हे तो कन्यापुत्र । तूं कां रे पवित्र त्यासी म्हणशी ॥ ३ ॥ एकाजनार्दनी नाशिवंतासाठीं । देवासवें तुटी पाडितोसी ॥ ४ ॥

३३५४ संसाराचें सुख कोण पैं सांगती । होत आहे फजिती लहान थोरां ॥ १ ॥ सर्पे मंडुक धरिलासे मुखीं । तेणें पैं शेखीं मक्षिका धरी ॥ २ ॥ मरती बापुडीं हाव धरती गोडी । तरी ती वेडीं नागवती ॥ ३ ॥ एकाजनार्दनी न धरीं सोय । वांयांचि धांवो जाय हांव भरी ॥ ४ ॥

३३५५ मक्षिकेनें जैसा रचियेला कंद । वाउगाचि वेध तैशा परी ॥ १ ॥ आणिकें झाडितां गुंतोनि पडती । तैशी हा फजिती संसाराची ॥ २ ॥ एका जनार्दनी कृपा न करी देव । तोंवरी अभाव सर्व जाणा ॥ ३ ॥

३३५६ कोण हरी आतां संसाराचा छंद । न स्मरतां गोविंद दुःख बहु ॥ १ ॥ शाहाणे बुडती शाहाणे बुडती । शाहाणे बुडती भवडोहीं ॥ २ ॥ तत्वज्ञानाच्या सांगताती गोष्टी । परि संसार हिंपुटी होती मूढ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संसाराचा छंद । टाकुनी गोविंद भजे कां रे ॥ ४ ॥

३३५७ मागे बहुतांसी सांगितले संतीं । वांयां हे फजिती संसार तो ॥ १ ॥ अंधाचे सांगाती मिळालेसे अंध । सुख आणि बोध काय तेथें ॥ २ ॥ विष खाऊनियां प्रचीत पाहे कोणी । तैसा अधमपणीं गुंतूं नको ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जाऊं नको वांयां । संसार माया लटिकी ते ॥ ४ ॥

३३५८ पावला जतन मातेचे उदरीं । संतोषली माता तयासी देखोनी ॥ १ ॥ जो जो जो म्हणोनी हालविती बाळा । नानापरी गाणें गाती करिती सोहळा ॥ २ ॥ दिवसेंदिवस वाढला सरळ फोक । परि कर्म करी आचाट तया न साहावे दुःख ॥३॥ शिकवितां नायके पडे भलते व्यसनीं । एका जनार्दनीं पुन्हां पडतसे पतनीं ॥४॥

३३५९ पिता सांगतां गोष्टी । तयासी करितो चावटी ॥ १ ॥ नायके शिकविलें । म्हणे म्हाताऱ्यासी वेड लागलें ॥ २ ॥ बाईल

बोलतांचि जाण । पुढें करून धांवे कान ॥३॥ ऐसें नसावें संतान । वांयां भूमीभार जाण ॥ ४ ॥ एकाजनार्दनी अमंगळ । त्याचा होईल विटाळ ॥ ५ ॥

३३६० व्हावें निसंतान । हेंचि एक बरें जाण ॥ १ ॥ येर श्वान ते सुकर । जन्मां येवोनियां खर ॥ २ ॥ मातापित्यांचा कंटाळा । न पहावें त्या चांडाळा ॥ ३ ॥ देखतांचि सचेल स्नान । करावें तें पाहुनि जाण ॥ ४ ॥ पुत्र नोहे दुराचारी । एकाजनार्दनीं म्हणे वैरी ॥ ५ ॥

३३६१ मातेचिया गळा न मिळे गळसरी । बाईलेसी सरी सोनियाची ॥ १ ॥ मातेचिये हातां न मिळे कांकण । बाईले करी तोडे घडी जाण ॥ २ ॥ मातेसी न मिळे अंगीं चोळी । बाईलेसी नेसवी चंद्रकळा काळी ॥ ३ ॥ बाईले आधीन ठेविलें जिणें । एकाजनार्दनीं नरकीं पेणें ॥ ४ ॥

३३६२ बाईल सांगतांची गोठी । म्हणे मातेसी करंटी ॥ १ ॥ जन्मापासुनी आमुचे मागें । अवदसा लागली सांगे ॥ २ ॥ इचे उत्तम नाहींत गुण । ऐसा बोले अभागी जाण ॥ ३ ॥ नरदेही ते गाढव । एकाजनार्दनीं नाहीं भाव ॥ ४ ॥

३३६३ देव गुरु माता पिता । ऐसा भाव जया चित्ता ॥१ ॥ नाहीं दुजा आठव कांहीं । चित्त जडलें चौघांपायीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं साचें । ऐसें मनीं नित्य ज्याचे ॥ ३ ॥

३३६४ माता पिता देव गुरु । ऐसा ज्याचा एक विचारु ॥ १ ॥ धन्य धन्य तयाचें शरिर । नर नोहे तो ईश्वर ॥ २ ॥ चारी दैवतें समान मानी । शरण एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

३३६५ मातापितियांसी जो करी नमन । धन्य त्याचें पुण्य इह जनीं ॥ १ ॥ मातापितियांचें करी जो पूजन । धन्य तयाचें पुण्य इहलोकीं ॥ २ ॥ मातापितियांची करीत जो सेवा । एकाजनार्दनीं देवा वरिष्ठ तो ॥ ३ ॥

३३६६ आळस निद्रा सांडी । रामनाम म्हणे तोंडीं ॥ १ ॥ धन वित्त मान । हें तों श्वानविष्ठे समान ॥ २ ॥ पुत्र पत्नी संसार । वांयां व्यर्थचि भार ॥ ३ ॥ हें परतें सांडी मनें । एकाजनार्दनीं जिणें ॥ ४ ॥

३३६७ सलगीनें सर्प हातीं तो धरिला । परि डंश तो वहिला करील बापा ॥ १ ॥ तैसें विषयांसी सलगी पैं देतां । नेती अधःपाता प्राणीमात्र ॥ २ ॥ विष उत्तम चांगलें घातलेंसे मुखीं । परि प्राण शोखी क्षणमात्रें ॥ ३ ॥ जाणोनी जाणोनी नको भुलूं वांयां । एकाजनार्दनीं पायां भजे आधीं ॥ ४ ॥

३३६८ श्वानाचा तो धर्म करावी वसवस । भले बुरे त्यास न कळे कांहीं ॥ १ ॥ वेश्यांचा धर्म द्रव्य तें हरावें । भले बुरे भोगावे न कळे कांहीं ॥ २ ॥ निंदकाचा धर्म निंदा ती करावी । भले बुरे त्यागांवीं न कळे कांहीं ॥ ३ ॥ सज्जनांचा धर्म सर्वांभूतीं दया । भेदाभेद तयां न कळे कांहीं ॥ ४ ॥ संतांचा तो धर्म अंतरीं ती शांती । एकाजनार्दनीं वस्ती सर्वांठायीं ॥ ५ ॥

३३६९ नेणतपणें पांडुरंगा ध्याईं । सदोदित गाई रामनाम ॥ १ ॥ मग तुज सोपे मार्ग ते असती । पांडुरंग चित्तीं दृढ धरी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं काया वाचा मन । करी समर्पण देवापायीं ॥ ३ ॥

३३७० कां रे नायकसी गव्हारा । कां रे न भजसी ईश्वरा ॥ १ ॥ सोपा मंत्र विठ्ठलराज । तेणें पुरे सर्व काज ॥ २ ॥ नको संसाराचें कोड । अंतकाळीं यमदंड ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कींव भाकी । रामनाम वदा मुखीं ॥ ४ ॥

३३७१ भवरोगा औषध जाण । नाममात्रा नारायण ॥ १ ॥ तेणें निरसे भवरोग । न लगे साधन अष्टांग ॥ २ ॥ कामक्रोधांची झाडणी । नामें होय तत्क्षणीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाममात्रा । उद्धरील कुळगोत्रा ॥ ४ ॥

३३७२ सुख एक आहे हरि आठवितां । इतर जपतां दुःख बहु

॥ १ ॥ ऐशी आठवण धरूनी मानसीं । हरि गावा मुखासी दिननिशीं ॥ २ ॥ सारे दिन करा संसाराचा हेत । परी भजनीं प्रीत असों द्यावी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धरूनि विश्वास । होईं कां रे दास संतचरणीं ॥ ४ ॥

३३७३ दुबळयासी धन । सांपडलिया नोहे जतन । अभाविकांसी नाम जाण । तैशा रीतीं ॥ १ ॥ धनलोभीयाचे परी । जैसें चित्त धनावरी । तैसें हृदयामाझारीं । नाम जपें ॥२॥ कामी पुरुषाचें ध्यान । तया न कळे आतजन । जैसा पारध्याधीन । मग होय ॥ ३ ॥ अभाविकाचे बोल । नव्हती ते फोल । एकाजनार्दनीं मोल । तया नाहीं वेंचत ॥ ४ ॥

३३७४ नाकळे जो आकळ । भक्तिप्रेमाचा वत्सल । रूप धरूनि कोमळ । भीमातटीं उभा ॥ १ ॥ त्याचा छंद असो जनीं । काया वाचा आणि मनीं । संचिताची हानी । कदा काळीं न होवो ॥ २ ॥ जें जें होत कर्माकर्म । अथवा उत्तम ते धर्म । प्राचीन तें कर्म । तया पासूनि सोडवी ॥ ३ ॥ एकविध धरी भाव । मागें देवापदीं ठाव । संचिताची हाव । तयापाशीं नुरेचि ॥ ४ ॥ ऐसा बळकट करी नेम । धरी संतसमागम । एकाजनार्दनीं धाम । पावसी तूं वैकुंठ ॥ ५ ॥

३३७५ कन्येचा करी जो नर विकरा । चांडाळ तो खरा अधमाचे ॥ १ ॥ तयाचिया मुखीं श्वानाची ते विष्ठा । पातकी वरिष्ठा सर्वांहूनी ॥ २ ॥ पंचमहापातकी विश्वासघातकी । या परता दोष कीं तया अंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं त्याचें नाम घेतां । सचैल सर्वथा स्नान कीजे ॥ ४ ॥

३३७६ गौ आणि कन्या कथेचा विकरा । चांडाळ निर्धारा पापराशी ॥ १ ॥ तयाचें तें मुख न पाहाती जन । अपवित्र दुर्जन पातकी तो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं दोषां न परिहार । भोगिती अघोर कल्पकोटी ॥ ३ ॥

३३७७ शिणल्या भागल्या विठोबाचें नाम। विश्रांतीचें धाम पंढरपूर ॥ १ ॥ म्हणोनियां करा नामाचाचि लाहो। पंढरिचा नाहो पहा डोळां ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पुरवील आशा। पंढरीनिवासा पाहतांची ॥ ३ ॥

३३७८ देहीं धर्म विहित करी। अद्वैत भाव चित्तीं धरी। सर्वभावें नमस्कारी। एक आतमा म्हणोनी ॥ १ ॥ तेणें तुटे रे बंधन। वाचे जपे जनार्दन। आणिक नको रे साधन। रामकृष्ण स्मर सुखें ॥ २ ॥ पवित्र त्याचें हें कुळ। आचार त्याचाची सुशीळ। अखंड जे सर्वकाळ। नाम जपती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाम। परब्रह्म तें निष्काम। हरे भवश्रम। जन्म जरा व्याधी ॥ ४ ॥

३३७९ दुस्तर सायास न करी। वाचे म्हणे हरी हरी। वैकुंठ पायरी। सोपी तेणें ॥ १ ॥ तें नाम विठोबाचें। सुलभ वदे कां रे वाचे। अनंता जन्मांचे। दोष जाती ॥ २ ॥ प्रचीत पाहे अर्धक्षण। नाम उच्चारी रे जाण। तेणें तुटे भवबंधन। यम दूतांचें ॥ ३ ॥ नाम घेतां उठाउठीं। पातकाच्या पळती थाटी। पूर्वज उद्धरती कोटी। बेताळीसासहित ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं प्रेम। गाई तूं विठ्ठलनाम। आणिक सोपें वर्म। नाहीं नाहीं ॥ ५ ॥

३३८० बहु जन्मांचे सायास। विटे उभा हृषीकेश। पाहे पुंडलीकास। समचरणीं ॥ १ ॥ जाई जाई पंढरपुरा। स्नान करी तूं भीवरा। जन्माचा तो फेरा। तेणें चुके ॥ २ ॥ व्रत करीं एकादशी। जागरण अहर्निशीं। संतसभे सरसी। टाळी वाहे ॥ ३ ॥ आळस तूं न करी। वाचे म्हणे विठ्ठल हरी। सांडोनियां थोरी। नाम घे आवडी ॥ ४ ॥ जनीं वसे जनार्दन। एका दृढ धरी चरण। अर्पियेलें तनमन। विठ्ठल वाचे ॥ ५ ॥

३३८१ जया म्हणती नीचवर्ण। स्त्री शूद्रादी हीन जन ॥ १ ॥ सर्वांभूतीं देव वसे। नीचा ठाई काय नसे ॥ २ ॥ नीच कोठोनी

जन्मला । पंचभूतां वेगळा झाला ॥ ३ ॥ तया नाहीं कां जनन । सर्वांचि होत पतन ॥ ४ ॥ नीच म्हणोनि काय भुली । एकाजनार्दनीं देखिली ॥ ५ ॥

३३८२ शास्त्रज्ञ पंडित हो कां वेदवक्ते । परी हरी भजनीं रत वंद्य सदा ॥ १ ॥ भक्तीच कारण तेणें सरतेपण । वाउगाची शीण जाणिवेचा ॥ २ ॥ मी एक जाणता पैल तो नेणता । ऐसा विकल्प भावितां पतन जोडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विकल्प त्यजोनी । विठ्ठलचरणीं मिठी घाली ॥ ४ ॥

३३८३ जरी न वनेची गुरुवचनीं । तरी बैसोनि सहजासनीं । हेंचि एक निर्वाणीं । साधींजे सुख ॥ १ ॥ सकळीं सकळपणें । अखंडरूप पहाणें । साध्य तेंचि साधनें । करूनी घेई ॥ २ ॥ जया संतचरणीं नाहीं भावो । त्यासी लडिवाळ संदेहो । तेथें साधनामाजी देव । दिसे कैसा ॥ ३ ॥ हेतु मातु अनुमाना । आकळी दृढ एकमना । अधिकाचि कल्पना । वाढविली ॥ ४ ॥ जाणीव नेणीव हें वाड । कल्पनेचें समूळ झाड । तुझें तुजचि आड । उभे ठाकती ॥ ५ ॥ नाना हेतु विवंचना । सांडूनियां कल्पना । एकाजनार्दना । शरण रिघे ॥ ६ ॥

## मनास उपदेश.

३३८४ मन एके ठायीं । राहे ऐसें करी कांहीं ॥ १ ॥ सर्व साधनांचें सार । मनीं करावा विचार ॥ २ ॥ एकाग्र तें मन । करूनि करावें भजन ॥ ३ ॥ मन जिंकावें पां आधीं । तेणें तुटेल उपाधी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मन । दृढ ठेवावें बांधून ॥ ५ ॥

३३८५ मनें करूनि विश्वास । संतचरणीं व्हावें दास ॥ १ ॥ आणीक न लगे साधन । मन आवरूनी करी भजन ॥ २ ॥ मन धरी मुष्टीमाजी । वाउगा तं न शिणें सहजीं ॥ ३ ॥ मन दृढ देवा पायीं । एकाजनार्दनीं पाहीं ॥ ४ ॥

३३८६ मनें कल्पोनियां केली विटंबना । हिंडविलें रानां वासनेच्या ॥ १ ॥ तैसें नका करूं वाउगें चिंतन । मन आकळून कार्य करा ॥ २ ॥ मनाचें आकलन करावें पां आधीं । वाउगी उपाधी तुटतसे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आवरूनी मन । मग करीं भजन सुखरूप ॥ ४ ॥

३३८७ नका धावूं तुम्ही सैरा । मना मागें या सत्वरा ॥ १ ॥ मन करा पें आधीन । तेणें जोडे संतचरण ॥ २ ॥ मन आहे महा पापी । लावावें तें हरिरूपीं ॥ ३ ॥ मन स्थिर करूनी निश्चयें । एका जनार्दनी पाहे ॥ ४ ॥

३३८८ करितां अनुष्ठान । मन धावे सहज जाण ॥ १ ॥ मंत्र तंत्र यंत्र भेद । मनें केला वादावाद ॥ २ ॥ आधीं मनातें जिंकावें । सहज रूप मग पहावें ॥ ३ ॥ मन करी आधीन आधीं । एकाजनार्दनीं तुटे व्याधी ॥ ४ ॥

३३८९ मन करूनियां सावध । वाचे स्मरे तूं गोविंद ॥ १ ॥ तेणें साधे सर्व काज । सकळ साधनांचे निज ॥ २ ॥ मन धरी एक मुष्टी । वाचे जपे नाम गोष्टी ॥ ३ ॥ मन धांवे भलतीकडे । साधन वांयां जाय कोडें ॥ ४ ॥ मन आवरूनी साधन । तेणें पावसी निजखूण ॥ ५ ॥ खुण संतावाचूनी । एकाजनार्दनीं ध्यानीं ॥ ६ ॥

३३९० न करी सायास आणिक संकल्प । वांयांचि विकल्प न धरी मनीं ॥ १ ॥ मनाचें जें मन करी तें स्वाधीन । तेणें नारायण कृपा करी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं टाकूनी कल्पना । श्री संतचरणा शरण जाई ॥ ३ ॥

३३९१ मन करूनियां स्थिर । हृदयीं ध्याई तो साचार ॥ १ ॥ मग सुखाची वसती । सदा समाधान चित्तीं ॥ २ ॥ समाधि समाधान । सहज घडे ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ तुटे संसाराचा कंद । वाचा नामस्मरण छंद ॥ ४ ॥ हेंचि साधनांचे सार । सदा चित्तीं परो-

पकार ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ध्यान । ध्यानीं मनीं जनार्दन ॥ ६ ॥

३३९२ अखंड सदा ध्यान । पांडुरंगीं लावा मन ॥ १ ॥ ऐसा उदार हा हिरा । टाकुनी वेचिताती गारा ॥२॥ अमृत सांडोनि । वळें घेती कांजवणी ॥३॥ कामधेनु कल्पतरू । एकाजनार्दनीं आगरू ॥४॥

३३९३ मन मनासी होय प्रसन्न । तेव्हां वृत्ति होय निरभिमान ॥ १ ॥ पावोनि गुरुकृपेची गोडी । मना मन उभवी गुढी ॥ २ ॥ साधकें संपूर्ण । मन आवरावें जाण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । मनें होय समाधान ॥ ४ ॥

३३९४ मनाचा सविस्तर । ऐका तुम्ही वो निर्धार ॥ १ ॥ मनें केलें सगुण निर्गुण । मनें दाखविलें चैतन्य ॥ २ ॥ मनें नागविलें देवां। मनें लोळविलें जीवां ॥ ३ ॥ मन अज्ञानाची राशी । मन धांवें तें सायासी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मन । दृढ ठेवावें बांधोन ॥ ५ ॥

३३९५ मना तूं परम चांडाळ । अधम खळाह्नि खळ । विषयीं तळमळ । बहु करिसी पापिष्ठा ॥१॥ धरी विठ्ठलीं विश्वास । आणिक नको रे सायास । वाउगा तो सोस । सांडी सांडी अधमा ॥ २ ॥ करी संतांचा संगात । पूर्ण होती मनोरथ । न धरी दुजा हेत । विठ्ठलावांचूनी ॥ ३ ॥ बहु सांडीं तूं भाषण । आणिक न करी साधन । एकाजनार्दनीं शरण । विठ्ठलासी निघेपां ॥ ४ ॥

३३९६ मना तूं अधीर अधीर । बहु पातकी पामर । न राहासी स्थिर । क्षणभर निश्चयें ॥ १ ॥ किती शिकवावें तूंतें । नायकसी एक चित्तें । बहु गुणें बोलतां तूंतें । नायकसी पामरा ॥२॥ एकपणें धरी भाव । दृढ चित्तीं विठ्ठलराव । वाउगा तो भेव । नको धरूं आणीक ॥ ३ ॥ हेंचि धरी शिकविलें । कांहीं नको आन दुजें वहिलें । एकाजनार्दनीं बोलें । करुणा भरीत मनासी ॥ ४ ॥

३३९७ बैसतां निश्चळ । मन करी तळमळ ॥ १ ॥ ध्यान धारण ते विधी । मनें न पावेची सिद्धी ॥ २ ॥ जपतप अनुष्ठान । अवघें

मनेंची मळीन ॥ ३ ॥ दया शांती क्षमा । मनें न येती समा ॥ ४ ॥ ऐशा मना काय करावें । कोठें निवांत बैसावें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं शरण । मन धांवें सहजपणें ॥ ६ ॥

३३९८ कौतुक वाटतें मनाचें । नामस्मरण नेणें साचें ॥ १ ॥ कां रे मानिशी कांटाळा । मना खळा अधम तूं ॥ २ ॥ नायकशी शिकाविलें । धांवशी वाहिलें स्वइच्छा ॥ ३ ॥ सांगतों तें । नायकसी । एकाजनार्दनीं म्हणे तुजसी ॥ ४ ॥

३३९९ देहीं शत्रू वसती दूर देशीं । येतां बहु दिवस लागती तयासी ॥ १ ॥ बाह्य शत्रूचें अल्प दुःख । मन शत्रूचें वर्म अशेख ॥ २ ॥ आसनीं शयनीं एकांतीं । जपीं अथवा ध्यान स्थितीं ॥ ३ ॥ ऐशिया मनातें न जिंकितां । देवपण नये हातां ॥ ४ ॥ देवपणाचे भुलले हावे । एकाजनार्दनीं नेणती देवें ॥ ५ ॥

३४०० मना दुजी बुद्धि नको बा हो । संत समागमीं राहीं । या परतें कांहीं । दुजें नको सर्वथा ॥ १ ॥ मीपणाचा ठावो । टाकीं टाकीं हा संदेहो । पडसी प्रवाहो । वाउगाची शिणसी ॥ २ ॥ बहुत मत मतांतरें । कासया शिणसी रे आदरें । संतचरणीं झुरे । रात्रंदिवस मानसीं ॥ ३ ॥ कायीक वाचीक सर्वथा । भजे भजे पंढरिनाथा । एकाजनार्दनी तत्वतां । संतचरणीं लीन होय ॥ ४ ॥

३४०१ दुजियाची निंदा नको रे करूं मना । चिंतीं या चरणा संतांचिया ॥ १ ॥ होउनी उदास गाई सदा नाम । बैसोनि निष्काम एकांतासी ॥ २ ॥ एकांतीची गोडी शंभु जाणे जोडी । आणिका परवडी न कळे कांहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं राम नाम सार । करितां उच्चार आळस नको ॥ ४ ॥

३४०२ मना सांडीं विषय खोडी । लावी विठ्ठलेशीं गोडी ॥ १ ॥ आणीक न लगे साधन । एकलें मन करी उन्मन ॥ २ ॥ विठ्ठल विठ्ठल सांवळा । पाहें पाहें उघडा डोळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । मनाचि होय विठ्ठल पूर्ण ॥ ४ ॥

३४०३ अरे अरे मना । कांहीं करी विचारणा ॥ १ ॥ शरण विठोबासी जाई । मग राही भलते ठायीं ॥ २ ॥ वाउगा तूंचि सोस । मना न करी सायास ॥ ३ ॥ येतां काकुळती । एकाजनार्दनीं प्रीती ॥ ४ ॥

३४०४ आणिकाची आस नको करूं मना । चिंती तूं चरणां विठोबाच्या ॥ १ ॥ वाचे नाम गाये वाचे नाम गाये । वाचे नाम गाये विठोबाचें ॥ २ ॥ कर कटीं उभा चंद्रभागे तटीं । पुंडलिकापाठी धरूनि ध्यान ॥ ३ ॥ ठेविले चरण दोन्ही विटेवरी । वाट पाहे हरी भाविकांची ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं उभारूनी बाह्या । आलिंगीत आहे भाळे भोळे ॥ ५ ॥

३४०५ अंतरीचा भाव दृढ धरी मना । सेवी तूं चरणा विठोबाच्या ॥ १ ॥ साधन आणिक नको कष्ट कांहीं । राममुखीं गायीं सदा नेमें ॥ २ ॥ आकार निराकार सर्वाहि व्यापक । तो उभा सम्यक समपदीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वाहूनीयां आण । विठ्ठलाचे चरण ध्यावे आधीं ॥ ४ ॥

३४०६ मना ऐक हे विनंती । तूं न करी दुजी खंती । विठ्ठलावांचुनी प्रीती । दुजी नको आणिक ॥ १ ॥ वाउगा तूं न करी सोस । दृढ घाली तूं कांस । धरी पां विश्वास । विठ्ठलचरणीं ॥ २ ॥ सांडी माझें आणि तुझें । वाउगें नको वाहूं ओझें । निपजती बीजें । संतचरणीं सकळ ॥ ३ ॥ हेंचि साधनांचें सार । विठ्ठलमंत्र उच्चार । एकाजनार्दनीं येरझार । येणें तुटे समूळ ॥ ४ ॥

३४०७ भक्तकरुणाकर दीनाचा वत्सल । उभा श्रीविठ्ठल विटेवरी ॥ १ ॥ मना जाय तेथें मना जाय तेथें । मना जाय तेथें पंढरीये ॥ २ ॥ पुरतील काम निवारेल गुंती । आहे ती विश्रांति संतसंगें ॥ ३ ॥ आषाढी कार्तिकी सोहळा आनंद । मिळालासे वृंद वैष्णवांचा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं आनंदी आनंद । तेणें परमानंद डुल्लतसे ॥ ५ ॥

३४०८ विठ्ठल पंढरपूर निवासी । विठ्ठल उभा भिवरेसी । विठ्ठल पुंडलिकापाशीं । भक्ति प्रेमेशीं तिष्ठत ॥ १ ॥ जाई जाई मना तेथें । सुखें वैष्णव नाचती जेथें । ब्रह्मानंदपद दरुशनमात्रें । देत आहे भक्तांसी ॥ २ ॥ सुलभ सुलभ मंत्रराज । शंभु जाणे निजबिज । एकाजनार्दनीं गुज । सांगतसे भाविकां ॥ ३ ॥

३४०९ मना ऐक एक मात । धरी हरिनामीं हेत ॥ १ ॥ तेणें चुकती बंधनें । वाचे म्हणे नारायण ॥ २ ॥ नारायण नाम । तेणें सर्व होय काम ॥ ३ ॥ दृढ धरी भाव । न करी आणिक उपाव ॥ ४ ॥ उपाव न करी कांहीं । शरण देवासी तूं जाई ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं मन । करीं देवासी अर्पण ॥ ६ ॥

३४१० अरे अरे मना । सत्य सत्य धरी ध्याना । पंढरीचा राणा । वेध ठेवी तयाचा ॥ १ ॥ तुज नाहीं रे बंधन । सहज आकळे ब्रह्मज्ञान । वाउगें शोधन । नको करूं ग्रंथांचे ॥ २ ॥ मागां तुज शिकविलें । परि तूं रे नायकशी वाहिलें । तुझें हितगुज कथिलें । शुद्धि करीं कांहीं ते ॥ ३ ॥ तूं अनिवार सर्वांसी । म्हणोनी कींव भाकितों तुजसी । शरण गुरु जनार्दनासी । एकाभावें जाई तूं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण । जातां होईल समाधान । वाउगें नको भ्रमण । चरणीं राहें निवांत ॥ ५ ॥

३४११ मनें नागविलें बहुतापरी । धांव धांव तूं श्रीहरी ॥ १ ॥ आतां माझें मन । दृढ ठेवावें आकळून ॥ २ ॥ वाहात चालिलों मनामागें । बुडतसे प्रपंच गंगे ॥ ३ ॥ धांवे धांवे विठाबाई । एकाजनार्दनी लागे पायीं ॥ ४ ॥

३४१२ माझ्या मनाचें तें मन । चरणीं ठेवावें बांधून ॥ १ ॥ मग तें जाऊं न शके कोठें । राहे तुमच्या नेहटें ॥ २ ॥ मनासी तें बळ । देवा तुमचें सकळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनी देवा । मन दृढ पायीं ठेवा ॥ ४ ॥

३४१३ तापलीया तापें शिणलीया मार्गीं। पोहे ठाकी वेगीं कृष्ण-कथा ॥ १ ॥ कृष्णकथा गंगा सांवळें उदक। मना बुडी दे कां वोल्हा-वसी ॥ २ ॥ वोल्हावलें मन इंद्रियां टवटवी। गोपिराज जीवीं साठावेलें ॥ ३ ॥ साठविलें जीवीं जाणा याची खूणा। जरी होय करुणा सर्वांभूतीं ॥ ४ ॥ सर्वांभूतीं राम दृष्टीचें देखणें। नाहीं दुजें पणें आडवस्ती ॥ ५ ॥ आडवस्ती नाहीं एकाजनार्दनीं। श्रीरामावां-चुनी आन नेणें ॥ ६ ॥

३४१४ तुज सांगतसे मना। पाहें पंढरीचा राणा ॥ १ ॥ नको दुजा छंद कांहीं। राहें विठ्ठलाचे पायीं ॥ २ ॥ विषयीक वासना। सोडी सोडी सत्य जाणा ॥ ३ ॥ जेणें घडे सर्व सांग। फिटे संसा-राचा पांग ॥ ४ ॥ म्हणे जनार्दनाचा एका। सुलभ उपाव नेटका ॥ ५ ॥

३४१५ जन्म मरण सांकडें निवारावया कोडें। विठ्ठल उघडें पंढरीये ॥ १ ॥ तयाचे चरणां मिठी घाली मना। नाहीं तुज यातना जन्म कोटी ॥ २ ॥ चंद्रभागे स्नान पुंडलीक भेटी। पूर्वजां वैकुंठीं मार्ग सोपा ॥ ३ ॥ महाद्वारीं नाचा जोडोनियां पाणी। पुढें चक्रपाणी उभा विटे ॥ ४॥ एकाजनार्दनीं तयांसी भेटतां। मोक्ष सायुज्यता पायीं लागे ॥ ५ ॥

३४१६ मन रामीं रंगलें अवघें मनाचि राम जालें। सबाह्य अभ्यं-तरीं अवघें रामरूप कोंदलें ॥ ध्रु० ॥ चित्ताचें हारपलें अवघें चैत-न्याचि जालें। देखतां देखतां अवघें विश्व मावळलें। पहातां पहातां अवघें सर्वस्व ठकलें ॥ १ ॥ आत्मयारामाचें ध्यान लागलें मज कैसें। क्रिया कर्म धर्म अवघें येणेंचि प्रकाशे। सत्य मिथ्या प्रकृति पर रामचि अवघा भासे ॥ २ ॥ भक्ति अथवा ज्ञान शांति आणिक योग-स्थिती। निर्धारितां न कळे रामस्वरूपीं जडली प्रीती। एकाजना-र्दनीं अवघा रामची आदि अंतीं ॥ ३ ॥

## मुमुक्षूस उपदेश.

३४१७ देह सांडावा ना मांडावा। येणें परमार्थुची साधावा ॥ १ ॥ जेणें देहीं वाढे भावो। देहीं दिसतसे देवो ॥ २ ॥ ऐसें देहीं भजन घडे। त्रिगुणात्मक स्वयें उडे ॥ ३ ॥ त्रिगुणात्मक देहो वावो। एकाजनार्दनीं धरा भावो ॥ ४ ॥

३४१८ देहा ऐसें वोखटें। पृथ्वीमाजी नाहीं कोठें ॥ १ ॥ वोखटें म्हणोनि त्यागावें। मोक्ष सुखार्थ नागवावें ॥ २ ॥ जैसें भाडियाचें घोडें। दिनु सरल्या पंथ मोडे ॥ ३ ॥ हेतु ठेवूनि परमार्थी। एकाजनार्दनीं ठेवीं माथा ॥ ४ ॥

३४१९ काय मनुष्यदेहाचें होय। नाशिवंत जाय शेवटीं ॥ १ ॥ हें तों काळाचें खाजें सहजीं। कांहीं तरी राजी हरि करा ॥ २ ॥ जातो आयुष्य न लगे वेळ। स्मरे घननीळ रामराणा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाकी कींव। वांयां हांव धरूं नका ॥ ४ ॥

३४२० अदृष्टीं असेल जे जे वेळे। तें तें मिळेल ते ते काळें ॥ १ ॥ ऐशी प्रारब्धाची गती। ब्रह्मादिकां न चुकती ॥ २ ॥ जें जें होतें ज्या संचितीं। तें तयासवें चालती ॥ ३ ॥ जैशी जैशी कर्म रेषा। तैसें भोगणें सहसा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भोग। भोगविल्याविण न चुके सांग ॥ ५ ॥

३४२१ चित्त समाधानें। सुख दुःख सम जाणें ॥ १ ॥ ॥ न करी आणीक उपाधी। निवारली आधिव्याधी ॥ २ ॥ वृत्ति झाली समरस। सेवीं नित्य ब्रह्मरस ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चित्त। ब्रह्मरसें झालें शांत ॥ ४ ॥

३४२२ होणार जाणार न चुके कल्पांतीं। वाउगी कुंथाकुंथी करूनी काय ॥ १ ॥ लिहिलें संचित न चुके कल्पांतीं। वाउगाची भ्रांती फळ काय ॥ २ ॥ एकाजनार्दनीं प्रारब्धाचा भोग। करितां उद्वेग न टळेची ॥ ३ ॥

३४२३ स्वप्नीं चालतां लवलाही । आडामध्यें पडिला पाही ॥ १ ॥ घाबरूनी म्हणे धांवा । तैसे भुलले जीवजीवा ॥ २ ॥ मृगजळ भासे निर । वांयां मायेचा पसर ॥ ३ ॥ सावध होऊनि जंव पाहे । वायां स्वप्न मिथ्या आहे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भुलले । वाया गेले अधोगती ॥ ५ ॥

३४२४ जेथें पापपुण्यकर्माचरण । वाढविताहे जन्ममरण ॥ १ ॥ जया पुण्याचीया गोडी । स्वधर्म जोडिताती जोडी ॥ २ ॥ जया नाहीं हा विश्वास । असोनी न दिसे जगीं भाष ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं डोळा । असोनी देहीं तो अंधळा ॥ ४ ॥

३४२५ देहबुद्धि खुंटली तेथें माया तुटली । देहाची स्थिती दैवाधीन ठेली ॥ १ ॥ दैवाचेनी बळें देहीचें कर्म चळे । स्वसुखाचे सोहळे विदेह भावें ॥ २ ॥ भोगी कां त्यागी अथवा हो योगी । देहीं देहपण न लगे त्याच्या अंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं एकपणाच्या तुटी । सहज चैतन्यासी मिनला उठाउठी ॥ ४ ॥

३४२६ नरदेह परम पावन । तरी साधी ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ ब्रह्मज्ञानाविण । वांयां होत असे शीण ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान प्राप्ति नाहीं । वायां देहत्व असोनी देहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ज्ञान । तेणें होय समाधान ॥ ४ ॥

३४२७ नरदेहीं येउनी करी स्वार्थ । मुख्य साधी परमार्थ ॥ १ ॥ न होतां ब्रह्मज्ञान । श्वान सूकरां समान ॥ २ ॥ पशूवत जिणें । वांयां जेवीं लाजिरवाणें ॥ ३ ॥ सायंप्रातर्चिंता । नाहीं पशूंसी सर्वथा ॥ ४ ॥ मरणा टेकलें कलीवर । परी न सांडी व्यापार ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं पामर । भोगिती अघोर यातना ॥ ६ ॥

३४२८ ब्रम्हास्थितीचें हें वर्म । तुज दावितों सुगम ॥ १ ॥ सर्वांभूतीं भगवद्भाव । अभेदत्वें आपणचि देव ॥ २ ॥ संसार ब्रम्हस्फूर्ति । सांडोनियां अहंकृति ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दन । कृपें पावला परिपूर्ण ॥ ४ ॥

३४२९ लहानाहूनि लहान न धरी अभिमान । तेणें हो कारण सर्व बापा ॥ १ ॥ उंचपणें पहातां वेळूचीये परी । लोहळा अंतरीं नम्र होय ॥ २ ॥ भक्ति करतां मुक्ति संतांचे संगतीं । मग मनीं विश्रांति हरी जोडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतासी शरण । धरूनियां कान नाचूं द्वारीं ॥ ४ ॥

३४३० सानपणें धुरु अढळीं बैसला । सानपणें केला कृतकृत्य ॥ १ ॥ सानपणें प्रल्हादें साधियेलें काज । सानपणें सहज बळी पूजी ॥ २ ॥ सानपणें बिभीषण शरण आला । राज्यधर केला श्रीरामें त्यासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सानपणावांचुनी । ब्रह्मज्ञान जनीं नातुडेची ॥ ४ ॥

३४३१ उपमन्यु सान देवासी कळवळ । क्षीरसिंधु तात्काळ दिला त्यासी ॥ १ ॥ सानपणें अर्जुनें साधियेलें काज । श्रीकृष्ण निजगुज सांगतसे ॥ २ ॥ सानपणें उद्धव झालासे विमुक्त । सानपणें तो निश्चित तारियेला ॥ ३ ॥ सानपणें सुख गोपाळ गौळणी । एका जनार्दनीं सदोदित ॥ ४ ॥

३४३२ सानपणें तरले अनंत भक्त अपार । जाणिवेचा भार टाकूनियां ॥ १ ॥ सानपणें शुक व्यास नारदमुनी । जाहले मुगुट-मणी सानपणें ॥ २ ॥ सानपणें गज तारिली गणिका । उद्धारिला देखा अजामिळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सानपणावांचूनी । न चुके आयणी प्रपंचाची ॥ ४ ॥

३४३३ सानपणें साधे सर्व येत हातां । जाणिवेनें तत्वतां नाग-वशी ॥ १ ॥ महापूर येतां वृक्ष तेथें जाती । लव्हाळें राहती नव्हल कैंचें ॥ २ ॥ चंदनाचे संगें तरुवर चंदन । सानपणा कारण संग-तीचें ॥ ३ ॥ संतांचे संगती अभाविक तरती । एकाजनार्दनीं निश्चितीं सानपणें ॥ ४ ॥

३४३४ आशेपाशीं नाहीं सुख । आशेपाशीं परम दुःख ॥ १ ॥

आशा उपजली देवासी । तेणें नीचत्व आलें त्यासी ॥ २ ॥ आशे-साठीं जगदानी । मागे बळीसी स्वयें पाणी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आशा । तिनें गुंतविलें महेशा ॥ ४ ॥

३४३५ निराशीयाचे भेटी पाहे । वैकुंठीचा राव धांवे ॥ १ ॥ निराशेपाशीं नये व्याधी । निराशेपाशीं सकळ सिद्धी ॥ २ ॥ निराशेचें जेथें नांव । तेथें देव घेतसे धांव ॥ ३ ॥ निराशेचा जिव्हाळा । एकाजनार्दनीं पाहे डोळा ॥ ४ ॥

३४३६ निःशेष कांहीं नेणिजे । तें शुद्ध ज्ञान म्हणिजे । मा सर्व जेणें जाणिजे । तें अज्ञान कैसें वा ॥ १ ॥ ज्ञान तें कवण । अज्ञान तें कवण । दोहींचें लक्षण । पाहाते पहा ॥ २ ॥ ज्ञानाचें जें ज्ञातेपण । तया नांवचि अज्ञान । अज्ञानाचें जें ज्ञान । तया नांव शुद्ध ज्ञान ॥ ३ ॥ ज्ञान तें अज्ञाना आलें । अज्ञान तें ज्ञाना गेलें । एकाजनार्दनीं मुलें । बागुलाचीं दोनीं ॥ ४ ॥

३४३७ मूळ नाशासी कारण । कनक आणि स्त्री जाण ॥ १ ॥ जो न गुंते येथें सर्वथा । त्याचा परमार्थ पुरता ॥ २ ॥ जया सुख इच्छा आहे । तेणें एकांतासी रहावें ॥ ३ ॥ दृष्टी नाणी मनुष्यासी । तोचि परमार्थाची राशी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं धन्य । त्याचा परमार्थ पावन ॥ ५ ॥

३४३८ शुद्ध भावें गावें नाम श्रीहरीचें । भेदभाव साचें टाकूनिया ॥ १ ॥ भोळे भाविक ज्याचा आहे देव जवळा । टवाळास निराळा भास दिसे ॥ २ ॥ अविश्वासियासी होय बोध वांयां । ब्रह्मज्ञान तया सांगून काय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अभाविक खळ । बोध तो सकळ जाय वांयां ॥ ४ ॥

३४३९ पक्षी आंगणीं उतरती । ते कां गुंतोनिया राहती ॥ १ ॥ तैसें असावें संसारीं । जोंवरी प्राचीनाची दोरी ॥ २ ॥ वस्तीकर वस्ती आला । प्रातःकाळीं उठोनि गेला ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दन । ऐसें असतां भय कवण ॥ ४ ॥

३४४० विषयवासना भाजी त्याचें मूळ । मग सुखकल्लोळ प्राप्ति तुज ॥ १ ॥ आशेचें काबाड कल्पना सगळी । उपटोनि मुळीं टाकी परती ॥ २ ॥ भेदाचें भांडें वैराग्याचे हातें । धुवोनि सरतें करीं बापा ॥ ३ ॥ शांतीचेनि सवें धरी वेगें सोय । एकाजनार्दनीं पाय पावशील ॥ ४ ॥

३४४१ वैराग्य अनुताप जाहलियावांचून । रामनाम वदनीं नये बापा ॥ १ ॥ मुख्यत्वें कारण साधी हें भजन । येणें समाधान होय बापा ॥ २ ॥ विरक्ती हेही जाहलियावांचुनी । शांति समाधानी नये बापा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सत्संगावांचुनी । जन्माची आयणी न चुके बापा ॥ ४ ॥

३४४२ मुख्य पाहिजे अनुताप । हेंचि वैराग्याचें रूप ॥ १ ॥ कोरड्या त्या ज्ञानगोष्टी । अनुताप नाहीं पोटीं ॥ २ ॥ अनुतापाविण ज्ञान । कदा नोहे समाधान ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तप । अनुताप हेंचि देख ॥ ४ ॥

३४४३ सावध पहातां तुम्ही ज्ञानाचें अज्ञान । मानूं तोचि म्हणे महंता महाघन ॥ १ ॥ ज्ञानाचें अज्ञान कवण ज्ञाता फेडी । अनुतापाची जंव जीवीं नाहीं आवडी ॥ २ ॥ नश्वर देह म्हणोनी ज्ञानेंच निंदिजे । तोचि देह घेउनी ज्ञातेपणें फुंजे ॥ ३ ॥ सच्चिदानंद माया या नांवें । याहुनी परती स्थिति तें तें ज्ञान जाणावें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं अनुतापाची गोडी । ज्ञानाज्ञानाची तोडोनी सांडिली बेडी ॥ ५ ॥

३४४४ तेजाचें जें तेज तेंचि परब्रह्म । परम मंगलधाम त्यासी म्हणती ॥ १ ॥ तेंचि नमियेलें जोडोनियां कर । व्यापूनी चराचर भरलेसें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तोचि पुरुषोत्तम । मनासी आराम त्या ठायीं ॥ ३ ॥

३४४५ ब्रह्मादिक देव त्यांचे रंगीं नाचती । सनकादिक त्याचें

ध्रुपद धारिती ॥ १ ॥ त्यापुढें गीत नृत्य कारिती । त्यापुढें मानव केवीं ताल धारिती ॥ २ ॥ हरि हरि हरि म्हणतां वाचे । हरिरंगीं नाचे तोचि धन्य ॥ ३ ॥ शास्त्राची व्युत्पत्ती प्रसन्न वागेश्वरी । ती सारजा मुख्य करी नृत्य तेथें ॥ ४ ॥ शास्त्र अभिमानें चढला ताठा । मुक्ती ते फुकटा अंतरले ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं स्वहितीं तूं नाचे । बोलणें अभावाचें बोलूं नको ॥ ६ ॥

३४४६ देवासी तो भाव पुरे । तेणें देव सदा झुरे । भक्तालागीं सरे । वैकुंठासी ॥ १ ॥ भाव धरावा बळकट । आणीक नको कांहीं कष्ट । साधन हें श्रेष्ठ । कलीमाजीं ॥ २ ॥ भावें प्राप्ति होय देव । अभक्तासी संदेह । जवळी असोनी देव । नाहीं म्हणती ॥ ३ ॥ भावें देव घरीं नांदे । एकाजनार्दनीं आनंदें । म्हणोनी संतवृंदें । तया न विसरती ॥ ४ ॥

३४४७ मेघ वर्षे निर्मळ जळ । जैसें बीज तैसें फळ ॥ १ ॥ तया-परी भक्ति कीजे । बीजासारिखें फळ घेईजे ॥ २ ॥ उत्तम अलंकार गोमटे । तेथें नाक असे नकटें ॥ ३ ॥ भजना जातां लाज वाटे । वेश्याघरीं भांग घोटे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नर । प्रत्यक्ष जाणावा तो खर ॥ ५ ॥

३४४८ एक धरलिया भाव । आपणचि होय देव ॥ १ ॥ नको आणीक सायास । जाय जिकडे देव भास ॥ २ ॥ ध्य.नीं मनीं शयनीं । देव पाहे जनीं वनीं ॥ ३ ॥ अवलोकी जिकडे । एकाजनार्दनीं देव तिकडे ॥ ४ ॥

३४४९ मातेचा आठव बाळावरी स्नेहो । तैसा धरा देवो मनीं सदा ॥ १ ॥ बाळा पाहूनियां माता संतोषत । तैसा धरा हेत देवा-वरी ॥ २ ॥ बोबडें सावडें असोच तें बाळ । तैसी धरा कळवळ देवावरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं देव धरा मनीं । आसनीं शयनीं विसरूं नका ॥ ४ ॥

३४५० वत्सालागीं गोप धाउनी वोरसे। तैसें असो पिसें देवाठायीं ॥ १ ॥ पाडसा चुकली हरिण पाहे वास। तैसी धरा आस देवाठायीं ॥ २ ॥ मातेलागीं चुके बाळ एकुलतें। तैसें देवापरतें न धरा मनीं ॥ ३ ॥ एका जनार्दनीं देव करा सखा। प्रपंच पारिखा सहज तेणें ॥ ४ ॥

३४५१ सुखें संसार हा करीं। वाचे उच्चारावा हरी ॥ १ ॥ दुःखरूप हा संसार। रामनामें सुख साचार ॥ २ ॥ रामनामाचें स्मरण। नाश पावे जन्ममरण ॥ ३ ॥ जयापाशीं नाम असे। नारायण तेथें वसे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नामें। संसार हा परब्रम्ह ॥ ५ ॥

३४५२ स्वगोत्र परगोत्र यांचा भरंवसा। मानूं नये सहसा अरे मूढा ॥ १ ॥ वेदींचें वचन वेदीं तें प्रमाण। एक नारायण सार जप ॥ २ ॥ शास्त्रांचा प्रभाव शास्त्रिकांसी ठावा। उघड जपावा राममंत्र ॥ ३ ॥ न करीं आळस नको पडों भरी। एकाजनार्दनीं हरी स्मरे देहीं ॥ ४ ॥

३४५३ दाता तोचि म्हणावा। नामावांचोनि नेणें जीवा ॥ १ ॥ थोर तोचि म्हणावा। नेणें भूताचा तो हेवा ॥ २ ॥ लहान तोचि म्हणावा। काया वाचा भजे देवा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं म्हणे। देवावाचूनी कांहीं नेणें ॥ ४ ॥

३४५४ उत्तम पुरुषाचें उत्तम लक्षण। जेथें भेद शून्य मावळला ॥ १ ॥ भेदशून्य जाला बोध स्थिरावला। विवेक प्रगटला ज्ञानोदय ॥ २ ॥ जिकडे पाहे तिकडे उत्तम दरुशन। दया शांति पूर्ण क्षमा अंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उत्तम हे प्राप्ती। जेथें मावळती द्वैताद्वैत ॥ ४ ॥

३४५५ कनक कांता नये चित्ता। तोची परमार्थी पुरता ॥ १ ॥ हेंचि एक सत्य सार। वांयां व्युत्पत्तीचा भार ॥ २ ॥ वाचा सत्यत्वें सोंवळी। येर कविता वोवळी ॥ ३ ॥ जन तेचि जनार्दन। एकाजनार्दनीं भजन ॥ ४ ॥

३४७६ न कळे जयाचें विंदान । हरिहर नेणती महिमान । शिणलें शेषाचें वदन । तो तटस्थ राहिला ॥ १ ॥ ऐसा आकळ त्रिभुवनीं । न कळे वेदशास्त्रां मनीं । पुराणांचीं आयणी । कुंठित जाहली ॥ २ ॥ तो सोपा नाममंत्रें । वाचे वर्णितां पवित्रें । एकाजनार्दनीं वक्त्रें । म्हणा रामकृष्ण हरी ॥ ३ ॥

३४७७ निवांत श्रीमुख पहावें डोळेभरी । तेणें पुरे अंतरीं इच्छा कांहीं ॥ १ ॥ चरणीं ते मिठी घालावें दंडवत । तेणें पुरे आर्त सर्व मनींचें ॥ २ ॥ ध्यान तें दृष्टीं भरूनि पहावें । आलिंगन द्यावें वेळोवेळां ॥ ३ ॥ हृदयकमळीं पहावा तैसा ध्यावा । एकाजनार्दनीं विसांवा सहजाचि ॥ ४ ॥

३४७८ विश्व पाळिताहे हरी । दासा केवीं तो अव्हेरी ॥ १ ॥ नवमास गर्भवास । नाहीं भागला आम्हास ॥ २ ॥ बाळपणीं वांचविलें । स्तनीं दुग्ध तें निर्मिलें ॥ ३ ॥ कीटक पाषाणांत वसे । त्याचे मुखीं चारा असे ॥ ४ ॥ धरा धरा हा विश्वास । एकाजनार्दनीं त्याचा दास ॥ ५ ॥

३४७९ मेघदर्शनें मयूर नाचती । चंद्रदरुशनें चकोर सुखावती ॥ १ ॥ धेनुदर्शनें वत्सें सुखावती । साधुदर्शनें जीवां आनंदवृत्ती ॥ २ ॥ सूर्यदर्शनें जीवातें सुख होय । पितृदर्शनें सुपुत्रा आनंद होय ॥ ३ ॥ मातृदर्शनें कन्या सुख मानें । मित्रदर्शनें सुमित्रा आनंदीं ठाणें ॥ ४ ॥ या रीती सतत चिंतितां हरी । एकाजनार्दनीं धन्य संसारीं ॥ ५ ॥

३४८० होउनी उदास । मागा प्रेम सावकाश ॥ १ ॥ उभा विटेवरी उदित । देतां न पाहे चित्त वित्त ॥ २ ॥ जें जें पाहिजे जयालागीं । तें तें देतो त्या प्रसंगीं ॥ ३ ॥ न म्हणे उत्तम चांडाळ । ऐसा भक्तिचा भुकाळ ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं म्हणा दास । करा आस निर्भय ॥ ५ ॥

३४६१ गोडी वेगळा ऊंस वाढे । हें तों न जोडे कल्पांतीं ॥ १ ॥ जों जों वाढे तों तों गोड । ऐशी चाड भावाची ॥ २ ॥ जों जों धरशील भाव । तो तों देव दिसे पुढें ॥ ३ ॥ ही तों प्रचीति घ्या अंगीं । नाचा रंगीं संतांच्या ॥ ४ ॥ रूपा वेगळी ती छाया । एकाजनार्दनीं लागे पायां ॥ ५ ॥

## वेषधाऱ्यांस उपदेश.

३४६२ भजन चालिलें उफराटें । कोण जाणे खरें खोटें ॥ १ ॥ अग्निहोत्राचा सुकाळ । वडापिंपळासी काळ ॥ २ ॥ तिन्ही देव पिंपळांत । अग्निहोत्रीं केला घात ॥ ३ ॥ म्हणती सोमयाग करा । मुख धरूनि मेंढा मारा ॥ ४ ॥ शेंदुर माखूनियां धोंडा । चाळविती पोरें रांडा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं नेम । सर्वांठायीं पुरुषोत्तम ॥ ६ ॥

३४६३ भक्त रागेला तवकें । देव फोडोनि केले कुटके ॥ १ ॥ कटकट मूर्ति मागुती करा । मेण लावुनि मूर्ति जडा ॥ २ ॥ न तुटे न जळे कांहीं न मोडे । त्या देवाचे केले तुकडे ॥ ३ ॥ रांडवा म्हणती आगे आई । कैसा देव फोडिला बाई ॥ ४ ॥ जवळीच शुद्ध असतां देवो । भक्तांसी पडिला संदेहो ॥ ५ ॥ शाळिग्राम शुद्ध शिळा । हारपलीया उपवास सोळा ॥ ६ ॥ चवदा गांठींचा बांधिला दोरा । तोही अनंत नेला चोरा ॥ ७ ॥ अनंतासी अंतु आला । भक्तां तेथें खेदु जाहला ॥ ८ ॥ एकाजनार्दनीं भावो । नाहीं तंव कैंचा देवो ॥ ८ ॥

३४६४ देव म्हणती मेसावाई । पूजा अर्चा करिती पाही ॥ १ ॥ नैवेद्य वहाती नारळ । अवघा करिती गोंधळ ॥ २ ॥ मेंढरें बोकड मारिती । सुटी रोटी तया म्हणती ॥ ३ ॥ वळींचे आणिताती अंगा । नाचताती शिमगीं सोंगा ॥ ४ ॥ सकळ देवांचा हा देव । विसरती तया अहंभाव ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ऐसा देव । येथें कैंचा आमुचा भाव ॥ ६ ॥

३४६५ आलों ऐकोनि खंडोबाची थोरी । वाघा होउनी मज मागा ह्मणती वारी ॥ १ ॥ ठकलों ठकलों वाउगा सीण । वारी मागतां पोट न भरे जाण ॥ २ ॥ सदा वागवी कोटंबा आणि झेंडा । रांडा पोरें त्यजिलीं झालों काळतोंडा ॥ ३ ॥ गेले दोनी ठाव आतां कोठें उरला वाव । एकाजनार्दनी भेटवा मज पंढरीरावो ॥ ४ ॥

३४६६ पूजिती खंडेराव पतर भरिती । विठ्ठल विठ्ठल न म्हणती अभागी ते ॥ १ ॥ लाउनी भंडार दिवटी घेती हातीं । विठ्ठल म्हणतां लाजती पापमती ॥ २ ॥ ऐसियासी भाव सांगावा तो कवण । एकाजनार्दनीं काया वाचा शरण ॥ ३ ॥

३४६७ सांडोनियां विठाबाई । कां रे पूजितां मेसाई ॥ १ ॥ विठाबाई माझी माता । चरणीं लागों इचे आतां ॥ २ ॥ अरे जोगाई तुकाई । इजपुढें बापुड्या काई ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं माझी आई । तिही लोकीं तिची साई ॥ ४ ॥

३४६८ प्रेमें पूजी मेसाबाई । सांडोनियां विठाबाई ॥ १ ॥ काय देईल ती वोंगळ । सदा खाय अमंगळ ॥ २ ॥ आपुलीये इच्छेसाठीं । मारी जीव लक्ष कोटी ॥ ३ ॥ तैसी नोहे विठाबाई । सर्व दीनांची ती आई ॥ ४ ॥ न सांडीचि विठाबाई । एकाजनार्दन पायीं ॥ ५ ॥

३४६९ प्रतिमेचा देव केला । काय जाणें ती अबला ॥ १ ॥ नवस करिती देवासी । म्हणती पुत्र देई वो मजसी ॥ २ ॥ न कळेचि मूढा वर्म । कैसें जाहलेंसे कर्म ॥ ३ ॥ प्रतिमा केलीसे आपण । तेथें कैंचें देवपण ॥ ४ ॥ देव खोटा नवस खोटा । एकाजनार्दनीं रडती पोटा ॥ ५ ॥

३४७० जयाचेनी तुटे भवबंधन । तयासी जाण विसरती ॥ १ ॥ करती आणिकाची सेवा । ऐसे ते अभागी निर्दैव ॥ २ ॥ मुळींच नाहीं देवपण । तेथें करती जप ध्यान ॥ ३ ॥ विसरूनि खऱ्या देवासी । भुलले आपुल्या मानसीं ॥ ४ ॥ सत्य सत्य बुडती जनीं । एका शरण जनार्दनीं ॥ ५ ॥

३४७१ येउनी नरदेहा भूतातें पूजिती। परमात्मा नेणती महामूर्ख ॥ १ ॥ दगडाच्या देवा सेंदुराचा भार। दाविती वडिवार पूजनाचा ॥ २ ॥ रांडा पोरें घेती नवसाचे वगाड। नुगवे लिगाड तयाचेनी ॥ ३ ॥ आपण बुडती देवा बुडविती। अंतकाळीं होती दैन्यवाणे ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ऐसिया देवा। जो पूजी गाढवासम होय ॥ ५ ॥

३४७२ लावूनियां अंगा राख। म्हणती सुख आम्हापाशीं ॥ १ ॥ भोळे भाविका भोंदिती। भलते मंत्र तया देती ॥ २ ॥ म्हणती आम्हां करा गुरु। उपचारु पूजेचा ॥३॥ एकाजनार्दनीं तें मंद। नाहीं गोविंद तयांपाशीं ॥ ४ ॥

३४७३ अंगा लाऊनियां राख। करी भलतेंचि पाप ॥ १ ॥ मेळवी शिष्यांचा मेळा। अवघा भांगेचा घोटाळा ॥ २ ॥ नानापरी सांगे मंत्र। नेणे विधि अपवित्र ॥ ३ ॥ न कळे ज्ञानाची हातवटी। सदा परदार राहाटी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं सोंग। तेथें नाहीं पांडुरंग ॥ ५ ॥

३४७४ वेदाचिया बोला कर्मातें गोंविला। परी नाहीं भजला संतांलागीं ॥ १ ॥ घोकूनियां वेद द्वैत नवजाय। वाउगाचि होय श्रम तया ॥ २ ॥ तया अद्वैताच्या वाटा जाय तो करंटा। शीण तो अव्हाटा आदि अंत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतांसी शरण। गेलिया पठन सर्व जोडे ॥ ४ ॥

३४७५ आशा टाकुनी फकीर जाला। परी भिक्षा मागणें जन्म गेला ॥ १ ॥ तैशी नोहे परमार्थ रहाटी। शुद्ध मन करीजे पोटीं ॥२॥ सर्वांभूतीं नांदे एक देव। वाउगा कां वाढावा अहंभाव ॥ ३ ॥ जे जे वाणी स्तुति केली। ती ती देवासी पावली ॥ ४ ॥ ऐसा धरी दृढ भाव। एकाजनार्दनीं मागे ठाव ॥ ५ ॥

३४७६ वेद विधि कांहीं न कळे पाठका। गुण दोष देखा मळीन

सदा ॥ १ ॥ दशग्रंथी ज्ञान होतांचि जाण । निंदितो देखोन भलत्यासी ॥ २ ॥ सर्व ब्रह्मरूप ऐसें बोले वेद । तेथें वादावाद उरला नाहीं ॥ ३ ॥ ओहं सोहं कोहं नाहीं ठाव । उगेचि गौरव मिरवी ज्ञान ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्मज्ञानासाठीं । हिंडताती कोटी जन्म घेत ॥ ५ ॥

३४७७ वेद बोलिला जो जो गुण । तो तो नव्हेचि पठण ॥ १ ॥ वेदें सांगितलें न करी । ब्रह्मद्वेषी दुराचारी ॥ २ ॥ न करा सुरापान । कन्या गो विक्रय जाण ॥ ३ ॥ ऐसी वेदाची मर्यादा । न कळेचि मतीमंदा ॥ ४ ॥ निजमुखें स्वयें बोले वेदु । न करावा परापवादु ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं शरण । वेदाचें नोहे आचरण ॥ ६ ॥

३४७८ कलीमाजी संत जाले । टिळा टोपी लाविती भले ॥ १ ॥ नाहीं वर्माचें साधन । न कळे हृदयीं आत्मज्ञान ॥ २ ॥ सदा सर्वदा गुरगुरी । द्वेष सर्वदा ते करी ॥ ३ ॥ भजनीं नाहीं चाड । सदा विषयीं कबाड ॥ ४ ॥ ऐसिया संतांचा सांगात । नको मजसी आदि अंत ॥ ५ ॥ भोळियाच्या पायीं । एकाजनार्दनीं ठाव देई ॥ ६ ॥

३४७९ कामक्रोध लागले मागें । तप करूनी काय सांगें ॥ १ ॥ कासया जाशी वनांतरीं । कामक्रोध भरले अंतरीं ॥ २ ॥ वनीं जाऊनियां चिंता । रात्रंदिवस घोकिशी कांता ॥ ३ ॥ योग अभ्यास न कळे वर्म । शिणतो मूढ धांवतें कर्म ॥ ४ ॥ कर्मी लिहिली न चुके रेखा । म्हणे जनार्दनीं एका ॥ ५ ॥

३४८० होउनी मानभाव । अवघा बुडविला ठाव ॥ १ ॥ नाहीं चित्त शुद्ध गती । द्वेष देवाचा करती ॥ २ ॥ धरती उफराटी काटी । रांडापोरें भोंदी वाटीं ॥ ३ ॥ नसोनियां काळेपण । अंगा लाविती दूषण ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं देवा । जळो जळो त्यांची सेवा ॥ ५ ॥

३४८१ करूनी वेदशास्त्र पठण । निर्धारितां निज ज्ञान ॥ १ ॥ करूनी वेदशास्त्र श्रवण । होय शिश्नोदर परायण ॥ २ ॥ महा मोहो गिळिला ज्ञाना । शरण एकाजनार्दना ॥ ३ ॥

३४८२ सांगे ब्रह्मज्ञान गोष्टी । माते पाहतां होतो कष्टी ॥ १ ॥ काय ज्ञान तें जाळावें । वदन तयाचें तें न पहावें ॥ २ ॥ करी कथा सांगे पुराण । वांयां मिरवी थोरपण ॥ ३ ॥ जन्मला जिचे कुशीं । तिसी म्हणे अवदसा ऐसी ॥ ४ ॥ ऐसें नसो तें संतान । एका विनवी जनार्दन ॥ ५ ॥

३४८३ त्यागूनियां स्त्री संन्यासी जे होती । पतना ते जाती अंतकाळीं ॥ १ ॥ घेउनी संन्यास ध्यान पैं स्त्रियांचें । गुंतलासे आशे वांयां जाये ॥ २ ॥ नारायण नामीं नाहीं पैं आचार । सर्व अनाचार स्त्रीतें लक्षी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संन्यास लक्षण । गीतेमाजीं कृष्ण बोलियेला ॥ ४ ॥

३४८४ नुपजे अनुताप ज्ञान । काय घेउनी विज्ञान ॥ १ ॥ अनुतापाविण । व्यर्थ संन्यास ग्रहण ॥ २ ॥ संन्यास घेतलियापाठीं । काम नुपजावा पोटीं ॥ ३ ॥ ऐसें संन्यास लक्षण । एकाजनार्दनीं खूण ॥ ४ ॥

३४८५ द्रव्याचिया आशे । कथा करणें सायासें ॥ १ ॥ उभयतां नरका जोडी । मेळविलीं तीं बापुडीं ॥ २ ॥ निरास करूनि मन । करा कथा तें कीर्तन ॥ ३ ॥ देवा आवड भक्तीची । एकाजनार्दनीं साची ॥ ४ ॥

३४८६ द्रव्य घेऊनियां कथा जे करिती । उभयतां जाती नरकामध्यें ॥ १ ॥ तयांचिया दोषा नाहीं परिहार । वेदाचा विचार कुंठितची ॥ २ ॥ शास्त्रांची तों मती न चाले सर्वथा । पुराणें हीं तत्वतां मौनावलीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं दोषां नाहीं पार । रवरव निर्धारें भोगिताती ॥ ४ ॥

३४८७ द्रव्याचिये आशे करी जो कथा । चांडाळ तत्वतां जाणावा तो ॥ १ ॥ द्रव्याचिये आशे वेद जे पढती । रवरव भोगिती कल्पवरी ॥ २ ॥ द्रव्याचिये आशे पुराण सांगती । सकुळ ते जाती

नरकामध्यें ॥ ३ ॥ द्रव्याचिये आशे कथेचा विकरा । प्रत्यक्ष तो खरा मातंगाचि ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नैराश्य भजन । तो प्राणी उत्तम कलियुगीं ॥ ५ ॥

३४८८ द्रव्य घेऊनियां उपदेश देती । मार्जार ते होती जन्मोजन्मीं ॥ १ ॥ द्रव्य घेऊनियां तीर्थयात्रा करिती । श्वान ते होती जन्मोजन्मीं ॥ २ ॥ देऊनियां दान परतोनि घेती । सूकर ते होती जन्मोजन्मीं ॥ ३ ॥ द्रव्य घेऊनियां रंगीं जे नाचती । वैष्णव ते न होती जन्मोजन्मीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं निर्धनीं भजन । तेणें नारायण संतुष्टचि ॥ ५ ॥

३४८९ प्रत्यक्ष ती कथा जगाची माउली । विक्रयें करिती वाहिली दोषी देखा ॥ १ ॥ आपुली ती माता आपण भोगितां । प्रायश्चित्त सर्वथा काय द्यावें ॥ २ ॥ पतिव्रतेनें जैसा पतीचि वधिला । प्रायश्चित्त तिला कोणें द्यावें ॥ ३ ॥ माते बाळकासी विषपान दिलें । प्रायश्चित्त या बोलें कोणें द्यावें ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कथा ती माउली । विकितां घडली ब्रम्हहत्या ॥ ५ ॥

३४९० कोटी ब्रम्हहत्या घडे । कथा विक्रय तया जोडे ॥ १ ॥ हा तों पुराणीं निवाडा । पाहे कीं रे दगडा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं जाण । पंचमहापातकी तो पूर्ण ॥ ३ ॥

३४९१ शिष्यापासून सेवा घेणें । हें तों लक्षण अधमाचें ॥ १ ॥ ऐसे असती गुरु बहु । नव्हेचि साहूं भार त्यांचा ॥ २ ॥ एकपणें समानता । गुरुशिष्य उरता उपदेश ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । गुरु माझा जनार्दन ॥ ४ ॥

३४९२ गजाचें तें वोझें गाढवासी न साजे । भाविकाचें भजन अभाविका न विराजे ॥ १ ॥ पतिव्रतेची रहाटी सिंदळीसी न साजे । श्रोतियाचें कर्म हिंसका लाजे ॥ २ ॥ एकाजनार्दनाचें कवित्व सर्वांसी साजे । वाचे श्रीगुरु म्हणतां कदा न लाजे ॥ ३ ॥

३४९३ सचेतनीं द्वेष अचेतनीं पूजा । भक्ति गरुडध्वजा कैंवी पावे ॥ १ ॥ व्यर्थ खटाटोप नाथिला पसारा । गोविंद गव्हरा कैंवीं कळे ॥ २ ॥ हरिदासाचेनि गुणें शिळा दैवतपणें । त्या शिळा पूजोनी त्यातें द्वेषी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नाथिलाची दावी । सजीव निर्जिवीं गोंवियेले ॥ ४ ॥

३४९४ गर्दभाचे अंगीं चंदनाची उटी । व्यर्थ शीण पोटीं लावूनियां ॥ १ ॥ श्वान तो भोजनीं वैसविला अढळ । परी वोकावरी ढाळ जाऊं नेदी ॥ २ ॥ सूकरा लेपन कस्तुरीचें केलें । परी तो लोळे चिखलीं सदा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं अभाविकाचे गुण । व्यर्थ शीण जाण प्राणियासी ॥ ४ ॥

३४९५ भाविकांचे स्थान पंढरी पावन । अभाविकां जाण नावडे तें ॥ १ ॥ म्हणोनि चिंतन विठ्ठलाचें वाचे । अभाविकां साचें नावडे नाम ॥ २ ॥ वैष्णवांचा संग नावडे कीर्तन । अभाविकांचा दुर्गुण हाची देखा ॥ ३ ॥ अभाविकांच्या संगें परमार्थ नावडे । एका जनार्दनीं न घडे सेवा कांहीं ॥ ४ ॥

३४९६ ब्रम्ह एक परिपूर्ण । तेथें नाहीं दोष गुण ॥ १ ॥ पराचा देखती जे दोष । तोचि दोषी महा दोष ॥ २ ॥ ब्रम्हीं नाहीं दोष गुण । पहाती ते मूर्ख जाण ॥ ३ ॥ जे गुणदोष देखती । एकाजनार्दनीं नाडती ॥ ४ ॥

३४९७ जीवाचें जीवन जनीं जनार्दन । नांदतो संपूर्ण सर्व देहीं ॥ १ ॥ वाउगीं कां वांयां शिणती बापुडीं । काय तयां जोडी हातीं लागे ॥ २ ॥ पंचाग्निसाधन अथवा धूम्रपान । तेणें काय संपूर्ण हरि जोडे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वाउगीं तीं तपें । मनाच्या संकल्पें हरी जोडे ॥ ४ ॥

३४९८ आशाबद्ध करिती देवाचें पूजन । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ १ ॥ आशाबद्ध करिती वेदाचें पठण । तेणें नारायण तुष्ट नोहे

॥ २ ॥ आशाबद्ध कारिती पुराणश्रवण । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ ३ ॥ आशाबद्ध कारिती दैवत उपासन । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ ४ ॥ आशाबद्ध कारिती जप तप हवन । तेणें नारायण तुष्ट नोहे ॥ ५ ॥ निराशी कारिती देवाचें कीर्तन । एकाजनार्दन तुष्ट होय ॥ ६ ॥

३४९९ राहुनी पंढरी । आणिकाची आस करी ॥ १ ॥ तो पातकी चांडाळ । खळाहुनी अमंगळ ॥ २ ॥ सांडोनियां विठ्ठल देव । आणिकासी म्हणे देव ॥ ३ ॥ सांडोनियां पुंडलिका । गाय आणिकासी देखा ॥ ४ ॥ ऐसा पातकी तो खळ । तयाचा न व्हावा विटाळ ॥ ५ ॥ म्हणे जनार्दनाचा एका । तया तेथें ठेऊं नका ॥ ६ ॥

३५०० जन्मोनी प्राणी नाम न घेत वाचे । त्याचिया जन्माचें व्यर्थ वोझें ॥ १ ॥ प्रसवोनी तया वांझ ती जननी । बुडविलीं दोन्हीं कुळें त्यानें ॥ २ ॥ पूर्वज पतनीं पडती बेताळीस । नाम नये मुखास ऐसा प्राणी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पतीत दुराचारी । यम तया अघोरीं घालितसे ॥ ४ ॥

३५०१ ऐसें कृपण मनाचें । तें या पंढरीसी न वचे ॥ १ ॥ पापीयासी पंढरपुर । नावडे ऐसा निर्धार ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान पाषांडीया । नावडे काया वाचा जीवेंसी ॥ ३ ॥ विषयीं जो दुराचारी । तया नावडे ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥ अभक्तांसी संतभेटी । झाल्या नावडे म्हणे चावटी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं म्हणे देवा । तया दुरी मज ठेवा ॥ ६ ॥

३५०२ दीपकाचे ठायीं नाहीं द्वैतभाव । चोर आणि साव सारखाची ॥ १ ॥ तैसें ब्रह्मज्ञान सांगताती गोष्टी । अभाविका पोटीं स्थिर नोहे ॥ २ ॥ शुद्ध पंचामृतें काग तो न्हाणिला । परी कृष्णवर्ण पालटला नोहे त्याचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं खळाचा स्वभाव । पालट वैभव नोहे त्यासी ॥ ४ ॥

३५०३ कस्तुरी परिमळ नाशितसे हिंग । ऐसा खळाचा संग जाणिजेतां ॥ १ ॥ साकरेचे आळा निंब जो पेरिला । शेवटीं कडू

त्याला फळें पत्रें ॥ २ ॥ चंदनाचे संगें हिंगण वसती। परी चंदनाची याती वेगळीच ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं हा अभाविकाचा गुण । वमना-समान लेखूं आम्ही ॥ ४ ॥

३५०४ नावडे जयासी पंढरी। तोचि जाणा दुराचारी ॥ १ ॥ नावडे जया चंद्रभागा। तोचि अपवित्र पैं गा ॥ २ ॥ नावडे पुंड-लिका वंदन। तोचि चांडाळ दुर्जन ॥ ३ ॥ नावडे विठ्ठलाचि मूर्ती। तोचि जगीं पापमति ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं शरण। तोचि दुराचारी जाण ॥ ५ ॥

३५०५ अज्ञानी विश्वासें साधूसी वंदी । ज्ञानिया तो सदा तया निंदी ॥ १ ॥ ऐशी उभयतांचि क्रिया । पहातां चर्या एकची ॥ २ ॥ वंदूं निंदूं कोणी ऐसा एक भाव। तेथें तो देव वसे सदा ॥ ३ ॥ ज्ञान अज्ञानाचा निवाडा होय। एका शरण जनार्दनीं जाय ॥ ४ ॥

३५०६ हृदयस्थ असोनी कां रे फिरसी वांयां। दीप आणि छाया जयापरी ॥ १ ॥ आत्मतीर्थी सुस्नात झालिया मन। आणिक साधन दुजें नाहीं ॥ २ ॥ साधन तें मन करी आपुलें आधीन। यापरतें कारण आन नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं मनासी आवरी। मग तूं संसारीं धन्य होसी ॥ ४ ॥

३५०७ लोखंडाची वेडी तोडी। आवडी सोनियाची घडी ॥ १ ॥ मी ब्रह्म म्हणतां अभिमान। तेथें शुद्ध नोहे ब्रह्मज्ञान ॥ २ ॥ जळा-पासूनी लवण होय। तें जळींचें जळीं विरूनी जाये ॥ ३ ॥ जैशी देखिली जळगार। शेवटीं जळचि निर्धार ॥ ४ ॥ मुक्तपणें मोला चढलें। शेवटीं सोनियाचे फांसां पाडिलें ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं शरण। बद्धमुक्ता ऐसा शीण ॥ ६ ॥

३५०८ गाण्याचें कीर्तन वाखाणिलें। जाणिवेचें ज्ञान तें जाणि-वेनें खोदलें ॥ १ ॥ भवार्णव हा अवघा उभारा। तो कळे जाणि-वेवरी रे ॥ २ ॥ पंडिताचा बोध विश्वंसी वाद। तापसाचें तप

निर्दाळी क्रोध ॥ ३ ॥ योगियाचा योग नाडियेला सिद्धी । अभिमान नाडी सज्ञान बुद्धी ॥ ४ ॥ कर्माकर्म नाडी वर्णाश्रम । संबंधीं विषम विकल्प करी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं भगवत्कृपा पूर्ण । निरभिमानें चरण धरियेले ॥ ६ ॥

३५०९ एकांतीं बैसणें शरीर रोधणें । अष्टांग साधनें श्रम नको ॥ १ ॥ गुदातें अंगुष्ठ लावुनि बैसणें । शरीरीं रोधणें पंचप्राण ॥ २ ॥ नको नको व्यर्थ जीवासी यातना । रामनाम स्मरणा करीं सुखें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं नको यातायाती । नामस्मरणें मुक्ती सत्वर जोडे ॥ ४ ॥

३५१० पंडितांच्या वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ १ ॥ शास्त्रीयाचें वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ २ ॥ वेदांताच्या वचना द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ ३ ॥ पुराणिकाचे वचनीं द्यावें अनुमोदन । परि हित नोहे जाण तेणें कांहीं ॥ ४ ॥ ॥ संतांच्या वचना द्यावें अनुमोदन । एकाजनार्दनीं तेणें हित होय ॥ ५ ॥

३५११ पवित्र अंतर शुद्ध करा मन । तेणें घडे जाण सर्व कर्म ॥ १ ॥ वेदयुक्त मंत्र जपतां घडे पाप । मी मी म्हणोनी संकल्प उठतसे ॥ २ ॥ यज्ञादीक कर्में घडती सांग । मी मी संसर्ग घडतां वायां ॥ ३ ॥ दानधर्मविधी धरितां शुद्ध मार्ग । मी मी म्हणतां याग वांयां जाय ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मीपणा टाकून । करीं कृष्णार्पण सर्व फळ ॥ ५ ॥

३५१२ जिव्हा रस चाखी अवलोकी नेत्र । प्रेरक पवित्र आत्माराम ॥ १ ॥ बोलतसे मुख त्वचे कळे स्पर्श । प्रेरक परेश आत्माराम ॥ २ ॥ सुखदुःख ज्ञान होतसे पैं चित्ता । प्रेरक पंढरीनाथाविण नाहीं ॥ ३ ॥ घ्राणा परिमळ ऐकती श्रवण । प्रेरक नारायण सर्व साक्षी ॥ ४ ॥ हस्तें घेणें देणें चरणीं गमन । प्रेरक इशान आत्मा-

राम ॥ ५ ॥ ज्याच्या सत्तावळें हाले वृक्षपान । प्रेरक भगवान सर्वांचा तो ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं पाय हे धरावे । ध्यान हें करावें हृदयीं त्याचें ॥ ७ ॥

३५१३ जप जाप्य तप नको अनुष्ठान । पंचाग्निसाधन योग नको ॥ १ ॥ नको तीर्थाटण नको मंत्रावळी । वेद शास्त्र जाळीं गुंतूं नको ॥ २ ॥ नको आत्मस्थिती नको ब्रह्मज्ञान । नको अष्टांगसाधन नको वांया ॥ ३ ॥ नको यंत्रमंत्र नको रे कल्पना । भ्रांति भूली जाणा नको नको ॥ ४ ॥ नको तूं करूं सायास धरी पां विश्वास । एका जनार्दनास डोळां पाहें ॥ ५ ॥

श्रीनिवृत्तिमहाराज

३५१४ देहाच्या दीपकीं एकी वस्तु चोख । असोनियां शोक कां करितोसी ॥ १ ॥ देहभरी आत्मा नांदे निरंतर । असतां हा विचार का धांवतोसी ॥ २ ॥ तुझें तूं पाहीं आहे तें येईं । एकरूप होई गुरु-खुणें ॥ ३ ॥ निवृत्तीचें सार हरिरूप सदा । नित्य परमानंदा रात-लासे ॥ ४ ॥

३५१५ देहीं देव आहे हें बोलती वेद । परि वासनेचे भेद न द्व-डिती ॥ १ ॥ वासना पैं चोख तेथेंचि वैकुंठ । भावोचि प्रगट होये जनां ॥ २ ॥ न लगती सायास करणें उपवास । नाममात्रें पाश तुटे जनां ॥ ३ ॥ निवृत्ति पहातु देहामाजि प्रांतु । देवोची दिसतु सर्वांघटीं ॥ ४ ॥

३५१६ सर्व हरि दिसे जनीं वनीं वसे । भवदृश्य भासे भक्तजनां ॥ १ ॥ ऐसें कांहीं करा सहज तें आचरा । जन्मभरोवरा पडों नका ॥ २ ॥ भावना श्रीधर भाविक हरिहर । भजनीं श्रीवर सर्व तुष्टे ॥ ३ ॥ निवृत्ति निधान आत्मा हाचि जीवन । भवयुक्त धन भावें पावे ॥ ४ ॥

३५१७ दुजियाची निंदा दुजेपण सदा । द्वैत तें गोविंदा नावडे

रया ॥ १ ॥ दुजेपणा भिन्न सर्व जनार्दन । ब्रह्म सनातन पावसी रया ॥ २ ॥ वांयां द्वैतभाव दुजिया वळणें । ब्रह्म हें येसणें ठाव नेदी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे तो नर येथें गुंफला । द्वैताच्या गोंविला योनिमाळे ॥ ४ ॥

३५१८ आपपर शून्य आपीं करी लीन । आपपर जाण हरी असे ॥ १ ॥ करितां उपाधि द्वैत तें उपजे । तया अधोक्षजें नुद्धरिजे ॥ २ ॥ दुजिया सौजन्य दुजेपण सांडी । अद्वैत पें मांडी सुख गोष्टी ॥ ३ ॥ निवृत्ति साकार परासि अद्वैत । पर परमामृत गोपवेषें ॥ ४ ॥

३५१९ वासनेचें द्वैत सांडुनि परतें । अद्वैता अरुतें भोगी हरी ॥ १ ॥ दुजियाची सृष्टि नाहीं नाहीं भिन्न । सर्व नारायण विवलासे ॥ २ ॥ आत्मरूपें जन मानीं कां रे मूढा । होसी माजिवडा ब्रह्मामाजि ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे द्वैत सांडीं सांडीं कथा । अद्वैत अच्युता नित्य सेवीं ॥ ४

३५२० पितृ मातृ निंदिता द्वैत होंचि खोटें । अर्चन गोमटें एको विष्णु ॥ १ ॥ निंदितां पितरांसि नपवे हृषीकेशी ॥ योनीचे माळेसि गुंफसील ॥ २ ॥ चित्त शाठ्य करी प्रपंचाचरण । पितृ जनार्दन न पावसी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे नरु द्वैताचा पामरू । अद्वैतीं सुरवरु नाहीं रया ॥ ४ ॥

३५२१ निःसंदेह हरि भावयुक्त करी । भजन निर्धारीं सत्वशीळ ॥ १ ॥ रज तम खंडी वासना हे गुंडी । चित्त हें अखंडी हरिपंथीं ॥ २ ॥ साधन हरिपंथु हाचि निज हेतु । गुरुमुखें मातु ऐसी असे ॥ ३ ॥ निवृत्तीचें धन हरि आत्मा जाण । हरि हाचि पूर्ण जनकु रया ॥ ४ ॥

३५२२ सुख दुःख कांहीं भजनप्रवाहीं । मायामोह पाही हरि रया ॥ १ ॥ हरिरूपीं सुख हरिरूपीं दुःख । हरिरूप शोक आत्मा

माझा ॥ २ ॥ साकार निराकार सर्व हा आचार । हरिरूप सार भजन-भाव ॥ ३ ॥ निवृत्तीचें ज्ञान हरिरूप ध्यान । मनाचें उन्मन हरि-रूपीं ॥ ४ ॥

३५२३ कैवल्य देहीं आत्मा असोनि हिंडसी । गर्भवासा येशी नाना जन्मीं ॥ १ ॥ मन करीं एकट आत्मा करीं सुभट । आपेआप वैकुंठ एकातत्वें ॥ २ ॥ या रूपें चिंतितां आत्मरूपें पाहतां । तत्वीं-तत्व समता मिळोनि जाये ॥ ३ ॥ निवृत्ति सधर एकतत्वीं विचार । मन मार्ग साचार हारपला ॥ ४ ॥

३५२४ दिसे वरीवरी नाम अवघें वैकुंठधाम । जपतो शिव वर्म रामनाम ॥ १ ॥ तें रूप समरस गोकुळीं हृषीकेश । नंदाघरीं गोपवेषें हरि खेळे ॥ २ ॥ समाधिधनधाम वैकुंठ हरिसम । योगियां पूर्ण काम हृदयीं सदा ॥ ३ ॥ निवृत्तिनें कथिलें गुरुगयनीं प्रसादें । सकळ हा गोविंद आत्माराम ॥ ४ ॥

३५२५ भक्ति ज्ञान वैराग्य तिहींचें शोधन । जनीं जनार्दन हेंचि खरें ॥ १ ॥ भक्तीविण देव नपवे सावेव । रोहिणीची माव तैसा दिसे ॥ २ ॥ वैराग्यें तापलें ब्रह्मांड देखिलें । वासनें मुंडिलें निःसंदेहें ॥ ३ ॥ निवृत्ति ज्ञानार्क विज्ञान सम्यक । भावशीळ देख जनीं इयें ॥ ४ ॥

३५२६ मोक्षमुक्ती चारी एक तत्व हरी । बाहिजु भीतरीं हरि करी ॥ १ ॥ तराल स्वभावें एकाएक देवें । एक हरी भावें ऐसा कीजे ॥ २ ॥ टाका हें पैं द्वैत अद्वैत सिद्धांत । मोक्ष मार्ग हेत एका तत्वें ॥ ३ ॥ निवृत्तीचा मार्ग एक रूपें सांग । नांहीं पैं पांग कल्पनेचा ॥ ४ ॥

३५२७ ज्ञानाचिया गोष्टी सांगतो चावटी । भाव नाहीं पोटीं ते काय करूं ॥ १ ॥ भावबळें देव भावबळें देव । भक्तीचा स्वभाव ऐसा असे ॥ २ ॥ जना उपदेशी जनीं हृषीकेशी । आपण भक्तीसी दुन्हा-वितु ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे भक्तिभाव हा सफळ । तेथें अद्वैत कृपाळ विवलेंसे ॥ ४ ॥

३५२८ समता वर्तावी अहंता खंडावी । तेणेंचि पदवी मोक्षमार्ग ॥ १ ॥ क्षमा धरीं चित्तीं अखंड श्रीपति । एक तत्व चित्तीं ध्याईजेसु ॥२॥ नाम हाचि मंत्र नित्य नाम सार । दुसरा विचार घेऊं नको ॥३॥ अन्य शास्त्रें भजतां नाहीं पैं मुक्तता । हरिनाम गातां मुक्ति रोकडी ॥ ४ ॥ नित्य सुख घ्यावें नामाचि अनुभवावें । तरीच सुख पावावें इहींलोकीं ॥ ५ ॥ निवृत्ति भजन नित्य अनुष्ठान । एकरूपध्यान मनीं ध्यातु सदा ॥ ६ ॥

३५२९ दीपाची कळिका दीपींचि सामावे । तैसा जीवशिव वोळखीवोजी ॥ १ ॥ दीप आहे देहीं तयाचे हे प्रकाश । त्याचेनि सावकाश हरी भजे रया ॥ २ ॥ न मिळे आयुष्य न मिळे घटिका । देह क्षण एका जाईल रया ॥ ३ ॥ निवृत्तीचा दीप दीपाचिया मुसे । आटोनि सौरसें एक जाला ॥ ४ ॥

३५३० आकारीं दिसे निराकारीं वसे । तोचि हृदयीं दिसे अरे जना ॥ १॥ नाहीं तो आहे न दिसे ना पाहे । अवघा होऊनि राहे तन्मयता ॥ २ ॥ स्वरूप उखर मनोमन सार । एकतत्व निर्धार हरी नांदे ॥ ३ ॥ निवृत्तीची खूण अवघेंचि होणें । एका नारायणें भरलें दिसे ॥ ४ ॥

३५३१ परंपरा भक्त उद्धरिले प्रेमें । सांडिलें दुर्गमें संसारिकें ॥ १ ॥ नसतें भवभय होतें जें मानसीं । स्मरतां नाम त्यासी नाहीं केलें ॥ २ ॥ पाहतां तुझें नाम रूप दृश्य नोहे । तो भक्तालागीं होय कृष्णठसा ॥ ३ ॥ निवृत्तीचें नाम रूप निराकार । कृष्ण हा साचार गयनी कृपा ॥ ४ ॥

३५३२ एकरूपें दिसे भेदरूप भासे । ज्ञानियासी कैसें एकतत्व ॥ १ ॥ तत्वता श्रीहरी एक असे सर्व । सांडुनी देहभाव पूर्ण पाहा ॥ २ ॥ देवेंविण कोठें रितें नाहीं सर्वथा । संपूर्ण पुरता हरी आहे ॥ ३ ॥ निवृत्तीची खूण एकतत्त्वरूपें । पाहतां सोहंपं गुरुखुणें ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

३५३३ शरीर वरिवरि कां दंडिसि जंव वारिलें न करी तुझें मन । जळीं नेत्र लाउनि ठोकती अविंशा लागोनि तैसें नको बक-ध्यान रया ॥ १ ॥ चित्त सुचित्त करीं मन सुचित्त करीं । न धरीं तूं विषयाची सोय । वनीं असोनी वनिता । चिंतिसि तरि तपचि वाउगें जाय रया ॥ २ ॥ त्रिकाळ स्नान करिसी तीर्थजळीं परि नवजाती मनींचे मळ । तुझियानि दोषें तीर्थ कुश्चित्त जाली जैसी त्या रजकाची शीळ रया ॥ ३ ॥ आतां करिसि तरी चोखटच करी त्यासी साक्ष तुझें मन । लटिकें न झकवसी तऱ्हीं देव दुऱ्हा होसी बापरखुमा-देविवरा विठ्ठलाचि आण ॥ ४ ॥

३५३४ तोंडें जाले संन्यासु । भोगावरी धावे हव्यासु ॥ १ ॥ ते नेणती ब्रह्मरसु । वांयां होती कासाविसु ॥ २ ॥ ब्रह्मकर्मातें साधू जाती । वांयां चुकली तुझी भक्ति ॥ ३ ॥ सर्वत्र आपणची म्हणती । अभक्ष भक्षण करिती ॥ ४ ॥ तोंडीं दंभ माया धंदा । शरण रिघें रे गोविंदा ॥ ५ ॥ चुकले विठ्ठला उदारा । बापरखुमादेविवरा ॥ ६ ॥

३५३५ विटवुनि काया दंड धरी करीं । हिंडे घराचारी नवल पाहें । असमाधानी विषयीं विव्हळ । तरी केवळ दंड काजा काई ॥ १॥ सिद्धाचि असतां कां गा विटंबिसी । नव्हेचि संन्यासी तूं जाण कैसा ॥ २ ॥ निजाश्रमींचे वास संकल्पासी त्यागी । सर्वस्वें वैरागी तोचि संन्यासी । संगीं असंगता तोचि जाण संन्यासी । स्वरूप तयापाशीं जवळी आहे ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरु उघडाचि संन्यासी । तोचि पूर्ण भासीं भरला असे । निवृत्तीरायें खुणा दाखविला निरुता । तो जाणण्या परता सदोदितु ॥ ४ ॥

३५३६ तापत्रयीं तापलीं गुरूतें गिंवसिती भगवें देखोनि ह्मणती तारा स्वामी । तंव ते नेणोनि उपदेशाची रीती आतां न उपदेशिती ठकले निश्चितीं तैसें जालें ॥ १ ॥ संत ते कोण संत ते कोण ।

हे जाणवि म्हणे केशविराजा ॥ २ ॥ कोणी एक प्राणी क्षुधेनें पिडिले । म्हणोनि दोंडें तोडूं गेले । त्यावो येथें तो तुसधिरूपीं उडे । ठकले बापुडे तैसें जालें ॥ ३ ॥ कोणी एक प्राणी प्रवासें पीडिला । स्नेहाळु देखिला विश्ववानु । तयाचें स्नेह लाविता अंगीं । सुजला सर्वांगीं तैसें जालें ॥ ४ ॥ कोणी एक प्राणी पडिला झडीं । म्हणोनि गेला पैल तो झाडीं । त्यांत अस्वलीं उठली लवडसवडी । नाक कान तोडी तैसें झालें ॥ ५ ॥ ऐसा सकळ कळा जाणसी । नंदरायाचा कुमर म्हणविसी । बाप रखुमादेविवरु विठ्ठलीं भेटी । पडली ते न सुटे जिवेंसी ॥ ६ ॥

३५३७ घरदार वोखटें त्यजूं म्हणसी तरी शरीरा येवढें जाड । मायबाप वोखटीं त्यजूं म्हणसी तरी अहंकार अविद्येचें कोड । बंधु सखे त्यजूं म्हणसी तरी काम क्रोध मद मत्सर अवघड । बहिणी पाठीच्या त्यजूं म्हणसी आशा तृष्णा मायेचें बंड रया ॥ १ ॥ त्यजिलें तें काय कासया म्हणिजे सांग पां मजपाशीं ऐसें । जया भेणें तूं जासी वनांतरा तें तंव तुजचि सरिसें रया ॥ २ ॥ स्त्री वोखटी त्यजूं म्हणसी तरी कल्पने येवढी शोक्ती । पुत्र अपत्य त्यजूं म्हणसी तरी इंद्रियांसि नाहीं निवृत्ति । सकळ गणगोत त्यजूं म्हणसी तरी हे अष्टधा प्रकृति । अवघेंचि त्यजूं पाहे म्हणसी तरी मना नाहीं निज-शांति रया ॥ ३ ॥ अवघीचि तुज जवळी दुमदुमित असतां वरीवरी मुंडिसी कां करिसी विटंबना । सहज संतोषें असोनि जैसा तैसा पारे तो सद्गुरू पाविजे खुणा । आपुलें आश्रमीं स्वधर्मीं असतां सर्वत्र एकुचि जाणा । बापरखुमादेविवरु विठ्ठलु इतुकियासाठीं नेईल वैकुंठभुवना ॥ ४ ॥

३५३८ आलियाचा संतोष गेलियाची हानी । नाहीं त्याचा अति-शो वेंचे त्याची कहाणी ॥ ऐसें संकल्प विकल्प देहीं वरिवरि मुंडि-लिया होय कायी । तरि बहुरूप्याच्या ठायीं काई काई नटु नसे

रया ॥ १ ॥ आधीं भितरु दंडावा पाठीं बाहिजु मुंडावा । नाहीं तरी योग मांडिवा कां करिसी रया ॥ ध्रु०॥ मागितलीया भीक जरि होय निर्दोष । तरी सणिये रजक काय न मगती ॥ देवपणें फुग धरिसील गाढा । तरी वायांवीण मूढा सिंतरलासी ॥ २ ॥ थिगळी घालोनी गळां म्हणसी न भियें काळिकाळा । तरी काय कर्मावेगळा कैं हो पहासी ॥ योगिया म्हाणिजे कैसा भीतरीं काश्मिरी जैसा । मीनालिया पदार्थासरिसा होउनि मिळे ॥ ३ ॥ हृदयीं नाहीं जालेपण क्रोधें भवंडिसी लोचन । अंगीं भस्मउधळण राख राखेल काई ॥ खरु लोळे उकरडा । काय परत्राचिया चाडा । तैसा मठी बांधोनि मूढा । वर्म चुकलासी ॥ ४ ॥ तीर्थ व्रत जप स्नान । वाउगें करिसी ध्यान । ऐसें करितां आनेआन । मार्ग चुकलासी ॥ शुद्ध करूनियां मन सेवीं निवृत्तीचे चरण ॥ विठ्ठल विठ्ठल ह्मण नाहीं तरी नाडलासी ॥ ५ ॥

३५३९ येणेंचि आश्रमें नित्य नैमित्तीक कर्मे । वर्णाश्रमधर्म त्यागून कोठें जासी । म्हणोनि येकाचि विचारी बापा । जेणें सार्थक होय संसारासी । विकल्प नको धरूं शुद्ध करीं अंतर धरुनि राहे या सगुणासी रया ॥ १ ॥ आवडी धरूनी गोडी घेईं कां ध्यानीं । परतोन मग योनि नाहीं तुज ॥२॥ सांडीं सांडीं त्याग नास्तिकाचें मत नलगे करणें अटणें । नानाविधि वाउगे जड का सिणवणें । केवि मन होय शुद्धी । एकलेंचि मन करूनि स्वाधीन । सगुणींचि काय सिद्धि नलभे रया ॥ ३ ॥ म्हणोनि येकाकारवृत्ति सगुणीं बैसली । प्रीतिची निर्गुणींचि आर्ति जाण संपदा । त्याची सांडी मांडी न करीं निरुतें चित्तीं धरीं । स्वस्वरूपीं असे सदा । बापरखुमादेविवरु विठ्ठलु चिंतितां । सुख सगुणींचि जोडे आनंदु रया ॥ ४ ॥

३५४० कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म । कासया सांडिसी कुळींचे धर्म । आहे तें वर्म वेगळेंचि ॥ १ ॥ भस्मउधळण जटाभारू । अथवा उदास दिगंबरू । न धरीं लोकांचा आधारू ।

आहे तो विचारु वेगळाचि ॥ २ ॥ जप तप अनुष्ठान । क्रियाकर्म यज्ञ दान । कासया इंद्रियां बंधन । आहे तें निधान वेगळेंचि ॥ ३ ॥ वेदशास्त्र जाणीतलें । आगमीं पूर्ण ज्ञान झालें । पुराणमात्र धांडोळिलें । आहे तें राहिलें वेगळेंची ॥४॥ शब्दब्रह्मीं होसी आगळा । म्हणसि न भिये कळिकाळा । बोधेंविण सुख सोहळा । आहे तो जिव्हाळा वेगळाची ॥ ५ ॥ याकारणें श्रीगुरुनाथु । जंव मस्तकीं न ठेवि हातु । निवृत्तिदास असे विनवितु । तंव विवांतु केवीं होय ॥ ६ ॥

३५४१ अरे मना तूं वांजटा । सदा हिंडसी कर्मठा । वायां शिणशीलरे फुकटा । विठ्ठल विनटा होय वेगीं ॥ १ ॥ तुझेनि संगें नाडले बहु । जन्म भोगितां नित्य कोहुं । पूर्व विसरलें ॐ हुं सोहुं । येणे जन्म बहुतांसी जाले ॥ २ ॥ सांडि सांडि हा खोटा चाळा । नित्य स्मरे रे गोपाळा । अढळ राहारे तूं जवळा । मेघःश्याम सांवळा तुष्टेल ॥ ३ ॥ न्याहाळितां परस्त्री । अधिक पडसी असिपत्रीं । पाप वाढिन्नलें शास्त्रीं । जप वक्त्रीं रामकृष्ण ॥ ४ ॥ बापरखुमादेवीवर । चिंतीं पां तुटे येरझार । स्थिर करीं वेगीं बिढार । चरणीं थार विठ्ठलाचें ॥ ५ ॥

३५४२ अरे मना तूं पापिष्ठा । किती हिंडसीरे नष्टा । सैरा सिणसीरे फुकटा । विठ्ठल विनटा स्थिर होई ॥ १ ॥ येणें पैलपार पावसी । तूं अनिवार नावरसी। तुझेनि संगें नाडले ऋषी । तूं तंव अपभ्रंशी पाडिशी । म्हणोनि गुरूसी गेलें शरण ॥ २ ॥ न सोडी हरिचरण । नाहीं नाहीं जन्ममरण । अविट सेवी नारायण । तेणें मी तूं पण एकरसी ॥ ३ ॥ ज्ञानदेव शरण हरी । मन हिंडे चराचरीं । न सोडी चरण अभ्यंतरीं । नित्य श्रीहरी हृदयीं वसे ॥ ४ ॥

३५४३ आजि लाजलें तुमच्यापाशीं स्तुती करूं काई । हेंचि तुम्हां पाहीं विनवीतसे ॥ १ ॥ निवृत्ती बाप निवृत्ति माये । निवृत्ति पाहे विवळलिये ॥ २ ॥ देखणें देखिलें तेंचि होई पां रे मना । निवृत्ति चरणीं स्थिर राहीं पां रे ज्ञाना ॥ ३ ॥

३५४४ सुख आपलें आपण तों पाहें । रूप आपलें आपण ध्यायरे मना ॥ १ ॥ लक्ष निवृत्तिचरणीं थोर राहे । भेदुभ्रम सांडीं सावध होयें ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु एकचि पुरे । जाणतिलया सर्व सुख मोहरे ॥ ३ ॥

३५४५ स्वमींचेनि सुखें मानिताती सुख । घेतालेया विख जाईल देह ॥ १ ॥ मोलाचें आयुष्य दवडितोसि वायां । माध्यान्हींची छाया जाय वेगीं ॥ २ ॥ वेग करीं भजना काळ यम श्रेष्ठ । कैसेनि वैकुंठ पावसील ह्मणें ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठल उभा । सर्वत्र घटीं प्रभा त्याची आहे ॥ ४ ॥

३५४६ विष्णुवीण मार्ग घेसील अव्यंग । तरी वायांचि सोंग करणी तुझी ॥ १ ॥ येऊनि संसारा वायांचि उजिगरा । कैसेनि ईश्वरा पावसी हरी ॥ २ ॥ नरदेह कैंचें तुज होय साचें । नव्हे रे देहींचें सुख तुज ॥ ३ ॥ ज्ञानदेव ह्मणे शरण रिघणें । वैकुंठीचें पेणें अंतीं तुज ॥ ४ ॥

३५४७ चौर्‍यांशी लक्ष योनी क्रमुनि सायासी । नरदेहा ऐसें मांडवल पावलासी । जतन करीरे गव्हारा न भजें न भजें या संसारा । बीज सांडूनि असारा वायां झोंबतोसी ॥ १ ॥ हातींचिया लागीं भूमि चाळितोसी । आप नेणतां तूं पर काय चिंतिसी ॥ मन एक स्वाधीन तरी खुंटलें साधन । सर्व सुखाचें निधान हरि पावसी रया ॥ २ ॥ तृणें पशु झकविले ते क्षीरातें विसरले । तैसा विषय-पाल्हाळें निज चुकलासी ॥ कोटी युगें जन्मवरी येतां जातां येरझारी । दुःख भोगिसी दुर्धरीं रया ॥ ३ ॥ पुत्र कलत्र भवविभव विचित्र । होय जाय सूत्र तूं आप न ह्मण ॥ तुझा तूंचि नाहीं ऐसें विचारूनि पाहीं । चेतवि चोरिलासी वेगीं सावध होईं रया ॥ ४ ॥ तुज नाथिलाचि धिवसा आस्तिक्यपणाची आशा । असते सांडुनि आकाशा वायां झोंबतोसी ॥ दिवस आहे तों धांवावें नाहीं तरी फुटोनि मरावें ।

मृगजळ हें अवघें पाहें पां रया ॥ ५ ॥ स्वप्नीं साचचि जोडे थोडें ना बहुत हातां सांपडे । तुटलें प्रीतीचें कुवाडें ऐसें जाणोनियां ॥ शरण जाई निवृत्ति तो सोडवील संसृति । बापरखुमादेविवरा विठ्ठलाचे भक्ति रया ॥ ६ ॥

३५४८ द्वीपोद्वीपींचे पक्षी मेरुतळवटीं उतरले । रत्न म्हणोनि त्या स्फटिकासी झेंपावले ॥ १ ॥ राजहंस ते भ्रमले हो पाषाण चुंबिती । आडकालिया चाञ्चू मग मागिल आठविती ॥ २ ॥ एक श्रीकृष्ण तें विसरले ऐसें ज्ञानदेव बोले । मूर्खासि संगति करितां शाहणे सिंतरले ॥ ३ ॥

३५४९ जंव या वायूचा प्रकाशु तंव या भांडियाचा विश्वासु । वायो निघोनियां गेला ठाईंचाच जाला उदासु रया ॥ १ ॥ काळाचें भातुकें शृंगारिलें कौतुकें । जातसें तें देख परि न चले कांहीं ॥ २ ॥ ठाईंचेचि जाणार कीं नव्हे राहणार यासी जतन ते काई । जेथील तेथें निमोनियां गेलें उपचार नचलेचि कांहीं ॥ ३ ॥ हें काळाचें भांडें कीं अवघेंचि लटिकें जैसें आहे तैसें सांगेन पुढती । बापरखुमादेविवरु विठ्ठलुचि सकळहि जीवांचा सांगाती रया ॥ ४ ॥

३५५० कानीं घालुनियां बोटें नाद जे पाहावे । न दिसतां जाणावें नऊ दिवस ॥ १ ॥ भोंवया पाहातां न दिसे जाणा । आयुष्याची गणना सात दिवस ॥ २ ॥ डोळां घालोनियां बोट चक्र जें पाहावें । न दिसतां जाणावें पांच दिवस ॥ ३ ॥ नासाग्रीचें अग्र न दिसे नयनीं । तरि तेचि दिनीं म्हणा रामकृष्ण ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे हें साधूंचें लक्षण । अंतकाळीं आपण वेगीं पहा ॥ ५ ॥

३५५१ जंववरीरे तंववरी जंबुक करी गर्जना । जंव त्या पंचानना देखिलें नाहीं बाप ॥ १ ॥ जंववरीरे तंववरी वैराग्याच्या गोष्टी । जंव सुंदर वनिता दृष्टी देखिली नाहीं बाप ॥ ध्रु० ॥ जंववरीरे तंववरी मैत्रत्व संवाद । जंववरी अर्थेंसी संबंध पडिला नाहीं बाप ॥ २ ॥

जंववरीरे तंववरी युद्धाची मात । जंव परमाईचा पूत देखिला नाहीं बाप ॥ ३ ॥ जंववरीरे तंववरी समुद्र करी गर्जना । जंव अगस्ती ब्राह्मणा देखिलें नाहीं बाप ॥ ४ ॥ जंववरीरे तंववरी बाधी हा संसार । जंव रखुमादेविवर देखिला नाहीं बाप ॥ ५ ॥

३५५२ वेदवाणी चांग स्मरतां स्मरण । नित्य नारायण हृदयीं वसे ॥ १ ॥ तेथिल गव्हर जाणतो विरुळा । ब्रह्मीं ब्रह्मकळा साधुमुखें ॥ २ ॥ जाप्य जप होम विधिविधान हारे । हृदयीं श्रीहरि न कळे मूढा ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे श्रीहरि हृदयस्थ । ऐसी आहे भाष वेदशास्त्रीं ॥ ४ ॥

३५५३ निर्जिवां दगडांची काय करिसी सेवा । तो तुज निर्दैवा देईल काय ॥ १ ॥ कवणें गुणें भुली पडली गव्हारा । तीर्थाच्या माहेरा नोळखिसी ॥ २ ॥ अष्टोत्तरशें तीर्थें जयाच्या चरणीं । तो तुझ्या हृदयभुवनीं आत्माराम ॥ ३ ॥ देव जवळीं असतां जासी आना तीर्था । मुकलासी आतां म्हणे ज्ञानदेवो ॥ ४ ॥

३५५४ सुंदरु राजसु सुकुमारु विंदुलें न साहे ज्यासी । स्वबुद्धी अळंकारला परा आसुनि ठेला मौन्य पडलें या शब्दासी । पाहों जाय तंव पाहाणें आसी नवलावो काय या सुखासी । न अवलोकवे मना अवधारूनि ध्यानीं आतां न विसंबे तुझिया पायासी रया ॥ १ ॥ हेम अळंकारु भेदु हा काय सगुणीं निर्गुणीं आहे तैसे गुण । गुळाचेनि अंगें गोडीपणें पाहातां न निवडे आतां मी काय करूं ॥ २ ॥ म्हणोनि मन समावेश करणें तुझें तुजमाजीं घालणें । येणें तुज अळंकारणें मध्यमणी । मन चतुष्टय पदीं पदक तेंचि बैसका चोखट मन मनीं रुतलें ठेलें । आवडीचेनि अभ्यासें कोंदलिया दाही दिशा म्हणोनि प्रीति धरीं सगुणीं रया ॥ ३ ॥ उभारलेनि सिडे जेथें स्वराज्य तारूं न बुडे । ऐसें घडे वाडेकोडें तेंचि कीजे । जेथें मनासि कवण स्वप्नीं राज्य रक्षी जाण । आपुलें पारिखें नेणिजे म्हणोनिया आतां बापरखुमादेविवरा विठ्ठला शरण जाईजे रया ॥ ४ ॥

३५५५ सुढाळ ढाळाचे मोती अष्ट अंगें लवे ज्योती। जया होय प्राप्ति तोचि लाभे ॥ १ ॥ हातीचें निधान जाय मग तूं करिसी काय। पोळलियावरि हाय निवऊं पाहे ॥ २ ॥ अमृतें भोजन घडे कांजियानें चूळ जोडे। मग तये चरफडे मिती नाहीं ॥ ३ ॥ अंगा आला नाहीं घावो तंव ठाकी येक टावो। बापरखुमादेविवर विठ्ठलु नाहीं ॥ ४ ॥

३५५६ परियेसी गव्हारा सादर। कर्मे निर्वंश झाले सगर। भिल्लें विंधिलें शारंगधर। जाला पुरंदर सहस्र नयन ॥ १ ॥ कर्मे मन्मथ जालासे राख। कर्मे चंद्रासी घडला दोष। कर्मे भार वाहति कूर्म-शेष। कर्मे खरमुख ब्रह्मा देखा ॥ २ ॥ कर्मे वासुकी लंके दिवटा। कर्मे हनुमंता उदरीं कांसोटा। कर्मे शुकदेव गर्भी कष्टा। पाताळ-वाटा बळी गेला ॥ ३ ॥ कर्मे दशरथ वियोगें मेला। कर्मे श्रीराम वनवासा गेला। कर्मे रावण क्षयो पावला। वियोग घडला सीता-देवी ॥ ४ ॥ कर्मे दुर्योधनादि रणीं नासले। कर्मे पांडव महापंथें गेले। कर्मे सिंधुजळ शोषिलें। नहुष जाला सर्प देखा ॥ ५ ॥ कर्मातें शंभु मानी आपण। किती पळसिल कर्माभेण। बापरखुमादेविवरा विठ्ठला शरण। केलीं कर्मे निवारी नारायण ॥ ६ ॥

३५५७ त्रिभुवनापरतें दाविसी दुरी। आधीं तूं आपुली शुद्धी करी। उदयो अस्तु कवणिये घरीं। पिंडा माझारीं सांग बापा ॥ १ ॥ जागृतिमध्यें कवण जागत। सुषुप्तिमध्यें कवण निद्रिस्त। दोघे भ्रम-लिया स्वप्न देखत। जीव कीं मन सांग पां रे ॥ २ ॥ जागृतिवरून काढी चेतना। सुषुप्तिमध्यें रिघता ज्ञाना। दोन्ही चेईलिया जाणता स्वप्ना। मग अनुवादती कवण ॥ ३ ॥ इंद्रियें सूत्र दारें दाटलीं। जागत होतीं तीं काय झालीं। सांग पां कवणें ठायीं लपालीं। मग मिळालीं कवणें ठाईं ॥ ४ ॥ शब्दातें नाइकती श्रवण। पहात पहात डोळे झाले हीन। नासाग्रीं ठेवूनियां सुमन। परि नेणती

परिमळा ते ॥ ५ ॥ पाहे पां येथें अनुवादु काइंचा । मीमाजि हारपली खुंटली वाचा । ज्ञानदेव म्हणे सद्गुरु साचा । अढळपदीं बैसाविले ॥ ६ ॥

३५५८ वृंदावनीं वनमाळी । खेळे गोपींसी धुमाळी । मदनमेचूची नवाळी । रसाकाळीं मनोहर ॥ १ ॥ तयाचे करी पां स्मरणु । आळसु न करीं अंतःकरणु । भीतरलीया सुमनपणु । निहारण होईल ॥ २ ॥ बरवेपणाचेनि मिसें । देवातें वाणी या सौरसें । जडत्व फिटेल तया सरिसें । रसनें ऐसें चुको नको ॥ ३ ॥ तरी तूं हा देवो न्याहाळी पां । पिसाटपण फिटेल बापा । पावन होसी परम स्वरूपा । नेत्रीं ऐसा चुकों नको ॥ ४ ॥ वेगीं क्षेम देऊनियां निविजे । ऐसें दैव कैं लाहिजे । जरी तो हृदयीं ध्याईजे । तें पाविजे अंगसुखा ॥ ५ ॥ मन भ्रमर येकी हेळा । जैसें पावे पदकमळा । बापरखुमादेविवरा विठ्ठला । होईल जवळा सौरसु ॥ ६ ॥

३५५९ बरवीं पाउलें पाउलें । सुंदर सुकुमार पाउलें ॥ १ ॥ शीतळ हरिचीं पाउलें । गोमटी हरिचीं पाउलें ॥ २ ॥ शिवासी उपदेशिलें । तेंचि प्रल्हादें स्मरिलें ॥ ३ ॥ उपमन्या प्रसन्न जालें । तेंचि गजेंद्रें चिंतिलें ॥ ४ ॥ अहिल्येसि उद्धरिलें । तेंचि द्रौपदियें धांविन्नलें ॥ ५ ॥ यशोदेनें वोवाळिलें । तेंचि गोवर्धनीं रंगले ॥ ६ ॥ शकटा अंगी जे उमटले । तेंचि बाळिपृष्ठीं शोभलें ॥ ७ ॥ शिव शक्तिप्रती कथिलें । धर्मराजें तें पूजिलें ॥ ८ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलें । तें विटेवरी दाविलें ॥ ९ ॥

३५६० दीप दीपिका शशी तारा होतुका कोटिवरी रे । परी न सरे निशि नुगवे दिवसु दिनकरनाथें जियापरी रे ॥ १ ॥ नुद्धरिजे नुद्धरिजे नुद्धरिजे गोपाळेविण नुद्धरिजे ॥ धृ० ॥ नगर भ्रमतां जन्म जावो परि प्रवेशु एक्या द्वारें रे । तैसा यजिजो भजिजो पुजिजो परि उकलु नंदाकुमरूरे ॥ २ ॥ सर्वावयवीं शरीर सांग परि विरहित एका

जिवेंरें । तैसा धिक् तो श्रोता धिक् तो वक्ता जो वाळिला विठ्ठलदेवें रे ॥ ३ ॥ गळित शिर हें कलेवर रे । उदकेंविण सरिता भयंकर रे । रविशशीविण अंबर तैसें हरिवीण जिणें तें असार रे ॥४॥ अंतःकरणीं रुक्मिणीरमणु परि त्या श्वपचाहि बंधन न घडे न घडे न घडे रे। येरु यति होका भलतैसा परि तो भावाभिहानि न सुटे न सुटे न सुटे रे॥५॥ शिखिपक्षी पत्रीं डोळे जेवीं अकाळ जळद पटळेरे। तैसीं गोकुळ पाळक बाळेंविण कर्मे सकळ विफळ रे ॥ ६ ॥ यम नियम प्राणायाम प्रत्याहार हे सकळ उपाय परि अपाय रे। जंव तमाळनीळ घनःसांवळा हृदयीं ठाण मांडुनि न राहे रे ॥ ७ ॥ मी उत्तम पैल हीनु भूतीं द्वेषाद्वेष ठेलेरें । केलेनि कर्मे उफकां निपजे सुख तें दुरी ठेलें रे ॥ ८ ॥ आतां असोत हे भेदाभेद आम्हीं असो एक्या बोधेंरे । बापरखुमादेविवरु विठ्ठल निवृत्ती मुनिराय प्रसादें रे ॥ ९ ॥

३५६१ मलयानिळ शीतळू पालवीं नये गाळूं । सुमनाचा परिमळु गुंफितां नये ॥ १ ॥ तैसा जाणा सर्वेश्वरु म्हणों नये साना-थोरु । स्वरूपाचा निर्धारु कवण जाणे ॥ २ ॥ मोतियाचें पाणी भरतां नये वो रांजणी । गगनासी गवसणी घालितां नये ॥ ३ ॥ कापुराचें कांडण काढितां नये आड कण । साखरेचें गोडपण पाखडतां नये ॥ ४ ॥ डोळियांतील बाहुली करूं नये वो वेगळी । सखी म्हणुनि साउली धरितां नये ॥ ५ ॥ विठ्ठलरखुमाईचे भांडणीं कोण करी बुझावणी । निवृत्तीचे चरणीं शरण ज्ञानदेव ॥ ६ ॥

३५६२ ये सांतें आलिया वोळंगा सारंगधरु । नाहीं तरी संसारु वायां जाईल रया ॥ १ ॥ कवणाचे मायबाप कवणाचें गणगोत । मृगजळवत् वायां जाईल रया ॥ २ ॥ विषयाचें समसुख वेगडाची बाहुली । अभ्राची साउली जाईल रया ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे पाहतां पाहिलें । स्वप्नींचें चेईलें जाईल रया ॥ ४ ॥

३५६३ रुणुझुणु रुणुझुणु रे भ्रमरा । सांडी तूं अवगुणुरे भ्रमरा

॥ १ ॥ चरणकमळदळ रे भ्रमरा । भोगी तूं निश्चळु रे भ्रमरा ॥ २॥ सुमन सुगंधुरे भोवरा । परिमळ विद्गदुरे भोवरा ॥ ३ ॥ सौभाग्य सुंदरु रे भ्रमरा । बापरखुमादेवीवरु रे भ्रमरा ॥ ४ ॥

३५६४ आनंदुरे आजि आनंदुरे । सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदु रे॥ १ ॥ एक दोन तीन चार पांच सहा । इतुके विचारूनि मग परमानंदीं रहा ॥ २ ॥ सातवा अवतार आठवा वेळोवेळा । बापरखुमादेवीवरु विट्ठलु जवळा ॥ ३ ॥

३५६५ आपीं आप माये तेजीं तेज समाये । पवनीं पवन माये पृथ्वी जाये ॥ १ ॥ हंस कोठें गेला तूं पाहीं विसरला । भ्रमेंचि भुलला कोहं शब्दें ॥ २ ॥ सांडीं तूं रे जाती होई रे विजाती । येणें रूपें समाप्ती प्रपंचाची ॥ ३ ॥ ज्ञानदेवा घर विठ्ठल आचार । वेगीं पर पार हंस पावे ॥ ४ ॥

३५६६ मन मुरे मग जें उरे । तें तूं कां रे सेविासिना ॥ १ ॥ दिसतें परि न धरवे हातें । तें संतातें पुसावें ॥ २ ॥ तेथींची खुण विरुळा जाणे । निवृत्तीप्रसादें ज्ञानदेवो ह्मणे ॥ ३ ॥

३५६७ निर्गुणाची वार्ता सगुणीं मांडिली । सगुण निर्गुण दोन्ही एकरूपा आली ॥ १ ॥ सगुण नव्हे तें निर्गुण नव्हे । गुरुमुखें चोजवे जाणितलें पां ॥ २ ॥ रखुमादेवीवरु साकारु निराकारु नव्हे । कांहीं नहोनि होये तोचि बाईये वो ॥ ३ ॥

३५६८ चौदा विद्या जरी पूर्ण अभ्यासिले । व्यर्थचि जाहले ज्ञानेविण ॥ १ ॥ तीन वीस चारी कळा अनुभविले । व्यर्थचि जाहले ज्ञानेंवीण ॥ २ ॥ अष्टांगादि योग प्रयासें जोडले । व्यर्थचि जाहले ज्ञानेंवीण ॥ ३ ॥ कर्म धर्म क्रिया नाना आचरले । व्यर्थचि जाहले ज्ञानेंवीण ॥ ४ ॥ ज्ञानेश्वर म्हणे ब्रह्म साधियेलें । कीर आथियले ज्ञानेंवीण ॥ ५ ॥

३५६९ मुक्ति पावावया करिजे हरिभक्ति । तरीच विरक्ति प्रगटेल

॥ १ ॥ विरक्ति विषयीं होतांचि विचार । नित्य हे नेश्वर ओळखती ॥ २ ॥ तेव्हां आत्मज्ञान अनुभव होय । अविद्यत्व जाय जीवरूप ॥ ३ ॥ शांति क्षमा दया तिष्ठति सहज । न दिसे दृश्य काज जना-माजीं ॥ ४ ॥ गुरुकृपाद्वारें लाहिजे पैं सिद्धी । बोलिला त्रिशुद्धि ज्ञानेश्वर ॥ ५ ॥

३५७० श्रवणें कीर्तनें झाले ते पावन । सनकादिक जाण परम भक्त ॥ १ ॥ झाली ते विश्रांति याचकां सकळां । जीवीं जीवन-कळा श्रीमूर्तिरया ॥ २ ॥ पादसेवनें अक्रूर जाला ब्रह्मरूप । प्रत्यक्ष स्वरूप गोविंदाचें ॥ ३ ॥ सख्यपणें अर्जुन नरनारायण । सृष्टी जना-र्दन एकरूप ॥ ४ ॥ दास्यत्व निकट हनुमंतें केलें । म्हणोनि देखिले रामचरण ॥ ५ ॥ बळि आणि भीष्म प्रल्हाद नारद । बिभीषणा-वरद चंद्रार्क ॥ ६ ॥ व्यास आणि वासिष्ठ वाल्मिकादिक । आणि पुंडलिक शिरोमणी ॥ ७ ॥ शुकादिक योगी रंगले श्रीरंगीं । परि-क्षितीचे अंगीं ठसावलें ॥ ८ ॥ उद्धव यादव आणि ते गोपाळ । गोपिकांचा मेळ ब्रह्मरूप ॥ ९ ॥ अनंत भक्तराशी तरले वानर । ज्ञान-देवा घर चिदानंदीं ॥ १० ॥

३५७१ सोळा कळि चंद्र पूर्णिमे पूर्ण बोधु । संतजनां उद्बोधु सागरन्यायें ॥ १ ॥ नित्यता पूर्णिमा हृदयीं चंद्रमा । आलिंगन मेघः-शामा देतु आहे ॥ २ ॥ ज्ञानदेवा मोहो निःशेष निर्वाहो । रूपीं रूप सोहंहो एका तेजें ॥ ३ ॥

३५७२ मी देही म्हणतां ब्रह्महत्त्या कोटी । घेऊनियां पाठीं थाप-टिती ॥ १ ॥ शुद्ध ब्रम्हीं कैशी कल्पना आरोपी । तोचि एक पापी जगीं होय ॥ २ ॥ नाथिलें अज्ञान करूनि अनंता । केविं मोक्षपंथा जाईलजे पां ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे दिव्य मी देईन । सद्गुरूचि आण स्वयंब्रह्म ॥ ४ ॥

३५७३ सुखाची आवडी घे कां रे गोविंदीं । चित्त हें आनंदीं

ठेऊनियां ॥ १ ॥ मनाची मोहर लावा कीरे नामीं । मनोरथ कामीं गुंतुं नका ॥ २ ॥ अकळित काळ जंव आहे दूरी । तंव तूं श्रीहरी चिंत वेगीं ॥ ३ ॥ देहाचा दीपक जंव आहे देहीं । तंव तो निवडूनी घेईं नीक ॥ ४ ॥ निवृत्ति सोपान ज्ञानदेव म्हणे । श्रीगुरु ही खूण बुझेतीना ॥ ५ ॥

## श्रीसोपानमहाराज

३५७४ हरि असे देहीं ह्याचि भावो खरा । वांयां तूं सैरा धांवूं नको ॥ १ ॥ धांवतां अवचटें पडशील व्यसनीं । संसार घसणीं योनिमाळे ॥ २ ॥ हरिचेंनि ध्यान निरंतर करीं । बाह्य अभ्यंतरीं एकु रामु ॥ ३ ॥ सोपान म्हणे राम नांदे सर्वांघटीं । विश्वीं जगजेठी क्षरलासे ॥ ४ ॥

३५७५ हरि नांदे देहीं ऐसा भावो आहे । परतोनि पाहें अरे जना ॥ १ ॥ परतलिया दृष्टी चैतन्याची सृष्टी । नामेंच वैकुंठीं पावे जना ॥ २ ॥ हा बोधु श्रीरंगीं अर्जुना उपदेशु । सर्व हृषीकेशु सर्वां रूपीं ॥ ३ ॥ सोपान धारणा हरि नांदे सर्वत्र । त्याचेंचि चरित्र क्षरलेंसे ॥ ४ ॥

३५७६ हरिविण भावो न धरावा पोटीं । सर्व भावें सृष्टि एका तत्त्वें ॥ १ ॥ तत्त्वतां श्रीहरी सर्वांघटीं आहे । उभारोनि बाहे वेद बोले ॥ २ ॥ हरिविण नाहीं जीवशिव पाहीं । शिवाच्याही देहीं आत्मा हरी ॥ ३ ॥ सोपान म्हणे हरीविण नाहीं तत्त्व । हरि हाचि सर्वत्र सर्वां वसे ॥ ४ ॥

३५७७ मन आधीं मुंडीं वासनेतें खंडी । विठ्ठल ब्रम्हांडीं एक आत्मा ॥ १ ॥ मन हें सोंवळें सदा शौच करी । तुज निरंतरीं हरि पावे ॥ २ ॥ विवेक वैराग्य ज्ञानाचें सौभाग्य । सोंवळा आरोग्य हरि देखा ॥ ३ ॥ सोपान नेणें सलगीचा सोंवळा । नित्य वेळोवेळां स्मरे हरी ॥ ४ ॥

३५७८ पृथ्वी सांवळी आकाश सांवळें । मन हें वोंवळें अभ-क्तांचें ॥ १ ॥ ब्रह्म हें सांवळें न देखों वोंवळें । असों खेळेमेळें इये जनीं ॥ २ ॥ ब्रह्मांड पंढरी सांवळी हे खरी । तरसी निर्धारीं एक्या नामें ॥ ३ ॥ सोपान अखंड सांवळा प्रचंड । न बोले वितंड हरी-विण ॥ ४ ॥

## श्रीमुक्ताबाई

३५७९ नामबळें देहीं असोनियां मुक्त । शांति क्षमा चित्त हरि-भजनें ॥ १ ॥ दया धरा चित्तीं सर्वभूतीं करुणा । निरंतर वासना हरिरूपीं ॥ २ ॥ माधव मुकुंद हरिनाम चित्तीं । सर्व पैं मुक्ति नाम-पाठें ॥ ३ ॥ मुक्ताईचें धन हरिनामें उच्चारु । अवघाचि संसारु मुक्त केला ॥ ४ ॥

३५८० करणें जंव कांहीं करूं जाये शेवट । तंव पडे आडवाट द्वैतभावें ॥ १ ॥ राहिलें करणें न चले पैं कर्म । हरीविण देहधर्म चुकताहे ॥ २ ॥ मोक्षालागीं उपाय करितोसि नाना । तंव साधनीं परतां पडो पाहे ॥ ३ ॥ मुक्ताई करी हरिश्रवण पाठ । तेणें मोक्षमार्ग नीट सकळ साधे ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

३५८१ हित व्हावें मनासीं । दवडा दंभ मानसीं ॥ १ ॥ अलभ्य-लाभ येईल हातां । शरण जावें पंढरीनाथा ॥ २ ॥ चित्त शुद्धि करा । न देई दुजियासी थारा ॥ ३ ॥ हेंचि शस्त्र निर्वाणीचें । सेना म्हणे धरा साचें ॥ ४ ॥

३५८२ धन कोणा कामा आलें । पहा विचारूनि भले ॥ १ ॥ ऐसें सकळ जाणती । कळोनियां आंधळे होती ॥ २ ॥ स्त्रिया पुत्र बंधु पाही । त्याचा तुझा संबंधु नाहीं ॥ ३ ॥ सखा पांडुरंगावीण । सेना म्हणे दुजा कोण ॥ ४ ॥

३५८३ कशासाठीं करितां खटपट । तप तीर्थ व्रतें अचाट ॥ १ ॥

नलगे शोधावें गिरिकानन । भावें रिघा विठ्ठला शरण ॥ २ ॥ विभां-
डक श्रृंगी तपस्वी आगळा । क्षण न लागतां रंभेनें नागविला ॥ ३ ॥
जाणोनि सेना निवांत बैसला । केशवराजा शरण रिघाला ॥ ४ ॥

३५८४ सिद्ध ब्रम्हज्ञान बोलतां नोहे वाचे । शांतवन क्रोधाचें
झालें नाहीं ॥ १ ॥ पाल्हाळ लटिका करणें तो काय । शरण पंढरी-
राया गेला नाहीं ॥ २ ॥ जंव नाहीं गेली अज्ञानाची भ्रांती । जंव
नाहीं विरक्ती बाणली आंगीं ॥३॥ जीवाची तळमळ राहिली सकळ ।
मग ब्रह्मज्ञान कळे सेना म्हणे ॥ ४ ॥

३५८५ करा हाचि विचार । तरा भवसिंधु पार ॥ १ ॥ धरा
संतांची संगती । मुखीं नाम अहोरातीं ॥ २ ॥ अजामीळ पापराशी ।
पार पावविलें त्यासी ॥ ३ ॥ नका धुरें भरूं डोळा । सेना सांगे वेळो-
वेळां ॥ ४ ॥

३५८६ माझा केला अंगिकार । काय जाणे मी पामर ॥ १॥ देव
दीनाचा दयाळा । शरणागता पाळी लळा ॥ २ ॥ प्रल्हादा कारण ।
प्रगटला नारायण ॥ ३ ॥ मिराबाईसाठीं । केवढी केली आटाआटी
॥ ४ ॥ शरण रिघा पंढरिराया । सेना न्हावी लागे पाया ॥ ५ ॥

३५८७ चिंतन चित्ताला । लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥
उन्मनी सुखांत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥ ऐसा आहे श्रेष्ठाचार ।
वेद शास्त्राचा निर्धार ॥ ३ ॥ कवटाळूनि पोटीं । सेना म्हणे सांगूं
गोष्टी ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

३५८८ जन्मला देह पोशिला सुखाचा । काय भरंवसा याचा
आहे ॥ १ ॥ एकलेंचि यावें एकलेंचि जावें । हेंचि अनुभवावें आप-
णची ॥ २ ॥ कोण हे अवघे सुखाचे संगती । अंतकाळीं होती
पाठीमोरे ॥ ३ ॥ चोखा म्हणे याचा न धरी भरंवसा । शरण जा
सर्वेशा विठोबासी ॥ ४ ॥

३३८९ नाशिवंतासाठीं करितोसी आटी। दृढ धरा कंठीं एक नाम ॥ १ ॥ भवासी तारक विठ्ठलाचि एक। नाहीं आणिक सुख येतां जातां ॥ २ ॥ एक एक योनी कोटी कोटी फेरा। नरदेहीं थारा तईंच लाभे ॥ ३ ॥ चोखा म्हणे येथें एकचि साधन। संतांसी शरण जाई सुखें ॥ ४ ॥

३५९० तुटला आयुष्याचा दोरा। येर वाउगा पसारा ॥ १ ॥ टाकोनी पळती रांडापोरें। अंतीं होती पाठीमोरे ॥ २ ॥ अवघे सुखाचे सांगाती। कोणी कामा नये अंतीं ॥ ३ ॥ चोखा म्हणे फजीतखोर। माझें माझें म्हणे घर ॥ ४ ॥

३५९१ धिक् तो आचार धिक् तो विचार। धिक् तो संसार धिक् जन्म ॥ १ ॥ धिक् ब्रह्मज्ञान वाउग्या ह्या गोष्टी। दया क्षमा पोटीं शांति नाहीं ॥ २ ॥ धिक् तें आसन जटाभार माथा। वायांचि हे कंथा धरिली जेणें ॥ ३ ॥ चोखा म्हणे धिक् जन्मला तो नर। भोगी नरक घोर अंतकाळीं ॥ ४ ॥

३५९२ जयाचियासाठीं जातो वनाप्रती। ते तों सांगाती येती बळें ॥ १ ॥ जयांचियासाठीं टाकिला संसार। ते तों बलवत्तर पाठीं येती ॥ २ ॥ जयाचिया भेणें घेतिलें कपाट। तो तेणें उद्योग लावियेला ॥ ३ ॥ चोखा म्हणे नका होऊं परदेशी। चिंती विठोबासी हृदयामाजीं ॥ ४ ॥

३५९३ सुखाचा सुखरासी पंढरीशी आहे। जावोनियां पाहे अरे जना ॥ १ ॥ अवघाचि लाभ होईल तेथींचा। न बोलवे वाचा मौनावली ॥ २ ॥ अवघियां उद्धार एकाचि दरुशनें। भुक्तिमुक्ति केणें मिळे फुका ॥ ३ ॥ प्रत्यक्ष चंद्रभागा अमृतमय साचार। जडजीवा उद्धार पाहतां दृष्टी ॥ ४ ॥ चोखा म्हणे आनंदें नाचा महाद्वारीं। वाचे हरी हरी म्हणा मुखें ॥ ५ ॥

३५९४ असोनि नसणें या नांव स्वार्थ। येथेंचि परमार्थ सुखी

होय ॥ १ ॥ स्वार्थ परमार्थ आपुलेचि देहीं । अनुभवोनि पाहीं तुझा तूंचि ॥ २ ॥ सुख दुःख दोन्ही वाहूं नको ओझें । मी आणि माझें परतें सारी ॥ ३ ॥ चोखा म्हणे तोचि योगियांचा राणा । जीहीं या खुणा अनुभविल्या ॥ ४ ॥

३५९५ पुंडलिकें सुख दाखविलें लोका । विठ्ठलनाम नौका तारावया ॥ १ ॥ जाय पंढरीसी जाय पंढरीसी । पाहे विठोबासी डोळाभरी ॥ २ ॥ अवघा पर्वकाळ तयाचिये पायीं । नको आणिके ठायीं जाऊं वांयां ॥ ३ ॥ चोखा म्हणे ऐसा लाभ बांधा गांठीं । जावोनियां मिठी पायीं घाला ॥ ४ ॥

३५९६ एकांतिं बैसोनि करी गुजगोष्टी । धरोनि हनुवटी बुझावित ॥ १ ॥ नको बा मानूं संसाराचा सीण । तुज एक खूण सांगतों मी ॥ २ ॥ होणार तें होय न होणार तें न होय । सुखदुःख पाहे कर्माधिन ॥ ३ ॥ देव म्हणे चोख्या नको मानूं शीण । तुज माझी आण भक्तराया ॥ ४ ॥

३५९७ कासया मानिसी दुःखाचे पर्वत । पुरवीन हेत सर्व तुझा ॥ १ ॥ महाद्वारीं सुख सुखाची जे राशी । ते नामयासी प्राप्त झालें ॥ २ ॥ त्या सुखाचा अधिकारी तुज मी करीन । दृष्टी हे ठेवीन तुजवरी ॥ ३ ॥ तूं माझा प्राण जिवाचा आवडता । तुज मी तत्वतां न विसंबें ॥ ४ ॥ चोखा म्हणे देवा पुरवी माझा ळळा । न विसंबे दयाळा मजलागीं ॥ ५ ॥

३५९८ माकडाचे परी हालविती मान । दावी थोरपण जगामध्यें ॥ १ ॥ स्वहिता मुकले स्वहिता मुकले । वळें झांकी डोळे नाक धरी ॥ २ ॥ माळा आणि मुद्रा दाविताती सोंग । डोलविती अंग रंग नाहीं ॥ ३ ॥ पोटाचा पोसणा विटंबना करी । भीक दारोदारीं मागतसे ॥ ४ ॥ चोखा म्हणे ऐसा जगामध्यें भोंदू । तया कोण साधु म्हणे देवा ॥ ५ ॥

३५९९ साधन तें एक जगासी प्रमाण। परद्वारा परधन वमन जैसें ॥ १ ॥ ऐसा ज्याचा भाव तोचि एक साधु। येर अवघे भोंदु जगामाजीं ॥ २ ॥ काम आणि क्रोध जिरवोनी अंतरीं। वाचे हरी हरी जप करी ॥ ३ ॥ आन वासना विराली कल्पना। शांति क्षमा ह्या जाणा अंगीं वसे ॥ ४ ॥ चोखा म्हणे याचा भार वाही देव। ऐसा ज्याचा भाव एकविध ॥ ५ ॥

३६०० सुखाचि सुखरासी आम्हांशी बोळली। ती गाय देखिली पंढरीये ॥ १ ॥ ज्ञानदेवा फावली नामदेवा लाधली। प्रेमें पान्हा घाली भाविकांसी ॥ २ ॥ गोरा आणि सांवता परिसा भागवत। वासुरें पाजित आवडीनें ॥ ३ ॥ चोखा म्हणे गाय ती पंढरीये आहे। एक वेळां पाहे अरे जना ॥ ४ ॥

३६०१ असोनि नसणें संसाराचे ठाईं। हाचि बोध पाहीं मना घ्यावा ॥ १ ॥ संतांची संगती नामाची आवडी। रिकामी अर्ध घडी जावों नेदी ॥ २ ॥ काम क्रोध सुनेपरी करीं दूर। सहपरिवारीं दवडीं बापा ॥ ३ ॥ चोखा म्हणे सुख आपेआप घरा। नाहीं तरी फजीतखोरा जासी वांयां ॥ ४ ॥

३६०२ शुद्ध चोखा मेळा। करी नामाचा सोहळा ॥ १ ॥ मी यातिहीन महार। पूर्वीं निळाचा अवतार ॥ २ ॥ कृष्ण निंदा घडली होती। म्हणोनी महार जन्म प्राप्ती ॥ ३ ॥ चोखा म्हणे विटाळ। आम्हां पूर्वींचें हें फळ ॥ ४ ॥

## श्रीनरहरी सोनार

३६०३ ऐरावती बहु थोर। त्याला अंकुशाचा मार ॥ १ ॥ व्याघ्र बहु भयंकर। त्याला सांपळा हो थोर ॥ २ ॥ सर्पविष हो विखार। मंत्रवल्ली केली थोर ॥ ३ ॥ देह जठराग्नी भारी। अन्नपाणी शांत करी ॥ ४ ॥ गुरु गेबीनाथ। नरहरी दास हा अंकित ॥ ५ ॥

# पाईक अभंग

## श्रीतुकाराममहाराज

३६०४ पाईकपणें जोतिला सिद्धांत । शूर धरी मात वचन चित्तीं ॥ १ ॥ पाईकीवांचून नव्हे कधीं सुख । प्रजांमध्यें दुःख न सरे पीडा ॥ २ ॥ तारे व्हावें पाईक जिवाचे उदार । सकळ त्यांचा भार स्वामी वाहे ॥ ३ ॥ पाईकीचें सुख जयां नाहीं ठावें । धिग त्यांनीं ज्यावें धायांविण ॥ ४ ॥ तुका म्हणे एका क्षणाचा करार । पाईक अपार सुख भोगी ॥ ५ ॥

३६०५ पाईकीचें सुख पाईकासी ठावें । म्हणोनियां जीवें केली साटी ॥ १ ॥ येतां गोळ्या बाण साहिले भडिमार । वर्षतां अपार वृष्टी वरी ॥ २ ॥ स्वामी पुढें व्हावें पडतां भांडण । मग त्या मंडण शोभा दावी ॥ ३ ॥ पाईकांनीं सुख भोगिलें अपार । शूर आणि धीर अंतर्बाहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे या सिद्धांताच्या खुणा । जाणे तो शहाणा करी तो भोगी ॥ ५ ॥

३६०६ पाईक तो जाणे पाइकीचा भाव । लागबग ठाव चोर वाट ॥ १ ॥ आपणां राखोनी ठकावें आणीक । घ्यावें सकळीक हरोनियां ॥ २ ॥ येऊं नेदी लाग लागों नेदी माग । पाईक त्या जग स्वामी मानी ॥ ३ ॥ ऐसें जन केलें पाइकें पाईक । जया कोणी भीक न घालिती ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसे जयाचे पाईक । बळिया तो नाईक त्रैलोकींचा ॥ ५ ॥

३६०७ पाईकांनीं पंथ चालविल्या वाटा । पारख्याचा सांटा मोडोनियां ॥ १ ॥ पारखिये ठायीं घेऊनियां खाण । आपलें तें जन राखियेलें ॥ २ ॥ आधारेंवीण जें बोलतां चावळे । आपलें तें कळे नव्हे ऐसें ॥ ३ ॥ सांडितां मारग मारिती पाईक । आणिकांसी शीक लागावया ॥ ४ ॥ तुका म्हणे विश्वा घेऊनी विश्वास । पाईक तयांस सुख देती ॥ ५ ॥

३६०८ पाईक तो प्रजा राखोनियां कुळ। पारखिया मूळ छेदी दुष्टा ॥ १ ॥ तो एक पाईक पाईकां नाईक। भाव सकळीक स्वामिकाजीं ॥ २ ॥ तृणवत तनु सोनें ज्या पाषाण। पाईक त्या भिन्न नाहीं स्वामी ॥ ३ ॥ विश्वासावांचूनी पाईकासी मोल। नाहीं मिथ्या बोल बोलिलिया ॥ ४ ॥ तुका म्हणे नये स्वामी उणेपण। पाईक जतन करी त्यासी ॥ ५ ॥

३६०९ धनी ज्या पाईका मानितो आपण। तया भितें जन सकळीक ॥ १ ॥ जिवाचे उदार शोभती पाईक। मिरवती नाईक मुकुटमणी ॥ २ ॥ आपुलिया सत्ता स्वामीचें वैभव। भोगिती गौरव सकळ सुख ॥ ३ ॥ कमाईचीं हीणें पडिलीं उदंड। नाहीं तया खंड येती जाती ॥ ४ ॥ तुका म्हणे तरी पाईकीच भली। थोडी बहुत केली स्वामि सेवा ॥ ५ ॥

३६१० पाईकपणें खरा मुशारा। पाईक तो खरा पाइकीनें ॥ १ ॥ पाईक तो जाणे मारितें अंग। पाइकासी भंग नाहीं तया ॥ २ ॥ एक दोहीं घरीं घेतलें खाणें। पाईक तो पणें निवडला ॥ ३ ॥ करूनी कारण स्वामी यश द्यावें। पाईक त्या नांवें खरेपणा ॥ ४॥ तुका म्हणे ठाव पाईकां निराळा। नाहीं स्वामीस्थळा गेल्याविण ॥ ५ ॥

३६११ उंच नीच कैसी पाईकाची ओळी। कोण गांढे बळी निवडिले ॥ १ ॥ स्वामिकाजीं एक सर्वस्वें तत्पर। एक ते कुचर आशाबद्ध ॥ २ ॥ प्रसंगावांचूनी आणिती आविर्भाव। पाईक तो नांव मिरवी वायां ॥ ३ ॥ गणपतीचे एक उंच निंच फार। तयामध्यें शूर विरळा थोडे ॥ ४ ॥ तुका म्हणे स्वामी जाणे त्याचा मान। पाईक पाहोन मोल करी ॥ ५ ॥

३६१२ एकाच स्वामीचे पाईक सकळ। जैसें तैसें बळ मोल तया ॥ १ ॥ स्वामिपदीं एकां ठाव उंच स्थळीं। एक तीं निराळीं जवळी दूरी ॥ २ ॥ हीन कमाईचा हीन आन ठाव। उंचा सर्व भाव

उंच पद ॥ ३ ॥ पाईकपणें तो सर्वत्र सरता । चांग तरी परता गांढ्या चाव ॥ ४ ॥ तुका म्हणे मरण आहे यां सकळां । भेणें अवकळा अभयें मोल ॥ ५ ॥

३६१३ प्रजी तो पाईक ओळीचा नाईक । पोटासाठीं एक जैसीं तैसीं ॥ १ ॥ आगळें पाऊल आणिकांसी तरी । पळती माघारीं तोडिजेतीं ॥ २ ॥ पाठीवरी घाय म्हणती फटमर । घडां अंगें शूर मान पावे ॥ ३ ॥ घेईल दरवडा देहा तो पाईक । मारी सकळीक सर्व हरी ॥ ४ ॥ तुका म्हणे नव्हे बोलाचें कारण । कमाईचा पण सिद्धी पावे ॥ ५ ॥

३६१४ जातीचा पाईक ओळखे पाईका । आदर तो एका त्याचे ठायीं ॥ १ ॥ धारितील पोटासाठीं हातियेरें । कळती तीं खरें वेठी-चीसीं ॥ २ ॥ जातीचें तें असे खरें धायडाय । पारखिया काय पाशीं लोपे ॥ ३ ॥ तुका म्हणे नमूं देव म्हूण जना । जालियांच्या खुणा जाणतसों ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

३६१५ शूर धीर स्वामीपणें । पाईक पेणें शोभे त्या ॥ १ ॥ नेणेचि कधीं दुजा ठाव । एक भाव स्वामीकाजीं ॥ २ ॥ जाईल तरी जावो प्राण । परि स्वामीस नये उणेपण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं उदार । मिरविती बडिवार पाइकीचा ॥ ४ ॥

३६१६ याची सत्ता स्वामीवरी । ऐसे ते बळी पाईक ॥ १ ॥ उदार धीर एक मनें । स्वामीकार्या देह देणें ॥ २ ॥ न धरिती कांहीं आशा । म्हणोनि सर्वेशा पात्र होती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पाईक । मुकुटमणी स्वामिया एक ॥ ४ ॥

३६१७ कांहींच सांकडें न घालीती वायां । स्वामी सन्मुख पाया सरते होती ॥ १ ॥ ऐसे ते पाईक मुकुटमणी देहीं । स्वामी त्यांची पद्वी मानी जगीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं तया मोल नाहीं । स्वामी देतो कांहीं न घेती ते ॥ ३ ॥

३६१८ शोभले उदार पाईकपणें देहीं। हेतु दुजा नाहीं सेवेविण ॥ १ ॥ स्वामी काजीं एक न करी आळस। देहासी उदास सर्वभावें ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सर्वभावें प्रमाण। स्वामी आपुले आधीन केला तिहीं ॥ ३ ॥

३६१९ नेणती जाणती होती आणि जाती। पाइकीची ज्योती ब्रह्मरूप ॥ १ ॥ म्हणोनि जडलें सेवेलागीं मन। नव्हेचि उद्विग्न चित्त कधीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं प्रेमाचें भांडार। पाईकपणें उदार शोभे जगीं ॥ ३ ॥

३६२० आणीक पाईक अनेक स्वामीचे। कार्य कारण साचें जाणती ते ॥ १ ॥ स्वामीचें जैसें मन तैसी पाइकाची सेवा। हें तो माझे जीवा नावडेची ॥ २ ॥ एकाजनार्दनीं स्वामी माझा बळी। पाइकपणें रळी करीन मोर्चा ॥ ३ ॥

३६२१ देह दान देऊनि उदार मिरविले। स्वामीयासी केलें आपुलें घर ॥ १ ॥ घेऊनि करवत आपुलेनी हातें। शरीर दोन भागातें केलें जिहीं ॥ २ ॥ देऊनि राज्य धन जाहलेसे भिकारी। भिक्षा निरंतरीं मागताती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसे पाईक भले। स्वामीस मानले सर्वभावें ॥ ४ ॥

३६२२ धन मान राज्य न धरितां आशा। तरीच स्वामीदशा पावती ते ॥ १ ॥ पाईकपण गेलें स्वामी होऊनि ठेले। परि नाहीं विसरले सेवेलागीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं पाइकीं ठाव। देहींच तो देव हातीं लागे ॥ ३ ॥

३६२३ एकपणें एक एकपणें एक। एकाचें अनेक मिरवती ॥ १ ॥ तया नाहीं ठाव दिसेना ती गती। पाईकपणें वस्ती कोठें नाहीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गेले दोन्ही ठाव। स्वामी ना देव नाहीं तया ॥ ३ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

३६२४ जालोनि पाइकें गोवीपण जिंकें। परि स्वामिया सेवक साचा होय ॥१॥ एकएकेविणें स्वामीसेवकपण। मिरविती हे खुण स्वामी जाणें ॥ २ ॥ पाइक काय स्वामी स्वामिया काय पाइक। असतां एकेएक दोन्ही नव्हती ॥ ३ ॥ स्वामीचें काज पाईकपणें वोज। करितां होय चोज पैं गा ॥ ४ ॥ बापरखुमादेवीवरा विठ्ठलासी ओळगतां। पाइक स्वामी असतां निवृत्ति ऐसा ॥ ५ ॥

३६२५ पाईका मोल नाहीं देसील तें काई। पाइक न मागे कांहीं भोगजात ॥ १ ॥ देसील तें काई न देसील तें काई। पाइक न मागे कांहीं तुजवांचोनि ॥ २ ॥ बापरखुमादेवीवर विठ्ठलाच्या पायीं। पाईका मोल नाहीं तैसें झालें ॥ ३ ॥

३६२६ आणिक पाइक मोलाचे तुझे। तैसें नव्हे माझें पाईकपण ॥ १ ॥ न मागे कहीं मोल जीवन भातें। तें द्यावें मातें पाईकपण ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरा गोसांविया। पाईकपण मी पायां जोडलेंती ॥ ३ ॥

३६२७ देह दंडूनि पाइक अनुसरला जीवें। तंव स्वामियाचें गूज हातासी आलें ॥ १ ॥ पाइकपण गेलें स्वामी होऊनि ठेलें। परि नाहीं विसरलें स्वामियातें ॥ २ ॥ पाईकपण ऐसा आठवुचि नाहीं। स्वामी वांचुनि कांहीं जाणेचिना ॥ ३ ॥ बाप रखुमादेवीवरु विठोजी उदारु। पाइक तो साचारु स्वामी केला ॥ ४ ॥

---

# श्रीकृष्णमाहात्म्य

## श्रीएकनाथमहाराज

३६२८ ॐ कारा परतें निर्गुणा आरुतें। भक्तांसी निरुतें गोकुळीं वसे ॥ १ ॥ सांवळें सगुण चैतन्य परिपूर्ण। संवगडियांसी जाण

क्रीडा करी ॥ २ ॥ आदि मध्य अंत न कळे ज्या रूपाचा । तोचि बाळ नंदाचा म्हणताती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वेगळाचि पाही । हृदयीं धरूनी राही सांवळियासी ॥ ४ ॥

३६२९ निर्गुण सगुण श्रुतीसी वेगळें । तें रूप सांवळें गोकुळीं वसे ॥ १ ॥ डोळियांची धणी पाहतां न पुरे । तयालागीं झुरे चित्त माझें ॥ २ ॥ वेडावलीं दरुशनें भांडती अखंड । वेदाचें तें तोंड स्तब्ध जाहलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सांवळें सगुण । खेळतसे जाण वृंदावनीं ॥ ४ ॥

३६३० ब्रह्मादिकां न कळे तें रूप सुंदर । गोकुळीं परिकर नंदाघरीं ॥ १ ॥ रांगणा रांगतु बाळलीले खेळतु । दुडदुडां धांवतु गायीपाठीं ॥ २ ॥ गौळणीचे घरीं चोरूनि लोणी खाये । पिलंगतां जाये हातीं न लगे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं त्रैलोक्या व्यापक । गाई राखे कौतुक गौळियांसी ॥ ४ ॥

३६३१ जाणते नेणते होतु ब्रह्मज्ञानी । तयांचे तो ध्यानीं नातुडेचि ॥ १ ॥ सुलभ सोपारा गोकुळा माझारीं । घरोघरीं चोरी खाय लोणी ॥ २ ॥ न कळे ब्रह्मादिकां करितां लाघव । योगियांची धांव कुंठे जेथें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चेंडुवाचे मिसें । उडी घालितसे डोहामाजीं ॥ ४ ॥

३६३२ विश्वाचा व्यापक विश्वंभर साक्षी । नये अनुमानासी वेदशास्त्रां ॥ १ ॥ नवल गे माय नवल गे माय । चोरूनियां खाय नवनीत ॥ २ ॥ धरिती बांधिती गौळणी बाळा । वोढोनी सकळां आणिताती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं येतो काकुलती । न कळे ज्याची गति वेदशास्त्रां ॥ ४ ॥

३६३३ मेळवी सवंगडे खेळतसे विंदीं । शोभतसे मांदी गोपाळांची ॥ १ ॥ सांवळा सुंदर वैजयंती हार । चिन्मय परिकर पीतांबर ॥ २ ॥ मुगुट कुंडलें चंदनाचा टिळा । झळके हृदयस्थळां कौस्तुभ-

मणी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वेधलेंसे मन । नाहीं भेद भिन्न गौळणींसी ॥ ४ ॥

३६३४ मिळती सकळा गौळणी ते बाळा । लक्ष लाविती डोळा कृष्णमुखा ॥ १ ॥ धन्य प्रेम तयांचें काय वानूं वाचे । न कळे पुण्य त्यांचें आगम निगमां ॥ २ ॥ आदरें गृहा नेती मुख पैं धुताती । जेवूं पैं घालिती दहींभात ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं प्रेमाची पैं लाठी । धांवुनी इटी मिठी घेती बळें ॥ ४ ॥

३६३५ जगाचें जीवन ब्रह्म परिपूर्ण । जनीं जनार्दन व्यापक तो ॥ १ ॥ तो हरि गोकुळीं रांगणा नंदाघरीं । गौळणी त्या सुंदरी खेळविती ॥ २ ॥ वेद गीतीं गाती शास्त्रें विवादती । खुंटलीसे मति शेषादिकांची ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चहूं वाचांपरता । उच्छिष्ट सर्वथा भक्षी सुखें ॥ ४ ॥

३६३६ लक्षाचें जें लक्ष तो दिसे अलक्ष । तो असे प्रत्यक्ष नंदाघरीं ॥ १ ॥ बाळरूप गोजिरें बाळे वांकी साजिरे । पाहतां दृष्टीचें पुरे कोड सर्व ॥ २ ॥ ध्यानाचें निज ध्यान मनाचें अधिष्ठान । व्यापक विधान महेशाचें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शब्दासी नातुडे । गौळणी वाडेकोडें जेवविती ॥ ४ ॥

३६३७ तिही त्रिभुवनीं ज्याची सत्ता वाहे । तो चोरी करिताहे घरोघरीं ॥ १ ॥ न कळे न कळे लाघव तयाचें । ब्रह्मादिक साचे वेडावती ॥ २ ॥ वेद शास्त्र श्रुती कुंठित पैं होती । तया गौळणी बांधिती धरूनियां ॥ ३ ॥ योग मुद्रा साधन योगी साधिताती । तयांसि नोहे प्राप्ती हेंचि रूप ॥ ४ ॥ तें बाळरूप घेऊनि वोसंगा । हालविती पैं गा बाळकृष्णा ॥ ५ ॥ जयाचेनि होय तृप्ति पैं सर्वांसी । तो मागे यशोदेसी दहींभात ॥ ६ ॥ दहींभात लोणी खाउनी न धाय । घरोघरीं जाय चोरावया ॥ ७ ॥ एकाजनार्दनीं न कळे वैभव । दावितसे भाव भोळ्या जनां ॥ ८ ॥

३६३८ योगी शिणताती साधन कपाटीं। तया नोहे भेटी कांहीं केल्या ॥ १ ॥ तो हरी गोकुळीं बाळवेषें खेळे। पुरती सकळ मनोरथ ॥ २ ॥ गोपिका तयासी कडेवरी घेती। बाळाढुला म्हणती माझें माझें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जया जैसा हेत। तैसा पुरवीत देवराव ॥ ४ ॥

३६३९ जगाचें जीवन भक्तांचें मोहन। सगुण निर्गुण ठाण शोभतसे ॥ १ ॥ तें रूप गोकुळीं नंदाचिये घरीं। यशोदे मांडिवरी खेळतसे ॥ २ ॥ इंद्रादि शंकर ध्यान धरती ज्याचें। तो लोणी चोरी गौळ्याचें घरोघरीं ॥ ३ ॥ सर्वांवरी चाले जयाची ते सत्ता। त्यासी बागुल आला म्हणतां उगा राहे ॥ ४ ॥ एकाचि पदें बळी पाताळीं घातला। तो उखळीं बांधिला यशोदेनें ॥ ५ ॥ जयाचेनी तृप्त त्रिभुवन सगळें। तो लोणीयाचे गोळे मागून खाय ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं भरुनि उरला। तो असे संचला विटेवरी ॥ ७ ॥

३६४० अर्जुनाचे रथीं श्रमला जगजेठी। म्हणोनी कर ठेउनी कटीं उभा येथें ॥ १ ॥ धरुनी गोवर्धन उभा सप्तदिन। म्हणोनी कर जघन ठेउनी उभा ॥ २ ॥ कंसादी मल्ल मारी जरासंध। ते चरणारविंद उभे विटे ॥ ३ ॥ धर्माघरीं उच्छिष्टपात्र काढी करें। म्हणोनी श्रमें निर्धारें ठेविले कटीं कर ॥ ४ ॥ पुंडलीक भक्त देखोनी तल्लीन झाला। एकाजनार्दनीं ठेविला कटीं कर ॥ ५ ॥

---

# गौळणी

## श्रीतुकाराममहाराज

३६४१ मैं भुली घरजानी बाट। गोरस बेचन आयों हाट ॥ १ ॥ कान्हारे मनमोहन लाल। सबही बिसरूं देखें गोपाल ॥ २ ॥ काहां पग डारूं देख अनेरा। देखें तो सब वोहिन घेरा ॥ ३ ॥ हुं तो थकित भईरे तुका। भागा रे सब मनका धोका ॥ ४ ॥

३६४२ हरिबिन रहियां न जाये जिहिरा । कबकी ठाडी देखें राहा ॥ १॥ क्या मेरे लाल कवन चुकी भई । क्या मोहिपासिती बेर लगाई ॥२॥ कोई सखी हरी जावे बुलावन । बारहि डारूं उसपर तन ॥ ३ ॥ तुका प्रभु कब देखें पाऊं । पासीं आऊं फेर न जाऊं ॥ ४ ॥

३६४३ होतें बहुत दिवस मानसीं । आजी नवस फळले नवसीं । व्हावी भेटी ते जाली गोविंदासीं । आतां सेवा करीन निश्चयेसीं वो ॥ १ ॥ स्थिर स्थिर मजाचि साहे करा । बहु कष्ट सोसिल्या येरझारा । येथें आड मज न सहावे वारा । देउनि कपाट आलें तें दुसरें वारा वो ॥ २ ॥ मूळ सत्ता हे सायासाची जोडी । नेदी वेगळें होऊं एकी घडी । नाहीं लौकिक स्मरला आवडी । आतां येणें काळें या वो लोभें वेडी वो ॥ ३ ॥ उदयीं उदय साधिला अवकाश । निश्चिंती निश्चितीनें सावकाश । धरिये गोडी बहुत आला रस । तुका म्हणे हा मागुता न ये दिवस वो ॥ ४ ॥

३६४४ स्वयें सुखाचे झाले अनुभव । एक एकीपाशीं सांगतील भाव । अवघ्यां अवघा हा कैसा नवलाव । सर्व साक्ष तेथेंचि त्याचा जीव वो ॥१॥ आपआपणांशीं करिती नवल । परि वादावाद न संडिती बोल । एका मेघश्यामें जलधर बोल । रसीं उतावीळ हृदय सखोल वो ॥ २॥ एक विषय तो सकळांचा हरी । त्याच्या आवडीनें आवडी इतरीं । अंध बहिर हे प्रेत लोकाचारीं । त्यांची कीर्ति गाइली पुराणांतरीं वो ॥ ३ ॥ स्तुति पराविया मुखें रुचिकर । प्रीतिपात्राच्या गौरवीं आदर । परस्परें हें सादरा सादर । योग सज्जनाच्या सुखा नाहीं पार वो ॥ ४ ॥ भक्तिवल्लभ न तुटे चराचरीं । आप्त अनाप्त हे ऐशी नाहीं उरी । दुरी जवळी संचिता ऐसें धरी । रंगा रंगा ऐसें होणें लागे हरी वो ॥ ५ ॥ तुका लाधला हें उच्छिष्ट भोजन । आला बाहेरी प्रेमें वोसंडून । पडिलें कानीं त्या जीवाचें जतन । धरियेलें एका भावें हृदयीं चरण वो ॥ ६ ॥

३६४५ आजी कां वो तूं दिससी दुश्चिती । ह्मणिये काम नलगे तुझ्या चित्तीं । दिलें ठेवूं तें विसरसी हातीं । नेणों काय बैसला हरी चित्तीं वो ॥१॥ सर सर परती जालीस आतां भांड । कैसें दाखविसी जगासी या तोंड । व्याली माय ते लाजविली रांड । नाहीं थार दों ठायीं झाला खंड वो ॥२॥ होतें तैसें तें उमटलें वरी । बाह्य संपादणी अंतरींची चोरी । नाहीं मर्यादा निःसंग वावरी । मन हें गोविंदीं देह काम करी वो ॥ ३ ॥ नाहीं करीत उत्तर कोणासवें । पराधीन भोजन दिलें खावें । नाहीं अचळ सांवरावा ठावें । देखों उदासीन तुज गे देहभावें वो ॥ ४ ॥ कोठें नेणों हा फावला एकांत । सदा किलकिल भोंवतीं बहुत । दोघे एकवाट बोलावया मात । नाहीं लाज धरिली दिला हात वो ॥ ५ ॥ करी कवतुक खेळ खेळे कान्हा । दावी लाघव भांडवी सासुसुना । परा भक्ति हे शुद्ध तुम्ही जाणा । तुका म्हणे ऐसें कळों यावें या जना वो ॥ ६ ॥

३६४६ भरिला उलंडूनी रिता करी घट । मीस पाणियाचें गोविंदाची चट । चाले झडझडां उसंतूनी वाट । पाहे पाळतूनी उभा तोचि नीट वो ॥ १ ॥ चाळा लावियेला गोप गोपीनाथें । जाणे आवडीचें रूप जेथें तेथें । दावी बहुतांच्या बहुवेष पंथें । गुणातीतें खेळ मांडियेला येथें वो ॥ २ ॥ मनीं आवडे तें करावें उत्तर । कांहीं निमित्ताचा पाहोनी आधार । उगा राहें कां मारिसी कंकर । मात वाढविसी उत्तरा उत्तर वो ॥ ३ ॥ धरिली खोडी दे टाकोनिया मागें । न ये विनोद हा कामा मशीं संगें । मिठी घालीन या जीवाचिया त्यागें । नाहीं ठाउकीं पडलीं तुझीं सोंगें वो ॥ ४ ॥ सुख अंतरीचें बाह्य ठसठसी । म्हणे विनोद हा काय सांग यासी । तुज मज काय सोयरीक ऐसी । नंदनंदन या थोरपणें जासी वो ॥ ५ ॥ करी कारण तें कळों नेदी कोणा । सुख अंतरींचें बाह्य रंग जाणा । मन मिनलें रे तुका म्हणे मना । भोग अंतरींचा पावे नारायणा वो ॥ ६ ॥

राजु । गरुडवाहन चतुर्भुजु । कंठीं कौस्तुभ झळके विजु । मेघः-
शाम देखोनी ॥ २ ॥ करी सृष्टीची रचना । नाभीं जन्म चतुरानना ।
जग हें वाखाणी मदना । तें लेंकरूं तयाचें ॥ ३ ॥ कमळा विला-
सली पायीं । आर्त तुळशीचें ठायीं । ब्रह्मादिकां अवसरू नाहीं ।
तो यशोदे वोसंगा ॥ ४ ॥ उपमा द्यावी कवणे अंगा । चरणीं जन्मली
पैं गंगा । सोळा सहस्र संभोगा । नित्य न पुरती कामिनी ॥ ५ ॥
अधिष्ठान गोदातीरीं । रिद्धिसिद्धी तिष्ठती द्वारीं । भानुदास पूजा
करी । वाक्पुष्पें अनुपम्य ॥ ६ ॥

१७४१ लावण्य रूपडें पहा डोळे भरी । मूर्ति हे गोजिरी विटेवरी ॥ १ ॥ राहीरखुमाई सत्यभामा आई । गरुड हनुमंत ठायीं उभे असती ॥ २ ॥ चंद्रभागा तीर्थ पुंडलिक मुनी । दक्षणवाहिनी शोभतसे ॥ ३ ॥ वेणुनाद काला गोपाळ करिती । भानुदास तृप्ति पाहोनियां ॥ ४ ॥

१७४२ उन्मनी समाधी नाठवे मनासी । पाहतां विठोबासी सुख बहु ॥ १ ॥ आनंदी आनंद अवघा परमानंद । आनंदाचा कंद विठोबा दिसे ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहतां सांठवे रूप मनीं ॥ ३ ॥ नित्यता दिवाळी नित्यता दसरा । पाहतां साजिरा विठ्ठलदेव ॥ ४ ॥ भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

१७४३ वेदशास्त्रांचें सार । तो हा विठ्ठल विटेवर ॥ १ ॥ पुढें शोभे चंद्रभागा । स्नानें उद्धार या जगा ॥ २ ॥ पद्मतळें गोपाळपुर । भक्त आणि हरीहर ॥ ३ ॥ भानुदास जोडोनी हात । उभा सामोरा तिष्ठत ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१७४४ द्वारकेहुनी जगजेठी । आला पुंडलीकाचे भेटी । पाउलें सरळ गोमटीं । बाळ सूर्यापरी ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग । बाळरूप

हा अन्याय आमुचा । केला उच्चार घडल्या दोषांचा । झाला प्रकट स्वामी तुकयाचा वो ॥ ४ ॥

३६५० काय उणें कां करितोसी चोरी । किती सांगों तुज नाइकसी हरि । परे परता तूं पळोनी जासी दुरी । अनावर या लौकिका बाहेरी वो ॥ १ ॥ माया करुणा हे करिते बहुत । किती सोसूं या जगाचे आघात । न पुरे अवसरु हेंचि नित्यानित्य । तूंचि सोडवी करूनि स्थिर चित्त वो ॥ २ ॥ बहुत कामें मी गुंतलियें घरीं । जासी डोळा तूं चुकवूनी हरी । करितां लाग न येसी चपळ भारी । नाहीं सायासाची उरीं दिली उरी वो ॥ ३ ॥ तुज म्हणीये मी न संगें अनंता । नको जाऊं या डोळियां परता । न लगे जोडी हे तुजविण आतां । तुकया-स्वामी कान्होबा गुणभरिता वो ॥ ४ ॥

३६५१ आलियें धांवती धांवती भेट होईल म्हूण । तंव ते टळली वेळ वो माझा उरला सीण ॥ १ ॥ आतां काय करूं सांग वो मज भेटेल कैसा । हरिलागीं प्राण फुटे वो थोरी लागली आशा ॥ २ ॥ लाविला उशीर बहुतीं बहु ओढिती ओढा । सांभाळितां सांग असांग दुःख पावल्यें पीडा ॥ ३ ॥ जळो आतां संसारु वो कई शेवट पुरे । तुकयाच्या स्वामी गोपाळालागीं जीव झुरे ॥ ४ ॥

३६५२ घाली कवाड टळली वाढ राती । कामें व्यापिली कां पडिली दुश्चित्तीं । कोणे लागला गे सदैवेचे हातीं । आजी शून्य शेजे नाहीं दिसे पति वो ॥ १ ॥ बोले दूतिकेशीं राधा हें वचन । मशीं लाघव दाखवी नारायण । म्हणे कोमळ परी बहु गे निर्गुण । याशीं न बोले कळला मज पूर्ण वो ॥ २ ॥ धाडिलें गरुडा आणिलें हनुमंता । तैं पाचारिलें होउनि ये वो सीता । लाजिनली रूप नये पालटितां । जाला भीमकी आपण राम सीता वो ॥ ३ ॥ सत्यभामा दान करी नारदासी । तैं कळला वो मज हृषीकेशी । तुळे घालितां न ये कनक वो रासी । सम तुकें एक पान तुळसी हो ॥ ४ ॥ मज भुली पडली

राजु । गरुडवाहन चतुर्भुजु । कंठीं कौस्तुभ झळके विजु । मेघः-शाम देखोनी ॥ २ ॥ करी सृष्टीची रचना । नाभीं जन्म चतुरानना । जग हें वाखाणी मदना । तें लेंकरूं तयाचें ॥ ३ ॥ कमळा विलासली पायीं । आर्त तुळशीचें ठायीं । ब्रह्मादिकां अवसरू नाहीं । तो यशोदे वोसंगा ॥ ४ ॥ उपमा द्यावी कवणें अंगा । चरणीं जन्मली पें गंगा । सोळा सहस्र संभोगा । नित्य न पुरती कामिनी ॥ ५ ॥ अधिष्ठान गोदातीरीं । रिद्धिसिद्धी तिष्ठती द्वारीं । भानुदास पूजा करी । वाक्पुष्पें अनुपम्य ॥ ६ ॥

१७४१ लावण्य रूपडें पहा डोळे भरी । मूर्ति हे गोजिरी विटेवरी ॥ १ ॥ राहीरखुमाई सत्यभामा आई । गरुड हनुमंत ठायीं उभे असती ॥ २ ॥ चंद्रभागा तीर्थ पुंडलिक मुनी । दक्षणवाहिनी शोभतसे ॥ ३ ॥ वेणुनाद काला गोपाळ करिती । भानुदास तृप्ति पाहोनियां ॥ ४ ॥

१७४२ उन्मनी समाधी नाठवे मनासी । पाहतां विठोबासी सुख बहु ॥ १ ॥ आनंदी आनंद अवघा परमानंद । आनंदाचा कंद विठोबा दिसे ॥ २ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति नाठवे । पाहतां सांठवे रूप मनीं ॥ ३ ॥ नित्यता दिवाळी नित्यता दसरा । पाहतां साजिरा विठ्ठलदेव ॥ ४ ॥ भानुदास म्हणे विश्रांतीचें स्थान । विठ्ठल निधान सांपडलें ॥ ५ ॥

१७४३ वेदशास्त्रांचें सार । तो हा विठ्ठल विटेवर ॥ १ ॥ पुढें शोभे चंद्रभागा । स्नानें उद्धार या जगा ॥ २ ॥ पद्मतळें गोपाळपुर । भक्त आणि हरीहर ॥ ३ ॥ भानुदास जोडोनी हात । उभा सामोरा तिष्ठत ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

१७४४ द्वारकेहुनी जगजेठी । आला पुंडलीकाचे भेटी । पाउलें सरळ गोमटीं । बाळ सूर्यापरी ॥ १ ॥ धन्य धन्य पांडुरंग । बाळरूप

असतील घरीं । चित्त तयापासीं परी । वेगीं करोनी वोसरी । तेथें जाऊं पाहे । लाज सांडियेली वोज । नाहीं फजितीचें काज । सुख सांडोनीयां सेज । तेथ धांव घाली ॥ ४ ॥ वेधियेल्या बाळा । नरनारी या सकळां । बाळा बाळा खेळवी अबला । त्याही विसरल्या । कुमर कुमारी । नाहीं भाव हा शरीरीं । दृष्टी न फिरे माघारी । तया देखतां हे ॥ ५ ॥ वैरभाव नाहीं । आपपर कोणी कांहीं । शोक मोह दुःख ठायीं । तये निरसलीं । तुका म्हणे सुखी । केलीं आपणासारिखीं । स्वामी माझा कवतुकीं । बाळवेषें खेळे ॥ ६ ॥

३६५५ हरी तुझी कांति रे सांवळी । मी रे गोरी चांपेकळी । तुझ्या दर्शनें होईन काळी । मग हे वाळी जन मज ॥ १ ॥ उगला राहें न करी चाळा । तुज किती सांगों रे गोवळा । तुझा खडबड कांवळा । अरे नंदबाळा आलगटा ॥ २ ॥ तुझिये अंगीं घुरट घाणी बहु खासी दुध तूप लोणी । घरिंचें बाहेरील आणोनी । मी रे चांदणी सकुमार ॥ ३ ॥ मज ते हांसतील जन । धिक्कारिती मज देखोन । अंगींचें तुझें देखोनी लक्षण । मग विटंबना होईल रे ॥ ४ ॥ तुज लाज भय शंका नाहीं । मज तंव सज्जन पिशुन व्याही । आणिक मात वालूं कांहीं । कसी भीड नाहीं तुज माझी ॥ ५ ॥ वचन मोडी नेदी हात । कळलें न साहेची मात । तुकयास्वामी गोपीनाथ । जीवन्मुक्त करूनी भोगी ॥ ६ ॥

३६५६ येरे कृष्णा खुणाविती खेळें भातुकें । मिळलिया वाळा एके ठायीं कवतुकें । कळों नेदी माया त्यासीच तें ठाउकें । खेळतोसे दावी लक्षलक्ष्यापें भुकें ॥ १ ॥ अखंडित चटे त्यांनीं लावियेला कान्हा । आवडे तयाचे संकल्प वाहाती मना । काया वाचा मनें रूपीं गुंतल्या वासना । एकांताचें सुख जाती घेउनियां राना ॥ २ ॥ अवघियांचा जाणे जाला मेळासा हरी । मिळोनियां जावें तेथें तयाभीतरीं । कळों नेदी घरींच्या करीं गोवूनी चोरी । हातोहातीं नेती

परपरत्या दूरी ॥ ३ ॥ आनंदें निर्भर आपणाशीं आपण । क्रीडतील वाळा त्यजिलें पारिखें जन । एकाएकीं नाहीं तेथें दुसरें भिन्न । तुका म्हणे एका नारायणावांचून ॥ ४ ॥

३६५७ कोठें मी तुझा धरूं गेलें संग । लावियेलें जग माझ्या पाठीं ॥ १ ॥ सर सर रे परता अवगुणाच्या गोवळा । नको लावूं चाळा खोटा येथें ॥ २ ॥ रूपाच्या लावण्यें नेली चित्तवृत्ति । न देखें भोंवतीं मी ते माझी ॥ ३ ॥ तुकयाचा स्वामी माझे जीवींच बैसला । बोलींच अबोला करूनियां ॥ ४ ॥

३६५८ खेळतां मुरारी जाय सरोवरातीरीं । तंव नग्नचि नारी तेथें देखियेल्या । मांडिलें विंदान ख्याल सुखाचें संधान । अंग लपवूनी मान पिलंगत चाले ॥ १ ॥ ख्याल मांडिला रे ख्याल मांडिला रे । पायां पडतां न सोडी नेदी साउलां रे ॥ २ ॥ साड्या साउलीं पातळे गोंडे कसणिया चोळ्या । बुंथी घेउनी सकळा कळंबावरी पळे । खांदी घालुनियां करीं दृष्टि घालोनि सामोरी । बैसे पाला ओढी वरी खदखदां हांसे ॥ ३ ॥ आनंदें कल्लोळ बाळा खेळती देती उलटिया चपळ । एकी एकीहूनी म्हैस वेल सुर काडी । एकी नागविती कोडीं । नाना परीच्या विकडी खेळ मांडियेला ॥ ४ ॥ एकी आलिया बाहेरी पाहे लुगडें तंव नारी । म्हणे नाहीं नेलें चोरी काय जाणों केव्हां । केला सकळीं हाकारा तंव आलिया बाहेरा । आतां म्हणतील घरा जावें कैशापरी ॥ ५ ॥ तंव हांसे वनमाळी वरी पाहोनी सकळी । लाजे रिघालिया जळीं मागें पुढें हात । लाज राखावी गोपाळा आम्हांजणींची सकळां । काय मागसी ये वेळां देऊं गुळवाटी ॥ ६ ॥ जोडोनियां कर या गे सकळीं समोर । वायां न बोलावें फार गडबड कांहीं । भातुकें भूषण नाहीं चाड नेघे धन । करा एक चित्त मन या गे मजपाशीं ॥ ७ ॥ एकएकीकडे पाहे लाज सांडूनियां राहे । म्हणे चला आतां सये जाऊं तयापाशीं ।

जोडोनियां हात कैशा राहिल्या निवांत। तुका म्हणे केली मात लाज राखिली तयांची ॥ ८ ॥

३६५९ धरिला पालव न सोडी माझा येणें। कांहीं करितां या नंदाचिया कान्हें। एकली न येतें मी ऐसें काय जाणें। कोठें भरलें या अवघड राने रे ॥ १ ॥ सोडीं पालव जाऊं दे मज हरी। वेळ लागल्या रे कोपतील घरीं। सासू दारुण सासरा आहे भारी। तुज मज सांगतां नाहीं उरी रे ॥ २ ॥ सख्या वाशिया होत्या मजपाशीं। तुज फावलें रे फांकतां तयांसी। होतें अंतर तईं सांपडतें कैसी। एकाएकीं अंगीं जडलासी रे ॥ ३ ॥ कैसी भागली हे करितां उत्तर। शक्ति मावळल्या आसुडितां कर। स्वामी तुकयाचा भोगिया चतुर। भोग भोगी त्यांचा राखे लोकाचार वो ॥ ४ ॥

३६६० गाई गोपाळ यमुनेचे तटीं। येती पाणिया मिळोनि जगजेठी। चेंडू चौगुणा खेळती वाळवंटीं। चला चला म्हणती पाहूं दृष्टी वो ॥ १ ॥ ऐशा गोपिका त्या कामातुरा नारी। चित्त विव्हळतें देखावया हरी। मिस पाणियाचें करितील घरीं। बारा सोळा मिळोनी परास्परीं वो ॥ २ ॥ चिरें चोळिया त्या धुतां विसरती। उर्ध्व लक्ष लागलें कृष्णमूर्ती। कोणा नाठवे कोण कुळ याती। झालीं तटस्थ सकळ नेत्रपातीं वो ॥ ३ ॥ दंतधावनाचा मुखामाजीं हात। वाद्यें वाजती नायके जन मात। करी श्रवण श्रीकृष्ण वेणुगीत। स्वामी तुकयाचा पुरवी मनोरथ वो ॥ ४ ॥

३६६१ कोणी एकी भुलली नारी। विकितां गोरस म्हणे घ्या हरी ॥ १ ॥ देखिला डोळां बैसला मनीं। तोचि वदनीं उच्चारी ॥ २ ॥ आपुलियाचा विसर भोळा। गोविंद कळा कौतुकें ॥ ३ ॥ तुका म्हणे हांसे जन। नाहीं कान ते ठायीं ॥ ४ ॥

३६६२ हरिरता चपळा नारी। लागवरी न रिघती ॥ १ ॥ अवघ्या अंगें सर्वोत्तम। भोगी काम भोगता ॥ २ ॥ वाचा वाच्यत्वासी न ये।

कोठें काय करावें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा ऐशा । देवापिशा उदारा ॥ ४ ॥

३६६३ कान्हो एकली रे एकली रे । तुज सवें चुकलें रे । भय वाटे वनीं मज अबळा धाकली रे ॥ १ ॥ निघतां घरीं आई बा वारी । तुज सवें कां आलियें हरी ॥ २ ॥ लोक वाटा सांगती खोटा । परी मी चटा लागलियें ॥ ३ ॥ पिकल्या बोरी झालियें सामोरी । काय जाणों कोठें राहिला हरी ॥ ४ ॥ आड खुंट झालिंया जाळी । काय काय जाणों कान्हें मांडिली रळी ॥ ५ ॥ तुका म्हणे जाऊं आलिया वाटा । पाहों हरी पायीं न मोडे कांटा ॥ ६ ॥

३६६४ कोंडिला गे माज । निरोधूनि द्वार । राखण तें बरें । येथें करा कारण ॥ १ ॥ हा गे हा गे हरी । करितां सांपडली चोरी । घाला गांठी धरी । जीवें माय त्रासाया ॥ २ ॥ तेंचि पुढें आड । तिचा लोभ तिला नाड । लावुनी चरफड । हात गोउनी पळावें ॥ ३ ॥ संशयाचें बिरडें । याचे निरसले भेटी । घेतली ते तुटी । आतां घेतां फावेल ॥४॥ तुका येतो काकुलती । वाउगिया सोड । यासींचि निवाड । आम्हीं भारवाहिका ॥ ५ ॥

३६६५ उदासीना पावल्या वेगीं । अंगा अंगीं जडलिया ॥ १ ॥ वेंटाळिला भोंवता हरी । मयूर फेरीं नाचती ॥ २ ॥ मना आले करिती चार । त्या फार हा एकला ॥ ३ ॥ तुका म्हणे नारायणीं । निरंजनीं मीनलिया ॥ ४ ॥

३६६६ मुख डोळां पाहे । तैशीच ते उभी राहे ॥ १ ॥ केल्याविण नव्हे हातीं । धरोनी आरती परती ॥ २ ॥ न धरिती मनीं । कांहीं संकोच दाटणी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवें । ओस केल्या देहभावें ॥ ४ ॥

३६६७ मेळउनि सगळे गोपाळ । कांहीं करिती विचार ॥ १ ॥ चला जाऊं चोरूं लोणी । आजी घेऊं चंद्रधणी । वेळ लावियेला अझुनी । एकाकरितां गडे हो ॥ २ ॥ वाट काढिली गोविंदीं । मागें

गोपाळांची मांदी ॥ ३ ॥ अवघाचि वावरे । कळों नेदी कोणा फिरे ॥ ४ ॥ घर पाहोनि एकांताचें । नवविधा नवनीताचें ॥ ५ ॥ रीघे आपण भीतरीं । पुरवी माथुलीयाच्या हरी ॥ ६ ॥ बोलों नेदी म्हणे स्थीर । खुणा दावी खारे क्षीर ॥ ७ ॥ जोगावल्यावरी । तुका करितो चाकरी ॥ ८ ॥

## श्रीकान्होबामहाराज

३६६८ तंव ते म्हणे ऐका हृषीकेशी वो । नावाजिलें तुम्हीं म्हणा आपणांसी वो । तरी कां वंचनुक सुमनासी वो । नटनाटय बरें संपादूं जाणसी वो ॥ १ ॥ सर हो परता आतां हो हरी । म्हणे सत्राजिताची कुमरी । जाणतें मी या शब्दाच्या कुसरी । ऐसेंच करून ठकाविलें आजीवरी ॥ २ ॥ भावें गेलें म्हूण न व्हावा वियोग । मनींची आर्त जन्मांतरीं व्हावा संग । तों तों केलें पाठमोरें हें जग । ऐसें काय जाणें हे तुझे रंग ॥ ३ ॥ काय करूं या नागविलें कामें । लागलें तयास्तव इतुकें सोसावें । नाहीं तरी कां नव्हती ठावीं वर्में । परद्वारीं ऐसा हाकालिती प्रसिद्ध नांवें ॥ ४ ॥ काय किती सांगावे तुझे गुण । न फुटे वाणी निष्ठुर ऐसा निर्गुण । आपपर न म्हणसी माय बहीण । सासुसुनांस लावुनी पाहासी भांडण ॥ ५ ॥ इतुकियावरी म्हणे वैकुंठींचा राणा । होऊन गेलें तें नये आणुं मना । आतां न करी तैसें करीं क्रिया आना । भक्तवत्सल म्हणे तुकयाबंधु कान्हा ॥ ६ ॥

## श्रीनिळोबामहाराज

३६६९ येकिं येकटेंचि असोनि येकला । विश्वीं विश्वाकार होउनियां ठेला । जयापरी वो तैसाचि गमला । नंदनंदन हा आचोज आंवुला वो ॥ १ ॥ ऐशा गौळणी त्या बोलति परस्परी । करूनि विस्मय आपुल्या अंतरीं । विश्वलाघवीया हाचि चराचरीं । नेणों महिमा यासीं म्हणो व्याभिचारी वो ॥ २ ॥ गिरि गोवर्धन येणें उच-

लिला। काळिया महासर्प नाथुनि आणिला। जळत वणवा वो मुखेंचि प्राशीला। गिळीता आघासुर चीरूनि सांडीला वो ॥ ३ ॥ कपट्या मामळभटा दिल्हे पिंडेदान। शोषिली पूतना विषें पाजिताचि स्तन। उखाळें बांधतां उपटिले विमलार्जुन। भक्षुनि मृत्तिका वदनीं दाविली भुवनें वो ॥ ४ ॥ आणिखीं येक येणें नवलावो केला। काला वांटितां वो विधाता ठकवीला। भाग नेदितां तो वत्सें गोवळ घेउनि गेला। तैसिंच आपण येथें होऊनियां ठेला वो ॥ ५ ॥ इंद्र चंद्र महेंद्र यातेचि पूजीती। श्रुति शास्त्रें तेही यातेंचि स्तविती। महासिद्ध मुनि ध्यानीं आराधिती। नीळा म्हणे तो हा जोडला सांगाती वो ॥ ६ ॥

३६७० दिसे सगुण हा स्वरूप सुंदर। परि व्यापुनियां ठेला चराचर। देव दानवादि मानव असुर। याविण उरला ऐसा नाहीं तृणांकुर वो ॥ १ ॥ ऐशा गौळणी त्या अनुवाद करीती। ज्या ज्या रंगलिया याच्या अनुवृत्ती। रजनि दिवो जयां याचीचि संगती। त्या त्या स्वानुभवें आपुल्या बोलति वो ॥ २ ॥ महि अंबु तेज मारुत गगन। जगा वीजरूप हाचि वो लपोन। महद मायेचें हा अनादि कारण। देवत्रयासी हा मूळ अधिष्टान वो ॥ ३ ॥ येकानेक झाला आपुल्याचि गुणीं। उरला भरोनियां चाऱ्हि वाणि खाणी। जयापरि हा तैसाचि साजणी। रूपें गुणें क्रीया मंडीत भूषणीं वो ॥ ४ ॥ भुवनें चतुर्दश तींहि याच्या पोटीं। स्वर्गी येकविसाहि आदि हा सेवटीं। होण्या न होण्याच्या नेणोनिया गोठी। आपीं आपणाचि येकट येकटी ॥ ५ ॥ निळा म्हणे आम्ही नेणोनि अबळा। हासों रुसों यासी करूं गदारोळा। खेळतां खेळ यासी भांडों वेळोवेळां। केले अपराध ते मागों या गोपाळा वो ॥ ६ ॥

३६७१ शुकादिकाचिये हृदयींचें ध्यान। आम्हां जोडलें वो न करितां साधन। सहजाचि पाचारितां येतसे धावोन। प्रेमें आलिंगीतां

निवे तनु मन वो ॥ १ ॥ ऐशा गौळणी आनंद भरिता । दृष्टी अवलोकुनि मदनाचिया ताता । म्हणति धन्य भाग्य आमुचें वो आतां । लाधलों जन्म झालि कृत्याची कृत्यता वो ॥ २ ॥ नित्य हरिचिया समागमें बाई । नाहिं देखीलें तें सुख भोगूं देहीं । प्रालब्ध सांचित वो क्रियमाण तेंही । गेलें हारपोनियां ठाईंचें ठाईं वो ॥ ३ ॥ येतां जातां नेणों काळाचा आडदरा । देखतां सन्मुख तो पळतुसे माघारा । रंग श्रीरंगाचा उमटला शरीरा । तेणें वाताहात जन्मदुःख जरा वो ॥ ४ ॥ हरिचे सन्निधी वो सहवासें वर्ततां । यासि बोलतां चालतां कृष्ण खेळतां । आंगीं ऐश्वर्याची दृढावली सत्ता । तेणें अजरामर झालों-सों निभ्रांता वो ॥ ५ ॥ ऐशा कृष्णरूपी रूपसा बाळा । होउनि स्तविती पूजिती वेळोवेळां । कडिये खांदियें घेउनी घननीळा । नीळया स्वामीतें अवलोकिती डोळां वो ॥ ६ ॥

३६७२ येकले न कंठेचि म्हणोनियां येणें । केलीं निर्माण वो चौदाहि भुवनें । गगन चंद्र सूर्य मेघ तारांगणें । पांचहि महाभूतें भौतिकें भिन्नभिन्न वो ॥ १ ॥ ऐसा लाघवीया माया सूत्रधारी । येकला येकटाचि झाला नानाकारी । स्थूळ सूक्ष्म जीव जीवाचे अंतरीं । तो हा नंदनंदन सये बाळ ब्रह्मचारी वो ॥ २ ॥ याचिये नाभिकमळीं जन्म चतुरानना । याचिया निजप्रभा प्रकाश रविकिरणा । याचिया महातेजें तेज हुताशना । येणेंचि पढउनी वेद केला शहाणा वो ॥ ३ ॥ याचिया द्रावपणें समुद्रासी जळ । याचिया चपळपणें पवन हा चंचळ । याचिया अवकाशें आकाश पघळ । याचिया धृतिबळें अवनि हि अढळवो ॥ ४ ॥ येणेंची मेरुस्तंभ अचळ धरियेला । दिशादिग्पाळासी येणेंचि ठाव दिधला । विधिविधानाचा शास्त्रा बोध केला । येणेंचि सुरपति स्वर्गीं बैसविला वो ॥ ५ ॥ भोगुनि अंगना हा बाळब्रह्मचारी । येकला जेथें तेथें सोळासहस्त्रा

घरीं । आम्हां तुम्हां भोगुनि अलिप्त मुरारी । नीळा म्हणे ऐशा विवादति नारी वो ॥ ६ ॥

३६७३ कांहींच नहोनिया कांहीं येक होता । नामारूपातीत आपण नेणता । होण्या न होण्याच्या नेणोनिया वार्ता । त्याचा संकल्पाचि झाला त्या प्रसवता वो ॥ १ ॥ ऐशा परि हा मूर्तिमंत झाला । विश्वि विश्वाकार होउनियां ठेला । भाग्यें आमुचिया मूर्ती मुसावला । गाऊं वानूं ऐसा आम्हासी फावला वो ॥ २ ॥ नव्हे ते पुरुष ना नारीपण जेथें । शून्या निरशून्याहि पैलाडी परतें । नाकळे नादबिंदु कळा ना ज्योतितें । परा पश्यंतीचा प्रवेश नाहीं जेथें वो ॥ ३ ॥ गुणलावण्याची उघडली खाणी । मंडित चतुर्भुज मुगुट माळा मणी । मुख मनोहर कुंडलें श्रवणीं । श्रीवत्सलांछन हृदयीं साजणी वो ॥ ४ ॥ घ्यागे उचलुनि जाऊं निजघरा । आजि फावला तो पाहों यदुवीरा । खेळों आदरें या खेळवूं सुंदरा । याच्या संगें नाहिं सुखा पारावारा वो ॥ ५ ॥ निळा म्हणे ऐशा संवादति सुंदरी । करिती क्रीडा सवें घेऊनि मुरारी । सुखीं सुखरूप झाल्या कल्प वरी । पुन्हा न येती त्या फिरोनि संसारीं वो ॥ ६ ॥

३६७४ नित्यानंदापुढें आनंद तो कोण । विषयसुख बाई बापुडें तें क्षीण । जेथें न सरेचि वैकुंठसदन । शेषशायी वो त्रिकुट भुवन वो ॥ १ ॥ नेघों म्हणोनियां त्यागिली परौते । घेऊं संगसुख हरिच्या सांगातें । गाऊं वानूं रूप पाहोनि निरुतें । हांसों खेळों ठायीं जेवणूं सांगातें वो ॥ २ ॥ नेघों समाधीचें सुख तुच्छ वाटे । नित्यानित्याचिये न पडों खटपटे । काय करूं ते तपाचे बोभाटे । एका हरिविण अवघी ते फलकटे वो ॥ ३ ॥ काय जाउनियां करूं निजधामा । तेथें मी नातुडे नाढळे विश्रामा । येथें सांडूनियां तमाल मेघःशामा । नेघों नाइका आणिका दुर्गमा वो ॥ ४ ॥ स्वर्गभोग ते हीन लागति असार । क्षणें होती जाती क्षणेंचि नश्वर । येथें हरिसंगें क्रीडों निरं-

तर। सर्वही सुखाचें हा जोडला आगर वो ॥ ५ ॥ निळा म्हणे नित्य निःसीम स्वानुभवें। ऐशा गोपिका त्या रंगल्या हरिसवें। अधिकाधिक हें प्रेम त्यांचें नवें। जाणोनि आवडी ते पुरविली देवें वो ॥ ६ ॥

३६७५ एकिं एकपणाचा घेऊनियां त्रास। जाला नानाकार स्वरूपें बहुवस। म्हणोनि दुसरेंचि नाढळे वो यास। जयातया माजी याचाचि रहिवास वो ॥ १ ॥ ऐसे निजात्मया जाणोनि गोविंदा। जीवें अनुसरल्या सकळाही प्रमदा। करिती सेवावृत्ति निशिदिनी सदा। हसती रुसती करिती विनोदा वो ॥ २ ॥ सर्व-साक्षी सर्वही जाणता। सर्व करूनियां म्हणवी अकर्ता। जीवीं जीवाचा हा आप्तचि सर्वथा। जेथें तेथें याची नित्य ऐक्यात्मता वो ॥ ३ ॥ नित्य अंगसंगें भोग त्यासि देती। दृष्टी अवलोकुनि गुण त्याचे गाती। नेऊनि एकांति वो निजगुज बोलती। करिती काम धाम परि त्याचिपासी वृत्ति वो ॥ ४ ॥ सासुसासरिया भ्रतारासी चोरी। नणंदा जावा त्याही त्यजूनियां घरीं। देती आलिंगन निजा-त्मया हरी। येथुनि म्हणाति वो संसारा बोहरी वो ॥ ५ ॥ ऐशा निळा म्हणे झाल्या हरिरता। त्या त्या विराजति मुक्तिचिया माथा। नाना साधनाच्या लाजउनि चळथा। जाल्या असोनि संसारि नित्यमुक्ता वो ॥ ६ ॥

३६७६ याच्या संगसुखें गर्भवास घेतां। येत जात गे कल्पाच्या चळथा। नेघों भुक्ती मुक्ती देतां सायुज्यता। ऐशा गौळणी त्या सुखानंद भरिता वो ॥ १ ॥ धन्य प्रेमळा त्या रंगल्या श्रीरंगीं। नेणति दुसरें वो संसारीं विरागी। हरिचीं भूषणें त्या लेउनि निजांगीं। सुखी सुखरूप भोगी नित्य त्यागी वो ॥ २ ॥ याच्या सहवासें भोगितां निजभोग। भोगी भोगातीता सर्वदा निःसंग। नयेचि दृश्यावरी देखती ही जग। ऐशा विचराति होउनि अनंग

वो ॥ ३ ॥ नित्य जनिं वनिं हरीतें देखती । हरिचि होउनियां हरि- ते भजती । हरिरूप जाली त्यांचि अंगकांती । हरिचि ध्यानीं मुसा- वला मनिं चित्तीं वो ॥ ४ ॥ येती जाती त्या हरिच्या सांगातें वसति । नित्यकाळ हरि वसे जेथें । करिती भोजन त्या जेववितां हरीतें । हरिविण त्या न घेती जीवनातें वो ॥ ५ ॥ निळा म्हणे तया हरीच सांगाती । त्याहि वर्तताति हरिच्या अनुवृत्ती । नाहीं उरविली दोनीपणें खंती । वसति एकाएकीं निजात्मता युक्ती वो ॥ ६ ॥

३६७७ भाव भक्तीचिया प्रीति जेवविला । देउनि ढेंकर वो पूर्ण- पणें धाला । नेणों आनंदाचा प्रवाह लोटला । ऐसिया स्वानंदाची वचनें अनुवादला वो ॥ १ ॥ म्हणे केले ते पावले उपचार । तुम्हि आवडीनें प्रेमाचे प्रकार । झाली तृप्ति आतां घ्यावो देतों वर । पुन्हा नातळो हा तुम्हांसि संसार वो ॥ २ ॥ तातल्या सोसुनियां विर- क्तीच्या ज्वाळा । वरव्या शिजविल्या समृद्धी सकळा । झाला रस- स्वाद भोजनीं आगळा । वाढिलीं पंचामृतें जेवितां जे वेळोवेळा वो ॥३ ॥ ऐसे जेउनियां धाले विश्वंभर । भक्तां उभविला अभयाचा कर । काढुनी घालिती कंठीचे तुळसीहार । निळया स्वामी गौरविती वारंवार वो ॥ ४ ॥

३६७८ नव्हतें एक ना दुसरें कांहीं यासी । होता लपोनियां आपुलीये कुसी । कांहींचि नोळखोनि आपआपणासीं । तोचि येउनि येथें झाला अविनाशी वो ॥ १ ॥ रूप धरिलें सगुण चांगलें । वाण माण जेथील तेथेंची रेखीलें । चतुर्भुज शंख चक्रातें मिरवलें । मुगुट माळा श्रवणीं सुतेज कुंडलें वो ॥ २ ॥ नव्हता गांव सींव पहिले यासि कांहीं । नामरूपासि तो आधीचि ठावा नाहीं । म्हणाति वैकुंठ ते कालिचीं झाले बाई । क्षीरसागर ना कौंचि शेष- शाई वो ॥ ३ ॥ नव्हता काळा गोरा खुजा ना ठेंगणा । स्वरूप सुंदर

ना आंधळा देखणा । कैंचि जीव शिव तयासी भावना । पंचभौतिक ना नेणें पंचप्राणा वो ॥ ४ ॥ नव्हता मन बुद्धि इंद्रियांचा मेळा । कार्य कर्तृत्व हा कारणा वेगळा । येणें जाणें यासि नव्हतें कवण्या काळा । तोचि आला या नंदाच्या राउळा वो ॥ ५ ॥ यासि जीवें भावें धरा घाला मिठ्या । ऐशा बोलती गौळणी गोरट्या । निळा म्हणे अवघ्या मिळोनि लहानामोठ्या । यासी चुकती त्या अभाग्या करंट्या वो ॥ ६ ॥

३६७९ यासि पाहतां वो हृदयस्थ पाहिला । यासि बोलतां वो वेदुची घोकला । यासी खेळतां कुसंगदोष गेला । यासि भोगितां हा प्रत्यवाय गळाला वो ॥ १ ॥ ऐसा निजानंद परमात्मा श्रीहरी । आम्हीं लाधलों वो भाग्याच्या संसारीं । नित्य आळंगूं या हृदया माझारीं । ऐशा निजबोधें निमाल्या सुंदरी वो ॥ २ ॥ यासी विचरतां परमार्थ हातीं लागे । यासि विवरीतां ये सिद्धांत बोलंगे । यासि विनटतां समाधि पाया लागे । यासि विनावितां हाचि वरि आंगें वो ॥ ३ ॥ यासि करूं जातां सहजाचि गोठी । स्वार्थ परमार्थ पुरुषार्थ लागे पाठी. । यासि जीवीं ध्यातां यासिचि पडे मिठी । यासि गीतीं गातां ब्रम्हांड पडे पोटीं वो ॥ ४ ॥ यासि करूनि पुढें विचरों जनीं वनीं । यासि घेउनि संगें बैसों वो भोजनीं । यासि निजउनी निजों निजशयनीं । याचे संग सुख घेऊं अनुदिनीं वो ॥ ५ ॥ निळा म्हणे निजाश्रमींची सकळा । ऐशा आरजा गौळणी त्या बाळा । ध्यानीं मनीं जीवीं ध्यातां या गोपाळा । गेल्या विसरोनियां संसार सोहळा वो ॥ ६ ॥

३६८० वेणू वाजवित यमुनेच्या तटीं । उभा कान्हया सांवळा जगजेठी । भोवती गोधनें वो गोवळाच्या थाटी । ऐकोनि गौळणी धांवतीं उठाउठी वो ॥ १ ॥ ऐसा जनमनमोहन रंजवणा । गुणी गुणातीत नंदाचा पोसणा । करूनि आकर्ता हा सृष्ट्यादि रचना ।

विश्वीं विश्वातीत अलक्ष देखणा वो ॥ २ ॥ बैसोनि विमानीं याच्या पाहों येति खेळा । देव सकळहि मिळोनिया पाळा । बोध कुंठित या यमुनेच्या जळा । वरुषे ब्रह्मानंद नरनारीबाळा वो ॥ ३ ॥ जळचर भूचर खेचर वनचर । लुब्ध होउनिया वेणुचिया स्वरें । राहिलीं तटस्थचि मानसें शरीरें । नेणती वैरभाव येकत्र परस्परें वो ॥ ४ ॥ पवन निश्चळचि होउनिया ठेला । सूर्य अस्तमाना जाऊं विसरला । वत्से न पिती पेहभाव गेला । मुखींचा कवळ गाई मुखींची राहिला वो ॥ ५ ॥ ऐसा स्वानंदाचा आला महापूर । कृष्ण वेणुध्वनि लोधले अंतर । नेत्रिं गळताति प्रेमाचे पाझर । निळा म्हणे देहीं देहा अनादर वो ॥ ६ ॥

३६८१ माझ्या मीपणाचा करुनि फराळ । उरलें खावयासि बैसलों सकळ । ऐसा भुकाळू हा नंदाचा गोवळ । यासि न पुरेचि ग्रासितां माझा खेळ वो ॥ १ ॥ आतां काय देऊं नसतां जवळी । संचित प्रालब्ध तें भक्षिलें समुळीं । कर्माकर्माच्या घेतल्या कवळी । विषय वासना त्या ग्रासिल्या निमिषमेळीं वो ॥ २ ॥ भक्षिले संपत्ति विपत्तीचे भोग । कांहीं नुरवितांचि कोणाचा ही भाग । अवघे भक्षूनियां नुरवि हा माग । नामरूप तेंही नेदीचि उरों सोंग वो ॥ ३ ॥ ऐसा भक्षूनियां पूर्ण नव्हे कधीं । अवघ्या भक्षूनियां संसार उपाधी । जीव भावाचिया नुरवुनियां आधी । केलें एकाएकीं निजरूप अनादि वो ॥ ४ ॥ आधिची दुर्बळ मी नव्हती कांहीं जोडी । पूर्वीच भक्षूनियां गेला वो तातडी । आणूं कोठुनि वाढूं या परवडी । हा तो भुकाळूचि सदाचा वराडि वो ॥ ५ ॥ आतां तृप्तिलागीं दिसे एक शेवटीं । भाव भक्ति याचे वोगरिन ताटीं । तेणेंचि होईल या क्षुधेची संतुष्टी । ऐसें निळा म्हणे विचारिलें पोटीं वो ॥ ६ ॥

३६८२ येऊनि जाऊनि करी गौळणीचें कोड । पुरवुनि सकळ ही अंतरींची चाड । नेदि प्रेम त्याचें खंडों करि वाड । ऐसा कृपाळू

हा सुखाचा सुरवाड वो ॥ १ ॥ धन्य भाग्याच्या त्या जन्मल्या संसारीं । ज्याचे ध्यानीं मनीं नित्य काळ हरी । करितां काम काज दृष्टी त्याचि वरी । बोलतां चालतां जेवितां निरंतरिं वो ॥ २ ॥ त्याचा विकिला ऐसा रावे त्याचे घरीं । पडिलें काम काज तेंहि आपण करी । नवचे पळभरी त्या सांडोनियां दुरी । त्याचा नलजेचि म्हणवितां कामारी वो ॥ ३ ॥ त्याचा येवजाव सासुरें माहेर । झाला आपणचि लेणें अळंकार । अवघें धन वित्त गोत परिवार । झाला नामरूप दीर भावे वर वो ॥ ४ ॥ नेदी उरों त्या आणिक दुसरें । विण आपणा वो सोयरे धायरे । गाई म्हैशी पशू पोटिचीं लेकुरें । झाला घरदार त्याचे एकसरें वो ॥ ५ ॥ खाती जेवीती ते भोग सकळही । झाला आपणचि संचरोनि देहीं । नेदि आपपर ऐसें दिसों कांहीं । निळा म्हणे ऐसी ऐक्याचि नवाई वो ॥ ६ ॥

३६८३ सये आनंदाचा अवचिता आला पूर । याचे मुरलीचा उठितांचि गजर । मी मज नाठवेचि कैचें घरदार । ठेलें तटस्थाचि राहिलें शरीर वो ॥ १ ॥ ऐसें मोहन नाटक येणें केलें । जीव चैतन्य वो हरूनियां नेलें । एकलें एकवटाचि करूनि ठेविलें । नाठवे सासुरें ना माहेर ऐसें झालें वो ॥ २ ॥ याचा नवलावो हाचि एक वाटे । जीवीं जीव नुरे आनंदाचि भेटे । तेणें सुखानंदें संसाराचि आटे । मी हें माझें तों न दिसोचि कोठें वो ॥ ३ ॥ मनीं मनासीं हि नुरोनियां थार । हृदयभुवनीं होय याचाचि प्रसर । बुद्धी चाकटलि राहे निरंतर । सुखी सुखाचाचि होतसे आदर वो ॥ ४ ॥ होतें आपुलीये घरीं वो निश्चळ । कोठें पाहों गेलें याचा निज खेळ । तेंचि पासुनि वृत्ति झालि वो वोढाळ । मनीं नाठवेचि लेंकरूं ना वाळ वो ॥ ५ ॥ एका एकिची पडियेला फासा । याचा नेणोनियां स्वभाव वो ऐसा । माझा मजची हा नवलावो मानसा । निळा म्हणे होता संचिताचा ठसा वो ॥ ६ ॥

३६८४ होते लेउनियां आर्तिचें अंजन । तेणें देखिलें वो निक्षेपीचें धन । होतें वेदरायें ठेविलें जोडून । तेंचि सांपडलें आयतें निधान वो ॥ १ ॥ जनीं जनार्दन प्रत्यक्षचि होता । तोचि मुसावोनि कृष्ण झाला आतां । मंडित चतुर्भुज वेणु वाजविता । मुगुट कुंडलें वो माळाचा मिरविता वो ॥ २ ॥ प्रगट असोनियां न दिसेची कोणा । आड आलिया वो बुद्धीचि कल्पना । जाय हारपोनि अविद्येच्या भावना । तेणेंचि न देखति भूतीं भगवाना वो ॥ ३ ॥ कैसा माया मोह भ्रम झाला गाढा । नेणें जाणीवाचि धांवे पुढा पुढा । विधीनिषेधाचा माझारी झगडा । तेणें अंतरला न सांपडे मूढा वो ॥ ४ ॥ इंद्रिया विषयाची सदा लगबग । मातले अहंकार कामक्रोध मांग । मदमत्सराचे धांवति निलाग । तेणें हातिच्या हातीं अंतरला श्रीरंग वो ॥ ५ ॥ ऐसे चुकवुनी आघात अपार । आजि सांपडलें आयतें भांडार । तेणें झालिये वो निजसुखें निर्भर । निळा म्हणे भोगूं सुखाचे संभार वो ॥ ६ ॥

३६८५ होतें बहुत दिवस आर्त वागाविलें । आजि अकस्मात तें फळ देऊं आलें । दृष्टि श्रीहरिचीं देखिलीं पाऊलें । घेतले जन्म मागें सार्थक त्याचें झालें वो ॥१॥ धन्य हे आनंदाचि सांपडली वेळ । तेणें संत सज्जन भेटले कृपाळ । त्याणि फेडियला बुद्धीचा वो मळ । दृष्टीं दाखविला यशोदेचा बाळ वो ॥ २ ॥ नाना साधनाच्या केलिया खटपटा । परि त्या न पवतिची वो याच्या दारवंटा । जाणो जातां जाणिव घालि आडफांटा । योगाभ्यासें सिद्धी रोधीताती वाटा वो ॥ ३ ॥ यज्ञयागें स्वर्गभोग आड येती । करितां तपें काम क्रोध खवळती । नित्यानित्यज्ञानें अभिमान वाढती । करितां तीर्थाटणें अहंकाराचि प्राप्ति वो ॥ ४ ॥ जपतां मंत्रबीजें चव्हाचि घाली घाला । करितां दान धर्म पुढें भोगविती फळा । सोंवळें

मिरवितां विधिनिषेध आगळा । आतां हेंचि बरवें घणी ध्यावूं याला वो ॥ ५ ॥ ऐसे शोधियले मार्ग नानापरी । न येती प्रतीति मग सांडियले दुरी । आतां गाउनि गीतीं नाचों हा मुरारी । निळा म्हणे करूं संसारा बोहरी वो ॥ ६ ॥

३६८६ आजि पुरलें वो आर्तीचें आरत । होतें हृदयीं वो बहु दिवस चिंतित । मना आवरूनि इंद्रियां सतत । दृष्टि पाहों हा धणिवरि गोपिनाथ वो ॥ १ ॥ तेंचि घडोनियां आलें अनायासें । जातां यशोदे घरा वाणाचिया मिसें । आला खेळत खेळत बाळवेषें । कवाळि घालि मिठी गद्गदा हांसे वो ॥ २ ॥ मुख अमृताचा मयंक उगवला । दंत हिऱ्याचा प्रकाश फांकला । नयनीं रत्नकीळ तारा वो झमकला । देखतां हृदयीं निजवास त्याचा झाला वो ॥ ३ ॥ जन्म जन्मांतरीं बहु केले सायास । याचे भेटिलागीं व्रतें उपवास । सेविलीं गंगेचीं तटाकें उदास । त्याचिया सुकृताचे आले नेणों घोष वो ॥४॥ आजि आनंदाशीं आनंद माझ्या झाला । आजि सुखाशीं सुखें लाभ केला । आजि हर्षाशीं हर्ष भेटों आला । तेणें श्रीरंग निजदृष्टी स्थिरावला वो ॥ ५ ॥ भोग भोगितां ओसरले समस्त । गेले उडोनियां प्रालब्ध संचित । विटलें विषयावरूनियां चित्त । निळा म्हणे घडला हरिशीं एकांत वो ॥ ६ ॥

३६८७ एकी म्हणती हा आमुचा सांगाती । दुजी म्हणे परती भाऊ माझा ॥ १ ॥ तिजी म्हणे हरि आमुचा मेहुणा । चौथी म्हणे पैलुन्या देखसी झणे ॥२॥ एकि म्हणती हा आमुचा गोवळ । साहावी म्हणे बाळ नंदाचा कीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जैशा श्रुती वेवादती । तैशा या भांडती परस्परें ॥ ४ ॥

३६८८ एकी म्हणती हरि आमुचा सोयरा । दुजी म्हणे घरा पुसों जाईं ॥ १ ॥ तिजी म्हणे काली आणिला पोसणा । चौथी म्हणे तान्हा यशोदेचा कीं ॥ २ ॥ एकी म्हणे माझा नोवरा साजणी ।

एकी म्हणे वहिणी पाठीची मी ॥ ३ ॥ निळा म्हणे एकी म्हणती आमुचा पिता । एकी म्हणे चुलता सखा माझा ॥ ४ ॥

३६८९ एकी म्हणे हरि आमुचा शेजारी । दुजी म्हणे दुरी मित्र माझा ॥ १ ॥ तीजी म्हणे सखा आमुचा जिवलग । चौथी म्हणे निःसंग सदांचा हा ॥ २ ॥ एकी म्हणे कुमारि देउनि आणिला । एकी म्हणे जन्मला यशोदे पोटीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकमेकां न मिळती । पुराणें भांडती तैशापरी ॥ ४ ॥

३६९० येतां देखोनियां भार । गाई मनोहर गोवळांचे ॥ १ ॥ धांवचि घेउनि गौळणी येती । पहावया श्रीपती मदनमूर्ती ॥ २ ॥ एकीस न पुसतां एकी । माय लेकी सास्वा सुना ॥ ३ ॥ निळा म्हणे पाहोनि मुख । भोगितातीं सुख कैवल्यपर ॥ ४ ॥

३६९१ कृष्णरूपा वेधल्या नारी । देखती अंतरीं तेंचि रूप ॥ १ ॥ गमनीं शयनीं आसनीं भोजनीं । देखती जनीं वनीं दृष्टीपुढें ॥ २ ॥ एकांतीं लोकांतीं घरीं दारीं बाहेरी । त्याविण निजाचारीं नेणती दुजें ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्वहि त्याचा परिवार । होउनी सारंगधर ठेला घरीं ॥ ४ ॥

३६९२ वळत्या आम्हांसी पाठवी । त्याचा नाठवी उपकारही ॥ १ ॥ नका येऊं देऊं संगें । लावा मागें भोवंडुनी ॥ २ ॥ याची वोढाळें धांवती । सैरा नाटोपती तें आम्हां ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐकोनी हरी । त्यांचें करी समाधान ॥ ४ ॥

३६९३ एकली एक दुजी होति ये सदनीं । तंव आयीकिली मुरलीची ध्वनी । गेलें धांवोनियां पाहावया लोचनीं । तंव गेलिये देहभाव विसरोनी ॥ १ ॥ हरि देखतांची मदनाचा पुतळा । गेला जडोनियां बैसला तो डोळा । मनीं आठवे साजणी वेळोवेळां । नेल्या शोषुनी माझीया जीवनकळा वो ॥ २ ॥ नव्हतें जवळी दुसरें बाई कोणही । नको जाऊं ऐसें सांगावया लागुनी । नेईल जीवभाव

सर्व हा हरूनी । मग पडसि तूं याचेचि व्यसनीं वो ॥ ३ ॥ ऐसी जाजावोनी बोले सखियाप्रती । येरि टकमका पाहोनि हांसती । म्हणती जाणोनियां होसि कां नेणती । भाग्यें लाधलिसी धरूनी राहे चित्तीं वो ॥ ४ ॥ आजि तुझिया भाग्यासी नाहीं पार । झाला परिचय पाहिला सारंगधर । ज्यालागीं शिणति हे योगी मुनीश्वर । तोचि तुझे हृदयींचा परात्पर वो ॥ ५ ॥ निळा म्हणे आजि दैवासि ही दैव । आलें मोडोनि वैभवा वैभव । सकळहि सुखाचीच जोडली राणीव । देखिला यदुपति निज लावण्याची ठेव वो ॥ ६ ॥

३६९४ ब्रह्म आणि गोवळपणें । यज्ञभोक्ता आणि उच्छिष्ट खाणें । महर्षि स्तव आणि हुंबरी घेणें । नाटकी विंदानें अघटित ॥१॥ नित्य मुक्त आणि बांधला गळा । परात्पर आणि कोंडिती बाळा । ब्रह्मचर्य आणि सहस्रसोळा । भोगिल्या अबळा आणिखींहि ॥ २ ॥ असुरमर्दन आणि मारिती गौळणी । लक्ष्मिकांत आणि चोरितो लोणी । ईशाचा ईश आणि फोडी दुधाणी । गुणातीत अगुणीं भरलासे ॥ ३ ॥ विश्वव्यापक आणि यशोदे कडिये । शुकाचें ध्यान आणि दासी पाढिये । कृपावंत आणि मारिली माये । रडे ये माये ये माये लटिकाची ॥ ४ ॥ रोमीं ब्रह्मांडें आणि बाळक झाला । आतुर्वळी आणि उखळीं बांधिला । बळीचा द्वारपाळ आणि पंढरिये आला । पुसताचि याला नाहीं कोणी ॥ ५ ॥ सखा भावाचा आणि मामासिचि मारी । धर्मस्थापक आणि अकर्मे करी । देहातीत आणि आयुधें धरी । अकर्ता करी मना आलें ॥ ६ ॥ सर्वज्ञचि आणि नेणता झाला । काळाचाहि काळ आणि बाऊसि भ्याला । माउशीचे स्तनीं विषचि प्याला । उत्तीर्ण तिये झाला जीवघातें ॥ ७ ॥ अरूप आणि घेतलीं सोंगें । निष्काम आणि गौळणी मागे । नित्य तृप्त आणि गोवळ संगें । नित्य उच्छिष्टें खाय त्यांचीं ॥ ८ ॥ भूपति आणि मंत्री माकडें । अर्धांगी नोवरी आणि नेली म्हणुन रडे । नावा

सोडुनी तारितो दगडे । वनवासी उघडे फळें भक्षी ॥ ९ ॥ अमरा पूज्य आणि राखितो गाई । क्षीराब्धीचा जामात आणि घोंगडें डोई । ईशाचा ईश आणि लोळतो भुई । नंदाचे गोठणीं गाईवाडा ॥ १० ॥ सनकादिक देव स्तविती भावें । तो हा लंपट गौळणीसवें । नमगती त्यासी देउंचि धांवे । आणि मागत्यासी व्हावें अति कृपण ॥ ११ ॥ जगदानी आणि भिकारी झाला । विराटरूपी आणि खुजट ठेला । त्रिपाद देतां त्रैलोक्या नेला । शेखीं बळिनें बांधला द्वारदेशीं ॥ १२ ॥ नित्यपूर्ण आणि भोजन मागे । बाळकाचि दात्याचें कापवी आंगें । न जेवितां सर्व पळोंचि लागे । मग धांवे त्यामागें विमानीं घाली ॥ १३ ॥ दयावंत आणि अंगाचि चिरिलें । मयूरध्वजाचीं केलीं शकलें । उदार कर्णाचे दांताचि पाडिले । शिबीतें सोलिलें कपोतासाठीं ॥ १४ ॥ ब्राह्मण भक्त आपणा म्हणवी भला । आणि नारदाचि नारदी करूनी ठेला । सख्खे बहिणीची भीड नाहीं याला । जांभळाच्या निमित्तें केला उपहास ॥ १५ ॥ वेदांसी स्तवितां उगाचि बैसे । आणि गौळणीच्या शिव्या ऐकोनि हांसे । नित्यानंद आणि रडताचि बैसे । आळी घेउनी मिसें जेवणाच्या ॥ १६ ॥ निळा म्हणे हा लाघवी हरी । कांहींही न करूनी अवघेंचि करी । भक्तां द्वेषियां एकेचि परी । निंदा स्तुतिवरी सम देणें ॥ १७ ॥

## श्रीनामदेव महाराज

३६९५ परब्रह्म निष्काम तो हा गौळियां घरीं । वाक्या वाळे अंदु कृष्ण नवनीत चोरी ॥ १ ॥ म्हणती गौळणी हरीचीं पाउलें धरा । रांगत रांगत येतो हरी हा राजमंदिरा ॥ २ ॥ लपत छपत येतो हरी हा राजभुवनीं । नंदाचे देव टाकूनि आपण बैसे सिंहासनीं ॥ ३ ॥ सांपडला देव्हारीं यासी बांधी दावेनीं । शंख चक्र गदा पद्म शारंगपाणी ॥ ४ ॥ बहुता कष्टें बहुता पुण्यें जोडलें देवा । अनंत

पवाडे तुमचे न कळती मावा ॥ ५ ॥ विष्णुदास नामा म्हणे अहो केशवा । जन्मोजन्मीं द्यावी तुमची चरणसेवा ॥ ६ ॥

३६९६ यशोदे घराकडे चाल मला जेवूं घाल ॥ ध्रु० ॥ साध्या गव्हाची पोळी लाटी । मला पुरणपोळी करून दे मोटी । नाहीं अड-वीत गुळासाठीं । मला जेवूं घाल ॥ १ ॥ तूप लावून भाकर करीं । वांगें भाजून भरीत करी । वर कांद्याची कोशिंबिरी । मला जेवूं घाल ॥ २ ॥ आई ग खडीसाखरेचे खडे । लवकर मला करून दे वडे । बाळ स्फुंदस्फुंदोनी रडे । मला जेवूं घाल ॥ ३ ॥ आई लहानच घे गे उंडा । लवकर भाजुन दे मांडा । लांब गेल्या गाईच्या झुंडा । मला जेवूं घाल ॥ ४ ॥ आई मी खाईन शिळा घांटा । दह्याचा करून दे मट्ठा । नाहीं माझ्या अंगीं ताठा । मला जेवूं घाल ॥ ५॥ भाकर बरीच गोड झाली । भक्षुनी भूक हारपली । यशोदेनें कृपा केली । मला जेवूं घाल ॥ ६ ॥ आई मी तुझा एकुलता एक । गाई राखितों नउ लाख । गाई राखून झिजलीं नख । मला जेवूं घाल ॥ ७ ॥ नामा विनवी केशवासी । गाई राखितो वनासी । जाऊन सांगा यशोदेसी । मला जेवूं घाल ॥ ८ ॥

३६९७ तळवे तळहात टेंकीत । डाव्या गुडघ्यानें रांगत । रंगणीं रंगनाथ । तो म्यां देखिला सये ॥ १ ॥ गवळणी जसवंती पैं सांगे । आले या कृष्णाचेनि मागें । येणें येणें वो श्रीरंगें । नवनीत माझें भक्षिलें ॥ २ ॥ एक्या हातीं लोण्याचा कवळु । मुख माखिलें अळु-माळु । चुंबन देतां येतो परिमळु । नवनीताचा गे सये ॥ ३ ॥ येणें माझें कवाड उघडिलें । येणें शिंकें हो तोडिलें । दह्यादुधातें भक्षिलें । उलंडिलें ताकातें ॥ ४ ॥ ऐसें जरी मी जाणतें । यमुना पाणिया नव जातें । धरूनि खांबासी बांधितें । शिक्षा लावितें गोविंदा ॥ ५ ॥ ऐसा पुराणप्रसिद्ध चोर । केशव नाम्याचा दातार । पंढरपुरीं उभा विटेवर । भक्त पुंडलिकासाठीं ॥ ६ ॥

३६९८ जाऊं पाण्या निसुरवाण्या । आळवीती गोड राण्या ॥ध्रु०॥ गोविंद गीतीं गाऊं गोविंद गीतीं गाऊं । आनंदें जाऊं पाण्या ॥ १ ॥ खाऊं कंदमुळें आम्हीं असों वनीं । न देखों श्रीकृष्ण न ऐकों कानीं ॥ २ ॥ आम्हीं गोड मिळिणी काय आम्हां गोडी । तुझिया नामाची लागली आवडी ॥ ३ ॥ आजीचा दिवस आम्हां झालासे आनंदु । विष्णुदास नामा यानें लावियेला छंदु ॥ ४ ॥

३६९९ येत येत उभा राजबिदीं । सवें चाले गोपाळांची मांदी । नारी पाहती उभया बिदीं । एकीच्या धरूनि बाहुवा खांदीं ॥ १ ॥ हरिहरनंदना साहश्य लोचना । डोळ्यां वेगळा न वा जासी कान्हा। अरे कान्हा मनमोहना । गोपी भुलल्या तुझिया गुणा ॥ध्रु०॥ चतुर्वेद नागवी भाट सांगतें । उभया वर्णितां रामकृष्णातें । श्रुतिस्मृति विद्यावंतें । जय जय म्हणती कृपानिधितें ॥ २ ॥ येत येत उभा रहात । सुदाम्याच्या खांद्यावरी हात । समदृष्टी गोपिका न्याहाळित । चैतन्य चोरूनि आनंदें डुल्लत ॥ ३ ॥ ऐसा कृष्ण सौभाग्यसुंदर । लावण्य गुण रत्नाकर । विष्णुदास नामयाचा दातार । भक्तिभावें ओळंगा शारंगधर ॥ ४ ॥

३७०० जाये जाये जाये परतोनि पाहे । लाचावला जीव पर न लगे सोय गे माय ॥ १ ॥ नावेक विठ्ठल पाहूं या साजणी । न पुरे गे धणी डोळियांची ॥ २ ॥ देखिला गे माय लावण्यसागर । नामया दातार केशिराज ॥ ३ ॥

३७०१ ध्यान सांवळें गोकुळींचें । धांव पाव वेगीं हरी सांवळियां ॥ ध्रु० ॥ सांवळिसी आंगीं उटी । सांवळी कस्तुरी ल्हाटीं । सांवळीसी कांसे कासियला कटीं । गोवळिया ॥ १ ॥ सांवळीसी तनु वरवी । सांवळें वृंदावन मिरवी । सांवळ्याशा तुळसी कानीं । मंजुरिया कोंवळीया ॥ २ ॥ सांवळीशीं कंठीं माळा । सांवळें हृदयीं पदक विशाळा । सांवळ्याशा गोपी केल्या ओवळ्या । गोवळिया

॥ ३ ॥ सांवळीसी हातीं काठी ।सावळासा कांबळा पाठीं । नामयाचा स्वामी गायी राखी । धवळ्या आणि पिवळ्या ॥ ४ ॥

३७०२ यशोदेचा बाळ अलगट । रूपें राजस बरवा बरवंट ॥ १॥ वेधीं लावूनि वेधिलें येणें मानस । आड घालुनि आपुला प्रकाश ॥ २ ॥ आपणासींच खेळे विनोदें । विश्व निववी तेणें सुखें निजबोधें ॥ ३ ॥ दृष्टी याची पावे देखणीया । आड रिघोनि तेज सांवळें भरिलें डोळियां ॥ ४ ॥ मन मारोनि आर्त पुरविलें । रूप दावूनि चित्त माझें भुलविलें ॥ ५ ॥ नामया स्वामी आसनीं शयनीं । दुरी नवजे डोळ्यां पासोनी ॥ ६ ॥

३७०३ दुःखाची निवृत्ति सुखाचें तें सुख । पाहतां श्रीमुख गोविंदाचें ॥ १ ॥ रंगणीं रांगत गुलगुल बोलत । असुर रूळत चरणातळीं ॥ २ ॥ नामा म्हणे हातीं लोणियाचा उंडा । गौळणी त्या तोंडा भुललिया ॥ ३ ॥

३७०४ चंद्रबिंबासरी देखों जरी मुखा । कोटी चंद्रप्रभा देखा कृष्णमूर्ति ॥ १ ॥ धवळलें चांदिणें रांगतां रांगणें । धन्य वो गौळणी सुखी तुम्ही ॥ २ ॥ कानींचीं कुंडलें गुरुशुक्र बिंबलें । शिरीं तें शोभलें पिंपळपान ॥ ३ ॥ कंठीं वाघनखें साजिरी ते सरी । कडदोरा वरी राजसासी ॥ ४ ॥ सकुमार दोंदिलें किंकीणी कटींतटीं । चरणीं नाद उठी नेपुरांचा ॥ ५ ॥ श्रुतिसमागमें नाद ऐके कानीं । संतोषोनि मनीं डुले हरी ॥ ६ ॥ देखोनिया माते होय समाधान । उतरीं निंबलोण मुखावरूनि ॥ ७ ॥ सच्चिदानंदघन तान्हुलें आपण । विष्णुदास नामयानें वोवाळिलें ॥ ८ ॥

३७०५ घागरिया छंद चरण घवघवी । अरूणा दाखवी चरणतळीं ॥ १ ॥ अरुता येई कान्हा देईं आलिंगन । उतरीं निंबलोण मुखावरुनी ॥ २ ॥ वाघनखें कडदोरा कंठीं घालूनि सरी । झणीं तुज मुरारी दृष्टी लागो ॥ ३ ॥ अंबुलें लोळिया कटीं रिठे गांठी ।

छंदें जगजेठीं हालवी मान ॥ ४ ॥ भाळीं चंदन वरी मसीचा टिळकला । झणीं तुज गोपाळा दृष्टी लागे ॥ ५ ॥ नामयाचा स्वामी हरि माझें चिंतणें । छंदें गीत गाऊं नाचूं मी सदा जाणें ॥ ६ ॥

६७०६ कृष्ण डोलतु रांगतु रंगणीं । इडापिडा धांवोनी घेती गौळणी ॥ १ ॥ जीवापरीस हें वाल्हें बाळक । शिणलिया विसांवा त्याचें पाहे श्रीमुख ॥ २ ॥ सर्व सुख याचेनी मनोहरें । तोंचि खेळवितां धनी मन न पुरे ॥ ३ ॥ देह गेह नाठवे सर्वथा । सुत पतीची मावळली वार्ता ॥ ४ ॥ सुख न सांगवे वैखरी कोंदली । रूपीं रमतां मनें बुडी दिधली ॥ ५ ॥ नामया स्वामी सुखाचा सागरु । कृष्ण खेळवितां सुफळ हा संसारु ॥ ६ ॥

३७०७ हातीं घेऊनिया काठी । शिकविते श्रीपति । यमुनेची माती । खासी कां कां कां कां ॥ १ ॥ हरी तूं खोडी नको करूं माझ्या बा बा बा बा ॥ ध्रु० ॥ धाऊनियां धरिला करीं । बैसविला मांडीवरी । मुख पसरोनि करी । आ आ आ आ ॥ २ ॥ विष्णुदास नामा म्हणे । मरोनियां जन्मा येणें । कृष्ण सनातन पाहूं । या या या या ॥ ३ ॥

३७०८ गौळणी ठकाविल्या । गौळणी ठकाविल्या । एक एक संगतीनें । मराठी कानडीया । एक मुसलमानी । कोंकणी गुजरणी । अशा पांचांजणी गौळणी ठकविल्या ॥ ध्रु० ॥ गौळणी सुंदरी । गौळणी सुंदरी । गेल्या यमुने तीरीं । वस्त्र फेडूनियां स्नान कारिती नारी । गोविंदानें वस्त्रें । नेलीं कळंबावरी । स्नान करोनियां । त्या आल्या बाहेरी ॥ १ ॥ लडोबा गोविंदा । लडोबा गोविंदा । निरवाणी आज । आडचाल्लो पडचाल्लो । शीर फोड्या न कोडो । मारो कन्हया । पानी खेळ्या न खेळो ॥ २ ॥ देखरे कन्हया । देखरे कन्हया । । मै इज्यतकी बडी । कदम पकडुंगी । मैयां कुटो जुडी । मेरी चुनरी दे । मेरी ले दुल्हडी

॥ ३ ॥ देवकीनंदना । देवकीनंदना । तूं एक श्रीपती । उघडी हिंवाची तुज विनवूं किती । पायां पडत्यें बा । मी येत्यें काकुळती । माझी सार्डी दे । घे नाकाचे मोतीं ॥ ४ ॥ पावगा दाताला । पावगा दाताला । तूं नंदाचा झिलो । माकां फडको दी । मी हिवान मेलों । घे माझो कोयतो । देवा पायां पडलों ॥ ५ ॥ ज्योरे, माधवजी । ज्योरे माधवजी । मे शरण थई । तनका काकैपी । बाप दयाळ तूंहा । मारी साडी अपो । हातणी ले कंकणी ॥ ६ ॥ इतुकें ऐकुनी । इतुकें ऐकुनी । देव बोले हांसोनी । सूर्या दंडवत करा कर जोडोनी । नामा विनवितो । म्हणे शांरगपाणी । गौळ्या ऐकु तूं । धन्य तुझी करणी ॥ ७ ॥

३७०९ बाळ सगुणगुणाचें तान्हें गे । बाळ दिसतें गोजिरवाणें गे । काय सांगतां गाऱ्हाणें गे । गोकुळीच्या नारी ॥ १ ॥ श्रीरंग माझा वछडा गे । यासी नाहीं दुजा जोडा गे । तुम्ही याची संगति सोडा गे । गोकुळीच्या नारी ॥ २ ॥ पांच वर्षांचें माझें बाळ गे । अंगणीं माझ्या खेळे गे । कां लटकाच घेतां आळ गे । गोकुळीच्या नारी ॥ ३ ॥ सांवळा गे चिमणा माझा गे । गवळणींत खेळे राजा गे । तुम्हीं मोठ्या ढालगजा गे । गोकुळींच्या नारी ॥ ४ ॥ तुम्हीं खाऊन लोण्याचा गोळा गे । आळ घेतां या गोपाळा गे । तुम्हीं ठाईंच्या वोढाळा गे । गोकुळींच्या नारी ॥ ५ ॥ तुम्हीं लपवूनि याची गोटी गे । लागतां गे याचे पाठीं गे । हीं एवढीच रीत खोटी गे । गोकुळींच्या नारी ॥ ६ ॥ तुम्हीं लपवून याचा भंवरा गे । आळ घेतां शारंगधरा गे । तुम्हीं बारा घरच्या बारा गे । गोकुळीच्या नारी ॥ ७ ॥ हा ब्रह्मविधीचा जनिता गे । तुम्ही याला धरूं पाहतां गे । हा कैसा येईल हाता गे । गोकुळींच्या नारी ॥ ८ ॥ नामा म्हणे यशोदेसी गे । हा तुझा हृषीकेशी गे । किती छळितो आम्हासी गे । गोकुळीच्या नारी ॥ ९ ॥

३७१० कान्हा तूं आजि कां झालासि बैमान ॥ ध्रु० ॥ तूं तो आमुचा गडी । म्हणोनि मी केली खोडी । घालूं हुंबर यमुनेची मोडूं मान ॥ १ ॥ होसी तूं आमुचा बळी । म्हणोनि म्यां केली कळी । तेथें कशाचा काय गुमान ॥ २ ॥ जरी तूं होसी सखा । होऊं दे झाला वाखा । चल रूपवती घरीं घेऊं भान ॥ ३ ॥ समजूनियां देव । येक नामा नामदेव । जालें तें हारपलें । या द्वैत भान ॥ ४ ॥

३७११ सोडी कान्हा रविदोर । मथिल्या देतें । बया मज तें दे आई । मज तें दे डेरां घुमघुमतें ॥ १ ॥ यशोदा उचलोनी । कडे त्यासी घेउनी । दाविती चित्रशाळेतें ॥ २ ॥ करीं कर धरुनी । नेउनी अंगणीं । दावी कुप वावीतें ॥ ३ ॥ दावील आरशांत । म्हणे पाहे कृष्णनाथ । मुख मुखा चुंबितें ॥ ४ ॥ चिमण्या ह्या गौळणी । आल्या त्याहा मिळोनी । राधे उरीं मज तें दे ॥ ५ ॥ राधेसी म्हणे नामा । कृष्णासी तुझा प्रेमा । समजावी यासी तें दे ॥ ६ ॥

३७१२ गोपाळांसी खेळती । आनंदें डोलती । कृष्ण आमुचा सांगाती । डो डो डो डो डो ॥ १ ॥ कान्होबाची संगती । ब्रह्मादिक इच्छिती । धन्य आम्हां म्हणविती । अ ल ल ल ल ॥ २ ॥ कृष्णाप्रती गोपाळ । म्हणताती सकळ । अकळशी नाकळ । ह्या त त त त ॥ ३ ॥ मामा मारूं गेलासी । आपाटिलें गजासी । मल्लयुद्ध खेळलासी । हु तु तु तु तु ॥ ४ ॥ अजगर मारिला । वडवानळ गिळिला । गोवर्धन उचालिला । अ ब ब ब ब ॥ ५ ॥ पूतनेसी शोषिलें । नारदासी मोहिलें । गणिकेसी उद्धारिलें । अ रे रे रे रे ॥ ६ ॥ गौळियांचे घरा जासीं । दहीं दूध लोणी खासी । त्यांच्या सुना भोगिसी । छि छी छी छी छी ॥ ७ ॥ सोळा सहस्र भोगिसी । ब्रम्हचारी म्हणविसी । लटिकेंचि ठकाविसी । कु लु लु लु लु ॥ ८ ॥ सोडोनियां मीपण । आम्हां घाली लोटांगण । परब्रम्ह नारायण । आहा हा हा हा ॥ ९ ॥ ऐसे तुझे पवाडे । वर्णिताती वाडेकोडें । विष्णुदास नामा म्हणे । यु यु यु यु यु ॥ १० ॥

३७१३ प्रातःकाळीं प्रहरा रात्रीं उठल्या गौळणी बाळा । घुसळण मांडियेलें घरोघरीं सकळां । नित्यानंदें परमानंदें गाती गोपाळा । सहस्रापरी कैशा गाती मदन सांवळा ॥ १ ॥ घुम घुम करिती घुम घुम करिती डेरे घुमती । आनंदल्या गौळणी छंदें छंदें डोलती ॥ ध्रु० ॥ एक म्हणती साजणी तुम्ही लपवागे लोणी । न कळे न कळे हो बाई कृष्णाची करणी । कोणी कडुन हा गे येईल सखये चक्रपाणी । खास खांदुनि तुम्हीं आतां लपवा दुधाणी ॥ २ ॥ बोलतां चालतां इतुक्यामध्यें हरी आला । कवणेंहि नाहीं देव दृष्टि देखिला। सूक्ष्मरूप धरूनि डेऱ्यामध्यें प्रवेशला । वरच्यावरी देव लोणी खाऊनियां गेला ॥ ३ ॥ उन्हवणी शिळवणी घालिती परि तें लोणी येईना । काय झालें टोणे सासूबाई कळेना ॥ ४ ॥ हा हा गे बायांनों तुमचे जाणते चाळे । यशोदेच्या मुला नेउनि देतसां गोळे । उगीच मग पाहातां आतां फिरगे निराळे । मारी ठोंसरे दोन्ही गाल्होरे घेतले ॥ ५ ॥ डेऱ्यामधुन मार माझा जगजीवन पाहे । नामा म्हणे धन्य धन्य वर्णूं मी काये ॥ ६ ॥

३७१४ कान्हु थंबालले थंबाल आपुल्या गाई । आम्ही आपुलाल्या घलासी जातों बाई ॥ ध्रु० ॥ काल गौलीले गौली गाय व्याली । तीचा खलूजले गोल जाहला लई । तो थगल्याला लई लई दिला । मी गलीबले म्हनून थोला दिला । काम कलतोयल कलतोय माझा लवला ॥ १ ॥ तुम्ही यमुनेची आंगोल गल्यानों केली । मला म्हनता भले आन जाय शिदोली । माझ्या संगतीसले दुसला नाहीं कोणी । कैसी आनूले वलानन भाकली ॥ २ ॥ तुम्ही थोलल्या पातलाच ल्याकू । तुम्हा मंदी मी गलीब हाये याकू । तुम्हा कैसीले आवल माझी नाहीं । काय कलूले काता मोलला पाई ॥ ३ ॥ तुझ्या कपालीं केशलाचा तीला । तुझ्या गल्यातले वैजयंती माला । तुझ्या काशेला पीतांबल पीवला । हात जोलीतो नामदेव भोला ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

३७१५ गौळण म्हणे गौळणीला । पुत्र झाला यशोदेला ॥ १ ॥ एक धांवे एकीपुढें । ताटीं वाटी सुंठवडे ॥ २ ॥ सुइणीची गलबल झाली । दासी जनी हेल घाली ॥ ३ ॥

३७१६ मग म्हणे नंदाजीला । पुत्रमुख पाहूं चला ॥ १ ॥ स्नान घालूनि त्यासी । वस्त्रें दिधलीं ब्राह्मणांसी ॥ २ ॥ परब्रह्म तें पाहुनी । ब्रह्मीं मिळे दासी जनी ॥ ३ ॥

३७१७ आलिया ब्राह्मणासी दान । द्रव्य दिधलें अपार जाण ॥ १ ॥ गाई म्हसींचीं खिल्लारें । ब्राह्मणा दिधलीं अपारें ॥ २ ॥ कामधेनूची उभनी । कल्पवृक्षाची दाटणी ॥ ३ ॥ ऐसा आनंद सोहळा । दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

३७१८ वैकुंठीचा हरी । तान्हा यशोदेच्या घरीं ॥ १ ॥ रांगतसे हा अंगणीं । माथा जावळाची वेणी ॥ २ ॥ पायीं पैंजण आणि वाळे । हातीं नवनीताचे गोळे ॥ ३ ॥ धन्य यशोदा ते माय । दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

३७१९ ब्रह्मा वंदी ज्याचे पाय । त्यासी यशोदा ते माय ॥ १ ॥ सामराज्याचा जो दानी । मागे यशोदेसी लोणी ॥ २ ॥ क्षीरसागर ज्याचे चरणीं । त्याला पायावरतें न्हाणी ॥ ३ ॥ देव ब्रह्मांड पालकीं । त्याची टाळू हातें मारवी ॥ ४ ॥ शुक सनकादिक योगी । जनी म्हणे दळूं लागी ॥ ५ ॥

३७२० अहो गोकुळींच्या देवा । आदि अंत तुम्हां ठावा ॥ १ ॥ नलगे पुसावें हो कोणा । आदि अंत हो सुजाणा ॥ २ ॥ जनी म्हणे वो गोकुळीं । किती खासी उष्टावळी ॥ ३ ॥

## श्रीभानुदासमहाराज

३७२१ तृण चारा चरूं विसरली । गाई व्याघ्र एके ठायीं जालीं । पक्षीकुळें निवांत राहिलीं । वैरभाव समूळ विसरलीं ॥ १ ॥

वृंदावनीं वेणु कवणाचा माये वाजे। वेणुनादें गोवर्धनु गाजे। पुच्छ पसरूनि मयोर विराजे। मज पाहतां भासती यादवराजे॥ २॥ यमुना जळ स्थिर स्थिर वाहे। रवीमंडळ चालतां स्तब्ध होय। शेषकूर्म वराहा चकित राहे। बाळा स्तन देऊं विसरली माय॥ ३॥ ध्वनी मंजुळ मंजुळ उमटती। वांकी रुणझुण रुणझुण वाजती। देव विमानीं बैसोनि स्तुति गाती। भानुदासा फावली प्रेम-भक्ती॥ ४॥

## श्रीएकनाथमहाराज

३७२२ गोकुळामाजी कृष्णें नवल केलें। स्त्री आणि भ्रतारा विंदान दाविलें॥ १॥ खेळ मांडिला हो खेळ मांडिला हो। न कळे ब्रह्मादिकां अगम्य त्याची लीळा वो॥ २॥ एके दिनीं गृहा गेले चक्रपाणी। बैसोनी वोसरी पाहे पाळतोनी लोणी॥ ३॥ गौळणी आली घरां म्हणे शारंगपाणी। चोरीचें विंदान पाळती पाहसी मनीं॥ ४॥ चोरी करावया जरी येसी सदनीं। कृष्णा धरूनी तुझी शेंडी वांधीन खांबालागुनी॥ ५॥ एकाजनार्दनीं ऐसें बोले व्रजवाळी। दाविलें लाघव ब्रह्मादिकां न कळे ते काळीं॥ ६॥

३७२३ उठोनी मध्यरात्रीं तेथें आला सांवळा। सुखसेजे पहुडली देखे गोपी बाळा॥ १॥ पती आणि गौळणी एके सेज पहुडली। बैसोनियां सेजे विपरीत करणी केली॥ २॥ धरूनी गोपी वेणी दाढी पतीची बांधिली। न सुटे ब्रह्मादिकां ऐशी गांठ दिधली॥ ३॥ करूनी कारण आले आपुले मंदिरा। यशोदा म्हणे कृष्णा काय केलें सुंदरा॥ ४॥ जाहला प्रातःकाळ लगबग उठे कामिनी। वोढतसे दाढी जागा झाला ते क्षणीं॥ ५॥ कां गे मातलीस दिली दाढी वेणी गांठी। एकाजनार्दनीं आण वाहे गोरटी॥ ६॥

३७२४ उभयतां बैसोनी क्रोधें वोलती। कैशी जाहली करणी एकमेक रडती॥ १॥ गोदोहन राहिलें दिवस आला दुपारीं। धाउनी

शेजारी येती पहाती नवल परी ॥ २ ॥ शस्त्रें घेऊनियां ग्रंथीं वळें कापिती । कापितांचि शस्त्रें न कापे कल्पांतीं ॥ ३ ॥ घेऊनियां अग्नि लाविताती दाढी वेणी । न जळेचि वन्हि ऐशी केली कृष्णें करणी ॥ ४ ॥ ऐसा समुदाय लक्षावधी मिळाला । बोल बोलती बोला भलतींचि बरळा ॥ ५ ॥ धांवूनियां नंदरायातें सांगती । एकाजनार्दनीं नवल विपरीत गती ॥ ६ ॥

३७२५ नंदें आणाविलें उभयतां राजबिदीं । गोवळे आणि गोवळी भोंवती जनांची मांदी ॥१॥ येवोनी चावडीये उभयतां रडती । म्हणे नंदराव कैशी कर्माची गती ॥ २ ॥ अंकावरी बैसोनी सांवळा गद्गदां हांसे । विंदान दाविलें देवें तुज बांधिलें असे ॥३॥ आमुची तूं शेंडी काल बांधीन म्हणसी । न कळे देवाची माव देवें बांधिलें तुजसी ॥ ४ ॥ आतां माझी गती कैशी हरी तें सांगा । करुणाभरीत देखोनी केलें लाघव वेगा ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं करुणाकर मोक्षदानी । सहज दृष्टी पाहतां सुटली ग्रंथी दोनी ॥ ६ ॥

३७२६ उठोनी प्रातःकाळीं गोपी येती घरा । आवरी आवरी यशोदे आपुलिया पोरा ॥ १ ॥ थोर पीडियेलें सांगतां नये आम्हां । दहीं दूध तूप लोणी नासिलें सीमा ॥ २ ॥ लेंकी सुना पोरें वेडाविलीं सकळ । चोरी करिताती भुलविलें सबळ ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं आवरी आपुला कान्हा । तुझा तुज गोड वाटे हांसतीस मना ॥ ४ ॥

३७२७ येकीपुढें एक सरसावोनी गोपिका । सांगती गार्‍हाणीं तुज नाहीं ठाउका ॥ १ ॥ रात्रीं मंचकावरी पहुडतां साजणी । अवचिता येउनी बांधी दाढी आणि वेणी ॥ २ ॥ नाहतां आपुले अंतरसदनीं । येऊनियां पुढें बैसे शारंगपाणी ॥ ३ ॥ ऐसा कंटाळा आणियला येणें । एकाजनार्दनीं तुझें आवडतें तान्हें ॥ ४ ॥

३७२८ दुजी येउनी पुढें बोले एके वो बाई । घुसळण घुसळितां डेरा फोडिला पाहीं ॥ १ ॥ धांवुनी आली सासु मारितसे मजला । हांसतसे आपण तेथोनी पळाला ॥ २ ॥ वासुरें तीं सोडी मुला चिमुरे

घेतो । द्यारे नवनीत म्हणोनी तयां मारितो ॥ ३ ॥ लपविलें ठायीं उरीं नेदी कांहीं । एकाजनार्दनीं पुरे आतां बाई ॥ ४ ॥

३७२९ एकीपुढें एक सांगती गाऱ्हाणीं । लिहितां पृथ्वी न पुरेचि धणी ॥ १ ॥ म्हणे यशोदा कृष्णा काय हें कैसें । खोडी नको करूं हरी बोलतसे ॥ २ ॥ मज नेती गृहांत दहा पांच मिळती । नग्न होऊनियां मग पुढें नाचती ॥ ३ ॥ म्हणती रे पोरा तूं दिससी साना । हृदयीं धरूनी करीं देती स्तना ॥ ४ ॥ ऐसे याचे तुज सांगूं म्हणतां माते । एकाजनार्दनीं नवल वाटेल तूतें ॥ ५ ॥

३७३० नको करूं आतां कृष्णा तूं खोडी । नाहीं म्हणोनियां दोनी हात जोडी ॥ १ ॥ काल इचे गृहीं थोडें खादलें नवनीत । म्हणोनि राधिकेचे स्तनीं ठेवी हात ॥ २ ॥ येवढाचि गोळा काढिला बाहेरी । सत्य म्हणोनियां आण वाहतो हरी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विश्वव्यापक सांवळा । न कळे ब्रह्मादिकां याची अगम्य कळा ॥ ४ ॥

३७३१ हांसोनियां राधा बोले यशोदेसी । पहावो हा चोर बोले विश्वासी ॥ १ ॥ आण वाहातसे लटिकीची मामिसे । याचिया वचनीं सर्वांस विश्वासे ॥ २ ॥ खोडी न करी ऐशी वाहे तूं आण । गोरसावांचुनि चोरी न करी तुझी आण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं बोले विनोदवाणी । यशोदेसह हांसती गौळणी ॥ ४ ॥

३७३२ घरोघरीं चोरी करीतो हृषीकेशी । गाऱ्हाणें सांगती येउनी यशोदेसी ॥ १ ॥ भली केली गोविंदा भली केली गोविंदा । निज भक्तांलागीं दाखविसी लीला ॥ २ ॥ कवाड उघडोनी शिंकें वो तोडिलें । दहीं दूध भक्षूनी ताक उलंडिलें ॥ ३ ॥ अंतर बाहेर मज व्यापियलें माया । एकाजनार्दनीं म्हणे न सोडीं पायां ॥ ४ ॥

३७३३ मिळोनी अवळा बसती परसद्वारीं । येरे येरे कृष्णा म्हणोनी वाहाति व्रजनारी ॥ १ ॥ ऐशा लांचावल्या नंदनंदना । घरींच बैसती लक्ष लावीत कान्हा ॥ २ ॥ वेद श्रुतीसी न कळे जयाची शुद्धी । तो नवनीत खावया लाहे लाहे घरामधीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्म परिपूर्ण । तेणें वेधें वेधिलें आमुचें मनाचें मन ॥ ४ ॥

३७३४ ऐसें नानापरी सांगती गार्‍हाणें । ऐकतां घडे कोटी अश्वमेध यज्ञ ॥ १ ॥ पुनरपि संसार नयेची मागुती । शंख चक्र गदा पद्म ऐसे जन्म होती ॥ २ ॥ एका जनार्दनीं ऐकतां चोरी कर्म । कर्म आणि धर्म पावती विश्राम ॥ ३ ॥

३७३५ जो न कळे वेदशास्त्रां गे माये । तो गोकुळीं चोरूनी लोणी खाये ॥ १ ॥ ऐशी भाविकांची आवडी देखा । टाकुनि आला वैकुंठसुखा ॥ २ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्म परिपूर्ण । तया घालिती यशोदा भोजन ॥ ३ ॥

३७३६ बाळ कृष्ण रांगे नंदाघरीं । चोरी करी घरोघरीं । गौळणी धरूनियां करीं । घेऊनि नंदमंदिरीं आली ॥ १ ॥ गार्‍हाणें सांगती अबळा । नवल विंदान तयाची ती कळा । हांसत उभा यशोदे जवळा । पाहूंनिया बाळा चाकाटली ॥ २ ॥ राहिले बोलणें चालणें निवांत । कृष्णरूपीं वेधलें चित्त । एकाजनार्दनीं समाधिस्त । द्वैताद्वैत विसरली ॥ ३ ॥

३७३७ एकमेक गौळणी करिती विचार । चोरी करी कान्हा नंदाचा कुमर ॥ १ ॥ नायके वो बाई करूं गत काई । धरूं जातां पळून जातो न सांपडोचि बाई ॥ २ ॥ दहीं दूध लोणी चोरी करूनियां खाये । पाहूं जातां कवाड जैसें तैसें आहे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं न कळे लाघव तयाचें । न कळेचि ब्रह्मादिकां वेडावलें साचें ॥ ४ ॥

३७३८ काय सांगूं यशोदे बाई । आम्हीं घरांत बैसलों पाहीं । कृष्ण आला लवलाहीं । म्हणे मज भूक लागली ॥ १ ॥ ऐसा लाघवी हा हरी । खोडी करी नानापरी । धरितां न धरवे निर्धारीं । जातो पळुनियां दुरी ॥ २ ॥ माझी सून एकली घरीं । नाहात होती परसद्वारीं । आपण येउनी झडकरी । उभा पुढें राहिला ॥ ३ ॥ तंव ती म्हणे कां आलासी । कृष्ण म्हणे तूं पाहियेली । मी खेळत होतों बिदीसीं । चेंडु उडोनियां आला ॥ ४ ॥ तंव ती म्हणे पाहें कृष्णा ।

क्रियाहीन नष्ट तूं कान्हा । घाली मिठी धरी स्तना । कां गे चेंडू देईना ॥ ५ ॥ तंव ती म्हणे परता सर । कृष्ण म्हणे दे चेंडू सत्वर । एकाजनार्दनीं निर्धार । परा भक्ति हे साचार ॥ ६ ॥

३७३९ आम्हीं असतां माजघरीं । रात्र झाली दोन प्रहरीं । मी असतां पति शेजारीं । अवचित हरि तुझा आला ॥ १ ॥ काय सांगूं सखये बाई । वेदशास्त्रां अगम्य पाहीं । आगमनिगमां न कळे कांहीं । मन पवन पांगुळलें गे बाई ॥ २ ॥ आम्हीं असतां निदसुरी । मुंगूस घेउनी आपुले करीं । सोडियलें दोघां माझारीं । तंव तें बोचकरी आम्हांतें ॥ ३ ॥ आम्हीं भ्यालों उभयतां । चीर फिटलें बाई तत्त्वतां । नग्नचि झालें मी सर्वथा । भूत भूत म्हणोनी भ्यालें ॥४॥ ऐसें करूनि आपण पळाला । जाउनी मायें आड लपाला । एकाजनार्दनीं म्हणे भला । आतां सांपडतां न सोडीं त्याला ॥ ५ ॥

३७४० गौळणी बारा सोळा । होउनी येके ठायीं मेळा । म्हणती गे कृष्णाला । धरूं आजी ॥ १ ॥ कवाड लाउनी । बैसल्या सकळ जणी । रात्र होतांचि माध्यान्हीं । आला कृष्ण ॥ २ ॥ दहीं दूध तूप लोणी । यांचीं भाजनें आणुनि । रितीं केलीं तत्क्षणीं । परी तयां न कळे ॥ ३ ॥ थोर लाघव दाविलें । सकळां निद्रेनें व्यापिलें । द्वार तें नाहीं उघडिलें । जैसें तैसेंची ॥ ४ ॥ खाउनि सकळ । मुखा लाविलें कवळ । आपण तात्काळ । पळे बाहेरी ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं । ऐशी करूनि करणी । यशोदे जवळी येउनि । बोसंगा बैसे ॥ ६ ॥

३७४१ उदय सूर्याचा झाला । मिळाला गौळणींचा मेळा । धाउनी सकळा । आलीया अंगणीं ॥ १ ॥ बोलती अति सक्रोधें । थोर पीडिलें बाळकें । चोरी करूनियां देखें । आला पळोनी ॥ २ ॥ आमुचीं फोडिलीं भाजनें । दहीं दूध खादलें येणें । एकाजनार्दनीं तान्हें । यशोदे तुझें ॥ ३ ॥

३७४२ येणें कृष्णें आमुचें खादलें दूध दहीं । फोडोनि टाकिलीं

भाजनें पाहीं ॥ १ ॥ आवरी आवरी बाई आपुला कान्हा । न कळे याची करणी ब्रह्मादिकां नये ध्याना ॥ २ ॥ घेऊनीयां पोरें घरांमध्यें येतो पाहे । चोरी करूनियां पळूनी जातो ठवलाहे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं किती सांगूं गाऱ्हाणें । पुन्हां आलिया यासी शीक लावीन सत्य जाणे ॥ ४ ॥

३७४३ गौळणी सांगती गाऱ्हाणीं । रात्रीं आले चक्रपाणी । खाउनी दहीं दूध तूप लोणी । फोडिलीं अवघी विरजणी ॥१॥ हा गे बाई कोणासी आवरेना । यशोदे बाळ तुझा तान्हा । कोठवर सोसूं धिंगाणा ॥ ध्रु० ॥ दुसरी आली धांवत । यानें बाई काय केली मात । मुखाशीं मुख चुंबन देत । गळ्यामाधिं हात घालीत । धरूं जातां सांपडेना ॥ २ ॥ तिसरी आली धाउनी । म्हणे गे बाई काय केली करणी । पतीची दाढी माझी वेणी । दोहींसी गाठ देउनी । गांठ बाई कोणा सुटेना ॥ ३ ॥ मिळोनी अवघ्या गौळणी । येती नंदाच्या अंगणीं । जातों आम्हीं गोकुळ सोडोनी । आमुच्या सुना घेउनी । हें बाई आम्हांसी पहावेना ॥ ४ ॥ ऐसीं ऐकतां गाऱ्हाणीं । यशोदे नयनीं आलें पाणी । कृष्णा खोड दे टाकुनी । एकाजनार्दनीं चरणीं । प्रेम तया आवरेना ॥ ५ ॥

३७४४ गौळणी गाऱ्हाणें सांगती यशोदेसी । दहीं दूध खाउनीयां पळुनी जातो हृषीकेशी ॥ १ ॥ लाडका हा कान्हा बाई तुझा तुला गोड वाटे । याच्या खोडी किती सांगूं महीपत्र सिंधु आटे ॥ २ ॥ मेळवोनी गोपाळ घरामध्यें शिरे कान्हा । धरूं जातां पळुनी जातो यादवांचा राणा ॥ ३ ॥ ऐसें मज यानें पिसें लावियलें सांगूं काई । एकाजनार्दनीं कायावाचामनें पायीं ॥ ४ ॥

३७४५ यशोदेसी गौळणी सांगती गाऱ्हाणें । नट नाटक कपटी सांभाळ आपुलें तान्हें । किती खोडी याच्या सांगूं तुजकारणें ॥ १ ॥ सहस्रमुख भागला । निवांताचि ठेला । वेद परतला ।

गाती अनुछंदें । वेध लाविला गोविंदें । परमानंदें । आनंदकंदें ॥ ध्रु० ॥ एके दिवशीं मी गेलें यमुनातट जीवना । गाई गोप सांगाते घेऊनि आला कान्हा । करी धरी पदरा न सोडी तो जाणा । एकांत घातली मिठी । न सुटे गांठी । पाहिला दृष्टि । नित्य आनंदु । वेध लाविला ॥ २ ॥ माझ्या घरासी एकदां आले शारंगपाणी । दहीं दूध भक्षुनी रिती केली दुधाणी । अज्ञान मडकीं टाकिली निपटुनी ॥ पाहिला हरी । पळाला दुरी । घरा भीतरीं ॥ बाई यशोदे ॥ वेध लाविला ॥ ३ ॥ किती खोडी याच्या सांगूं तुज साजणी । गुण याचे लिहितां न पुरे मेदिनी । रूप सुंदर पाहतां न पुरे नयनीं । एकाजनार्दनीं देखिला । ध्यानीं धरिला । मनीं बैसला । सच्चिदानंद । वेध लाविला ॥ ४ ॥

३७४६ ऐकें ऐकें बाई यशोदे । नवल केलें तुझ्या गोविंदें । आमुचीं मुलें तुडविलीं पदें । आतां यासी बांधीन ॥ १ ॥ आवरी आवरीं आपुला कान्हा । नाशियल्या आमुच्या सुना । अझुनि लाज नये तुझ्या मना । तुझा तुला गोड वाटे कान्हा ॥ २ ॥ येतो आमुचे घरासी । धमकावितो लेकी सुनांसी । कोठें लोणी सांग आम्हांसी । न सांगतां वासुरें सोडी विदीसी ॥ ३ ॥ आपण खातो दहीं दूध लोणी । हात पुसतो सुनेच्या मुखालागुनी । एकाजनार्दनीं करीं करणीं । जातो पळोनी तेथोनी ॥ ४ ॥

३७४७ मिळोनी गौळणी । देती यशोदे गान्हाणीं । खोडी करी चक्रपाणी । ऐक साजणी यशोदे ॥ १ ॥ परवां आला आमुचे घरा । दारीं निजला होता म्हातारा । घेऊनि ताकाचा हो डेरा । फोडिला सैरा त्यावरी ॥ २ ॥ दुसरी बोले बाई यशोदे । कांहीं सांगते तुझीया मुकुंदें । आमुचे घरा येऊनि गोविंदें । नवल केलें साजणी ॥ ३ ॥ सून होती माझी गर्भिणी । तीस पुसे चक्रपाणी । कैशी जाहलीस हो गर्भिणी । तंव ती हासूं लागली ॥ ४ ॥ जवळ बैसला

जाऊनि । पोट पाहे चांचपुनी । न कळे ईश्वराची करणी । तंव ती झिडकावी ॥ ५ ॥ ऐशा खोडी नानापरी । किती म्हणोनी सांगूं सुंदरी । एकाजनार्दनीं आवरीं । आपुलीया कृष्णातें ॥ ६ ॥

३७४८ गोकुळीं चोरी करितो चक्रपाणी । गवळणी येउनी सांगती गाऱ्हाणीं । येणें माझें भक्षिलें दहीं दूध लोणी । पळोनियां येथें आला शारंगपाणी वो ॥ १ ॥ आवरी आवरी यशोदे आपुला कान्हा । याच्या खोडी किती सांगूं जाणा । याचे लाघव न कळे चतुराननां । यासी पाहतां मन नुरे मीपणा वो ॥ २ ॥ एके दिवशीं मी आपुले मंदिरीं । मंथन करितां देखिला पूतनारी । जवळी येवोनि रवी दंड धरी । म्हणे मी घुसळितों तूं राहे क्षणभरी वो ॥ ३ ॥ परवां आमुचे घरासी आला । संगे घेउनी गोपाळांचा मेळा । साचल ऐकत घरीं पाहे चाळा । धरूं जातां तो पळोनिया गेला वो ॥ ४ ॥ ऐसें बहु लाघव केलें येणें । किती सांगावें तुज गाऱ्हाणें ॥ एकाजनार्दनी परब्रम्ह तान्हें । यासीं ध्यातां खुंटलें येणें जाणें वो ॥ ५ ॥

३७४९ दिसे सगुण परि निर्गुण । आगमां निगमा न कळे महिमान । परा पश्यंती खुंटलिया जाण । त्याचें न कळे शिवासी महिमान ॥ १ ॥ पहा हो सांवळा नंदा घरीं । नवनीताची करीतसे चोरी । गौळणी गाऱ्हाणीं सांगती नानापरी । त्याचें महिमान न कळे श्रमले सहा चारी ॥ २ ॥ कोणी म्हणती यासी शिक लावूं । कोणी म्हणती आला वाऊ । दाखवी लाघव नवलाऊ । अगम्य खेळ ज्याचा कवणा न कळे कांहीं ॥ ३ ॥ चोरी करितां बांधिती उखळीं दावें । येतो काकुलती माते मज सोडावें । एका जनार्दनीं दावी सोंग बरवें । ज्याची कीर्ति ऐकतां अघ नासे सर्व ॥ ४ ॥

३७५० आवरीं आवरीं आपुला हरी । दुबळ्याची केली चोरी । घरा जावयाची उरी । कृष्णें ठेविली नाहीं ॥ १ ॥ गौळणी उतावेळी । आली यशोदाजवळी । आवरी आपुला वनमाळी । प्रळय आम्हां

दिधला ॥ २ ॥ कवाड भ्रांतीचें उघाडिलें । कुलूप मायेचें मोडिलें । शिंके अविद्येचें तोडिलें । बाई तुझिया कृष्णें ॥ ३ ॥ होती क्रोधाची अर्गळा । हळूचि काढिलीसे वळा । होती अज्ञानाची खिळा । तोही निर्मूळ केली ॥ ४ ॥ डेरा फोडिला दंभाचा । त्रिगुण तिवईस ठाव केंचा । प्रपंच सडा हा ताकाचा । केला तुझिया कृष्णें ॥ ५ ॥ अहंकार होता ठोंबा । उपडिला घुसळ खांबा । तोही टाकिला स्वयंभा । बाई तुझिया कृष्णें ॥ ६ ॥ संचित हें शिळें लोणी । याची केली धूळधाणी । संकल्प विकल्प दुधाणी । तीहीं फोडिलीं कृष्णें ॥ ७ ॥ प्रारब्ध हें शिळें दहीं । माझें खादलें गे बाई । क्रियमाण दूध साई । तीहीं मुखीं चोतिलीं ॥ ८ ॥ कुंप रांजण सगळे । स्पर्श होती हात काळे । होतें कामाचें तें पाळें । तेंही फोडिलें कृष्णें ॥ ९ ॥ सुचित दुश्चित घृत घागरी । लोभें भरल्या होत्या घरीं । त्याही टाकिल्या बाहेरी । तुझिया कृष्णें ॥ १० ॥ कल्पनेची उतरंडी । याची केली फोडाफोडी । होती आयुष्याची दुरडी । तेही मोडिली कृष्णें ॥ ११ ॥ पोरें आचपळ आमुची । संगती धरली या कृष्णाची । मिळणी मिळाली तयांची । संसाराची शुद्ध नाहीं ॥ १२ ॥ ऐशी वार्ता श्रवणीं पडे । मग मी धांवोनी आलें पुढें । होतें द्वैताचें लुगडें । तेंही फिटोनी गेलें ॥ १३ ॥ आपआपणा विसरलें । कृष्णस्वरूपीं मिळालें । एका जनार्दनीं केलें । बाई नवल चोज ॥ १४ ॥

३७५१ आल्या पांच गौळणी पांच रंगांचे शृंगार करूनी ॥ ध्रु० ॥ पहिली गौळण रंग सफेत । जशी चंद्राची जोत । गगनीं चांदणी लखलखित । एका तिची मात । मंथन करीत होती दारांत । धरून कृष्णाचा हात । ऐशा आल्या पांच गौळणी ॥ १ ॥ दुसरी गौळण भाळी भोळी । रंग हळदीहून पिंवळी । पिंवळा पितांबर नेसून आली । आंगीं बुट्टेदार चोळी । एक लहान तनु उमर कवळी । जशी चांफ्याची कळी । ऐशा आल्या पांच गौळणी ॥ २ ॥ तिसरी गौळण

रंग काळा । नेसून चंद्रकळा । काळें काजळ लेऊन डोळां । रंग तिचा सांवळा । काळी गरसोळी लेऊन गळां । आली राजस बाळा। ऐशा आल्या पांच गौळणी ॥ ३ ॥ चवथी गौळण रंग लाल । लाल लालही लाल । कपाळीं कुंकुम चिरी लाल । भांगीं भरून गुलाल । मुखीं विडा रंग लाल । जसें डाळिंबीचें फूल । ऐशा आल्या पांच गौळणी ॥ ४ ॥ पांचवी गौळण हिरवा रंग । अवघ्या झाल्या दंग । हिरव्या कांकणाचा पहा रंग । जसें आरशांत जडलें भिंग । फुगडी खेळतां कृष्णसंग । एकनाथ अभंग । ऐशा आल्या पांच गौळणी ॥५॥

३७५२ दुडीवरी दुडी गौळणी साते निघाल्या । गौळण गोरस म्हणों विसरल्या ॥ १ ॥ गोविंदु घ्या कोणी दामोदर घ्या गे । तंव तंव हासती मथुरेच्या गे ॥ २ ॥ दुडिया माझारी कान्होबा झाला भारी । उचंबळे गोरस सांडे बाहेरी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सबरस गौळणी । ब्रह्मानंदु न समाये मनीं ॥ ३ ॥

३७५३ गौळणीचा थाट निघाला मथुरे हाटालागीं । तें देखोनी जगदीश धांवला गोप घेउनी वेगीं ॥१॥ कान्हया सरसर परता नको आरुता येऊं । तुझा संग झालिया मग मी घरा कैसी जाऊं ॥ धृ० ॥ सासुरवासिनी आम्ही गौळणी जाऊं दे रे हरी । बहु वेळ लागतां सासु सासरे कोपतील घरीं ॥२॥ आम्हीं बहुजणी येकला तूं शारंगपाणी दिससी येथें । हृदयमंदिरीं ठेउनी तूंतें जाऊं मथुरापंथें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ब्रह्मवादिनी गोपीया वरवंटा । कृष्णपदीं त्या लीन झाल्या पूर्णपणें तन्निष्ठा ॥ ४ ॥

३७५४ मथुरेसी गोरस विकूं जातां नितंबिनी । तयांमाजी देखिली राधिका गौळणी । जवळी जाऊनियां धरिली तिची वेणी ॥ १ ॥ सोडी सोडी कान्हा शारंगपाणी । माझीया संसारा घातिलें पाणी । नांव रूप माझें बुडाविलें जनीं ॥ २ ॥ राधा म्हणे येथोनियां बहु चाट होसी । घरी चोरी करूनियां वाटे आडविसी । ओढोनियां

नेतें आतां तुज मातेपाशीं ॥ ३ ॥ धरिली पदरीं राधा न सोडीच निरी । दान दे आमुचें म्हणे मुरारी । भोंवताली हांसती व्रजसुंदरी ॥ ४ ॥ भक्तीचिया पोटीं राधा समरस जाली । कृष्णरूप पाहूनियां देहभावा विसरली । एकाजनार्दनीं राधा शेजे पहुडली ॥ ५ ॥

३७५५ फणस जंबीर कर्दळी दाटा । हातीं घेउनी नारंगी फाटा ॥ १ ॥ वारियानें कुंडल हाले । डोळे मोडित राधा चाले ॥ २ ॥ राधा पाहूनि भुलले हरी । बैल दुभे नंदा घरीं ॥ ३ ॥ हरी पाहूनि भुलली चित्ता । राधा घुसळी डेरा रिता ॥ ४ ॥ मन मिनलेंसे मना । एका भुलला जनार्दना ॥ ५ ॥

३७५६ नानापरी समजावितें परी न राहे श्रीहरी । दहींभात कालवोनी दिला वेगीं झडकरी । कडेवरी घेऊनियां फिरलें मी द्वारोद्वारीं ॥ १ ॥ राधे राधे राधे राधे घेईं शामसुंदरा । नेईं आतां झडकरी आपुलिया मंदिरा ॥ धृ० ॥ क्षणभरीं घरीं असतां करी खोडी शारंगपाणी । खेळावया बाहेरी जातां आळ घेती गौळणी । थापटोनी निजवितां पळोनि जातो राजद्वारा ॥ २ ॥ राधा घेऊनि हरीला त्वरें जात मंदिरीं । हृदयमंचकीं पहुडविला श्रीहरी । एकाजनार्दनीं हरीला भोगी राधा सुंदरा ॥ ३ ॥

३७५७ करूं देईना मज दूध तूप बाई । मथितां दधि तो धरी रवी ठायीं ठायीं । हट्ट हा कदापि नुमजे समजाविल्यास काई । समजाउनी यातें तुझ्या घरास नेईं नेईं ॥ १ ॥ राधे हा मुकुंद कडिये उचलोनी घेईं घेईं । रडतांना राहिना करूं यास गत काई काई ॥ धृ० ॥ हरिसी आनंदें राधा मृदु मृदु बोलवीते । पाळण्यांत तुला कृष्णा निजवोनी हालवितें । गृहा नेऊनियां दहीं भात कालवितें । यशोदेसी सोडी कान्हा माझ्या जवळी येईं येईं ॥ २ ॥ हट्ट मोठा घेतो मला छळितो गे राधे पहाणें । असाच हा नित्य राधे हरि घरा नेत जाणें । उगाचि हा निश्चळ कैसा राहे त्वां समजावल्यानें । तुझी

धरितें हनुवटी यासी गृहा नेई, नेई ॥ ३ ॥ गोविंदा गोपाळा कृष्णा मुकुंदा शेषशाई । जगजीवना गोकुळभूषणा गोपी भुलवणा बाई । उगा नको रडूं कृष्णा यशोदेसी सोडी तूंही । एकाजनार्दनीं शरण राधे घेउनी यासी जाई जाई ॥ ४ ॥

२७५८ गोधनें चारावया जातां शारंगपाणी । मार्गीं भेटली राधिका गौळणी । कृष्ण दान मागे निरी आसुडोनी । तंव ती देखिली यशोदा जननी ॥ १ ॥ यशोदा म्हणे लाटका हृषीकेशी । परनारीसी कैसा रे झोंबसी । येरु रुदत सांगतो मातेपाशीं । माझा चेंडू लपविला निरीपाशीं ॥ २ ॥ राधिका म्हणे यशोदे परियेशीं । चेंडू नाहीं नाहीं वो मजपाशीं । परि हा लटका लबाड हृषीकेशी । निरी आसडितां चेंडु पडे धरणीसी ॥ ३ ॥ यशोदा म्हणे चाळका तुम्हीं नारी । मार्गीं वैसतां क्षण एक मुरारी । एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी । नाम घेतां पातकें जाती दुरी ॥ ४ ॥

२७५९ खांद्यावरी कांबळी हातामध्यें काठी । चारितसे धेनु सांवळा जगजेठी ॥ १ ॥ राधे राधे राधे राधे मुकुंद मुरारी । वाजवितो वेणु कान्हा सांवळा श्रीहरी ॥ २ ॥ एक एक गौळणी एक एक गोपाळा । हातीं धरूनि नाचती रासमंडळा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रासमंडळ रचिलें । जिकडे पाहे तिकडे अवघें ब्रह्म कोंदलें ॥ ४ ॥

२७६० तुझी संगति नाहीं कामाची । मी सुंदरा कोवळ्या मनाची । मज दृष्टि होईल साची । मग तुझी घेईन चर्या ॥ १ ॥ कसें वेड लाविलें कान्हो गोवळीया ॥ ध्रु० ॥ माझा वंश आहे मोठ्याचा । तूं तंव यातीहीन गौळ्यांचा । ऐक्य जालीया नाम रुपाचा । ठावचि पुसलीया ॥ २ ॥ तुझ्या अंगीची धुरट घाणी । तनु काय दिसती वोंगळवाणी । मुरली वाजविसी मंजुळवाणी । मनमोहन कान्हया ॥ ३ ॥ तुझ्या ठिकाणीं अवगुण मोठा । चोरी करूनी भरिसी पोटा । वृजनारी सुंदरा चावटा । अडविसी अव-

गुणीया ॥ ४ ॥. सर्व सुखाची कृष्ण संगती । वेणुनादें गाई गोप वेधती । एकाजनार्दनीं हरिरूपीं रमती । त्या व्रज सुंदरीया ॥ ५ ॥

३७६१ मनमोहन मुरलीवाला । नंदाचा आलबेला ॥ १ ॥ भक्तासाठीं तो जगजेठी । कुब्जेसीं रत घाला ॥ २ ॥ विदुरा घरच्या भक्षूनि कण्या । परमानंदें घाला ॥ ३ ॥ भक्तिसुखें सुखावला । एकाजनार्दनीं निमाला ॥ ४ ॥

३७६२ नंदनंदन मुरलीवाला । याच्या मुरलीचा वेध लागला ॥ १ ॥ प्रपंच धंदा नाठवे कांहीं । मुरलीचा नाद भरला हृदयीं ॥ २ ॥ पती सुताचा विसर पडिला । याच्या मुरलीचा छंद लागला ॥ ३ ॥ स्थावर जंगम विसरूनी गेलें । भेद भाव हारपला ॥ ४ ॥ समाधि उन्मनी तुच्छ वाटती । मुरली नाद ऐकतां मना विश्रांति ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं मुरलीचा नाद । ऐकतां होती त्या सद्गद ॥ ६ ॥

३७६३ मुरली मनोहर रे माधव ॥ ध्रु० ॥ श्रीवत्स लांछन हृदयीं विलासन । दीन दयाघन रे ॥ १ ॥ सुरवर किन्नर नारद तुंबर । गाती निरंतर रे ॥ २ ॥ एका जनार्दनीं त्रिभुवन मोहन । राखीत गोधन रे ॥ ३ ॥

३७६४ तुझ्या मुरलीची ध्वनी । अकल्पित पडली कानीं । विव्हळ जालें अंतःकरणीं । मी घरधंदा विसरलें ॥ १ ॥ अहारे सांवळीया कैसी वाजविली मुरली ॥ ध्रु० ॥ मुरली नोहे केवळ बाण । तिनें हरिला माझा प्राण । संसार केला दाणादीन । येऊनि हृदयीं संचरली ॥ २ ॥ तुझ्या मुरलीचा सूरतान । मी विसरलें देहभान । घर सोडोनी धरिलें रान । मी वृंदावनीं गेलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गोविंदा । पतितपावन परमानंदा । तुझ्या नामाचा मज हा धंदा । वृत्ति तंव पदीं निवर्तली ॥ ४ ॥

३७६५ तुझें श्रीमुख सुंदर । कुसुम शुभकांति नागर । कासे पीतांबर मनोहर । पाहुनी भूल पडली । करूणाघना ॥ १ ॥ मुरली

नको वाजवूं मनमोहना ॥ ध्रु० ॥ सर परता होय माघारा । देहभाव बुडाला सारा । नाहीं संसारासी थारा ॥ भेदभ्रम गेला । कमळ नयना ॥ २ ॥ ध्वनि मंजुळ ऐकिली कानीं । सर्व सुखां जाली धणी । एकाजनार्दनीं ध्यानीं मनीं । एकपण जगजीवना ॥ ३ ॥

३७६६ भुलविलें वेणुनादें । वेणु वाजविला गोविंदें ॥ १ ॥ खुंथुळलें यमुनाजळ । पक्षी राहिले निश्चळ ॥ २ ॥ तृणचरें लुब्ध जालीं । पुच्छ वाह्यानियां ठेलीं ॥ ३ ॥ नाद न समाये त्रिभुवनीं । एका भुलला जनार्दनीं ॥ ४ ॥

३७६७ कशी जाऊं मी वृंदावना । मुरली वाजवी कान्हा ॥ ध्रु० ॥ पैलतीरीं हरी वाजवी मुरली । नदी भरली यमुना ॥ १ ॥ कासे पीतांबर कस्तुरी टिळक । कुंडल शोभे काना ॥ २ ॥ काय करूं बाई कोणाला सांगूं । नामाची सांगड आणा ॥ ३ ॥ नंदाच्या हरीनें कौतुक केलें । जाणे अंतरीच्या खुणा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मनीं म्हणा । देव माहात्म्य कळेना कोणा ॥ ५ ॥

३७६८ सुंदर मुख साजिरें कस्तुरी मळवटीं । मुरली वाजवीत उभा यमुनेचे तटीं । गोपवेष शोभे खांदा कांबळी हातीं काठी । तो नंदनंदन देखिला जगजेठी वो ॥ १ ॥ मंजुळ मंजुळ वाजवी मुरली । ऐकतां माझी चित्तवृत्ति हरली ॥ ध्रु० ॥ चारी वेद जया गाताती आनंदें । तो गोकुळीं गाई चारी परमानंदें । श्रुतिशास्त्रें वेधलीं जयाचिया छंदें । तया गोवळ म्हणती कान्हा आनंदें ॥ २ ॥ ऐशी आवडी भक्तीची देखा । उच्छिष्ट खातां कांहीं न धरी शंका । एकाजनार्दनीं भुलला तयाचिया सुखा । वैकुंठ नावडेचि देखा ॥ ३ ॥

३७६९ माझा कृष्ण देखिला काय । कोणी तरी सांगा गे ॥ ध्रु० ॥ हातीं घेऊनियां फूल । अंगणीं रांगत आलें मूल । होतें सारावित मी चूल । कैसी भूल पडियेली ॥ १ ॥ माथां शोभे पिंपळपान । मेघवर्ण ऐसा जाण । त्याला म्हणती श्रीभगवान । योगी ध्यान विश्रांति

॥ २ ॥ संगे घेउनी गोपाळ । बाळ खेळे आळुमाळ । पायीं पोल्हारे झळाळ । गळां माळ वैजयंती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं माय । घरोघरां-प्रती जाय । कृष्णा जाणावें तें काय । कोणी सांगा गे ॥ ४ ॥

३७७० सिंगाचें सिंगुलें खांद्यावर आंगुलें। नाचत तान्हुलें यशोदेचें ॥ १ ॥ येती गौळणी करनी बुझावणी। लागती चरणीं कान्होबाच्या ॥ २ ॥ गोविंद वाळिया वाजविती टाळिया । आमुचा कान्हया देव-राव ॥ ३ ॥ कडदोरा विंद्लीं वाघनखें साजिरीं । नाचत श्रीहरी यशोदेचा ॥ ४ ॥ पायीं घागरीया वाक्या साजरीया । कानींच्या बाळ्या ढाळ देती ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं एकत्वशरण । जीवें निंवलोण उतरती ॥ ६ ॥

३७७१ ऐक ऐक सखये बाई नवल मी सांगूं काई । त्रैलोक्याचा धनी तो हा यशोदेसी म्हणतो आई ॥ १ ॥ देवकीनें वाहिला यशो-देनें पाळिला । पांडवांचा वंदीजन होऊनियां राहिला गे ॥ २ ॥ ब्रह्मांडाची सांठवण योगीयांचें निजधन । चोरी केली म्हणऊन उखळासी बंधन ॥ ३ ॥ सकळ तीर्थें जया चरणीं सुलभ हा शूल-पाणी । राधिकेसी म्हणतो तुझी करीन मी वेणीफणी ॥ ४ ॥ शरण एकाजनार्दनीं कैवल्याचा मोक्षदानी । गाई गोप गोपी बाळा मेळ-विले आपुलेपणीं ॥ ५ ॥

३७७२ गवळण म्हणती यशोदेला । कोठें गे सांवळा । कां रथ शृंगारिला । सांगे वो मजला । अक्रुर उभा असे बाई गे साजणी ॥१॥ या नंदाच्या आंगणीं । मिळाल्या गौळणी ॥ ध्रु० ॥ बोले नंदाची पट्टराणी । सद्गदीत होउनी । मथुरेसी चक्रपाणी । जातो गे साजणी । विव्हळ झालें मन वचन ऐकोनी ॥ २॥ अक्रूरा चांडाळा । तुज कोणी धाडिला । कां घात करूं आलासि । वधिशी सकळां । अक्रुरा तुझी नामा ऐसी न करणी॥ ३॥ रथीं चढले वनमाळी। आकांत गोकुळीं। भूमि पडल्या व्रजबाळी । कोण त्या सांभाळी । नयनींच्या उदकानें

भिजली धरणी ॥ ४ ॥ देव बोले अक्रूरासी । वेगें हांकी रथासी । या गोपींच्या शोकासी न पहावे मजसी । एकाजनार्दनीं रथ गेला निघोनी ॥ ५ ॥

३७७३ उद्धवासी एकांतीं बोले गुज सांवळा । गोकुळासी जाउनी बोधीं सुंदरी गोपीबाळा । रथीं बैसोनी निघाला वेगीं पावला गोकुळा । तो उद्धव देखोनी दृष्टी गोपीनीं वेढिला ॥ १॥ उद्धवा जाय मथुरेला । आणीं लौकरी हरीला ॥ धृ० ॥ मुख सुंदर शोभे कपाळीं टिळक रेखिला । नवरत्न जडित मुद्रिका हार कंठीं घातिला । झळकती कुंडलें कानीं शिरीं मुगुट शोभला । मुरली धरूनी अधरीं नाचे यमुना तीरीं देखिला ॥२॥ मथुरेसी राहिला हरी विसरोनी आम्हांसी। कुब्जेनें मोहिला भाळला तिच्या रूपासी । डोळे पिचके खुरडत जे चाले काय वानूं मुखासी । शुद्ध भाव देखोनी तिचा अनुसरला तियेसी ॥ ३ ॥ रासमंडळीं नाचे मुरारी कधीं भेटेल तो न कळे । वेणु वाजवी सुस्वर सोज्वळ पदकमळें । धणी न पुरे तया पाहतां मन आमुचें वेधिलें ॥ ४ ॥ हा अक्रूर कोठोन आला हरि गेला घेउनी। तो वियोग जाळी न जाय जीव आमुचा अझुनी । घरदार सोडोनी जावें गोकुळ हें सांडोनी । उद्धवा कधीं भेटविसी हरीला आणुनी ॥ ५ ॥ घडी घडी घरां येतो चोरितो श्रीहरी । तो झडकरी दाखवीं उद्धवा लौकरी । धन्य प्रेम तयाचें सद्गदित अंतरीं । एकाजनार्दनीं हरिरूपीं वेधल्या नारी ॥ ६ ॥

३७७४ प्रथम मत्स्य अवतारीं तुमचें अगाध चरित्र । न कळे ब्रह्मादिकां वैष्णव गाती पवित्र ॥ १ ॥ उठोनी प्रातःकाळीं गौळणी घुसळण घुसळिती । गाती कृष्णाचे पोवाडे हृदयीं परोपरी ध्याती ॥ २ ॥ द्वितीय अवतारीं आपण कच्छरूप जाला । सृष्टि धरूनी पृष्ठीं शेवटीं सांभाळ केला ॥ ३ तृतीय अवतारीं आपण वराहरूप झाला। धरणी धरूनी दाढे हिरण्याक्ष वधिला ॥ ४ ॥ चतुर्थ अवतारीं आपण

नरहरि रूप। रक्षुनी प्रल्हाद वधिला हिरण्यकश्यप ॥५॥ पांचवे अवतारीं आपण वामन झाला। बळी घालुनी पाताळीं शेखीं द्वारपाळ ठेला ॥ ६ सहावे अवतारीं आपण परशुराम झाला। धरूनी परशु हातीं सहस्रभुजा वध केला ॥ ७ ॥ सातवे अवतारीं आपण दाशरथी राम। वधोनी रावण कुंभकर्ण सुखी देव परम ॥ ८ ॥ आठवे आवतारीं आपण वसुदेवा घरीं। वधोनी कंसादिक असुर मारिले भारी ॥ ९ ॥ नववे अवतारीं आपण बौद्धरूप झाला। धरूनियां मौन भक्तांवरीं राहिला ॥ १० ॥ दहावे अवतारीं आपण झालासे वारु। एकाजनार्दनीं वर्णिला त्याचा बडिवारु ॥ ११ ॥

३७७५. भक्ति गोकुळीं नवविधा नारी। गजरे चालती भारी वो ॥ सुनीळ जळीं अति संतोषें। क्रीडती यमुना तीरीं वो ॥ १ ॥ स्थिर स्थिर माधवा विचार धरीं। आम्हीं परात्पर परनारी ॥ वासना वास अलक्ष लक्षोनी। दृष्टीचो करिसी चोरिरे ॥ २ ॥ आकंठ मग्न सुनीळ निरी। घन सांवळा देखोनि वरी। येथोनि निघतां लाज मोठी। विनोद न करीरे ॥ ३ ॥ लाज सांडोनि धरा चरण। तंव मी होईन प्रसन्न ॥ एकाजनार्दनीं निःशंक झाल्या। जीवींची जाणुनि खूण वो ॥ ४ ॥

३७७६ चंद्राहुनी शीतळ रवीहुनी सोज्वळ। तेणें मज केवळ वेधियलें ॥ १ ॥ वेध कैसा मज लागला वो बाई ॥ ॥ ध्रु० ॥ अमृताहुनी स्वादु गगनाहुनी मृदु। रूपेंविण आनंदु देखिला बाई ॥ २ ॥ एकाजनार्दनीं आनंदु परिपूर्ण। कायावाचा मनें वेधिलें वो आई ॥ ३ ॥

३७७७ आजी वो कां हो कृष्ण नाहीं आला। म्हणोनि खेद करी गौळणी बाळा। काय वो ऐसा देहीं लागला चाळा। कां रे न येसी बाळा नंदाचिया ॥ १ ॥ कवण देवा नवसीं नवसूं। कवणा गुरुतें मार्ग पुसूं। कैं भेटेल हा हृषिकेशू। म्हणोनि मन जाहलें उदासू ॥२॥

कृष्ण आजी कां घरीं नये । आतां काय करूं यासी उपाय । काजनार्दनीं धरूं जाय पाय । तैंच दरशन होय आजी याचें ॥ ३ ॥

३७७८ देह गेह कर्म सारूनी । शेजे पहुडली निज समाधानीं । णवेणुगीत ये श्रवणीं । वृत्ति उचलली भेटी लागुनी वो ॥ १ ॥ वीं लागलें हरीचें ध्यान । कांहीं केलिया न राहे मन । प्रेम पडिभरें ासे स्फुंदोन । हरिचरणीं तें वेधिलें मन वो ॥ २ ॥ लाज सांडोनी ळें निर्लज्ज । सासुसासऱ्यासी नाहीं मज काज । माया माहेर गळें सहज । हरिचरणीं तों वेधलें निज वो ॥ ३ ॥ चिदाकाशीचें ाळ चांदिणें । कृष्ण प्रभा ते चंद्र परिपूर्ण । ध्येय ध्यातां खुंटलें ागुणें । एकाजनार्दनीं सहज एकपणें वो ॥ ४ ॥

३७७९ ज्ञाति कूळ सांडिलें आम्हीं वेगीं । माया माहेर त्यजिलें ागीं । अंग अर्पिलें अंगींचीये अंगीं । शेखीं रत- से दासी कुब्जेलागीं ॥ १ ॥ सर सर निर्गुणा तूं अगुणाचा हरी । ळी असतां जालासी कैसा दुरी । चित्त उतटे चिंतितां निरंतरी । मावळलें न दिसे दृश्याकारी वो ॥ २ ॥ तुज लागीं सांडिला ा । तुजविण विटला विषयभोग । जळो तुझा उपदेश सांगसी आम्हां देईं सप्रेम संयोग ॥ ३ ॥ एक म्हणती गे सांडा ाटी । शब्दा नातुडे कोरड्या ज्ञानगोष्टी । आजिचा सुदीन ्णीं झाली भेटी । हरुषें निर्भर स्वानंदें भरली सृष्टी ॥ ४ ॥ म्हणती गे सांडा शब्दज्ञान । ध्येय जोडलें काइसें आतां ध्यान । भजक एक झालें भजन । गेली त्रिपुटी मिथ्या मोक्ष बंधन । एक म्हणती गे चला मांडु रासू । झणे उगवेल मायामय ु । दैवें जोडला गे कृष्ण परमहंसु । शोधा निजतत्व सांडोनि ु ॥ ६ ॥ गोपी मंडळी मिळाली कृष्णापाशीं । जैशा मिनल्या रविबिंबासी । कृष्ण भोगितां नाठवे दिनानिशी । एका नीं ऐक्यता प्रेमेसी ॥ ७ ॥

३७८० कृष्णमूर्ति होय गे कळों आली सोय गे। प्राणाचाही प्राण पाहतां सुख सांगूं काय गे॥ १ ॥ तुळसी माळ गळा गे कस्तुरीचा टिळा गे। अर्धांगी रुक्मिणी त्रिझणें वारिती गोपी बाळा गे ॥ २ ॥ पीतांबराची कास गे कसिली सावकाश गे। नारद तुंबर गायन करती पुढें निजदासगे ॥ ३ ॥ भक्त कृपेचि माय गे गोकुळीं आली विठाई गे। एकाजनार्दनीं विटे जोडियेले पायगे ॥ ४ ॥

३७८१ चला बाई वृंदावनीं रासक्रीडा पाहूं। नंदाचा कान्हु केला नवलाऊ ॥ १ ॥ कल्पनेची सासु इच्छा बहुताचि जाचु। २ भाव ठेऊनी पायीं ब्रम्हपदीं नाचूं ॥ २ ॥ सर्व गर्व सोडूनी बाई चला हरीपाशीं। द्वैतभाव ठेवुनी पायीं हरिरूप होसी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं विश्वव्यापक हा देव। एक एक पाहतां अवघें स्वप्नवत् वाव ॥ ४ ॥

३७८२ ब्रम्ह कैसें वेडावलें गे बाईये ॥ ध्रु० ॥ निर्गुण होतें सगुणा आलें। त्रिभुवन उद्धरिलें बाईये ॥ १ ॥ घेउनी वसुदेवें गोकुळा नेलें। यशोदेनें खेळविलें गे बाईये ॥ २ ॥ एका एकपण तेंही नेलें। जनीं जनार्दन केलें गे बाईये ॥ ३ ॥

३७८३ काळी घोंगडी हातीं कांठी। लागला धेनूचे पाठीं ॥ अरे हरी व्रज वांकुडा कीं तुजसाठीं। बैसला यमुनेचे तटीं ॥ राधा गोरटी हातीं वाटी। लागली कृष्णाचे पाठीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं झाली दाटी। घातली पायांवर मिठी ॥ ४ ॥

३७८४ देखिला अवचिता डोळां सुखाचा सागरु। मन बुद्धि हारपली झाले एकाकारु। न दिसे काया माया कृष्णीं लागला मोहरु ॥ १ ॥ अह्मया आनंदारे अह्मया आनंदारे। वेधियल्या कामिनी अह्मया आनंदारे ॥ २ ॥ खुंटलें येणें जाणें घर सासुर। नाठवे आपपर वेधियेलें सुंदर। आंत सबाह्य व्यापिलें कृष्ण परात्पर नांदे वो ॥ ३ ॥ सावजी कळलें आतां लोधलें निर्गुणा। एकाजनार्दनीं कृपा केली परिपूर्णा। गगनीं गिळियलें येणें उरी नुरेचि आपणा ॥ ४ ॥

३७८५ वेणु:— अधरीं धरुनी वेणु । वेणु वाजविला कोणी नेणुं ॥ १ ॥ प्रातःकाळीं तो वनमाळी । घेऊनि जातो धेनु ॥२॥ उभी मी राहे वाट मी पाहें । केव्हां भेटेल मम कान्हु ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वाजविला वेणु । ऐकतां मन जालें तल्लीनु ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

३७८६ त्वचेचिया राना धाडूं नको मना । तेथें नंदाचा कान्हा डोळा घालि गो आयियो ॥ १ ॥ गाईचा गोंवळा यमुनेचा पावळा । धरिला माझा अंचुळा मग मी पळालिये गो ॥ ध्रु० ॥ ताकापिरिं गोवाळिं केली मजसी रांडोळी । भावें नारली मग मी पळालिये गो ॥ २ ॥ गळा गुंजमाळा गांठी । डांगा मोरविसा वेठी । सोकरू लागे पाठीं । नंदरायाचा गो आयियो ॥ ३ ॥ एक्याकरें धरि । बिजा करें वेढारी । चुंबन दे हरि । मग मी पळालिये गो ॥ ४ ॥ ऐसि पळत पळत गेलिये । कान्होनें मोहिलिये । माझी मीचि जालिये । मग मी समोखिलिये गो ॥ ५ ॥ तुना चारा लागते गोर । तुना बोर लागतो गोर । तुना वाही माजी चार । माझी आईयो गो गो ॥ ६ ॥ पूर्वपुण्य फळलें । देहमुक्त झालें । बापरखुमादेवीवरा विठ्ठलें ऐसें केलें गो आइयो ॥ ७ ॥

३७८७ रांगतु रंगणीं चोरितु लोणी धांवोनि धरिती गौळणी । बांधति चरणीं देति गान्हाणीं यशोदे साजणी । दधिघृत भक्षून तमाळनीळें नवल केलें साजणी ॥ १ ॥ कृष्ण अळिवा अळिवा । परतोनि मातें दावा ॥ ध्रु० ॥ कृष्णा कान्हा मधुसूदना कामिनी मनमोहना । योगिध्याना हरस्मरणा गोपीध्याना । मानिति कान्हा बोलति यमुना ॥ २ ॥ नेणवसी नेणवसी । आकळ तूं नाकळसी ॥ ध्रु० ॥ इंद्रनिळा श्रुतीजन किरळा । सुरीजन घनसांवळा । कंठीं माळा कौस्तुभ

गळां प्रीति तुळसीदळा । कांसे शेला सोनसळा उभा बाळिभद्रा-जवळा ॥ ३ ॥ कृष्ण सांवळा डोळसु । सहज परम हंसु ॥धृ०॥ सदा-नंदा श्रीमुकुंदा श्रीहरि परमानंदा आनंदकंदा । अभय प्रल्हादा पावकनादा धेनुलुब्धा गोविंदा गोपाळा ॥ ४ ॥ कृष्ण आमुचा आमुचा । खेळिया गौळियाचा ॥ धृ० ॥ कर्पूरगौरा मनस्थिरा पुराण गुणगंभिरा । विरादिविरा महावीरा पांडवदळ साहा-कारा । मथुरा नगरा कंसासुरा शिक्षा लाविसी चाणुरा । अति-सुंदरा तूं पंढारा बापरखुमादेवीवरा रे । कृष्णा जाणितलें । माझें मज दिधलें ॥ ५ ॥

३७८८ एकुचि एकला जाला पैं दुसरा । एकीमेकी सुंदरा खेळ-विती ॥ १ ॥ माझिये कडिये तान्हा तुझिये कडिये कान्हा । देवकी यशोदा विस्मो करिती मनीं ॥ धृ० ॥ बापरखुमादेवीवरु आवडे मना । जगत्रजीवनु कान्हा बाईयांनो ॥ २ ॥

३७८९ काय सांगूं तूंतें बाई काय सांगूं तूंतें ॥ धृ० ॥ जात होतें यमुने पाणिया वातेत भेतला सांवळा । दोईवल तोपी मयुल-पुछाची खांद्यावली कांवला ॥ १ ॥ तेणें माझी केली तवाली मग मी तेथुनी पलाली । पलतां पलतां घसलून पलली दोईची घागल फुतली ॥ २ ॥ माझे धुलगे फुतले मग मी ललत बथले । तिकून आले शालंगपाणी मला पोतासीं धलिलें ॥ ३ ॥ मला पोताशीं धलिलें माझें समाधान केलें । निवृत्तीचे कृपें सुख हें ज्ञानदेवा लाधलें ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

३७९० गोपिका वेल्हाळा । अवघ्या मिळोनी सकळा । चालिल्या यमुना जळां । तंव सन्मुख देखिला सांवळा वो ॥ १ ॥ राधा म्हणे बहु चाळक होसी । नसतां आळ कां आम्हांवर घेसी । त्वां देखोलें

यशोदेसी । हा लबाड लटका हृषीकेशी वो ॥ २॥ यशोदा म्हणे कवटाळिणी । नसती खोडी करितां देखुनी । सांगतां गाऱ्हाणें येऊनी । गुणातीत हा चक्रपाणी वो ॥ ३ ॥ राधा म्हणे यशोदा सुंदरी । चोरटा शिंदळ तुझा मुरारी । आम्हां ठाऊक अंतरीं । हा न करी तें करी काय सांगूं वो ॥ ४ ॥ हा ब्रम्हांडनायक । येणें मोहिले तिन्ही लोक । सेना म्हणे यदुनायक । कर्मातीत परिपूर्ण वो ॥ ५ ॥

३७९१ दूती जाणवित स्वामिनी । काम दाटला हृदयभुवनीं । कां पा नयेचि सारंगपाणी । सेजे पाहतां न दिसे नयनीं ॥ १ ॥ मज भेटवागे श्रीहरी । लागला वेध त्याचा अंतरीं । ध्यानीं बिंबलागे मुरारी । प्राण रिघो पाहे जरी ॥ २ ॥ गोड न लागे काम धंदा कांहीं । नावरे चीर चोळी पाहीं । सुमनसेज रुपती बाई । चित्त वेधलें हरी पायीं वो ॥ ३ ॥ वृत्ति स्वानंदीं निमग्न । गेली देहभाव विसरून । रंगीं रंगली परिपूर्ण । धन्य धन्य सेना म्हणे ॥ ४ ॥

३७९२ जाती मिळोनि पांच सात गवळणी । गोरस विकूं मथुरे लागोनी । वाटे आडवोनी दान मागे चक्रपाणी ॥ ध्रु० ॥ सोडी सोडी मज जाऊं दे हरी । नको वाटे आडवूं म्हणे मुरारी । घरीं जावा नणंदा जाचिती कीं भारी ॥ १ ॥ म्हणती गवळणी हरिसि हसूनी । देऊं तुजलागिं नवनीत चोरुनी । जाऊं पाहती ठकवुनी हरिसी गवळणी ॥२॥ ब्रह्मांडाचा नायक म्हणे गोपिकांसी । ब्रह्मज्ञानी महान चाळविले ऋषी । गाई गोपाळ चोरिलें नाडिलें ब्रह्मयासी ॥ ३ ॥ भक्तिभावें गवळणी रिघाल्या शरण । वृत्तिसहित विबल्या अवघ्या परिपूर्ण । सेना म्हणे विसरल्या कार्य आठवण ॥ ४ ॥

३७९३ एक येश्वदे साजणी । या कृष्णाची करणी । दहीं दूध खातो चोरूनी । टाकी भाजणें फोडोनी ॥ध्रु०॥ सांभाळ आपुला हरी गे । उगा न राहे क्षणभरी गे । येणें धमकाविल्या पोरी गे । काय सांगो भांडखोरी गे ॥ १ ॥ करी कारणें कळेना गे । हृदयीं धरितो सुना गे ।

भोग भोगितो शहाणा गे । आंगीं लागूं देईना गे ॥ २ ॥ हा दिसतो भोळा गे । येऊनि घालितो डोळा गे । सावल करितो गोळा गे । नाहीं काळ वेळा गे ॥ ३ ॥ सावळा जगजेठी गे । चित्तचोर कपटी गे । हा न कळे वेदश्रुति गे । येणें हरली कामवृत्ती गे ॥ ४ ॥ हें बाळक नंदाचें । भाग्य फळलें गवळ्यांचे । सेना म्हणे धन्य साचें । पुण्य त्या गोपींचें ॥ ५ ॥

३७९४ राधा जाणवित दूतीं । कामें व्यापिलें न गमे राती । कां वा गोवळा नये निश्चिती । यानें वेधली चित्तवृत्ति ॥ धृ० ॥ मज दाखवा गे हरिसी । ध्यान लागलें मानसीं । त्याविण न गमे दिवस निशीं । डोळा हृषीकेशी दावा मज ॥ १ ॥ मिळोनि गोपीनीं मोहिला । कीं सत्यभामेनें दान केला । नारद हरिसी घेऊनि गेला । नेणो गुंतला सदैवा घरीं ॥ २ ॥ धाडिलें गरुडासी । वेगीं आणावें हनुमंतासी । अभिमान होता सत्यभामेसी । नेऊनिया सभेसी विटंबिली ॥ ३ ॥ माया लाघवी सूत्रधारी । बोलतां बोल खुंटली वैखरी । धरिला गोपिकांनीं अंतरीं । सेना म्हणे धन्य त्या नागरी वो ॥ ४ ॥

---

# विराहिण्या

## श्रीतुकाराममहाराज

३७९५ वाळो जन मज म्हणोत शिंदळी । परी हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥ सांडूनी लौकिक झालियें उदास । नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥ नाइकें वचन बोलतां या लोकां । म्हणे झालों तुका हरिरता ॥ ३ ॥

३७९६ आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा । म्हणोनि व्यभिचारा टेकालियें ॥ १ ॥ रात्रंदिस मज पाहिजे जवळी । क्षण त्या निराळी न

गमे घडी ॥ २ ॥ नाम गोष्टी माझी सोय सांडा आतां । रातलें अनंता तुका म्हणे ॥ ३ ॥

३७९७ हाचि नेम आतां न फिरें माघारीं । बैसलें शेजारीं गोविंदाचे ॥ १ ॥ घररिघी जालें पट्टराणी बळें । वरिलें सांवळें परब्रह्म ॥ २ ॥ बळियाचा अंगसंग जाला आतां । नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥ ३ ॥

३७९८ नाहीं काम माझें काज तुम्हांसवें । होतें गुप्त ठावें केलें आतां ॥ १ ॥ व्यभिचार माझा पडिला ठाउका । न सरती लोकांमाजीं जालें ॥ २ ॥ न धरावा लोभ कांहीं मजविशीं । जालें देवपिशी तुका म्हणे ॥ ३ ॥

३७९९ विसरलें कुळ आपुला आचार । पति भावे दीर घर सोय ॥ १ ॥ सांडिला लौकिक लाज भय चिंता । रातलें अनंता चित्त माझें ॥ २ ॥ मज आतां कोणी आळवाल झणीं । तुका म्हणे कानीं बहिरी झालें ॥ ३ ॥

३८०० न देखें न बोलें नाइकें आणिक । बैसला हा एक हरि चित्तीं ॥ १ ॥ सासुरें माहेर मज नाहीं कोणी । एक केलें दोन्हीं मिळोनियां ॥ २ ॥ आळ आला होता आम्हीं भांडखोरी । तुका म्हणे खरी केली मात ॥ ३ ॥

३८०१ दुजा ऐसा कोण बळी आहे आतां । हरि या अनंतापासूनियां ॥ १ ॥ बळियाच्या आम्हीं जालों बळिवंता । करूं सर्व सत्ता सर्वांवरी ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हीं जिवाच्या उदारा । जालों प्रीतिकरा गोविंदासी ॥ ३ ॥

३८०२ क्षणभरि आम्हीं सोसिलें वाईट । साधिलें अविट निजसुख ॥ १ ॥ सांडीमांडी मागें केल्या भरोवरी । अधिकेंच परी दुःखाचिया ॥ २ ॥ तुका म्हणे येणें जाणें नाहीं आतां । राहिलों अनंताचिये पायीं ॥ ३ ॥

३८०३ आम्हां आम्हीं आतां वडील धाकुटीं । नाहीं पाठीं पोटीं कोणी दुजें ॥ १ ॥ फावला एकांत एकविध भाव । हरि आम्हांसवें सर्व भोगी ॥ २ ॥ तुका म्हणे अंगसंग एके ठायीं । असो जेथें नाहीं दुजें कोणी ॥ ३ ॥

३८०४ सर्व सुख आम्हीं भोगूं सर्व काळ । तोडियेलें जाळ मोहपाश ॥ १ ॥ याचसाठीं सांडियेलें भरतारा । रातलों या परपुरुषाशीं ॥ २ ॥ तुका म्हणे आतां गर्भ नये धरूं । औषध जें करूं फळ नव्हे ॥ ३ ॥

३८०५ एका जिवें आतां जिणें जालें दोहीं । वेगळीक कांहीं नव्हे आतां ॥ १ ॥ नारायणा आम्हां नाहीं वेगळीक । पुरविली हे भाक सांभाळिली ॥ २ ॥ तुका म्हणे जालें सायासाचें फळ । सरली ते वेळ काळ दोन्ही ॥ ३ ॥

३८०६ हासों रुसों आतां वाढवूं आवडी । अंतरीची गोडी अवीट ते ॥ १ ॥ सेवा सुखें करूं विनोद्वचन । आम्हीं नारायण एकाएकीं ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हीं झालों उदासीन । आपुल्या आधीन केला पति ॥ ३ ॥

३८०७ मजसवें आतां येऊं नका कोणी । सासुरवासिनी बाइयांनो ॥ १ ॥ न साहवे तुम्हां या जनांची कूट । बोलति वाईट ओखटें तें ॥ २ ॥ तुका म्हणे झालों उदास मोकळ्या । विचरों गोवळ्यासवें आम्हीं ॥ ३ ॥

३८०८ शिकविलें तुम्हीं तें राहे तोंवरी । मज आणि हरी वियोग तो ॥ १ ॥ प्रसंग या नाहीं देहाची भावना । तेथें या वचना कोण मानी ॥ २ ॥ तुका म्हणे चित्तीं बैसला अनंत । दिसों नेदी नित्य अनित्य तें ॥ ३ ॥

३८०९ सांगतों तें तुम्हीं आइकावें कांनीं । आमुचे नाचणीं नाचूं नका ॥ १ ॥ जोंवरी या तुम्हां मागिलांची आस । तोंवरी उदास

होऊं नका ॥ २ ॥ तुका म्हणे काय वायांविण धिंद । पति ना गोविंद दोन्ही नाहीं ॥ ३ ॥

३८१० आजिवरी तुम्हां आम्हां नेणपणें । कौतुकें खेळणें संग होता ॥ १ ॥ आतां अनावर झालों अगुणाची । करूं नये तींचि करीं सुखें ॥ २ ॥ तुका म्हणे आतां बुडविलीं दोन्हीं । कुळें एक मनीं नारायणा ॥ ३ ॥

३८११ सासुरियां वीट आला भरतारा । इकडे माहेरा स्वभावेंचि ॥ १ ॥ सांडवर कोणी न धरिती हातीं । प्रारब्धाची गति भोगूं आतां ॥ २ ॥ न व्हावी ते जाली आमुची भंडाई । तुका म्हणे काई लाजों आतां ॥ ३ ॥

३८१२ मरणाही आधीं राहिलों मरोनी । मग केलें मनीं होतें तैसें ॥ १ ॥ आतां तुम्ही पाहा आमुचें नवल । नका वेंचूं बोल वायांविण ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्ही भयाभित नारी । कैसी संग सरी तुम्हां आम्हां ॥ ३ ॥

३८१३ परपुरुषाचें सुख भोगे तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥ संवसारा आगी आपुलेनी हातें । लावूनी मागुतें पाहूं नये ॥ २ ॥ तुका म्हणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपावरी ॥ ३ ॥

३८१४ आइकला परी ऐसें नव्हे बाई । न सांडावी सोई भ्रताराची ॥ १ ॥ नव्हे आराणूक लौकिकापासून । आपुल्या आपण गोविलें तें ॥ २ ॥ तुका म्हणे मन कराल कठीण । त्या या निवडोन मजपाशीं ॥ ३ ॥

३८१५ आहाच आहाच आंत वरी दोन्ही । न लगा गढणी आम्हां तैशा ॥ १ ॥ भेऊं नये तेथें भेडसावूं कोणा । आवरूनि मना बंद द्यावा ॥ २ ॥ तुका म्हणे कांहीं अभ्यासावांचुनी । नव्हे हे करणी भलतीच ॥ ३ ॥

३८१६ बहुतांच्या आम्ही न मिळों मतासी । कोणी कैसी कैसी भावनेच्या ॥ १ ॥ विचार करितां वायां जाय काळ । लटिकांचे मूळ फजितीचें ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्ही करा घटापटा । नका जाऊं वाटा आमुचिया ॥ ३ ॥

३८१७ त्याचें सुख नाहीं आलें अनुभवा । कठीण हें जीवा तोंचि वरी ॥ १ ॥ मागिलांचें दुःख लागों नेदी अंगा । अंतर हे संगा नेदी पुढें ॥ २ ॥ तुका म्हणे सर्वविशीं हा संपन्न । जाणती महिमान श्रुति ऐसें ॥ ३ ॥

३८१८ न राहे रसना बोलतां आवडी । पायीं दिली बुडी माझ्या मनें ॥ १ ॥ मानेल त्या तुम्हीं आइका स्वभावें । मी तों माझ्या भावें अनुसरलें ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्हीं फिरावें बहुतीं । माझी तो हे गति जाली आतां ॥ ३ ॥

३८१९ न बोलतां तुम्हां कळों नये गुज । म्हणऊनि लाज सांडियेली ॥ १ ॥ आतां तुह्मांपुढें जोडीतसे हात । नका कोणी अंत पाहों माझा ॥ २ ॥ तुका म्हणे आम्हीं बैसलों शेजारीं । करील तें हरि पाहों आतां ॥ ३ ॥

## श्रीनिळोबामहाराज

३८२० खेळिं खेळतां वो विकळ सुंदरा । जालि आठवितां नंदाच्या कुमारा । स्वेद कंप खेद हाटला शरीरा । जाला विरह तो नेणती ईतर वो ॥ १ ॥ धरा आवरुनी म्हणाति वो साजणी । धिर न धरत पडीलि धरणी । येकी सांगाति वो जालि झडपणी । वेगिं आणा आतां पंचाक्षरी गुणी वो ॥ २ ॥ जातो प्राण वो येताति लहरे । येकी म्हणति वो डंखिली विखारें । आंग तापलें वो येतु आसे शियारे । येकी म्हणति वो मोड सियेचा भरें वो ॥ ३ ॥ येकि म्हणाति गे लागलें दैवत । कुळिचें दारूण वो नेदि करूनि मात । घाला गोंधळ वो विनवा समस्त । ठेवा आण भाक करूनि एक

चित्त वो ॥ ४ ॥ ऐसा मिळाला वो भोवताला पाळा । होति चुकुर येकी रडताती बाळा । पाजा वोखदें वो वांचवा वेल्हाळा । नका उसिर गे धांवा उतावेळा वो ॥ ५ ॥ मग ते येकांतिची सांगे सखियासी । नका बाहेरि वो फुटों कोणापाशीं । आणा नंदाचा नंदनु येकांतासी । निळया स्वामीचीं हे भावना निश्चयेसी वो ॥ ६ ॥

३८२१ देतां आलिंगन नंदाच्या कुमरा । पडेल उतार हे वांचेल सुंदरा । नका आड घालूं संदेह दुसरा । लावा उठवुनि जाऊंद्या इतरा वो ॥१॥ ऐसे बोलति त्या जिविच्या जिवलगा । झाला विरह गे वांचवा सुभगा । आणा पाचारूनी गे एकांता श्रीरंगा । दुजा उपावोंचि न चले या प्रसंगा वो ॥ २ ॥ आहे ठाउकें हें अंतरीं आम्हांसी । याचा वेध झाल्या दशाचि हे ऐसी । होते आटणी गे जीवा आणे शिवासी । तेथं देहबुद्धि नाठवे देहासी वो ॥ ३ ॥ हृदयीं होतांचि या कामाचा संचार । न्यावा एकांतासि निष्काम यदुवीर । देईल सुख तोचि नाहीं ज्यासि पार । सांडा चावटी आणिक विचार वो ॥ ४ ॥ नाहीं अनुभव हा ठाऊक जयासी । त्याचि भोगिती या अनुदिनीं दुःखासी । येति जाति पुन्हा होति कासाविसी । आम्हीं न विसंबों या सांवळ्या कृष्णासी वो ॥ ५ ॥ नाहीं जीवीं या जीविताची चाड । याच्या संगसुखें घालूं वो धुमाड । स्वामी निळयाचा पुरवील कोड । आणा तोचि आतां सांडा बडबड वो ॥ ६ ॥

३८२२ येणें एकलें वो जाणे ही शेवटीं । येथें राहाणेंचि नाहीं कल्पकोटी । जोडिलें धन तें न चले लक्षकोटी । म्हणोनि आलियें या सांवळियाचे भेटी वो ॥ १ ॥ आतां घाला वो याच्या पायांवरी । हाचि चुकवील जन्माचि भोंवरी । शिणलें बहुत वो चौऱ्याशीचे फेरी । तोडील चिंता हा होचि आशा थोरी वो ॥ २ ॥ बहुत गांजियेलें माया मोह भ्रमें । रततां विषयीं या विषयाच्या कामें । करितां भरोवरी रित्या मनोधर्में । याशी कृपा येतां हरील हा कर्में वो ॥ ३ ॥

कामक्रोधीं वो जांचिलें बहुत । नेदी राहों वो क्षण एक निवांत । वरी पडती वो गर्वाचे आघात । म्हणोनि विनवणी सांगा त्वरित वो ॥ ४॥ आशा कल्पना या मातल्या पापिणी। मनसा चिंता डंखिती सर्पिणी। येती लहरे वो जाणिवेची जाचणी । म्हणोनि विनाविते हेचि क्षण-क्षणीं वो ॥ ५ ॥ आहे शेवटिचें माझें येथें पेणें । वाटे निश्चय हा याचिया दर्शनें । राहिलें चित्तीं वो याचेंचि चिंतनें । निळा म्हणे आजि ऐकिलें गार्‍हाणें वो ॥ ६ ॥

३८२३ काय करूं वो भुलविलें भुलीं । चित्त माझें या विषयाचे चालीं । आड कल्पना ठाकोनि राहिली । त्याणें संगति वो याची अंतरली वो ॥ १ ॥ पायां पडतें वो दाखवा मज वाट । कर्माकर्मी चुकवुनियां घाट । कामक्रोधांचे ऐकोनि बोभाट । भय वाटे तें हें देखोनि दुर्घट वो ॥ २ ॥ मज तो विचार न सुचे आपुल्या मतें । न्याल तुम्ही त्या येईन सुपंथें । घेउनि धर्म मज पाववा वो तेथें । जेथें असती सांवळे गोपीनाथ वो ॥ ३ ॥ कोठें गेलें या करूं वार-वारा । आगीं लागो या अघोरा संसारा । पडते गुंति हा अधिकाचि पसारा । भेटवा आतां मज न्या वो सारंगधरा ॥ ४ ॥ येथें होती हे बहुतचि उत्पात । जन्म जरा या व्याधींचे आघात । भुललें वाट वो न मिळतां संघात । तुम्हि पाववा वो रमानाथ जेथें वो ॥ ५ ॥ आहे भरवंसा हा तुमचाचि मज । संत जाणतसां अंतरीचें गुज । आले शरण ते पावती सहज । निळा म्हणे आतां राखा माझी लाज वो ॥ ६ ॥

३८२४ वदन निमासुरें कटावरी कर । उभा विटेवरी पुंडलिका समोर । चरणीं ब्रीदावळी रुळती असुर । वरी वाळे वांकी रुण-झुणिती मधुर वो ॥ १ ॥ तेणें नवलचि केलें वो साजणी । सहज अवलोकितां संचरला नयनीं । त्याविण न दिसेचि दुजें जनीं वनीं । जें जें दिसें तें तें हाचि भासे मनिं वो ॥ २ ॥ कांसे कासिला वो मिरवे सानसेळा । कटीं कटिसूत्र जडित मेखळा । उदरीं त्रिवळी वो

तुळसी वनमाळा । कौस्तुभ पदकें द्विजचरणांकुश सोज्वळा ॥ ३ ॥ मुखमयंक पूर्णांश उगवला । भक्त चकोरासी अमृतें वरुषला । दंत हिऱ्याचा प्रकाश फांकला । आधार सोज्वळ वो नासाग्र सरळा वो ॥ ४ ॥ निढळिं रेखिलें वो केशर झळके । श्रवणीं कुंडलांचें तेज फांके । नयनीं सुतेज विद्युल्लता चमके । माथां मुगुटावरी मयूर-पिच्छ स्तवकें वो ॥ ५ ॥ सुंदर साजिरें वो स्वरूप ठाण माण । तेणें आकर्षिले माझे पंचप्राण । नावडे आणिक वो त्याचिच मज आण । निळा म्हणे मी माझी याचि झाली वोळवण वो ॥ ६ ॥

३८२५ माझी मजचि वो पडियली भुली । गेलें मर्यादा वो विसरोनि आपुली । याची अणुमात्र पडतांचि साउली । वृत्ति तदाकार होऊनियां ठेली वो ॥ १ ॥ आलें वाचे तेंचि करितेंचि करिते वडबड । नये भ्रांतीचे वो वस्त्र दृष्टी आड । मना आलें तैसा नाचतें धुमाड । नेणों काय पुरें आरंभला नाड वो ॥ २ ॥ नाहिं देखिलें तें येउनि पडे दृष्टी । तेंचि उच्चारे वो येउनि वाचे ओटीं । नेणोनि अनुभवा ज्ञानाची कसोटी । नेणो काय येउनी सांठवलें पोटीं वो ॥ ३ ॥ वाचे अनिर्वाच्य येउनि आदळे । हृदयीं वाडगेंचि होताती सोहळे । उठिति स्फूर्तिचेचि क्षणक्षणा उमाळे । माझिये जाणीवेचे फोडूनि पेंडोळे वो ॥ ४ ॥ होतें तैसें तुम्हां निवेदिलें पाईं । नकळे यावरी तुमचे कृपेची नवाई । ठेवाल जैसें तेथें राहावे ते ठाईं । कैंचि सत्ता आम्हां बोलावें तें काई वो ॥ ५ ॥ यावरी कराल तें तुह्मि करा देवा । मी तों नुरोनियां उरलें देहभावा । कांहींचि नेणोनियां हिताहित तेव्हां । निळा म्हणे साक्षी तुह्मिचि या सर्वा वो ॥ ६ ॥

३८२६ ऐशि या सुखामाजीं राहेन सुखरूप । दुजा वागों नेदी आड येउं संकल्प । भोगिन याचेचि वो सर्वदा पडप । करूनि भावना अखंड तद्रूप वो ॥ १ ॥ ऐशी हे निश्चयाची सांगितली मात । तुम्ही ही आयका हो कृपावंत संत । न कळे माझा मज सत्याचा इत्यर्थ ।

तुम्हीचि दावाल तो मानीन हितार्थ वो ॥ २ ॥ येईल चित्तासी ते सांगा विचारूनी । माझे निजहित तेंचि विवरूनी । मि तो नेणेचि वो यार्ची ये वाहाणी । हेचि कळासले हृदयभुवनीं वो ॥ ३ ॥ हाचि निजानंद आवडला मना । करूं सर्व काळ हेचि विवंचना । रूप दृष्टीपुढें धरूनि गाउं गुणा । करूनि तदाकार वृत्तीची भावना वो ॥ ४ ॥ याविण नावडे चित्ता ऐसें झालें । दिवसरात्रिं हें ध्यानचि लागलें । सांगति ईतरें तें नमनेचि भलें । नेणो कोण ऐसें कर्म उभें ठेलें वो ॥ ५ ॥ हेंचि राहेन वो धरूनियां दृष्टी । रूप नागर वो मुरली वाजे होंटीं । खांदिये घोंगडें वो घेउनि वेताटी । चाले गाई मागें सवें गोंवळ थाटी वो ॥ ६ ॥ ऐसिये आवडीचे पुरविले आरत । येउनि एकांतीं वो भेटले गोपिनाथ । तेणें मानस वो माझें झालें स्वस्थ । निळा म्हणे वो भोगिन एकचित्त वो ॥ ७ ॥

३८२७ येणें आपुलिया कृपेचिया गुणें । माझी पोषिली वो सर्वांग जीवनें । देउनी क्षेम अवघीं निवविलीं करणें । यासि काय देउनि व्हावें म्या उत्तीर्ण वो ॥ १ ॥ माझे जीवींचा हा जिवलग सोयरा । यासी करूनि काय पूजावें उपचारा । जें जें कीजे तो तो उपाधी पसारा । कैसेनि पावेल या निज निर्विकारा वो ॥ २ ॥ करूनि पूजुं जंव मंत्र तंत्र जप । तव हा शब्दातीत निर्गुण अरूप । कोण करूं यासि न पवेचि वो तप । ध्यानिं ध्यातां हा अरूपिं अरूप वो ॥ ३ ॥ यासि न पुरे वो जाणिवे जाणतां । यासि न चले वो शाहाणीव करितां । नाना तर्कवाद यापुढें वृथा । आतां कोणा करूं उपचार तत्वता वो ॥ ४ ॥ करितां योगाभ्यास न पवे ती सिद्धी । करितां नानायाग वाढति उपाधी । नित्यानित्य ज्ञानें अभिमानाचि वृद्धी । आतां कोण्यायुक्ति तोषवूं कृपानिधी वो ॥ ५ ॥ ऐसें जें जें करूं म्हणे आपुलिये मती । तें तें सांडि परतें न धरि हा हातीं । येकचि आवडे या शुद्ध भाव भक्ती । निळा म्हणे वर्म दाविलें हें संतीं वो ॥ ६ ॥

३८२८ एकलें न कंठवे याविण मज आतां । घेउनि विचरेन सर्वे प्राणनाथा । जनिं वनिं वो एकांतिं बसतां । न करिं वेगळा हा युगें कल्प जातां वो ॥ १ ॥ हातीं लागला वो युगादिचा निध । भाग्यें माझिया वो जोडियला सिद्ध । करूनि उपचार पूजिन सावध । न वंचि शरीर सेविन एकविध वो ॥ २ ॥ याचिये संगती वो सुखाचिया कोडी । वेचतां युगें कल्प मज वाटे घडी । भोगिन नित्य नवा जीवाचे आवडी । भरूनि निज दृष्टि पाहेन घडि घडि वो ॥ ३ ॥ अवघे निवेदिन अंतरिंचे भोग । यासि करूनियां सये अंगसंग । कांहीं न वंचितां मन बुद्धि अंग । भोगिन निजसेजे घेऊनि श्रीरंग वो ॥ ४ ॥ त्यागें जीवाचिया घालिन यासि मिठी । जातां युगसंख्या कल्पाचिया कोटी । धरिन अंतरिं वो बांधोनियां गांठी । यावरि न करिं मी कदा यासि तुटि वो ॥ ५ ॥ कळे अंतरींचा भाव या परेशा । होय प्रियवादें जैसा केला तैसा । पुरवी निजदासीं केला जो धिंवसा । निळा म्हणे आहे कृपावंत ऐसा वो ॥ ६ ॥

३८२९ एक ना दुसरें वो नव्हतें मजपासीं । मी मज नोळखतां आप आपणासी । होतिये निर्जनीं वो निराभास देसीं । नेणों कोणें आणियेलें कर्मभूमिसी वो ॥ १ ॥ तैंच पासुनियां विसरलें निजसुखा । वाटे जीव माझाचि परि मज वो पारिखा । देखोनि आपपर पात्र झालें बहु दुःखा । सांगों कोणापासिं सये जाला ऐसा वाखा वो ॥ २ ॥ मी मज माझियानि वेढाळिलें बाई । चित्तासि या चिंतनें वो घातलें प्रवाहीं । नेणेंचि विश्रांति कोठें विचरतां मही । जेथुनियां आलिये ते नाठवेचि कांहीं वो ॥ ३ ॥ नसतेचि कामक्रोध लागले हे वैरी । येउनियां आशा चिंता बैसल्या जिव्हारीं । द्वेष निंदेचिया नित्य नाना भरोवरी । कामना कल्पना ह्या दाटल्या शरीरीं वो ॥ ४ ॥ किती तरी करूं वो या संसारा पुरवणी । किती सोसूं येऊं जाऊं यमाचि जाचणी । किती येऊं जाऊं भोगुं नाना यातिचिया खाणी ।

किती गर्भवासीं बैसों थार अडचाणिं वो ॥ ५ ॥ ऐसि जाजावालि बहु अनुतापें बाळा । घेउनियां विकृतिया विषयाचा कंटाळा । मनोभावें चिंतिला वो श्रीरंग सांवळा । पावली निजस्थान पुनरपि म्हणे निळा वो ॥ ६ ॥

३८३० पाहों गेलियें वो नंदाचा नंदन । नेत्रिं लेऊनियां आर्तिचें अंजन । जेथें उभा होता राजीवलोचन । भोंवतें मेळउनी गडि संत सज्जन वो ॥ १ ॥ दृष्टि तेथेंहि निवालि वो इंद्रियें सकळ । जालियें तटस्थाचि देखोनियां घननीळ । मुकुट विराजित कुंडलें वनमाळ । सुंदर श्रीमुख चतुर्भुज सरळ वो ॥ २ ॥ शंख चक्र हातीं गदा पीतांबरधारी । देव्हडा पाउलिं वो मुरलि अधरीं । वाजवितां सप्तस्वर उमटति माझारीं । देखतां देहभाव नुरतीच शरीरीं वो ॥ ३ ॥ वेधीं वेधले वो ज्याचे विधाता हरिहर । इंद्र आदिकरूनी सकळहि सुरवर । सिद्ध महामुनि योगि ऋषीश्वर । नारद तुंबरादि महानुभाव थोर वो ॥ ४ ॥ तेथें कोण पाड आम्हा मानवांचा । ज्यातें न पुरति स्तवितां वेदवाचा । न कळे महिमा वो याच्या स्वरूपाचा । नयनिं पाहतांचि सुकाळ सुखाचा वो ॥ ५ ॥ रूप नागर वो सुंदर गोजिरें । चरणीं वाजती वो मंजुळ रुणझुणिति नुपुरें । ऐकतां निजानंदा होतसे चेईरे । निळा म्हणे माझें तेथेंचि मन मुरे वो ॥ ६ ॥

३८३१ मनिंचा माझिये वो संदेह फीटला । देव पाहों जातां जवळिच भेटला । अवघा मागें पुढें तोचि वो ठाकला । जनीं जनार्दनीं भरोनियां दाटला वो ॥ १ ॥ पुरलें जीवींचें आरत साजणी । पाहे जेथें तेथें दिसे चक्रपाणी । लोक लोकांतरीं त्याचिचि भरणी । भरोनि उरला अवघ्याचि वाणि खाणिं वो ॥ २ ॥ जाला सुकाळ हा सुखाचा मानसा । पडिला त्रिभुवनिं एकरूप ठसा । घरा व्यापुनियां अंबर दशादिशा । आतां भोगिन मी सर्वकाळ ऐसा वो ॥ ३ ॥ नानाभूताकृति एकचि आभासे । नानानामें आळवितां

वो देतसे । नाना अळंकार एकाचि लेतसे । नागिवा उघडा ही वरवाचि हा दिसे वो ॥ ४॥ नाना वस्त्रें हा नेसला पांघुरला । जेथील तेथींचि हा बहुरंगें नटला । शास्त्रें अशास्त्रें हा हातें मिरवला । सौम्य क्रूर ऐसा होउनियां राहिला वो ॥ ५ ॥ एका निववी भोगवी नाना भोग । एका खावावि जेवावि दावी जग । एका विचरे देउनि अंगसंग । निळा म्हणे हा एकलाचि अनंग वो ॥ ६ ॥

३८३२ नित्य श्रीहरीचे आठवितें गुण । वदनीं त्याचिया वो नामाचें स्मरण । हृदयीं धरूनियां निजभावें चरण । करिते अनुदिनीं हेंचि अनुष्ठान वो ॥ १ ॥ येथें आलिये वो याचि निजकार्या । केलीं कर्में तीं मागील भोगाया । आतां घडती तीं यातें समर्पाया । नाहिं भय त्या निजस्थाना जावया वो ॥ २ ॥ वाचे असत्याचा नेदि लागों वारा । केलें सांडणें वो देह संसारा । चित्तीं विषयाची मोडियला थारा । नाहिं गुंतलें या दंभ अहंकारा वो ॥३॥ संतीं सांगितलें केलें तें जतन । नाहीं आज्ञे त्यांचे केलें उल्लंघन । मत मतांतरा नाहिं दिल्हें मन । हृदयीं धरिलें या हरिचें चिंतन वो ॥ ४ ॥ कांहीं ठाकलें तें केलें लोकहित । कायावाचा वो हें वेंचुनियां चित्त । नाहीं वंचुनियां ठेविलें संचित । काळ याचिपरि सारियेला वो ॥ ५ ॥ नित्य नवा वो हा आवडिचा दिस । केला करूनियां कीर्तनीं उल्हास । नाहीं गोवियेला कोठें आशापाश । निळा म्हणे वर्तोनि उदास वो ॥ ६ ॥

## श्रीनामदेवमहाराज

३८३३ अव्यक्त परब्रह्म कैसें आलें वो व्यक्ती । अकळु न कळेचि तो हा अमूर्तमूर्ती । पुंडलिकाचे भक्ती येऊनियां वाळवंटीं । उभा राहे विटेवरी कर ठेऊनि कटीं ॥१ ॥ जिवाचा जिवनु वो मज भेटवा हरी । लागलें प्रेमपिसें होऊनि दासी कामारी ॥ध्रु०॥ कासे कसिला पितांबर तयावरी मेखळा । अंगीं उटी चंदनाची शोभती वनमाळा ।

बाह्रु बाह्रुवटे तें रूप खुंतलें डोळां। मन माझें मोहिलें दृष्टि देखतां घननिळा ॥ २ ॥ अधर जें पोंवळियाचे दंत हिऱ्याची ज्योती । विशाल नयन वो भोंवया व्यंकटा अति । टिळक जो रेखिला मृगनाभीं ललाटीं । उपमा नये व्यक्ती चंद्रा पडियेली तुटी ॥ ३ ॥ माथां मुगुट जो रत्नें जडियेली वरी । त्या खालीं मयूरपत्रीं वेटी साजे मुरारी । माथां त्या विरगुंठी पुष्पें तुरंविलीं वरी । तेणें मी भाळलियें भेटवावो झडकरी ॥ ४ ॥ इंद्रनीळ कीळ उभा घनश्यामु हा दिसे । पाहा तूं एक दृष्टी चकित केलें वो हांसे । तेचि ते कामबाण जिवा लागलें पिसें । नामया विष्णुदासा व्यापिलें हृषीकेशें ॥ ५ ॥

३८३४ संसार परजनीं । दूर दिधलें मज साजणी । द्वारकापुर पाटणीं । माझें माहियेर ॥ १ ॥ थोर उत्कंठा मनीं । वाट पाहें प्रतिदिनीं । मज नेत कां न कोणी । तया माहियेरा ॥२॥ चित्तीं न लगती व्यापार । मनीं हेंचि वारंवार । आड ठाकले गिरी डोंगर । तया माहियेरा ॥ ३ ॥ माझिये सासुये निष्ठुरें । दुरळ बोलिलीं उत्तरें । तंव तंव मी तूतें स्मरें । विठू बापु माहियेरा ॥ ४ ॥ येथें कोणी नाहीं माझें एक । जे त्यासि बोलुं सुखदुःख । हें मन उतावेळ देख । तया माहियेरासाठीं ॥ ५ ॥ कामक्रोध भावे दीर । बोलती अति निष्ठुर । ते वेळीं त्याजिजे संसार । ऐसें वाटतसे मना ॥ ६ ॥ या वो संसारीं नसिजे । संगु अवघाची सांडिजे । निःसंग होऊनि राहिजे। तया माहियेरा ॥ ७ ॥ या वो प्राणाचे संकटीं । आत्मा ठेवूनियां कंठीं । मग चालवीं घरराहटी । म्हणिजे काम रात्रंदिवस ॥ ८ ॥ याचे क्रूर बोल न होती । तेणें मी असें निर्बुज चित्तीं । निरोप धाडूं कवणा हातीं । तया माहियेरा ॥ ९ ॥ तंवाचि वो शिणिजे । जंव यातें न वोळंगीजे । याचें बीज पाविजे । नामें एकें विठ्ठलें ॥ १० ॥ आतां बहु काय बोलिजे । यासि सुवेळा न पुसिजे । पुण्यमार्गें जाईजे । तया माहियेरा ॥ ११ ॥ माझी सखी जे कां भक्ति । मज

तेचि संबोखिती । तिये लाविले शुद्धमती । साह्य तें मज चूकों नेदी ॥ १२ ॥ सत्यभावो मज सांगाती । येर लटकिया व्युत्पत्ति । मी वो जाईन हरखें जतीं । तया माहियेरा ॥ १३ ॥ कृष्ण माउली भेटेल । शीण अवघाचि हरेल । सुख आनंदु न मायेल । या या त्रिभुवनीं ॥ १४ ॥ या वहु जन्माचा शीण वो जाईल । विठोदर्शनें दुःख हरेल । नामा सुखिया होईल । केशवचरणीं ॥ १५ ॥

३८३५ कृष्ण अनुरागें रंगली कामिनी । काम धामें गेलीं गुणां विरोनी ॥ १ ॥ होती बहुत जन्में वियोगें शिणली । आप नाठवे परसुखें मिनली ॥ २ ॥ मनें करूनियां ये विषयांचे संकल्प । तंव ते अवघे होय कृष्णरूप ॥ ३ ॥ दृष्टीं देखणें जें जें आवडे । वेणू वाहे तेथें उभे देहुडे ॥ ४ ॥ सुखशयनीं स्वप्नीं देखे सांवळा । कंठीं कौस्तुभ रुळे वरी वनमाळा ॥ ५ ॥ जीवें धांवूनि आलिंगी प्रीति । तंव ते आतीं होय कृष्णमूर्ती ॥ ६ ॥ देह परतोनी मागुते सांभाळी । तंव स्वयें सिद्ध आपण वनमाळी ॥७॥ नामया स्वामी जीविंचा जिवलगू । कृष्णसुखाचा सुखबोध अंतरंगु ॥ ८ ॥

३८३६ भिन्न रात्रीं माध्यान्हीं वो । सेजे सुदली नारी । आपआपणा विसरूनियां । सुशोभित अंधारीं ॥ १ ॥ त्यामाजीं चारी भुजा । शंख चक्र वो करीं । पद्म गदा हातीं शोभती । दिसे सर्व शृंगारीं ॥ २ ॥ येऊनि हंस तुळीके । कैसें धरियलें करीं । देऊनि आलिंगन । वोरसलें वो दुरी ॥ ३ ॥ पालवीं धरितां धरितां । निघाला बाहेरी । त्यालागीं प्राण जातो । भेटवा झडकरी ॥ ४ ॥ कवण ते प्राणसखी । भेट करी विठोसी । सांडूनि वीरगुंठी । चरण झाडीन केशीं ॥ ५ ॥ कवण मी कैंचा नेणें । जाती कुळ तयाचें । कवण पासाव झाला । तें मी नेणें वो साचें ॥ ६ ॥ इंद्र चंद्र नीळ कीळ । घन नभ रूप तयाचें । चरणीं तोडर रुळे । वरि नेपुरें साचें ॥ ७ ॥ नख चंद्रमंडीत वो । जन्मस्थान गंगेचें । जानु जघन नीट । पीतां-

वर वो कासे ॥ ८ ॥ त्यावरी नाग मुरडी । रत्न मेखळा साजे । माजू जो मुष्टी माय । त्या मन वेधलें माझें ॥ ९ ॥ नाभीं सरोवरीं वो । दिसे ब्रम्हकमळ । अनुपम्य उदर ज्याचें । विशाळ वक्षस्थळ ॥ १० ॥ कौस्तुभ वरी शोभे । करितो झळफळ । कुंडलांचेनि रत्नें । कैसेनि फांकताती कीळ ॥ ११ ॥ वदनीं मी काय वानूं । प्रसिद्ध निर्मळ । भाळीं तो अर्धचंद्र । मृगनाभींचा टीळ ॥ १२ ॥ सरळ ज्या अंगोळिका । नवरत्नें जडीत । कंकणें मनगटीं । बाहुवटी सुशोभित ॥ १३ ॥ त्यावरी कीर्ति मुखें । भुजादंड मिरवत । वैजयंती पदक हिरे । मुगुटीं झळकत ॥ १४ ॥ मयूरपत्रें शिरीं । शोभा दिसे अमित । चंद्रमंडळ लोपलीं वो । महातेज अद्भुत ॥ १५ ॥ व्यापिलें वनमाळीये । लावण्य तेज अमित । तें रूप देखावया । माझा जीव उल्हासत ॥ १६ ॥ ऐसी तापली विरहज्वरें । थोर होतो उबारा । चंदन पोळतसे । न घाला विंजण वारा ॥ १७ ॥ चंद्रमा दाहतसे । उष्ण तो खडतरा । तंव येरी जाणितला । वेध नंदकुमरा ॥ १८ ॥ होईल केशीराजा । पाहे द्वारकापुरा । भक्ति ही विरहा माता । तिणें आणिला घरा ॥ १९ ॥ नामया विष्णुदासा । भेटी शारंगधरा । तनु मन जीवें त्याला । सुख झालें अंतरा ॥ २० ॥

## श्रीएकनाथमहाराज

३८३७ वेधला जीव माझा भेटवा श्रीरंग । सर्व सांडियेला मोह ममता संग ॥ जिवीं जिवलग झाला अनंग । भेटवा भेटवा मज श्रीरंग ॥ १ ॥ ऐशी विरहिणी बोले बोली । कां रे श्रीहरी तूं सांडी केली ॥ ध्रु० ॥ समभाग तुज पहावया । मन आमुचें गुंतलें देवराया ॥ तूं तंव मध्यें घालिसी माया ॥ नको आतां विरह पायां ॥ २ ॥ आमुचा विरह कोण निवारी । विरहिणी बोले ऐशियापरी ॥ एकाजनार्दनीं विनवी श्रीहरी । जन्ममरणाचा विरह निवारी ॥ ३ ॥

३८३८ कोण्या वियोगें गुंतला कवणे हातीं । परा पश्यंती

मध्यमा जया ध्याती । श्रुतिशास्त्र जया भांडती । तो कां हो रुसला श्रीपती ॥ १ ॥ येई येई कान्हा देई आलिंगन । भेटी देउनी पुरवी मनोरथ पूर्ण । विरहाविरहा करी समाधान । दावी तूं आपुले चरण ॥ २ ॥ येथें अपराध आमुचा नाहीं । खेळ सर्व तुझ्या पायीं ॥ एकाजनार्दनीं नवल काई । एकदा येउनी भेटी देई ॥ ३ ॥

३८३९ विरहिणी विरहा विरहित बोले । कां वो पूर्वकर्म आड ठेलें । वाचे न येती नाम सांवळें । तया विरहा मन माझें वेधलें ॥ १ ॥ ऐशा परी बोलती गोपीबाळा । कोठें गेला नेणों सांवळा । पाहतां पहातां ठकाविलें गोपाळां । ऐसा याचा विरह लागला ॥ २ ॥ नेणों कांहीं कर्म आड ठेलें । वियोग वियोगाचें वर्म ऐसें जालें ॥ एकाजनार्दनीं कौतुक बोले । ऐशा दुःखा विरहिणी बोले ॥ ३ ॥

३८४० नको नको दूरदेशीं । आम्हां ठेवी चरणापाशीं । मग या विरहा कोण पुसी । ऐसी इच्छा देई आम्हांसी ॥ १ ॥ पुरे पुरे संसार विरह छंद । तेणें तूं अंतरसी गोविंद ॥ द्वैताचा नको देऊं बाध । हृदयीं प्रगटोनी दावी बोध ॥ २ ॥ विरह हरी सत्वर देवराया । परेपरता प्रगटोनी दावी पाया । दुजें मागणें आणिक नाहीं काह्या । एकाजनार्दनीं शरण तुझिया पाया ॥ ३ ॥

३८४१ सम चरणीं मन माझें वेधलें । तें वेगळें होतां विरह बोलें । हर्षामर्षा चित्त उन्मन ठेलें । म्हणोनि विरहिणी विरह बोले ॥ १ ॥ सावळिया कान्हया नको जाऊं दुरीं । राहे परेपरता परतोनी हरी । पश्यंती मध्यमा मारुनी वैखरी । चारी वाचा तटस्थ झाल्या हरी ॥ २ ॥ तुझ्या वियोगाचा न व्हावा संग । अखंड नामीं असो अनुसंधान । शरण एकाजनार्दन । कायावाचा मनें जाणोन ॥ ३ ॥

३८४२ आशा मनीषाचा विरह लागला । तेणें सांवळा दुरी ठेला । जवळी असोनी बोलती अबला । कवणे गुणें कान्हू रुसला

॥ १ ॥ धांवे धांवे कान्हाई नंदनंदना । पुरवी तूं आमुची वासना । आणिक नको दुजी कल्पना । विरह निवारी देई दर्शना ॥ २ ॥ छंदें छंदें विरहिणी बोले । कां वो बोलण्या अबोलणें झालें । एकाजनार्दनीं ऐसें केलें । नंदनंदना चित्त गुंतलें ॥ ३ ॥

३८४३ जन्म जन्मांतरीं विरहिणी । होती दुश्चित अंतःकरणीं । दुःख सोशिलें होतें मागील जन्मीं । ये खेपे निरसलें स्थूळकारणीं ॥ १ ॥ येउनी भेटो देहीं देहातीत । तयाचा विरह मजलागीं होत । मना समूळ मन पहात । तो भेटला गोपिनाथ ॥ २ ॥ दुःख फिटलें सुख झालें थोर । हर्षें आनंदें आनंद तुपार । एकाजनार्दनीं भेटला परात्पर । तेणें संसार विरह गेला निर्धार ॥ ३ ॥

३८४४ बहुत जन्में विरहें पीडली । नेणों कैशी स्थिर राहिली । मन आशा गोविंदीं वेधली । तो मध्यमा वैखरीये गुंतली वो ॥ १ ॥ चारी वाचा परता सांवळा । विरहिणीसी छंद त्याचा लागला । चौं परता कोठें गुंतला । तें नेणों आम्हीं अबला वो ॥ २ ॥ विरह जाईल कैशापरी । पूर्वपुण्य सुकृत पदरीं । एकाजनार्दनीं भेटेल हरी । तैं विरह नोहे निर्धारीं वो ॥ ३ ॥

३८४५ येई वो श्रीरंगा कान्हाबाई । विरहाचें दुःख दाटलें हृदयीं । कोण सोडवील यांतून पाही । दैवयोगें सांपडला सगुण देहीं ॥ १ ॥ सगुण निर्गुण याचा वेध । वेधें वेधलें मन झालें सद्गद । वाचा कुंठित हरपला बोध । नेणें आणिक परमानंद ॥ २ ॥ अस्थिरीं स्थिर मति झाली । वृत्ति विरक्ति हारपली । समाधि उन्मनी स्थिरावली । ऐशी विरहाची मति ठेली वो ॥ ३ ॥ संग विवर्जित मन झालें । काया वाचा मन चित्त ठेलें । एकाजनार्दनीं ऐसें केलें । विरहदुःख निरासिलें वो ॥ ४ ॥

३८४६ भिन्न माध्यानीं रात्रीं नारी । विरह करी बैसोनि अंतरीं । केधवां भेटेल श्रीहरि । तों नवल झालें अंतरीं वो ॥ १ ॥ अवचित

घडला संतसंग। विरहाचा झाला भंग। तुटोनी गेला द्वैतसंग। फिटला जन्ममरणाचा पांग वो ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संतसंग। फिटला संसाराचा पांग। विरह गेला देहत्याग। सुखें सुख झालें अनुराग वो ॥ ३ ॥

३८४७ विषयविरह गुंतले संसारीं। तया जन्मजन्मांतरीं फेरी। कोणी न सोडवी निर्धारीं। यालागी न गुंता संसारीं ॥ १ ॥ मज सोडवा तुम्ही संतजन। या विषयविरहा पासोन ॥ धृ० ॥ क्षणिक विषयसंसार। भरला दिसे भवसागर। यांतुनी उतरी पैलपार। संतसंग मिळालिया माहेर ॥ २ ॥ यांसी शरण गेलियावांचुनी। संतसंग न जोडे त्रिभुवनीं। शरण एका भावें जनार्दनीं। विरह गेला समूळ निरसोनी ॥ ३ ॥

३८४८ ऐशी निर्धारें विरहिणी करी। परे परता देखेन श्रीहरी। मनपवन साधन न करीं। संतसंग घडलिया धन्य संसारीं ॥ १ ॥ धन्य धन्य संतमाहिमा। विरह गेला पावलें सुखधामा ॥ धृ० ॥ नामविरहित विरह तो कोण। विषयविरह थुंकीन मी जाण। नामावांचुनी नेणें साधन। तो विरह न व्हावा पूर्ण ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सत्यवचन। विरहा विरह गेला मुळींहून। नाम जपतां स्थिर झालें मन। विरह गेला त्यागुन ॥ ३ ॥

३८४९ रात्रंदिवस मन रंगलें। हरिचरणीं चित्त जडलें। विरहाचें दुःख फिटलें। धन्य झालें संसारीं ॥ १ ॥ विरह गेला सुख झालें वो माय। पुढतोपुढती आनंद न समाय ॥ धृ० ॥ संतसंग घडला धन्य आजी। मोह ममता तुटली माझी। भ्रांति फिटोनी गेली सहजीं। विरह गेला सुख झालें आजी ॥ २ ॥ धन्य संतसंगती। अवघी झाली विश्रांती। एकाजनार्दनीं चित्तीं। विरहभ्रांती निरसली वो ॥ ३ ॥

३८५० अनुतापें विरहिणी बैसे ॥ कां वो कर्म बळिवंत दिसे ॥

संगविवर्जित मज झालें ऐसें ॥ कोणें योगें भेटी नसे ॥ १ ॥ मज भेटवा संतसंगती ॥ तेणें निवारेल सर्व भ्रांती ॥ धृ० ॥ विरहें बहुत पीडिली बाळा ॥ कोण शांतवी तया अबलां ॥ श्रीरंग वेध जीवीं लागला ॥ तया भेटलिया सुख होईल जिवाला ॥ २ ॥ नेणें आप-परावें दुजें कांहीं ॥ विरहें विरह जडला हृदयीं ॥ कोण सोडवी गुरु मज देहीं ॥ या विरहा अंतपार नाहीं ॥ ३ ॥ ऐसा विरह करितां दुःख ॥ दैवयोगें घडलें संतसुख ॥ तापत्रय विरह गेला देख ॥ सुखें सुख अपार झालें देख ॥ ४ ॥ संतसंगें निरसे विरह ॥ पावन देह झाला विदेह ॥ एकाजनार्दनीं आनंद पाहे ॥ विरह निरसला सुख झालें गे माय ॥ ५ ॥

३८५१ बोला बोल विरहिणी बोले ॥ गगनीं चांदणें शुद्ध शोभलें ॥ त्यामाजीं घनसांवळा खेळे ॥ कर्मदशें वियोग झाला बळें ॥ १ ॥ दावा गे दावा गे कृष्णवदन ॥ विरहाचें दुःख दारुण ॥ कोण्या कर्में जालें खंडन ॥ कांहो यदुनंदन न बोले ॥ २ ॥ विरहतापें तापलें भारी ॥ कोण आतां दुजा निवारी ॥ श्रीगुरु भेटला झडकरी ॥ एका जनार्दनीं दाविला श्रीहरी ॥ ३ ॥

३८५२ युगायुगीं पीडिली विरहिणी ॥ नाठवी ध्यानीं मनीं चक्रपाणी ॥ म्हणोनी वियोगाची जांचणी ॥ तो भेटला संतसंग साजणी ॥ १ ॥ विरह गेला सुख झालें अपार ॥ जन्मोजन्मींची तुटली वेरझार वो ॥ धृ० ॥ घडतां संतसंग विश्रांती ॥ तुटली माया पडळभ्रांती ॥ भवसंसार याची झाली शांती ॥ संतमहिमा वर्णावा किती ॥ २ ॥ महिमा वर्णितां विरहा फिटलें ॥ एकाजनार्दनीं तया भेटलें ॥ सुख अनुभवें अंतरीं दाटलें ॥ विरहाचें बीज भाजिलें वो ॥ ३ ॥

श्रीज्ञानेश्वरमहाराज

३८५३ निळिये मंडळीं नीळवर्ण सांवळी । तेथें वेधलीसे बाळी ध्यानरूपा ॥ १ ॥ वेधु वेधला निळा पाहे घननीळा । विरहणी

केवळा रंग रसनें ॥ धृ० ॥ नीळवर्ण अंभ नीळवर्ण स्वयंभ । वेधें वेधु न लभे वैकुंठींचा ॥ २ ॥ ज्ञानदेव निळीं हृदयीं सावळी । प्रेमरसें कल्लोळीं बुडी देत ॥ ३ ॥

३८९४ निळिये रजनि वाहे मोतिया सारणी । निळेपणें खाणी सांपडली ॥ १ ॥ आंगणीं चिंतामणि जळधरू सिंपणी । अमृत साजणी जीवनकळा ॥ धृ० ॥ सुमनाचे शेजे विरहणी विराजे । शयनीं सुलजे आरळ सेज ॥ २ ॥ लाजयानें हातिं मुखकमळ टेंकी । निळिये अवलोकी कृष्णमूर्ति ॥ ३ ॥ कमळाणि अमोद सुस्वाद मकरंद । चंदनाची असेद उटि अंगीं ॥ ४ ॥ कर्पूरपरिमळें दिव्य खाद्य फळें । टेऊनि सोज्वळें वाट पाहे ॥ ५ ॥ मन तो निळिये गोविंदाचिये सोसें । विरहिणी पाहे वाट्ठुली ऐसी ॥ ६ ॥ ज्ञानदेवी निळिये वाठ्ठुली गोविंदीं । कृष्ण निळिये पदीं ठाव जाला ॥ ७ ॥

३८९५ निळिये सारणी वाहे मोतियाचें पाणी । चिंतामणि अंगणीं पेरियेला ॥ १ ॥ कैसा हा भाव करूं गोंविला संसारू । कृष्णसंगें धुरंधरू तरलों आम्हीं ॥ २ ॥ हिरियाची खाणी दिव्यतेज मणी । सांपडला अंगणीं सये मज ॥ ३ ॥ सूर्यकर रश्मी चंद्र अहमास्मि । प्रगट झाल्या रश्मी जेथूनिया ॥ ४ ॥ कल्पतरु चोखू चिंतामणी वेखु । मनामाजि हरिखु देखियेला ॥ ५ ॥ ज्ञानदेवी वल्ली विद्युलता सलीलीं । फळपाकें दुल्ली दुमिन्नल्या ॥ ६ ॥

३८९६ आपुलेनि रंगें येत होतिये साजणी । तंव वनवासी येकें आळंगिलें गे माये ॥ १ ॥ बोलेना बोलों देईना । तेथें पाहणें तें अवघें पारुषलें गे माये ॥ धृ० ॥ आपुलें केलें कांहीं न चले वो आतां । बापरखुमादेवीवरा विठ्ठला देखतां ॥ २ ॥

३८९७ तुजविण येकली रे कृष्णा न गमे राती । तंव तुवां नवल केलें वेणू घेऊनी हातीं । आलिये तेचि सोय तुझी वोळखिली गती ॥ १ ॥ नवल हें वालभरे कैसें जोडलें जिवा । दुसरें दुरी ठेलें प्रीति केला

रिघावा ॥ धृ० ॥ पारुर पारुर कान्हा ह्मणें करिसी अव्हेरु । तूं तंव ह्रदईंचा होसी चैतन्य चोरु । बापरखुमादेवीवरा विठो करी कां अंगीकारु ॥ २ ॥

३८५८ मज तुरंबा कां वो जिये तिये । जेणें वेधें हरि सोयरा होये । मज लावा कां वो चंदन ऐसिये परीचें । जें लाविलियाचि अनादि पुसोनि जाये वो ॥ १ ॥ मज करा कां वो कांहीं येक । जेणें करणें ठाके अशेख । सरा कां वो मजअडूनि मज पाहों द्या । आपुलें मुख गे माये ॥ २ ॥ मज शृंगारा कां वो तया जोगी । पुढति अंग न समाय अंगीं । या मनापासोनी पढिये तो गोंवळु । तोचि तो जिव्हारीं भोगीन गे माये ॥ ३ ॥ देह पालटावो तयासाठीं । वरच या देईन अवघी सृष्टी । बापरखुमादेवीवरा विठ्ठला संयोगीं । तोचि तो त्यागून भोगी गे माये ॥ ४ ॥

३८५९ कृष्णें वेधिली विरहिणी बोले । चंद्रमा करितो उबारा गे माये । न लवा चंदनु न घला विंजण वारा । हरिविणें शून्य शेजारु गे माये ॥ १ ॥ माझे जिवींचें तुम्हीं कां वो नेणा । माझा वळिया तो पंढरीराणा वो माये ॥ धृ० ॥ नंदनंदनु घडि घडि आणा । तयाविण न वाचती प्राण वो माये । बापरखुमादेवीवरु विठ्ठलु गोविंदु । अमृत-पान गे माये ॥ २ ॥

३८६० घनु वाजे घुणघुणा । वारा वाजे रुणझुणा । भवतारकु हा कान्हा । वेगीं भेटवा कां ॥ १ ॥ चांदवो चांदणें । चापे वो चंदनु । देवकी नंदनु । विण नावडे वो ॥धृ०॥ चंदनाची चोळी । माझें सर्वांग पोळी । कान्हो वनमाळी । वेगीं भेटवा कां ॥ २ ॥ सुमनाची सेज । शीतळ वो निकी । वोले आगीसारिखी । वेगीं विझवा कां ॥ ३ ॥ तुम्हीं गातसा सुस्वरें । ऐको नेदावीं उत्तरें । कोकिळें वर्जावें । तुम्हीं बाइयांनो ॥ ४ ॥ दर्पणीं पाहातां । रूप न दिसे आपुलें । बापरखुमा-देवीवर विठ्ठलें । मज ऐसें केलें ॥ ५ ॥

३८६१ पांचा दामांचा घोंगडा नेसेन । उरली मोट तें मी जेवीन गे वाईये ॥ १ ॥ कामारी कामारी कामारी होऊन । या गोपाळाचें घर रिघेन गे वाईये ॥ ध्रु० ॥ त्याचा उंबरा उसिसा करीन । वरि वेरझार मी सारीन गे वाईये ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानदेवा पुसतील वर्म । त्यासि कामिन पुरेन गे वाईये ॥ ३ ॥

३८६२ सांवळें परब्रह्म आवडे या जीवा । मनें मन राणिवा घर केलें ॥ १ ॥ काय करूं माये सांवळें गोंवित । आपें आप लपत मन तेथें ॥ ध्रु० ॥ बापरमादेवीवरु सांवळी प्रतिमा । मनें मनीं क्षेमा एक जालें ॥ २ ॥

३८६३ सांवळिये वुंथी सांवळिया रूपें । सांवळिया स्वरूपें वेधियेलें ॥ १ ॥ काय करूं गे माये सांवळें न सोडी । इंद्रिया इंद्रिय जोडी एक तत्त्वें ॥ २ ॥ कैसें याचें तेज सांवळें अरुवार । कृष्णीं कृष्ण नीर सतेजपणें ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्तीचे खुणे । सांवळेची होणें यासी ध्याता ॥ ४ ॥

३८६४ निरंजन वना गेलिये साजणी । तेथें निर्गुणें माझ्या मनीं वेधियेलें ॥ १ ॥ सुखाची अतिप्रीति जाहाली गे ब्रह्मीं । श्रीगुरु निवृत्ति मुनी मी जाहले गे माये ॥ ध्रु० ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठल सहजावला । निर्गुण दाविला विसुरा गे माये ॥ २ ॥

३८६५ मन मुरडूनि घातलें मनातें । थोर मारु तेथें होत असे ॥ १ ॥ पुरे पुरे वो आतां जिणें तें केउतें । येणें वो पंढरीनाथें वेधियेलें ॥ ध्रु० ॥ न चले न चले कांहीं करणें कामान । याचें पाहाणेंचि विंदान कामानिया ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरा विठ्ठलासि भेटी । संसाराची तुटी झाली गे माये ॥ ३ ॥

३८६६ निळियेचच्या निशीं विराहिणी पिशी । शेज बाजे कैशी आरळ शेजे ॥ १ ॥ कृष्णसंगें बाली विव्हळ झाली निळी । चंदन अंगीं पोळी विरहज्वरें ॥ ध्रु० ॥ ज्ञानदेव प्रेम निळारूप रूपसें सोहळा । कृष्णवेधें वेधली बाळा भली वसे ॥ २ ॥

३८६७ येणें रूपें पाहावासी तरी अनुमाय होसी । माझ्या मना नाकळसी सांवळ्या । सगुणपणाची तुझी पाडलीसे मिठी । केली जिवसाठीं सांवळ्या ॥ १ ॥ वेधला जिउ माझा शिकवाल काई । सगुणें ठाइ वेधियेलें ॥ ध्रु० ॥ ये अंगणीं अवचितां देखिला बोलतां । कोण ऐसा निरुता न कळे गे माये । सगुण म्हणोनि धरूं गेलें पालवीं । तंव नवलपणाची ठेवी प्रगट केली ॥ २ ॥ आंतू बाहेरी कांहीं न कळे वो मज । आप आपणया चोज वाटोनि ठेलें । बाप रखुमादेवीवरें माझें मीपण चोरुनि नेलें । आपणा ऐसें केलें बाई-या वो ॥ ३ ॥

३८६८ जीवींचिया जीवा । प्रेमभावाचिया भावा । तुजवांचूनि केशवा आनू नावडे ॥ १ ॥ जीवें अनुसरालेंये । अझुनि कां नये । वेगीं आणावा तो सये प्राणु माझा ॥ ध्रु० ॥ सौभाग्य सुंदरु । सकळ लावण्य आगरु । बापरखुमादेवीवरु श्रीविठ्ठलु ॥ २ ॥

३८६९ अवचिता परिमळु झुळकला अळुमाळु । मी म्हणे गोपाळु आला गे माये । चांचरती चांचरती बाहेरी निघालें । ठकाचि मी ठेलें काय करूं ॥ १ ॥ मज करा कां उपचारु अधिक तापभारु । सखिये शारंगधरु भेटवा कां ॥ ध्रु० ॥ तो सावळा सुंदरु कासे पीतांबरु । लावण्य मनोहरु देखियेला । भरलिया दृष्टीं जंव डोळां न्याहाळी । तंव कोठें वनमाळी गेला गे माये ॥ २ ॥ बोधोनि ठेलें मन तंव जालें आनेआन । सोकोनि घेतले प्राण माझे गे माये । बापरखुमादेवीवरु विठ्ठलु सुखाचा । तेणें काया मनें वाचा वेधियेलें ॥ ३ ॥

३८७० पैल तो गे काऊ कोकताहे । शकून गे माये सांगताहे ॥ १ ॥ उड रे उड रे काऊ तुझे सोन्यानें मढवीन पाऊ । पाहुणे पंढरीराऊ घरा कें येती ॥ ध्रु० ॥ दहींभाताची उंडी लावीन तुझ्या तोंडीं । जीवा पढिये त्याची गोडी सांग वेगीं ॥ २ ॥ दुधें भरुनि

वाटी लावीन तुझे वोठीं । सत्य सांगे गोठी विठो येईल कायी ॥ ३ ॥ आंबया डाहाळी फळें चुंबी रसाळीं । आजिचे रे काळीं शकुन सांगे ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे जाणिजे ये खुणे । भेटती पंढरीराणे शकुन सांगे ॥ ५ ॥

३८७१ आजि शुभ लवे लोचनु । हरिखें सांगताहे शकुनु । स्वप्न देखिलें सुंदरी । अळंकार लेववा चंदन चर्चावा जाति जूती पायांतिके शेवती । करा आइती सेजारीं । शेला काढा मच्छूचा हा दिन दैवाचा । सोहळा तो आमुचा मंदिरीं गे माये ॥ १ ॥ गुडिया उभवा मखरें शृंगारा । भेटी होईल आळंगी । स्फुरण आलें वाहीं क्षेमालागीं । पाहीं काचोळी न समाये अंगीं गे माये ॥ धृ० ॥ जिवीं जीव सुन्दर । त्याचेनि साचार तो मज भेटवा सुखाचा विसावा । सुमनें उकलिलीं नित्य दे माळी उचित करी तया भावा । आजि वेळु कांवो लाविला । नेणों पंथीं शीणला । बुझाऊं जाऊं त्याच्या गांवा गे माये ॥ २ ॥ हृदयीं निर्भर प्रेमवारें वार माझें चित्तीं राहो ऐक्य मज । दुजिये वस्तुलागीं रुत जाय माधवी मन्मथ करितां हे वोज । ऐसी तेथवरी जाईन सुखाची होईन नाचेन आनंदाचे भोजें गे माये ॥ ३ ॥ ऐसा विपरीत लाघवी लपे सर्वेचि दावी वासिपे चोके । अभ्यासें अंतर पडलें येणें तरी मी त्यजीन जिणें म्हणोनि विनवितसें चतुर सुरेखे । रात्रीचे ठायीं देख मेघश्याम बोलला अंबरीं गे माये ॥ ४ ॥ पोसिये निवांता मूर्ति ऐकोनि ठेली श्रुती । आकर्षोनि चित्तचैतन्य भरोनि ठेलें लोचन । ध्यानीं विसर्जिलें मन । परमात्मया रामा तूं येक लाघवी सावेव पावलें ज्ञान । बापरखुमादेवीवरा विठ्ठला सुमन संयोगीं आजी सत्य जालें माझें स्वप्न गे माये ॥ ५ ॥

३८७२ त्रिभुवनींचे सुख पाहावया नयनीं । दिनरात्रीं धणी न पुरे माझी ॥ १ ॥ विटेवरी सांवळा पाहतां पैं डोळां । मन वेळोवेळां

आठवितु ॥ २ ॥ सागरीं भरितें दाटे तैसें मन उल्हाटे । वाट पाहों कोठें तुझी रया ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु पूर्ण प्रकाशला । कुमुदिनी विकासला तैसें झालें ॥ ४ ॥

३८७३ पैल विळाचिये वेळीं आंगणीं उभी ठेलिये ॥ येतिया जातिया पुसे विठ्ठल केउता गे माये ॥ १ ॥ पायरऊ जाला संचारु नवल । वेधें विंदान लाविलें म्हणे विठ्ठल विठ्ठल ॥ २ ॥ नेणें तहान भूक नाहीं लाज अभिमान । वेधिलें जनार्दनीं देवकीनंदनालागूनि माये ॥ ३ ॥ बापरखुमादेवीवरु जिवींचा जीवनु । माझे मनिंचे मनोरथ पुरवी कमळनयनु गे माये ॥ ४ ॥

३८७४ यातिकुळ माझें गेलें हारपोनि । श्रीरंगावांचूनि आनु नेणें ॥ १ ॥ किती वो शिकवाल मज वेळोवेळां । मी तंव गोंवळा रातलिये ॥ ध्रु० ॥ अष्टभोग भोगणें मातें नाहीं चाड । भक्ति प्रेम गोड लेइलें गे माये ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु जीवींचा जिव्हाळा । कांहीं केलिया वेगळा नव्हे गे माये ॥ ३ ॥

३८७५ ज्याचिये आवडी संसार त्यजिला । तेणें कां अबोला धरिला गे माये । पायां दिधली मिठी घातली जीवें गांठी । साऊमा नयें जगजेठी उभा ठेला गे माये ॥ १ ॥ भेटवावो त्यासी चरण झाडीन केशीं । सगुण रूपासी मी वो भाळलिये ॥ ध्रु० ॥ क्षेमालागीं जीऊ उतावेळ माझा । उचलोनि चारी भुजा देईन क्षेम । कोण्यागुणें कां वो रुसला गोंवळू । सुखाचा चावळू मजसी न करी गे माये ॥ २ ॥ ऐसें अवस्थेचें पिसें लाविलेंसे कैसें । चित्त नेलें आपणियासरिसें गे माये । बापरखुमादेवीवरें लावियेलें पिसें । करूनि ठेविलें आपणिया ऐसें गे माये ॥ ३ ॥

३८७६ देऊनियां भेटी मजसी न करी गोठी । लांचावला जीउ पाठी न राहे वो । निष्ठुर म्हणों तरी आपंगितो मातें । व्यापूनि जीवातें उरी उरवितो ॥ १ ॥ तो दाखवा वो माये धरीन त्याचे

पाये । तयालागीं जीउ आहे उतावेळु ॥ ध्रु० ॥ भेटीचेनि सुखें मनाचि होय मुकें । तें रूप देखें परी बोलवेना । सगुण गुणाचा म्हणोनि घातली मिठी । तंव तो आपणयासमसाठीं करुनि ठेलें ॥ २ ॥ काय नेणों कामाण कैसें वो जालें । चित्त चोरुनि नेलें गोवळेनें । बापरखुमादेवीवर विठ्ठलें अंग लपवूनि । चैतन्य चोरुनि नेलें गे माये ॥ ३ ॥

३८७७ सुख शेजारीं असतां कळी जाली वो पहातां । देठु फेडूनि सेवतां अरळ केलें ॥ १ ॥ अंगणीं कमळणी जळधरू वोळे वरी । बाफा सिंपल्यावरी वाळून जाये ॥ ध्रु० ॥ मोतियाचें पाणी वाहे निळिये सारणी । सगुणाची लावणी लावूनि गेला ॥ २ ॥ अंगणीं वोळला मोत्यें वरुषला । धन्य दिवसु झाला सोनियाचा ॥ ३ ॥ चोरटया मधुकरा कमळीं घेतलासे थारा । मोतियांचा चारा राजहंसा ॥ ४ ॥ अंगणीं बापया तूं परसरे चांपया । आसुवीं माचया भिनलया ॥ ५ ॥ वाट पाहे मी येकली मज मदन जाकळी । अवस्था धाकुली म्हणों नये ॥ ६ ॥ आतां येईल म्हूण गेला वेळु कां लाविला । सेला जो भिनला मुक्ताफळीं ॥ ७ ॥ बावन चंदनु मर्दिला अंगीं वो चर्चिला । कोणें सदैवें वरपडा जाला वो माये ॥ ८ ॥ बापरखुमादेवीवरु माझे मानसींचा होये । तयालागीं सये मी जागी सुती ॥ ९ ॥

३८७८ पंढरपुरींचा निळा लावण्याचा पुतळा । विठो देखियेला डोळां बाईये वो ॥ १ ॥ वेधलें वो मन तयाचिया गुणीं । क्षणभर विठ्ठलरुक्मिणी न विसंबे ॥ ध्रु० ॥ पौर्णिमेचें चांदिणें क्षणक्षणा होय उणें । तैसें माझें जिणें एका विठ्ठलेंविण ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु विठ्ठलुचि पुरे । चित्तचैतन्य मुरे बाईये वो ॥ ३ ॥

३८७९ जागृति पुसे साजणी । कवण बोलिलें अंगणीं । निरखितां वो नयनीं । वृंदावनीं देखियेला ॥ १ ॥ मनिं वेधु वो तयाचा । पंढरीरायाचा ॥ ध्रु० ॥ स्वप्न सांगे सुषुप्ति । असे ममता हे चित्तीं ।

विठ्ठल होईल प्रतीति । मग गर्जति तुर्ये ॥ २ ॥ मज बोलों नये ऐसे केलें । मन उन्मनी बोधलें । बापरखुमादेवीवर विठ्ठलें । थितें नेलें मी माझें ॥ ३ ॥

३८८० आजिवरि होतें मी मोकाट । तंव डोळे फुकट मोडा तुम्हीं ॥ १ ॥ समर्थाचे अंगीं पडलें अवचितीं । तुम्हा ऐसीं किती चाळविलीं ॥ धु० ॥ बापरखुमादेवीवरू विठ्ठलाचे घरवात जालें । जन्मवरि एकांत करूनि ठेलें ॥ २ ॥

३८८१ मीपण माझें हरपलें । शेखीं ठकाचि विशेखीं पडिलें बाइये ॥ १ ॥ काय सांगों तुह्मां कैंचा हा गोवळु । न म्हणे दिनवेळु आम्हां घरीं ॥ धु० ॥ नवल पैं केलें बुडविलें सगुण । आपणचि निर्गुण होऊनि ठेला ॥ २ ॥ बापरखुमादेवीवरु जीवन आमुचें । नाहीं पैं साचें कुळकर्म ॥ ३ ॥

३८८२ पडलें दूर देशीं मज आठवे मानसीं । नको नको हा वियोग कष्ट होतातीं जिवासी ॥ १ ॥ दिनु तैसी रजनी मज झालिये माये । अवस्था लावूनी गेला अझुनी कां नये ॥ २ ॥ गरुडवाहना गंभिरा येईगा दातारा । बापरखुमादेवीवरा श्रीविठ्ठला ॥ ३ ॥

३८८३ सुखाचिये गोठी सुख आलें भेटी । तया लाभाचिये साठीं जीव वेचिला गे माये । तंव अवचितें सगुणरूप भरलेंसे नयनीं । बोलतां अंगणीं स्यां वो देखियेलें ॥ १ ॥ जीवाचा जीऊ माझा भेटवा यादवराजा । उचलल्या चारी भुजा देईल क्षेम ॥ २ ॥ न करा उपचार न रंगे हें मन । दृष्टीपुढें ध्यान ठसावलें । आवडी गिळूनि येणें सुख विहरोनि ठेलें । चित्त माझें गोविलें गोवळेनी ॥ ३ ॥ आतां भरोवरी उरावितां नुरे उरी । आनंदें अंतरीं कान्हो संचरला । बापरखुमादेवीवरू विठ्ठल निर्गुण । तो सुखाची सांठवण गिळूनि ठेला ॥ ४ ॥

३८८४ भेटीसी गेलिये तंव तीच झालिये । भुलली ठेलिये मज न कळे कांहीं । परतलिया दृष्टि जंव मागुता न्याहाळीं । तंव काळी

ना सावळी मूर्ति चोजवेना ॥ १ ॥ काय सांगो माये न कळे तयाची सोये । येणें मनाचे मोडूनि पाये वेधियेलें ॥ २ ॥ आंतु बाहेरी कैसी भरलेनि रंगें । क्षेम देऊं गेलें अंगें तंव तो जडूनि ठेला । वारितां नावरे काय सांगो माय गोठी । करूनि ठेला साटीं जीवित्वेसी ॥ ३ ॥ आशेचिये हावे तंव तो परताचि धांवे । निराशेसी पावे वेळु न लागतां । बापरखुमादेवीवरु विठ्ठलीं उपावो । ज्ञानदेवा भावो निवृत्तिपायीं ॥ ४ ॥

३८८५ गुणाचेनि आटोपें आकारलें ब्रह्म । भक्तभाग्य सम आलेंसे ॥ १ ॥ चैतन्य परिपाटीं ठसा घडलासे साकार । कृष्णाचि आकार गोकुळीं रया ॥२॥ त्या रूपें वेधिलें काय करूं गे माये । नामरूप सोये नाहीं आम्हा ॥ ३ ॥ सबाह्य सभोंवतें चतुर्भुज सांवळें । सर्वभूतीं विवळे कृष्णरूपें ॥४॥ हारपले आकार कृष्णची क्षरला । वेदांसी अबोला श्रुतीसहित ॥ ५ ॥ ऐसें परब्रह्म सांवळें दैवत आमुचें । आतां आम्हां कैचें क्रियाकर्म ॥ ६ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलु दैवत । मनें घर तेथ चरणीं केलें ॥ ७ ॥

३८८६ प्रभा काळिका दीप शून्याकार हें स्वरूप । मुनिजनमानसींचें सुख येकलेपणें । बिंब अर्धबिंब अर्धमातृका तूर्या नातळे ज्यासी आनु तो दिठी केविं धरावा । गुणातीत निर्गुणीं जे सहजाचि सगुणीं विखुरे रया ॥ १ ॥ आपआपणिया पडे माय विसरु । मज आवडे तो नंदाचा कुमरु गे माये ॥ ध्रु० ॥ म्हणोनि डोळियाचें अंजन आणि मेघश्याम बुंथीचें ध्यान । निडारलें वृत्ति नयन पाहों जावों । तेथें तें अनुमतें नलगे मतांतरें । भावें देखणा होय देवो रया ॥ २ ॥ डोळयाचा डोळसु विचरे हा परेशु तोचि परमात्मा सर्वां असे । बापरखुमादेविवरु विठ्ठलु उघडा पुरविला सौरसु गे माय । आम्हा जितांचि मरणें कीं मेलिया कल्पकोटी जिणें । निवृत्तीनें दाविलें परेशु रया ॥ ३ ॥

३८८७ सावळी प्रतिमा घेऊनि सुकुमार । खेळत सुंदर गोकुळीं रया ॥ १ ॥ त्या रूपें वेधिलें काय करूं माये । अवघें निर्गुणाचि होय पाचारितां ॥ २ ॥ मीपणा ठाव नुरेचि पैं सर्वथा । प्रपंचाची कथा ब्रह्म झाली ॥ ३ ॥ बाप निवृत्तिराजे दाविताती खुण । नाम नारायण पाठ कीजे ॥ ४ ॥

---

# खिरापतीचे अभंग

## श्रीएकनाथमहाराज

३८८८ क्षीरसागरींचे नावडे सुख । क्षीरापती देख देव आला ॥ १ ॥ कवळ कवळ पहाहो । मुख पसरूनि धांवतो देवो ॥ २ ॥ एकादशीस देव जागरा आला । क्षीरापतीलागीं टोकत ठेला ॥ ३ ॥ द्वादशी क्षीरापती ऐकोनी गोष्टी । आवडी देव देतसे मिठी ॥ ४ ॥ क्षीरापती घालितां वैष्णवामुखीं । तेणें मुखें देव होतसे सुखी ॥ ५ ॥ क्षीरापती सेवितां आनंदु । स्वानंदें भुलला नाचे गोविंदु ॥ ६ ॥ क्षीरापती सेवितां वैष्णवा लाहो । मुखामाजीं मुख घालितो देवो ॥ ७ ॥ क्षीरापती चारा जनार्दन मुखीं । एकाएकीं तेणें होतसे सुखी ॥ ८ ॥

## श्रीतुकाराममहाराज.

३८८९ बहुडाविलें जन मन जालें निश्चळ । चुकवूनि कोल्हाळ आला तुका ॥ १ ॥ पर्यंकी निद्रा करावें शयन । रखुमाई आपण समवेत ॥ २ ॥ घेऊनियां आलों हातीं टाळ वीणा । सेवेसी चरणा स्वामिचिया ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां परिसावीं सादरें । बोबडीं उत्तरें पांडुरंगा ॥ ४ ॥

३८९० आड केलें देवद्वार । व्यर्थ काय करकर ॥ १ ॥ आतां चला जाऊं घरा । नका करूं उजगरा ॥ २ ॥ देवा लागलीसे नीज । येथें उभ्या काय काज ॥ ३ ॥ राग येतो देवा । तुका म्हणे नेघे सेवा ॥ ४ ॥

३८९१ पाहें प्रसादाची वाट। द्यावें धुवोनियां ताट ॥ १ ॥ शेष घेउनी जाईन । तुमचें झालिया भोजन ॥ २ ॥ झालों एकसवा। तुम्हां आडोनियां देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे चित्त। करूनी राहिलों निवांत ॥ ४ ॥

३८९२ पावला प्रसाद आतां विठो निजावें । आपला तो श्रम कळों येतसे भावें ॥ १ ॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा। पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ २ ॥ तुम्हासी आम्ही जागविलें आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्मं दोष हरावया पीडा ॥ ३ ॥ तुका म्हणे दिलें उच्छिष्टाचें भोजन । नाहीं निवडिलें आम्हां आपणया भिन्न ॥ ४ ॥

---

# काल्याचे अभंग

## श्रीतुकाराममहाराज

३८९३ याल तर यारे लागें । अवघे माझ्या मागें मागें ॥ १ ॥ आजि देतों पोटभरी । पुरे म्हणाल तोंवरी ॥ २ ॥ हळूहळू चला । कोणी कोणाशीं न बोला ॥ ३ ॥ तुका म्हणे सांडा धाटे । तेणें नका भरूं पोटें ॥ ४ ॥

३८९४ पाहाती गौळणी । तंव पालथी दुधाणी ॥ १ ॥ म्हणती नंदाचिया पोरें । आजि चोरी केली खरें ॥ २ ॥ त्याविण हे नासी । नव्हे दुसरीया ऐसी ॥ ३ ॥ सवें तुका नेला । त्याणें अगुणा आणिला ॥ ४ ॥

३८९५ माझे गडी कोण कोण । निवडा भिन्न यांतुनी ॥ १ ॥ आपआपणामध्यें मिळों । एक खेळों एकाशीं ॥ २ ॥ घाबरियांच्या मोडा काड्या । धाडा भ्याडां वळतियां ॥ ३ ॥ तुका म्हणे देवांपाशीं । विटाळशी नसावी ॥ ४ ॥

३८९६ चला वळूं गाई । वैसों जेऊं एके ठायीं ॥ १ ॥ बहु केली वणवण । पायपिटी जाला सीण ॥ २ ॥ खांदी भार पोटीं भूक । काय खेळायाचें सुख ॥ ३ ॥ तुका म्हणे धांवें । मग अवघें बरवें ॥४॥

३८९७ अवघियां दिला गोर । मजकरे पाहींना ॥१॥ फुंदे गोपाळ डोळे चोळी । ढुंगा थापली हाणे तोंडा ॥ २ ॥ आवडती थोर मोठे । मी रे पोरटें दैन्यवाणें ॥ ३ ॥ तुका म्हणे जाणों भाव । जीवींचा देव बुझावी ॥ ४ ॥

३८९८ घ्यारे भोंकरें भाकरी । दहीं भाताची सिदोरी । ताक सांडा दुरी । असेल तें तया पैं ॥ १ ॥ येथें द्यावें तैसें घ्यावें । थोडें परी निरें व्हावें । सांगतों रे ठावें । असों द्यारे सकळां ॥ २ ॥ माझें आहे तैसें पाहे । नाहीं तरी घरा जाये । चोरोनियां माये । नवनीत आणावें ॥ ३ ॥ तुका म्हणे घरीं । माझे कोणी नाहीं हरी । नका करूं दुरी । पायांवेगळें ॥ ४ ॥

३८९९ काल्याचिये आसे । देव जळीं जाले मासे । पुसोनियां हांसे । टिरीसांगातें हात ॥ १ ॥ लाजे त्यासी वांटा नाहीं । जाणे अंतरींचें तेंही । दान होतां कांहीं । होऊं नेदी वेगळी ॥ २ ॥ उपाय अपाय यापुढें । खोटें निवडितां कुडें । जोडोनियां पुढें । हात उभे नुपेक्षी ॥ ३ ॥ तें घ्यारे सावकाशें । जया फावेल तो तैसें । तुका म्हणे रसें । प्रेमाचिया आनंदें ॥ ४ ॥

३९०० आजि ओस अमरावती । काला पाहावया येती । देव विसरती । देहभाव आपुला ॥ १ ॥ आनंद न समाये मेदिनी । चारा विसरल्या पाणी । तटस्थ त्या ध्यानीं । गाई जाल्या श्वापदें ॥ २ ॥ जें या देवाचें दैवत । उभें आहे या रंगांत । गोपाळांसहित । क्रिडा करी कान्होबा ॥ ३ ॥ तया सुखाची शिराणी । तींच पाउलें मेदिनी । तुका म्हणे मुनी । धुंडितां न लभती ॥ ४ ॥

३९०१ चला बाई पांडुरंग पाहूं वाळवंटीं । मांडियेला काला

भोंवतीं गोपाळांची दाटी ॥ १ ॥ आनंदें कवळ देती एका मुखीं एक । न म्हणती सान थोर अवघीं सकळीक ॥ २ ॥ हमामा हुंवरी पांवा वाजवीती मोहरी । घेतलासे फेर माजीं घालुनीयां हरी ॥ ३ ॥ लुब्धल्या नारी नर अवघ्या पशुयाती । विसरलीं देहभाव शंका नाहीं चित्तीं ॥ ४ ॥ पुष्पांचा वरुषाव जाली आरतियांचि दाटी । तुळशी गुंफोनियां माळा घालितील कंठीं ॥ ५ ॥ यादवांचा राणा गोपी मनोहर कान्हा । तुका म्हणे सुख वाटे देखोनियां मना ॥ ६ ॥

३९०२ कंठीं धरिला कृष्णमणी । अवघा जनीं प्रकाश ॥ १ ॥ काला वांटूं एकमेकां । वैष्णवां निका संभ्रम ॥ २ ॥ वांकुलिया ब्रम्हादिकां । उत्तम लोकां दाखवूं ॥ ३ ॥ तुका म्हणे भूमंडळीं । आम्ही बळी वीर गाढे ॥ ४ ॥

३९०३ उपजोनियां पुढती येऊं । काला खाऊं दहींभात ॥ १ ॥ वैकुंठीं तो ऐसें नाहीं । कवळ कांहीं काल्याचे ॥ २ ॥ एकमेकां देऊं मुखीं । सुखीं घालूं हुंबरी ॥ ३ ॥ तुका म्हणे वाळवंट । बरवें नीट उत्तम ॥ ४ ॥

३९०४ आतां हेंचि जेऊं । सवें घेऊं सिदोरी ॥ १ ॥ हरिनामाचा खिचडा काला । प्रेमें मोहिला साधनें ॥ २ ॥ चवीं चवीं घेऊं घास । ब्रम्हरस आवडी ॥ ३ ॥ तुका म्हणे गोड लागे । तों तों मागे रसना ॥ ४ ॥

३९०५ कवळाचिया सुखें । परब्रम्ह जालें गोरखें । हात गोवूनि खाय मुखें । बोटासांदीं लोणचें ॥ १ ॥ कोण जाणे तेथें कोण लाभ । कां तें ब्रम्हादिकां दुर्लभ ॥ २ ॥ घाली हमामा हुंवरी । पांवा वाजवी मोहरी । गोपाळांचे फेरी । हरी छंदें नाचतसे ॥ ३ ॥ काय नव्हतें त्याघरीं खावया । रिघे लोणी चोरावया । तुका म्हणे सवें तया । आम्हीही सोकलों ॥ ४ ॥

३९०६ आम्ही गोवळीं रानटें । नव्हो जनांतील धीटें ॥ १ ॥ सिदोरीचा करूं काला । एक वांटितों एकाला ॥ २ ॥ खेळों आप-

आपणाशीं । आमचीं तीं आम्हांपाशीं ॥ ३ ॥ म्हणे मिळालों नेणते ।
तुका कान्होबाभोंवते ॥ ४ ॥

३९०७ पाहतां गोवळी । खाय त्यांची उष्टावळी ॥ १ ॥ करिती नामाचें चिंतन । गडी कान्होबाचें ध्यान ॥ २ ॥ आली द्यावी डायी । धांवे वळत्या मागें गाई ॥ ३ ॥ एके ठाईं काला । तुका म्हणे भावि-काला ॥ ४ ॥

३९०८ गोकुळींच्या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ बाळ-कृष्ण नंदाघरीं । आनंदल्या नरनारी ॥ २ ॥ गुढिया तोरणें । करिती कथा गाती गाणें ॥ ३ ॥ तुका म्हणे छंदें । मन मोहिलें गोविंदें ॥ ४ ॥

३९०९ अनंत ब्रह्मांडें उदरीं। हरि हा बाळक नंदाघरीं ॥ १ ॥ नवल केव्हडें केव्हडें । न कळे कान्होबाचें कोडें ॥ २ ॥ पृथ्वी जेणें तृप्त केली । त्यासी यशोदा भोजन घाली ॥ ३ ॥ विश्वव्यापक कमळापती । त्यासी गौळणी कडिये घेती ॥ ४ ॥ तुका म्हणे नटधारी । भोग भोगूनी ब्रह्मचारी ॥ ५ ॥

३९१० काकुलती येतो हरी । क्षणभरी निवाडितां ॥ १ ॥ तुमची मज लागली सवे । ठायींचे नवे नव्हां गडी ॥ २ ॥ आणीक बोला-विती फार । बहु थोर नावडती ॥ ३ ॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । तुका म्हणे मिठी घाली जीवें ॥ ४ ॥

३९११ आजी दिवस झाला । धन्य सोनियाचा भला ॥ १ ॥ झालें संतांचें पंगती । बरवें भोजन निगुती ॥ २ ॥ रामकृष्णनामें । बरवीं मोहियेलीं प्रेमें ॥ ३ ॥ तुका म्हणे आला । चवी रसाळ हा काला ॥ ४ ॥

३९१२ अवघोंचि गोड जालें । मागीलये भरी आलें ॥ १ ॥ साह्य झाला पांडुरंग । दिला अभ्यंतरीं संग ॥ २ ॥ थाडिये पावतां तो वाव । मागें वाहावतां ठाव ॥ ३ ॥ तुका म्हणे गेलें । स्वप्नींचें जागें झालें ॥ ४ ॥

३९१३ बहु बरा बहु बरा । या सांगातें मिळे चारा ॥ १ ॥ म्हणोनि जीवेंसाठीं । घेतली कान्होबाची पाठी ॥ २ ॥ बरवा बरवा दिसे । समागम याचा निमिषें ॥ ३ ॥ पुढती पुढती तुका । सोंकला सोंकवितो लोकां ॥ ४ ॥

३९१४ पळाले ते भ्याड । त्यांसी येथें झाला नाड ॥ १ ॥ धीट घेती धणीवरी । शिंकीं उतरितो हरी ॥ २ ॥ आपुलिया मतीं । पडलीं विचारीं तीं रितीं ॥ ३ ॥ तुका लागे त्या रे पायां । कैं पावाल या ठाया ॥ ४ ॥

३९१५ हरि गोपाळांसवें सकळां । भेटे गळ्या गळा मेळवूनि ॥१॥ भाविकें त्यांची आवडी मोठी । सांगे गोष्टी जीवींचिया ॥ २ ॥ योगियांच्या ध्याना नये । भाकरी त्यांच्या मागोनी खाय ॥ ३ ॥ तुका म्हणे असे शाहाणियां दूरी । बोबडिया दासां हाका मारी ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

३९१६ काला करिती संतजन । सवें त्यांच्या नारायण ॥ १ ॥ वांटी आपुल्या निज हस्तें । भाग्याचा तो पावे तेथें ॥ २॥ लाही सित लागे हातीं । दोष देखोनियां त्या पळती ॥ ३ ॥ निळा म्हणे क्षीराचा बुंद । लागतां पावे ब्रह्मानंद ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

३९१७ असो थोर थोरांची मात । तूंचि मिळालासी गोपाळांत ॥ १ ॥ त्यांच्या शिदोऱ्या सोडिसी । ग्रासोग्रासीं उच्छिष्ट खासी ॥ २ ॥ न म्हणे सोंवळें ओंवळें । प्रत्यक्षचि तें ओंवळें ॥ ३ ॥ स्वानंदाचे डोहीं हात । धुतले सर्वांही निश्चित ॥ ४ ॥ हातीं काळ्या पायीं जोडे । दासी जनी वाट झाडे ॥ ५ ॥

३९१८ एकच टाळी झाली चंद्रभागे वाळवंटीं । माझा ज्ञानराज गोपाळांशीं लाह्या वाटी ॥ १ ॥ नामदेव कीर्तन करी पुढें नाचे पांडुरंग । जनी म्हणे बोला ज्ञानदेवा अभंग ॥ २ ॥ अभंग बोलतां रंग

कीर्तनीं भरला । प्रेमाचेनि छंदें विठ्ठल नाचूं लागला ॥ ३ ॥ नाचतां नाचतां देवाचा गळला पितांबर। सावध होईं देवा ऐसा बोले कबीर ॥ ४ ॥ साधु या संतांनीं देवाला धरिला मनगटीं। काय झालें म्हणुनी दचकले जगजेठी ॥ ५ ॥ ऐसा कीर्तन महिमा सर्वांमाजी वरिष्ठ । जड मूढ भाविकां सोपी केली पायवाट ॥ ६ ॥ नामयाची जनी लोळे संतांच्या पायीं । कीर्तन प्रेमरस अखंड देईं गे विठाई ॥ ७ ॥

## श्रीभानुदासमहाराज

३९१९ अवध्या सोडियेल्या मोटा । आजीचा दहीं काला गोमटा ॥ १ ॥ घ्यारे घ्यारे दहीं भात । आम्हां देतो पंढरीनाथ ॥ २ ॥ मुदा घेऊनियां करीं । पेंधा वाटितो शिदोरी ॥ ३ ॥ भानुदास गीतीं गात । प्रसाद देतो पंढरीनाथ ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

३९२० अनंत नामाचा हा काला । पुराणें म्हणती पाहूं चला ॥ १ ॥ हरिनामाचा कवळु घेतां । तेणें धालों पैं सर्वथा ॥ २ ॥ एका कवळासाठीं। गणिका बैसविली वैकुंठीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं कवळ । संतू जाणती ते प्रेमळ ॥ ४ ॥

३९२१ देव भक्त दोन्ही करिताती काला । तयांच्या सुखाला वर्णी कवण ॥ १ ॥ धन्य भाग्य त्यांचें गोकुळ जनांचें । ठेवणें सदाशिवांचें खेळतसे ॥ २ ॥ उच्छिष्ट तें खाय तयाचेनी हातें । नाहीं कंटाळत तयालागीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भक्ताची आवडी । वाढवीत गोडी नित्य नवी ॥ ४ ॥

३९२२ पेंधा म्हणे देवा बाऊ तो पळाला । आमुचें भेणें गेला देशोधडी ॥ १ ॥ देव म्हणे गोपाळा धन्य तुम्हीं बळी । पळाविला बळी बाऊ तुम्हीं ॥ २ ॥ ऐसें समाधान करी मनमोहन । एकाजनार्दन चरणीं लागे ॥ ३ ॥

३९२३ करूनियां काला सर्व आले गोकुळीं । गोपाळांसहित गाई वत्स सकळीं ॥ १ ॥ वोवाळिती श्रीमुख कुर्वंडी करिती । रामकृष्णातें सर्व ओवाळिती ॥ २ ॥ जाहला जयजयकार आनंद सकळां । एकाजनार्दनीं धणी पाहतां डोळा ॥ ३ ॥

३९२४ बैसविती हरी वस्त्रघडीवरी । पूजा करिती वरी पुष्पपत्रें ॥ १ ॥ धाउनी गळां पालेमाळा त्या वाहाती । गजरें नाचती पुढें एक ॥ २ ॥ टिरिया मांडिया वाजविती घाय। हरुषें नाचताहे देवराय ॥ ३ ॥ ऐसें नित्यानित्य क्रीडा ते करिती । देव ते पाहती विमानीं तें ॥ ४ ॥ म्हणताती देव वंचलों या सुखा । एकाजनार्दनीं देखा गोंवियलें ॥ ५ ॥

## श्रीनिवृत्तिमहाराज

३९२५ वैष्णवांचा मेळ सकळ मिळाला । विठ्ठलनामें काला पंढरीसी ॥ १ ॥ हरिनाम विनट हरि उच्चारीत । सप्रेमें डुल्लत भक्तजन ॥ २ ॥ चालिला सोपान ज्ञानदेव निधि । मुक्ताई गोविंदीं तल्लीनता ॥ ३ ॥ निवृत्ति खेचर परिसा भागवत । आनंदे डुल्लत सनकादिक ॥ ४ ॥

३९२६ आनंद सर्वांचा काला अरुवार । नामया साचार फुंदतुसे ॥ १ ॥ राहिरखुमाबाई सत्यभामा माता । आलिया त्वरिता काल्यामाजीं ॥ २ ॥ उचलिला नामा प्रेमाचें फुंदन । नुघडी तो नयन कांहीं केल्या ॥ ३ ॥ बुझावित राही रखुमादेवी बाही । पीतांबर साई करिती हरी ॥ ४ ॥ ज्ञानासी कवळु सोपानासी वरु । खेचरा अरुवारु कवळु देतु ॥ ५ ॥ निवृत्ति पूर्णिमा भक्तीचा महिमा । नामयासि सीमा भीमातीरीं ॥ ६ ॥

## श्रीसोपानमहाराज

३९२७ चलारे वैष्णवहो जाऊं पंढरीसी । प्रेमामृत खूण मागों त्या विठ्ठलासी ॥ १ ॥ चालिले गोपाळ वाताती वाकुलिया । भरले

प्रेमरसें मग ते वातातो टाळिया ॥ २ ॥ दिंड्या गरुडटके मृदंगाचे नाद । गातातो विठ्ठलनाम करितातो आल्हाद ॥ ३ ॥ पावले पंढरी भीमा देखियेली दृष्टी । वैष्णवाचा गजरु आनंदें हेलावली सृष्टी ॥ ४॥ गजरु गोपाळांचा श्रवणीं पडियेला । शंखचक्र करीं विठ्ठल सामोरा आला ॥ ५ ॥ कांसवदृष्टी न्याहाळीतु रंगीं नाचतु पैं उगला । सोपान म्हणे आम्हीं वाळुवंटीं केला काला ॥ ६ ॥

## श्रीसेनामहाराज

३९२८ सोडिल्या शिदोरी । काला करी दहीं भात ॥ १ ॥ घ्यारे अवघे समस्त । हरी गोपाळांसी देत ॥ २ ॥ कांहीं न ठेवा उरी । आजि देतों पोटभरी ॥ ३ ॥ सेना बैसला द्वारीं । प्रसाद वांटितो श्रीहरी ॥ ४ ॥

---

# गळति

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

३९२९ विदेह आत्मलिंगा गुरुकृपेचा तुषारु । पुर्णे पूर्ण भरिला घट्ट हळूहळू बिंदु उदारु । वरुषला लिंगावरि तेणें तुष्टला श्रीगुरु । प्रसन्न निवृत्तिराज। ज्ञान देऊनि उदारु ॥ १ ॥ यालागीं ज्ञानदेव नाम गुरुकृपेनें पावलों । असतां इये देहीं संसारा हारपलों । ज्ञानविज्ञान कळों आलें अद्वैतरूपीं बुझालों। विठ्ठल नाम माझे वाचे तेणें वाग्पुष्प पावलों ॥२॥ नित्य गळति नामें जाली गेला प्रपंच अनिवारू। उपरती देहीं जाली निमाली वासनासंसारू । तपन जालें ब्रह्ममूर्ती दिनादिशीं साचारू। आठवितां मागिल भावो अवघा पारुषला उदारु ॥ ३ ॥ विज्ञानेसि ज्ञान गेलें एकरूप परिचार। ज्योतिमाजि कळिका गेली एकदीप जाला आकार। वृत्ति ते निवृत्ति जाली माया मारुनि केलें घर । निवृत्ति गुरु माझा घट स्थापिला त्या समोर ॥ ४ ॥ ज्ञानदेवें

घटींमटीं निरोपिली हरिभक्ती । उडाली पक्षपाती इंद्रिया तेथें नाहीं गती । विराले अभिमान ममता जाली समाप्ती । खुंटालिया ऊर्मी दाही तपन जालें लिंगाप्रती ॥ ५ ॥

३९३० आदि आत्मज्योतीलिंगा लांबियेला घट्ट । स्थावरिलें मायावस्त्र लिंगावरी प्रविष्ट । तपन नामध्वनी इंद्रिया केलें सपाट्ट ॥ १ ॥ हळुहळु गळती गळे गळों लागली सकळें । उच्चारितां कृष्ण नाम भेणें पळिजे कळिकाळें ॥ ध्रु० ॥ त्रिगुण सुटल्या गांठी घट्ट विराला सघन । पंचतत्त्वें एके ठायीं आत्मा नांदे परिपूर्ण । जिव-शिव हरपले एक दिसे चैतन्य । आत्माराम विदेहिया श्रीगुरूनें सांगितली खूण ॥ २ ॥ गळाति लागीं अपाय मोठें विरूळा जाणे हेचि खुण । नरदेह अवचितें जो साधकु होय नारायण । परमानंदें गळति गळे पांचाहि तत्त्वें हरपोन ॥ ३ ॥ निवृत्ति सखा माझा दीनदयाळ श्रीगुरु । आळंकापुरीं स्थापियेलें दिधला विठ्ठल उच्चारू । समाधि जीवन माझें वरी अज्ञानवृक्षतरू । जंववरी चंद्रसूर्य तंववरी कीर्तिघट स्थिरू ॥ ४ ॥ गाति वाति साधु मुनी छंदु घटमठीं चित्त । विरेल देहबुद्धि ज्ञानदाता देईल उचित । विज्ञा-नेसी गोष्टी सांगे ऐसें पद पावत । बापरखुमादेविवरु लांबविला घट्ट ज्ञानदेव सांगत ॥ ५ ॥

---

## ‘ घोंगडी ’

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

३९३१ माझिया घोंगडियावरी ब्रह्माचा गोंडा । बाहिरी सांडा बैसावया ॥ १ ॥ संतचरणीं रूळे श्रीरंगीं रंगलें । व्योमाकार मिर-वलें तेंचि देखे ॥ २ ॥ रखुमादेविवरें विठ्ठलें दिधलें । अमोलिक झालें मोलेंविण ॥ ३ ॥

३९३२ घोंगडी घेऊनि हाटासि जाये । पंढरिये आहे वस्ती आम्हां ॥ १ ॥ घोंगडियाचें मोल पैं जालें । चरणीं राहिलें विठ्ठलाचे ॥ २ ॥ घोंगडें एक वैसलें थडी । उभयां गोडी विठ्ठलाची ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे अनुभवी तो जाणे । शहाणे ये खुणें संतोषले ॥ ४ ॥

३९३३ काळें ना सांवळें धवळें ना पिंवळें । घोंगडें निराळें लाधलों मी ॥ १ ॥ मागील रगटें झाडिलें आतां । पंढरीनाथा चरणाजवळीं ॥ २ ॥ नवें नवधड हातां आलें । दृष्टी पाहे तंव मन हारपलें ॥ ३ ॥ सहस्र फुलीवरी गोंडा थोरू । धडुते दावी रखुमादेविवरू ॥ ४ ॥

३९३४ अद्वैत पेठेहुनी घोंगडें आणिलें । अमोलिक घेतलें पंढरिये ॥ १ ॥ चौ हातांची भरणी आली । तिये चराचरीं ऐसें नाहीं ॥ २ ॥ रखुमादेविवरु विठ्ठलीं नीट । पांघुरविलें वैकुंठ मज देखा ॥ ३ ॥

३९३५ माझें चवाळें रंगाचें बहुतें । श्रीगुरु निवृत्तिनाथें दिधलें गे माय ॥ १ ॥ चवाळें शुद्ध चहूं पालवीं । व्योमाकार वेद प्रसिद्ध पांघुरवी ॥ २ ॥ आतां पराहुनि परमेहूचें । बापरखुमादेविवरा विठ्ठला अंगीचें ॥ ३॥

३९३६ निरंजना गाई चारूं गेलों । तंव चवाळें तेथें एक पावलों ॥ १ ॥ मज निर्गुणें आड वारिलें । चवाळें हिरोनि जिणें बुडविलें ॥ २ ॥ बापरखुमादेविवरें इतुकें केलें । माझें चवाळें हिरोनि नेलें गे माये ॥ ३ ॥

३९३७ निर्गुण चवाळें आणिलें । बापनिवृत्तीनें मज पांघुराविलें ॥ १ ॥ चौघे चाऱ्ही पदर म्हणीतले । पांघुरणें झालें सारासार ॥ २ ॥ बापरखुमादेविवरें विठ्ठलें । माझें चोरूनि जिणें उघडें केलें गे माये ॥ ३ ॥

३९३८ चवाळ्याची सांगेन मातु । चवाळें पांघुरे पंढरिनाथु

॥ १ ॥ गोधनें चारितां हरि पांघुरला । मज चवाळ्याचा त्यागु पें दिधला ॥ २ ॥ बापरखुमादेविवरु श्रीगुरुराणा । चवाळें पांघुरवी निरंजना गे माय ॥ ३ ॥

३८३९ तूं माझा स्वामी मी तुझा रंक । पाहतां न दिसे वेगळिक ॥ १ ॥ मी तूं पण जाऊं दे दुरी । एकचि घोंगडें पांघरूं हरी ॥ २ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलराया । लागेन मी पायां वेळोवेळां ॥ ३ ॥

३९४० कान्होबा तुझी घोंगडी चांगली । आम्हांसी कां दिली वांगली ॥ ध्रु० ॥ स्वगत सच्चिदानंदें मिळोनि शुद्ध सत्वगुण विणली रे । षड्‌गुण गोंडे रत्नजडित तुज श्यामसुंदरा शोभली रे ॥ १ ॥ काम कर्म अविद्या त्रिगुण पंचभूतांनीं विणली रे । रक्त रेत दुर्गंधी जंतु नरक मुताने भरलीरे ॥ २ ॥ षड्विकार षड्वैरी मिळोनि तापत्रयानें विणलीरे । नवा ठायीं फाटूनि गेली ती त्वां आम्हांसी दिधली रे ॥ ३ ॥ ऋषि मुनि ध्यातां मुखीं नाम गातां संदेहवृत्ती विरली रे । बापरखुमादेविवर विठ्ठलें त्वत्पदीं वृत्ति मुरली रे ॥ ४ ॥

### श्रीसोपानमहाराज

३९४१ घोंगडियासाठीं पंढरीये पेटीं । वैष्णवाची दाटी होती तेथें ॥ १ ॥ घोंगडियांचें मोल पैं खरें । रामटका देई एक पुरे ॥ २ ॥ घोंगडिया घोंगडिया पाड दाविती । एक एक दाविती एकापुढें ॥ ३ ॥ सोपान घोंगडी घडी केली । चरणीं राहिली निवृत्तीच्या ॥ ४ ॥

---

## सद्‌गुरुपर

### श्रीतुकाराममहाराज

३९४२ सद्‌गुरुरायें कृपा मज केली । परि नाहीं घडली सेवा कांहीं ॥ १ ॥ सांपडविलें वाटे जातां गंगास्नाना । मस्तकीं तो जाणा

ठेविला कर ॥ २ ॥ भोजना मागती तूप पावशेर । पडिला विसर स्वप्नांमाजी ॥ ३ ॥ कांहीं कळे उपजला अंतराय । म्हणोनिया काय त्वरा झाली ॥ ४ ॥ राघवचैतन्य केशवचैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥ ५ ॥ बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला राम कृष्णहरि ॥ ६ ॥ माघ शुद्ध दशमी पाहुनि गुरुवार । केला अंगिकार तुका म्हणे ॥ ७ ॥

३९४३ माझिये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥ १ ॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणे नव्हे गुंफा कांहीं कोठें ॥ २ ॥ जाती पुढें एक उतरले पार । हा भवसागर साधुसंत ॥ ३ ॥ जाणत्या नेणत्या ज्या जैसी आवडी । उतार सांगडी तापे पेटीं ॥ ४ ॥ तुका म्हणे मज दावियेला तारू । कृपेचा सागरू पांडुरंग ॥ ५ ॥

३९४४ घालूनिया भार राहिलों निश्चिती । निरविले संतीं विटोबासी ॥ १ ॥ लावूनिया हातें कुरवाळिला माथा । सांगितलें चिंता न करावी ॥ २ ॥ कटीं कर समचरण साजिरे । राहिला भीवरे तीरीं उभा ॥ ३ ॥ खुंटले सायास आणीक या जीवा । धरिले केशवा पाय तुझे ॥ ४ ॥ तुज वाटे आतां तें करी अनंता । तुका म्हणे संतां लाज माझी ॥ ५ ॥

३९४५ माझिये मनीचा जाणा हा निर्धार । जिवासी उदार झालों आतां ॥ १ ॥ तुजविण दुजें न धरीं आणिका । भय लज्जा शंका टाकियेली ॥ २ ॥ ठायींचा संबंध तुज मज होता । विशेष अनंता केला संतीं ॥ ३ ॥ जीवभाव तुझ्या ठेवियेला पायीं । हेचि आतां नाहीं लाज तुम्हां ॥ ४ ॥ तुका म्हणे संतीं घातला हवाला । न सोडीं विठ्ठला पाय आतां ॥ ५ ॥

३९४६ सद्गुरूचें चरणीं ठेविला मस्तक । देऊनिया हस्तक उठाविलें ॥ १ ॥ उठाविलें मज देऊनियां प्रेम । भावार्थें सप्रेम नमस्कारीं

॥ २ ॥ नमस्कारीं त्याला सद्गुरूरायाला । तुका म्हणे बोला नाम वाचे ॥ ३ ॥

३९४७ सद्गुरूनें मज आशीर्वाद दिला । हरूष भरला हृदयीं माझे ॥ १ ॥ हृदयींचा भाव कळला गुरूसी । आनंद उल्हासीं बोले मज ॥ २ ॥ बोले मज गुरू कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं आनंदलों ॥ ३ ॥

३९४८ अनंता जन्मींचा शीण उतरला । सद्गुरू भेटला सदानंद ॥ १ ॥ सदानंद माझा पांडुरंग पूर्ण । मायादि कारण विश्वबीज ॥ २ ॥ देऊनीयां हातीं निज बोधरत्न । तोडिला प्रयत्न संसारीचा ॥ ३ ॥ तुका म्हणे गुरू उपकारासी पाहीं । न मिळेचि कांहीं ब्रह्मांडांत ॥ ४ ॥

३९४९ मज अनाथासी घेऊनी पदरीं । निघाले बाहेरी गुरूराज ॥ १ ॥ आकाराचे माथां देउनीया पाय । ठेविलें अक्षय निजपदीं ॥ २ ॥ काय सांगूं माझी वाचा हे निमाली । सद्गुरू माऊली दयाळु जे ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें मरोनी जन्मलों । आपुलें पावलों अधिष्ठान ॥ ४ ॥

३९५० सद्गुरूनें कानीं महावाक्यध्वनीं । कुंडलें श्रवणीं लेवविलीं ॥ १ ॥ अध्यात्म कावडी दिधली कुबडी । धारणेचि बुडी हंसरूपीं ॥ २ ॥ धर्माधर्म धुणी सहज जागवी । शांती आंगीं लावी विभूति हे ॥ ३ ॥ राहिलों निवांत दृढ या आसनीं । सहज साधनीं स्थिर झालों ॥ ४ ॥ धैर्याचा कुतका हृदय तो कुंडा । बोध भांग पुढां घोटियलीं ॥ ५ ॥ घोटोनीयां घोटा मिश्रित ते भांग । नेमानिष्ठ दंग तन्मयता ॥ ६ ॥ तुका म्हणे गुरू कृपेचा आधार । नामीं निरंतर डुलतसों ॥ ७ ॥

३९५१ धन्य धन्य सद्गुरूराज । ज्योत दाखविली मज ॥ १ ॥ काळें पिवळें ढवळें । रूप गोजिरें सांवळें ॥ २ ॥ जैसे रंग उमटती । पाहे पाहे आत्मज्योति ॥ ३ ॥ चक्रें उमटति । मध्यें हिरे झळकती

॥ ४ ॥ अनुहाताचा गजर । सोहं नादाचा प्रकार ॥ ५ ॥ तुका म्हणे ऐसें दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥ ६ ॥

३९५२ सद्गुरुवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यास ऋषी ॥ १ ॥ म्हणोनि तयाचें पाहू नये तोंड । निगुरा अखंड सुतकाळा ॥ २ ॥ कोणे परी तया नव्हेचि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुम्ही ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसीं बोलती पुराणें । संतांची वचनें मागिला हो ॥ ४ ॥

३९५३ सकळ देवांचे दैवत । सद्गुरुनाथ एकला ॥ १ ॥ राम केला ब्रह्मज्ञानी । वसिष्ठ मुनि तारक ॥ २ ॥ कृष्ण गुरु संदीपन । पूर्ण ब्रह्म दाविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे सद्गुरुसेवा । सकळ देवा वसिष्ठ ॥ ४ ॥

३९५४ आधीं पूजा गुरुनाथा । चाले देवावरी सत्ता ॥ १ ॥ तेचि सद्गुरु जाणावे । कांपे काळ ज्यांच्या नांवे ॥ २ ॥ ज्यांची दृष्टी होतां पूर्ण । करी आपणासी पूर्ण ॥ ३ ॥ तुका गर्जतो पवाडे । गुरुभक्त ऐसे थोडे ॥ ४ ॥

३९५५ गुरु नाहीं नाशिवंत । गुरु सत्य तो अनंत ॥ १ ॥ गुरु सगुणस्वरूप । अवतार ज्ञानदीप ॥ २ ॥ गुरु अखंड अभेद । शिष्या पूर्ण तो गोविंद ॥ ३ ॥ तुका म्हणे एकरूप । गुरु शिष्य हे अरूप ॥ ४ ॥

३९५६ थोर थोरांची गती । गुरुवांचून नाहीं मूर्ती ॥ १ ॥ नारद मुनि शिष्य भला । त्याचा गुरु ब्रह्म झाला ॥ २ ॥ सप्त कोटी रामायण । केलें तया वाल्मीकाने ॥ ३ ॥ तया आधार कोणाचा । पहा मंत्र नारदाचा ॥ ४ ॥ सप्त कोटी रामायण । त्याचा गुरु जनार्दन ॥ ५ ॥ गुरु ज्ञानेश्वर दातार । त्याला निवृत्ति आधार ॥ ६ ॥ तुक्यासम स्वर्गा गेला । त्याचा गुरुचि तया झाला ॥ ७ ॥

३९५७ सद्गुरु वांचोनि सांपडेना सोय । धरावे ते पाय आधीं

आधीं ॥ १ ॥ आपणासारिखे करिती तात्काळ । नाहीं काळवेळ मग त्यांसी ॥ २ ॥ लोह परिसाची न साहे उपमा । सद्गुरु महिमा अगाधाचि ॥ ३ ॥ तुका म्हणे कैसे आंधळे हे जन । गेले विसरून खऱ्या देवा ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

३९५८ ॐनमोजी पंढरिराया । हृत्कमलवासीया गुरुनाथा ॥१॥ तुमचा अनुग्रह लाधलों । पात्र झालों महासुखा ॥ २ ॥ सकळ संत करिती कृपा । दाविला सोपा निजमार्ग ॥ ३ ॥ निळा म्हणे दिवस रात्रीं । गातो वक्त्रीं गुण नाम ॥ ४ ॥

३९५९ डोळियाचाही डोळा बुद्धी । माझी उघडूनियां कृपानिधी । देखणी करूनियां त्रिशुद्धी । निजात्मपदीं स्थापिली ॥ १ ॥ तेणें दिसती ठायाठाव । हृदय सकळांचेही भाव । संत दावीजे अनुभव । आणखीही सर्व मायाकृत ॥ २ ॥ नवल कृपेची हे जाती । फिटली मोह ममता भ्रांती । उत्पत्ति स्थिती प्रळय होती । ते ते निगुती आटले ॥ ३ ॥ देखणें झाले नयनानयन । देखती आपुलेंही वर्तन । राहिलें ठायींच ते जडोन । अभेद होऊन देखती ॥ ४ ॥ निळास्वामी सद्गुरुनाथा । देखणा तूंचि मी नाहीं आतां । तोडुनी मी हे माझी ममता । आपण आतौता मेळविलों ॥ ५ ॥

३९६० अवघे वर्ण बावन्नपरी । शब्दीं शब्दांच्या कुसरी ॥ १ ॥ आयते दिले जोडूनिया । स्वामी सद्गुरु तुकया ॥ २ ॥ नलगे करणेंचि घडामोडी । अर्थीं अक्षरें उघडी ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपावंता । कैसेनि उत्तीर्ण होऊं आतां ॥ ४ ॥

३९६१ कृपावंता सद्गुरुराया । केला जो माझीया मना बोध ॥१॥ तो काय बोलोनि दाखवूं आतां । बोलणें बोलतां अरौतें पडे ॥२॥ शब्दातीत परात्पर । ध्वनि ॐकार न पवेचि ॥ ३ ॥ निळा म्हणे आनंद कोटी । उथळोनीं सृष्टी गगनीं भरे ॥ ४ ॥

३९६२ तुकोबाचे किर्तनमेळीं । नाचे कल्लोळीं स्वानंदें ॥ १ ॥ क्षिरापती वाटी हातें । कालाही सांगातें करूं धावे ॥ २ ॥ उदकामाजी रक्षी वह्या । आलिंगी बाह्या पसरूनी ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशा कीर्ति । वाढवी श्रीपती दासांच्या ॥ ४ ॥

३९६३ सेवेलागी सेवक झालों । तुमच्या लागलों निज चरणा ॥ १ ॥ अहो स्वामी तुकया देवा । यावरी न करावा अव्हेर ॥ २ ॥ सहज लीले उदकीं वह्या । रक्षिलिया निजसत्ते ॥ ३ ॥ निळा म्हणे धराल हातीं । तरी घाल मती निरुपम ॥ ४ ॥

३९६४ पशुमुखें ज्ञानेश्वर । करविला उच्चार वेदघोषू ॥ १ ॥ तैसेंचि तुम्हीं मजही केलें । सामर्थ्यें वदविलें आपुलिया ॥ २ ॥ मी तो मुळींचाचि मतिमंद । जाणोनियां भेद अंतरीचा ॥ ३ ॥ निळा म्हणे अंगिकार । केलाजी वर देऊनियां ॥ ४ ॥

३९६५ येथें तुजलागी बोलाविलें कोणी । प्रार्थिल्यावांचूनि आलासी कां ॥ १ ॥ प्रल्हादा कैवारी दैत्याशीं दंडाया । स्तंभीं देवराया प्रगटोनी ॥ २ ॥ तैशापरी मजला नाहीं बा संकट । तरी कां फुकट श्रम केला ॥ ३ ॥ निळा म्हणे आम्हीं नोळखोंचि देवा। तुकयाचा धांवा करीतसों ॥ ४ ॥

३९६६ येऊनिया कृपावंतें । तुकयास्वामी सद्गुरुनाथें ॥ १ ॥ हात ठेविला मस्तकीं । देऊनी प्रसाद केलें सुखी ॥ २ ॥ माझी वाढविली मती । गुण वर्णावया स्फुर्ती ॥ ३ ॥ निळा म्हणे मी बोलता। दिसें परी हे त्याची सत्ता ॥ ४ ॥

३९६७ नव्हे हे सांगितली मात । महिमाच अद्भूत सद्गुरुचा ॥१॥ जीवाजीवपणाचा वंगू । तोडूनि अभंगु ब्रह्म करी ॥ २ ॥ आपुलिये मुळ मिरासी । नांदवी ज्यासी हातीं धरी ॥ ३ ॥ निळा म्हणे करितां सेवा । ऐसीया देवा पात्र करी ॥ ४ ॥

३९६८ नाठवी तो स्वयें द्यावी आठवण । हे तो आहे खूण

सद्गुरुची ॥ १ ॥ ऐशिया प्रकारें बोधविता शिष्या । अंतरीं प्रकाश काय उणे ॥ २ ॥ आपुलें स्वराज्य फावेल आपणासी । नित्य सदाभ्यासी तद्रूपता ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐशी सद्गुरूची कला । परि आहे विरळा बोधक तो ॥ ४ ॥

३९६९ चाडिया मुखें दाणा पडे । तरी तो निवडे कणभारें ॥१॥ तैसें कडवळ फोकीलें नोव्हे । सोपटचि राहे वाढोनिया ॥ २ ॥ तैसे सद्गुरु मुखींचे वचन । पाववी निजस्थान पदातें ॥ ३ ॥ वाचाळ शानें ऐकतां गोष्टी । वाडग्याच शेवटीं भरोवरी ॥ ४ ॥ निळा म्हणे सांप्रदाय शुद्ध । उपजवी बोध गुरु शिष्या ॥ ५ ॥

३९७० दळणीं कांडणीं गाइन मंगळीं । कान्हो वनमाळी प्राणसखा ॥ १ ॥ हरीचिया नामें हरती महादोष । तुटती कर्मपाश निमिषमात्रें ॥ २ ॥ सद्गुरुरायाचीं पाउलें गोमटीं । वंदितांची भेटे हृदयस्थ ॥ ३ ॥ माझ्या सद्गुरुचे अवलोकितां मुख । समाधीचें सुख तुच्छ वाटे ॥ ४ ॥ सद्गुरुरायाचें स्वरूप पाहातां । विश्वीं एकात्मता भासों लागे ॥ ५ ॥ नित्य सद्गुरुची आळवितां नामें । येती निजधामें भेटों स्वयें ॥ ६ ॥ सद्गुरुस्वामीचा महिमा अगाध । वचनींचि बोध करी शिष्या ॥ ७ ॥ सद्गुरु सद्गुरु करितां उच्चार । येती हरीहर भेटों स्वयें ॥ ८ ॥ सद्गुरूच्या नामें पोट माझें धाय । आनंदाचा होय पाहुणेरु ॥ ९ ॥ निळा म्हणे माझ्या सद्गुरुची मूर्ति । सकळांही विश्रांति विश्रांतीसी ॥ १० ॥

३९७१ मुख्य महाविष्णु चैतन्याचें मुळ । सांप्रदाय फळ तेथोनियां ॥ १ ॥ हंसरूपी ब्रह्मा उपदेशी श्रीहरी । चतुश्लोकी चारी भागवत ॥ २ ॥ तें गुज विधाता सांगे नारदासी । नारदें व्यासासी उपदेशिलें ॥ ३ ॥ राघव चैतन्य केलें अनुष्ठान । त्यासी द्वैपायनें कृपा केली ॥ ४ ॥ कृपा करूनि हस्त ठेवियेला शिरीं । बोध तो अंतरीं ठसावला ॥ ५ ॥ राघवा चरणीं केशव शरण । बावाजीशीं पूर्ण कृपा

त्याची ॥ ६ ॥ बाबाजींनें स्वप्नीं येऊनि तुकयाला । अनुग्रह दिला निज प्रीती ॥ ७ ॥ जगद्गुरू तुका अवतार नामयाचा । संप्रदाय सकळांचा येथूनियां ॥ ८ ॥ निळा म्हणे मज उपदेश केला । संप्रदाय दिला सकळ जना ॥ ९ ॥

३९७२ नमियेलीं घरांत घरें । शिवशक्ति वधुवरें ॥ १ ॥ आदि गुरू चराचरा । पासूनी ज्या परंपरा ॥ २ ॥ प्रसवोनिया दृश्यजाता । क्षराक्षरा मातापिता ॥ ३ ॥ निळा म्हणे वरदहस्तें । पाववितीं जे परमार्थातें ॥ ४ ॥

३९७३ मन विश्रांती पावलें । गुरूचरणीं स्थिरावलें ॥ १ ॥ ज्ञान-युक्त होतां मन । ब्रह्मभूत झालें जाण ॥ २ ॥ जिकडे जिकडे जाय मन । तिकडे तिकडे अधिष्ठान ॥ ३ ॥ निळा म्हणे मन । होऊनि ठेलें तें उन्मन ॥ ४ ॥

३९७४ पहा ज्याचें तयाची परी । जीवन भातें याच्या करीं ॥ १ ॥ देऊं जाणे यथाविधी । जैसा भाव तैशी सिद्धी ॥ २ ॥ उंच नीच अधिकारें । पावती आपुलाल्या व्यापारें ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्यापरी रवी । ज्याचे व्यवसाय तया दावी ॥ ४ ॥

३९७५ जाणे सकळां अंतरींचा । भाव साचा मिथ्या तो ॥ १ ॥ तया करी तैसाची मान । जैसें भजन ज्यापाशीं ॥ २ ॥ जेवीं एकचि स्वाती जळ । सर्पी गरळ हिरा भूमीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकचि हरी । जैशापरी तैसाचि ॥ ४ ॥

३९७६ अवघें देखे ब्रह्मरूप । गुणदोष पाप नातळे ॥ १ ॥ त्याची झाली चित्त शुद्धी । कृपानिधी तोषला ॥ २ ॥ हरीच्या भजनीं अत्यादर । पडेल विसर संसारें ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल ध्यानीं । चित्तीं मनीं बैसला ॥ ४ ॥

३९७७ सद्गुरुकृपा वोळली तयां । जे पंढरीराया अनुसरले ॥ १ ॥ भक्ति ज्ञान वैराग्यशीळ । शांति अढळ निर्वैरता ॥ २ ॥ भूतदया

मानसीं वसे । मातले प्रेमरसें गर्जती ॥ ३ ॥ निळा म्हणे हृदयीं ध्यान । मुखीं चिंतन अहर्निशीं ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

३९७८ सद्‌गुरु सारिखा सोईरा जीवलग । तोडिला उद्वेग संसारींचा ॥ १ ॥ काय उतराई होऊं कवण्या गुणें । जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥ २ ॥ माझें सुख मज दाखविलें डोळा । दिधली प्रेमकळा नाममुद्रा ॥ ३ ॥ डोळियाचा डोळा उघडिला जेणें । लेवविलें लेणें आनंदाचें ॥ ४ ॥ नामा म्हणे निकी सांपडली सोय । न विसंबें पाय खेचराचे ॥ ५ ॥

३९७९ सुखाचा सुखतरू सद्‌गुरु खेचर । स्वरूप साक्षात्कार दाखविला ॥ १ ॥ विठ्ठल पाहतां मावळलें मन । ध्यानीं भरले नयन तन्मय झालें ॥ २ ॥ मी माझें होतें तें मजमाजि निमालें । जळें जळ गिळिलें जयापरी ॥ ३ ॥ तेथें आनंद आनंदु ओळला परमानंदु । नाम्या झाला बोधु विठ्ठलनामें ॥ ४ ॥

३९८० नाशवंत देतां ब्रह्म येईल हातां । ऐसी ज्याची कथा पुराणांत ॥ १ ॥ सद्‌गुरुचे पायीं देहासी अर्पितां । तात्काळ मुक्तता हाता येते ॥ २ ॥ माया देऊनियां ब्रह्म घ्यावें हातीं । ऐशा गुरूप्रती कां भजाना ॥ ३ ॥ नामा म्हणे गुरूपायीं लाभ आहे । मोक्ष तोही पाहे दास होती ॥ ४ ॥

## श्रीजनार्दनस्वामी

३९८१ गुरुसख्या तुजविण । जाऊं पाहे माझा प्राण ॥ १ ॥ कां हो कठिण केलें मन । पाहें नेत्र उघडून ॥ २ ॥ माता पिता म्हणविलें । तरी कां निर्वाण मांडिलें ॥ ३ ॥ आतां यावें लवकरी । भेट द्यावी बा सत्वरीं ॥ ४ ॥ यश घेईं गुरुराया । जनार्दन ठेवीं पायां ॥ ५ ॥

३९८२ अहो सद्‌गुरू दातारा । म्हणविसी करुणाकरा ॥ १ ॥

राज्य देऊनि रजकासी । शेखीं नेलें पायांपाशीं ॥ २ ॥ ब्रह्मग्रहा दिलें ज्ञान । केलें आपणा समान ॥ ३ ॥ काय तुम्हां आराधिलें । काय देवासी अर्चिलें ॥ ४ ॥ त्यासी तुम्ही तारियेलें । ब्रीद वत्सल मिरविलें ॥ ५ ॥ लीला दाविली लाघवा । शुष्क काष्ठासी पल्लवा ॥ ६ ॥ जनार्दना कृपा करा । राखें पायांपें किंकरा ॥ ७ ॥

श्रीएकनाथमहाराज

३९८३ जनार्दनें माझें केलें असें हित । दाविला देहातीत देव मज ॥ १ ॥ नाटवे भाव अभावना तें कांहीं । स्वर्ग मोक्ष नाहीं चाड आम्हां ॥ २ ॥ देहाचें देहत्व देहपण गेलें । एकाजनार्दनीं केलें विदेहत्व ॥ ३ ॥

३९८४ मनोभाव जाणोनी माझा । सगुणरूप धरिलें वोजा । पाहुणा सद्गुरुराजा । आला वो माय ॥ १ ॥ प्रथम अंतःकरण जाण । चित्त शुद्ध आणि मन । चोखाळोनी आसन । स्वामीसीं केलें ॥ २ ॥ अनन्य आवडीचें जळ । प्रक्षाळिले चरणकमळ । वासना समूळ । चंदन लावी ॥ ३ ॥ अहं जाळियला धूप । सद्भाव उजाळिला दीप । पंचप्राण हे अमूप । नैवेद्य केला ॥ ४ ॥ रज तम सांडोनी दोन्ही । विडा दिला सत्वगुणी । स्वानुभवें रंगोनी । सुरंग दावी ॥ ५ ॥ एकाजनार्दनी पुजा । देव भक्त नाहीं दुजा । अवघाची सद्गुरुराजा । होवोनी ठेला ॥ ६ ॥

३९८५ ध्यानीं ध्यातां गुरुराया । ब्रह्मभूत होय काया ॥ १ ॥ करें करितां गुरुपूजा । तेंचि पूजन अधोक्षजा ॥ २ ॥ पायीं करा गुरुयात्रा । मुखें उच्चार गुरुमंत्रा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं परब्रह्म । हेंचि जाणा धर्म कर्म ॥ ४ ॥

३९८६ धन्य धन्य श्रीगुरुभक्त । गुरूचें जाणती मनोगत ॥ १ ॥ गुरूचरणीं श्रद्धा गाढी । गुरुभजनाची आवडी ॥ २ ॥ गुरूचें नाम घेतां वाचे । कैवल्यमुक्ति तेथें नाचे ॥ ३ ॥ गुरूचें घेतां चरणतीर्थ ।

भुक्ति मुक्ति पवित्र होत ॥ ४ ॥ गुरुकृपेचें महिमान । शरण एका-
जनार्दन ॥ ५ ॥

३९८७ धन्य धन्य सद्‍गुरुराणा । दाखविलें ब्रह्मभुवना ॥ १ ॥
उपकार केला जगीं । पावन झालों आम्ही वेगीं ॥ २ ॥ पंढरी पाहतां ।
समाधान झालें चित्ता ॥ ३ ॥ विटेवरी समचरण । एकाजनार्दनीं
निजखुण ॥ ४ ॥

३९८८ धन्य गुरू जनार्दन । स्वानंदाचें जें निधान ॥ १ ॥ तेणें
केला हा उपकार । दावियेलें परात्पर ॥ २ ॥ त्याच्या कृपें करूनि
जाण । प्राप्त झालें ब्रह्मज्ञान ॥ ३ ॥ एकाजनार्दन सद्‍गुरु । जनार्दन
माझा पैं आधारु ॥ ४ ॥

३९८९ वेदांन्त सिद्धांत पाहणें ते आटी । जनार्दन भेटी निरसली
॥ १ ॥ आगम निगम कासया दुर्गम । जनार्दनें सुवर्म सांगितलें
॥ २ ॥ न्यायमीमांसा पातंजली शास्त्रें । पाहतां सर्वत्र निवारलें ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं पूर्ण कृपा केली । भ्रांती निरसली मनाची ते ॥ ४ ॥

३९९० दृष्टी देखे परब्रह्म । श्रवणीं ऐके परब्रह्म ॥ १ ॥ रसना
सेवी ब्रह्मरस । सदा आनंद उल्हास ॥ २ ॥ गुरुकृपेचें हें वर्म । जग
देखे परब्रह्म ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं चराचर । अवघें ज्यासी परात्पर
॥ ४ ॥

३९९१ देवाचरणीं ठाव तैसा गुरूचरणीं भाव ॥ १ ॥ गुरू देव
दोन्ही समान । ऐसें वेदांचें वचन ॥ २ ॥ गुरु देवामाजी पाहीं ।
भिन्न भेद नाहीं नाहीं ॥ ३ ॥ देवा पुजितां गुरूसी आनंद । गुरूसी
पूजितां देवा परमानंद ॥ ४ ॥ दो नामाचेनि छंदें । एकाजनार्दनीं
परमानंद ॥ ५ ॥

३९९२ श्रीगुरूचें नाममात्र । तेंचि आमुचें वेदशास्त्र ॥ १ ॥
श्रीगुरुचें तीर्थमात्र । सकळ तीर्थां करी पवित्र ॥ २ ॥ श्रीगुरुचें
चरण रज । तेणें आमुचें जाहलें काज ॥ ३ ॥ श्रीगुरूची ध्यानमुद्रा ।

तेंचि आमुची योगनिद्रा ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं मन । श्रीगुरुचरणीं केलें लीन ॥ ५ ॥

३९९३ गुरु परमात्मा परेशु । ऐसा ज्याचा दृढ विश्वासु ॥ १ ॥ देव तयाचा अंकिला । स्वयें संचला त्याचे घरीं ॥ २ ॥ एकाजनार्दनीं गुरू देव । येथें नाहीं वा संशय ॥ ३ ॥

३९९४ गुरु माता गुरु पिता । गुरु आमुची कुळदेवता ॥ १ ॥ थोर पडतां सांकडें । गुरू रक्षी मागें पुढें ॥ २ ॥ काया वाचा आणि मन । गुरुचरणींच अर्पण ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । गुरु एक जनार्दन ॥ ४ ॥

३९९५ साधावया परमार्था । साह्य नव्हती माता पिता ॥ १ ॥ साह्य न होत व्याही जांवई । आपणा आपण साह्य पाही ॥ २ ॥ साह्य सद्गुरु समर्थ । तेंचि करिती स्वहित ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । नोहे एकपणावांचून ॥ ४ ॥

३९९६ श्रीगुरुपायीं ठेवीं तूं विश्वास । दासाचा तूं दास होय त्याच्या ॥ १ ॥ परब्रह्म राम वसिष्ठा शरण । कृष्णें संदीपन गुरु केला ॥ २ ॥ वाल्मिका उपदेशी नारद तो मुनी । वंद्य त्रिभुवनीं झाला वाल्हा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गुरु मज भेटला । मोकळा दाविला मार्ग तेणें ॥ ४ ॥

३९९७ धन्य गुरुकृपा जाहली । अहंता ममता दूर गेली ॥ १ ॥ घालूनि अंजन डोळां । दाविला स्वयंप्रकाश गोळा ॥ २ ॥ बोधीं बोधविलें मन । नाहीं संकल्पासी भिन्न ॥ ३ ॥ देह विदेह निरसलें । एकाजनार्दनीं धन्य केलें ॥ ४ ॥

३९९८ सद्गुरुसी शरण जाय । त्यासी ब्रह्मप्राप्ति होय ॥ १ ॥ न लगे आणिक उपाय । धरीं सद्गुरुचे पाय ॥ २ ॥ सद्गुरुचें चरण-तीर्थ । मस्तकीं वंदावें पवित्र ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सद्गुरु । हाचि भवसिंधूचा तारू ॥ ४ ॥

३९९९ ध्येय ध्याता ध्यान । अवघा माझा जनार्दन ॥ १ ॥ आसन शयनीं मुद्रा जाण । अवघा माझा जनार्दन ॥ २॥ जपतप यज्ञ यागपण । अवघा माझा जनार्दन ॥ ३ ॥ भुक्तिमुक्ति स्थावर जाण । अवघा माझा जनार्दन ॥ ४ ॥ एका एकीं वेगळा जाण । अवघा भरला जनार्दन ॥ ५ ॥

४००० वेद तो आम्हां जनार्दन । शास्त्र तें आम्हां जनार्दन । पुराण जनार्दन । सर्वभावें ॥ १ ॥ सुख जनार्दन दुःख जनार्दन । कर्म धर्म जनार्दन । सर्वभावें ॥ २ ॥ योग जनार्दन । याग जनार्दन । पाप आणि पुण्य । तेंही जनार्दन ॥ ३ ॥ यापरीं सर्वस्व अर्पी जनार्दन । एकाजनार्दन साधे भजन ॥ ४ ॥

४००१ पावलों प्रसाद । अवघा निरसला भेद ॥ १ ॥ द्वैताद्वैत दूर ठेलें । एकपणें एक देखिलें ॥ २ ॥ जन वन समान दोन्ही । जनार्दन एकपणीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं लडिवाळ । म्हणोनि करावा सांभाळ ॥ ४ ॥

४००२ माथां ठेवोनियां पाव । माझा देहाचि केला देव ॥ १ ॥ नवलाव पायाचा मी केला । माझा देहींचा देवपणा नेला ॥ २ ॥ पायीं पराक्रम पंचानन । पायीं निरसला देहाभिमान ॥ ३ ॥ पायीं देहासी पाहे ठावो । पायीं देहचि केला वावो ॥ ४ ॥ नवल हा पायाचा भावो । पायीं नुरेचि देही देवो ॥ ५ ॥ एकाजनार्दनाच्या पायीं । देह विदेह दोन्ही नाहीं ॥ ६ ॥

४००३ अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां । चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ॥ १ ॥ माय जगन्नाथ बाप जगन्नाथ । अनाथाचा नाथ जगार्दन ॥ २ ॥ एकाजनार्दनीं एकपणीं उभा । चैतन्याची शोभा शोभलीसे ॥ ३ ॥

४००४ नेणें मंत्र तंत्र बीजाचा पसारा । जनार्दन सोइरा घडला मज ॥ १ ॥ भक्ति ज्ञान विरक्ति नेणें पैं सर्वथा । मोह ममता चिंता

कांहीं नेणें ॥ २ ॥ योग याग कसवटी कांहीं नेणों आटी । सर्व देखों सृष्टीं जनार्दन ॥ ३ ॥ काया वाचा मन ठेविलें चरणीं । एका जनार्दनीं सर्वभावें ॥ ४ ॥

४००५ गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे ताहान भूक ॥ १ ॥ आसनीं शयनीं भोजनीं । गुरूतें न विसंबें ध्यानीं मनीं ॥ २ ॥ गुरुसेवेचि आवडी । सेवा करी चढोवढी ॥ ३ ॥ गुरुचरणांची गोडी । एकाजनार्दनीं पायीं दडी ॥ ४ ॥

४००६ पीक पिकलें प्रेमाचें । सांठविलें गगन टांचें ॥ १ ॥ भूमी शोधोनी पेरिजे बीज । सद्‌गुरुकृपें उगवलें सहज ॥ २ ॥ कामक्रोधाच्या उपटोनी पेंडीं । कल्पनेच्या काशा काढी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं निजभाव । विश्वभरित पिकला देव ॥ ४ ॥

४००७ गुरुमुखें घेतां तो निर्दोष । येऱ्हवीं आयास पडे कष्ट ॥ १ ॥ रामकृष्णहरि हा मंत्र सोपा । उच्चारितां खेपा खंडे कर्म ॥ २ ॥ तुटती भावना द्वैताची ते बुद्धी । निरसे उपाधी कामक्रोध ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सत्य सत्य साचा । रामनाम मंत्राचा जप करी ॥ ४ ॥

४००८ ऐसे जे घाले पूर्ण निमाले । ते नाहीं आले परतोनिया ॥ १ ॥ घडिनें घडी चढतसे गोडी । अखंड आवडी संतांपायीं ॥ २ ॥ सांडोनियां काम स्मरे रामनाम । अंतरीं तें प्रेम धरूनियां ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रंगले नामीं । तयां वंदूं आम्ही सर्वभावें ॥ ४ ॥

४००९ हरे भवभयव्यथा चिंतनें । दूर पळती नाना विघ्नें । कली कल्मष बंधनें । न बाधती चिंतनें ॥ १ ॥ करा करा म्हणोनि लाहो । चिंतनाचा निर्वाहो । काळाचा तो बिहो । दूर पळे चिंतनें ॥ २ ॥ हीच माझी विनवणी । चिंतन करा रात्रंदिनीं । शरण एकाजनार्दनीं । रामनाम चिंतावें ॥ ३ ॥

## श्रीनिवृत्तिमहाराज

### ( गुरूकृपेची स्थिति )

४०१० आदिनाथ उमा बीज प्रगटलें । मच्छिंद्रा लाधलें सहजस्थिती ॥ १ ॥ तेचि प्रेममुद्रा गोरक्षा दिधली । पूर्ण कृपा केली गयनिनाथा ॥ २ ॥ वैराग्यें तापला सप्रेमें निवाला । ठेवा जो लाधला शांतिसुख ॥ ३ ॥ निर्द्वंद्व निःसंग विचरतां मही । सुखानंद हृदयीं स्थिरावला ॥ ४ ॥ विरक्तिचें पात्र अन्वयाचें सुख । देऊनि सम्यक् अनन्यता ॥ ५ ॥ निवृत्ति गयनीं कृपा केली पूर्ण । कूळ हें पावन कृष्णनामें ॥ ६ ॥

४०११ आम्हा हेचि थोर सद्गुरुविचार । नलगे संप्रधार नानामतें ॥ १ ॥ नेघों तें काबाड न करूं विषय । ब्रह्मांड हें होय आत्माराम ॥ २ ॥ नेदूं यासी दुःख उन्मनीचें सुख । न करूं तो शोक आला गेला ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे आम्हा सद्गुरु उपदेशु । सर्वांभूतीं वासु हरी असे ॥ ४ ॥

४०१२ चराचरीं हरि गुरुमुखें खरा । माजि ब्रम्ह सैरा विचरों आम्हीं ॥ १ ॥ आम्हां ऐसें व्हावें तरीच हें भोगावें । निरंतर घ्यावें पोटाळूनीं ॥ २ ॥ नाहीं येथ काळ अवघें शून्यमय । निर्गुणीं सामाय तनु माझी ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे पर त्रिकुटीं गोल्हाट । त्यावरील नीट वाट माझी ॥ ४ ॥

४०१३ साकार निराकार हे ब्रम्हीचे विकार । तेथील अंकूर गुरुराज ॥ १ ॥ रज तम नाहीं सात्विकहीं डोहीं । परिपूर्ण देहीं आत्माराम ॥ २ ॥ सर्व घटवासि सर्वत्र निवासी । आपण समरसीं विबलासे ॥ ३ ॥ निवृत्तिची खुण गुरुकृपा उद्धार । सर्व हा निर्धार आत्माराम ॥ ४ ॥

४०१४ विस्तार हरीचा चराचर झालें । त्या माजी सानुलें गुरु दैवत ॥ १ ॥ गुरुविण व्यर्थ विज्ञान न संपडे । ज्ञान हेतुकडे हिंडणें

व्यर्थ ॥ २ ॥ गुरु परब्रम्ह गुरु माता पिता । गुरुनें समता दाखविली ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे गुरुबोध दिठीं । भक्ति नाम पेटी उघडिली ॥ ४ ॥

४०१५ आमुचा आचार आमुचा विचार । सर्व हरिहर एक पुरे ॥ १ ॥ धन्य माझा भाव सद्गुरु उपदेश । सर्व हृषीकेश दावियेला ॥ २ ॥ हरिवीण दुजें नेणें जो सहजें । तया गुरुराजें अर्पियेलें ॥ ३ ॥ हरि हेचि व्रत हरि हेचि कथा । हरिचिया पंथा मनोभाव ॥ ४ ॥ देहभाव हरी सर्वत्र स्वरूप । एका जन्में खेप हरिली माझी ॥ ५ ॥ निवृत्ति हा हरि प्रपंच बोहरी । आपुला शरीरीं हरी केला ॥ ६ ॥

४०१६ सर्वांघटीं वसे तो आत्मा प्रकाशे । प्रत्यक्ष आम्हां दिसे गुरुकृपा ॥ १ ॥ विरालें तें ध्येय ध्यान गेलें मनीं । मनाची उन्मनि एक झाली ॥ २ ॥ ठेला अहंभाव सर्व दिसे देव । निःसंदेह भव नाहीं आम्हां ॥ ३ ॥ निवृत्ति साधन गयनिप्रसाद । सर्व हा गोविंद सांगतुसे ॥ ४ ॥

४०१७ हरिविण न दिसे जनवन आम्हां । नित्य हे पौर्णिमा सोळा कळी ॥ १ ॥ चंद्रसूर्यरश्मी न देखो तारांगणें । अवघा हरी होणें हेंचि घेवों ॥ २ ॥ न देखों हे पृथ्वी आकाश पोकळी । भरलासे गोपाळीं दुमदुमीत ॥ ३ ॥ निवृत्ति निष्काम सर्व आत्माराम । गयनी हें धाम गुरुगम्य ॥ ४ ॥

४०१८ एक देव आहे हा भाव पैं सोपा । द्वैतरूपें बापा पडसी नरकीं ॥ १ ॥ द्वैत सांडी अद्वैत धरी । एक घरोघरीं हरी नांदे ॥ २ ॥ सबाह्य कोंदलें परिपूर्ण विश्वीं । तोचि अर्जुनासि दृष्ट जाला ॥ ३ ॥ गयनिप्रसादें निवृति बोधु । अवघाचि गोविंदु अवघा रुपीं ॥ ४ ॥

४०१९ आम्हीं चकोर हरी चंद्रमा । आम्ही कळा तो पुर्णिमा

॥ १ ॥ कैसा बाहिजु भीतरीं हरी । बिंबें बिंबला एकसुत्रीं ॥ २ ॥ आम्ही देही तो आत्मा । आम्ही विदेही तो परमात्मा ॥ ३ ॥ ऐक्यपणें सकळ वसे । द्वैत बुद्धि कांहीं न दिसे ॥ ४ ॥ निवृत्ति चातक इच्छिताहे । हरिलागीं वर्ते पाहें ॥ ५ ॥

४०२० हरी हेचि खूण सांगितली आम्हां । जनवनसमा वर्ता तुम्ही ॥ १ ॥ ॐकार मूर्धनीं करावा कीर्तनीं । नित्य ब्रम्हार्पणीं भजन भावें ॥ २ ॥ नित्यकाळ कथा हरि विचरो सार । जन वन घर आम्हां असे ॥ ३ ॥ निवृत्ति म्हणे मी गुरुचा अंकीत । वाचे उच्चारीत हरी हरी ॥ ४ ॥

४०२१ भांडवल हरि पैल द्वीपांतरीं । हरिरूप चारी दिशा पूर्ण ॥ १ ॥ न दिसे तें भान दृश्य द्रष्टा हरी । सर्व घरोघरीं आत्माराम ॥ २ ॥ ज्ञानेसी विज्ञान गेलें अनाठाया । हरीरूप छाया आम्हावरी ॥ ३ ॥ निवृत्ति दिधला नामें रूपें दिसे । सर्व हरी असे तेजोमय ॥ ४ ॥

४०२२ विवेक वैराग्य उन्मनी विनट । हरिनामें वाट सांपडली ॥ १ ॥ हरिनाम भला हरिकृष्ण भला । दीन उगवला ब्रह्मरूपें ॥ २ ॥ हरी हरी सार वाचेसि उच्चार । सर्व हा श्रीधर पुरे आम्हां ॥ ३ ॥ निवृत्ति निर्माण एक नाम हरी । प्रपंच बोहरी कोटी राशी ॥ ४ ॥

४०२३ निगम नियम सर्व सर्वोत्तम । दिननिशीं राम सेवितुसे ॥ १ ॥ आम्हां गोड हरी आम्हां चाड हरी । हरी तो संहारीं आम्हांमाजी ॥ २ ॥ नेघों हरिवीण दुजें तें पैं भिन्न । सांगितली खूण गुरुराजें ॥ ३ ॥ निवृत्ति गयनी प्रसाद उन्मनीं । निरंतर ध्यानीं रामनाम ॥ ४ ॥

४०२४ हरि आत्मा होय परात्पर आलें । नाम हें क्षरलें वेदमतें ॥ १ ॥ वेदांत सिद्धांत नाहीं अनु हेत । सर्वभूतीं हित हरी

आहे ॥ २ ॥ हरिवीण न दिसे गुरु सांगतसे । हरि हा प्रकाशे सर्वरूपीं ॥ ३ ॥ निवृत्ति कोंदलें सद्‌गुरूने दिधलें । हरिधन भलें आम्हांमाजी ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

### ( सद्‌गुरुकृपेची प्रतीति )

४०२५ अनुभव खुण मी बोलें साजणी । निरंजनीं अंजन लेईलें अंजनीं ॥ १ ॥ गुरुमुखें साधन जालें पैं निवृत्ति । तत्वसार आपणचि जाला निवृत्ति ॥ २ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठल कृपा चित्तीं । पुंडलिका साधिलें प्रेम तत्वार्थी ॥ ३ ॥

४०२६ पदोपदिं निजपदा गेलें वो । कर्म संचित सकर्म जाले वो ॥ १ ॥ तेथें आपुलें नाठवे कांहीं वो । आप आपणा न पडे ठाई वो ॥ २ ॥ श्रीगुरुप्रसादं ज्ञान बोधु झाला वो । नव्हे ते ठाऊकें पडिलें माय वो ॥ ३ ॥

४०२७ इवलेंसें रोप लावियेलें द्वारीं । त्याचा वेलु गेला गगनावरी ॥ १ ॥ मोगरा फुलला मोगरा फुलला । फुलें वेचितांति भारू कळियासी आला ॥ २ ॥ मनाचिये गुंफीं गुंफियेला शेला । बापरखुमादेविवरू विठ्ठलीं अर्पिला ॥ ३ ॥

४०२८ मी माझें अद्वैत द्वैत होऊनि ठेलें । सद्‌गुरु एका बोलें ठेविलें ठायीं ॥ १ ॥ द्वैत गिळीं अद्वैत मेळीं । चित्ताची काजळी तोडी वेगीं ॥ २ ॥ ज्ञानदेव म्हणे निवृत्ति उदार । दीपीं दीप स्थिर केला सोयी ॥ ३ ॥

४०२९ अनंत अनंतापरी देखतां तो अंतरीं । हृदयाभितरी मज निववितो माये ॥ १ ॥ चाळवी चक्रचाळ अलगट गोपाळ । यानें केला सुकाळ सहज सुखाचा वो मायें ॥ २ ॥ सांगवी तें सांगणी उमगूनि चक्रपाणी । त्या निर्गुणाचे रहणी मी रिघालें वो माये ॥ ३ ॥

भ्रांतिभूली फेडूनिया निवृत्ति। रखुमादेविवरू विठ्ठलीं गती झाली वो माय ॥ ४ ॥

४०३० देखिले तुमचे चरण निवांत राहिलें मन। कासया त्यजीन प्राण आपुला गे माये ॥ १ ॥ असेन धणीवरी आपुले माहेरीं। मग तो श्रीहरि गीतीं गाईन गे माये ॥ २ ॥ सकळही गोत माझें पंढरीसी जाण। बापरखुमादेविवरा विठ्ठलाची आण ॥ ३ ॥

४०३१ तृप्ति भुकेली काय करूं माये। जीवनीं जीवन कैसें तान्हे-जत आहे ॥ १॥ मन धालें परि न धाये। पुढत पुढती राजा विठ्ठलुचि पाहे ॥ २ ॥ निरंजनीं अंजन लेइजत आहे। आपुलें निधान कैसें आपणाचि पाहे ॥ ३ ॥ निवृत्ति गार्हस्थ्य मांडलें आहे। निष्काम आपत्य प्रसवत जाय ॥ ४ ॥ त्रिभुवनीं आनंदु न माये गे माये। आपेआपु परमानंदु वोसंडतु आहे ॥ ५ ॥ बापरखुमादेविवरु विठ्ठलुगे माये। देहभाव सांडूनि भोगिजत आहे ॥ ६ ॥

४०३२ सांवळा सकुमार लावण्य त्रिभुवनीं। अवचिता आंगणीं देखिला रया ॥ १ ॥ आळवितां नयेचि सचेतनीं अचेत। भावेंचि तृप्त माझा हरी ॥ २॥ अज्ञानी न दिसे ज्ञानी येऊनी उभा। विज्ञानेंसी शोभा दावी रया ॥ ३ ॥ ज्ञानदेवा सार सांवळिये मूर्ति। निवृत्तीनें गुंति उगविली ॥ ४ ॥

४०३३ श्रीगुरुसारिखा असतां पाठिराखा। इतरांचा लेखा कोण करी ॥ १ ॥ राजयाची कांता काय भीक मागे। मनाचिया जोगे सिद्धि पावे॥ २ ॥ कल्पतरू तळवटीं जो कोणी बैसला। काय वाणी त्याला सांगिजोजी ॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे तरलों तरलों। आतां उद्धरलों गुरुकृपे ॥ ४ ॥

४०३४ आमित्य भुवनीं भरलें शेखीं जें उरलें। तें रूप आपुलें मज दावियेलें वो माय ॥ १ ॥ आतां मी नये आपुलिया आस। सायास तुटले भ्रांतीचे वो माय ॥ २ ॥ मंजुळ मंजुळ वायो गती

झळकती । तापत्रयें निवृत्ति निर्वाळिलें वो माय ॥ ३ ॥ वेडावलें एकाएकीं निजधामरूपीं । रखुमादेविवरु दीपीं दिव्य तेज़ वो माय ॥ ४ ॥

३०३५ मायाविवर्जित जालें वो । माझें गोत तें पंढरिये राहिलें वो ॥ १ ॥ पतिव्रता मी परद्वारिणी । परपुरुषेंसी व्याभिचारिणी ॥ २ ॥ साचारीं चौदा जाली वो । सखीं अठरा घोकुनी राहिलें वो ॥ ३ ॥ निवृत्ति प्रसादें मी गोवळी वो । माझा भावो तो विठ्ठलु न्याहाळी वो ॥ ४ ॥

४०३६ मजमाजी पाहतां मीपण हारपलें । ठकलेंचि ठेलें सये मन माझें ॥ १ ॥ आंत विठ्ठलु बाहेर विठ्ठलु । मीचि विठ्ठलु मज भासतसे ॥ २ ॥ मीपण माझें नुरेचि कांहीं दुजें । ऐसें नाहीं केलें निवृत्तिराजें म्हणे ज्ञानदेवो ॥ ३ ॥

४०३७ चातकाची तृषा मेघें पुरविली । ब्रम्हस्तनीं पान्हाईली बाईये वो ॥ १ निवृत्तिप्रसाद माझ्या मुखीं सूदला । प्रेमरसें धारा फुटल्या दोहीं पक्षीं ॥ २ ॥ बाप श्रीगुरु तेणे मज अफाविलें । अवघें ब्रम्ह दाविलें ज्ञानदेवा ॥ ३ ॥

४०३८ देहधर्मी काज गुरुराज चित्तीं । तरीच या संपत्ती फळद होती ॥ १ ॥ तैसें तुझें ध्यान करितां उद्भट । सांपडली वाट वैकुंठींची ॥ २ ॥ ज्ञेय ज्ञाता ज्ञान ध्येय ध्याता हरी । समरसें श्रीहरी तत्व जालें ॥ ३ ॥ पृथ्वी आप तेज गगनाकृति वायो । फिटला संदेहो ये जन्मींचा ॥ ४ ॥ उपदेश द्रष्टा जरि असे श्रेष्ठ । तरीच भाग्य विनट विष्णुरूपीं ॥ ५ ॥ ज्ञानदेवीं सिद्धी साउली श्रीहरी । गुरुकृपा करीं कुरवाळिलें ॥ ६ ॥

४०३९ अनुपम्य तेजें धवळलें ब्रम्हांड । विश्वरूपीं अखंड तदाकार ॥ १ ॥ रसीं रस मुरे प्रेमाचें स्फुंदन । एकरूपीं घन हरी माझा ॥ २ ॥ नाद आणि ज्योति परिपूर्ण आम्हां । परेसि माहात्मा उजे-

डला ॥ ३ ॥ झाला अरुणोदयो उजळलें सूर्यतेज । त्याह्नि सतेज तेज आलें ॥ ४ ॥ हारपल्या रश्मी देहभाव हरी । ऋद्धि सिद्धि कामारी जाल्या कैश्या ॥ ५ ॥ निवृत्ति उपदेश ज्ञानिया लाधला । तत्वीं तत्व बोधला ज्ञानदेव ॥ ६ ॥

४०४० आधींच तूं ज्ञान वरी झालें उन्मन । हरी हें जीवन हृदयीं आलें ॥ १ ॥ स्थिरावलें ध्यान ज्ञानाचिये वृत्ति । विज्ञानसंपत्ति साधलिया ॥ २ ॥ अंधकारपट नासला समतेज । रामरूपीं पैज दीपज्ञान ॥ ३ ॥ संत शांत शांति उलथीचा ठसा । कृष्णरूपीं दिशा तेजो तेज ॥ ४ ॥ अलक्ष लक्षिते अगोचर पर । तेथेंही गव्हर संचलें असे ॥ ५ ॥ ज्ञानदेव सुखी जालीसे विश्रांति । परमानंद चित्तीं निरंतर ॥ ६ ॥

४०४१ ऐके तूं ज्ञान सुख विश्रांति रूपा । हरिरूप दीपा पाहे ऐसा ॥ १ ॥ चित्तवृत्तीचिया आदिमध्य अंतीं । रूपीं रूप आनंदी समरसें ॥ २ ॥ निवृत्ति सांगे ज्ञाना योगाची धारणा । जीवशीव करणा चक्षु दृढ करी ॥ ३ ॥

४०४२ साध्यसाधनकाज निवृत्तिचें गुज । केशव सहज सर्वभूतीं ॥ १ ॥ रामकृष्ण मंत्र प्रोक्षियेलीं गात्रें । हरिरूप सर्वत्र क्षर दिसे ॥ २ ॥ गुरुगम्य चित्त झालें माझें हित । दिननिशीं प्राप्त हरि आम्हा ॥ ३ ॥ पूर्णिमा प्रकाश चंद्र निराभास । हरी हा दिवस उगवला ॥ ४ ॥ चकोरें सेवीति आळाउळें पाहाती । घटघटा घेती अमृत-पान ॥ ५ ॥ ऐसें हें पठण ज्ञानदेवा जालें । निवृत्तिनें केलें आपणा ऐसें ॥ ६ ॥

४०४३ आकारीं नाहीं तें निराकारीं पाहीं । निराकारी राही शून्याशून्य ॥ १ ॥ जेथें शून्यचि मावळलें तेथें काय उरलें । हेंचि सांगें एकें बोलें मजपासी ॥ २ ॥ शून्य कासया पासाव जालें शून्य तें कवणें केलें । हें सांगिजोजी एक्या बोलें गुरुराया ॥ ३ ॥

आपण शून्याकार कीं आपण निराकार । आकार निराकार मूर्तिमंत दाऊ ॥ ४ ॥ आकार निराकार ये दोन्ही नाहीं । तेंचि तूं पाहीं आपणापें ॥ ५ ॥ जेथें अनुभवचि नाहीं तेंचि तूं पाहीं । स्वानुभवीं राहीं तुझा तूंचि ॥ ६ ॥ जेथें चंद्र सूर्य एक होती तेथें कैंचि दिनराती । ऐसें जे जाणती ते योगेश्वर ॥ ७ ॥ कर्माकर्म पारुषले देवधर्म लोपले । गुरुशिष्य निमाले जाले क्षीरसिंधू ॥ ८ ॥ तेथें गोडीविण चाखणे जिव्हेविण बोलणें । नेत्रेंविण पाहणें तेंचि ब्रह्म ॥ ९ ॥ हातीं घेऊनियां दिवटी लागिजे अंधारापाठी । अंधार न देखे दृष्टी उजियेडु तो ॥ १० ॥ बापरखुमादेविवरू विठ्ठलु देखणा । दृश्यद्रष्टपणा माल्हावले ॥ ११ ॥

( सद्गुरुपर )

४०४४ ब्रह्म जयाचिये बोधेंचि पावत । ते जगीं शाश्वत गुरुमूर्ति ॥ १ ॥ शब्दज्ञानें जया गुरु उपदेशिती । नाहीं त्यासी मुक्ति कदा काळीं ॥ २ ॥ संसारीं तरोनि शिष्यासी तारिती । तेचि मानिजेति गुरु एक ॥ ३ ॥ कामक्रोध लोभ जे का न शिवती । तेचि ओळखि सद्गुरु जाण ॥ ४ ॥ ज्याशी नाहीं भेद ब्रह्मीं एकाकार । म्हणे ज्ञानेश्वर तोचि गुरु ॥ ५ ॥

४०४५ सद्गुरुवांचुनीं संसारीं तारक । नसेचि निश्चंक आन कोणी ॥ १ ॥ इंद्र चंद्र देव ब्रह्मादि करूनि । संशयाची श्रेणी छेदिती ना ॥ २ ॥ उघडें परब्रह्म सद्गुरुची मूर्ती । पुरविती आर्ती शिष्याचिया ॥ ३ ॥ वंचना करिती जन दुष्ट नष्ट । मुख्य श्रेष्ठ श्रेष्ठ वंदिताती ॥ ४ ॥ ज्ञानदेव म्हणे गुरुचा मी दास । नेणे साधनास आन कांहीं ॥ ५ ॥

४०४६ सद्गुरुसारिखा सोयरा सज्जन । दाविलें निधान वैकुंठींचें ॥ १ ॥ सद्गुरु माझा जिवींचा जिवलग । फेडियला पांग प्रपंचाचा ॥ २ ॥ सद्गुरु ह्या अनाथ माउली । कृपेचि साउली केली मज

॥ ३ ॥ ज्ञानदेव म्हणे अवचित घडलें । निवृत्तीनें दिधलें निजबीज ॥ ४ ॥

४०४७ गुरु हा संतकुळीचा राजा । गुरु हा प्राणविसांवा माझा । गुरूविण देव दुजा । नाहीं नाहीं त्रिलोकीं ॥ १ ॥ गुरु हा सुखाचा सागरू । गुरु हा प्रेमाचा आगरू । गुरु हा धैर्याचा डोंगरु । कदाकाळीं डळमळीना ॥ २ ॥ गुरु वैराग्याचें मूळ । गुरु हा परब्रह्म केवळ । गरु सोडवी तात्काळ । गांठ लिंगदेहाची ॥ ३ ॥ गुरु हा साधकांसी साह्य । गुरु हा भक्तांलागीं माय । गुरु हा कामधेनु गाय । भक्तांघरीं दुभतसे ॥ ४ ॥ गुरु घाली ज्ञानांजन । गुरु दाखवी निज धन । गुरु सौभाग्य देऊन । साधुबोध नांदवी ॥ ५ ॥ गुरु भक्तिचें मंडण । गुरु दोषांचें दंडण । गुरु पापाचें खंडण । नानापरी वारितसे ॥ ६ ॥ काया काशी गुरु उपदेशी । तारक मंत्र दिला आम्हांसी । बापरखुमादेवीवरासी । ध्यान मानसीं लागलें ॥ ७ ॥

४०४८ नित्य धर्म नाम पाठ । तेंचि वैकुंठाची वाट । गुरु भजनीं जो विनट । तोचि हरिभक्त जाणावा ॥ १ ॥ धन्य धन्य त्याचा वंश । धन्य तो आला जन्मास । तया जवळी हृषीकेश । सर्व काळ नांदतु असे ॥ २ ॥ रामकृष्ण स्मरण जप । तेंची तयाचें अमूप तप । तो वास करील कोटी कल्प । वैकुंठ पीठ नगरीशीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं जप केला । हरि समाधीसी साधिला । हरिमंत्रें प्रोक्षिला । सर्व संसार निर्धारें ॥ ४ ॥

---

# संतश्रेष्ठांचें स्तवन

## ( १ ) श्रीज्ञानेश्वरादिकांचें स्तवन

### श्रीतुकाराममहाराज

४०४९ बोलिलों लेकुरें । वेडीं वांकुडीं उत्तरें ॥ १ ॥ करा क्षमा अपराध । महाराज तुम्ही सिद्ध ॥ २ ॥ नाहीं विचारिला । अधिकार

म्यां आपुला ॥३॥ तुका म्हणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥४॥

४०५० ज्ञानियांचा राजा गुरु महाराज । म्हणती ज्ञानदेव तुम्हां ऐसें ॥ १ ॥ मज पामरासी काय थोरपण । पायींची वहाण पायीं बरी ॥ २ ॥ ब्रह्मादिक जेथं तुम्हां वोळगणे । इतर तुळणें काय पुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे नेणें युक्तीची ते बोली । म्हणोनी ठेविली पायीं डोई ॥ ४ ॥

४०५१ जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । अंगीं ऐसें बळ रेडा बोले ॥ १ ॥ करील तें काय नव्हे महाराज । परि पाहे बीज शुद्ध अंगीं ॥ २ ॥ जयानें घातली मुक्तीची गवादी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ ३ ॥ तुका म्हणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधान चित्ताचिया ॥ ४ ॥

४०५२ ज्ञानराज माझी योग्यांची माऊली । जेणें निगमावली प्रगट केली ॥ १ ॥ गीता अलंकार नाम ज्ञानेश्वरी । ब्रम्हानंद लहरी हेलावली ॥ २ ॥ छपन्न भाषेचा केलासे गौरव । भवार्णवीं नांव तरावया ॥ ३ ॥ श्रवणाच्या मिसें बैसावें येवोनी । साम्राज्यभुवनीं सुखें नांदा ॥ ४ ॥ आध्यात्मविद्येचें दाखविलें रूप । उजळीला दीप चैतन्याचा ॥ ५ ॥ तुका म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ॥ ६ ॥

४०५३ संतकृपा झाली । इमारत फळा आली ॥ १ ॥ ज्ञानदेवें रचिला पाया । उभारिलें देवालया ॥ २ ॥ नामा तयाचा किंकर । तेणें केला हा विस्तार ॥ ३ ॥ जनार्दन एकनाथ । खांब दिला भागवत ॥ ४ ॥ तुका झालासे कळस । भजन करा सावकाश ॥ ५ ॥

४०५४ चला आळंदिला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ॥ १ ॥ होतिल संतांचिया भेटी । सांगों सुखाचिया गोष्टी ॥ २ ॥ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं म्हणतां चुकती फेर ॥ ३ ॥ जन्म नाहींरे आणीक । तुका म्हणे माझी भाक ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

४०५५ बोलविला बोले वेद । म्हैसा सुबुद्ध स्वरान्वयें ॥ १ ॥ काय एक न करा देवा । भिंती चालवा निचेष्टिता ॥ २ ॥ शिष्यालागीं देता बोध । नलगे पलार्ध निमिष्यहि ॥ ३ ॥ निळा म्हणे ज्ञानेश्वरा । मजहि अंगिकारा रंका दीना ॥ ४ ॥

४०५६ उभारिला ध्वज तिहीं लोकांवरी । ऐशी चराचरीं कीर्ति ज्यांची ॥ १ ॥ ते हे निवृत्तिनाथ ज्ञानेश्वर सोपान । मुक्ताबाई ज्ञान दीतीकळा ॥ २ ॥ धरूनि सगुणरूपें केली क्रीडा । बोलविला रेडा निगम वाचे ॥ ३ ॥ बैसूनियां वरी चालविली भिंती । चांगदेवाप्रती दिली भेटी ॥ ४ ॥ मग वास केला अळंकापुरासी । पिंपळ द्वारासी कनकाचा ॥ ५ ॥ निळा म्हणे ज्यांच्या नामें करितां घोष । नातळती दोष कळिकाळाचे ॥ ६ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४०५७ तिन्ही देव जैसे परब्रह्मीचे ठसे । जगीं सूर्य जैसे प्रकाशले ॥ १ ॥ धन्य तो निवृत्ति धन्य तो सोपान । धन्य तो निधान ज्ञानदेव ॥ २ ॥ उपजतांचि ज्ञानी हें वर्म जाणोनि । आले लोटांगणीं चांगदेव ॥ ३ ॥ प्रत्यक्ष पैठणीं भटीं केला वाद । बोलविला वेद म्हैशीपुत्रा ॥ ४ ॥ सोहंसुकृताच्या सोडोनियां गांठी । केलीसे मराठी गीतादेवी ॥ ५ ॥ नामा म्हणे सर्व सुकृत लाहिजे । एक वेळां जाइजे अळंकावती ॥ ६ ॥

४०५८ नाथा नको रे अंतरूं । तुझ्या कांसेचें वांसरूं ॥ १ ॥ कळा दुभती तूं गाय । तुझा वियोग असह्य ॥ २ ॥ देह भोगितां प्राक्तन । मना ठेवीं तवाधीन ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं ही समाधी । जडो मनोवृत्ति अवधी ॥ ४ ॥ नामा भेटे ज्ञानदेवा । जना प्रसाद मिळावा ॥ ५ ॥

## श्रीजनाबाई

४०५९ भाव अक्षराची गांठी । ब्रह्मज्ञानाने गोमटी ॥ १ ॥ ते हे

माय ज्ञानेश्वरी । संतजनां माहेश्वरी ॥ २ ॥ ज्ञानेश्वर मंगल मुनी । सेवा करी दासी जनी ॥ ३ ॥

४०६० गीतेवरी आन टीका । त्यांनी वाढियेली लोकां ॥ १ ॥ रत्नताटामाजी । त्यानें वोगरिलें कांजी ॥ २ ॥ या ज्ञानेशावांचोनी । म्हणे नामयाची जनी ॥ ३ ॥

४०६१ विवेक सागर । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥ मरोनियां जावें । बा माझ्याच्या पोटा यावें ॥ २ ॥ ऐसें करी गा माझ्या भावा । सखया माझ्या ज्ञानदेवा ॥ ३ ॥ जाई वोवाळुनीं । जन्मो-जन्मीं दासी जनी ॥ ४ ॥

४०६२ मायेह्लानि माय मानी । करी जीवाची ओंवाळणी ॥ १ ॥ परलोकींचें तारूं । म्हणे माझा ज्ञानेश्वरू ॥ २ ॥ वित्त गोत चित्त पाहे । सत्य वंदी गुरुचे पाय ॥ ३ ॥ पतिव्रते जैसा पती । जनी म्हणे सांगों किती ॥ ४ ॥

४०६३ सदाशिवाचा अवतार । स्वामी निवृत्ति दातार ॥ १ ॥ महाविष्णुचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ २ ॥ ब्रह्मा सोपान तो झाला । भक्तां आनंद वर्षला ॥ ३ ॥ आदिशक्ति मुक्ताबाई । दासी जनी लागे पायीं ॥ ४ ॥

४०६४ सोपानाची ऐशी मूर्ति । विश्वकर्ता ब्रह्म ह्मणती ॥ १ ॥ ऐसें बोले पुराणांत । सृष्टी कर्ता जो भगवंत ॥ २ ॥ जनी म्हणे हा सोपान । ब्रह्मा अवतरला पूर्ण ॥ ३ ॥

४०६५ नामयाचा गुरु । तो हा सोपान सद्गुरु ॥ १ ॥ कऱ्हेवरीं करूनी वस्ती । ब्रह्मपुरी तिशीं म्हणती ॥ २ ॥ माझ्या जीवींच्या जीवना । हृदयीं राहें तूं सोपाना ॥ ३ ॥ चित्त उद्धव ज्याची सत्ता । जनी म्हणे माझ्या ताता ॥ ४ ॥

४०६६ शालिवाहन शके अक्राशें नव्वद । निवृत्ति आनंद प्रग-टले ॥ १ ॥ ब्याण्णवाच्या सालीं ज्ञानेश्वर प्रगटले । सोपान देखिले

शाण्णवांत ॥ २ ॥ नव्याण्णवाव्या सालीं मुक्ताई देखिली । जनी म्हणे केली मात त्यांनीं ॥ ३ ॥

४०६७ अळंकापुरवासिनी समिप इंद्रायणी। पूर्वेसी वाहिनी प्रवाह तेथें ॥ १ ॥ ज्ञानाबाई आई आर्त तुझे पायीं । धांवोनियां येई दुडदुडां ॥ २ ॥ बहु कासाविस होतो माझा जीव। कनवाळयाची कींव येऊं द्यावी ॥ ३ ॥. नामयाची जनी म्हणावी आपुली। पायीं सांभाळिली मायबापें ॥ ४ ॥

४०६८ अहो सखिये साजणी । ज्ञानाबाई हो हरणी ॥ १ ॥ मज पाडसाची माय । भक्तिवत्साची ते गाय ॥ २ ॥ कां गा उशीर लाविला । तुजविण शिण झाला ॥ ३ ॥ अहो बैसलें दळणीं । धांव घाली म्हणे जनी ॥ ४ ॥

४०६९ संत राउळा चालिले । ज्ञानेश्वर तंव बोले ॥ १ ॥ केव्हढें नवल सांगावें । दासी जनीचें पद घ्यावें ॥ २ ॥ पाय जोडुनी विटेवरी । करीं हात उभा हरी ॥ ३ ॥ रूप सांवळें सुंदर । कानीं कुंडल मनोहर ॥ ४ ॥ सोनसळा वैजयंती । पुढें गोपाळ नाचती ॥ ५ ॥ गरूडपारीं सन्मुख उभा । जनी म्हणे धन्य शोभा ॥ ६ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४०७० विश्रांतीचें स्थान संतांचें माहेर । तें या भुमीवर अलंकापुर ॥ १ ॥ तये स्थळीं माझा जीवाचा वो ठेवा । नमीन ज्ञानदेवा जाऊनियां ॥ २ ॥ सिद्धेश्वरस्थान दरुशनें मुक्ती । ब्रह्मज्ञान प्राप्ती वटेश्वर ॥ ३ ॥ चौऱ्यांयशी सिद्धांचा सिद्ध भेटी मेळा । प्रत्यक्ष स्थापिला कल्पवृक्ष ॥ ४ ॥ तयासी नित्यतां घडतां प्रदक्षणा । नाहीं पार पुण्या वास स्वर्गीं ॥ ५ ॥ अमृतमय वाहे पुढें इंद्रायणी । भागीरथी आदिकरूनि तीर्थराज ॥६॥ ऐशीया स्थळीं समाधी ज्ञानदेव । एकाजनार्दनीं ठाव अलंकापुर ॥ ७ ॥

४०७१ नमो ज्ञानराजा नमो ज्ञानराजा। निवृत्ती सहजा गुरुवर्या ॥ १ ॥ नमो सोपानदेवा मुक्ताई परेशा। ठाव त्या सर्वेशा कन्हातटीं ॥ २ ॥ समाधी वैभव पाहतां नयनीं। चुकतसे आयणी जन्मव्याधी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं म्हणावा आपुला। अंकित अंकिला दास तुमचा ॥ ४ ॥

४०७२ ज्ञानदेव ज्ञानदेव वदतां वाचें। नाहीं कळीकाळाचें भेव जीवां ॥ १ ॥ जातां अलंकापुर गांवीं। मोक्ष मुक्ति दावी वाट त्यासी ॥ २ ॥ ब्रह्मज्ञान जोडोनि हात। म्हणे मी तुमचा अंकीत॥ ३ ॥ वाचे वदतां इंद्रायणी। यमं वंदितो चरणीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं भावें। ज्ञानदेवा आठवावें ॥ ५ ॥

४०७३ मोक्ष मुक्ति रिद्धी सिद्धी। पाहतां समाधी ज्ञानदेवा ॥ १॥ ऐसा लाभ सांगे देव। ऐके नामदेव आवडी ॥ २ ॥ दरूशनें नासे व्याधी पीडा। ऐसा संवगडा ज्ञानदेव ॥ ३ ॥ एकाजनार्दन मापारी। नाचतसे अलंकापुरी ॥ ४ ॥

४०७४ कृपाळू उदार माझा ज्ञानेश्वर। तया नमस्कार वारंवार ॥ १ ॥ न पाहे यातिकुळाचा विचार। भक्त करुणाकर ज्ञानाबाई ॥ २ ॥ भलतिये भावें शरण जातां भेटी। पाडितसे तुटी जन्मव्याधी ॥ ३ ॥ ज्ञानाबाई माझी अनाथाची माय। एकाजनार्दनीं पाय वंदितसे ॥ ४ ॥

४०७५ धन्य जाहलों आतां। अवघी चिंता वारली॥ १ ॥ आजी देखिलीं पाउलें। सुख जाहलें समाधान ॥ २ ॥ निवारला भाग शीण। पाहतां चरण गोमटे ॥ ३ ॥ भय निवारली खंती। दृष्टी मूर्ति पाहतां ॥ ४ ॥ समाधी सोहळा देखिला। एकाजनार्दन सुखावला ॥ ५ ॥

४०७६ कैवल्याचा पुतळा। प्रगटला भूतळा। चैतन्याचा जिव्हाळा। ज्ञानोबा माझा ॥ १ ॥ साधकांचा मायबाप। दरूशनें हरे ताप। सर्वां-

भूतीं सुखरूप । ज्ञानोबा माझा ॥ २ ॥ ज्ञानियांचा शिरोमणी । वंद्य जो कां पूज्यस्थानीं । सकळांसी शिरोमणी । ज्ञानोबा माझा ॥ ३ ॥ चालविली जड भिंती । हरली चांगयाची भ्रांती । मोक्ष मार्गीचा सांगाती । ज्ञानोबा माझा ॥ ४ ॥ वेद रेड्या बोलविला । गर्व द्विजांचा हरविला । शांतिबिंब प्रगटला । ज्ञानोबा माझा ॥ ५ ॥ उजाळिली दीपिका । गीतेवरी केली टीका । विठोबाचा प्राणसखा । ज्ञानोबा माझा ॥ ६ ॥ गुरुसेवलागीं जाण । शरण एकाजनार्दन । चैतन्याचें जीवन । ज्ञानोबा माझा ॥ ७ ॥

४०७७ ज्ञानदेव चतुराक्षरी जप हा करी तूं सर्वज्ञा । ज्ञानाज्ञान विरहित ब्रह्मप्राप्तीची संज्ञा । ज्ञाता ज्ञेय निजांग होय ऐसी प्रतिज्ञा । ज्ञानाग्नीनें पापें जळती ही ज्याची आज्ञा ॥ १ ॥ ज्ञानदेव ज्ञानदेव म्हणतां ज्ञानदेव देतो । वासुदेव होतो अखंड वदनीं वदे तो ॥ ध्रु० ॥ नररूपें विष्णु अवतरला हा भगवान । नदी नद वापी कूप पाहतां उदक नव्हे भिन्न । नवल हेंचि पशु म्हैसा करितो वेदाध्ययन । नमन करुनी सद्भावें जपतां होय विज्ञान ॥ २ ॥ देवाधीश देव भक्ताप्रति वर दे । देतां वर ब्रह्मांडीं ब्रह्म आनंद कोंदे । देशिकराज दयानिधि अलंकापुरीं जो नांदे । देशभाषा ज्ञानदेवी गीतार्थ वदे ॥ ३ ॥ वक्ता श्रोता श्रवणें पठणें पावती समभाव । वर्णूं जातां अघटित माहिमा होतो जीव शिव । वंदुनी अनन्य एकाजनार्दनीं धरी दृढभाव । वर्षती निर्जर ज्ञानदेव नामें पुष्पांचा वर्षाव ॥ ४ ॥

४०७८ ॐ नमो ज्ञानेश्वरा । करूणाकरा दयाळा ॥ १ ॥ तुमचा अनुग्रह लाधलों । पावन झालों चराचरीं ॥ २ ॥ मी कळा कुसरी कांहींच नेणें । बोलतों वचनें भाविका ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं तुमचा दास । त्याची आस पुरवावी ॥ ४ ॥

४०७९ सर्व सुखाची लहरी । ज्ञानाबाई अलंकापुरीं ॥ १ ॥ शिव-पीठ हें जुनाट । ज्ञानाबाई तेथें मुगुट ॥ २ ॥ वेदशास्त्र देती ग्वाही ।

म्हणती ज्ञानाबाई आई ॥ ३ ॥ ज्ञानाबाइचे चरणीं । शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

४०८० माझी एकावी विनंती । ज्ञानदेवा श्रेष्ठ मूर्ती ॥ १ ॥ तुम्हीं वैसोनि अंतरीं । मज जागवा निर्धारीं ॥ २ ॥ तुम्हीं सत्ताधारी । प्रपंच करावा बोहरी ॥ ३ ॥ श्रेष्ठा ज्ञानदेवा । एकाजनार्दनीं आठवा ॥ ४ ॥

४०८१ अहो दयाळे ज्ञानाबाई । आर्त माझें तुझ्या पायीं ॥ १ ॥ इंद्रायणीचे तटीं । ज्ञानाबाई वो गोमटी ॥ २ ॥ सकळ मेळा हो सिद्धांचा । ज्ञानाबाई अनुग्रहाचा ॥ ३ ॥ पूर्वपश्चिम देवस्थान । मध्यें ज्ञानाबाई आपण ॥ ४ ॥ ऐशी ज्ञानाबाई ध्याऊं । एकाजनार्दनीं शरण जाऊं ॥ ५ ॥

४०८२ श्रीज्ञानदेवें येऊनी स्वप्नांत । सांगितली मात मजलागीं ॥ १ ॥ दिव्य तेजःपुंज मदनाचा पुतळा । परब्रह्म केवळ बोलतसे ॥ २ ॥ आजानवृक्षाची मुळी कंठास लागली । येऊनि आळंदी स्थळीं काढ वेगीं ॥३॥ ऐसें स्वप्न होतां आलों अलंकापुरीं । तंव नदी माझारी देखिलें द्वार ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं पुर्वपुण्य फळलें । श्रीगुरु भेटले ज्ञानेश्वर ॥ ५ ॥

४०८३ आदिनाथ शंकरें केला उपकार । ठेवणें निर्धारें प्रगट केलें ॥ १ ॥ तोचि महाराज निवृत्ती अवतार । केला उपकार जगालागीं ॥ २ ॥ निवृत्तीनें गुज सांगितलें ज्ञानदेवा । होता जो ठेवा गुह्य कांहीं ॥ ३ ॥ ज्ञानदेवें केलें ठेवणें प्रगट । एकाजनार्दनीं नीट मार्ग सोपा ॥ ४ ॥

४०८४ पडले मायावर्ती शुद्धि नाहीं जया । म्हणोनि अवतार तयां धरणें लागे ॥ १ ॥ धन्य गुरु माझा निवृत्ति दयाळ । दाखविलें सोज्वळ पद जेणें ॥ २ ॥ केला उपकार तारिले हे दीन । ज्ञानां ज्ञानांजन घालुनियां ॥ ३ ॥ नेणतीं जाणतीं पडलीं जी भुलीं । तयां

शुद्धि केली त्रिअक्षरीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं त्रिभुवनीं प्रताप । उजाळिला दीप ज्ञानदेवें ॥ ५ ॥

४०८५ जाले ज्ञानदेव वाणी । आले सामुग्री घेऊनी ॥१॥ पर्वकाळ द्वादशी । दिली सामुग्री आम्हांसी ॥ २ ॥ ज्ञानदेवाच्या चरणीं । शरण एकाजनार्दनीं ॥ ३ ॥

४०८६ संतांचा महिमा वर्णावा किती । अलक्ष मूर्ति ज्ञानोबा तो ॥ १ ॥ अर्जुना संकट पडतां जडभारी । गीता सांगे हरी कुरुक्षेत्रीं ॥ २ ॥ तोचि अवतार धरी अलंकापुरीं । ज्ञानाबाई सुंदरी तारावया ॥ ३ ॥ गीता शोधोनियां अर्थ तो काढिला । ग्रंथ तो निर्मिला ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥ जगाचा उद्धार ज्ञानाबाई नामें । साधन हें आणिक नेणे न करीं कांहीं ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं ज्ञानाबाई नाम । पावेन निजधाम संतांचें तें ॥ ६ ॥

४०८७ भाव धरुनियां वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरी तयावरी ॥ १ ॥ स्वमुखें आपण सांगे तो श्रीविष्णु । श्रीगीता हा प्रश्नु अर्जुनेसी ॥ २ ॥ तेचि ज्ञानेश्वरी वाचे वदतां साचे । भय कळिकाळाचें नाहीं तया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संशय सांडोनी । दृढ धरीं मनीं ज्ञानेश्वरी ॥ ४ ॥

४०८८ तीन अक्षरें निवृत्ति । जो जप करी अहोरात्रीं । तया सायुज्यता मुक्ती । ब्रम्हस्थिती सर्वकाळ ॥ १ ॥ चार अक्षरें ज्ञानदेव । जो जप करी धरील भाव । तया ब्रम्हपदीं ठाव । ऐसें देवादिदेव बोलिले ॥ २ ॥ सोपान हीं तीन अक्षरें । जो जप करील निर्धारें । तयास ब्रम्ह साक्षात्कारें । होय सत्वर जाणिजे ॥ ३ ॥ मुक्ताबाई चतुर्विधा । जो जप करील सदा । तो जाईल मोक्षपदा । सायुज्य संपदा पावेल ॥ ४ ॥ ऐसीं चौदाहीं अक्षरें । जो ऐकेल कर्णविवरें । अथवा गाईल मुखद्वारें । त्यासी ज्ञानेश्वर प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं प्रेम । जो जप करील धरिल नेम । तयास पुनः नाहीं जन्म । ऐसें पुरुषोत्तम बोलिले ॥ ६ ॥

४०८९ जोडोनियां दोनी हात । जगीं जाणवितों मात ॥ १ ॥ एकदां जारे अलंकापुरा । जन्म येरझारा चुकवा ॥ २ ॥ आवडी सांगा जीवींचें आर्त । माउली पुरवित जाणोनि ॥ ३ ॥ ज्ञानराज माझी माउली । एकाजनार्दनाची साउली ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

४०९० शिवाचा अवतार । स्वामी निवृत्ति दातार ॥ १ ॥ तया माझा नमस्कार । वारंवार निरंतर ॥ २ ॥ सव्य नांदे कैलासराणा । मागें गंगा ओघ जाणा ॥ ३ ॥ सेना घाली लोटांगण । वंदि निवृत्तिचे चरण ॥ ४ ॥

४०९१ निवृत्ति निवृत्ति । म्हणतां पाप नुरेची ॥ १ ॥ जप करितां त्रिअक्षरीं । मुक्ति लोळे चरणावरी ॥ २ ॥ ध्यान धरितां निवृत्ती । आनंदमय राहे वृत्ती ॥ ३ ॥ सेना म्हणे चित्तीं धरा । स्मरतां चुके येरझारा ॥ ४ ॥

४०९२ धन्य धन्य निवृत्तिराया । शरण आलों तुझिया पायां ॥१॥ नको पाहूं दुसरें आतां । गुण दोषाची वारता ॥ २ ॥ नाहीं माझा अधिकार । यातीहीन मी पामर ॥ ३ ॥ अपराधाचा केलों । सेना म्हणे काय बोलों ॥ ४ ॥

४०९३ धन्य अलंकापुर धन्य सिद्धेश्वर । धन्य ते तरुवर पशुपक्षी ॥ १ ॥ धन्य इंद्रायणी धन्य भागीरथी । तेथें स्नान जे करिती धन्य जन्म ॥ २ ॥ धन्य तो प्रयाग धन्य ते त्रिवेणी । वहाती येऊनि गुप्तरूपें ॥ ३ ॥ धन्य ते भूमी धन्य ते प्राणी । देखती नयनीं ज्ञानदेवा ॥ ४ ॥ धन्य ते भाग्याचे होती अलंकापुरीं । तयांचा निरधारी धन्य वंश ॥५॥ धन्य दासानुदास अलंकापुरीचा । सेना न्हावी त्यांचा रजःकण ॥ ६ ॥

४०९४ वाचे उच्चारी जो ज्ञानदेवाशी । तयाच्या सुकृतासी नाहीं पार ॥ १ ॥ पूर्वींचें सुकृत फळासी आलें । वाचे उच्चारिलें

ज्ञानदेवा ॥ २ ॥ या अलंकापुरीं आला जन्मासी । पूर्वज तयासी मानिती धन्य ॥ ३ ॥ सेना म्हणे त्यानें उद्धरिलें कुळ । पूर्वज सकळ आशिर्वाद देती ॥ ४ ॥

४०९५ धन्य महाराज अलंकापुरवासी । साष्टांग तयासी नमन माझें ॥ १ ॥ या ज्ञानदेवाचें नित्य नाम घेती वाचे । उद्धरती तयाचीं सकळ कुळें ॥ २ ॥ इंद्रायणी स्नान करिती प्रदक्षणा । तुटती यातना सकळ त्यांच्या ॥ ३ ॥ सेना म्हणे त्याचें धन्य झालें जिणें । ज्ञानदेव दरूशनें मुक्त होती ॥ ४॥

४०९६ येऊनी नरदेहासी वाचे उच्चारी ज्ञानेश्वर । तयाचा संसार सुफळ झालागे माये ॥ १ ॥ प्रत्यक्ष परब्रह्म येऊनी अवतारासी । तारिलें जगासी नाममात्रें ॥ २ ॥ जयाचे अंगणीं पिंपळ सोनियाचा । सिद्ध साधकांचा मेळा तेथें ॥ ३ ॥ तयाचे स्मरणें जळती पातकं । सांगत पंढरीनाथ सेना म्हणे ॥ ४ ॥

४०९७ विष्णूचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ॥ १ ॥ चला जाऊं अळंकापुरा । संतजनाच्या माहेरा ॥ २ ॥ स्नान करितां इंद्रायणी । मुक्ती लागती चरणीं ॥ ३ ॥ ज्ञानेश्वराच्या चरणीं । सेना आला लोटांगणीं ॥ ४ ॥

४०९८ गिरजेप्रती शंकर उपदेशिले । तो गुह्य मंत्र सप्त समुद्रापलीकडे ॥ १ ॥ ऐसें निज गुह्य साराचेंही सार । उघडें दाविलें साचार ज्ञानदेवें ॥ २ ॥ हें सुखाचें सुख साधन । भक्ति ज्ञानाचें अंजन । हेंचि परब्रह्म जीवन ॥ ३ ॥ हेंचि मुख निज राम मंत्र सार । सुलभ साकार सेना ध्याये निरंतर ॥ ४ ॥

४०९९ ज्ञानदेव गुरु ज्ञानदेव तारूं । उतरील पैलपारू ज्ञानदेव ॥ १ ॥ ज्ञानदेव माता ज्ञानदेव पिता । तोडिल भवव्यथा ज्ञानदेव ॥ २ ॥ ज्ञानदेव माझे सोयरे धायरे । जिवलग निर्धारें ज्ञानदेव ॥ ३ ॥ सेना म्हणे माझा ज्ञानदेव निधान । दाविली निज खुण ज्ञानदेव ॥ ४ ॥

४१०० अलंकापुरवासिनी । ज्ञानाबाई मायबहिनी ॥ १ ॥ लेकुराची चिंता । वागवावी कृपावंता ॥ २ ॥ मी तो आहे यातीहीन । माझा राखा अभिमान ॥ ३ ॥ करूनि विनवणी । सेना लागतो चरणीं ॥ ४ ॥

४१०१ श्रीज्ञानराजें केला उपकार । मार्ग हा निर्धार दाखविला ॥ १ ॥ विटेवरी उभा वैकुंठनायक । आणि पुंडलीक चंद्रभागा ॥ २ ॥ अविनाश पंढरी भूमीवरी पेठ । प्रत्यक्ष वैकुंठ दाखविलें ॥ ३ ॥ सेना म्हणे चला जाऊं तया ठाया । पांडुरंग सखया भेटवया ॥ ४ ॥

४१०२ वैकुंठवासिनी कृपावंत माऊली । जगा तारावया अळंकापुरा आली ॥ १ ॥ शिव तो निवृत्ति आदिमाया मुक्ताई । ब्रह्मा तो सोपान विष्णु ज्ञानदेव पाहीं ॥ २ ॥ येऊनी प्रतिष्ठानीं पशु वेद बोलविला । पंडित ब्रह्मज्ञानी यांचा गर्व हरिला ॥ ३ ॥ तपीतीरवासी चौदाशें वर्षांचा होता । तयाचा अभिमान गर्व हरि आदिमाता ॥ ४ ॥ वाळितां ब्राह्मणीं स्वर्गींचे पितर आणविले । सेना म्हणे जगीं पूर्णब्रह्म अवतरलें ॥ ५ ॥

४१०३ श्रीगुरु निवृत्तिराय सांप्रदाय दाविला । अलंकापुरवासिनी अधिकार तया दिधला ॥ १ ॥ आदिनाथें मूळ गुप्त होतें ठेविलें । निवृत्तिकृपेनें ज्ञानदेवें प्रगट केलें ॥ २ ॥ बुडतां भवसागरीं जगा काढिलें बाहेरी । दावियेला तारू विठ्ठल या तीं अक्षरीं ॥ ३ ॥ विटेवरी उभा नीट वैकुंठींचा राणा । दावियली खूण म्हणे न्हावीयाचा सेना ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहराज

४१०४ सुख अनुपम संतांचे चरणीं । प्रत्यक्ष अलंकाभुवनीं नांदतसे ॥ १ ॥ तो हा महाराज ज्ञानेश्वर माऊली । जेणें निगमवल्ली प्रगट केली ॥ २ ॥ संसारीं आसक्त माया मोहें रत । ऐसे जे पतित

तारावया ॥ ३ ॥ चोखा म्हणे श्रेष्ठ ज्ञानदेवी ग्रंथ । वाचितां सनाथ जीव होती ॥ ४ ॥

४१०५ उघडोनी वेदार्थाचा ठेवा । केला तरणोपाय जीवा ॥ १ ॥ ऐसा समर्थ ज्ञानदेव । तया चरणीं ठेवा भाव ॥ २ ॥ प्रत्यक्ष प्रचित लोचनीं । अस्थीं विरती जीवनीं ॥ ३ ॥ पुढें सोन्याचा पिंपळ । ऐसी साक्ष असे अढळ ॥ ४ ॥ कर जोडुनियां दोन्हीं । चोखा जातो लोटांगणीं ॥ ५ ॥

४१०६ महाविष्णूचा अवतार । प्राणसखा ज्ञानेश्वर ॥ १ ॥ आदिनाथाचा अवतार । निवृत्ति म्हणती साचार ॥ २ ॥ चतुराननाचा अवतार । तो हा सोपान निर्धार ॥३॥ आदि माया मुक्ताबाई । चांगा उपदेशिला पाहीं ॥ ४ ॥ ऐशा संतांच्या चरणीं । चोखा घालितो लोळणी ॥ ५ ॥

## कान्होपात्रा

४१०७ शिव तो निवृत्ति विष्णु ज्ञानदेव पाही । सोपान तो ब्रह्मा मूळ माया मुक्ताई ॥ १ ॥ धन्य धन्य धन्य धन्य निवृत्तिराया । धन्य ज्ञानदेव सोपान सखया ॥ २ ॥ प्रत्यक्ष पैठणीं भटां दाविली प्रचिती । रेडियाचे मुखें वदविली वेदश्रुती ॥ ३ ॥ चौदाशें वरुषांचे तप्तीतीर राहिवाशी । गर्व हरविला चालविलें भिंतीशीं ॥ ४ ॥ धन्य कान्हुपात्रा आजी झाली भाग्याची । भेटी झाली ज्ञानदेवाची म्हणूनियां ॥ ५ ॥

## ( २ ) सर्व संतश्रेष्ठांचें स्तवन

## श्रीतुकाराममहाराज

४१०८ तुम्ही सनकादिक संत । म्हणवितां कृपावंत ॥ १ ॥ एवढा करा उपकार । देवा सांगा नमस्कार ॥ २ ॥ भाकावी करुणा । विनवा पंढरीचा राणा ॥ ३ ॥ तुका म्हणे मज आठवा । मूळ लवकरी पाठवा ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

४१०९ म्हैसीपुत्रा मुखें बोलवणें श्रुती। चालवणें भिंतीं बैसोनियां ॥ १ ॥ नव्हे हा सामान्य महिमा संतांचा। नैवेद्य हातींचा मूर्ती जेवी ॥ २ ॥ उदकामाजी वह्या ठेऊनि कोरड्या। दाखवणें रोकड्या विश्वजनां ॥ ३ ॥ निळा म्हणे तिहीं संगींचि तारणे। दीनें उद्धरणे नवल कोण ॥ ४ ॥

४११० अगाध कीर्ति वाढले संत। केलीं विख्यात चरित्रें हीं ॥ १ ॥ अग्नींत उभे विषचि प्याले। नाहीं ते भ्याले महा शस्त्रा ॥ २ ॥ वंदूनि आज्ञा बोले पशु। करी श्रुतिघोषु दिर्घ स्वरें ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेऊनि उदकीं। कागदहि सेखीं कोरड्या वह्या ॥ ४ ॥

४१११ पशुमुखें वेदाच्या श्रुति। पढवा कीर्ती तुमचिये ॥ १ ॥ अचेतन भिंती चालवणें। हेंही करणें विचित्र ॥ २ ॥ तेरा दिवस उदकीं ठेवा। कागद द्यावा कोरडे ॥ ३ ॥ निळा म्हणे नारायण। ब्राह्मणजन तुम्हा घरीं ॥ ४ ॥

४११२ मृतप्राणी ते जेवविले। पुरुषही केले स्त्रियांचे ॥ १ ॥ हे तों तुमची सहजस्थिती। लोकांसी भक्ति प्रगटावया ॥ २॥ प्रसादेंचि विधवेसी बाळ। जन्मविला केवळ भातलवंडा ॥ ३ ॥ निळा म्हणे तुमची करणी। देवाहुनी अधिक ॥ ४ ॥

४११३ जिहीं निमिषमात्रें देह पालटिला। स्त्रियेचाचि केला पुरुष उभा ॥ १ ॥ त्याचें नवल कोण तारिती जड जीवा। यालागीं घडावा संतसंग॥ २ ॥ जिहीं फिरविलें औंढयाचें देऊळ। बोलविले बोल मूर्तिकरवीं ॥ ३ ॥ निळा म्हणे जिहीं प्रेतें जिवविलीं। वरदें उपजविलीं बाळें स्त्रिया ॥ ४ ॥

४११४ प्रताप तुमचा आहेचि जैसा। करितां जी तैसा बडिवारही ॥ १ ॥ नव्हे जें कोणा तें करूनी दावितां। अघटित घडवितां निमिष्यमात्रें ॥ २॥ स्त्रियांचे पुरुष पशुमुखें श्रुती। चालविल्या

भिंती उदकीं वह्या ॥ ३ ॥ निळा म्हणे माझा करा अंगिकार । तरी महिमा थोर वाढेल तुमचा ॥ ४ ॥

४११५ सुरदास आंधळा पंजाबी ब्राम्हण । गातां तुमचे गुण धन्य झाला ॥ १ ॥ विसोबा खेचर चांगा वटेश्वर । नरहरी सोनार पाठक नामा ॥ २ ॥ जिवलग तुम्हां सांगाती जीवाचे । विभागी भाग्याचे केले तुम्ही ॥ ३ ॥ निळा म्हणे भेद नाहीं तुम्हां संतां । दाविली भिन्नता प्रीतीसाठीं ॥ ४ ॥

४११६ शुक प्रल्हाद हरिच्या नामें । गातां सुख संभ्रमें निवाले ॥ १ ॥ त्यांनीं उघडूनियां मार्गा । दाविली जगा हरिभक्ती ॥ २ ॥ तैसाचि नामा विष्णुदास । पावला सौरस परब्रम्हीं ॥ ३ ॥ निळा म्हणे दाऊनी तुका । गेला एका जनार्दन ॥ ४ ॥

४११७ देवचि झाले अंगें । देवा भजतां अनुरागें ॥ १ ॥ शुक प्रल्हाद नारद । अंबऋषी रुक्मांगद ॥ २ ॥ निवृत्ति ज्ञानेश्वर सोपान । नामा सजना आणि जाल्हाण ॥ ३ ॥ कूर्मा विसोबा खेचर । सांवता चांगा वटेश्वर ॥ ४ ॥ कबीर सेना सूरदास । नरसी मेहता भानुदास ॥ ५ ॥ निळा म्हणे जनार्दन एका । देवचि होऊनी ठेला तुका ॥ ६ ॥

४११८ गजेंद्राच्या संगें नाडीया उद्धार । प्रल्हादें असुर उद्धरले ॥ १ ॥ हनुमंतें जुत्पत्ती रिस आणि वानर । पावले पार भवसिंधु ॥ २ ॥ बिभीषणें राक्षस लावियेले भक्ती । केली पावन क्षिती धर्मराजें ॥ ३ ॥ निळा म्हणे तैसें संतीं उद्धरिले । नव जाती बोलिले संख्यारहित ॥ ४ ॥

४११९ दळणीं दळतां आठवे मानसीं । आलंकापुरवासी ज्ञानराज ॥ १ ॥ ओविया मंगळीं गाईन तयासी । स्वामी तुकयासी निजानंदें ॥ २ ॥ एका जनार्दन आणि नामदेव । देती स्वानुभव आठवितां ॥ ३ ॥ परलोक सोइरे जिवलग हे माझे । जे कां पंढरि-

राजें अनुग्रहीलें ॥ ४ निळा म्हणे संत जे जे भूमंडळीं । त्यांची पाय-धुळी वंदीन मी ॥ ५ ॥

## रामेश्वर भट्ट

४११९अ तुकाराम तुकाराम । नाम घेतां कांपे यम ॥ १ ॥ धन्य तुकोबा समर्थ । जेणें केला पुरुषार्थ ॥ २ ॥ जळीं दगडासहित वह्या । तारियेल्या जैशा लाह्या ॥ ३ ॥ म्हणे रामेश्वर भट्ट द्विजा । तुका विष्णु नाहीं दुजा ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४१२० शुक सनकादिक जनक चक्रवर्ती । प्रल्हाद परिक्षिति बिभिषण ॥ १ ॥ बळि भीष्म नारद आणि उद्धव । रुक्मांगद श्रुत-देव इत्यादिक ॥ २ ॥ शास्त्रांचें हें सार वेदांचें गव्हर । नामापरिकर कलियुगीं ॥ ३ ॥

## श्रीजनाबाई

४१२१ ज्ञानेश्वर अभंग बोलिले ज्या शब्दां । चिदानंद बाबा लिही त्यास ॥ १ ॥ निवृत्तिचे बोल लिहिले सोपानें । मुक्ताईचीं वचनें ज्ञानदेवें ॥ २ ॥ चांगयाचा लिहणार शामा तो कांसार । परमानंद खेचर लिहीत होता ॥ ३ ॥ सांगे पूर्णानंद लिही परमानंद । भगवंत भेटी आनंद रामानंद ॥ ४ ॥ सांवत्या माळ्याचा काशिबा गुरव । कुर्म्याचा वसुदेव काईत होता ॥ ५ ॥ चोखामेळ्याचा अनंतभट्ट अभ्यंग । म्हणोनी नामयाचे जनीचा पांडुरंग ॥ ६ ॥

४१२२ भक्तांमाजीं अग्रगणी । पुंडलीक महामुनी ॥ १ ॥ त्याचे प्रसादें तरले । साधुसंत उद्धरिले ॥ २ ॥ तोचि प्रसाद आम्हासीं । विटेवरी हृषिकेशी ॥ ३ ॥ पुंडलिक बापमाय । दासी जनी वंदी पाय ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

४१२३ सिद्धांमाजी अग्रगणी । तो हा भोळा शुळपाणी ॥ १ ॥

धन्य धन्य त्रिंबकराजा । तया नमस्कार माझा ॥ २ ॥ जटीं गंगा वाहे । तो हा त्रिगुणात्मक पाहे ॥ ३ ॥ भोंवता वेढा ब्रह्मगिरी । मध्यें शोभे त्रिपुरारी ॥ ४ ॥ सेना घाली लोटांगण । उभा राहे कर जोडून ॥ ५ ॥

४१२४ नाम हें अमृत भक्तांसी दिधलें । ठेवणें ठेविलें होतें गुप्त ॥ १ ॥ प्रत्यक्ष अवतार धरिला अलंकापुरी । मार्ग तो निर्धारीं दाखविला ॥ २ ॥ कृतयुगामाजी वशिष्ठ जाणता । नाम तो घेता नारद्मुनी ॥ ३ ॥ कलियुगामाजी न घडे साधन । जातील बुडोन महाडोहीं ॥ ४ ॥ रामकृष्ण हरी गोविंद गोपाळ । स्मरा वेळोवेळां सेना म्हणे ॥ ५ ॥

## श्रीनरहरी सोनार

४१२५ धन्य पुंडलिक भक्त निवडला । अक्षयीं राहिला चंद्रभागीं ॥ १ ॥ भक्त नामदेव अक्षयीं जडला । पायरी तो झाला महाद्वारीं ॥ २ ॥ ज्ञानोबा सोपान निघती हे भक्त । अक्षयीं राहत परब्रह्मीं ॥ ३ ॥ बोधराज भला वचनीं गोविला । कीर्तनीं राहिला पांडुरंग ॥ ४ ॥ साधुसंत फार येती थोर थोर । उभा निरंतर चोखामेळा ॥ ५ ॥ संत साधूजन वंदिती चरण । नरहरी निशिदीन सेवेलागीं ॥ ६ ॥

## श्रीचोखोबामहाराज

४१२६ सप्रेम निवृत्ति आणि ज्ञानदेव । मुक्ताईचा भाव विठ्ठल चरणीं ॥ १ ॥ सोपान सांवता गोरा कुंभार । नरहरी सोनार प्रेमभरीत ॥ २ ॥ कबीर कमाल रोहिदास चांभार । आणीक अपार वैष्णवजन ॥ ३ ॥ चोखा तयां पायीं घाली लोटांगण । वंदितो चरण प्रेमभावें ॥ ४ ॥

---

# आळंदी महिमा

## श्रीनिळोबामहाराज

४१२७ एक भूवैकुंठ एक शिवपीठ। महिमा वरिष्ठ दोहींचा ॥ १ ॥ तेथें पेरिलें नुगवे शेतीं। अस्थी विरती येथें उदकीं ॥ २ ॥ चंद्रभागा चक्रतीर्थ। भीमा समर्थ इंद्रायणी ॥ ३ ॥ निळा म्हणे तेथें हनुमंत। येथें अश्वत्थ कनकाचा ॥ ४ ॥

४१२८ पंढरपुरीं ज्ञानेश्वरीं। मुक्ति कामारी वोळंगती ॥ १ ॥ तेथें देव येथें भक्त। महिमा अद्‍भुत दोहींचा ॥ २ ॥ तेथें ध्यान येथें ज्ञान। परलोकसाधन दो ठायीं ॥ ३ ॥ निळा म्हणे तेथें गरुड। येथें झाड अजानतरु ॥ ४ ॥

४१२९ यात्रे अलंकापुरा येती। ते ते आवडती विठ्ठला ॥ १ ॥ पांडुरंगें प्रसन्नपणें। केलें देणें हें ज्ञाना ॥ २ ॥ भूवैकुंठ पंढरपुर। त्याहुनी थोर महिमा या ॥ ३ ॥ निळा म्हणे जाणोनी संत। येती धांवत प्रतिवर्षीं ॥ ४ ॥

४१३० वर्णितां महिमा तो अगाध। जेथें सिद्ध अवतरले ॥ १ ॥ पशुमुखें वदवूनि श्रुति। निर्जीव भिंती चालविली ॥ २ ॥ सन्मुख पुढें अजानवृक्ष। पिंपळ प्रत्यक्ष सोन्याचा ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐकोनी कीर्ती। चांगदेव येती दर्शना ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

४१३१ नामयाच्या नारायणें घेतली आळी। या भूमीचें महिमान सांगे म्हणे वनमाळी ॥ १ ॥ धन्य धन्य अलंकापुर धन्य धन्य सिद्धेश्वर। धन्य इंद्रायणीतीरीं राज्य करी ज्ञानेश्वर ॥ २ ॥ या भूमीचें वर्णन करूं न शके चतुरानन। महा क्षेत्र पुरातन पातकें नासती स्मरणें ॥ ३ ॥ सेना म्हणे जगज्जीवन सांगतसे जीवींची खूण। महा दोषा होय दहन ज्ञानदेव दरुशनें ॥ ४ ॥

### श्रीकान्होपात्रा

४१३२ अलंकापुरीं पुण्य ठाव । तेथ समाधी ज्ञानदेव ॥ १ ॥ पांडुरंगें दिधला वर । भेटी निर्धार कृष्णपक्षीं ॥ २ ॥ नित्य स्नानालागीं जाणा । भागीरथी दिधली ज्ञाना ॥ ३ ॥ सरस्वती मणिकर्णिका । त्रिसंगमीं वाहती देखा ॥ ४ ॥ येथें स्नान करितां । वास वैकुंठीं तत्वतां ॥ ५ ॥ ऐसें देव सांगत । कान्होपात्रा आनंदत ॥ ६ ॥

---

# संतपर

## ( १ ) संतस्तुति

### श्रीतुकाराममहाराज

४१३३ श्रीसंतांचिया माथा चरणावरी । साष्टांग हे करी दंडवत ॥ १ ॥ विश्रांती पावलों सांभाळउत्तरीं । वाढलें अंतरीं प्रेमसुख ॥ २ ॥ डोरली हे काया कृपेच्या वोरसें । नव्हे अनारिसें उद्धरलों ॥ ३ ॥ तुका म्हणे मज न घडतां सेवा । पूर्वपुण्यठेवा वोढवला ॥ ४ ॥

४१३४ आम्हां सोयरे हरिजन । जनीं भाग्य निकंचन ॥ १ ॥ ज्यांच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥ २ ॥ भुके तान्हे चित्तीं । सदा देव आठविती ॥ ३ ॥ तुका म्हणे धन । ज्यांचें निज नारायण ॥ ४ ॥

४१३५ आले संत पाय ठेविती मस्तकीं । इहीं उभयलोकीं सरता केलों ॥ १ ॥ वंदीन पाउलें लोळेन चरणीं । आजि इच्छाधणी फिटईल ॥ २ ॥ अवघीं पूर्वपुण्यें झालीं सानुकूळ । अवघेंचि मंगळ संतभेटी ॥ ३ ॥ तुका म्हणे कृतकृत्य झालों देवा । नेणें परि सेवा डोळां देखें ॥ ४ ॥

४१३६ आम्हीं नाचों तेणें सुखें । वाहूं टाळी गातों मुखें ॥ १ ॥ देव कृपेचा कोंवळा । शरणागता पाळी लळा ॥ २ ॥ आम्हां झाला

हा निर्धार । मागें तारिले अपार ॥ ३ ॥ तुका म्हणे संतीं । वर्म दिलें आम्हां हातीं ॥ ४ ॥

४१३७ आजिचें हें मज तुम्हीं कृपादान । दिलें ते जतन मायबापा ॥ १ ॥ आलीं मुखावाटा अमृतवचनें । उत्तीर्णता येणें नव्हे जन्में ॥ २ ॥ तुका म्हणे तुम्हीं उदार कृपाळ । शृंगारिलें बाळ कवतुकें ॥ ३ ॥

४१३८ ऐसा भाग्यें जालों । तरीच धन्य जन्मा आलों ॥ १ ॥ रुळे तळींले पायरी । संत पाय देती वरी ॥ २ ॥ प्रेमामृतपान । होईल चरणरजें स्नान ॥ ३ ॥ तुका म्हणे सुखें । तया हरतील दुःखें ॥ ४ ॥

४१३९ काय माझी संत पाहती जाणीव । सर्व माझा भाव त्यांचे पायीं ॥ १ ॥ कारण सरतें करा पांडुरंगीं । भूषणाची जगीं काय चाड ॥ २ ॥ बोबड्या उत्तरीं म्हणे हरिहरि । आणीक भिकारी नेणें दुजें ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही विठ्ठलाचे दास । करितों मी आस उच्छिष्टाची ॥ ४ ॥

४१४० काय वानूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवितसें ॥ १ ॥ थोरीव सांडिली आपुली परिसें । नेणे सिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥ जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती परोपकारें ॥ ३ ॥ भूतांची दया हे भांडवल संतां । आपुली ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

४१४१ काय सांगों मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥ काय द्यावें यांसी व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ २ ॥ सहज बोलणें हित उपदेश । करूनि सायास शिकविती ॥ ३ ॥ तुका म्हणे वत्स धेनुवेच्या चित्तीं । तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥

४१४२ केला कईवाड संतांच्या आधारें । अनुभवें खरें कळों आलें ॥ १ ॥ काय जीवित्वाची धरूनिया आशा । व्हावें गर्भवासा पात्र भेणें ॥ २ ॥ अबाळीनें जावें निश्चितीच्या ठाया । रांडा रोटा वांयां करूं नये ॥ ३ ॥ तुका म्हणे बळी देतां तें विधान । भिकेसाठीं कोण राज्य देतो ॥ ४ ॥

४१४३ कोणा पुण्या फळ आलें । आजि देखिलीं पाउलें ॥ १ ॥ ऐसें नेणों नारायणा । संतीं सांभाळिलें दिना ॥ २ ॥ कोण लाभकाळ । दीन आजिचा मंगळ ॥ ३ ॥ तुका म्हणे झाला । एवढा लाभ गा विठ्ठला ॥ ४ ॥

४१४४ कृपाळू सज्जन तुम्ही संतजन । हेंचि कृपादान तुमचें मज ॥ १ ॥ आठवण तुम्ही द्यावी पांडुरंगा । कींव माझी सांगा काकुळती ॥ २ ॥ अनाथ अपराधी पतित आगळा । परि पायां वेगळा नका करूं ॥ ३ ॥ तुका म्हणे तुम्ही निरविल्यावरी । मग मज हरी उपेक्षीना ॥ ४ ॥

४१४५ जन्मा आलों त्याचें । आजि फळ झालें साचें ॥ १ ॥ तुम्ही सांभाळिलें संतीं । भय निरसली खंती ॥ २ ॥ कृतकृत्य झालों । इच्छा केली ते पावलों ॥ ३ ॥ तुका म्हणे काळ । आतां करूं न शके बळ ॥ ४ ॥

४१४६ जिचें पीडे बाळ । प्राण तियेचा विकळ ॥ १ ॥ ऐसा मातेचा स्वभाव । सूत्र दोरी एक जीव ॥ २ ॥ सुखाची विश्रांति । उमटे मातेचिये चित्तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे संत । तुम्ही बहु कृपावंत ॥ ४ ॥

४१४६अ तुम्हीं पाय संतीं । माझे ठेवियेले चित्तीं ॥ १ ॥ आतां बाधूं न शके काळ । जालों विषमें शीतळ ॥ २ ॥ भय नाहीं मनीं । देव वसे घरीं रानीं ॥ ३ ॥ तुका म्हणे भये । आतां स्वप्नींही तें नये ॥ ४ ॥

४१४७ तुम्ही संत मायबाप कृपावंत । काय मी पतीत कीर्ती वानूं ॥ १ ॥ अवतार तुम्हां धराया कारण । तारावया जन महादोषी ॥ २ ॥ वाढावया सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे गुण चंदनाचे आंगीं । तैसे तुम्ही जगीं संतजन ॥ ४ ॥

४१४८ ते माझे सोयरे सज्जन सांगाती । पाय आठविती विठोबाचे ॥ १ ॥ येरा मान विधि पाळणापुरतें । देवाचीं तीं भुतें म्हणोनियां ॥ २ ॥ सर्वभावें जालों वैष्णवांचा दास । करीन त्यांच्या आस उच्छिष्टाची ॥ ३ ॥ तुका म्हणे जैसे आवडती हरिचे दास । तैशी नाहीं आस आणीकांची ॥ ४ ॥

४१४९ तृषाकाळीं उदक भेटी । पडे मिठी आवडीची ॥ १ ॥ ऐसियांचा हो कां संग । जिवलग संतांचा ॥ २ ॥ मिष्टान्नाचा योग भुके । म्हणतां चुके पुरेसें ॥ ३ ॥ तुका म्हणे माते बाळा । कळवळा भेटीचा ॥ ४ ॥

४१५० दसरा दिवाळी तोचि आम्हां सण । सखे संतजन भेटतील ॥ १ ॥ आमुप जोडल्या सुखाचिया राशी । पार या भाग्याशी नाहीं आतां ॥ २ ॥ धन्य दिवस आजि जाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ॥ ३ ॥ तुका म्हणे काय होऊं उतराई । जीव ठेऊं पायीं संतांचिये ॥ ४ ॥

४१५१ धन्य काळ संतभेटी । पायीं मिठी पडिलीसे ॥ १ ॥ संदेहाच्या सुटल्या गांठी । झालों पोटीं शीतळ ॥ २ ॥ भवनदीचा झाला तारा । या उत्तरा प्रसादें ॥ ३ ॥ तुका म्हणे मंगळ आतां । कोण दाता याहूनी ॥ ४ ॥

४१५२ धन्य ते संसारीं । दयावंत जे अंतरीं ॥ १ ॥ येथें उपकारासाठीं । आलें घर ज्यां वैकुंठीं ॥ २ ॥ लटिकें वचन । नाहीं देहीं उदासीन ॥ ३ ॥ मधुरा वाणी ओठीं । तुका म्हणे वाव पोटीं ॥ ४ ॥

४१५३ न करावी स्तुति माझी संतजनीं। होईल या वचनीं अभिमान ॥ १ ॥ भारें भवनदी नुतरवे पार। बुडावती दूर तुमचे पाय ॥ २ ॥ तुका म्हणे गर्व पुरवील पाठी। होईल माझ्या तुटी विठोबाची ॥ ३ ॥

४१५४ नमावे पाय हें माझें उचित। आशिर्वादें हित तुमचिया ॥ १ ॥ कृपेचा वोरस न समाये पोटीं। म्हणोनि उफराटीं वचनें हीं ॥ २ ॥ तुमची उष्टावळी हें माझें भोजन। झाडावें अंगण केरपुंजे ॥ ३ ॥ परि ऐसें पुण्य नाहीं माझे गांठी। जेणें पडे मिठी पायांसवें ॥ ४ ॥ तुका म्हणे राहे आठवण चित्तीं। ऐसी कृपा संतीं केली तुम्हीं ॥ ५ ॥

४१५५ न लगे चंदना पुसावा परिमळ। वनस्पती मेळ हाकारूनी ॥ १ ॥ अंतरींचें धांवे स्वभावें बाहेरी। धरितांही परी आवरेना ॥ २ ॥ सूर्य नाहीं जागें करीत या जना। प्रकाश किरणा कर म्हूण ॥ ३ ॥ तुका म्हणे मेघ नाचवी मयूरें। लपवितां खरें येत नाहीं ॥ ४ ॥

४१५६ नाचे टाळी पिटी। प्रेमें अंग धरणीं लोटी ॥ १ ॥ माझे सखे ते सज्जन। भोळे भाविक हरिजन ॥ २ ॥ न धरिती लाज। नाहीं जनासवें काज ॥ ३ ॥ तुका म्हणे दाटे। कंठ नेत्रीं जळ लोटे ॥ ४ ॥

४१५७ परमेष्टिपदा। तुच्छ मानिती सर्वदा ॥ १ ॥ हेंचि ज्यांचें धन। सदा हरीच स्मरण ॥ २ ॥ इंद्रपदादिक भोग। भोग नव्हे तो भवरोग ॥ ३ ॥ सार्वभौम राज्य। त्यांसि कांहीं नाहीं काज ॥ ४ ॥ पाताळींचें आधिपत्य। तें तों मानीती विपत्य ॥ ५ ॥ योगसिद्धिसार। त्यांसि वाटे तें असार ॥ ६ ॥ मोक्षायेवढें सुख। सुख नव्हेचि तें दुःख ॥ ७ ॥ तुका म्हणे हरिविण। त्यासी अवघा वाटे शीण ॥ ८ ॥

४१५८ पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्व काळ ॥ १ ॥ तयाच्या चिंतनें तरतील दोषी । जळतील राशी पातकांच्या ॥ २ ॥ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ ३ ॥ काय त्यां उरलें वेगळें आणीक । वैकुंठनायक जयां कंठीं ॥ ४ ॥ तुका म्हणे देवभक्तांचा संगम । तेथें ओघ नाम त्रिवेणीचा ॥ ५ ॥

४१५९ पुण्य फळलें बहुतां दिवसां । भाग्य उदयाचा ठसा । झालों सन्मुख तों कैसा । संतचरण पावलों ॥ १ ॥ आजि फिटलें माझें कोडें । बहुता जन्मांचें सांकडें । कोंदाटलें पुढें । परब्रह्म सांवळें ॥ २ ॥ आलिंगनें संतांचिया । दिव्य झाली माझी काया । मस्तक हें पायां । वरी त्यांच्या ठेवितां ॥ ३ ॥ तुका म्हणे धन्य झालों । सुखें संतांचिया धालों । लोटांगणीं आलों । वैष्णवभार देखोनी ॥ ४ ॥

४१६० पुण्यवंत व्हावें । घेतां सज्जनांचीं नांवें ॥ १ ॥ नेघे माझी वाचा तुटी । महालाभ फुकासाठीं ॥ २ ॥ विश्रांतीचा ठाव । पायीं संतांचिया भाव ॥ ३ ॥ तुका म्हणे पापें । जाती संतांचिया जपें ॥४॥

४१६१ भाग्यवंता ऐशी जोडी । परवडी संतांची ॥ १ ॥ धन घरीं पांडुरंग । अभंग जें सरेना ॥ २ ॥ जनाविरहित हा लाभ । टांचें नभ सांटवणें ॥ ३ ॥ तुका म्हणे विष्णुदासां । नाहीं आशा दुसरी ॥ ४ ॥

४१६२ मनीं वसे त्यांचें आवडे उत्तर । वाटे समाचार घ्यावा ऐसा ॥ १ ॥ जातीचें तें झुरे येर येरासाठीं । वियोगेंही तुटी नेघे कधीं ॥ २ ॥ भेटीची अपेक्षा वारता आदर । पुसे नव्हे धीर मागुताले ॥ ३ ॥ तुका म्हणे माझ्या जीवाचें जीवन । सोइरे हरिजन प्राणसखे ॥ ४ ॥

४१६३ माउलीची चाली लेंकराचे ओढी । तयालागीं काढी प्राणें

प्रीती ॥ १ ॥ ऐसी बळिवंत आवडी जी देवा। संतमहानुभावा विनवितों॥२॥ मोहें मोहियेलें सर्व काळ चित्त। विसरू तो घेत नाहीं क्षणें ॥ ३ ॥ तुका म्हणे दिला प्रेमाचा वोरस। सांभाळिले दास आपुले ते ॥ ४ ॥

४१६४ माझिये जातीचे मज भेटो कोणी। आवडीची धणी फेडावया ॥ १ ॥ आवडे ज्यां हरी अंतरापासूनि। ऐसियांचें मनीं आर्त माझें ॥ २ ॥ तयांलागीं जीव होतो कासावीस। पाहातील वास नयन हे ॥ ३ ॥ सुफळ हा जन्म होईल येथून। देतां आलिंगन वैष्णवांसी ॥ ४ ॥ तुका म्हणे तोचि सुदिन सोहळा। गाऊं या गोपाळा धणीवरी ॥ ५ ॥

४१६५ मातेचिये चित्तीं। अवघी बाळकाची व्याप्ति ॥ १ ॥ देह विसरे आपुला। जवळी घेतां सीण गेला ॥ २ ॥ दावी प्रेमभातें। आणि अंगावरी चढतें ॥ ३ ॥ तुका संतापुढें। प्रायीं झोंबे लाडें-कोडें ॥ ४ ॥

४१६६ लेंकरा लेववी माता अळंकार। नाहीं अंतपार आव-डीसी ॥ १ ॥ कृपेचें पोसणें तुमचें मी दीन। आजि संतजन माय-बाप ॥ २ ॥ आरुष उत्तरीं संतोषे माउली। कवळूनि घाली हृद-यांत ॥ ३ ॥ पोटा आलें त्याचे नेणे गुणदोष। कल्याणाचि आस असावी हे ॥ ४ ॥ मनाची ते चाली मोहाचिये सोई। ओघ गंगा काइ परतों जाणें ॥ ५ ॥ तुका म्हणे कोठें उदार मेघां शक्ति। माझी तृषा किती जातकाची ॥ ६ ॥

४१६७ लेंकराचें हित। जाणे माउलीचें चित्त ॥ १ ॥ ऐसी कळ-वळ्याची जाती। करी लाभाविण प्रीती ॥ २ ॥ पोटीं भार वाहे। त्याचें सर्वस्वही साहे ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें। तैसें तुम्हा संतां ओझें ॥ ४ ॥

४१६८ शुद्धबीजापोटीं। फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥ मुखीं

अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ॥ २ ॥ सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ ३ ॥ तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ४ ॥

४१६९ हींच त्यांचीं पंचभूतें । जीवन भातें प्रेमाचें ॥ १ ॥ कळवळा धरिला संतीं । ते निगुती कैवाड ॥ २ ॥ हाच काळ वर्तमान । साधन हीं संपत्ती ॥ ३ ॥ तुका म्हणे दिवसराती । हेंचि खाती अन्न ते ॥ ४ ॥

४१७० संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥ १ ॥ मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ २ ॥ कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ ३ ॥ तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ४ ॥

४१७१ संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढे ॥ १ ॥ भजनविधी नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे ॥ २ ॥ ध्यान गति मति आसन समाधि । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥ ३ ॥ नेणता निर्लज्ज नेणें नादभेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥ ४ ॥ सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका म्हणे संतमहंतपाय ॥ ५ ॥

४१७२ संतांनीं सरता केलों तैसेपरी । चंदनीं ते बोरी व्यापीयेली ॥ १ ॥ गुणदोष याती न विचारि कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ॥ २ ॥ तुका म्हणे आलें समर्थाच्या मना । तरी होय राणा रंक त्याचा ॥ ३ ॥

४१७३ संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥ १ ॥ कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥ २ ॥ काया कुरवंडी । करून ओंवाळूनि सांडी ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥ ४ ॥

४१७४ संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ॥ १ ॥ काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥ २ ॥ शेष घेईन उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ॥ ३ ॥ तुका म्हणे संतां पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ ४ ॥

४१७५ संत गाती हरिकीर्तनीं । त्यांचें घेइन पायवणी ॥ १ ॥ हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणें दुजें ॥ २ ॥ काया कुरंवडी करीन । संत महंत ओंवाळीन ॥ ३ ॥ संत महंत माझी पूजा । आन भाव नाहीं दुजा ॥ ४ ॥ तुका म्हणे नेणें कांहीं । अवघें आहे संतां पायीं ॥ ५ ॥

४१७६ संतसंगें याचा वास सर्वकाळ । संचला सकळ मूर्तिमंत ॥ १ ॥ घालूनियां काळ अवघा बाहेरी । त्यासीच अंतरी वास दिला ॥ २ ॥ आपुलें हीं जिहीं नाहीं उरों दिलें । चोजवितां भलें ऐसीं स्थळें ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं झांकत परिमळ । चंदनाचें स्थळ चंदनाचि ॥ ४ ॥

४१७७ संतांचिया पायीं हा माझा विश्वास । सर्वभावें दास झालों त्यांचा ॥ १ ॥ तोचि माझें हित करिती सकळ । जेणें हा गोपाळ कृपा करी ॥ २ ॥ भागलिया मज वाहतील कडे । त्यांचियानें जोडे सर्व सुख ॥ ३ ॥ तुका म्हणे शेष घेईन आवडी । वचन न मोडी बोलिलें तें ॥ ४ ॥

४१७८ संतांचे घरींचा दास मी कामारी । दारीं परवरीं लोळतसें ॥ १ ॥ चरणींचे रज लागती अंगास । तेणें बेताळिस उद्धरती ॥ २ ॥ उच्छिष्ट हें जमा करूनी पत्रावळी । घालीन कवळी मुखामाजी ॥ ३ ॥ तुका म्हणे मी आणीक विचार । नेणें हेंचि सार मानीतसें ॥ ४ ॥

४१७९ सर्व सुखें आजी एथेंचि वोळलीं । संतांचीं देखिलीं चरणांबुजें ॥ १ ॥ सर्वकाळ होतों आठवीत मनीं । फिटली ते धणी येणें काळें ॥ २ ॥ तुका म्हणे वाचा राहिली कुंठित । पुढें जालें चित्त समाधान ॥ ३ ॥

४१८० सर्व भाग्यहीन । ऐसें सांभाळिलें दीन ॥ १ ॥ पायीं संतांचे मस्तक । असों जोडोनि हस्तक ॥ २ ॥ जाणें तरी सेवा। दीन दुर्बळची देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे जीव। समर्पून भाकीं कींव ॥ ४ ॥

४१८१ स्तुति करीं जैसा नाहीं अधिकार। न कळे विचार योग्यतेचा ॥ १ ॥ तुमचा मी दास संतांचें दुर्बळ। करूनि सांभाळ राखा पायीं ॥ २ ॥ रामकृष्णहरि मंत्र उच्चारणा। आवडी चरणां विठोबाच्या ॥ ३ ॥ तुका म्हणे तुमचें सेवितों उच्छिष्ट। क्षमा करा धीट होऊनियां ॥ ४ ॥

४१८२ हरिजनां प्राण विकली हे काया । अंकिला मी तयांघरीं जालों ॥ १ ॥ म्हणियें सत्वर करीन सांगतां। घेईन मी देतां शेष त्यांचें ॥ २ ॥ आस करूनियां राहेन अंगणीं। उच्छिष्टांची धणी घ्यावयासी ॥ ३ ॥ चालतां ते मार्गीं चरणींचे रज। उडती सहज घेइन आतां ॥ ४ ॥ दुरी त्यांपासूनि न वजें दवडितां। तुका म्हणे लाता घेईन अंगीं ॥ ५ ॥

४१८३ हें तों एक संतांठायीं। लाभ पायीं उत्तम ॥ १ ॥ म्हणवितां त्यांचे दास। पुढें आस उरेना ॥ २ ॥ कृपादान केलें संतीं। कल्पांतींही सरेना ॥ ३ ॥ तुका म्हणे संतसेवा। हाचि हेवा उत्तम ॥ ४ ॥

४१८४ शेवटींची विनवणी। संतजनीं परिसावी ॥ १ ॥ विसर तो न पडावा। माझा देवा तुम्हांसीं ॥ २ ॥ आतां फार बोलों काई। अवघें पायीं विदित ॥ ३ ॥ तुका म्हणे पडिलों पायां। करा छाया कृपेची ॥ ४ ॥

४१८४अ कोण पुण्य कोणा गांठीं। ज्यासी ऐसीयांची भेटी ॥१॥ जिहीं हरी धरिला मनीं। दिलें संसाराला पाणी ॥ २ ॥ कोण हा भाग्याचा। ऐसियासी बोले वाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याचे भेटी। होय संसाराची तुटी ॥ ४ ॥

४१८५ त्यांचिया चरणा माझे दंडवत । ज्यांचें धन वित्त पांडुरंग ॥ १ ॥ तेथें माझा जीव पावला विसांवा । म्हणऊनि हांवा भरलासें ॥ २ ॥ चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥ ३ ॥ आणिक तीं भाग्यें येथें कुरवंडी । करुनियां सांडीं इंद्र ऐसीं ॥ ४ ॥ वैष्णवांचे घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सर्वभावें ॥ ५ ॥ तुका म्हणे सखे हरिचे ते दास । आणिक पुढें आस नाहीं दुजी ॥ ६ ॥

४१८६ पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती ॥ १ ॥ कर्मधर्म त्यांचा जाला नारायण । त्यांचेनी पावन तिन्ही लोक ॥ २ ॥ वर्ण अभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ ३ ॥ अंत्यजादि योनी तरल्या हरिभजनें । तयांचीं पुराणें भाट झालीं ॥ ४ ॥ वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥ ५ ॥ कबीर मोमीन लतिफ मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥ ६ ॥ कान्होपात्रा खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेदू हरिचे पायीं ॥ ७ ॥ चोखामेळा बंका जातीचा महार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥ ८ ॥ नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ॥ ९ ॥ मैराळ जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें काय सांगों ॥ १० ॥ यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ११ ॥ तुका म्हणे तुम्ही विचारावे ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥ १२ ॥

४१८७ चंदनाचे हात पायही चंदन । परिसा नाहीं हीन कोणी अंग ॥ १ ॥ दीपा नाहीं पाठीं पोटीं अंधकार । सर्वांगें साकर अवघी गोड ॥ २ ॥ तुका म्हणे तैसा सज्जनापासून । पाहतां अवगुण मिळेचिना ॥ ३ ॥

४१८८ वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाभ ॥ १ ॥ संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥ २ ॥ तोचि देवभक्त । भेदा-

भेद नाहीं ज्यांत ॥ ३ ॥ तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोन जाये ॥ ४ ॥

४१८९ ब्रम्हज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥ १ ॥ रिघों पाहे माजी बळें त्यांचें घर । दवडिती दूर म्हणोनियां ॥ २ ॥ तुका म्हणे येथें न चले सायास । पडिलें उदास त्यांच्या गळां ॥ ३ ॥

४१९० धन्य दिवस आजी दर्शन संतांचें । नांदे तया घरीं दैवत पंढरीचें ॥ १ ॥ धन्य पुण्यरूप कैसा झाला संसार । देव आणि भक्त दुजा नाहीं विचार ॥ २ ॥ धन्य पूर्व पुण्य वोडवलें निरुतें । संतांचें दर्शन जालें भाग्यें बहुतें ॥ ३ ॥ तुका म्हणे धन्य आम्हां जोडली जोडी । संतांचे चरण आतां जीवें न सोडी ॥ ४ ॥

४१९१ धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन ॥ १ ॥ जाली पापा तापा तुटी । दैन्य गेलें उठाउठीं ॥ २ ॥ जालें समाधान । पायीं विसांवलें मन ॥ ३ ॥ तुका म्हणे आले घरा । तोचि दिवाळी दसरा ॥ ४ ॥

४१९२ जडलों तों आतां पायीं । होऊं काई वेगळा ॥ १ ॥ तुम्हीं संतीं कृपा केली । गंगे चाली ओघाची ॥ २ ॥ सांभाळिलें मायबापा । केलें तापावेगळें ॥ ३ ॥ वोरसें या जिव धाला । तुका ठेला मौन्याचि ॥ ४ ॥

४१९३ तुमाचिये दासीचा दास करुनी ठेवा । आशिर्वाद द्यावा हाचि मज ॥ १ ॥ नवविधा काय बोलिली जे भक्ती । द्यावी माझ्या हातीं संतजनीं ॥ २ ॥ तुका म्हणे तुमच्या पायांच्या आधारें । उतरेन खरें भवनदी ॥ ३ ॥

४१९४ आतां तुम्ही कृपावंत । साधु संत जिवलग ॥ १ ॥ गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हासी ॥ २ ॥ वंचिलें तें पायांपाशीं । नाहीं यासी वेगळें ॥ ३ ॥ तुका म्हणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥ ४ ॥

४१९५ गंगा आली आम्हांवरि । संत पाऊलें साजिरीं ॥ १ ॥ तेथें करीन मी अंघोळी । उडे चरणरजधुळी । येती तीर्थावळी । पर्वकाळ सकळ ॥ २ ॥ पाप पळालें जळालें । भवदुःख दुरावलें ॥ ३ ॥ तुका म्हणे धन्य झालों । सप्तसागरांत न्हालों ॥ ४ ॥

४१९६ भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ॥ १ ॥ येथूनियां नुठो माथा । मरणावांचुनि सर्वथा ॥ २ ॥ होईं बळकट । माझ्या मना रे तूं धीट ॥ ३ ॥ तुका आला लोटांगणीं । भक्तिभाग्या जाली धणी ॥ ४ ॥

४१९७ हरिभक्त माझे जिवलग सोइरे । हृदयीं पाउलें धरीन त्यांचीं ॥ १ ॥ अंतकाळीं येती माझ्या सोडवणें । मस्तक बैसणें देईन त्यांसी ॥ २ ॥ आणिक सोइरे सज्जन वो कोणी । वैष्णवां-वाचोनि नाहीं मज ॥ ३ ॥ देइन आलिंगन धरीन चरण । संसारसीण नासे तेणें ॥ ४ ॥ कंठीं तुळसीमाळा नामाचे धारक । ते माझे तारक भवनदीचे ॥ ५ ॥ तयांचे चरणीं घालीन मी मिठी । चाड हें वैकुंठीं नाहीं मज ॥ ६ ॥ अळसें दंभें भावें हारिचें नाम गाती । ते माझे सांगाती परलोकींचें ॥ ७ ॥ काया वाचा मनें देईन क्षेम त्यांसी । चाड जीवित्वासी नाहीं मज ॥ ८ ॥ हारिचें नाम मज म्हणविती कोणी । तया सुखा धणी धणीवरी ॥ ९ ॥ तुका म्हणे तया उप-कारें बांधलों । म्हणऊनि आलों शरण संतां ॥ १० ॥

४१९८ घेसी तरी घेईं संतांची हे भेटी । आणीक ते गोष्टी नको मना ॥ १ ॥ सर्वभावें त्यांचे देव भांडवल । आणीक ते बोल न बोलती ॥ २ ॥ करिसील तो करीं संतांचा सांगात । आणीक ते मात नको मना ॥ ३ ॥ बैससी तरी बैस संतांचे मधीं । आणीक ते बुद्धि नको मना ॥ ४ ॥ जासी तरी जाईं संतांचिया गांवा । होईल विसावा तेथें मना ॥ ५ ॥ तुका म्हणे संत सुखाचे सागर । मना निरंतर धणी घेईं ॥ ६ ॥

४१९९ बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य झाली बुद्धी संचितासी ॥ १ ॥ येणें पंथें माझीं चालिलीं पाउलें । दरूषण झालें संतां पायीं ॥ २ ॥ त्रासिलें दरिद्र दोषां झाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत झाला ॥ ३ ॥ तुका म्हणे झाला अवघा व्यापार । आली वेरझार फळासी हे ॥ ४ ॥

४२०० डौरलों भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ॥ १ ॥ संतसंगें सारूं काळ । प्रेमसुखाचा कल्लोळ ॥ २ ॥ ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥ ३ ॥ नाहीं वैकुंठींचा पांग । धावे कथे पांडुरंग ॥ ४ ॥ मुक्त व्हावें कशासाठीं । कैंचि येणें रसें तुटी ॥ ५ ॥ तुका म्हणे गोड । हेंचि पुरे माझें कोड ॥ ६ ॥

४२०१ जायाचें शरीर जाईल क्षणांत । कां हा गोपिनाथ पावेचिना ॥ १ ॥ तुम्ही संत सारे कृपेचे सागर । निरोप हा फार सांगा देवा ॥ २ ॥ अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायांपें विठ्ठला ठेवी मज ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसी करा निरवण । मग तो रक्षण करील माझें ॥ ४ ॥

४२०२ पायांच्या प्रसादें । कांहीं बोलिलों विनोदें ॥ १ ॥ मज क्षमा करणें संतीं । नव्हे अंगभूत युक्ति ॥ २ ॥ नव्हे हा उपदेश । तुमचें बडबडिलों शेष ॥ ३ ॥ तुमचें कृपेचें पोसणें । जन्मोजन्मीं तुका म्हणे ॥ ४ ॥

४२०३ पडोनिया राहीं । उगाच संतांचिये पायीं ॥ १ ॥ नलगे पुसणें सांगावें । चित्त शुद्ध करी भावें ॥ २ ॥ सहज ते स्थिती । उपदेशपर युक्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे भाव । जवळी धरूनि आणी देव ॥ ४ ॥

४२०४ जेथें जावें तेथें कपाळ सरिसें । लाभ तो विशेष संतसंगें ॥ १ ॥ पूर्वपुण्यें जरी होतीं सानुकूळ । अंतराय मूळ नुपजे तेथें ॥ २ ॥ भाग्य तरी नव्हे धन पुत्र दारा । निकट वास बरा संतांपायीं

॥ ३ ॥ तुका म्हणे हेचि करावी मिरासी । बळी संतापासीं द्यावा जीव ॥ ४ ॥

४२०५ शुद्ध चर्या हेचि संतांचें पूजन । लागताचि धन नाहीं वित्त ॥ १ ॥ सगुणाचे सोई सगुण विश्रांती । आपणचि येती चोजवीत ॥ २ ॥ कीर्तनीचि वोळे कृपेचा वोरस । दुरीपणें वास संनिधता ॥ ३ ॥ तुका म्हणे वर्म सांगतों सवंगे । मन लावा लागें स्वहिताच्या ॥ ४ ॥

४२०६ हरिजनाची कोणा न घडावी निंदा । साहात गोविंदा नाहीं त्याचें ॥ १ ॥ रूपा येऊनियां धरी अवतार । भक्तां अभयकर खळां कष्ट ॥ २ ॥ दुर्वास हा छळों आला आंबऋषी । सुदर्शन त्यासी जाळित फिरे ॥ ३ ॥ द्रौपदिच्या क्षोभें कौरवांची शांती । होऊनी श्रीपती साह्य केलें ॥ ४ ॥ न साहेचि वध्रु पांडवां पारिखा । धुडाविला सखा वळिभद्र ॥ ५ ॥ तुका म्हणे अंगीं राखिली दुर्गंधी । अश्वत्थामा वधी पांडवपुत्रां ॥ ६ ॥

४२०७ संतांचे गुणदोष आणितां या मना । केलिया उगाणा सुकृताचा ॥ १ ॥ पिळोनियां पाहे पुष्पाचा परिमळ । चिरोनि केळी केळ गाढव तो ॥ २ ॥ तुका म्हणे गंगे अग्नीसि विटाळ । लावी तो चांडाळ दुःख पावे ॥ ३ ॥

४२०८ अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ १ ॥ कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ २ ॥ चुकलासा दिसे पंथ । गेले संत तो ऐसा ॥ ३ ॥ तुका म्हणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ॥ ४ ॥

४२०९ तीर्थे फळती काळें जन्में आगळिया । संतदृष्टी पाया हेळामात्रें ॥ १ ॥ सुखाचे सुगम वैष्णवांचे पाय । अंतरींचा जाय महाभेव ॥ २ ॥ काळेंहि न सरे तपें समाधान । कथे मूढजन समाधिस्थ ॥ ३ ॥ उपमा द्यावया सांगतां आणीक । नाहीं तिन्ही लोक

धुंडाळितां ॥ ४ ॥ तुका म्हणे मी राहिलों येणें सुखें । संतसंगे दुःखें नासावया ॥ ५ ॥

४२१० गुरुचिया मुखें होईल ब्रम्हज्ञान । न कळे प्रेमखूण विठोबाची ॥ १ ॥ वेदातें विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ २ ॥ तुका म्हणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥ ३ ॥

४२११ देव ते संत देव ते संत । निमित्य त्या प्रतिमा ॥ १ ॥ मी तो सांगतसें भावें । असो ठावें सकळा ॥ २ ॥ निराकारीं ओस दिशा । येथें इच्छा पुरतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे रोकडें केणें । सेवितां येणें पोट धाय ॥ ४ ॥

४२१२ कृपेचे सागर हेचि साधुजन । तींहीं कृपादान केलें मज ॥ १ ॥ बोबडे वाणीचा केला अंगीकार । तेणें माझा स्थिर केला जीव ॥ २ ॥ तेणें सुखें मन स्थिर झालें ठायीं । संतीं दिला पायीं ठाव मज ॥ ३ ॥ नाभी नाभी ऐसें बोलिले वचन । तें माझें कल्याण सर्वस्वही ॥ ४ ॥ तुका म्हणे झालों आनंदें निर्भर । नाम निरंतर घोष करूं॥ ५ ॥

## श्रीनिळोबामहाराज

४२१३ नित्य वदनीं हरीचें नाम । अंतरी प्रेम विसावलें ॥ १ ॥ त्यांच्या भाग्या नाहीं सीमा । पुरुषोत्तमा प्रिय झाले ॥ २ ॥ आवडती ते सर्वदा हरी । न वचे दुरी पासुनी त्यां ॥ ३ ॥ निळा म्हणे मेघः-श्याम । पुरवी काम सर्व त्यांचें ॥ ४ ॥

४२१४ फळलें तया जन्मांतर । न पडे विसर नामाचा ॥ १ ॥ अत्यादरें हरिची भक्ति । झाली विरक्ति विषयाची ॥ २ ॥ कामक्रोधां गिळिलें शांती । अहंकार समाप्ति मदमत्सरा ॥ ३ ॥ निळा म्हणे अचिंतन । लागलें अनुसंधान हरिरूपीं ॥ ४ ॥

४२१५ सुखाचीच ओतली । मूर्ति याची ठसावली ॥ १ ॥ अवि-

च्छिन्न भगवत्बुद्धी । सर्व भूतीं निरवधी ॥ २ ॥ मोह ममता कैंची आतां । आशा कल्पना हरीच्या भक्तां ॥ ३ ॥ निळा म्हणे सनकादिकां । अनुभव तैसा त्याचा निका ॥ ४ ॥

४२१६ मानापमान संकल्प आशा । तुटला मोहजाळ फांसा ॥ १ ॥ तया गुरुचियां भक्तां । नुरेचि कोठें गोंवा गुंता ॥ २ ॥ सर्वांतरीं आपुलें रूप । देखती नेणतां विकल्प ॥ ३ ॥ निळा म्हणे कर्मातीत । झाले होऊनि कर्मीं रत ॥ ४ ॥

४२१७ नाहीं भिन्नत्व उरलें । अवघ्या अंगें अवघें झालें ॥ १ ॥ नेणती ते मानामान । जन तैसें तयां वन ॥ २ ॥ न लगे साधन त्या संपत्ती । देवचि झाले सर्वाभूतीं ॥ ३ ॥ निळा म्हणे एकाएकी । एकचि होऊनि ठेले लोकीं ॥ ४ ॥

४२१८ तोचि वानिती आनंद । परमानंद अंतरींचा ॥ १ ॥ जनीं लावावया गोडी । कीर्ति परवडी पोकारिती ॥ २ ॥ आपण पावोनियां सुखा । आणिकां हरिखा मेळविती ॥ ३ ॥ निळा म्हणे निगमादिक । ज्याचें कौतुक वानिती ॥ ४ ॥

४२१९ निर्वैरता सर्वाभूतीं । दया शांति आणि करूणा ॥ १ ॥ केली कृपा नारायणें । ऐसीं चिन्हें उमटतां ॥ २ ॥ क्षमा अंगीं निर्मत्सर । वाणी उच्चार नामाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे नम्रता अंगीं । मोहत्यागी ममतेच्या ॥ ४ ॥

४२२० अखंड भूतदया मानसीं । वाचे नाम अहर्निशीं । तया न विसंबे हृषीकेशी । मागें मागें हिंडतसे ॥ १ ॥ जिहीं परकारणीं वेंचिलें । शरीर आयुष्य आपुलें । धन वित्तही वेंचिलें । तयां विठ्ठलें सन्मानिजे ॥ २ ॥ जिहीं गाइलें नित्य नाम । अंतरीं धरूनियां प्रेम । तया वसितसी निजधाम । विसंबूनियां ठेविलें ॥ ३ ॥ जिहीं धरिला संतसंग । दुराविलें त्रिविध जग । तया सखा पांडुरंग । निजानुभवें ओळला ॥ ४ ॥ निळा म्हणे सद्गुरुभक्ति । शास्त्र ब्राह्मणांचे

अनुरक्ती । तयालागीं हा श्रीपती । करी सांगाती आपुला ॥ ५ ॥

४२२१ तेचि संत तेचि संत । ज्यांचा हेत विठ्ठलीं ॥ १ ॥ नेणती कांहीं टाणेटोणे । नामस्मरणां वांचुनीं ॥ २ ॥ काया वाचा आणि मनें । धाले चिंतनें डुलती ॥ ३ ॥ निळा म्हणे विरक्त देहीं । आठवाचि नाहीं विषयांचा ॥ ४ ॥

४२२२ नाहीं तरी संत झकवित कोणा । थोर लहाना सारखेचि ॥ १ ॥ नाहीं तेथें काने कोचे । उपज्या वाचे उच्चार ॥ २ ॥ न लागे पूजनासी धन वित्त । एकचि चित्त भाव पुरे ॥ ३ ॥ निळा म्हणे उपदेश देती । कानीं सांगती विठ्ठल म्हणा ॥ ४ ॥

४२२३ सूर्य न देखे अंधकारा । अग्नि जेवीं शीतज्वरा ॥ १ ॥ तेंवी हरिभक्तां सांकडें । येऊंचि न शके तयापुढें ॥ २ ॥ हनुमंतासी भूतबाधा । नव्हे कल्पांतींही कदा ॥ ३ ॥ निळा म्हणे दत्तात्रया । न बाधी मोह ममता माया ॥ ४ ॥

४२२४ काळ सार्थक केला त्यांनीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ १ ॥ नाम वाचे श्रवणीं कीर्ति । पाऊलें चित्तीं समान ॥ २ ॥ कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥ निळा म्हणे स्वरूप सिद्धी । नित्य समाधि हरिनामीं ॥ ४ ॥

४२२५ संतां ऐसा उदार एक । त्रैलोक्यनायक श्रीविठ्ठल ॥ १ ॥ आणखी नये तुळणें दुजा । धुंडितां समाजा त्रिभुवनीं ॥ २ ॥ ज्याचिया वचनें भवसिंधू नुरे । माया सुरे दुरी पळे ॥ ३ ॥ निळा म्हणे सगुणावतार । तेंचि परात्पर श्रीहरीचें ॥ ४ ॥

४२२६ संत प्रसाद लाधले । तेचि धाले ब्रह्मरसें ॥ १ ॥ सदा नामीं जडली प्रीती । तेचि करिती उच्चार ॥ २ ॥ भक्तिभाग्य वोसंडलें । वैराग्य आलें मोडोनी ॥ ३ ॥ निळा म्हणे अंगीं शांती । क्षमा विश्रांति ज्ञानाची ॥ ४ ॥

४२२७ संतरूपें तुम्हीच धरा । विश्वंभरा अवतार ॥ १ ॥ म्हणोनि

महिमा कीर्ति जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥ २ ॥ बोलवूनि रेडा चालविती भिंती । विमानीं होती उपविष्ट ॥ ३ ॥ निळा म्हणे मानवी तनु । जाती घेऊन वैकुंठा ॥ ४ ॥

४२२८ संतकृपा त्यांसीचि फळे । ज्यांचें चित्त वोळे परमार्थी ॥ १ ॥ काय उणें सुखा मग । संतसंग जोडतां ॥ २ ॥ देवचि हातीं लागे तयां । संत जयां प्रसन्न ॥ ३ ॥ निळा म्हणे संतांपाशीं । आहे अनायासीं सर्व सिद्धी ॥ ४ ॥

४२२९ ध्यानी चिंतनी मानसीं । हरीतें ध्यातां अहर्निशीं । तोचि होवोनियां भक्तराशी । झाले विठ्ठल विठ्ठल ॥ १ ॥ कीटकीं भृंगी ऐसें रूप । तीव्र ध्यानें ते तद्रूप । विष्णु जेवीं शिवस्वरूप । शिवही विष्णु चिंतनें ॥ २ ॥ नर तोचि नारायण । अर्जुनरूपें विलसे कृष्ण । येर येरे विराजमान । करितां ध्यान तद्रूपता ॥ ३ ॥ निरसोनियां अविद्या-जात । देव तैसेचि झाले भक्त । मोह ममता कामातीत । झाले सतत निजध्यासें ॥ ४ ॥ निळा म्हणे अर्धनारी । रूप विलसे वटेश्वरीं । दोनी दाऊनी एक शरीरीं । दोघां नाहीं दोनीपणें ॥ ५ ॥

४२३० संत वृंद प्राप्त ज्यासी । निजात्मसुखासी तो पावे ॥ १ ॥ जेथें उभे संतजन । नारायण समवेत ॥ २ ॥ तया सुखा उणें नाहीं । लोकीं तिहीं पूज्य तो ॥ ३ ॥ निळा म्हणे हरीचे शेष । करीत नाश कल्मषा ॥ ४ ॥

४२३१ पूर्ण कृपा झाली तया । गेलों लगटोनियां निज चरणीं ॥ १ ॥ न देखती ते हरिविण । जनीं जनार्दन कोंदला ॥ २ ॥ आनंदें त्या आळविती । वोसणती हरिनामें ॥ ३ ॥ निळा म्हणे देवाचि झाले । भावा आले तयाचिया ॥ ४ ॥

४२३२ नेणती ते आपपर । विश्वीं झाले विश्वंभर ॥ १ ॥ नाहीं देहाची भावना । करितां नामसंकीर्तना ॥ २ ॥ हरीच्या नामामृतें धाले । गिळूनी ब्रह्मांडा राहीले ॥ ३ ॥ निळा म्हणे अवघ्याचि परी । झाले व्यापक चराचरीं ॥ ४ ॥

४२३३ देखती लोचनीं । निजात्मया अनुदिनीं ॥ १ ॥ त्यांच्या भाग्याचा तो महिमा । नेणे चतुर्मुख ब्रम्हा ॥ २ ॥ हरीसंगें हरीचेंचि रूप । झाली भावना तद्रूप ॥ ३ ॥ निळा म्हणे अवलोकनें । तैसेंचि झाले अंगें मनें ॥ ४ ॥

४२३४ संत वारें आले घरीं । चराचरीं धन्य तो ॥ १ ॥ संत-सेवा घडली ज्यासी । प्रसन्न त्यासी देव सकळ ॥ २ ॥ संतवचनीं विश्वासला । पूज्य तो झाला त्रिभुवनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे संत भेटी । निरसन कोटी संदेहा ॥ ४ ॥

४२३५ भाव भक्ती भाग्यवंत । तयां संत भेटती ॥ १ ॥ येर ते भाग्यें जाती वांयां । न भजतां पाया संतांच्या ॥ २ ॥ वचनीं यांचे विश्वास धरिती । धन्य ते होती उभय लोकीं ॥ ३ ॥ निळा म्हणे या सज्जनापायीं । जीवभाव जिहीं समर्पिला ॥ ४ ॥

४२३६ बहुत भाग्यें भूमंडळा । आले सकळां उद्धराया ॥ १ ॥ वर्तोनियां दाविती लोकां । पाविती परिपाका आणिकांहीं ॥ २ ॥ सहज त्यांचा क्रिडा खेळ । हाचि मंगळ सुखकर्ता ॥ ३ ॥ निळा म्हणे हें साहिलळ । ज्याचिया अढळ धर्मक्रिया ॥ ४ ॥

४२३७ कांहीं करी ना हा करवी । असोनि जीवीं जीव-हीन ॥ १ ॥ संतचि ओळखती यासी । जाणतां आणिकांसी दुर्लभ ॥ २ ॥ बुद्धीचिये पाठीं पोटीं । न देखे शेवटीं बुद्धी तया ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्ता याची । न देखे विरंची आणि रुद्र ॥ ४ ॥

४२३८ हरिरूप ध्यानीं हरिनाम वदनीं । हरिच्या चिंतनीं तद्रूपता ॥ १ ॥ हरि तयां अंतरीं हरि तयां बाहेरी । रक्षी निरंतर श्रीहरी त्यां ॥ २ ॥ हरि तयां आसनीं हरि तयां भोजनीं । हरि तयां शयनीं निद्रा करी ॥ ३ ॥ निळा म्हणे हरि देह गेह दारा । हरी दुजा वारा लागों नेदी ॥ ४ ॥

४२३९ घडो त्याचा समागम । ज्याचें प्रेम विठ्ठलीं ॥ १ ॥ सहज

त्याच्या ऐकतां गोष्टी । परमार्थ पोटीं दृढावे ॥ २ ॥ अनुतापासी दुणीव चढे । वैराग्य वाढे चढोवढी ॥ ३ ॥ निळा म्हणे वाढे भाव । संचरे स्वानुभव निजांगीं ॥ ४ ॥

४२४० म्हणोनियां संतजनां । देती आलिंगना पूजिती ॥ १ ॥ त्यांचिया मुखें ऐकती कथा । मानिती परमार्था फळ आलें ॥ २ ॥ म्हणती आजी धन्य झालों । प्रसाद पावलों संतांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे उत्साह देवा । मानला वैभवा देखोनिया ॥ ४ ॥

४२४१ संतीं सांगितलें मज । आपुलिये गुज अंतरींचें ॥ १ ॥ म्हणती आठवीं पंढरीनाथा । सांडीं वार्ता इतरांची ॥ २ ॥ नको विसंबों तूं यासी । अगाध सुखासी पावसील ॥ ३ ॥ निळा म्हणे सेवा आतां । हेचि प्रसन्नता आमुची ॥ ४ ॥

४२४२ त्याचे पायीं माझी बुद्धी । जडली कधीं न ढळेची ॥ १ ॥ ज्याचे ध्यानीं मनीं हरी । नामें वैखरी उच्चार ॥ २ ॥ नित्य कीर्तनांचे घोष । करिती उल्हास आवडी ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांची गोठी । ऐकतां पोटीं सुख वाटे ॥ ४ ॥

४२४३ अंतरींचें मनोगत । तुम्ही तों संत जाणतसां ॥ १ ॥ तरी वियोग नका आतां । तुमच्या भजना भजनासी ॥ २ ॥ आठव करितां दिवसराती । उल्हास चित्तीं मना द्यावा ॥ ३ ॥ निळा म्हणे कृपाघना । विज्ञापना हे माझी ॥ ४ ॥

४२४४ हेंचि त्यांचें नित्य काम । दावणें धर्म विहिताचे ॥ १ ॥ ज्याचें तया स्वहित जोडे । ऐसें उघडें बोलती ॥ २ ॥ निःसीम पांडुरंगीं भक्ति । उपजे विरक्ति भाविकां ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसी वाणी । वदती पुराणीं प्रतिपाद्य ॥ ४ ॥

४२४५ नित्यानंदाचिया घरा । विवेक पैल तीरा पाववितीं ॥ १ ॥ तेचि सद्गुरु संतजन । निजात्मज्ञान फळदाते ॥ २ ॥ वदनीं वसविली वेदोनीति । स्वधर्म स्थापिती सकळांचे ॥ ३ ॥ निळा म्हणे नेती धामा । वैकुंठग्रामा विश्रांती ॥ ४ ॥

४२४६ धरिती ज्या हातीं संत कृपावंत । पाळी पंढरीनाथ लळा त्याचा ॥ १ ॥ न विसंबे त्या घडी पळ युग मानी । दिसों नेदी जनीं किविलवाणें ॥ २ ॥ पाजी प्रेमपेहे वाहे तया अंकीं । म्हणे हे लाडकी तान्ही माझी ॥ ३ ॥ निळा म्हणे दावी स्वहिताचा पंथ । नेदि त्या आघात येऊं आड ॥ ४ ॥

४२४७ जया नाहीं आपपर । सांगतां विचार स्वहिताचा ॥ १ ॥ जेणें देव जोडे जोडी । दाविती परवडी त्या साचा ॥ २ ॥ संदेहाचे तोडिती पाश । सहज उपदेश बोलणें ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुताप उठी । ऐकतां गोठी भाविका ॥ ४ ॥

४२४८ सुदिन होय साधकांसी । जरी ते अनायासी भेटती ॥ १ ॥ बोध्र प्रतापाची वाणी । गर्जविती गुणीं श्रीहरीच्या ॥ २ ॥ ऐकती त्यांचें हरे पाप । निरसे ताप त्रिविध ॥ ३ ॥ निळा म्हणे भूतळींचे । देवाचि साचे बोलते ते ॥ ४ ॥

४२४९ ऐश्वर्याचीं वचनाक्षरें । वदती मधुरें तत्वदातीं ॥ १ ॥ श्रवण करिती सात्विक लोक । पावती सुख कैवल्य ॥ २ ॥ भोगूनियां नित्यानंदा । सुखें निजपदा लिगटती ॥ ३ ॥ निळा म्हणे हे संत साधु । आर्तबंधु दीनाचे ॥ ४ ॥

४२५० आपणचि ते येती घरा । देखुनि बरा निजभाव ॥ १ ॥ आप्तपणें आलिंगिती । मनीचा पुरविती हेत सकळ ॥ २ ॥ अनाथ अनन्य देखोनी रंक । करिती कौतुक खेळविती ॥ ३ ॥ निळा म्हणे लाविती सेवे । आपुलिया वैभवें गौरविती ॥ ४ ॥

४२५१ मार्ग दाउनी गेले आधीं । दयानिधी संत पुढें ॥ १ ॥ तेणेंचि पंथें चालों जातां । न पडे गुंता कोठें कांहीं ॥ २ ॥ मोडूनियां नाना मतें । देती सिद्धांतें सौरसु ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसे संत । कृपावंत सुखसिंधु ॥ ४ ॥

४२५२ अवलोकिले कृपादृष्टी । केली वृष्टी वचनामृतें ॥ १ ॥ अंकु-

रलें भावबीज । कारण निज अंतरींचें ॥ २ ॥ संतांचि हे सहज स्थिती । आठव देती स्मरणाचा ॥ ३ ॥ निळा म्हणे धांवोनि येती । आणि उपदेशिती निज गुह्य ॥ ४ ॥

४२५३ चोजवीत घरा येती । ज्यांचा देखती शुद्ध भाव ॥ १ ॥ ऐसे करुणाघन हे संत । करिती हेत परिपूर्ण ॥ २ ॥ पाचारुनियां हृदयीं धरिती । निकट बैसविती जवळी त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे अनुभव झाला । तोचि दाविला बोलोनी ॥ ४ ॥

४२५४ हरिभक्त माझे जिवलग सांगाती । सांभाळूनि नेती पर-लोका ॥ १ ॥ वचनेंचि त्यांच्या होय महालाभ । करी पद्मनाभ कृपादृष्टी ॥ २ ॥ मोहादि बंधनें जाती तुटोनियां । कळिकाळ ही पायांतळीं दडे ॥ ३ ॥ निळा म्हणे मुक्त मोकळिया वाटा । जावया वैकुंठा त्यांच्या संगें ॥ ४ ॥

४२५५ अवघ्याचि संपत्ती आलिया घरा । तुमचिया दातारा आगमनें ॥ १ ॥ सीतळ झालों पावन झालों । तुमचिया लागलों चरणासी ॥ २ ॥ धरिलीया जन्माचें सार्थक झालें । तुम्हीं अवलो-किलें म्हणोनियां ॥ ३ ॥ निळा म्हणे धरिलें हातीं । जेव्हांचि संतीं तुम्ही मज ॥ ४ ॥

४२५६ उपायांच्या करितां श्रेणी । परि जेथ कोणी न पवेचि ॥ १ ॥ तया पाववीलों ठाया । संतीं करूनियां निजकृपा ॥ २ ॥ ज्याचे प्राप्ती-लागीं योगी । धांवती मार्गीं सुषुम्नेच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे सिद्ध मुनी । ज्यातें अनुदिनीं चिंतिती ॥ ४ ॥

४२५७ नेणों काय पूर्वार्जित । होतें सुकृत निक्षेपींचें ॥ १ ॥ तेणें हातीं धरूनियां । संतीं ठाया पाववीलों ॥ २ ॥ विटेवरी दाविलें धन । होते पोटाळून महर्षी ज्या ॥ ३ ॥ निळा म्हणे बैसला ध्यानीं । ज्याचिये चिंतनीं सदाशिव ॥ ४ ॥

४२५८ माझें माझे हातीं हीत । दिधलें संत मुनिश्वरीं ॥ १ ॥ काय

उत्तीर्ण होऊं कैसा । उपकारें आकाशा झांकोळिलें ॥ २ ॥ जिहीं पाजिलें अमृत घणी । तयां कांजवणी काय देऊं ॥ ३ ॥ निळा म्हणे रत्न पालटा । सागरगोटा काय तुके ॥ ४ ॥

४२५९ जेणें माझी वाचा अती । आपुल्या कृपें केली सरती ॥ १ ॥ त्याचें उत्तीर्ण होऊं म्हणतां । जीवा जीवपण नुमसे आतां ॥ २ ॥ अवघेंचि त्यांचें घेणें देणें । मी हें माझें कांहींचि नेणें ॥ ३ ॥ निळा म्हणे ठेविलों ऐसा । जळिंचा बुदबुद जळींचि जैसा ॥ ४ ॥

४२६० जेणें छत्र सिंहासन । दिधलें आसन तृणाचें त्या ॥ १ ॥ काय उत्तीर्ण होइजे रंकें । तोंचि स्यां मस्तकें संतचरणा ॥ २ ॥ ज्याचिया कृपें ब्रह्मानंद । पावलों अगाध अक्षयी तो ॥ ३ ॥ निळा म्हणे साम्राज्यें लेणें । लेवविलें ईक्षणें कृपेचिया ॥ ४ ॥

४२६१ उत्तम संचित होतें गांठीं । तेणेंचि या भेटी संतांसवें ॥ १ ॥ सुकृतासी आलीं फळें । भाववळें लगटोनी ॥ २ ॥ त्यांच्या आग्या आलें भाग्यें । लाधले संग संतांचा ॥ ३ ॥ निळा म्हणे पूर्णते आले । जिहीं या सेविलें संतचरण: ॥ ४ ॥

४२६२ कृपा केली संतजनीं । लाविलों भजनीं श्रीहरीच्या ॥ १ ॥ नाहीं तरी जातों वांयां । लक्ष भोगावया चौऱ्यांयशीं ॥ २ ॥ आणिकां साधनीं गुंताचि पडता । अभिमान वाढता नित्य नवा ॥ ३ ॥ निळा म्हणे धांवणें केलें । सुपंथें लाविलें नीट वाटे ॥ ४ ॥

४२६३ धन्य काळ आजिचा दिवस । हरिचे दास भेटले ॥ १ ॥ दंडवत घालीन पायां । करीन काया कुरवंडी ॥ २ ॥ पाप ताप दैन्य गेलें । येथुनी पाउलें देखतां ॥ ३ ॥ निळा म्हणे पावलों फळ । केलिया निर्मळ सुकृतातें ॥ ४ ॥

४२६४ धन्य झालों कृपा केली । भेटी दिधली अवचिती ॥ १ ॥ सांभाळिलें तुम्हीं संतीं । केल्या आर्ती परिपूर्ण ॥ २ ॥ मी तों दीन तुमचा रंक । घातली भीक अभयाची ॥ ३ ॥ निळा म्हणे न भेणें आतां । सन्मुख येतां कळिकाळ ॥ ४ ॥

४२६५ परम सुखाचा सुकाळ । चित्तीं वसे सर्वही काळ ॥ १ ॥ ऐसें केलें कृपादान । तुम्ही मनातें मोहुन ॥ २ ॥ जिवा पैलाडिये खुणे । पावविलें सामर्थ्यें गुणें ॥ ३ ॥ निळा म्हणे ऐसे किती । उपकार वानूं पुढती पुढतीं ॥ ४ ॥

४२६६ भाग्याची उजरी । दिसे यावरी वोढवली ॥ १ ॥ म्हणोनियां कृपावंत । झाले संत मायबाप ॥ २ ॥ पाचारुनी देत मोहें । प्रेमपेहे पाजिती ॥ ३ ॥ निळा म्हणे सांगती कानीं । माझें मज लागुनी स्वहित ॥ ४ ॥

४२६७ भाग्य माझें उभें ठेलें । संतीं दाविलें निधान ॥ १ ॥ आतां उणें कोठें कांहीं । न पडे ठायीं भरलेंसे ॥ २ ॥ जेथें पाहे तेथें आहे । न पाहतांही राहे कवळुनी ॥ ३ ॥ निळा म्हणे व्यापुनी अंतरीं । मग नाहीं बाहेरीं तेचि दिसे ॥ ४ ॥

४२६८ मायबाप उत्तीर्ण होणें । न घडे देणें अपत्या ॥ १ ॥ जरी लक्ष जोडी दिली । तरी ते झाली उपाधी ॥ २ ॥ तैसा आत्मा विश्व प्रसवे । तेणें त्या व्हावें उत्तीर्ण कें ॥ ३ ॥ निळा म्हणे शुद्ध भावें । चरणा जावें लिगटोनी ॥ ४ ॥

४२६९ मी तों संतांचें पोसणें । देती समयीं तेचि खाणें ॥ १ ॥ अवघी चुकली जाचणी । उण्या पुऱ्याची सोसणी ॥ २ ॥ करूं सांगितलें काज । चिंता दवडूनियां लाज ॥ ३ ॥ निळा म्हणे फिटली खंती । जिणें मरणें त्याचे हातीं ॥ ४ ॥

४२७० मस्तक माझा पायांवरी । या वारकरी संतांच्या ॥ १ ॥ प्रतिवर्षी पंढरपुरा । जाती महाद्वारा हरिभेटी ॥ २ ॥ भेटी त्याची इच्छी मन । करिती कीर्तन अनुदिनीं ॥ ३ ॥ निळा म्हणे लोटांगण । घालित जाईन सामोरा ॥ ४ ॥

४२७१ टाळ विणे मृदंगेसी । येती गजरेंसी मिरवत ॥ १ ॥ छत्रिने पताका गरुडटेक । घेउनी हरिखें विलोकिती ॥ २ ॥ म्हणती

जन्म सुफळ झाला । आजि देखिला परात्पर ॥ ३ ॥ निळा म्हणे विठ्ठल हरी । लेखुनी अंतरीं सुखावती ॥ ४ ॥

४२७२ सुकाळ झाला नारीनरां । चराचरां मुक्तीचा ॥ १ ॥ विठोबाच्या दर्शनमात्रें । ऐकतां श्रोते गुण त्याचे ॥ २ ॥ नित्य नवाचि उत्साह वाटे । हृदयीं न संडे आनंद तो ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदोद्धारा । उपाय वरा योजिला हा ॥ ४ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४२७३ ब्रह्ममूर्ती संत जगीं अवतरले । उद्धरावया आले दीन जनां ॥ १ ॥ ब्रह्मादिक त्यांचे वंदिती पायवणी । नाम घेतां वदनीं दोष जाती ॥ २ ॥ हो कां दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरीत उद्धरती ॥ ३ ॥ अखंडित नामा त्यांची वास पाहे । निशिदिनीं ध्याय सत्संगती ॥ ४ ॥

४२७४ कर्दळीं फळ कर्पूर परिमळें भिन्न । परि दोहींचे जन्म ते एकत्र जाण । आत्मा कीं परमात्मा अभेद कीं भिन्न । चंद्र सोमकांत शून्य महाशून्य ॥ १ ॥ सूय सूर्यकांतु प्रकाश एकु । साधुसंत आराति रावो ना रंकु ॥ २ ॥ भ्रमरांच्या कुंजी मकरंद उधळती । असाध्य साधनीं लागल्या जोती । लयाचें लक्ष हारपली स्थिती । म्हणोनि साधुचरणीं नित्य पंचारती ॥ ३ ॥ गोदेचा उगमु तो ठाईच्या ठायीं । आणिकें उदकें तीं चाली प्रवाहीं । तैसी साधुसंत कृपा उन्मत्त देहीं । सागरा भेटली क्षीरसिंधु तेही ॥ ४ ॥ सागरींचे उदक जगा निववीत । निवळूनि मागुतें पूर्ण भरीत । तैसे अंतरींचें नीर ओघें हे साधुसंत । परि सागरा अंतरीं न वर्णवे मुक्त ॥ ५ ॥ तेथें अनुपम्या ऐकीजे शब्दाची रचना । हें जाणतेनो जाणा अमृतखुणा । हें रत्न कीं माणीक ऐसें अनुमाना । तें पानबुडिया परसोबा लाधलें निधाना ॥ ६ ॥ दुधावरिल साय वरी साखर मेळवणी । जैसी जिव्हा लोधली मधु लागुनि । तेथील गोलता तें

रहस्य लागलें ध्यानीं । तें परसोबा लाधलें येरां मुखीं भुलवणी ॥ ७ ॥ तापलें लोहो तेणें शोखियेलें जीवन । तैसें अंतरीं निवालें आपोआप आपण । परसा भागवत हे सकळांचें जीवन । विष्णुदास नामा त्याचे चरणींचें रजरेण ॥ ८ ॥

४२७५ सांडोनि नित्य नेम कर्म । बोलती कळिकाळाचें वर्म ॥ १ ॥ नामधारक नामाचें । झाले डिंगर केशवाचें ॥ २ ॥ टाळ मृदंग वाजती । टके पताका शोभती ॥ ३ ॥ कंठीं तुळशीच्या माळा । वज्र पंजराचा टिळा ॥ ४ ॥ शंख चक्र मुद्रा धरणें । अंगीं मिरवती भूषणें ॥ ५ ॥ संतरज उधळले । तेणें सर्वांग डवरलें ॥ ६ ॥ सहस्रनामें गर्जित । तेणें पळाले यमदूत ॥ ७ ॥ नामा म्हणे ते माझे सखे । स्वामी विठोबासारिखें ॥ ८ ॥

४२७६ सर्वांभूतीं पाहे एक वासुदेव । पुसोनियां ठाव अहंतेचा ॥ १ ॥ तोचि संतसाधू ओळखावा निका । येर ते आइका मायावद्ध ॥ २ ॥ देखिलिया धन मृत्तिकेसमान । नवविधा रत्नें जैसे धोंडे ॥ ३ ॥ काम क्रोध दोघे घातले बाहेरी । शांति क्षमा घरीं राबवीत ॥ ४ ॥ नामा म्हणे नाम गोविंदाचें वाचे । विसंबेना त्याचे क्षण-मात्र ॥ ५ ॥

४२७७ आशा नाहीं ज्याला । देव कामारी तयाला ॥ १ ॥ जेव्हां सुखाची उन्नति । मोह पायासी लागती ॥ २ ॥ सर्वां चित्तीं सम-भाव । सर्व मानीं वासुदेव ॥ ३ ॥ नामा म्हणे अंगीं प्रेम । मुखीं विठोबाचें नाम ॥ ४ ॥

४२७८ धन्य महाराज जन्मले संसारीं । जे ध्याती अंतरीं नारा-यणा ॥ १ ॥ नारायण गाय नारायण ध्याय । धन्य त्यासी माय प्रसवली ॥ २ ॥ प्रसवली तया कुळाचा उद्धार । तो तरे निर्धार नामा म्हणे ॥ ३ ॥

४२७९ सदा विचरती जनीं वनीं रानीं । मुखीं चक्रपाणी जप-

तसे ॥ १ ॥ विरक्तिची मात असे कोण्या गुणें । नामाचें चिंतन योगिराज ॥ २ ॥ तेव्हां योगियासीं कीर्तनाचा ध्यास । मुक्ति चारी त्यास॰हात जोडी ॥ ३ ॥ पंढरीस उभा राहे पांडुरंग । तीर्थ चंद्रभागा नामा म्हणे ॥ ४ ॥

४२८० जयाचेनि तिर्थां आलें तीर्थपण । केली साठवण हृदयीं ती ॥ १ ॥ नवल महिमा हरिदासां जीवीं । तीर्थं उपजवी त्यांचे कुसीं ॥ २ ॥ वाराणसी प्राणी मरे अंतीं कोणी । तया चक्रपाणी नामें तारी ॥ ३ ॥ नामा म्हणे तीर्थें तया येती भेटी । वोळंगती दृष्टी त्रिभुवना ॥ ४ ॥

४२८१ गौतम वसिष्ठ आणि विश्वामित्र । भारद्वाज अत्रि कश्यपादि ॥ १ ॥ वळी हनुमंत बिभिषण नळ । ध्रुव अजामिळ वाल्हा श्रेष्ठ ॥ २ ॥ उद्धव अर्जुन अंगद अगस्ति । सर्वांभूतीं भक्तिभाव ऐक्य ॥ ३ ॥ नामा म्हणे सदा साधु संतजन । जनीं जनार्दन आम्हां एक ॥ ४ ॥

४२८२ तोचि पुराणीक जो होय कृतार्थ । विषयीं विरक्त विधि पाळी ॥ १ ॥ मानी तो हरिदास ज्या नामीं विश्वास । सर्वस्वें उदास देहभावीं ॥ २ ॥ नामा म्हणे ऐसे संत भेटावे गा देवा । त्यालागीं केशवा हृदय फुटे ॥ ३ ॥

४२८३ एक भानु अवघा सृष्टीचा सोहळा । व्यापूनि सकळा आकाशासी ॥ १ ॥ पवनासिंधूवरी मन वेगें पाखरी । मार्गु षट्चक्रीं वैकुंठासी ॥ २ ॥ तोचि भोगी सुख चिदानंदी वासू । संतसंगें प्रकाशु सफळ मग ॥ ३ ॥ नामा म्हणे यासी गुरुकृपा पाहिजे । संतसंगें पाविजे केशवचरण ॥ ४ ॥

४२८४ धन्य तोचि देश जेथें संतवास । तापत्रय दोष जाती सत्य ॥ १ ॥ धन्य मातापिता उभयकुळशुद्धता । तोचि भजे संतां निर्धारेसी ॥ २ ॥ तीर्थरूपींजळ विलंबें करी निर्मळ । संतदर्शनें

तात्काळ शुद्ध होती ॥ ३ ॥ धातुमय मूर्ती चिरकाळें फळती । संतांचे संगतीं निजस्वार्थ ॥ ४ ॥ नामा म्हणे मुक्ती जे नर इच्छिती । संतांचे संगती धरती भाव ॥ ५ ॥

४२८५ संतसंगतीचें काय सांगूं सुख । आपण पारिखें नाहीं तेथें ॥ १ ॥ साधु थोर जाणा साधु थोर जाणा । साधु थोर जाणा कलीयुगीं ॥ २ ॥ इहलोकीं तोचि सर्वांभूतीं सम । शरीराचा भ्रम नेणे कदा ॥ ३ ॥ नामा म्हणे गाय दूध एक सरे । साधु निरंतर वर्ते तैसा ॥ ४ ॥

४२८६ परिसाचेनि संगें लोह होय सुवर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ १ ॥ कीटकी ध्यातां भृंगी झाला तोचि वर्ण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ २ ॥ वनस्पति परिमळु चंदन झाला जाण । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ३ ॥ अग्निस मिळे तें नये परतोन । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ४ ॥ सरिता ओघ जाय सिंधूसि मिळून । तैसा भेटे नारायण संतसंगें ॥ ५ ॥ नामा म्हणे केशवा मज देईं संतसंग । आणिक कांहीं तुज न मागें बापा ॥ ६ ॥

४२८७ सुख सांगावें संतांपुढें । जेणें सुख अधिक वाढे ॥ १ ॥ आणिक न करावें शहाणें । प्रेम दिठावेल झणें ॥ २ ॥ खंडितां कल्पनेचा लाग । त्यासी असावा अनुराग ॥ ३ ॥ तोडितां वासनेचा तंतु । त्यासि असावा एकांतु ॥ ४ ॥ गिळिलें अहंतेचें बीज । त्याचे व्हावें चरणरज ॥ ५ ॥ नामा म्हणे त्याचे संगतीं । चित्त आपेंआप येईल निवृत्ती ॥ ६ ॥

४२८८ वासनाविरहीत होवोनि एकवट । असावें निकट संतसंगें ॥ १ ॥ हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । करावें दास्यत्व हरिभक्तांचें ॥ २ ॥ नामा म्हणे केशवा तरीच शरणांगत । नाहीं तरी पतित म्हणा मातें ॥ ३ ॥

४२८९ भस्म तो होतसे आला जो आकारा । नासे प्रपंच सारा ।

नाममय ॥ १ ॥ झाला अनुभव प्रपंचींच ब्रम्ह । मना झाला निश्चय संतकृपें ॥ २ ॥ म्हणोनियां संतां जावोनी शरण । साधूनि निजधन नामब्रम्ह ॥ ३ ॥ नामदेव म्हणे संतांचेनि कृपें । हृदयीं नाम सोपें नांदतसे ॥ ४ ॥

४२९० संतांच्या चरणा द्यावें आलिंगन । जीवें निंबलोण उतरावें ॥ १ ॥ तेथें तूं निश्चळ राहे माझ्या मना । मग तुज यातना नव्हती कांहीं ॥ २ ॥ संतांचे द्वारींचा होई द्वारपाळ । तुटे मायाजाळ मोहपाश ॥ ३ ॥ संतांचे प्रसाद सेविसी उरले । आयुष्य सरलें दुणावेल ॥ ४ ॥ नामा म्हणे संत आहेत कृपासिंधु । देती भक्तिबोधु प्रेमसुख ॥ ५ ॥

४२९१ संतांचें लक्षण ओळखावया खूण । जो दिसे उदासीन देहभावा ॥ १ ॥ सतत अंतरीं प्रेमाचा जिव्हाळा । वाचे वसे चाळा रामकृष्ण ॥ २ ॥ त्या संतांचे चरण देखिले मी दृष्टीं । जळती कल्पकोटी पापराशी ॥ ३ ॥ ज्याच्या हृदयीं प्रेमाचा जिव्हाळा । जीवें भावें गोपाळा न विसंबती ॥ ४ ॥ त्याचे अंगणींचा होईन सांडोवा । मग तूं केशवा नुपेक्षिसी ॥ ५ ॥ तुझ्या ध्यानीं ज्याचें सदा भरलें मन । विश्व तूंचि म्हणोन भजती भावें ॥ ६ ॥ त्याच्या उष्टावळीचा होईन मागता । तरीच पंढरीनाथा भेटी देसी ॥ ७ ॥ ऐसें नित्यानंदें बोधें जे निवाले । ते जीवा वेगळे न करी नाम्या ॥ ८ ॥

४२९२ माझे मायबाप साधुसंतजन । माझे जीवप्राण अंतरींचें ॥ १ ॥ भवभयाहूनि तारियेलें मज । बाळे भोळे गुज प्रेम दावी ॥२॥ रंकाहूनि रंक झालों मी सेवक । ब्रह्मादिक देख इच्छिती सुख ॥ ३ ॥ नामा म्हणे संतभाग्य अलौकिक । शुद्ध निष्कलंक पुण्यरूप ॥ ४ ॥

४२९३ आकल्प आयुष्य व्हावें तयां कुळा । माझिया सकळां हरिच्या दासां ॥ १ ॥ कल्पनेची बाधा न हो कोणें काळीं । ही संतमंडळी सुखी असो ॥ २ ॥ अहंकाराचा वारा न लागो राजसां ।

माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥ नामा म्हणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

४२९४ आजी महासुखें सृष्टी भरली भाग्यवंती । जालीसे विकृती पापा तापा ॥ १ ॥ चालिले देखोनि वैष्णव जगजेठी । उभविती वैकुंठीं गुढिया देव ॥२॥ आले आलेरे हरीचे डिंगर । वीर वारीकर पंढरीचे ॥ ३ ॥ ज्यांची चरणधुळी उधळे गगनपंथें । ब्रम्हादिकां तेथें जाली दाटी ॥ ४ ॥ एकमेकांपुढें उडविती माथे । म्हणती आम्हातें लागो रज ॥ ५ ॥ भक्ति प्रेम भाव भरले ज्यांच्या अंगीं । नाचती हरिरंगीं नेणती लाजु ॥ ६ ॥ हर्षें निर्भर चित्तीं आनंदें डोलती । हृदयीं कृष्णमूर्ती भेटों आली ॥ ७ ॥ कोंदलें हरिरूप देखती विश्वाकार । सुटले पाझर नयनकमळीं ॥ ८ ॥ गुढिया रोमांकुरीं सात्विकें दाटले । गर्जती विठ्ठले नामघोष ॥ ९ ॥ मोरपिसा कुंचे भाट गरुड टके । भार ते नेटके मिरविताती ॥ १० ॥ तेथें केशवाचे नामें तनु हे तुळिका केली । पायघडी घातली हरिच्या दासा ॥ ११ ॥

## श्रीजनाबाई

४२९५ संतांचा तो संग नव्हे भलतैसा । पालटावी दशा तात्काळिक ॥ १ ॥ चंदनाचे संगें पालटती झाडें । दुर्बळ लांकडें देवामाथां ॥ २ ॥ हें कां ऐसें व्हावें संगती स्वभावें । आणिके न पालटावें देहालागीं ॥ ३ ॥ तैसा निःसंगाचा संग अग्रगणी । जनी ध्याय मनीं ज्ञानेश्वरा ॥ ४ ॥

४२९६ पंढरीचा वारकरी । त्याचे पाय माझे शिरीं ॥ १ ॥ हो कां उत्तम चांडाळ । पायीं ठेवीन कपाळ ॥ २ ॥ वंद्य होय हरिहरा । सिद्धमुनि ऋषीश्वरा ॥ ३ ॥ मुखीं नाम गर्जे वाणी । म्हणे नामयाची जनी ॥ ४ ॥

४२९७ संतभार पंढरींत । कीर्तनाचा गजर होत ॥ १ ॥ तेथें

असे देव उभा । जैशी समचरणांची शोभा ॥ २ ॥ रंग भरे कीर्तनांत । प्रेमें हरिदास नाचत ॥ ३ ॥ सखा विरळा ज्ञानेश्वर । नामयाचें जो जिव्हार ॥४॥ ऐशा संतां शरण जावें । जनी म्हणे त्याला ध्यावें ॥५॥

## श्रीएकनाथमहाराज

४२९८ पूर्वपुण्य असतां गांठीं । संत भेटी तैं होय ॥ १ ॥ धन्य धन्य संतसंग । फिटे पांग जन्माचा ॥ २ ॥ चार सहा वंदिती पाय । आणिकां ठाव कोठें नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संत । कृपावंत सुखसिंधु ॥ ४ ॥

४२९९ बहुत जन्मांचें सुकृत । तयासी घडत संतसंग ॥ १ ॥ धन्य वैष्णव भूमंडळीं । दरुशन मेळीं जीव तरती ॥ २ ॥ एकाजनार्दनीं विश्वास । निजदास संतांचा ॥ ३ ॥

४३०० बहु पुण्य होय गांठीं । तरीच भेटी संतांची ॥ १ ॥ पाप ताप दैन्य गेलें । संत पाऊलें देखतां ॥ २ ॥ मोक्ष मुक्ति साधे फुका । ऐशी देखा संतकृपा ॥ ३ ॥ नाहीं आणिकाचे भेव । संत सदैव भेटतां ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं संत । पुरविती हेत सर्वही ॥ ५ ॥

४३०१ संत भेटीचा आनंदु । सुखसागर परमानंदु । गातां नुरेची भेदु । नामस्मरणें ॥ १ ॥ कैवल्याचे अधिकारी । मोक्ष राबे त्यांचे घरीं । ऋद्धिसिद्धि कामारी । कोण त्यां पुसे ॥ २॥ भुक्ति आणि मुक्ति । सदा तिष्ठे अहोरात्रीं । कैवल्यपद येती । सामोरी तयासी ॥ ३ ॥ नाम गाती जे आनंद । हृदयीं नाहीं दुजा भेद । एका जनार्दनीं छंद । तयांचा मज ॥ ४ ॥

४३०२ देवाचे सोईरे संत ते जाणावें । यापरतें जीवें नाठवीं कोणा ॥ १ ॥ पडतां संकट आठवितसे संतां । त्याहूनि वारिता नाहीं दुजा ॥ २ ॥ म्हणोनि घरटीं फिरे तया गांवीं । सुदर्शनादि मिरवी आयुधें हातीं ॥ ३ ॥ लाडिके डिंगर वैष्णव ते साचे । एका जनार्दनीं त्यांचे वंदी पाय ॥ ४ ॥

४२०३ संत मायबाप म्हणतां । लाज वाटे बहु चित्ता ॥ १ ॥ मायबाप जन्म देती । संत चुकविती जन्मपंक्ति ॥ २ ॥ मायबापांपरीस थोर । वेदशास्त्रीं हा निर्धार ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । संत शोभती मुकुटमणी ॥ ४ ॥

४२०४ उद्धवा तूं धरीं संतसमागम । तेणें तुटे भवश्रमरे उद्धवा ॥ १ ॥ सांगतसे तुज मनीं धरीरे उद्धवा । आणीक श्रम वायां न करीं रे उद्धवा ॥ २ ॥ योगयागतप व्रत कसवटी । न करी आन गोष्टी रे उद्धवा ॥ ३ ॥ कीर्तन भजन सर्वभावें करीं । जाई संतद्वारीं शरणांगतरे उद्धवा ॥ ३ ॥ मनींचे निजगुज सांगितलें तुज । एकाजनार्दनीं निज साधेरे उद्धवा ॥ ५ ॥

४२०५ मज तयांची आवड । पुरवणें लागे त्यांचे कोड । गर्भवास सांकड । तयालागीं उद्धवा ॥ १ ॥ घेऊनि अवतार । करी दुष्टांचा संहार । माझा हा बडिवार । तयांचेनि उध्द्वा ॥ २ ॥ माझें जप तप अनुष्ठान । देवपुजा मंत्र पठन । नाना नेमादि साधन । संत माझे उघ्द्वा ॥ ३ ॥ मज आणिलें नामरूपा । त्यांची मजवर कृपा । दाविला हो सोपा । मार्ग मज उध्द्वा ॥ ४ ॥ माझा योगयाग सर्व । संत माझें वैभव । वैकुंठादि राणीव । तयाचेनि मज उद्धवा ॥ ५ ॥ ऐसे वसिष्ठ पावन । पुनीत केलें मज लागून । एकाजनार्दनीं शरण । तयांसीच उध्द्वा ॥ ६ ॥

४२०६ देवाचे ते आप्त जाणावे ते संत । त्यांचे चरणीं रत व्हावें सर्वदा ॥ १ ॥ श्रीहरिची भेटी सहजची होय । श्रमलिया जाय क्षणमात्रें ॥ २ ॥ पापाचे पर्वत भस्म नामाग्नींत । अभक्ता न कळे हित नाम न घेती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संताचिया कृपें । नाम होय सोपें कृपें त्यांच्या ॥ ४ ॥

४२०७ ज्ञान ध्यान जप तप तें साधन । ते हे संतनिधान सखे माझे ॥ १ ॥ संतांपायी आधीं जावें वो शरण । संसार बोळवण होय

तेणें ॥ २ ॥ तयाचें हें मूळ संतांचे पाय । आणीक उपाय नाहीं नाहीं ॥३॥ द्वैत अद्वैताचा नसरेचि कोंभ । तो हाचि स्वयंभ संतसंग ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं परब्रम्ह नाम । द्वैत क्रियाकर्म तेथें नाहीं ॥५॥

४३०८ संतांवांचोनियां नाम नये हातां । साधनें साधितां कोटी जाणा ॥ १ ॥ जैसें कांतेविण करणें संसार । साधन विचार व्यर्थ ठेला ॥ २ ॥ संतसमागम धरलियावांचूनी । संसार सांडणी नोहे बापा ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संतांसी शरण । रिघालिया जाण देव जोडे ॥ ४ ॥

४३०९ संत ते देव देव तें संत । ऐसा हेत दोघांचा ॥ १ ॥ देव तें संत संत ते देव । हाचि भाव दोघांचा ॥ २ ॥ संतांविण देवा कोण । संत ते जाण देवासी ॥ ३ ॥ फळपुष्प एका पाठीं । एकाजनार्दनीं राहटी ॥ ४ ॥

४३१० संत आधीं देव मग । हाचि उगम आणा मना ॥ १ ॥ देव निर्गुण संत सगुण । म्हणोनि महिमान देवासी ॥ २ ॥ नामरूप अचिंत्य जाण । संतीं सगुण वर्णिलें ॥ ३ ॥ मुळीं अलक्ष लक्षा नये । संतीं सोय दाविली ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं संत थोर । देव निर्धार धाकुला ॥ ५ ॥

४३११ संतांपोटीं देव वसे । देवापोटीं संत असे ॥ १ ॥ ऐसा परस्परें मेळा । देव संतांचा अंकिला ॥ २ ॥ संतांठाईं देव तिष्ठे । देव तेथें संत वसे ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत । देव तयाचा अंकित ॥ ४ ॥

४३१२ ज्या सुखा कारणें देव वेडावला । वैकुंठ सांडुनी संतसदनीं राहीला ॥ १ ॥ धन्य धन्य संतांचें सदन । जेथें लक्ष्मीसहीत शोभे नारायण ॥ २ ॥ सर्व सुखांची सुखराशी । संतचरणीं भुक्ति मुक्ति दासी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पार नाहीं सुखा । म्हणोनि देव भुलले देखा ॥ ४ ॥

४३१३ अमृता उणें आणिती संतजन । नाम अमृत खूण पाजिताती ॥ १ ॥ नाशिवंत यासी अमृत उपकार । अनाशिवंता नामामृतसार ॥ २ ॥ नाशिवंत देह नाशिवंत जीव । नाशिवंत ठाव जगडंबर ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतांचिये दृष्टी । नाशिवंत सृष्टी सजीव होती ॥ ४ ॥

४३१४ जें सुख संत सज्जनाचे पायीं । तें सुख नाहीं आणिके ठाईं ॥ १ ॥ तुकितां या सुखाचेनी तुकें । पैं वैकुंठ झालें फिकें ॥ २ ॥ पाहों जातां लोकीं तिहीं । ऐसें न देखों आणिके ठाईं ॥ ३ ॥ नवल या सुखाची गोडी । हरिहर ब्रह्मा घालिती उडी ॥ ४ ॥ क्षीरसागर सांडोनी पाही । अंगें धांवे शेषशाई ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं झाली भेटी । सुख संतोषा पडली मिठी ॥ ६ ॥

४३१५ बाळकाची बोबडी वाणी । ऐकोनि जननी संतोषे ॥ १ ॥ तैसें तुम्हीं कृपाळें । पाळिले लळे संतजनीं ॥ २ ॥ बाळाचे जे जे अपराध । माता न करी तयासी क्रोध ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । मिळविलें गुणी आपुलिया ॥ ४ ॥

४३१६ संत चरणींचे रजःकण । तेणें तिन्ही देव पावन ॥ १ ॥ ऐसा महिमा ज्याची थोरी । वेद गर्जे परोपरी ॥ २ ॥ शास्त्रें पुराणें सांगत । दरुशनें प्राणी होती मुक्त ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । ठाव द्यावा संत चरणीं ॥ ४ ॥

४३१७ सर्वांगीं सुवास परि तो उगला न राहे । सभोंवते तरुवर चंदन करीतचि जाये ॥ १ ॥ धणी धाय परी त्याची भुक्ति न धाये । सागर भरिता परि त्या सरिता समाये ॥ २ ॥ वैरागरमणी पूर्ण तेजाचा होय । भेटतां हरळ हिरे करीतचि जाय ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं पूर्ण झालासे निज । आपणासारिखें परी ते करीतसे दुजें ॥ ४ ॥

४३१८ संत केवळ घातकी पाहीं । परी तयासी पातक नाहीं

॥ १ ॥ निजबोधाचे करूनी फांसे । दोघे गोसावी मारिले कैसे ॥ २ ॥ अती खाणोरिया कर्म करी । दिवसा जाळिले गांव चारी ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घातकी मोठे । त्यांसी अंतक केवीं भेटे ॥ ४ ॥

४३१९ भाग्यवंत संत होती । दीन पतित तारिती ॥ १ ॥ उपदेश विठ्ठल मंत्र । देती सर्वत्र सारिखा ॥ २ ॥ स्त्रिया शूद्र अथवा बाळें । कृपा कल्लोळें एकचि ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं शरण । पतितपावन संत होती ॥ ४ ॥

४३२० आदि अंत नाहीं जयाचे रूपासी । तोचि संतांपाशीं तिष्ठतसे ॥ १ ॥ गातां गीतीं सावडें भावें तें कीर्तन । तेथें नारायण नाचतसे ॥ २ ॥ योगियांचीं ध्यानें कुंठित राहिलीं । संतनामामृतवल्ली गोड वाटे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संतसेवा जाण । घडती कोटी यज्ञ स्मरणमात्रें ॥ ४ ॥

४३२१ धन्य तेचि संत भक्त भागवत । हृदयीं अनंत नित्य ज्यांच्या ॥ १ ॥ धन्य त्यांची भक्ति धन्य त्यांचे ज्ञान । चित्त समाधान सर्वकाळ ॥ २ ॥ धन्य तें वैराग्य धन्य उपासना । जयाची वासना पांडुरंगीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धन्य तेचि संत । नित्य ज्यांचें आर्त नारायणीं ॥ ४ ॥

४३२२ संतांसी जो निंदी देवासी जो वंदी । तो नर आपदीं आपदा पावे ॥ १ ॥ देवासी जो निंदी संतांसी जो वंदी । तो नर गोविंदीं सरता होय ॥ २ ॥ कृष्णा कंस द्वेषी नारदा सन्मानी । सायुज्यसदनीं पदवी पावे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं गुज सांगे कानीं । रहा अनुदिनीं संतसंगे ॥ ४ ॥

४३२३ हरि प्राप्तीसी उपाय । धरावे संतांचे ते पाय ॥ १ ॥ तेणें साधती साधनें । तुटती भवाचीं बंधनें ॥ २ ॥ संतांविण प्राप्ति नाहीं । ऐसी वेद देत ग्वाही ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं संत । पूर्ण करिती मनोरथ ॥ ४ ॥

४३२४ संतचरणरज वंदुनी तत्वतां । सायुज्यमुक्ति माथां पाय देऊं ॥ १ ॥ थोरीव थोरीव संतांची थोरीव । आणिक वैभव कांहीं नेणें ॥ २ ॥ संतांपरतें दैवत नाहीं जया चित्तीं । तोचि एक पूर्ण स्थिति ब्रह्मज्ञानी ॥ ३ ॥ संत तेचि देव जयांची वासना । एकाजनार्दनीं भावना नाहीं दुजी ॥ ४ ॥

४३२५ धन्य आजि दिन संत दरुशनाचा । अनंत जन्मींचा शीण गेला ॥ १ ॥ मज वाटे त्यांसी आलिंगन द्यावें । कदा न सोडावे चरण त्यांचे ॥ २ ॥ त्रिविध तापांची झाली बोळवण । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घडो त्यांचा संग । न व्हावा वियोग जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

४३२६ अनुपम्य सुख संतांचिया पायीं । राहीन तये ठाईं अखंडित ॥ १ ॥ अखंडित गोडी सेवीन आवडी । ब्रह्मादिकां जोडी ऐशी नाहीं ॥ २ ॥ सर्व पर्वकाळ आले तया ठाया । विश्रांति घ्यावया इच्छिताती ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं सुखाचें माहेर । भवसिंधुपार तारक हे ॥ ४ ॥

४३२७ एकविध भाव संतांच्या चरणीं । घेईन पायवणी धणीवरी ॥ १ ॥ आनंदें चरण धरीन आवडी । हीच माझी जोडी सर्व जाणा ॥ २ ॥ उतराई तयांच्या नोहे उपकारा । धाडिती माहेरा निजाचिया ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं घडतां त्यांचा संग । जन्म मरण पांग तुटे मग ॥ ४ ॥

४३२८ संत भलते याती असो । परी विठ्ठल मनीं वसो ॥ १ ॥ तया घालीन लोळणी । घेईन मी पायवणी ॥ २ ॥ ज्ञाती कुळासी संबंध । मज नाहीं भेदाभेद ॥ ३ ॥ भलते ज्ञातीचा । विठ्ठल उच्चारी वाचा ॥ ४ ॥ तेणें पावन देह चारी । एकाजनार्दनीं निर्धारीं ॥ ५ ॥

४३२९ संत जाती हरिकीर्तना । त्यांच्या वाहीन मोचे वाहाणा ॥ १ ॥ हेंचि भवसिंधूचें तारूं । तेणें उतरूं पैल पारू ॥ २ ॥ जन्मो-

जन्मांचें भेषज । तें हे संतचरण रज ॥ ३ ॥ संत चरणींच्या पादुका । जाहला जनार्दन एका ॥ ४ ॥

४३३० धन्य दिवस जाहला । संत समुदाव भेटला ॥ १ ॥ कोडें फिटलें जन्माचें । सार्थक जाहलें पैं साचें ॥ २ ॥ आज दिवाळी दसरा । संतपाय आले घरा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं जाहला । धन्य दिवस तो भला ॥ ४ ॥

४३३१ संतांचिये पायीं मज पैं विश्रांति । नाहीं माया भ्रांति तये ठाईं ॥ १ ॥ सांगतों तें मनीं धरावें वचन । संतांसी शरण जावें सुखें ॥ २ ॥ संत तुष्टलिया देवा आनंद होय । मागें मागें धांवे तया पाठीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं माहेर सुखाचें । घेतलीया वाचे संत-नाम ॥ ४ ॥

४३३२ संतजनाची मिळाली मिळणी । रामनामाची भरली भरणी ॥ १ ॥ रामनाम सेवा हा राम सांठवा । परमानंदाचा लाभ झाला जीवा ॥ २ ॥ कीर्तनाचें तारूं लाधलें । रामनाम केणें संवगलें ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं रामनाम सेवा । परमानंदाचा लाभ जाला जीवा ॥ ४ ॥

४३३३ संतद्वारीं कुतरा झालों । प्रेमरसासी सोकलों ॥ १ ॥ भुंकत भुंकत द्वारा आलों । ज्ञान थारोळ्या बैसलों ॥ २ ॥ कुतरा भुंकत आला हिता । संतीं हात ठेविला माथां ॥ ३ ॥ कुतऱ्या गळ्याची सांखळी । केली संतांनीं मोकळी ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं कुतरा । दांत पाडुनी केला बोथरा ॥ ५ ॥

४३३४ आले आले हरिचे दास । मुखीं रामनाम घोष । तोडो-नियां भवपाश । जीवन्मुक्त ते ॥ १ ॥ वैराग्याचें कवच अंगीं । नाचताती प्रेमरंगीं । ज्ञान शस्त्र ते निसंगीं । छेदिती संग ॥ २ ॥ अनुभव तीक्ष्ण शर । सोडिताती निरंतर । वर्मीं खोचले ते वीर । क्रोधादि असुर ॥ ३ ॥ सांडोनि देहाभिमान । तोचि जीवन्मुक्त जाण । एकाजनार्दनीं शरण । रामकृष्ण जपताती ॥ ४ ॥

४३३५ भुक्ति मुक्तीचें माहेर । संत उदार असती ॥ १ ॥ देव ज्यांचें करी काम । देतो धाम आपुलें ॥ २ ॥ तया वचनाची पाहे वास । पुरवी सौरस मनींचा ॥ ३ ॥ एकाजनार्दनी विनित । संत-चरण रज वंदीत ॥ ४ ॥

४३३६ संतांचें सुख जिहीं अनुभविलें। ते जीवन्मुक्त झाले जन्मोजन्मीं ॥ १ ॥ संतांचा संग जयासी हो जाहला । प्रत्यक्ष घडला सत्यलोक ॥ २ ॥ एकाजनार्दनीं संतांचा अनुभव । धाला माझा जीव परमानंदें ॥ ३ ॥

४३३७ पहातां संत समुदाय । भुक्ति मुक्ति तेथें देव ॥ १ ॥ जातां लोटांगणीं भावें । ब्रह्मज्ञान अंगें पावें ॥ २ ॥ तयाचे उच्छिष्टाचा कण। शरण एका जनार्दन ॥ ३ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४३३८ अखंड हरि वाचेसी । जरी सुकृताची राशी । तरिच हरि ये मुखासी । धन्य जन्मासी तो आला ॥ १ ॥ देखतां ज्याचे चरण । यम जात असे शरण । ऐसें सुकृताचें वर्णन । कवण करावें तयाचें ॥ २ ॥ तोचि एक साधु देखा । नित्य पुसावें त्या विवेका । तो कांहीं न धरी शंका । हरिनाम म्हणतसे ॥ ३ ॥ ज्ञानदेवीं निज सूत्र । तोचि धन्य शुद्ध पवित्र । हरिवांचूनि त्याचें वक्त्र । नेणें आणिक दुसरें ॥ ४ ॥

४३३९ संत भेटती आजी मज । तेणें मी झालों चतुर्भुज । दोन्ही भुजा स्थुळीं सहज । दोन्ही सूक्ष्मीं वाढल्या ॥ १ ॥ आलिंगनीं सुख वाटे । प्रेम चिदानंदीं गोठे । हर्षें ब्रह्मांड उतटे । समुळ उठे मीपण ॥ २ ॥ या या संतांसी भेटतां । हरे संसाराची व्यथा । पुढत पुढती माथां । अखंडित ठेवीन ॥ ३ ॥ या या संतांचें देणें । कल्पतरूहूनि दुणें । परिसापरीस अगाधपणें । चिंतामणी ठेंगणा ॥ ४ ॥ या संतांपरीस उदार । त्रिभुवनीं नाहीं थोर । मायबाप सहोदर । इष्ट-

मित्र सोइरे ॥ ५ ॥ कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदीं बैसविलें । बापरखुमादेविवरें विठ्ठलें । भक्तां दिधलें वरदान ॥ ६ ॥

४३४० कुंचे पताका झळकती । टाळ मृदंग वाजती । आनंदें प्रेमें गर्जती । भद्रजाती विठ्ठलाचे ॥ १ ॥ आले हरीचे विनट । वीर विठ्ठलाचे सुभट । भेणें झाले दिप्पट । पळति थाट दोषांचे ॥ २ ॥ तुळसीमाळा शोभती कंठीं । गोपिचंदनाच्या उटी । सहस्र विघ्नें लक्ष कोटी । बारा वाटा पळताती ॥ ३ ॥ सतत कृष्णमूर्ति सांवळी । खेळे ज्याचे हृदयकमळीं । शांति क्षमा तया जवळी । जीवें भावें अनुसरल्या ॥ ४ ॥ सहस्र नामाचें हातियार । शंख चक्राचे शृंगार । अंगीं बळ वैराग्याचें थोर । केला मार षड्वर्गा ॥ ५ ॥ ऐसे एकांग वीर । विठ्ठलरायाचे डिंगर । बापरखुमादेविवर । तीहीं निर्धारीं जोडिला ॥ ६ ॥

४३४१ पूर्वजन्मीं सुकृतें थोर केलीं । तीं मज आजि फळासि आलीं ॥ १ ॥ परमानंदु आजि मानसीं । भेटी जाली या संतांसी ॥ २ ॥ माय बाप बंधु सखे सोयरे । यातें भेटावया मन न धरे ॥ ३ ॥ एक एका तीर्थाहूनि आगळें । तयामाजि परब्रह्म सांवळें ॥ ४ ॥ निर्धनासि धनलाभु झाला । जैसा अचेतनीं प्राण प्रगटला ॥ ५ ॥ वत्स विघडलियां धेनु भेटली । जैसी कुरंगिणी पाडसा मिनली ॥ ६ ॥ हें पियुषापरिस गोड वाटत । पंढरिरायाचे भक्त भेटत ॥ ७ ॥ बापरखुमादेविवर विठ्ठलें । संत भेटतां भवदुःख फिटलें ॥ ८ ॥

४३४२ आजी सोनियाचा दिनु । वर्षे अमृताचा घनु ॥ १ ॥ हरि पाहिला हो हरि पाहिला हो । सबाह्य अभ्यंतरीं अवघा व्यापक मुरारी ॥ धृ० ॥ दृढ विटे मन मुळीं । विराजीत वनमाळी ॥ २ ॥ बरवा संत समागमु । प्रगटले आत्मारामु ॥ ३ ॥ कृपासिंधु करूणाकरू । बापरखुमादेविवरू ॥ ४ ॥

## श्रीसेनामहाराज

४३४३ उदार तुम्ही संत । मायबाप कृपावंत ॥ १ ॥ केव्हढा केला उपकार । काय वाणूं मी पामर ॥ २ ॥ जडजीवा उद्धार केला । मार्ग सुपथ दाविला ॥ ३ ॥ सेना म्हणे उतराई । होतां न दिसे कांहीं ॥ ४ ॥

४३४४ तुम्हीं संत दयानिधी । तारा सांभाळा दुर्बुद्धि ॥ १ ॥ तुम्हां आहे शरणागत । तरी तारावा पतित ॥ २ ॥ अधिकार नाहीं । न कळे भक्तिभाव कांहीं ॥ ३ ॥ वागवा अभिमान । सेना आहे याती-हीन ॥ ४ ॥

४३४५ आजि सोनियाचा दिवस । दृष्टीं देखिलें संतांस ॥ १ ॥ जीवा सुख थोर झालें । माझें माहेर भेटलें ॥ २ ॥ अवघा निरसला शीण । देखतां संतचरण ॥ ३ ॥ आजि दिवाळी दसरा । सेना म्हणे आले घरा ॥ ४ ॥

४३४६ माय बाप कृपावंत । तुम्ही दयाळू संत ॥ १ ॥ घातला भार तुमच्या माथा । आवडे तें करा आतां ॥ २ ॥ चिंतुनि आलों पायांपाशीं । न धरी वेगळें मशीं ॥ ३ ॥ सेना म्हणे पायीं मिठी । घातली न करा हिंपुटी ॥ ४ ॥

४३४७ तेचि एक संत जाणा । आवडती नारायणा ॥ १ ॥ पांडु-रंगावांचोनि कांहीं । न जाणें दुसरें पाहीं ॥ २ ॥ मुखीं नाम अमृत-वाणी । घाले मनीं डुल्लती ॥ ३ ॥ सेना म्हणे पायीं माथा । त्यांच्या ठेवियला आतां ॥ ४ ॥

४३४८ संत संगतीनें थोर लाभ झाला । मोह निरसला मायादिक ॥ १ ॥ घातले बाहेरी काम क्रोध वैरी । बैसला अंतरीं पांडु-रंग ॥ २ ॥ दुजियाचा वारा लागूं नेदी अंगा । ऐसें पांडुरंगा कळों आलें ॥ ३ ॥ संतानीं सरता केला सेना न्हावी । ब्रम्हादिकां पाही नातुडे जो ॥ ४ ॥

४३४९ धन्य धन्य दिन । तुमचें झालें दरुषण ॥ १ ॥ आजि भाग्य

उद्या आलें । तुमचें पाऊल देखिलें ॥ २ ॥ पूर्वपुण्य फळा आलें । माझें माहेर भेटलें ॥ ३ ॥ सेना म्हणे झाला । धन्य दिवस आजि भला ॥ ४ ॥

## श्रीचोखोबामहाराज

४३५० चंदनाच्या संगें बोरीया बाभळी । हेकळी टाकळी चंदनची ॥१॥ संतांचिया संगें अभाविक जन । तयाच्या दर्शनें तेचि होती ॥२॥ चोखा म्हणे ऐसा परमार्थ साधावा । नाहीं तरी भार वाहवा खरा ऐसा ॥ ३ ॥

४३५१ संतांचा अनुभव संतचि जाणति । येर ते हांसती अभाविक ॥ १ ॥ नामाचा प्रताप प्रल्हादचि जाणें । जन्ममरण पेणें खुंटविलें ॥ २ ॥ सेवेचा प्रकार जाणें हनुमंत । तेणें सीताकांत सुखी केला ॥ ३ ॥ सख्यत्वें पूर्णता अर्जुना वाणली । ऐक्य रूपें चाली मिरवली ॥ ४ ॥ चोखा म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार । तेथें मी पामर काय वानूं ॥ ५ ॥

४३५२ आजि दिवस धन्य सोनियाचा । जिवलग विठोबाचा भेटलासे ॥ १ ॥ तेणें सुख समाधान झाली विश्रांती । दुजे नाठवती चित्तीं कांहीं ॥ २ ॥ समाधानें जीव राहिला निश्चळ । गेले हळहळ त्रिविधताप ॥ ३ ॥ चोखा म्हणे आनंद वाटलासे जीवा । संतांचे पाय केशवा देखियेले ॥ ४ ॥

### ( २ ) संतमाहिमा

## श्रीतुकाराममहाराज

४३५३ अर्भकाचे साठीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥ तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ २ ॥ बाळकाचे चाली । माता जाणुनि पाऊल घाली ॥ ३ ॥ तुका म्हणे नाव । जनासाठीं उदकीं ठाव ॥ ४ ॥

४३५४ आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ १ ॥ ऐसा

संतांचा महिमा । झाली बोलायाची सीमा ॥ २ ॥ तीर्थं पर्वकाळ । अवघीं पायांपे सकळ ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । त्यांची केली पावे सेवा ॥ ४ ॥

४३५५ आवडीची न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ १ ॥ नित्य नवा कळवळा । मायबाळामध्यें तो ॥ २ ॥ सुख सुखा भेटों आलें । होय वाल्हें पोटींचें ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रम्हानंदें । संतवृंदें चरणापें ॥ ४ ॥

४३५६ अग्निमाजी गेलें । अग्नि होऊन तेंच ठेलें ॥ १ ॥ काय उरलें तया पण । मागील तें नाम गुण ॥ २ ॥ लोह लागे परिसा अंगीं । तोही भूषण झाला जगीं ॥ ३ ॥ सरिता ओहळ ओघा । गंगे मिळोनि झाल्या गंगा ॥ ४ ॥ चंदनाच्या वासें । तरु चंदन झाले स्पर्शें ॥ ५ ॥ तुका जडला संतां पायीं । दुजेपणा ठाव नाहीं ॥ ६ ॥

४३५७ ब्रह्म सर्वगत सदा सम । जेथें आन नाहीं विषम । तया जाणती ते अति दुर्गम । तयांची भेटी झालिया भाग्य परम ॥ १ ॥ ऐसे ऐसियानें भेटती ते साधु । ज्यांच्या दर्शनें तुटे भवबंधु । जे कां सच्चिदानंदीं नित्यानंदु । जे कां मोक्षसिद्धि तीर्थां वंद्यु ॥ २ ॥ भाव सर्व कारण मूळ वंद्रु । सदा समबुद्धि नास्तिक्यभेदु । भूतकृपा मोडी द्वेषकंदु । शत्रु मित्र पुत्र सम करी बंधु ॥ ३ ॥ मन बुद्धि काया वाचा शुद्ध करी । रूप सर्वत्र देखोनि नमस्कारी । लघुत्व सर्व भावें अंगीकारी । सांडीमांडी मीतूंपण ऐसी थोरी ॥ ४ ॥ अर्थ काम चाड नाहीं चित्ता । मानामान मोह माया मिथ्या । वर्ते समाधानी जाणोनी नेणता । साधु भेट देती तया अवचिता ॥ ५ ॥ मनीं दृढ धरी विश्वास । न करी सांडीमांडीचा सायास । साधुदर्शन नित्यकाळ त्यास । तुका म्हणे जो विटला जाणिवेस ॥ ६ ॥

४३५८ ऐसा ज्याचा अनुभव । विश्वदेव सत्यत्वें ॥ १ ॥ देव तया जवळी असे । पाप नासे दर्शनें ॥ २ ॥ काम क्रोधा नाहीं चाली । भूतीं

जाली समता ॥ ३ ॥ तुका म्हणे भेदाभेद । गेले वाद खंडोनी ॥ ४ ॥

४३५९ उदकीं कालवी शेण मळमूत्र । तो होय पवित्र कासयानें ॥ १ ॥ उद्धारासी ठाव नाहीं भाग्यहीना । विन्मुख चरणा संतांचिया ॥ २ ॥ दुखवी तो बुडे सांगडीचा तापा । अतित्याई पापाचीच मूर्ती ॥ ३ ॥ तुका म्हणे जेव्हां फिरतें कपाळ । तरी अमंगळ योग होतो ॥ ४ ॥

४३६० उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥ संत-दर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ २ ॥ संपुष्ट हे हृदयपेटी । करूनि पोटीं सांठऊ ॥ ३ ॥ तुका म्हणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

४३६१ करितां या सुखा । अंतपार नाहीं लेखा ॥ १ ॥ माथां पडती संतपाय । सुख कैवल्य तें काय ॥ २ ॥ ऐसा लाभ नाहीं । दुजा विचारतां कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे गोड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

४३६२ कुळींची हे कुळदेवी । केली ठावी संतांनीं ॥ १ ॥ बरवें झालें शरण गेलों । उगविलों संकटीं ॥ २ ॥ आणिलाही रूपा बळें । करूनि खळें हरिदासीं ॥ ३ ॥ तुका म्हणे समागमें । नाचों प्रेमें लागलों ॥ ४ ॥

४३६३ कोणा पुण्यें यांचा होईन सेवक । जिहीं द्वंद्वादिक दुराविलें ॥ १ ॥ ऐसें वर्म मज दावी नारायणा । अंतरींच्या खुणा प्रकटोनि ॥ २ ॥ बहु अवघड आहे संतभेटी । तरि जगजेठी करुणा केली ॥ ३ ॥ तुका म्हणे मग नये वृत्तीवरी । सुखाचे शेजारीं पहुडईन ॥ ४ ॥

४३६४ खळा सदा क्षुद्र दृष्टि । करी कष्टी सज्जना ॥ १ ॥ करिती आपुलाले परी । धणीवरी व्यापार ॥ २ ॥ दया संतां भांडवल । वेची बोल उपकार ॥ ३ ॥ तुका म्हणे आपुलालें । उसंतिलें ज्यांणीं तें ॥ ४ ॥

४३६५ गंगाजळा पाहीं पाठी पोट नाहीं । अवगुण तो कांहीं अमृतासी ॥ १ ॥ रवि दीप काळिमा काय जाणे हिरा । आणिकां तिमिरां नाश तेणें ॥ २ ॥ कर्पूर कांडणी काय कोंडा कणी । सिंधु मिळवणी काय चाले ॥ ३ ॥ परिस चिंतामणी आणिकांच्या गुणी । पालटे लागोनि नव्हे तैसा ॥ ४ ॥ तुका म्हणे तैसे जाणा संतजन । सर्वत्र संपूर्ण गगन जैसें ॥ ५ ॥

४३६६ जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥ १ ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा ॥ २ ॥ मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनांचे चित्त ॥ ३ ॥ ज्यासि आपंगिता नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं ॥ ४ ॥ दया करणें जे पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥ तुका म्हणे सांगूं किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६ ॥

४३६७ दास झालों हरिदासांचा । बुद्धि काया मनें वाचा ॥ १ ॥ तेथें प्रेमाचा सुकाळ । टाळ मृदंग कल्लोळ ॥ २ ॥ नासे दुष्ट बुद्धी सकळ । समाधी हरिकीर्तनीं ॥ ३ ॥ ऐकतां हरिकथा । भक्ती लागे त्या अभक्तां ॥ ४ ॥ देखोनि कीर्तनाचा रंग । कैसा उभा पांडुरंग ॥ ५ ॥ हें सुख ब्रह्मादिकां । नाहीं नाहीं म्हणे तुका ॥ ६ ॥

४३६८ देवासी अवतार भक्तांसी संसार । दोहींचा विचार एकपणें ॥ १ ॥ भक्तांसी सोहळे देवाचिया अंगें । देव त्यांच्या संगें सुख भोगी ॥ २ ॥ देवें भक्तां रूप दिलासे आकार । भक्तीं त्याचा पार वाखाणिला ॥ ३ ॥ एका अंगीं दोन्ही जालीं हीं निर्माण । देवभक्तपण स्वामिसेवा ॥ ४ ॥ तुका म्हणे येथें नाहीं भिन्नभाव । भक्त तोचि देव देव भक्त ॥ ५ ॥

४३६९ पाप ताप दैन्य जाय उठाउठी । झालिया भेटी हरिदासांची ॥ १ ॥ ऐसें बळ नाहीं आणिकांचे आंगीं । तप तीर्थ जगीं दान व्रता ॥ २ ॥ चरणींचें रज वंदी शूळपाणी । नाचती कीर्तनीं

त्यांचे माथां ॥ ३ ॥ भव तरावया उत्तम हे नाव । भिजों नेदी पाय हात कांहीं ॥ ४ ॥ तुका म्हणे मना झालें समाधान । देखिल्या चरण वैष्णवांचे ॥ ५ ॥

४३७० भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनी ॥ १ ॥ विषय तो त्यांचा झाला नारायण । नावडे धन जन मातापिता ॥ २ ॥ निर्वाणीं गोविंद असे मागेंपुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्य कर्मा व्हावें साह्य । घातलिया भय नर्का जाणें ॥ ४ ॥

४३७१ भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणिकांसी ॥ १ ॥ जाणोनि नेणते झाले तेणें सुखें । न बोलोनि मुखें बोलताती ॥ २ ॥ अभेदूनि भेद राखियेला अंगीं । वाढावया जगीं प्रेमसुख ॥ ३ ॥ टाळ घोष कथा प्रेमाचा सुकाळ । मूढ लोकपाळ तरावया ॥ ४ ॥ तुका म्हणे हें तों आहे तयां ठावें । जिहीं एक्या भावें जाणीतलें ॥ ५ ॥

४३७२ भक्तिसुखें जे मातले । ते कळिकाळा शूर जाले ॥ १ ॥ हातीं बाण हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ २ ॥ महादोषां आला त्रास । जन्ममरणा केला नास ॥ ३ ॥ सहस्रनामाची आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ ४ ॥ नाहीं आणीकांचा गुमान । ज्याचें अंकित त्यावांचून ॥ ५ ॥ तुका म्हणे त्यांच्या घरीं । मोक्षसिद्धी या कामारी ॥ ६ ॥

४३७३ मोकळें मन रसाळ वाणी । याचि गुणीं संपन्न ॥ १ ॥ लक्ष्मी ते ऐशा नांवें । भाग्यें ज्यावें तरी त्यांनीं ॥ २ ॥ नमन नम्रता अंगीं । नेघे रंगीं पालट ॥ ३ ॥ तुका म्हणे त्याच्या नांवें । घेतां व्हावें संतोषी ॥ ४ ॥

४३७४ वाट वैकुंठीं पाहाती । भक्त कैं पां येथें येती । तयां जन्ममरण खंती । नाहीं चित्तीं परलोक ॥ १ ॥ धन्य धन्य हरीचे दास ।

तयां सुलभ गर्भवास । ब्रह्मादिक करिती आस । तीर्थां वास भेटीची ॥ २ ॥ कथाश्रवण व्हावयास । यमधर्मा थोर आस । पाहे रात्रंदिवस । वाट कर जोडूनिया ॥ ३ ॥ रिद्धीसिद्धी न पाचारितां । त्या धुंडिती हरिभक्तां । मोक्ष सायुज्यता । वाट पाहे भक्तांची ॥ ४ ॥ असती जेथें उभे ठेले । सदां प्रेमसुखें धालें । आणिकही उद्धरीले । महादोषी चांडाळ ॥ ५ ॥ सकळ करिती त्यांची आस । सर्व भावें ते उदास । धन्य भाग्य त्यांस । तुका म्हणे दरुषणें ॥ ६ ॥

४३७५ सकळ चिंतामणी शरीर । जरी जाय अहंकार आशा समूळ । निंदा हिंसा नाहीं कपट देहबुद्धी । निर्मळ स्फटिक जैसा ॥ १ ॥ मोक्षाचें तीर्थ नलगे वाराणसी । येती त्यापाशीं अवघीं जळें । तीर्थांसी तीर्थ झाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें ॥ २ ॥ मन शुद्ध तया काय करिसी माळा । मंडित सकळा भूषणांसी । हरिच्या गुणें गर्जती सदा । आनंद तया मानसीं ॥ ३ ॥ तन मन धन दिलें पुरुषोत्तमा । आशा नाहीं कवणाची । तुका म्हणे तो परिसाहूनि आगळा । काय महिमा वर्णूं त्याची ॥ ४ ॥

४३७६ संसारसोहळे भोगितां सकळ । भक्तां त्याचें बळ विठोबाचें ॥ १ ॥ भय चिंता धाक न मानिती मनीं । भक्तां चक्रपाणी सांभाळीत ॥ २ ॥ पापपुण्य त्यांचें धरूं न शके अंग । भक्तांसी श्रीरंग सर्वभावें ॥ ३ ॥ नव्हती ते मुक्त आवडे संसार । देव भक्तां भार सर्व वाहे ॥ ४ ॥ तुका म्हणे देव भक्तां वेळाइत । भक्त ते निश्चिंत त्याचियानें ॥ ५ ॥

४३७७ संतांसी क्षोभवी कोण्याही प्रकारें । त्याचें नव्हे बरें उभयलोकीं ॥ १ ॥ देवाचा तो वैरी शत्रु दावेदार । पृथ्वीही थार नेदी तया ॥ २ ॥ संतापाशीं ज्याचा तुटेचि विश्वास । त्याचे झाले दोष वळिवंत ॥ ३ ॥ तुका म्हणे क्षीर वासराच्या अंगें । किंवा धांवे लागें विषमें मारूं ॥ ४ ॥

४३७८ संतांसी तों नाहीं सन्मानाची चाड । परि पडे द्वाड अव्हेरितें ॥ १ ॥ म्हणऊनि तया न वजावें ठाया । होतसे घात या दुर्बळांचा ॥ २ ॥ भावहीना आड येतसे आशंका । उचितासी चुका घालावया ॥ ३ ॥ तुका म्हणे जयां संकोच दर्शनें । तया ठाया जाणें अनुचित ॥ ४ ॥

४३७९ संतांच्या धिक्कारें अमंगळ जिणें । विश्वशत्रु तेणें सांडी परी ॥ १ ॥ कुळ आणि रूप वांयां संवसार । गेला भरतार मोकलितां ॥ २ ॥ मूळ राखे तया फळा काय उणें । चतुर लक्षणें राखों जाणें ॥ ३ ॥ तुका म्हणे सायास तो एके ठायीं । दीप हातीं तईं अवघें बरें ॥ ४ ॥

४३८० संतांचें सुख झालें या देवा । म्हणऊनि सेवा करी त्यांची ॥ १ ॥ तेथें माझा काय कोण तो विचार । वर्णावया पार महिमा त्यांचा ॥ २ ॥ निर्गुण आकार जाला गुणवंत । घाली दंडवत पूजोनियां ॥ ३ ॥ तीर्थें त्यांची इच्छा करिती नित्यकाळ । व्हावया निर्मळ आपणांसी ॥ ४ ॥ अष्टमा सिद्धींचा कोण आला पाड । वागों नेदी आड कोणी तया ॥ ५ ॥ तुका म्हणे ते बळिया शिरोमणी । राहिले चरणीं विकटवासें ॥ ६ ॥

४३८१ संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥ तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥ २ ॥ संतांचिये गांवीं वरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥ संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥ संतांचा उदीम उपदेशाची पेठ । प्रेमसुख साटीं घेती देती ॥ ५ ॥ तुका म्हणे तेथें आणिक नाहीं परी । म्हणोनि भिकारी झालों त्यांचा ॥ ६ ॥

४३८२ संतांचा महिमा तो बहु दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ १ ॥ बहु दुधड जरी जाली म्हैस गाय । तरी होईल काय

कामधेनु ॥ २ ॥ तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ ३ ॥

४२८३ नव्हती ते संत करितां कवित्व । संतांचे ते आप्त नव्हती संत ॥ १ ॥ येथें नाहीं वेश सरत आडनांव । निवडे घावडाव व्हावा अंगीं ॥ २ ॥ नव्हती ते संत धरितां भोपळा । पांवरिति वाकळा नव्हती संत ॥ ३ ॥ नव्हती ते संत करितां कीर्तन । सांगतां पुराण नव्हती संत ॥ ४ ॥ नव्हती ते संत वेदाच्या पठणें । कर्म आचरणें नव्हती संत ॥ ५ ॥ नव्हती संत करितां तप तीर्थाटण । सेविलिया वन नव्हती संत ॥ ६ ॥ नव्हती संत माळामुद्रांच्या भूषणें । भस्म उधळणें नव्हती संत ॥ ७ ॥ तुका म्हणे नाहीं निरसला संदेह । तंव-वरी अवघे हे संसारिक ॥ ८ ॥

४२८४ वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥ १ ॥ परि तें तुज नाहीं ठावें । जेणें अंगें ब्रह्म व्हावें ॥ २ ॥ जरि तूं जालासी पंडित । करिसी शब्दाचें पांडित्य ॥ ३ ॥ गासी तान मान वंध । हाव भाव गीत छंद ॥ ४ ॥ जाणसील तूं स्वतंत्र । आगमोक्त पूजायंत्र ॥ ५ ॥ साधनाच्या ओढी । डोळियांच्या मोडामोडी ॥ ६ ॥ तुका म्हणे देही । संत जहाले विदेही ॥ ७ ॥

४२८५ जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥ १ ॥ आणीक नये माझ्या मना । हो कां पंडित शाहाणा ॥ २ ॥ नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ तुका म्हणे नवविध । भक्ति जाणे तोचि सिद्ध ॥ ४ ॥

४२८६ भाग्यवंतां हेंचि काम । मापी नाम वैखरी ॥ १ ॥ आनंदाची पुष्टी अंगीं । श्रोते संगीं उद्धरती ॥ २ ॥ पिकलें तया खाणें किती । पंगतीस सुकाळ ॥ ३ ॥ तुका करी प्रणिपात । दंडवत आचारियां ॥ ४ ॥

४२८७ आगी लागो जाणपणा । आड न यो नारायणा । घेइन

प्रेमपान्हा । भक्तिसुख निवाडें ॥ १ ॥ यासी तुळे ऐसें कांहीं । दुजें त्रिभुवनीं नाहीं । काला भात दहीं । ब्रह्मादिकां दुर्लभ ॥ २ ॥ निमिषार्धं संतसंगती । वास वैकुंठीं कल्पांतीं । मोक्षपदें होती । ते विश्रांती वापुडी ॥ ३ ॥ तुका म्हणे हेंचि देई । मीतूंपणा खंड नाहीं । बोलिलों त्या नाहीं । अभेदाची आवडी ॥ ४ ॥

४३८८ रवि दीप हिरा दाविती देखणें । अदृश्य दर्शनें संतांचेनी ॥ १ ॥ काय त्यांचा महिमा वर्णूं मी पामर । न कळे तो साचार ब्रह्मादिकां ॥ २ ॥ तापली चंदन निवविती कुडी । त्रिगुण तो काढी संतसंग ॥ ३ ॥ मायबापें पिंड पाळियेला माया । जन्ममरण जाया संतसंग ॥ ४ ॥ संतांचें वचन वारी जन्मदुःख । मिष्टान्न तें भूक निवारण ॥ ५ ॥ तुका म्हणे जवळी न पाचारितां जावें । संतचरणीं भावें रिघावया ॥ ६ ॥

४३८९ प्रारब्ध क्रियमाण । भक्तां संचित नाहीं जाण ॥ १ ॥ अवघा देवचि झाला पाहीं । भरोनियां अंतर्बाहीं ॥ २ ॥ सत्वरजतमबाधा । नव्हे हरिभक्तांसि कदा ॥ ३ ॥ खाय बोले करी । अवघा त्यांचे अंगीं हरी ॥ ४ ॥ देवभक्तपण । तुका म्हणे नाहीं भिन्न ॥ ५ ॥

४३९० ध्यानीं योगीराज बैसले कपाटीं । लागे पाठोपाठीं तयाचिया ॥ १ ॥ तान भूक त्यांचें राखे शीत उष्ण । जाले उदासीन देहभाव ॥ २ ॥ कोण सखे तया आणीक सोयरे । असे त्यां दुसरें हरीविण ॥ ३ ॥ कोण सुख त्यांच्या जीवासि आनंद । नाहीं राज्यपद घडी तया ॥ ४ ॥ तुका म्हणे विष अमृतासमान । कृपा नारायण करितां होय ॥ ५ ॥

४३९१ संतसमागम एखादिया परी । राहावें त्याचे द्वारीं श्वानयाती ॥ १ ॥ तेथें रामनाम होईल श्रवण । घडेल भोजन उच्छिष्टाचें ॥ २ ॥ कामारी बटीक सेवेचे सेवक । दीनपण रंक तेथें भलें ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व सुख त्या संगती । घडेल पंगती संतांचिया ॥ ४ ॥

४३९२ संतांपाशीं बहु असावें मर्यादा । फलकटाचा धंदा उर फोडी ॥ १ ॥ वासर तो भुंके गाढवाचेपरी । उडे पाठीवरी दंड तेणें ॥ २ ॥ समय नेणें तें वेडें चाहटळ । अवगुणाचा ओंगळ मान पावे ॥ ३ ॥ तुका म्हणे काय वांयां चाळवणी । पिटपिटयाणी हागवणीची ॥ ४ ॥

४३९३ संतांचा अतिक्रम । देवपूजा तो अधर्म ॥ १ ॥ येती दगड तैसे वरी । मंत्रपुष्पें देवा शिरीं ॥ २ ॥ अतीतासि गाळी । देवा नैवेद्यासी पोळी ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा । ताडण भेदकांची सेवा ॥ ४ ॥

४३९४ भुंकूनियां सुनें लागे हस्तीपाठीं । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥ काय त्या मशकें तयासी करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ २ ॥ स्नातलें माकड चिरवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तेणें ॥ ३ ॥ तुका म्हणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ४ ॥

## श्रीनिळोबामहाराज

४३९५ नित्य कथाश्रवणीं प्रीति । चित्तवृत्ति अभ्यांतरीं ॥ १ ॥ तेचि अधिकारी या सुखा । स्वानुभव निका पावती ॥ २ ॥ जया बोलतां चित्तीं । प्रसन्न होती तात्काळ ॥ ३ ॥ निळा म्हणे सर्व जाण । हेंचि ओळखण संतांचें ॥ ४ ॥

४३९६ बोलणें त्यांचें तें निःशब्द । देखणें देखती सच्चिदानंद । करणें चाळितां आत्मबोध । विषयीं विषय ब्रह्मरूप ॥ १ ॥ जाणें येणें आणिकां दिसे । अचळपणें ते जैसे तैसे । कल्लोळ सागरीं उससे । रश्मि जैसे निज बिंबीं ॥ २ ॥ न मोडे त्या अखंडता । घेतां देतां सर्वही करितां । हसतां खेळतां बोलतां । निजीं निजतां यथासुखें ॥ ३ ॥ लेणीं अलंकारही मिरविती । जयापरि तैसेचि दिसती । न मोडतां स्वरूपस्थिति । चित्तीं चिंतन सर्वदा ॥ ४ ॥ निळा म्हणे

गुणातीत । देहीं देहातें नातळत । होऊनियां ठेले संत । अखंडित अखंड ॥ ५ ॥

४३९७ सांपडली हे सुगम वाट । हरीचिया पाठ नामाच्या ॥ १ ॥ ब्रह्मानंदें करिती घोष । कीर्तनीं उल्हास नित्यानी ॥ २ ॥ हरिचिया प्रेमें रंगोनिया गेले । दोहिंचे विसरले देहभाव ॥ ३ ॥ निळा म्हणे जिंकोनि काळा । भोगिती सोहळा वैकुंठीचा ॥ ४ ॥

४३९८ रंगलें तें संतसंगें । झाले अंगें शुद्ध बुद्ध ॥ १ ॥ देवचि संत देवाचि संत । आणिकांही करीत देवाचि ते ॥ २ ॥ कैंचें तेथें व्यवधान । ब्रह्म सनातन पावविती ॥ ३ ॥ निळा म्हणे न लभे देवा । आणिती भावा त्या संत ॥ ४ ॥

४३९९ पावले ते झाले सुखी । ज्याची वोळखी संतचरणी ॥ १ ॥ कीटक पतंग पशुयाती । मानव सत्संगती उद्धरले ॥ २ ॥ जिहीं विश्वास धरिला पायीं । तरले ते डोहीं भवाब्धीच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे निर्वाणरूप । पावले स्वरूप श्रीहरीचें ॥ ४ ॥

४४०० पापी आणि दुराचारी । सहपरीवारीं संतांच्या ॥ १ ॥ तरले आणिक तरती पुढें । दिधलें येवढें सामर्थ्य त्यां ॥ २ ॥ तुम्हीं देवा कृपावंत । केले निजभक्त आपणसे ॥ ३ ॥ निळा म्हणे जगदोद्धारा । केला हा बरा उपाय ॥ ४ ॥

४४०१ संतसंगें हरे पाप । संतसंगें निरसे ताप । संतसंगें निर्विकल्प । होय मानस निश्चळ ॥ १ ॥ संतसंगें वैराग्य घडे । संतसंगें विरक्ती जोडे । संतसंगें निजशांति वाढे । साधन हृदयीं अखंडित ॥ २ ॥ संतसंगें हरिची भक्ती । संतसंगें ज्ञान विरक्ती । संतसंगें भुक्ती मुक्ती । साधकां वरिती अनायसें ॥ ३ ॥ निळा म्हणे साधुसंग । महाभाग्याचें हें भाग्य । सेविती ते स्वरूप चांग । पावती आत्मया श्रीहरीचें ॥ ४ ॥

४४०२ ब्रह्म संपत्ती वरी तया । आवडे जया संतसंग ॥ १ ॥

त्रिकाळज्ञानी होय तो नर । आत्मसाक्षात्कार भोगप्राप्ती ॥ २ ॥ शांति दया क्षमा सिद्धी । बोलती समाधी चालतां त्या ॥ ३ ॥ निळा म्हणे एवढा लाभ । जोडे त्यां स्वयंभ भाग्यवंता ॥ ४ ॥

४४०४ ऐसी जोडलिया सत्संगती । परम विश्रांती भाविकां ॥ १ ॥ ब्रह्मानंदाचें पारणें । नित्य स्मरणें श्रीहरिच्या ॥ २ ॥ सकळही लाभाच्या संपत्ती । सामोऱ्या धांवती पारमार्थिक ॥ ३ ॥ निळा म्हणे कृत्य झालें । ज्यालागीं आले नरदेहा ॥ ४ ॥

४४०५ भाविकांची उत्तम जाती । विश्वास धरिती संतवचनीं ॥ १ ॥ तयां फळे त्यांचा भाव । प्रगटे देव हृदयांत ॥ २ ॥ जाणिवेचा नाहीं फुंद । शुद्ध बुद्ध होती ते ॥ ३ ॥ निळा म्हणे त्यांची स्थिती । न ये ते गती जाणतिया ॥ ४ ॥

४४०६ वाचेतें वदवी रसनेतें चाखवी । नेत्रातें दाखवी परि त्या दुरी ॥ १ ॥ बुद्धी बोधविता चित्ता चेतविता । देहीं देहातीता कैसेनि दावूं ॥ २ ॥ भावाभावातीत अद्वैता अद्वैत । ज्यातें श्रुती म्हणत नेति नेति ॥ ३ ॥ निळा म्हणे कांहीं न होऊनियां जें आहे । दाविती त्याचि सोय सद्गुरु संत ॥ ४ ॥

४४०७ हरिचिया भजनें हरिचे जन । करिती पावन पतितांसी ॥ १ ॥ ऐसा त्यांचा अगाध महिमा । निरुपमा तो न वर्णवे ॥ २ ॥ देऊनियां परमार्थसिद्धी । पाववितीं पदीं श्रीहरीच्या ॥ ३ ॥ निळा म्हणे सत्संगसुख । गणितां अधिक परमामृता ॥ ४ ॥

४४०८ संतीं जया हातीं धरिलें । ब्रह्मसनातन ते पावले ॥ १ ॥ आणिकां दुर्लभ जें साधनें । यांच्या प्राप्त अवलोकनें ॥ २ ॥ फळ अनापेक्ष पावती । प्राणि यांचिये संगती ॥ ३ ॥ निळा म्हणे कल्पतरू । सामान्य दाते हे ईश्वरु ॥ ४ ॥

४४०९ एकाचि आशिर्वाद देती । जरी अवलोकिती कृपेनें ॥ १ ॥ तरी त्या पाववितीं पदा । जेथें सर्वदा रमती मुनी ॥ २ ॥ निश्चयाचें

देणें त्यांचें । हरिती जीवाचें जीवपण ॥ ३ ॥ निळा म्हणे अगाध वाचा । संत वरदाचा महिमा हा ॥ ४ ॥

### श्रीनामदेवमहाराज

४४१० संताचा महिमा कोण जाणे सीमा । सीणला हा ब्रम्हा बोलवेना ॥ १ ॥ संतांची हे कळा पाहतां न कळे । खेळोनिया खेळ वेगळाचि ॥ २ ॥ संतांचियां पारा नेणें अवतारा । म्हणती याच्या पारा कोण जाणे ॥३॥ नामा म्हणे धन्य धन्य भेट झाली । कल्पना निमाली संतापायीं ॥ ४ ॥

४४११ भक्त केशवाचे आले । दूत यमाचे पळाले ॥ १ ॥ भक्त हरिचे चालिले । हातीं हरिनामाचे भाले ॥ २ ॥ तळपे शांतिचें ओढण । घेती स्वानंदें उड्डाण ॥ ३ ॥ नामा म्हणे निजदास । कळि-काळाचे भरंवसे ॥ ४ ॥

४४१२ प्रतिदिनीं स्वधर्म करी । हरिमूर्ति नमस्कारी । भावें भजन वसे शरीरीं । तोचि भक्त हरिचा ॥ १ ॥ अनंत जन्मींचें कांट । तेणेंचि केलें सपाट । स्वधर्में करोनियां नीट । शुद्धपक्ष हरि हरि ॥ २ ॥ तेंचि तापसा सामर्थ्य । तेणेंचि जोडिलें तीर्थ । त्याचे धरोनि मनोरथ । हरिभजनपंथीं लागला ॥ ३ ॥ देवो त्याचा आखिला । सत्वा न ढळे तो कष्टविला । अकर्मी तोचि भला । त्याचें धन्य जीवित्व ॥ ४ ॥ तोचि सफळ सकळीं । सदा निर्मळ सर्वकाळीं । जो हरीनामें वाजवी टाळी । तोचि समर्थ त्रिभुवनीं ॥ ५ ॥ नामा हरिरंगीं रंगला । तेणें विठ्ठल संतोषला । येऊनिया राहिला । हृदय-कमळीं आमुच्या ॥ ६ ॥

४४१३ संतपायीं माथा धरितां सद्भावें । तेणें भेटे देव आपेंआप ॥ १ ॥ म्हणऊनि संतां अखंड भजावें । तेणें भेटे देव आपेंआप ॥ २ ॥ साधुपाशीं देव कामधंदा करी । पीतांबर धरी वरी छाया ॥ ३ ॥ नामा म्हणे देव इच्छी संतसंग । आम्हां जीवलग जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४४१४ ब्रह्म सर्वगत सदा सम । जेथें आनु नाहीं विषम । ऐसें जाणती ते अति दुर्गम । तयांची भेटी जालिया भाग्य परम ॥ १ ॥ ऐसे कैसीयानें भेटती ते साधु । ज्यांचा अतर्क्य तर्कवेना बोधु । ज्यांसी निजानंदीं आनंदु । ज्यांचा परमानंदीं उद्‌बोधु ॥ २ ॥ पवना घालवेल पालाण । पायीं चढवेल गगन । भूत भविष्य कळों येईल वर्तमान । परि त्या साधूंचें न कळे महिमान ॥ ३ ॥ चंद्रामृत सुखें सेववेल । रवि अस्ता जातां धरवेल । बाह्यां हेळा सागर तरवेल । परी त्या साधूंची भेटी न होईल ॥ ४ ॥ जप तप करवेल अनुष्ठान । ध्येय ध्याता धरवेल निजध्यान । ज्ञेय ज्ञाता विवर्जित ज्ञान । ज्ञान ध्यानाचें फळ हे साधुजन ॥ ५ ॥ निजवृत्तीचा करवेल निरोधु । जीवशिवाचा भोगवेल आनंदु । एकाजनार्दनीं निजसाधु । त्यांच्या दर्शनें तुटती भवबंधु ॥ ६ ॥

४४१५ जन्म कोटयांनीं हरिसेवा जोडे । नवविधा भजन सांग घडे । तंव वैराग्य तें पाहे पुढें । पूर्व प्राचीन फळ रोकडें ॥ १ ॥ ऐसे तैंच मिळती ते साधु । ज्यांचा संग करी उद्‌बोधु । ज्यांचा स्पर्श करी आल्हादु । ज्यांचा महिमा न कळे आनंदु ॥ २ ॥ घडे काम कर्म परित्याग । झडे समूळ विषयांचा संग । सर्व कामना नुरे सुसमार्ग । तें आतुडे मानवा संतसंग ॥ ३ ॥ शुद्ध सत्त्वगुण देहीं पाहे । दंभ अहंकार मानामान जाये । काम क्रोध लोभ सांडी सोये । तैं भूतभाव नाहीं होय ॥ ४ ॥ जें जनार्दनीं शुद्ध भाव । स्वकर्मासी विश्रांति ठाव । ऐक्य दुजें दोन्ही होती वाव । देह बुद्धीच भासे देव ॥ ५ ॥ जें संतदया होय बापा । तैंचि विश्रांती त्रिविधतापा । तैंच मिळणी होय स्वरूपा । पूर्ण एकाजनार्दनीं कृपा ॥ ६ ॥

४४१६ अभक्तां देव कंटाळती । परी सरते करती संत त्यां

॥ १ ॥ म्हणोनी महिमा त्यांचा जगीं । वागविती अंगीं सामर्थ्य ॥ २ ॥ मंत्र तंत्रा नोहे वळ । भक्ति प्रेमळ पाहिजे ॥ ३ ॥ आगमा निगमाचा पसारा । उगाचि भारा चिंध्यांचा ॥ ४ ॥ वेदशास्त्रांची घोकणी । ती तों काहाणी जुनाट ॥ ५ ॥ पुरातन वाटा असती बहु । त्या त्या न घेऊं यामाजी ॥ ६ ॥ एकाजनार्दनीं सोपा मार्ग । संतसंग चोखडा ॥ ७ ॥

४४१७ संतांचें चरणतीर्थ घेतां अनुदिनीं । पातकांची धुणी सहज होय ॥ १ ॥ संतांचें उच्छिष्ट प्रसाद लाधतां । ब्रह्मज्ञान हातां सहज होय ॥ २ ॥ संतांच्या दरूशनें साधती साधनें । तुटती बंधनें सहज तेथें ॥ ३ ॥ एका जनार्दनीं संत कृपादृष्टी । पाहतां सुलभ सृष्टी सहज होय ॥ ४ ॥

४४१८ संतवचनें देव जोडे । सायुज्यमुक्ति पायां पडे । संतवचनें सांकडें । नुरेचि कांहीं ॥ १ ॥ धन्य धन्य संतसंग । उभा तेथें श्रीरंग । लक्ष्मीसहित अभंग । तिष्ठे सदा ॥ २ ॥ संतवचनें कर्म झडे । संतवचनें मोक्ष जोडे । संतवचनीं तीर्थ घडे । धन्य संग संतांचा ॥ ३ ॥ संतवचनें तुटे उपाधी । संतवचनें सरे आधिव्याधी । संतवचनें भवनदी । प्राणी तरती ॥ ४ ॥ संतवचनीं धरा भाव । तेणें सर्व निरसे भेव । एकाजनार्दनीं देव । प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥

४४१९ ऐकरे उद्धवा तुज सांगतों गुज । संतचरणरज वंदी तूं सहज । तेणें कार्य कारण होईल तुज । अंतरदृष्टी करुनी परीस निज ॥ १ ॥ घाली लोटांगण वंदीं चरण । कायावाचामनें धरुनी जीवीं ॥ धृ० ॥ आलीया संतजन आलिंगन देई । पूजा ती बरवी समर्पावी । ज्ञान ध्यान त्यांचें करावें जीवीं । हेतु सर्व भावीं मनीं धरीं उद्धवा ॥ २ ॥ कायिक वाचिक मानसिक भाव । अर्पी तेथें जीव देहभाव । एकाजनार्दनीं तयाचें वैभव । सांगितलें तुज उद्धवा ॥ ३ ॥

४४२० उद्धवा स्वमुखें सांगे श्रीकृष्ण । संतसेवा जाण सर्वश्रेष्ठ

॥ १ ॥ हाचि योग जाण उद्धवा स्वीकारीं । आणीक न करीं भरो- वरी साधन तें ॥ २ ॥ तयाची संगती उद्धवा धरावी । सेवा ते करावी काया वाचा ॥ ३ ॥ मज तयाचा वेध उद्धवा प्रसिद्ध । तूं सर्वभावें सद्‌गद् नाम घेई ॥ ४ ॥ जयासी आवडी मजसी उद्धवा । जाई तया ठाया प्रेमभरीत ॥ ५ ॥ उच्च नीच कांहीं न म्हणे उद्धवा । एका जनार्दनीं तया शरण जावें ॥ ६ ॥

४४२१ संतां द्यावें आलिंगन । सांडुनियां थोरपण ॥ १ ॥ अंगें देव करी सेवा । इतरांचा कोण केवा ॥२॥ ब्रम्हज्ञानी वंदिती माथा । मुक्तांची सहज मुक्तता ॥ ३ ॥ शरण एकाजनार्दनीं । यम काळ वंदिती दोन्ही ॥ ४ ॥

४४२२ स्वर्ग जयाची पायरी । मोक्ष ज्यांचा आज्ञाधारी ॥ १ ॥ ऐसा संतांचा महिमा । पायवणी ये शिवब्रम्हा ॥ २ ॥ ब्रम्हज्ञा- नाचि ती मात । कोण तया तेथें पुसत ॥ ३ ॥ भुक्ति मुक्ति लोटां- गणीं । शरण एकाजनार्दनीं ॥ ४ ॥

४४२३ संत चरणींचा माहिमा । कांहीं न कळे आगमां निगमां ॥ १ ॥ ब्रम्हा घाली लोटांगण । विष्णु वंदितो आपण ॥ २ ॥ शिव ध्यातो पायवणी । धन्य धन्य संतजनीं ॥ ३ ॥ तया संतांचा सांगात । एकाजनार्दन निवांत ॥ ४ ॥

४४२४ संतसंगें तरला वाल्हा । पशु तरला गजेंद्र ॥ १ ॥ ऐसा संत समागम । धरतां उत्तम सुख लाभ ॥ २ ॥ तुटती जन्म जरा व्याधी । आणिक उपाधी नातळती ॥ ३ ॥ संसाराचा तुटे कंद । निरसे भेद अंतरींचा ॥ ४ ॥ परमार्थाचें फळ ये हातां । हा जोडतां संतसंग ॥ ५ ॥ घडती तीर्थादिक सर्व । सकळ पर्व साधती ॥ ६ ॥ एकाजनार्दनी संत । धन्य समर्थ तिहीं लोकीं ॥ ७ ॥

४४२५ संतपूजनें देव । तुष्टतसे वासुदेव ॥ १ ॥ संत पूजेचें महि- मान । वेदां न कळे प्रमाण ॥ २ ॥ संतचरणतीर्थ माथा । वंदिती

तीर्थें पें सर्वथा ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं करी पूजा । पूज्य पूज्यक नाहीं दुजा ॥ ४ ॥

### श्रीनिवृत्तिमहाराज

४४२६ हरिदासा संगें हरिरूप खेळे । ब्रह्मादिक सोहळे भोगितातीं ॥ १ ॥ संत मुनिदेव सनकादिक सर्व । तींही मनोभाव अर्पियेला ॥ २ ॥ पुंडरिकफळ वोळलें सफळ । शंकर सोज्वळ प्रेमें डुलें ॥ ३ ॥ निवृत्ति लोळत चरणरजीं लाटा । माजि त्या वैकुंठा आत्मलिंगीं ॥ ४ ॥

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

४४२७ अकार उकार मकार करिती हा विचार । परि विठ्ठल अपरंपार न कळे त्या ॥ १ ॥ संतांचें संगती प्रेमाचा कल्लोळ । आनंदे गोपाळ माजि खेळे ॥ २ ॥ वाळे भोळे भक्त गाताती सावडे । तें प्रेम आवडे विठोबासी ॥ ३ ॥ बापरखुमादेविवरू परब्रह्म पुतळा । तेथिल हे कळा निवृत्ति जाणें ॥ ४ ॥

४४२८ शर्करेची गोडी निवडावया भले । साधु निवडिले सत्संगती ॥ १ ॥ सत्संगें प्रमाण जाणावया हरी । येर तें निर्धारीं प्रपंचजात ॥ २ ॥ भानुबिंब पाहा निर्मळ निराळ । अलिप्त सकळ तैसे साधु ॥ ३ ॥ ज्ञानदेव हरी जपोनि निर्मळ । सदा असे सोज्वळ निवृत्तिसंगें ॥ ४ ॥

---

## वैष्णवपर

### श्रीतुकाराममहाराज

४४२९ चिंता नाहीं गांवीं विष्णुदासांचिये । घोष जयजयकार सदा ॥ १ ॥ नारायण घरीं सांठविलें धन । अवघेचि वाण तया पोटीं ॥ २ ॥ सवंग सकळां पुरे धणीवरी । सेवावया नारी नर वाळा

॥ ३ ॥ तुका म्हणे येणें आनंदें आनंदु । गोविंदें गोविंदु पिकविला ॥ ४ ॥

४४३० शृंगार ते एक विष्णुदास जगीं । पाप पुण्य अंगीं नातळे त्यां ॥ १ ॥ गोविंद आसनीं गोविंद शयनीं । गोविंद त्या मनीं बैसलासे ॥ २ ॥ ऊर्ध्वपुंड्र भाळीं कंठीं शोभे माळ । कांपिजे कळिकाळ तया भेणें ॥ ३ ॥ तुका म्हणे शंखचक्रांचे शृंगार । नामामृतसार मुखामाजीं ॥ ४ ॥

४४३१ पुनीत केलें विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ १ ॥ कोण पाहे तयांकडे । वीर विठ्ठलाचे गाढे ॥ अशुभ त्यांपुढें । शुभ होउनियां ठाके ॥ २ ॥ प्रेम सुखाचिया रासी । पाप नाहीं ओखदासी ॥ ३ ॥ तुका म्हणे त्यानीं । केली वैकुंठ मेदिनी ॥ ४ ॥

४४३२ भार देखोनि वैष्णवांचे । दूत पळाले यमाचे ॥ १ ॥ आले आले वैष्णव वीर । काळ कांपती असुर ॥ २ ॥ गरुडटकियांच्या भारें । भूमि गर्जे जयजयकारें ॥ ३ ॥ तुका म्हणे काळ । पळे देखोनियां वळ ॥ ४ ॥

४४३३ भावबळें विष्णुदास । नाहीं नाश पावत ॥ १ ॥ योगभाग्यें घरा येती । सर्व शक्ती चालत ॥ २ ॥ पित्याचें जें काय धन । पुत्रा कोण वंचील ॥ ३ ॥ तुका म्हणे कडे बैसों । तेणें असों निर्भर ॥ ४ ॥

४४३४ लवविलें तयासवें लवेंजली । अभिमानाहातीं सांपडेना ॥ १ ॥ सोंवळेंचि लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ॥ २ ॥ अर्चन वंदन नवविधा भक्ती । दया क्षमा शांति तया ठायीं ॥ ३ ॥ तये गांवीं नाहीं दुःखाची वसती । अवघाचि भूतीं नारायण ॥ ४ ॥ अवघींचि झालें सोंवळें ब्रह्मांड । विटाळाचें तोंड न देखती ॥ ५ ॥ तुका म्हणे गाजे वैकुंठीं सोहळा । याही भूमंडळामाजीं कीर्ति ॥ ६ ॥

उद्का शिवादिक । नित्य मस्तक रेषा लाविती ॥ ५ ॥ ऐसा दुर्लभ हरिराजा । वर्णितां होती चतुर्भुजा । जडजीवां तारिल केशव माझा । उभारोनि भुजा सांगे नामा ॥ ६ ॥

४४४५ वैष्णवांचे घरीं मांडिला पाहुणचार । नामाचा वोगर वाढियेला ॥ १ ॥ ध्यारे तारंभरी जेवा पोटभरी । आनंदगजरीं रामनाम ॥ २ ॥ होईल पायरव दुर्जना न सांगावें । एकांतीं सेवावें नामा म्हणे ॥ ३ ॥

४४४६ नित्य सर्वकाळ पुण्याचिया राशी । हरिनाम आलिया जिव्हेसी । नित्य तपानुष्ठानाच्या राशी । कोटी यज्ञासी लाभ झाला ॥ १ ॥ धन्य धन्य त्याचा वंश । जे जे रतले नामास । रामनामीं नित्य सौरस । ते विष्णुदास पवित्र जाणा ॥ २ ॥ पवित्र ते स्वधर्मी । ज्यांसी सर्वकाळ नेम नामीं । तयांचें नाम पूर्णकामी । मनोरथ पुरतील ॥ ३ ॥ नामा जपे नाम हरिचें । सार्थक केलें संसाराचें । ओझें फेडिलें पूर्व जन्मींचें । हरी स्मरण केलिया ॥ ४ ॥

## श्रीजनाबाई

४४४७ विष्णुमुद्रेचा अंकिला । तोचि वैष्णव एक भला ॥ १ ॥ अहं जाळोनि अंगारा । सोहं भस्मी तीर्थ सारा ॥ २ ॥ विष्णु माया द्वारावती । भक्तिमुद्रा त्या मिरवती ॥ ३ ॥ पंचायतन पूजी भावें । अहं सोहं भस्मी नांवें ॥ ४ ॥ प्रेमतुळसी कानीं । म्हणे नामयाची जनी ॥ ५ ॥

४४४८ वैष्णव तो एक इतर तीं सोंगें । ठसे देउनी अंगें चिता-रिती ॥ १ ॥ जिचे योनि जन्मला तिसी दंडूं लागला । तीर्थरूप केला देशधडी ॥ २ ॥ नाइकोन ब्रह्मज्ञान जो का दुराचारी । अखंड द्वेष करी सज्जनांचा ॥ ३ ॥ विद्येच्या अभिमानें नाइके कीर्तन । पाखांडी हें म्हणे करिती काई ॥ ४ ॥ पंचरस पात्रा कांता हे वडाविती । उद्धरलों म्हणती आम्ही संत ॥ ५ ॥ कीर्तनाचा द्वेष करी तो चांडाळ । तयाचा

विटाळ मातंगीसी ॥ ६ ॥ वैष्णव तो एक चोखामेळा महार । जनी म्हणे निर्धार केला संतीं ॥ ७ ॥

४४४९ आले वैष्णवांचे भार । दिले हरिनाम नगार ॥ १ ॥ अवघी दुमदुमली पंढरी । कडकडाट गरुडपारीं ॥ २ ॥ टाळ मृदंग घुमाळी । रंगणीं नाचे वनमाळी ॥ ३ ॥ ऐसा आनंद सोहळा । दासी जनी पाहे डोळां ॥ ४ ॥

४४५० वैष्णव तो कबीर चोखामेळा महार । तिजा तो चांभार रोहिदास ॥ १ ॥ सजण कसाई वाया तो कसाब । वैष्णव तो शुद्ध एकनिष्ठ ॥ २ ॥ कमाल फुलार मुकुंद जोहरी । जिहीं देवद्वारीं वस्ती केली ॥ ३ ॥ राजाई गोणाई आणि तो नामदेव । वैष्णवांचा राव म्हणवितसे ॥ ४ ॥ त्या वैष्णवचरणीं करी ओंवाळणी । तेथें दासी जनी शरीराची ॥ ५ ॥

## श्रीभानुदासमहाराज

४४५१ जें सुख क्षीरसागरीं देखिजे । तें या वैष्णवामंदिरीं देखिजे ॥ १ ॥ धन्य धन्य तें वैष्णवमंदीर । जेथें नामघोष होय निरंतर ॥ २ ॥ दिंडी पताका द्वारीं तुळशीवृंदावनें । मन निवताहे नामसंकीर्तनें ॥ ३ ॥ ज्याचिया दरुशनें पापताप जाय । भानुदास तयासी गीतीं गाय ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४४५२ आवडे देवासी तो ऐका प्रकार । नामाचा उच्चार रात्रंदिन ॥ १ ॥ तुळसीमाळ गळां गोपीचंदन टिळा । हृदयीं कळवळा वैष्णवांचा ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी पंढरीची वारी । साधन निर्धारीं आन नाहीं ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं ऐसा ज्याचा नेम । तो देवा परम पूज्य जगीं ॥ ४ ॥

४४५३ सुखरूप धन्य जाणावा संसारीं । सदा वाचे हरी उच्चारी जो ॥ १ ॥ रामकृष्ण नाम वदे वेळोवेळां । हृदयीं कळवळा संत-

भेटी ॥ २ ॥ एकाजनार्दनीं प्रेमाचा कल्लोळ । मुक्तिमुक्ति सकळ वले देव ॥ ३ ॥

४४१४ बकाचिये परी ध्यान नको धरूं । जीवेंभावें धरू संत-चरण ॥ १ ॥ मग ते तात्काळ करती पावन । ऐसें अनुमोदन आहे शास्त्रीं ॥ २ ॥ ध्यानाचें ध्यान संतांचे चरण । काया वाचा मन दृढ ठेवी ॥ ३ ॥ वाच्य तें वाचक संत ते व्यापक । एकाजनार्दनीं देव अंतर्बाहीं ॥ ४ ॥

४४१५ वैष्णवां घरीं देव सुखावला । नवजाय दवडोनी बाहेरी घातला ॥ १ ॥ देव म्हणे माझें पुरतसे कोड । संगती गोड या वैष्णवांची ॥ २ ॥ जरी देव नेऊनी घातिला दुरी । परतोनी पाहे तंव घराभीतरीं ॥ ३ ॥ कीर्तनाची देवा आवडी मोठी । एकाजनार्दनीं पडली मिठी ॥ ४ ॥

४४१६ पंढरीये देव आला । संतभारें तो वेष्टिला ॥ १ ॥ गुळा-सवें गोडी जैसी । देवासंगें दाटी तैसी ॥ २ ॥ झालें दोघां एक-विस । म्हणोनी उभाचि तिष्ठत ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं भाव । संतां-पायीं ठेविला जीव ॥ ४ ॥

४४१७ पवित्र तो देह सदा ज्याचा नेम । वाचे गाय राम सर्व भावें ॥ १ ॥ धन्य तो भाग्याचा तरला संसार । परमार्थाचें घर नाम मुखीं ॥ २ ॥ करितसे कथा कीर्तनीं आवडी । ब्रह्मज्ञान जोडी तया लाभे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं धन्य तें शरीर । परमार्थ संसार एकरूप ॥ ४ ॥

४४१८ सहस्र मुखांचा वर्णितां भागला । तें सुख तुजला प्राप्त कैचें ॥ १ ॥ संतांचे संगतीं सुख तें अपार । नाहीं पारावार सुखा भंग ॥ २ ॥ एकाजनार्दनीं सुखाचीच राशी । उभा हृषीकेशी विटे-वरी ॥ ३ ॥

४४१९ गव्हांची राशी जोडिल्या हातीं । सकल पक्वान्नें तें होती

॥ १ ॥ ऐसा नरदेह उत्तम जाण । वाचे वदे नारायण ॥ २ ॥ द्रव्य जोडतां आपुले हातीं । सकळ पदार्थ घरा येती ॥ ३ ॥ भावें करीं संतसेवा । एकाजनार्दनीं प्रिय देवा ॥ ४ ॥

४४६० नरदेहींचा हाचि मुख्य स्वार्थ । संतसंग करी परमार्थ ॥ १ ॥ आणिक नाहीं पां साधन । मुखीं हरिहरि स्मरण ॥ २ ॥ सोडीं द्रव्य दारा आशा । संतसंगें दशा पावावी ॥ ३ ॥ जरी पोखलें शरीर । तरी तें केव्हांही जाणार ॥ ४ ॥ जनार्दनाचा एका म्हणे । संतांपायीं ठाव देणें ॥ ५ ॥

४४६१ सकळ तीर्थें उत्तम । घडती करितां नामस्मरण । देवाधिदेव उत्तम । तोही धांवे सामोरा ॥ १ ॥ पहाहो वैष्णवांचे घरीं । सकळ तीर्थें कामारी । रिध्दिसिध्दि मोक्ष चारी । दास्यत्व करिती सर्वदा ॥ २ ॥ शरण एकाजनार्दनीं । तीर्थांचा तो अधिष्ठानी । नामस्मरण अनुदिनीं । तया तीर्थें वंदिती ॥ ३ ॥

४४६२ जयाचिये द्वारीं तुळसीवृंदावन । धन्य तें सदन वैष्णवांचें ॥ १ ॥ उत्तम चांडाळ अथवा सुशील । पावन सकळ वैकुंठीं होती ॥ २ ॥ जयाचिया गळा तुळशीमाळा । यम पदकमळा वंदी त्याच्या ॥ ३ ॥ गोपीचंदन उटी जयाचिया अंगीं । प्रत्यक्ष देव जगीं तोचि धन्य ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं तयाचा सांगात । जन्मोजन्मीं प्राप्त हो कां मज ॥ ५ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४४६३ आनंदले वैष्णव गर्जती नामें । चौदाही भुवनें भरलीं परब्रह्में ॥ १ ॥ नरोहरी हरि नारायणा । सनकसनंदन मुनिजनवंदन ॥ धृ० ॥ गातां वातां नाचतां प्रेमें उल्हासें । चराचरींचे दोष नासिले अनायासें ॥ २ ॥ हरी मनीं हरी चित्तीं हरी अंकु शरीरीं । तयातें देखोनि हरि चाऱ्ही बाह्या पसरी ॥ ३ ॥ अंघ्रि रेणु ज्याचा उद्धरितो पतिता । प्राकृत वाणी कोवि वर्णु हरिभक्तां ॥ ४ ॥ तीर्थां पावन धर्म

जिहीं केला घवोती । कैवल्यकल्पद्रुम ते त्रिजगतीं ॥ ५ ॥ मत्स्य कूर्मादिक ज्याचे महिमेसी आले । धन्य वैष्णव तेज रविशशिसी पाहालें ॥ ६ ॥ बापरखुमादेविवरा पाहिंयेती जया तनु । तया संतचरणीं स्थिर हो कां मनु ॥ ७ ॥

४४६४ कुंचे पताकांचे भार । आले वैष्णव डिंगर । जेणें पळती यमकिंकर । नामें अंबर गर्जतसे ॥ १ ॥ आले हरिदासांचे थाट । कळिकाळा नाहीं वाट । विठ्ठल नामें करिती बोभाट । सुक्षां वाट सांपडली ॥ २ ॥ टाळ घोळ चिपळ्या नाद । दिंडी पताका मकरंद । नाना वागडियाचे छंद । कवच अभेद नामाचें ॥ ३ ॥ वैष्णव चालिले गर्जत । महावीर ते अद्भुत । पुढें यमदूत पळत । पुरला अंत महादोषा ॥ ४ ॥ निवृत्ति संत हा सोपान । महावैष्णव कठीण । मुक्ताबाई तेथें आपण । नारायण जपतसे ॥ ५ ॥ ज्ञानदेव वैष्णव मोठा । विठ्ठलनामें सुकपेठा । स्नान दान घडे श्रेष्ठा । वैकुंठवाटा संत गेले ॥ ६ ॥

---

## मदालसा

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

४४६५ श्रीगुरु देवराया प्रणिपातु जो माझा । मनादि मूळ तूंचि विश्वव्यापका बीजा । समाधि घेई पुत्रा स्वानंदाचिया भोजा । पालखीं पहुडलिया नाशिवंतरे माया ॥ १ ॥ जागरे पुत्रराया जाई श्रीगुरुशरण । देह तूं व्यापिलासि चुकवीं जन्ममरण । गर्भवासु बोलटारे तेथें दुःख दारुण । सावध होईकारे गुरुपुत्र तूं सुजाण ॥ धृ० ॥ मदालसा म्हणे पुत्रा एक बोलणें माझें । चौऱ्यांशीं घरांमाजीं मन व्याकुळ तुझें । बहुत सिणतोसी पाहतां विषयांसी वोझें । जाण हें स्वस्वरूप येथें नाहीं वा दुजें ॥ २ ॥ सांडिरे सांडि बाळा

सांडि संसारछंदु । मारिया मोहळरे रचियेलारे कंदु । झाडूनि आणिली नेला तया फुकटाचि वेधु । तैसी परी होईल तुज उपदेशें आनंदु ॥ ३ ॥ सत्व हे रज तम तुज लाविती चाळा । काम क्रोध मद मत्सर तुज गोविती खेळा । यांसवें झणें जासी सुकुमारारे बाळा । अपभ्रंशीं घालतील सुकासिल सर्वस्वाला ॥ ४ ॥ कोसलियानें घर सुदृढ पैं केलें । निर्गमु न विचारितां तेणें सुख मानियेलें । जालें रे तुज तैसें यातायाति भोगाविलें । मोक्षद्वार चुकलासि दृढ कर्म जोडलें ॥ ५ ॥ सर्पे पैं दर्दुर धरियेला रे मुखीं । तेणेंहि रे मारी धरियेली पक्षी । तैसा नव्हे ज्ञानबोधु आपआपणातें भक्षी । इंद्रियां घालीं पाणी संसारीं होइ रे सुखी ॥ ६ ॥ पाखिया पाखिणीरे निरंजनीं ये वनीं । पिलिया कारणें रे गेली चारया दोन्ही । मोहोजाळें गुंतलीं रे प्राण दिधले टाकुनी । संसार दुर्घट हा विचारु पाहे परतुनीं ॥ ७ ॥ जाणत्या उपदेशु नेणता भ्रांती पडिला । तैसा नव्हे ज्ञानप्रकाशु ज्ञानदेवो अनुवादला । अनुभवीं गुरुपुत्र तोचि स्वयें बुझाला । ऐक त्या उद्धरणा गायक सहज उद्धरला ॥ ८ ॥

---

# वासुदेव

## श्रीतुकाराममहाराज

राम राम दोन्ही अक्षरें । सुलभ आणि सोपारें । जागा मागिलिया पाहारें । शेवटिंचें गोड तेंचि खरें गा ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेवा । जाणवी जनास वाजवी चिपळिया । टाळ घागऱ्या घोषें गा । रामकृष्ण वासुदेवा ॥२॥ गाय वासुदेव वासुदेवा । भिन्न नाहीं आणिका नांवा । दान जाणोनियां करीं आवा । न ठेवीं उरी कांहीं ठेवा गा ॥३॥ एक वेळा जाणविती । धरूनियां राहा चित्तीं । नेघें भार सांडीं काम्याहातीं । नीज घेउनीयां फिरती गा ॥ ४॥ सुपात्रीं सर्व भाव । मी

तों सर्व वासुदेव । जाणती कृपाळू संत महानुभाव । जया भिन्न भेद नाहीं ठाव गा ॥ ५ ॥ शूर दान जीवें उदार । नाहीं वासुदेवीं विसर । कीर्ति वाढे चराचर । तुका म्हणे तया नमस्कार गा ॥ ६ ॥

४४६७ बोल बोले अबोले । जागे बाहेर आंत निजेले । कैसें घरांत घरकुल केलें । नेणों अंधार ना उजेडलें गा ॥ १ ॥ वासुदेव करितों फेरा । वाडियांत बाहेर दारा । कोणी कांहीं तरी दान पुण्य करा । जाव न घाल तरी जातों माघारा गा ॥ २ ॥ हातीं टाळ दिंडी मुखीं नाम गाणें । गजर होतो बहु मोठ्यानें । नाहीं निवाडिलीं थोर लाहानें । नका निजों भिकेच्या भेणें गा ॥ ३ ॥ मी वासुदेव तत्वता । कळों येईल विचारितां । आहे टाउका सभाग्य संतां । नाहीं दुजा आणीक मागता गा ॥४॥ काय जागाचि निजलासी । सुनें जागवूनि दारापासीं । तुझ्या हितासाठीं करी वसवसी । भेटी न घेसी वासुदेवासी गा ॥ ५ ॥ ऐसें जागविलें अवघें जन । होतें संचित तिहीं केलें दान । तुका म्हणे दुबळीं कोणकोण । गेलीं वासुदेवा विसरून गा ॥ ६ ॥

४४६८ रामकृष्ण गीतीं गात । टाळ चिपळ्या वाजवीत । छंदें आपुलिया नाचत । नीज घेउनी फिरत गा ॥ १ ॥ जनीं वनीं हा अवघा देव । वासनेचा पुसावा ठाव । मग बोळगतो वासुदेव । ऐसा मनीं वसूं द्यावा भाव गा ॥ २ ॥ निजनामाची थोर आवडी । वासुदेवासी लागली गोडी । मुखीं नाम उच्चारी घडोघडी । ऐसी करा हे वासुदेवजोडी गा ॥ ३ ॥ अवघा सारूनि शेवट जाला । प्रयत्न न चले कांहीं केला । जागा होई सांडूनि झोपेला । दान देई वासुदेवाला गा ॥ ४ ॥ तुका म्हणे रे धन्य त्याचें जिणें । जिहीं घातलें वासुदेवा दान । तया न लगे येणें जाणें । जालें वासुदेवीं राहणें गा ॥ ५ ॥

## श्रीकान्होबामहाराज

४४६९ मनु राजा एक देहपुरीं । असे नांदतु त्यासी दोघी नारी । पुत्र पौत्र संपन्न भारी । तेणें कृपा केली आम्हांवरी गा ॥ १ ॥ म्हणउनी आलों या देशा । होतों नाहीं तरी भुललों दिशा । दाता तो मज भेटला इच्छा । येउनी मारग दाविला सरिसा गा ॥ २ ॥ सवें घेउनि चौघेजण । आला कुमर सुलक्षण । कडे चुकवूनी कांटवण । ऐका आणिलो तीं कोण कोण गा ॥ ३ ॥ पुढें भक्तीनें धरिलें हातीं । मागें ज्ञान वैराग्य धर्म येती । स्थिर केलीं जीं आचपळें होतीं । सिध्द आणुनि लाविती पंथीं गा ॥ ४ ॥ केले उपकार सांगों काय । बाप न करी ऐसी माय । धर्में त्याच्या हे देखियेले पाय । दिले अखय अभय दान गा ॥ ५ ॥ होतों पीडत हिंडतां गांव । पोट भरे ना राहावया ठाव । तो येणें अवघा संदेह । म्हणे फेडियेला तुकयाचा बांधव गा ॥ ५ ॥

४४७० गातों वासुदेव मी ऐका । चित्त ठेवुनी ठायीं भाव एका । डोळे झांकुनी रात्र करूं नका । काळ करीत बैसला लेखा गा ॥ १ ॥ राम राम स्मरा आधीं । लाहो करा गांठ घाला मूळबंधीं । सांडा वाउगिया उपाधी । लक्ष लावूनि राहा गोविंदीं गा ॥ २ ॥ अल्प आयुष्य मानवी देह । शत गणिलें तें अर्ध रात्र खाय । पुढें बालत्व पीडा रोग क्षय । काय भजनासी उरलें तें पाहे गा ॥ ३ ॥ क्षणभंगुर नाहीं भरवंसा । व्हारे सावध तोडा माया आशा । कांहीं न चले मग गळां पडेल फांसा । पुढें हुशार थोर आहे ओळसा गा ॥ ४ ॥ कांहीं थोडें बहुत लागपाठ । करा भक्ति भाव धरा वळकट । तन मन ध्यान द्या लावुनियां नीट । जरी करणें असेल गोड शेवट गा ॥ ५ ॥ विनवितों सकळां जनां । कर जोडुनि थोरां लहानां । दान इतुकेंचि द्या मज दीना । म्हणे तुकया बंधु राम म्हणा गा ॥ ६ ॥

४४७१ गेले टळले पहार तीन । काय निजसुरा निजसी अज्ञान । जागे होउनि कांहीं करा दान । नका झांकूं ऐकोनि लोचन गा ॥ १ ॥ हरे राम कृष्णा । वासुदेव जाणवितसे जना । चिपळया टाळ हातीं विणा । मुखीं घोष नारायणा गा ॥ ३ ॥ जें टाकेल कोणा कांहीं । फळ पुष्प अथवा तोयीं । या परी भीस घेऊं नका भाई । पुढें विन्मुख होतां बरें नाहीं गा ॥ ३ ॥ देवाकारणें भाव तस्मात । द्यावें न लगे फारसें वित्त । जालें एकाचिस तरी बहुत । तेवढ्यासाठीं नका करूं घाताहात गा ॥ ४ ॥ आलों तेथवरी बहु सायासें । करितां दान हेंचि मागायास । नका भार घेउं करूं निरास । धर्म सारफळ संसारास गा ॥ ५ ॥ आतां मागुता येईल फेरा । हें तों न घडे या नगरा । म्हणे तुकयाबंधु भाव धरा । ओळखी नाहीं तरी जाल अघोरा गा ॥ ६ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४४७२ बाबा अहंकार निशीं घनदाट । गुरुवचनीं फुटली पहांट । माता भक्ति भेटली वरवंट । तिनें मार्ग दाविला चोखट गा ॥ १ ॥ नरहरी रामा गोविंदा वासुदेवा ॥ ध्रु० ॥ एक बोल सुस्पष्ट बोलावा । वाचे हरि हरि म्हणावा । संतसमागमु धरावा । तेणें ब्रह्मानंद होय आघवा गा ॥ २ ॥ आला सीतळ शांतीचा वारा । तेणें सुख झालें शरीरा । फिटला पातकांचा थारा । कळीकाळासी धाक दरारा गा ॥ ३ ॥ अनुहात वाजती टाळ । अनुक्षीर गीत रसाळ । अनुभव तन्मय सकळ । नामा म्हणे केशव कृपाळु गा ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४४७३ धन्य जगीं तोचि एक हरिरंगीं नाचे । रामकृष्ण वासुदेव सदा स्मरे वाचे ॥ १ ॥ सुखदुःख समान सकळ जीवांचा कृपाळ । ज्ञानाचा उद्‍बोध भक्तिप्रेमाचा कल्लोळ ॥ २ ॥ विषयीं विरक्त जया नाहीं आपपर । संतुष्ट सर्वदा स्वयें व्यापक निर्धार ॥ ३ ॥ जाणीव

राहाणीव वोझें सांडोनियां दुरी । आपण वस्तीकर वर्ततसे संसारीं ॥ ४ ॥ एकाजनार्दनीं नित्य हरीचें कीर्तन । आसनीं शयनीं सदा हरीचें चिंतन ॥ ५ ॥

४४७४ जया परमार्थी चाड । तेणें सांडावें लिगाड । धरुनी भजनासी चाड । नित्य नेम आदरें ॥ १ ॥ सांडी मांडी परती टाकीं । वासुदेव नाम घोकीं । मोक्ष येईल सुखीं । नाम स्मरतां आदरें ॥ २ ॥ रामकृष्ण वासुदेवा । धरीं हाचि दृढभावा । आणिकाचा हेवा । दुरी करीं आदरें ॥ ३ ॥ घालों संतांसी आसनें । पूजा करी कायावाचामनें । एकाजनार्दनीं जाणे । इच्छिलें तें पुरवी ॥ ४ ॥

४४७५ सुखें सेऊं ब्रह्मानंदा । गाऊं रामनाम सदा । नोहे मग बाधा । काळ दूत यमाची ॥ १ ॥ करूं वासुदेव स्मरण । तेणें तुटे रे बंधन । खंडेल कर्माचें वदन । वासुदेव जपतांची ॥ २ ॥ तीर्थयात्रे सुखें जाऊं । वाचे विठ्ठलनाम घेऊं । संतांसंगें सेवूं । वासुदेव धणीवरी ॥ ३ ॥ लोभ ममता दवडूं आशा । उदरव्यथेच्या वोळसा । न करूं आणिक सायासा । वासुदेवावांचुनी ॥ ४ ॥ मुख्य वर्माचें हें वर्म । येणें साधे सकळ धर्म । एकाजनार्दनीं नाम । वासुदेव आवडी ॥ ४ ॥

४४७६ वासुदेव स्मरणें तुटती जन्ममरण व्याधी । अहं सोहं कोहं मूळ ह्या सांडी उपाधी ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेव गोपाळ वाचे आठवा । जन्म जरा तुटे वाचे आठवितां सांठवा ॥ २ ॥ चिपळ्या टाळ घुळघुळा शब्द नादे । तेणें ब्रह्मानंद हृदयीं आठवण नांदे ॥ ३ ॥ एकाजनार्दनीं वासुदेव चिंतितां । यम काळ दूत पळती नाम ऐकतां ॥ ४ ॥

४४७७ वासुदेवस्मरण पापहरणाचें मूळ । तीर्थांचें माहेर ब्रह्म व्यापक निश्चळ । अघनाशी मुखीं स्मरतां वाचा झाली निर्मळ । त्रिविध ताप शोधुनी रूपीं स्वरूपीं सुमंगळ ॥ १ ॥ ॐ नमो भगवते

रामकृष्ण वासुदेवा ॥ धृ० ॥ जपतप अनुष्ठान व्यर्थ कासया करणें। तीर्थ व्रत यम नेम नलगे दैवता धरणें। आसनमुद्रा ज्ञान ध्यान नलगे वाराणसी मरणें। केशव माधव अच्युत वदतां होय पातक-हरणें ॥ २ ॥ शरीरशोषण प्राणनिरोधन मनोजय हटयोग। गुद-पीडन कुंडलिनी कलिमलदल भंग। ऊर्ध्व वायुचा श्वेतु तोडोनी करि वो वनभंग। ब्रह्मरंध्रीं मिसळे परी मुमुक्षु दंग ॥ ३ ॥ मनोजय वासना तोडोनी केली बीमोडी। मनपुर नगर पहातां दुर्गति मोडी। काम क्रोध मद मत्सर अहंकार झोडी। अखंड परमानंद सेउनी उभवी गुढी ॥ ४ ॥ भेदभाव तोडोनियां घेतला प्रेमाचा गरळा। शुद्ध नाम श्रीहरीचें निजमुखीं लागला चाळा। हरिस्मरणाचेनी बळें अंकित केलें कळिकाळा। एकाजनार्दनीं अखंड सुखसोहळा ॥ ५ ॥

४४७८ मी वासुदेव नामें फोडितों नित्य टाहो। देखिले पाय आतां मागतों दान द्याहो। सावळें रूप माझ्या मानसीं नित्य राहो। पावन संतवृंदें सादरें दृष्टि पहा हो ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेवा। हरिरामकृष्ण वासुदेवा ॥ धृ० ॥ सांडोनी सर्व चिंता संतपदीं लक्ष लागो। मुक्त मी सर्वसंगीं सर्वदा वृत्ति जागो। भाविक प्रेमळांच्या संगतीं चित्त लागो ॥ २ ॥ अद्वैतेंची चालो अक्षयीं भक्तियोग। स्वप्नींहीं मानसातें नातळो द्वैतसंग। अद्वयानंदवेधें नावडो अन्य भोग। अक्रियत्वचि वाहो सक्रियारूप बोध ॥ ३ ॥ पहातां विश्व-मातें निजरूप दाखवी। सत्कथा श्रवण कर्णीं पीयूष चाखवी। रसनें नाममंत्र सर्वदा प्रेम देई। तोषला देवराणा म्हणे बा रे घेई ॥ ४ ॥ हें दान पावलें गा सद्गुरु शांतलिंगा। हें दान पावलें गा आत्मया पांडुरंगा। हें दान पावलें गा व्यापका अंतरंगा। हें दान पावलें एकाजनार्दनीं दोष जाती भंगा ॥ ५ ॥

४४७९ कर जोडूनि विनवितो तुह्मां। तुम्ही वासुदेव वासुदेव म्हणा। नको गुंतूं विषयकामा। तुम्हीं आठवा मधुसूदना ॥ १ ॥

नरदेह दुर्लभ जाणा। शत वर्षांची गणना। त्यामध्यें दुःख यातना। तुम्ही आठवा मधुसूदना ॥ २ ॥ नलगे तीर्थांचें भ्रमण। नलगे दंडण मुंडण। नलगे पंचाग्नि साधन। तुम्ही आठवा मधुसूदना ॥ ३ ॥ हेचि माझी विनवणी। जोडितों कर दोन्ही। शरण एकाजनार्दनीं। तुम्हीं वासुदेव म्हणा अनुदिनीं ॥ ४ ॥

श्रीज्ञानेश्वरमहाराज

४४८० बावा ममतानिशी अहंकार दाट। रामनामें वासुदेवीं वाट। गुरुकृपें वोळलें वैकुंठ। तेणें वासुदेव दिसे प्रगट गा ॥ १ ॥ वासुदेवा हरि वासुदेवा। रामकृष्ण हरि वासुदेवा ॥ ध्रु० ॥ आला पुंडलीक भक्तराज। तेणें केशव वोळला सहज। दिधलें विठ्ठल-मंत्रबीज। तेणें जालें सर्व काज गा ॥ २ ॥ रामकृष्ण वासुदेवें। वैष्णव गाताती आघवे। दिंडी टाळ प्रेमभावें। वासुदेवीं मन सामावे गा ॥ ३ ॥ शांति क्षमा दया धुरीं। वासुदेव घरोघरीं। आनंदें वोसंडले अंबरीं। प्रेमें डुले त्रिपुरारी गा ॥ ४ ॥ वासुदेवीं ज्ञेय ज्ञान। ध्यानीं मनीं नारायण। वासुदेव परिपूर्ण। कैसें स्फुरलेंसे चैतन्य गा ॥ ५ ॥ वासुदेवीं वाहूनि टाळी। पातकें गेलीं अंतराळीं। वासुदेवो वनमाळी। कीर्तन करूं ब्रह्ममेळीं गा ॥ ६ ॥ ज्ञानदेवा वासुदेवीं प्रीति पान्हा उजळी दिवो। टाळ चिपळी धरूनि जिवीं। ध्यान मुद्रा महादेवीं ॥ ७ ॥

४४८१ घुळघुळा वाजती टाळ। झणझणां नाद रसाळ। उदो जाली पाहाली वेळ। उठा वाचे वदा गोपाळ ॥ १ ॥ कैसा वासुदेव बोलतो बोल। बाळापोटीं माय रिघेल। मेलें माणूस जीत उठवील। वेळ काळातें ग्रासील ॥ २ ॥ आतां ऐसेंची अवघे जन। येतें जातें तयापासून। जगीं जग झालें जनार्दन। उदो प्रगटलें चिंवलें भान ॥ ३ ॥ टाळटाळीं लोपला नाद। अंगोअंगीं मुराला छंद। भोग भोगितांचि आटला भोग। ज्ञान गिळूनि गावा गोविंद ॥ ४ ॥ गांवा आंत बाहेरी

हिंडे आळी । देवों देविची केली चिपळी । चरण नसतां वाजे धुमाळी । ज्ञानदेवाची कांति सांवळी ॥ ५ ॥

### श्रीसेनामहाराज

४४८२ टळोनि गेले प्रहर तीन । काय निजतां झांकोन लोचन । आलों मागावया दान । नका विन्मुख होऊं जाण गा ॥ १ ॥ रामकृष्ण वासुदेवा । जाणवितों सकळ जीवां । द्या मज दान वासुदेवा । मागुता फेरा नाहीं या गांवा गा ॥ २ ॥ आलों दुरुनी सायास । द्याल दान मागायास । नका करूं माझी निरास । धर्मसार फळ संसारास गा ॥ ३ ॥ एक भाव देवाकारणें । फारसें नलगे देणें घेणें । करा एकचित्त रिघा शरण । हेंचि मागणें तुम्हांकारणें गा ॥ ४ ॥ नका पाहूं काळ वेळा । दान देई वासुदेवा । म्हा सावध झोंपेला । सेना न्हावी चरणीं लागला गा ॥ ५ ॥

---

# आंधळे

### श्रीतुकाराममहाराज

४४८३ सहज मी आंधळा गा । निजानिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें । मी माझें हारपलें । ठायीं जेथींच्या तेथें । अदृश्य तेंचि जालें कांहीं दृश्य जें होतें ॥ १ ॥ सुखें मी निजलों गा शून्य सारुनी तेथें । त्रिकूटशिखरीं गा । दान मिळे आइतें ॥ २ ॥ टाकिली पात्र झोळी । धर्म अधर्म आशा । कोल्हाळ चुकविला । त्रिगुणांचा वोळसा । न मागें मी भीक आतां । हाचि झाला भरवंसा । वोळली सत्रावी गा । तिणें पुरविली इच्छा ॥ ३ ॥ उर्ध्वमुखें आळविला । सोहं शब्दाचा नादु । अरूप जागविला । दाता घेऊनीयां छंदु । घेऊनी आला दान । निजतत्त्व निजबोधु । स्वरूपीं मेळविलें । नांव ठेविला भेदु ॥ ४ ॥ शब्द हा बहुसार । उपकाराची

राशी । म्हणोनि चालविला । मार्गे येतील त्यांसी । मागोनी आली वाट । सिद्ध ओळखीची तैसी । तरले तरती गा । आणिकही विश्वासी ॥ ५ ॥ वर्म तें एक आहे । दृढ धरावा भाव । जाणीव नागवण । लागों नेदी ते ठाव । म्हणोनि संग टाकीं । सेवीं अद्वैत-भाव । तुका म्हणे हाचि संतीं । मागें केला उपाव ॥ ६ ॥

४४८४ आंधळयां पांगळयांचा । एक विठोबा दाता । प्रसवला विश्व तोचि । सर्व होय जाणता । घडी मोडी हेळामात्रें । पापपुण्य-संचिता । भवदुःख कोण वारी । तुजवांचुनी चिंता ॥ १ ॥ धर्म गा जागो तुझा । तूंचि कृपाळू राजा । जाणसी जीवींचें गा । न सांगतां सहजा ॥ २ ॥ घातली लोळणी गा । पुंडलीकें वाळवंटीं । पंढरी पुण्यठाव । नीरे भींवरेतटीं । न देखे दुसरें गा । झाली अदृश्य दृष्टि । बोळला प्रेमदाता । केली अमृतवृष्टि ॥ ३ ॥ आणीक उपमन्यु । एक बाळ धाकुटें । न देखे न चलवे । जना चालते वाटे । घातली लोळणी गा । हरिनाम बोभाटें । पावला त्याकारणें । धांव घातली नेटें ॥ ४ ॥ बैसोनी खोळीं शुक । राहे गर्भीं आंधळा । शीणला येरझारीं । दुःख आठवी वेळा । मागील सोसिलें तें । ना भीं म्हणे गोपाळा । पावला त्याकारणें । लाज राखिली कळा ॥ ५ ॥ न देखे जो या जना । तया दावी आपणा । वेगळा सुखदुःखा । मोहो नाठवी धना । आपपर तेंही नाहीं । बंधुवर्ग सज्जना । तुकया तेची परी । जाली पावें नारायणा ॥ ६ ॥

४४८५ भगवंता तुजकारणें । मेलों जीताचि कैसी । निष्काम बुद्धि ठेली । चळण नाहीं तयासी । न चलती हात पाय । दृष्टि फिरली कैसी । जाणतां न देखों गा । क्षर आणि अक्षरासी ॥ १ ॥ विठोबा दान देगा । तुझ्या सारिखें नामा । कीर्ति हे वाखाणिली । थोर वाढली सीमा ॥ २ ॥ भुक्ति मुक्ति तूंचि एक । होसी सिद्धीचा दाता । म्हणोनि सांडवली । शोक भय लज्जा चिंता । सर्वस्वें त्याग

केला । धांव घातली आतां । कृपादान देईं देवा । येउनि सामोरा आतां ॥ ३ ॥ संसारसागरु गा । भवदुःखाचें मूळ । जनवाद अंथरुण । माजीं केलें इंगळ । इंद्रियें वज्रघातें । तपे उष्ण वरी जाळ । सोसिलें काय करूं । दुर्भर हें चांडाळ ॥ ४ ॥ तिहीं लोकीं तुझें नाम । वृक्ष पल्लव शाखां । वेंघलो वरि सोडा । भाव धरूनीं टेंका । जाणवी नरनारी । जागो धरम लोकां । पावती पुण्यवंत । सोईं आमुचिये हाका ॥ ५ ॥ नाठवे आपपर । आतां काय बा करूं । सारिखा दोहींसवा । हारपला विचारु । घातला योगक्षेम । तुज आपुला भारु । तुकया शरणागता । देईं अभयकरु ॥ ६ ॥

४४८६ देखत होतों आधीं मागें पुढें सकळ । मग हे दृष्टि गेली वरी आलें पडळ । तिमिर कोंदलेंसे वाढे वाढतां प्रबळ । भीत मी झालों देवा काय ज्याल्याचें फळ ॥ १ ॥ आतां मज दृष्टी देईं । पांडुरंगा मायबापा । शरण आलों आतां । निवारी या पापा । अंजन लेवूनी । करीं मारग सोपा । जाईन सिद्धपंथें । अवघ्या चुकतील खेपा ॥ २ ॥ होतसे खेद चित्ता । कांहीं नाठवे विचार । जात होतों जनामागें । तोहि सांडिला आधार । हा-ना-तोसा ठाव झाला । अवघा पडिला अंधार । फिरलीं माझीं मज । कोणी न देती आधार ॥ ३ ॥ जोंवरी चळण गा । तोंवरी म्हणती माझा । मानिती लहानथोर । देह सुखाच्या काजा । इंद्रियें मावळलीं । आला बागुल आजा । कैसें झालें विपरीत । तोचि देह नव्हे दुजा ॥ ४ ॥ गुंतलों या संवसारें । कैसा झालोंसे अंध । मी माझें वाढवूनी । मायातृष्णेचा बाध । स्वहित न दिसेचि । केला आपुला वध । लागले काळ पाठीं । सर्वे काम हे क्रोध ॥ ५ ॥ लागती चालतां गा । गुणदोषांच्या ठेसा । सांडिली वाट मार्ग । झालों निराळा कैसा । पाहातों वास तुझी । थोर करूनि आशा । तुका म्हणे वैद्यराजा । पंढरीच्या निवासा ॥ ६ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४४८७ मार्ग बहु असती परी तयांची न कळे गती । म्हणोनि पडियलों मायामोहभ्रांती । तेणें मी जाहलों अंध कोण धरील चित्तीं । मारितों हांका मोठयानें अहो उदार श्रीगुरुमूर्ति ॥ १ ॥ धांव धांव श्रीगुरुराया काढीं देऊनि हात । बुडतसे भवनदीमाजीं न कळे अंत । शिण बहु मज जाहला श्रमलों पाहत पाहत । यांतुनी सोडीं वेगीं तुम्हीं श्रीगुरु समर्थ ॥ २ ॥ वाटे आडवाट दरी दरकुटे यांमाजीं गुंतले । कन्या पुत्र स्त्री धन हें वर पाडिलें जाळें । कवण उगवील कवणा शरण जाऊं तें न कळे । करितों चिंता हृदयीं तंव श्रीगुरु भेटले ॥ ३ ॥ मार्ग हा दाविला जेथें नाहीं गोंवागुंती । श्रीगुरु प्रसन्न जाहले निवारली अवघी भ्रांती । एका शरण जनार्दनीं जाहली संतोषवृत्ती । अंधपण फिटलें निवारली पुनरावृत्ती ॥ ४ ॥

४४८८ आधीं देखत होतों सकळ । मग हो दृष्टि गेली आलें पडळ । चालतां मार्ग न दिसे केवळ । आतां मज करा कृपा मी दिन तुम्ही दयाळ ॥ १ ॥ दाते हो दान करा तुम्ही संत उदार । चालतां मार्ग दाखवा मज निर्धार । गुंतलों लोभ आशा कांहीं न कळे विचार । दृष्टीतें फिरवुनी द्या मुखीं नामाचा उच्चार ॥ २ ॥ त्रैलोक्यांत तुमची थोरी पुराणें वर्णिती साचार । वेदही तुम्हां गाती तयां न कळे निर्धार । कीर्ति गाती सनकादिक तो दाखवा श्रीधर । म्हणोनि धरिला मार्ग नका करूं अव्हेर ॥ ३ ॥ अंधपण सर्व गेलें श्रीगुरुचा आधार । तेणें पंथें चालतांना फिटला मायामोह अंधार । एकाजनार्दनीं देखिला परेपरता पर । श्रीगुरुजनार्दन कृपेनें दाविलें निजघर ॥ ४ ॥

४४८९ पंढरपुरपाटणीं गा महाराज सार्वभौम । पांडुरंग दिन-बंधु जयाचें तें नाम ॥ १ ॥ अंधळ्या जीवांचें तो जाणतो धर्म । म्हणोनि आलों गा देईं माझें मज वर्म ॥ ध्रु० ॥ असोनि हात पाय

डोळे जाहलों मी अंधळा । मुखीं नाम तुझें लागला वाचेसी चाळा ॥ २ ॥ देउनी दान मातें नाम सांगे ये काळीं । विठोबाचें दान आलें ऐसी देईन आरोळी ॥ ३ ॥ दान पावलें संतसंगें भक्तीचें । एकाजनार्दनीं अखंड नाम वाचे ॥ ४ ॥

श्रीज्ञानेश्वरमहाराज

२४९० पूर्वजन्मीं पाप केलें तें हें बहु विस्तारलें । विषयसुख नाशिवंत सेवितां तिमिर कोंदलें । चौऱ्यांशीं लक्ष योनी फिरतां दुःख भोगिलें । ज्ञानदृष्टि हारपली दोन्ही नेत्र आंधळे ॥ १ ॥ धर्म जागो सद्देवांचा जे वा परउपकारी । आंधळ्या दृष्टि देतो त्याचें नाम मी उच्चारीं ॥ २ ॥ संसार दुःखमूळ चहुंकडे इंगळ । विश्रांति नाहीं कोठें रात्रंदिवस तळमळ । काम क्रोध लोभ शुनी पाठी लागलीं ओढाळ । कवणा शरण जाऊं आतां दृष्टि देईल निर्मळ ॥ ३ ॥ माता पिता बंधु बहिणी । कोणी न पावती निर्वाणीं । इष्ट मित्र सज्जन सखे हे तों सुखाची मांडणी । एकला मी दुःख भोगीं कुंभपाक जाचणी । तेथें कोणी सोडविना एका सद्गुरुवांचूनी ॥ ४ ॥ साधुसंत मायबाप तिहीं केलें कृपादान । पंढरिये यात्रे नेलें घडलें चंद्रभागे स्नान । पुंडलिकें वैद्यराजें पूर्वीं साधिलें साधन । वैकुंठींचें मूळपीठ डोळां घातलें तें अंजन ॥ ५ ॥ कृष्णांजन एक वेळां डोळां घालितां अढळ । तिमिर दुःख गेलें फिटलें भ्रांतीपडळ । श्रीगुरु निवृत्तिरायें मार्ग दाविला सोज्वळ । बापरखुमादेविवरु विठ्ठल दिनाचा दयाळ ॥ ६ ॥

४८९१ देवा तुज चुकलों गा तेणें दृष्टी आलें पडळ । विषयग्रंथीं गुंतलोंसे तेणें होतसें विव्हळ । अंध मंद दृष्टी झाली गिळूं पाहे हा काळ । अवचित दैवयोगें निवृत्ति भेटला कृपाळ ॥ १ ॥ धर्म जागो निवृत्तीचा तेणें फेडिलें पडळ । ज्ञानाचा निजबोधु विज्ञानरूप सकळ ॥ २ ॥ तिहीं लोकीं विश्वरूप दिव्यदृष्टी दिधली ।

द्वैत हें हारपलें अद्वैतपणें माउली । उपदेशु निजब्रह्म ज्ञानांजन साउली । चिद्रूप दीप पाहे तेथें तनुमनु निवाली ॥ ३ ॥ दान हेंचि आम्हां गोड देहीं दृष्टी मुराली । देह हें हरपलें विदेह वृत्ति स्फुरली । विज्ञान हें प्रगटलें ज्ञेय ज्ञाता निमाली । दृश्य तें तदाकार ममता येथें बुडाली ॥ ४ ॥ प्रपंचु हा नाहीं जाणा एकाकार वृत्ति जाली । मी माझें हारपलें विषयांध या बोलीं । उपरती सद्गुरु बोधु तेथें प्रकृती संचली । शुद्धधर्म मार्गें पंथ हातीं काठी दिधली ॥ ५ ॥ वेदमार्गें मुनी गेले त्याची मार्गें चालिलों । न कळेचि विषयअंधा म्हणोनि उघड बोलिलों । चालतां धनुर्धरा तरंगाकारीं हारपलों । ज्ञानदेवो निवृत्तीचा द्वैत सर्व निरसलों ॥ ६ ॥

---

# पांगुळ

## श्रीतुकाराममहाराज

४४१२ पांगुळ जालों देवा नाहीं हात ना पाय । बैसलों जयावरी सैराट तें जाय । खेटितां कुपकांटी । खुंट दरडी न पाहे । आधार नाहीं कोणी । मज बाप ना माये ॥ १ ॥ दाते हो दान करा । जाते पंढरपुरा । न्या मज तेथवरी । अखमाचा सोयरा ॥ २ ॥ हिंडतां गव्हानें गा । शिणलों येरझारीं । न मिळेचि दाता कोणी । जन्मदुःख निवारी । कीर्ति हे संतांमुखीं । तोचि दाखवा हरी । पांगुळा पाय देतो । नांदे पंढरपुरीं ॥ ३ ॥ या पोटाकारणें गा । झालों पांगिला जना । न सरेचि मायबाप । भिकें नाहीं खंडणा । पुढारा म्हणती एक । तया नाहीं करुणा । श्वान हें लागे पाठीं । आशा बहु दारुणा ॥ ४ ॥ काय मी चुकलों गा । मार्गें नेणवेंचि कांहीं । न कळेचि पापपुण्य । येथें आठव नाहीं । मी माझी भुललों गा । दीप पतंगासोयी । द्या मज जीवदान । संत महानु-

भाव कांहीं ॥ ५ ॥ दुरोनी आलों मी गा । दुःख झालें दारुण । यावया येथवरी । होतें हेंचि कारण । दुर्लभ भेटी तुम्हां । पायीं झालें दरुषन । विनवितो तुका संतां । दोन्ही कर जोडून ॥ ६ ॥

४४९३ देश वेष नव्हे माझा । सहज फिरत आलों । करूं सत्ता कवणावरी । कोठें स्थिर राहिलों । पाय डोळे म्हणतां माझे । तिहीं कैसा मोकलिलों । परदेशीं नाहीं कोणी । अंध पांगुळ झालों ॥ १ ॥ आतां माझी करीं चिंता । दान देईं भगवंता । पाठीं पोटीं नाहीं कोणी । निरवीं सज्जन संतां ॥ २ ॥ चालतां वाट पुढें । भय वाटतें चित्तीं । बहुत जन गेले । नाहीं आले मागुतीं । न देखों काय झालें । काय तरी एकती । बैसलों संधिमार्गीं । तुज धरूनी चित्तीं ॥ ३ ॥ भाकितों करुणा गा । जैसा सांडिला ठाव । न भरेचि पोट कधीं । नाहीं निश्चळ पाव । हिंडतां भागलों गा । लक्ष चौऱ्यांशीं गांव । धरूनी राहिलों गा । हाचि वसता ठाव ॥ ४ ॥ भरंवसा काय आतां । कोण आणी अवचिता । तैसीच झाली कीर्ति । तया मज बहुतां । म्हणवुनी मारीं हाका । सोयी पावें पुण्यवंता । लागली भूक थोरी । तूंचि कृपाळू दाता ॥ ५ ॥ संचित सांडवलें । कांहीं होतें तें जवळी । वित्त गोत पुत्र माया । तुटली हे लागावळी । निष्काम जालों देवा । होतें माझे कपाळीं । तुका म्हणे तूंचि आतां । माझा सर्वस्वें वळी ॥ ६ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४४९४ जंबुया द्वीपामाजीं एक पंढरपुरगांव । धर्माचें नगर देखा विठो पाटील त्याचें नांव । चला जाऊं तया ठाया कांहीं भोजन मागाया ॥ १ ॥ विठोबाचा धर्म जागो । त्याचे चरणीं लक्ष लागो ॥ धृ० ॥ ज्यासीं नाहीं पंखपाय तेणें करावें तें काय । शुद्ध भाव धरोनियां पंढरीसी जाय । इच्छिलें फळ देतो यासी नवलाव तें काय ॥ २ ॥ सुदामा ब्राह्मण दुःखें दारिद्रें पीडिला । मुष्टिभर पोहे

घेऊनि त्याचे भेटीलागीं गेला। शुद्धभाव देखोनियां गांव सोनियाचा दिला ॥ ३ ॥ गण आणि गोत्रज सर्व हांसताती मज। गेलें याचें मनुष्यपण येणें सांडियेली लाज। विनवी तो शिंपी नामा संतचरणींचा रज ॥ ४ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४४९५ मी माझे कल्पनेनें जाहलोंसे पांगूळ। चालतां न चलवेचि कोठें न मिळे स्थळ। हिंडलों दिशा दाही श्रम जाहला केवळ। कवण ही भ्रांती वारी कैं भेटेल गुरुदयाळ ॥ १ ॥ धर्म जागो गुरुमहिमा देहीं दाविला देव। निवारुनी भवर जाळें अवघा निरसला भेव ॥ धृ० ॥ कर्म त्या अकर्माच्या लागती वाटे ठेंसा। संपत्ती विपत्तीचा मानिला भरवंसा। कन्या पुत्र आप्त जन हा तो सहज वोळसा। या भ्रमडोहीं बुडालों धांवे गुरुराया सर्वेशा ॥ २ ॥ येउनी गुरुनाथें माथां ठेविला करु। अज्ञान तिमिर गेलें शुद्ध मार्ग साचारू। गर्जत चालियेलों फिटला अज्ञान अंधारु। एकाजनार्दनीं माझा श्रीगुरु उदारू ॥ ३ ॥

४४९६ मृत्युलोकीं एक नगर त्याचें नांव पंढरपूर। तेथील मोकाशी उभा असे विटेवर। पुंडलिक भक्तराज शोभे चंद्रभागातीर। बोलती साधुसंत जिवा वाटे हुरहूर ॥ १ ॥ तुम्ही संत मायबाप येवढा उपकार करा। न्या मज तेथवरी दाखवा दिनांचा सोयरा ॥ धृ० ॥ मज नाहीं हात पाय डोळां पडली झांपड। कर्ण बधिर झाले वाचा बोले बोबड। नाक मुख गळूं लागलें लाळ आणि शेंबुड। श्वानापरी गती जाली अवघे करिती हाडहाड ॥ २ ॥ साधू संत मायबाप जे कां दयेचे सागर। भावाचें मुख्य स्थान भक्तीचें माहेर। तिहीं केलें कृपादान मस्तकीं ठेविला कर। मायामोह निरसली शुद्ध जालें कलेवर ॥ ३ ॥ भाव दिला मज संगें मार्ग दाविला नीट। भ्रांति हे समूळ

गेली दिसूं लागली वाट। नाचत प्रेमछंदें चालूं लागलों सपाट। एकाजनार्दनीं पावलों पंढरी पेठ ॥ ४ ॥

४४९७ सहज धुरपाटणीं गा एक जनार्दन दाता। पांगुळां पाय देतो विश्रांति समस्तां ॥ १ ॥ यालागीं नाम त्याचें दुःख निरसी मनाचें। पांगुळा जीवींचें तोचि चालवी साचें ॥ २ ॥ जीवें जिता मी पांगुळ दिधला निज बोध ढवळा। त्यावरि बैसोनि क्रीडे सर्वत्र स्वलीला ॥ ३॥ एकाएकु परम दीन अंध पंगु अज्ञान। जनार्दनें कृपा करून करवी निजसत्ता चलन ॥ ४ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४४९८ मृत्युलोकामाझारीं गा एक सद्गुरु साचारु। त्याचेनि गा दर्शनें तुटला हा संसारू। पांगुळा हस्तपाद देतो कृपाळु उदारु। यालागीं नांव त्याचें वेदा न कळे पारु ॥ १ ॥ धर्माचें वस्तिघर ठाकियलें वा आम्हीं। दान मागों ब्रह्म साचें नेघों द्वैत या उर्मी ॥ २ ॥ विश्रांति विजन आम्हां एक सद्गुरु दाता। सेवितां चरण त्याचे फिटली इंद्रियांची व्यथा। निमाली कल्पना आशा इळा पारिसा झगटतां। कैवल्य देह जालें उपरति देह अवस्था॥३॥ मन हें निमग्न झालें चरणस्पर्शीं तत्त्वतां। ब्रह्माहंस्फूर्ति आधीं भावो उमटला उलथा। पांगुळलें गुह्यज्ञान ब्रह्मरूपें तेथें कथा। अंध मग दृढ जालों निमाल्या विषयाच्या वार्ता ॥ ४ ॥ ऋद्धिसिद्धि दास्य सख्य आपेआप वोळलीं। दान मान मंद बुद्धि ब्रह्मरूपें लीन झालीं। वोळली कामधेनु पंगु तनु वाळली। पांगुळा जिवन मार्गु सतरावी हे वोळली ॥ ५ ॥ पांगुळ मी कल्पनेचा पंगु जालों पैं मनें। वृत्ति हे हारपली एका सद्गुरुरूपध्यानें। निवृत्तीसी कृपा आली शरण गेलों ध्येयध्यानें ॥ ६ ॥

४४९९ धर्म अर्थ काम मोक्ष दान मागे श्रीगुरु। हस्त पाद शरीर व्यथा पंगु झालों मी पुढारु। तिमिर आलें पुढें मायामोहो उदारु।

तेणें मी जात होतों मग सहज भेटला सद्‌गुरु ॥ १ ॥ धर्म जागो सद्‌गुरुमहिमा जेणें तुटे भवव्यथा । हाचि धर्म अर्थ काम येर तें मी नेघे वृथा ॥ धृ० ॥ एक नाम रामकृष्ण याचें दान देई सद्‌गुरु । वेद-शास्त्र मंथन केलें परि नव्हेचि पुढारु । शरण आलों निवृत्तिराया तोडी माया संसारु । पाहतां इये त्रिभुवनीं तुजहुनि नाहीं उदारु ॥ २ ॥ ज्ञानेसहित विज्ञान गिळी मी माझे पांगुळ । वृत्ति हे माझे ठायीं हृदयीं बुझे गोपाळ । शंख चक्र पद्म गदा तुष्टे ऐसा तूं दयाळ । बापरखुमादेविवरें दान देऊनि केलें अढळ ॥ ३ ॥

४९०० पूर्वप्राप्ती दैवयोगें पंगु जालों मी अज्ञान । विषयवुंथी घेऊनियां त्याचें केलें पोषण । चालतां धर्म बापा विसरलों गुह्य ज्ञान । अवचटें गुरुमार्गें प्रगट ब्रह्मज्ञान ॥ १ ॥ दाते हो वेग करा कृपाळुवा श्रीहरी । समता सर्वभावीं शांति क्षमा निर्धारीं । सुटेल विषयग्रंथी विहंगम आचारी ॥ २ ॥ शरण रिघे सद्गुरु पायां पांग फिटेल पांचाचा । पांगुळलें आपेंआप हा निर्धारु पैं साचा । मना-माजीं रूप घाली मी माजी तेथें कैंचा । हारपली देहबुद्धि एकाकार शिवाचा ॥ ३ ॥ निजबोधें धवळा शुद्ध यावरी आरूढ पैं गा । क्षीराब्धि बोध वाहे तेथें जाय पां वेगा । वासना माझी ऐसी करीं परिपूर्ण गंगा । नित्य हें ज्ञान घेई अद्वैत रूपलिंगा ॥ ४ ॥ पावन होशील आधीं पांग फिटेल जन्माचा । अंधपंगु विषयग्रंथी पावन होशी साचा । पांडुरंगु होसी आधीं फळ पीक जन्माचा । दुष्ट बुध्दि वेगीं टाकीं टाहो करीं नामाचा ॥ ५ ॥ ज्ञानदेव पंगुपणें पांगुळली वासना । मुरालें ब्रह्मीं मन ज्ञेय ज्ञाता पुरातना । दृश्य हें लोपलें बापा परती नारायणा । निवृत्ति गुरु माझा लागों त्याच्या चरणा ॥ ६ ॥

# आंधळा पांगळा

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४५०१ अंध पंगु दृढ झालों मायापडळ भ्रांती । कर चरण विव्हळ गेले तंव भेटले निवृत्ति । ज्ञान मज उपदेशिलें नेलें अज्ञान-क्षिती । वृक्ष एक तेथें होता त्या तळीं बैसाविलें रीतीं ॥ १ ॥ धर्म जागो निवृत्तीचा हरिनामें उत्सावो । कर्म धर्म लोपलें माझें माझा फिटला संदेहो । धर्म अर्थ काम पूर्ण दान मान संमोहो । नेघें मी इंद्रियवृत्ति रामकृष्णनामीं टाहो ॥ २ ॥ कल्पना मावळली कल्पवृक्षा घे तळवटीं । चिंता हे हारपली माझी नित्य अमृताची वाटी । मन हें निमग्न झालें नित्य वसे वैकुंठीं । तापत्रयें ताप गेले नाना दोषाचे थाटी ॥ ३ ॥ अनंत हें मायामय लोपलें जिवाचियासाठीं । हारपल्या योनीमाळा चिंतामणी कसवटी । सिध्दि बुद्धि समरसल्या जीवशिव एकदाटीं । आत्माराम मन जालें एकतत्त्व शेवटीं ॥ ४ ॥ आत्माराम निगमलें वेदशास्त्रगुह्यज्ञानें । वासनेचि मोहजाळी ते विराली नाना स्थानें । फुटले नाना घट तुटलीं नाना बंधनें । सुटल्या जीवग्रंथीं ऐसें केलें त्या दानें ॥ ५ ॥ मोक्ष हे ठेले मागें मुक्तिमार्गें निमाला । वृत्ति हे बुडाली माझी निवृत्ति गळाळा पाजिला । सत्रावी वोळली बाळा आत्माराम दाता जाला ॥ ६ ॥ बुद्धिबोध सर्वांगडे साजीव करचरण । नयनीं नयन जाले चक्षु मी समाधान । दिव्य देह अमृतकळा दशादिशा परिधान । सर्व हें ब्रह्म झालें फळद फळलें विज्ञान ॥ ७ ॥ निवृत्ति गुरु माझा अंधपण फेडिलों । सर्वत्र दृष्टी जाली एकतत्त्वीं राहिलों । निरसली माया मोहो श्रीराम अंजन लेइलों । ज्ञानदेव ज्ञानगंगे निवृत्तीनें बुडविलों ॥ ८ ॥

## श्रीएकनाथमहाराज

४५०२ असोनियां दृष्टी जाहलों मी आंधळा । आपांगिलें जिहीं

जाहलों त्यावेगळा । मायबाप माझे म्हणती मज माझ्या बाळा । शेवटीं मोकलिती देती हातीं काळा ॥ १ ॥ संत तुम्ही बापमाय माझी राखा कांहीं द्या । लागतों मी वारंवार तुमचीया पायां ॥ ध्रु० ॥ इंद्रियें माझीं न चलती क्षणभरी। गुंतलों मायामोहें या संसाराचे फेरीं । अंथरूण घातलें तें इंगळाचे शेजेवरी । कैशी येईल निद्रा कोण सोडवील निर्धारीं ॥ २ ॥ मायबाप तुम्ही संत उपकार करा । जगीं जो नांदतो जनीं एवढा जनार्दन तो खरा। तयाचिया चरणावरीं मस्तक निर्धारा । एकाजनार्दनीं करी विनंति अवधारा ॥ ३ ॥

४५०३ ॐकार निज वृक्ष त्यावरी वेघलो प्रत्यक्ष । दान मागों रामकृष्ण जनार्दना प्रत्यक्ष ॥ १ ॥ जालों मी अंध पंगु । माझा कोणी न धरिती संगु ॥ ध्रु० ॥ चालतां वाटमार्गीं मज कांहीं दिसेना । उच्चारिती नाम संतमार्गें चालिलों जाणा ॥ २ ॥ पाहुनी पंढरीपेठ अंधपणा फिटलों । एकाजनार्दनीं संतपायीं लीन झालों ॥ ३ ॥

४५०४ दाते बहुत असती परि न देती साचार । मागत्याची आशा बहु तेणें न घडे विचार । सम देणें सम घेणें या नाहीं प्रकार । लाजिरवाणें जिणें दोघांचे धर्म अवघा असार ॥ १ ॥ तैसा नोहे दाता माझा जनार्दन उदार । तुष्टला माझ्या देहीं दिधलें अक्षय अपार । न सरेचि कल्पांतीं माप लागलें निर्धार । मागतेपण हारपलें दैन्य गेलें साचार ॥ २ ॥ देउनी अक्षय दान पदा बैसविलें अढळ । मायामोह तृष्णा हाचि चुकाविला कोल्हाळ । एकाजनार्दनीं एकपणें निर्मळ । शरण एकाजनार्दना काया वाचा अढळ ॥ ३ ॥

४५०५ अंध पंगु दृढ जाहलों बांधलों संसारीं । मायामोह भरली नदीमाजीं दुस्तर मगरी । यांतून कोण सोडवील नानापरींचें दुःख भारी । दैवयोगें भेटला तो जनार्दन गुरु सत्वरीं ॥ १ ॥ धर्म जागो

जनार्दनाचा तेणें निवारिला फेरा । चुकविल्या चौऱ्यांयशीच्या तयानें वेरझारा । मोक्षप्राप्ति वाट जाहली दाविला सोयरा । जन्ममरणदु:ख गेलें जाहलों सैराट मोकळा ॥ २ ॥ घातिलें अंजन डोळां दिसों लागली वाट । मोकळा मार्ग जाहला चालिलों सैराट । श्रीगुरुजनार्दनमुखीं नामाचा बोभाट । एकाजनार्दनीं पावलों मूळची पेठ ॥ ३ ॥

## कोल्हाटीण

### श्रीएकनाथमहाराज

४५०६ सगुण गुण माया । आली कोल्हाटीण खेळाया ॥ ध्रु० ॥ प्रपंचाचा रोविला वेळू । चहूं शून्यांचा मांडिला खेळु । ब्रह्मा विष्णु जयाचे बाळु । लागती पायां ॥ १ ॥ आला गडे निर्गुणचा कोल्हाटी । सोहं शब्दें ढोलगें पिटी । चैतन्याची उघडून दृष्टी । चला जाऊं पहाया ॥ २ ॥ कोल्हाटीण मारिती ऐशी उडी । एकवीस स्वर्गांवरती माडी । देखे द्वार खिडकी उघडी । अगाध माया ॥ ३ ॥ कोल्हाटीण बसली असे डोळां । जाणे गुरुपुत्र विरळा । एकाजनार्दनीं लीळा । जाती वर्णाया ॥ ४ ॥

## आशीर्वाद

### श्रीतुकाराममहाराज

४५०७ आशीर्वाद तया जाती । आवडी चित्तीं देवाची ॥ १ ॥ कल्याण तें असे क्षेम । वाढे प्रेम आगळें ॥ २ ॥ भक्तिभाग्य गांठी धन । त्या नमन जीवासी ॥ ३ ॥ तुका म्हणे हरिचे दास । तेथें आस सकळ ॥ ४ ॥

४५०८ तयासाठीं वेंचूं वाणी । आइकों कानीं वारता ॥ १ ॥ क्षेम

माझे हरिजन । समाधान पुसतां त्यां ॥ २ ॥ परत्रींचे जे सांगाती । त्यांची याती न विचारीं ॥ ३ ॥ तुका म्हणे धैर्यवंतें । निर्मळ चित्तें तीं एक ॥ ४ ॥

४२०९ अभय उत्तर संतीं केलें दान । जालें समाधान चित्त तेणें ॥ १ ॥ आतां प्रेमरसें न घडे खंडण । द्यावें कृपादान नारायणा ॥ २ ॥ आलें जें उचित देह विभागासी । तेणें पायांपासीं उभीं असों ॥ ३ ॥ तुका म्हणे करी पूजन वैखरी । बोबडा उत्तरीं गातों गीत ॥ ४ ॥

४२१० असों मंत्रहीन क्रिया । नका चर्या विचारूं ॥ १ ॥ सेवेमधीं जमा धरा । कृपा करा शेवटीं ॥ २ ॥ विचारूनी ठायाठाव । येथें भाव राहिला ॥ ३ ॥ आतां तुकयापाशीं हेवा । नाहीं देवा तांतडी ॥ ४ ॥

४२११ जीवेंसाठीं यत्नभाव । त्याची नाव वळकट ॥ १ ॥ पैल-तीरा जातां कांहीं । संदेह नाहीं भवनदी ॥ २ ॥ विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ ३ ॥ तुका म्हणे भोळियांचा । देव साचा अंकित ॥ ४ ॥

---

# खेळिया

## श्रीतुकाराममहाराज

४२१२ खेळ मांडियेला वाळवंट घाई । नाचती वैष्णव भाई रे । क्रोध अभिमान केला पावटणी । एक एका लागतील पायीं रे ॥ १ ॥ नाचती आनंदकल्लोळीं । पवित्र गाणें नामावळी रे । कळि-काळावरी घातलीसे कास । एक एकाहूनी बळी रे ॥ २ ॥ गोपिचंदनउटी तुळशीच्या माळा । हार मिरविती गळां रे । टाळ मृदंग घाई पुष्प वरुषाव । अनुपम्य सुखसोहळा रे ॥ ३ ॥ लुब्धलीं नादीं लागली समाधी । मूढ जन नरनारी लोकां रे । पंडित ज्ञानी

योगी महानुभाव । एकाचि सिद्ध साधकां रे ॥ ४ ॥ वर्णाभिमान विसरलीं याती । एक एकां लोटांगणी जाती रे । निर्मळ चित्तें जालीं नवनीतें । पाषाणा पाझर फुटती रे ॥ ५ ॥ होतो जयजयकार गर्जत अंबर । मातले वैष्णव वीर रे । तुका म्हणे सोपी केली पायवाट । उतारावया भवसागर रे ॥ ६ ॥

४५१३ एके घाई खेळतां न पडसी डाई । दुचाळ्यानें ठकसील भाई रे । त्रिगुणांचे फेरीं थोर कष्टी होसी । या चौघांची तरी धरीं सोई रे ॥ १ ॥ खेळ खेळोनियां निराळाचि राहीं । सांडीं या विषयाची घाई रे । तेणेंचि खेळें बसवंत होसी । ऐसें सत्य जाणें माझ्या भाई रे ॥ २ ॥ शिंपियाचा पोर एक खेळिया नामा । तेणें विठ्ठल बसवंत केला रे । आपुल्या सवंगडिया शिकवूनी घाई । तेणें सतत फड जागविला रे । एक घाई खेळतां तो न चुकेचि कोठें । तया संतजन मानवले रे ॥ ३ ॥ ज्ञानदेव मुक्ताबाई वटेश्वर चांगा । सोपान आनंदें खेळती रे । कान्हो गोवारी त्यांनीं बसवंत केला । आपणभोंवती नाचती रे । सकळिकां मिळोनी एकीच घाई । त्याच्या ब्रह्मादिक लागती पायीं रे ॥ ४ ॥ रामा वसवंत कवीर खेळिया । जोडा बरवा मिळाला रे । पांचा संवगडिया एकाचि घाई । तेथें नाद बरवा उमटला रे । ब्रह्मादिक सुरवर मिळोनियां त्यांनीं । तोहि खेळिया निवडला रे ॥ ५ ॥ ब्राह्मणाचा पोर एक खेळिया भला । तेणें जन खेळकर केला रे । जनार्दन बसवंत करूनियां तेणें । वैष्णवांचा मेळा मिळविला रे । एकाचि घाई खेळतां खेळतो । आपणाचि बसवंत जाला रे ॥ ६ ॥ आणीक खेळिये होउनियां गेले । वर्णावया वाचा मज नाहीं रे । तुका म्हणे गडे हो हुशारूनि खेळा । पुढिलांची धरूनियां सोई रे । एकाचि घाई खेळतां जो चुकला । तो पडेल संसारा डाई रे ॥ ७ ॥

४५१४ बाराही सोळा गडियांचा मेळा । सतरावा बसवंत

खेळिया रे । जातिस पद रांखों जेणें टिपरिया घाई । अनुहातें वायें मांदळारे ॥ १ ॥ नाचत .पंढरिये जाऊं रे खेळिया । विठ्ठल रखुमाई पाहूं रे ॥ २ ॥ सा चहूं वेगळा अठराहि निराळा । गाऊं वाजवूं एक चाळा रे । विसरती पक्षी चारा येणें पाणी । तारुण्य देहभाव वाळा रे ॥ ३ ॥ आनंद तेथींचा मुकियासी वाचा । बहिरे ऐकती कानीं रे । आंधळयासी डोळे पांगळासी पाय । तुका म्हणे वृद्ध होती तरणे रे ॥ ४ ॥

४९१५ दोन्ही टिपरी एकाचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे । कुसरी अंगें मोडितील परी । मेळविती एका एक छंद रे ॥ १ ॥ कांहींच न वजे वांयां रे खेळिया । एकाचि बसवंत अवघियां रे । सम विषम तेथें होऊंच नेदी । जाणऊनि आगाळिया रे ॥ २ ॥ संत महंत सिद्ध खेळतील घाई । तेच सांभाळी माझ्या भाई रे । हात राखोन हाणिती टिपऱ्या । टिपरें मिळोनि जाय त्याची सोई रे ॥ ३ ॥ विटाळाचें अवघें जाईल वायां । काय ते शृंगारुनि काय रे । निवडुनि बाहेर काढिती निराळा । जो न मिळे संतांचिया घाई रे ॥ ४ ॥ प्रकाराचें काज नाहीं सोडीं लाज । निःशंक होऊनियां खेळें रे । नेणतीं नेणतींच एके पावलीं मान । विठ्ठल नामाचिया बळें रे ॥ ५ ॥ रोमांच गुडिया डोलविती अंगें । भाववळें खेळविती सोंगें रे । तुका म्हणे कंठ सद्गदित दाटे । या विठोबाच्या अंगसंगें रे ॥ ६ ॥

४९१६ या रे गडे हो धरूं घाई जाणतांहो नेणतां । नाम गाऊं टाळी वाहूं आपलिया हिता ॥ १ ॥ फावलें तें घ्यारे आतां प्रेमदाता पांडुरंग । आजी दिवस सोनियाचा वोडवला रंग ॥ २ ॥ हिंडती रानोरान भुजंग ते कांट्यावन । सुख तयांहून आम्हां गातां नाचतां रे ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रह्मादिकां सांवळें दुर्लभ सुखा । आजि येथें आलें फुका नाम मुखा कीर्तनीं ॥ ४ ॥

४५१७ भीमातीरीं एक वसविलें नगर । त्याचें नांव पंढरपुर रे । तेथील मोकासी चार भुजा त्यासी । बाइला सोळा हजार रे ॥ १ ॥ नाचत जाऊं त्याच्या गांवा रे खेळिया । सुख देईल विसावा रे । पुढें गेले ते निधाई जाले । वानितील त्याची सीमा रे ॥ २ ॥ वाळियां आगळा पाळी लोकपाळां । रिघ नाहीं कळिकाळा रे । पुंडलीक पाटील केली कुळवाडी । तो जाला भवदुःखावेगळा रे ॥ ३ ॥ संतसज्जनीं मांडिलीं दुकानें । जें जया पाहिजे तें आहे रे । भुक्ति मुक्ति फुकाचसाठीं । कोणी तयांकडे न पाहे रे ॥ ४ ॥ दोन्हीच हाट भरले घनदाट । अपार मिळाले वारकरी रे । न वजों म्हणती आम्ही वैकुंठा । जिहीं देखिली पंढरी रे ॥ ५ ॥ बहुत दिवस होती मज आस । आजी घडलें सायासीं रे । तुका म्हणे होय तुमचेनी पुण्यें । भेटी तया पायांसी रे ॥ ६ ॥

## श्रीनामदेवमहाराज

४५१८ नव्हे तेंचि कैसें झालें रे खेळिया । नाहीं तेंचि दिसूं लागलें रे । अरूप होतें तें रूपासि आलें । जीव शिव नाम पावलें रे ॥ १ ॥ आपलीच आवडी धरून खेळिया । आप आपणातें व्यालें रे । जोप नाकारणें केली बायको । तिनें एवढें वाढविलें रे ॥ २ ॥ ऐक खेळिया तुज सांगितलें ऐसें । जाणुनि खेळ खेळे रे ॥ ध्रु० ॥ बामनाचें पोर एक खेळासि न्यालें । तें बारा वर्षें लपालें रे । कांपत कांपत बाहेर आलें । तें नागवेंचि पळून गेलें रे ॥ ३ ॥ साहा तोंड्या एक सांभाचें बाळ त्यानें । बहुतचि दळ आटियेलें रे । खेळ खेळतां चक्र चाकियलें । तें कपाट फोडुनि गेलें रे ॥ ४ ॥ चहूं तोंड्याचा पोर एक नारद्या बावा । तो खेळियामाजीं आगळा रे । कुचाळि करुनी पोरें भांडवी । आपण राहे वेगळा रे ॥ ५ ॥ गंगा गौरी दोघी भांडवी । संन्यासी धाडिलें राना रे । खेळ खेळे परि ठायीं न सांपडे । तो एक खेळिया शहाणा रे ॥ ६ ॥ खेळियामाजीं हनुम्या शहाणा न पडे काम-

व्यसनीं रे। कामचि नाहीं तेथें क्रोधाचि कैंचा। तेथें कैंचें भांडण रे। रामा गड्याची आवडी मोठी। म्हणूनि लेंके पेणे रे ॥ ७ ॥ यादवांचा पोर एक गोप्या भला। तो बहुताचि खेळ खेळला रे। लहान थोर अवघे मारिलीं। खेळचि मोडूनि गेला रे ॥ ८ ॥ ऐसे खेळिये कोट्यान कोटी गणित नाहीं त्याला रे। विष्णुदास नामा म्हणे वडील हो पहा देहीं शोधुनी रे ॥ ९ ॥

---

## गोंधळ

### श्रीतुकाराममहाराज

४५१९ राजस सुंदर बाळा। पाहों आलिया सकळा वो। विंवीं विंबोनि ठेली। माझी परब्रह्म वेल्हाळा वो। कोटि रविशशि जिच्या। अंगींचिया लीळा हो ॥ १ ॥ राजस विठाबाई। माझें ध्यान तुझे पायीं वो। त्यजूनियां चौर्‍यांशी। लावीं आपुलिये सोई वो ॥ २ ॥ सकुमार साजिरीं। कैसीं पाउलें गोजिरीं वो। कंठीं तुळसीमाळा। उभी भीवरेच्या तिरीं वो। दंत हिरया ज्योती। शंख चक्र मिरवे करीं वो ॥ ३ ॥ निर्गुण निराकार। वेदां न कळेचि आकार वो। शेषादिक श्रमले। श्रुती न कळे तुझा पार वो। उभारोनी बाहे। भक्तां देत अभयकर वो ॥ ४ ॥ येऊनी पंढरपुरा। अवतरली सारंगधरा वो। देखोनि भक्तिभाव। ओसरली अमृतधारा वो। देऊनी प्रेमपान्हा। तुकयास्वामीनें किंकरा वो ॥ ५ ॥

४५२० सुदिन सुवेळ। तुझा मांडिला गोंधळ वो। पंच प्राण दिवटे। दोन्ही नेत्रांचे हिलाल वो ॥ १ ॥ पंढरपुरनिवासे। तुझे रंगीं नाचत असें वो। नवस पुरवीं माझा। मनींची जाणोनियां इच्छा वो ॥ २ ॥ मांडिला देव्हारा। तुझा त्रिभुवनामाझारीं वो। चौक साधियेला। नाभिकळस ठेविला वरा वो ॥ ३ ॥ बेसली देवता। पुढें

वष्णवांचें गाणें वो । उद्गारें गर्जती । कंठीं तुळसीचीं भूषणें वो ॥ ४ ॥ स्वानंदाचें ताटीं । धूप दीप पंचारती वो । ओवाळिली माता । विठाबाई पंचभूतीं वो ॥ ५ ॥ तुझें तुज पावलें । माझा नवस पुरवीं आतां वो । तुका म्हणे राखें । आपुलिया शरणागता वो ॥ ६ ॥

## श्रीकान्होबामहाराज

४५२१ सुंदर मुख साजिरें । कुंडलें मनोहर गोमटीं वो । नागर नागखोपा । केशव कस्तुरी मळवटीं वो । विशाळ व्यंकट नेत्र । वैजयंती तळपे कंठीं वो । कास पितांबराची । चंदन सुगंध साजे उटी वो ॥ १ ॥ अतिबरवंटा बाळा । आली सुलक्षणा गोंधळा वो । राजस तेजोराशी । मिरवी शिरोमणी वेल्हाळा वो । कोटि रवि शशिप्रभा तेजें लोपल्या सकळा वो । न कळे ब्रह्मादिकां । अनुपम्य इची लीळा वो ॥ २ ॥ सांवळी सुकुमार । गोरी भुजा शोभती चारी वो । सखोल वक्षस्थळ । सुढाळ पदक झळके वरी वो । करीं क्षुद्र घंटिका । शब्द करिताती माधुरी वो । गर्जत चरणीं वांकीं । अभिनव संगीत नृत्य करी वो ॥ ३ ॥ अष्टांगीं मंडित काय । वर्णावी रूपटेवणी वो । शोधिव शुद्ध रसाची ओतिली । सुगंध लावण्यखाणी वो । सर्वकळासंपन्न । मंजुळ बोले हास्यवदनीं वो । बहु रूपें नटली । आदिशक्ति नारायणी वो ॥ ४ ॥ घटस्थापना केली । पंढरपुर महानगरीं वो । आस्मानीं मंडप दिला । तिन्ही ताळांवरी वो । आरंभिला गोंधळ । इनें चंद्रभागेतिरीं वो । आली भक्तिकाजा । कृष्णाबाई योगेश्वरी वो ॥ ५ ॥ तेहतीस कोटी देव । चामुंडा अष्ट कोटी भैरव वो । आरत्या कुरवंड्या । करिती पुष्पांचा वरुषाव वो । नारद तुंबर गायन । ब्रह्मानंदें करिती गंधर्व वो । वंदी चरणरज तेथें । तुकयाचा बांधव वो ॥ ६ ॥

## एकनाथमहाराज

४५२२ अनादिसिद्ध पंढरपुर । नांदे विठाई सुंदर । कर ठेवुनी

कटावर । उभी रहासी निरंतर वो ॥ १ ॥ गोंधळा येवो जगदंबे । विटाबाई तूं मूळस्तंभे ॥ ध्रु० ॥ शुक सनकादिक गोंधळी । दिवटा भावें पोत पाजळी । मध्यें पुंडलिक दिवटा वळी ॥ २ ॥ ऐसा गोंधळ घाला निका । डाक वाजली तिहीं लोकां । शरण जनार्दनीं एका । गोंधळ गातां उदो उदो देखा ॥ ३ ॥

४०२३ अष्टधातूचें देवालय रचिलें वो । दिव्य तगट नवविधरत्नें जडविलें वो । चित्रविचित्र सुचित्र शोभा तें आणिलें वो । रंगमंडप पीठीं तुजलागीं स्थापियलें वो ॥ १ ॥ पंढरपूर निवासिनी तुझा गोंधळ मांडिला वो । साळुंकी कामक्रोधा वैराग्यदिवटा घेतिला वो ॥ ध्रु० ॥ हरीजन सर्व मिळोनी आनंदें नाचती वो । भावें पूजन अर्चन सद्भावें करिती वो । धूप दीप नैवेद्य चतुर्विध अर्पिती वो । समर्पोनि पूजा विठ्ठलनामें गर्जती वो ॥ २ ॥ भीवरेमाझारीं गोंधळ मांडिला वो । पुंडलिक दिवटा मध्यभागीं स्थापिला हो । जेणें पाहिलें पंढरपुर न रुचे आणिक क्षेत्र त्याला वो । एकाजनार्दनीं ऐसा ठावो स्थिर धरियेला वो ॥ ३ ॥

४०२४ माझे कुळींची कुळस्वामिनी । विठाई जगत्रयजननी । येई वो पंढरपुरवासिनी । ठेविले दोनी कर जघनीं । उभी सखीस-जनी ॥ १ ॥ येई पंडलीक वरदायिनी । विश्वजननी । रंगा येई वो ॥ ध्रु० ॥ मध्यें सिंहासन घातलें । प्रमाण चौक हे साधिले । ज्ञान कळस वर ठेविले । पूर्ण भरियले । धुप दाविले । सुवासें करुनी ॥ २ ॥ सभामंडप शोभला । भक्तिचांदवा दिधला । उदो उदो शब्द गाजला । रंग माजला । वेद बोलिला । मूळची ध्वनी ॥ ३ ॥ शुक सनकादिक गोंधळी । जीव शीव घेउनी संबळी । गाती हरिची नामावळी । मातले बळी । प्रेम कल्लोळीं । सुखाच सदनीं ॥ ४ ॥ ऐसा गोंधळ घातीला । भला परमार्थ लुटिला । एकाजनार्दनीं भला । ऐक्य साधिला । ठाव आपुला । लाभ त्रिभुवनीं ॥ ५ ॥

४५२५ सुवेळ सुदिन तुझा गोंधळ मांडिला वो । ज्ञान वैराग्याचा वरती फुलवरा बांधिला वो । चंद्र सूर्य दोन्ही यांचा पोत पाजाळिला वो । घालुनी सिंहासन वरुते घट स्थापियेला वो ॥ १ ॥ उदो बोला उदो उदो सद्‌गुरु माउलीचा वो ॥ध्रु०॥ प्रवृत्ती निवृत्तीचें घालुनि शुद्धासन वो । ध्येय ध्याता ध्यान प्रक्षाळिलें चरण वो । कायावाचा मनें एकविध केलें अर्चन वो । द्वैत अद्वैत भावें दिलें आचमन वो ॥ २ ॥ भक्ति वैराग्य ज्ञान यांहीं पूजियली अंबा वो । सद्रूप चिद्रूप पाहुनी प्रसन्न जगदंबा वो । एकाजनार्दनीं शरण मूळकंदंबा वो । त्राहे त्राहे अंबे तुझा दास आहे उभा वो ॥ ३ ॥

४५२६ अनादि अंबिका भगवती । बोध परडी घेउनी हातीं । पोत ज्ञानाचा पाजळती । उदो उदो भक्त नाचती ॥ १ ॥ गोंधळा येईं वो जगदंबे मूळ पीठ तूं अंबे ॥ ध्रु० ॥ व्यास वसिष्ठ शुक गोंधळीं । नाचताती सोहंमेळीं । द्वैतभाव विसरुनी वळी । खेळती अंबे तुझे गोंधळीं ॥ २ ॥ मुगुटमणी पुंडलीक । तेहतीस कोटी देव नायक । गोंधळ घालतील कौतुक । एकाजनार्दनीं नाचे देव ॥ ३ ॥

४५२७ स्वर्ग मृत्यु पाताळ त्याचा मंडप घातिला वो । चार वेदांचा फुलवरा बांधिला हो । शास्त्रें पुराणें अनुवादती तुझा गोंधळ मांडिला वो ॥ १ ॥ उदो बोला उदो बोला कृष्णाबाई माउलीचा वो ॥ ध्रु० ॥ जीवशिव संबळ घेउनी आनंदें नाचती वो । अठ्यांयशी सहस्त्र ऋषी दिवटे तिष्ठती वो । तेहतीस कोटी देव चामुंडा उदो उदो म्हणती वो ॥ २ ॥ आषाढी कार्तिकी तुझ्या गोंधळाची दाटी वो । पुंडलीक दिवटा शोभे वाळुवंटी वो । एकाजनार्दनीं अंबा उभी कर ठेवुनी कटीं वो ॥ ३ ॥

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४५२८ तूं विटेवरी सखये बाई हो करीं कृपा । माझें मन लागो तुझ्या पायीं हो करीं कृपा । तूं सावळे सुंदरी हो करीं कृपा । लावण्य

मनोहरी हो करी कृपा । निजभक्तां करुणाकरी हो करी कृपा ॥ १ ॥ पंढरपुरीं राहिली । डोळां पाहिली । संतें देखिली । वरुनी विठाई वरुनी विठाई । सच्चिदानंद अंबाबाई हो करीं कृपा । उजळ कुळ-दीपा । बोध करी सोपा । येउनी लवलाही येउनी लवलाही ॥ ध्रु० ॥ तुझा देव्हारा मांडिला हो करीं कृपा । चौक आसनीं कळस ठेविला हो करीं कृपा । प्रेमचांदवा वर दिधला हो करीं कृपा । ज्ञान गादी दिली बैसावया हो करीं कृपा । वरी बैसविली आदी माया हो करीं कृपा । काम क्रोध मदमत्सर । दंभ अहंकार । त्यांचें बळ फार । सर्व सुख देई सर्व सुख देई ॥ २ ॥ शुक सनकादिक गोंधळी हो करीं कृपा । नाचताती प्रेमकल्लोळीं हो करीं कृपा । उदो उदो शब्द आरोळी हो करीं कृपा । पुढें पुंडलीक दिवटा हो करीं कृपा । त्यानें मार्ग दाविला निटा हो करीं कृपा । आई दाविली मूळपीठा हो करीं कृपा । बापरखुमादेवीवरु । सुखसागरु । त्याला नमस्कारु । सर्व सुख देई सर्व सुख देई ॥ ३ ॥

---

## दसरा

### श्रीकान्होबामहाराज

४५२९ पवित्र सुदिन उत्तम दिवस दसरा । सांपडला तो साधा आजि मुहूर्त बरा । गर्जा जयजयकार हरि हृदयीं धरा । आळस नका करूं लहानां सांगतों थोरा ॥ १ ॥ या हो या हो बाइयांनो निघाले हरी । सिलंगना घेउनि वेगीं आरत्या करीं । ओवाळूं श्रीमुख वंदूं पाउलें शिरीं । आम्हां दैव आलें येथें घरिंच्या घरीं ॥ २ ॥ अक्षय मुहूर्त औटामध्यें साधे तें । मग येरी जैसें तैसें होत जातें । म्हणोनि मागें पुढें कोणीं न पहावें येथें । सांडा परतें काम जाऊं हरीसांगातें ॥ ३ ॥ बहुतां बहुतां रीती चित्तीं धरा हे मनीं । नका गई करूं आइकाल ज्या कानीं । मग हें सुख कधीं न देखाल स्वप्नीं । उरेल

हाय हाय मागें होईल काहाणी ॥ ४ ॥ ऐसियास वंचिती त्यांच्या अभाग्या पार । नाहीं नाहीं सत्य जाणा निर्धार । हे वेळ घटिका न ये अजरामर । कळलें असों द्या मग पटतील विचार ॥ ५ ॥ जयासाठीं ब्रह्मादिक जालेती पिसे । उच्छिष्टाकारणें देव जळीं जाले मासे । अर्धांगीं विश्वमाता लक्षुमी वसे । तो हा तुकयाबंधु म्हणे आले अनायासें ॥ ६ ॥

## धेनु

### श्रीनामदेवमहाराज

४५३० वेणुनादीं चरे पाणी पी सीवरे । ते धेनु हुंबरे वत्सालागीं ॥ १ ॥ वाणें ते सांवळी नामें ते श्रीधरा । चरे वसुंधरा चवदा भुवनें ॥ २ ॥ केशव नामें गाय माधव नामें गाय । विठ्ठल नामें गाय कामधेनु ॥ ३ ॥ प्रेमें ते पान्हावे भक्ताघरीं जाय । भुकेलिया खाय पातकांसी ॥ ४ ॥ नामा म्हणे गाय भाग्यवंता घरीं । पाप्या जन्मवरी पाठी लागे ॥ ५ ॥

४५३१ परा पश्यंति मध्यमा वैखरी । ते गाय दुभे वैष्णवाघरीं ॥ १ ॥ ते एके विठ्ठलें पंढरी राखिली । दुभावया दिधली पुंडलीका ॥ २ ॥ चारी वेद मुखीं धरूनियां राहे । विठ्ठलाचे द्वारीं नामा गाये ॥ ३ ॥

---

## कापडी

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

४५३२ आम्ही कापडी रे आम्ही कापडी रे । पापें बारा वाटा पळती बापुडीं रे ॥ १ ॥ पंढरपुरीचे आम्ही कापडी रे । उत्तरपंथींचे आम्ही कापडी रे ॥ २ ॥ आजि पाहालें रे आजि पाहालें रे । संतसंगति सुख जालें रे ॥ ३ ॥ समता कावडी रे समता कावडी रे ।

माजि नामामृत भरिलें आवडि रे ॥ ४ ॥ येणें न घडे रे जाणें न घडे रे । निजसुख कोंदलें पाहातां चहुंकडे रे ॥ ५ ॥ नलगे दंड-धरें नलगे मुंडणें रे । नाम म्हणोनि कर्माकर्म खंडणें रे ॥ ६ ॥ दुःख फिटलें रे दुःख फिटलें रे । बापरखुमादेविवर विठ्ठलें रे ॥ ७ ॥

४५३३ ॐनमो शिवा आदि । कावडि घेतली खांदीं । मिळाली संतमांदी । त्याचे रजरेणु वंदी रे ॥ १ ॥ शिवनाम शीतळ मुखीं । सेवि पां कापडिया रे । दुडदुडदुडदुडुडुडुडुडुडुडु । पळ सुटला कळिकाळा बापडीया रे ॥ ध्रु० ॥ गुरुलिंग जंगम । त्यानें दाविला आगम । आधिव्याधि झाली सम । तेणें पावलों विश्राम रे ॥ २ ॥ जवळी असतां जगजीवन । कां धांडोळीसी वन । एकाग्र करीं मन । तेणें होईल समाधानरे ॥ ३ ॥ देहभाव जेथें विरे । तें साधन दिधलें पुरे । बापरखुदेविवरे विठ्ठलुरे विठ्ठलु रे विठ्ठलु रे ॥ ४ ॥

---

## वाळछंद

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

४५३४ अलक्षलक्षीं मी लक्षीं । तेथें दिसती दोही पक्षी । वेद शास्त्रां हेची साक्षी । चंद्रसूर्यासहित ॥ मागेन स्वानुभव अंगुलें । पांचां तत्त्वांचें सानुलें । व्यर्थ इंद्रियें भोगिलें । नाहीं रंगलें संत-चरणीं ॥ १ ॥ वाळछंदो बाबा वाळछंदो ॥ ध्रु० ॥ रामकृष्ण नित्य उदो । हृदयकाळिके भाव भेदो । निवृत्तिसहित शरीर निंदो । नित्य उदो तुझाची ॥ २ ॥ क्षीरसिंधुही दुहिला । चतुर्द-शरत्नीं भरला । नेघे तेथील साउला । मज अबोला प्रपं-चेंसी ॥ दान देगा उदारश्रेष्ठा । परब्रह्म तूं वैकुंठा । मुक्तिमार्गीचा चोहटा । फुकटा नेघे तया ॥ ३ ॥ पृथ्वीतळ राज्यमद । मी नेघें नेणें हेंही पद । रामकृष्ण वाचे गोविंद । हाचि छंद तुझ्या पंथें ॥

संमतीचि यज्ञयाग । या न करीं भागाभाग । तूंचि होऊनि सर्वांग । सर्वे सेवा मज देईं ॥ ४ ॥ वृत्तिसहित मज रूपवीं । माझें मन चरणीं ठेवीं । निवृत्ति पदोपदीं गोवीं । तूं गोसावी दीनोद्धरण ॥ सात पांच तीन मेळा । या नेघे तत्वांचा सोहळा । रज तमाचा कंटाळा । हृदयीं जिव्हाळा हरी वसो ॥ ५ ॥ श्वेत पीत नेघे वस्त्र । ज्ञान-विज्ञान नेघे शास्त्र । स्वर्गमृत्यु पाताळपात्र । निल वक्त्र हरी देईं ॥ चंद्रसूर्यमहेंद्रपदें । ध्रुवादिकांची आनंदें । तें मी नेघे गा आल्हादें । तुझ्या ब्रीदें करीन घोष ॥ ६ ॥ करचरणांसि इंद्रियवृत्ति । तुझ्या ठायीं तूंचि होती । मी माझी उरों नेदी कीर्ति । हें दान श्रीपती मज द्यावें ॥ ७ ॥ शांती दया क्षमा ऋद्धी । हेहि पाहतां मज उपाधी । तुझीचिया नामाची समाधी । कृपानिधी मज द्यावी ॥ ८ ॥ बाप-रखुमादेविवरु तुष्टला । दान घे घे म्हणोनि बोलला । अजानवृक्ष पाल्हाईला । मग बोलिला विठ्ठल हरी ॥ ९ ॥ पुंडलिकें केलें रे कोडें । तें तुवां मागीतलें रे निवाडें । मी तुज हृदयीं सांपडे । हें त्वां केलें ज्ञानदेवा ॥ १० ॥ ज्ञानदेवें घेतलें दान । हृदयीं धरुनीयां ध्यान । समाधी बैसला निर्वाण । कथा कीर्तन करीतु ॥ ११ ॥ बाळछंदो बावीस जन्में । तोडिलीं भवाब्धीचीं कर्मे । चंद्रार्क तारांगणें । रश्मी दान घेतला हरी ॥ १२ ॥

---

## डौर

### श्रीज्ञानेश्वरमहाराज

४१३९ सभा समस्त साधुसंतांची । महामुनी विरक्तांची । पंडित पाठक ज्ञानियांची । समस्तांसी विनवणी ॥ १ ॥ या पहिलिया पाहाऱ्यांत । डौरकार सांगेल मात । समस्त रिझाल तुम्ही संत । एका निवांत तुम्ही सर्व ॥ २ ॥ आतां परिसा पांच नाद । पांच नादांचे पांच भेद । पहिला नाद चटपट चटपट । दुसरा खटपट खटपट ।

तिसरा लटपट लटपट । चौथा फटफट फटफट । पांचवा तळमळ तळमळ ॥ ३ ॥ पहिला नाद चटपट चटपट । शिखासूत्र त्यजूनी सपाट । विरजा होमिला हट्ट । परि अपुट लैसाची ॥ ४ ॥ वायां केली तडातोडी । वृथा त्यजिली सूत्रशेंडी । परि विषयवासना न सोडी । उपाधि गाढी श्रीपादा ॥ ५ ॥ सन्यास घेउनी कांचा । जिव्हा शिश्न घेघलें लांचा । विटंबु केला बापुडे कायेचा । चटपट चटपट मनीचें मनी वसेगा दादेनो ॥ ६ ॥ खटपट खटपट शास्त्रग्रंथ अलोट । बांधोनी व्युत्पत्तीची मोट । सैरा सुनाट धांवती ॥ ७ ॥ वादतर्कालागी धांवे । भरला विषयाचे हावें । वरिवरि वृंदावन दिसे बरवें । परि अंतरीं कडुवट गा दादेनो ॥ ८ ॥ लटपट लटपट । मेळवूनि शिष्यांचा थाट । अद्वैत ज्ञानाचा बोभाट । भरिला हाट जीविकेसी ॥ ९ ॥ गुरु लोभी धनमान । शिष्य लोभी अति दीन । दोघांसी लटपट लागली पूर्ण । कोण कोणासी आवरेना ॥ १० ॥ ब्रह्मज्ञान जाहलें वोस । पाहिले दुःखाचे दिवस । अंतीं जाले कासावीस । कामपाश समंध गा दादेनो ॥ ११ ॥ आतां फटफट फटफट । या नादाची गोठ नीट । बोळगोनी औटपीठ । ऊर्ध्व पाट भेदिती ॥ १२ ॥ मन पवन समरसोनी । ब्रह्मरंध्रीं लीन होउनी । हा अभिमान वाहोनी । जालेपणीं फुंजती ॥ १३ ॥ तें वोखटें गा हौरकारा । करोनि देहाचा मातेरा । भरूं पाहाती सुषुम्नाद्वारा । परि असाध्य खरा तो मार्गु ॥ १४ ॥ ऐसी जालिया ब्रह्मप्राप्ति । शिणतोच अहोरात्रीं । अंति विरोध भगवद्भक्ती । या लागीं बोलती फटफट गा दादेनो ॥ १५ ॥ आतां तळमळ तळमळ । धरणीं पारणीं हळाहाळ । तीर्थयात्रेलागीं चळपळ । घेतलें बळ तपाचें ॥ १६ ॥ जपध्यान मंत्रावळी । नाना दैवतें आराधिलीं । शेखीं काळें नरडी चेपिली । दुःखें तळमळी या हेतु ॥ १७ ॥ ऐसे भेद नादाचे । मनीं धरा विवेकाचे । ज्ञानदेव बोले निवृत्तीचें । बोला वाचें हरिनाम गा दादेनो ॥ १८ ॥

---

# अंबुला

## श्रीज्ञानेश्वरमहाराज

४१३६ विचारितां देहीं अविचार अंबुला । न साहे वो साहिला काय करूं ॥ १ ॥ सखि सांगे गोष्टी चाल कृष्णभेटी । आम्ही तुम्ही शेवटीं वैकुंठीं नांदों ॥ २ ॥ येरि सांगे आवो जावें वो प्रवृत्ति । तेथ वरि गती येतां नये ॥ ३ ॥ ज्ञानदेवो प्रवृत्ति निघालिया तत्परा । हरि आला सत्वरा तया भेटी ॥ ४ ॥

४१३७ न गमे हा संसारु म्हणोनि केला भ्रतारु । लोक अनाचारु म्हणती मज ॥ १ ॥ चंचल जालिये म्हणतील मज । कवणा सांगूं हें जिवीचें गूज ॥ २ ॥ बापरखुमादेविवरा विठ्ठलावांचूनि नेणें । सतत राहणें याचे पायीं ॥ ३ ॥

४१३८ अंबुला माहेरीं भोगे धणीवरी । मग तया श्रीहरी सांगो गूज ॥ १ ॥ माझें सुख मीच भोगीन । क्षेमासि निगेन अंगोअंगीं ॥ २ ॥ सांडोनि कुळाचार जालिये निर्लज्ज । तुम्हीं काय मज शिकवाल ॥ ३ ॥ रखुमादेविवरु विठ्ठल मातापिता । मी त्याची दुहिता सर्वांगणी ॥ ४ ॥

४१३९ जियेचा अंबुला रुसोनियां जाये । तियेचें जीवित्व जळो गे माय ॥ १ ॥ आम्ही रुसों नेणों आम्हा रुसो नेणों । अंबुलिया रुसों नेदूं गे वाईये ॥ २ ॥ ज्याच्यानि अंगें जोडला हा ठावो । रखुमादेविवरु नाहो बुझाविला ॥ ३ ॥

४१४० अष्टभावें भोगितां न पुरे धणी । देह उगाणी केली देवा ॥ १ ॥ अंबुला निघाला अंबुल्या गांवा । मी वो तयासवा जानू असें ॥ २ ॥ रखुमादेविवरु लागलासे चोरु । मार्ग बुडाविला घराचारू ॥ ३ ॥

४१४१ दुरळु अंबुला केला गे बाई । ब्रह्मादिकां तो न पडे ठाई ॥ १ ॥ हालों नये चालों नये । सैरावैरा कांहीं बोलों नये ॥ २ ॥

अंबुला केला घावें जरी मन । बुडती बेताळीस जाती नाक कान ॥ ३ ॥ मागील केलें तें अवघेंचि वावो । बापरखुमादेविवरु विठ्ठलु नाहो ॥ ४ ॥

४१४२ सुची अंबुला ज्ञान घराचारु । भक्ति हें साकारु आवडली ॥ १ ॥ काय सांगूं माय निर्गुण अंबुला । शून्यीं मिळाला नाहीं ठाईं ॥ २ ॥ रखुमादेविवरु साकार अंबुला । मज पूर्ण आला वाईयेवो ॥ ३ ॥

४१४३ अंबुला विकून घेती वस्तु । घराचार समस्तु बुडविला ॥ १ ॥ उठोनि गेलिये अज्ञान म्हणाल । म्यां तंव कैवल्य जोडियेलें ॥ २ ॥ अंबुला सांडूनि परावा केला । संसार सांडिला काय सांगों ॥ ३ ॥ रखुमादेविवरें मज पर्णुनि नेलें । सुखचि दिधलें काय सांगों ॥ ४ ॥

४१४४ सगुण अंबुला निर्गुण पैं जाला । घराचार समस्त बुडविला ॥ १ ॥ आशा हे सासु असतां बुडविली । शांति माउली भेटों आली ॥ २ ॥ रखुमादेवीवर विठ्ठलेंसी चाड । अद्वैतेंसी माळ घेऊनि ठेलें ॥ ३ ॥

४१४५ अंबुला होता तो लेंकरू जाला । घराचार बुडविला बाईयांनो ॥ १ ॥ ज्ञानी अकुळी म्हणाल उणें । तुम्ही जाणते जाणा परमार्थ खुणें ॥ २ ॥ रखुमादेविवरें विठ्ठलें भोगियेलें । लंपट जाहालेये सहजानंदीं ॥ ३ ॥

४१४६ स्वरूपाचेनि भानें बिंब हें भासिलें । परि खुण न बोले काय करूं ॥ रूपाचा दर्पण रूपेंविण पाहिला । दृष्टाहि निमाला नवल कायी ॥ १ ॥ जिकडे जाय तिकडे दर्शन सांगाती । उदो ना अस्तु हे नाहीं द्वैतस्थिति ॥ २ ॥ पूर्वबिंब शून्य हे शब्दचि निमाले । अनाम्याचेनि भले होतें सुखें ॥ त्यासी रूप नांव ठाव संकल्पें आणिला । अरूपाच्या बोला नाम ठेला ॥ ३ ॥ बापरखुमा-

देविळ विठ्ठलाचें एक । ओवी समसुख ऐक्यपणें ॥ अदृश्य अंगुला जाणतां निवाविजे । परि सेज स्वभावीं दुजें नाहीं त्या ॥ ४ ॥

४५४७ सुखाचा निधि सुखसागर जोडला । म्हणोनि काळा बाहुला मज पाचारि गे माय ॥ १ ॥ प्रेम नव्हाळी मज झाली दिवाळी । काळे वनमाळी आले घरा गे माय ॥ २ ॥ बापरखुमादेवि-वर पुरोनि उरला । सबाह्यजु भरला माझे हृदयीं गे माये ॥ ३ ॥

---

## प्रासंगीक अभंग

### धरणेकऱ्याचा अभंग

४५४८ श्री पंढरीशा पतितपावना । एक विज्ञापना पायांपाशीं ॥ १ ॥ अनाथा जीवांचा तूं काज कैवारी । ऐसी चराचरीं ब्रीदा-वळी ॥ २ ॥ न सांगतां कळे अंतरींचें गुज । आतां तुम्ही लाज तुज देवा ॥ ३ ॥ आळिकर त्याचें करिसी समाधान । अभयाचें दान देऊ-नियां ॥ ४ ॥ तुका म्हणे तूंचि खेळें दोन्ही ठायीं । नसेल तो देई धीर मना ॥ ५ ॥

### तुकाराममहाराजांनीं वारकऱ्यांबरोबर निरोप पाठविला ते अभंग

४५४९ तुम्ही संतजनीं । माझी करावी विनवणी ॥ १ ॥ काय तुक्याचा अन्याय । त्यासी अंतरले पाय ॥ २ ॥ आका बहुतां रीती । माझी कींव काकुलती ॥ ३ ॥ न देखे पंढरी । तुका चरण विटे-वरी ॥ ४ ॥

४५५० येती वारकरी । वाट पाहातों तोंवरी ॥ १ ॥ घालूनियां दंडवत । पुसेन निरोपाची मात ॥ २ ॥ पत्र हातीं दिलें । तया तेथें पाठविलें ॥ ३ ॥ तुका म्हणे येती । जाइन सामोरा पुढती ॥ ४ ॥

४५५१ रुळे महाद्वारीं । पायांखालील पायरी ॥ १ ॥ तैसे माझे दंडवत । निरोप सांगतील संत ॥ २ ॥ पडे दंडकाठी । देह मळती-सवा लोटी ॥ ३ ॥ तुका म्हणे बाळ । लोळे न धरितां सांभाळ ॥ ४ ॥

४५७२ होईल कृपादान । तरी मी येईन धांवोन ॥ १ ॥ होती संतांचिया भेटी । आनंदें नाचों वाळवंटीं ॥ २ ॥ रिघेन मातेपुढें । स्तनपान करीन कोडें ॥ ३ ॥ तुका म्हणे ताप । हरती देखोनियां बाप ॥ ४ ॥

४५७३ परिसोनी उत्तर । जाब देईजे सत्वर ॥ १ ॥ जरी तूं होसी कृपावंत । तरी हा बोलावीं पतित ॥ २ ॥ नाणीं कांहीं मना । करूनि पापाच्या उगाणा ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं । काय शक्ती तुझे पायीं ॥ ४ ॥

४५७४ कोण्या सुखें ऐसी ऐकेन मी मात । चाल तुज पंढरीनाथ बोलावितो ॥ १ ॥ मग मी न धरीं आस मागील बोभाट । वेगीं धरिन वाट माहेराची ॥ २ ॥ निरांजलें चित्त करितें तळमळ । केधवां देखती मूळ आलें डोळे ॥ ३ ॥ तुका म्हणे कई आम्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥ ४ ॥

४५७५ कां माझे पंढरी न देखती डोळे । काय हें न कळे पाप त्यांचें ॥ १ ॥ पाय पंथें कां हे न चलती वाट । कोण हें अदृष्ट कर्म वळी ॥ २ ॥ कां हें पायांवरी न पडे मस्तक । क्षेम कां हस्तक न पवती ॥ ३ ॥ कां या इंद्रियांची न पुरे वासना । पवित्र होइना जिव्हा कीर्ती ॥ ४ ॥ तुका म्हणे कई जाऊनि मोटळें । पडेन हा लोळें महाद्वारीं ॥ ५ ॥

४५७६ कां माझा विसर पडला मायबापा । सांडियेली कृपा कोण्या गुणें ॥ १ ॥ कैसा कंठूनियां राहों संवसार । काय एक धीर देऊं मना ॥ २ ॥ नाहीं निरोपाची पावली वारता । न करावी ते चिंता ऐसी कांहीं ॥ ३ ॥ तुका म्हणे एक वेंचुनी वचन । नाहीं समाधान केलें माझें ॥ ४ ॥

४५७७ आतां पाहों पंथ माहेराची वाट । कामाचा बोभाट पडो सुखें ॥ १ ॥ काय करूं आतां न गमेसें झालें । बहुत सोसिलें बहु

दीस ॥ २ ॥ अर लागे पाठीं चित्ता उभें वारें । आपुलें ते झुरे पाहावया ॥ ३ ॥ तुका म्हणे जीव गेला तरी जावो । धरिला तो देव भावसिद्धी ॥ ४ ॥

४९५८ काय झालें नेणों माझिया कपाळा । न देखिजे डोळां मूळ येतां ॥ १ ॥ बहु दीस पाहे वचनाची वास । धरिलें उदास पांडुरंगा ॥ २ ॥ नाहीं निरोपाचें पावलें उत्तर । ऐसें तो निष्ठुर न पाहिजे ॥ ३ ॥ पडिला विसर किंवा कांहीं धंदा । त्याहुनी गोविंदा जरूरसा ॥ ४ ॥ तुका म्हणे आलें वेचावें सांकडें । देणें घेणें पुढें तोंहीं धाक ॥ ५ ॥

४९५९ एवढा संकोच तरि कां व्यालासी । आम्ही कोणापासीं तोंड वासूं ॥ १ ॥ कोण मज दुजें शिणलें भागलें । जरी मोकलिलें तुम्ही देवा ॥ २ ॥ कवणाची वाट पाहों कोणीकडे । कोण मज ओढे जिवलग ॥ ३ ॥ कोण जाणे माझें जीवींचें सांकडें । उगवील कोडें संकटाचें ॥ ४ ॥ तुका म्हणे तुम्ही देखिली निश्चिंती । काय माझे चित्तीं पांडुरंगा ॥ ५ ॥

४९६० आतां आशीर्वाद । माझा आसो सुखें नांद ॥ १ ॥ म्हणसी कोण तरी काळें । आहेतसी माझीं बाळें ॥ २ ॥ दुरी दुरांतर । तरी घेसी समाचार ॥ ३ ॥ नेसी कधीं तरी । तुका म्हणे लाज हरी ॥ ४ ॥

४९६१ बोलिलों तें आतां । कांहीं जाणतां नेणतां ॥ १ ॥ क्षमा करावे अन्याय । पांडुरंगे माझे माय ॥ २ ॥ स्तुती निंदा केली । लागे पाहिजे साहिली ॥ ३ ॥ तुका म्हणे लाड । दिला तैसें पुरवा कोड ॥ ४ ॥

## वारकरी परत येईतोंपर्यंत मनाची स्थिती

४९६२ माहेरींचा काय येईल निरोप । म्हणऊनी झोंप नाहीं डोळां ॥ १ ॥ वाट पाहे आस धरूनियां जीवीं । निडळा हे ठेवीं

